आंतरभारती : पुष्प तिसरे

# कन्नड-मराठी शब्दकोश

संपादक

श्री. पुंडलीकजी कातगडे



# निवेदन

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. कमीजास्त प्रमाणात लेखनिविष्ट व लोकांच्या दैनंदिन व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या कमीत कमी १६ ते २२ भाषा भारतात आहेत. भारतीय १४ भाषा भारताच्या संविधानातील अनुसूचीत मान्य केलेल्या आहेत. हिंदी, उर्दू, बंगाली, पंजाबी, काश्मिरी, सिंधी, असामी, उडिया, गुजराती, मराठी, तेलगु, कानडी, तामीळ व मल्याळम् या तर संघराज्यमान्य भाषा आहेतच; त्याशिवाय भोजपुरी, मैथिली, राजस्थानी, कोकणी, तुळू, नेपाळी इत्यादी भारतीय भाषाही लेखनिविष्ट भाषा म्हणून समजल्या जातात. शिवाय उपभाषा किंवा बोलीभाषा म्हणून परिगणन केल्यास त्यांची संख्या २०० ते २५० च्या दरम्यान उपलब्ध होते.

भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशांतील एकराष्ट्र व एकभाषा अशा समीकरणाची नाही. अपवादात्मक स्वित्झर्लंड, कॅनडा इत्यादी छोटी राष्ट्रे सोडल्यास बाकीच्या पश्चिमी राष्ट्रांची एकात्मता ही भाषिक एकात्मतेशी समांतर आहे. उदयाला आलेल्या व वाढीस लागलेल्या वा महनीय परिणतपदास पोहोचलेल्या जगातील राष्ट्रांत भारत हेच एक राष्ट्र एकात्मक असून त्याच्यातील प्रत्येक एकभाषिक प्रदेश युरोपातील मोठ्या प्रगत राष्ट्राएवढा आहे. येथे वैविध्यपूर्ण, वैचित्र्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १२ तरी भाषा आहेत.

या सर्व भारतीय भाषांच्या व साहित्याच्या देवघेवीची प्रक्रिया व सांस्कृतिक व वैचारिक विनिमयाची प्रक्रिया संस्कृत भाषेच्या द्वारे व धर्माच्या द्वारेच आजपर्यंत झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या, पश्चिमी ज्ञानाच्या व पश्चिमी आधुनिक शिक्षणाच्या द्वारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत.

परंतु, या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास अन्योन्यसंबंध आवश्यक तितका प्रभावी स्वरूपात निर्माण होत नाही. वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव, परंपरागत धर्म व इंग्लिश भाषा यांच्या द्वारेच राखली जात आहे. हिंदी, गुजराती, मराठी, बंगाली, पंजाबी, असामी, उडिया, नेपाळी, काश्मिरी व उर्दू यांच्यामध्ये त्या इंडो-आर्यन भाषा असल्यामुळे बरेच साहश्य आहे. म्हणून त्यांत शब्दांची व कल्पनांची देवघेव आपोआप जितकी होते त्यापेक्षा दक्षिणेकडील तेलगु, तामीळ, मल्याळम् व कानडी या द्रविडी भाषा व वर उल्लेखिलेल्या इंडो-आर्यन भाषा यांच्यामध्ये त्या मानाने फारच कमी देवघेव होते. ही परस्पर देवघेव विपुल प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे.

याकरिता महत्त्वाचा उपाय म्हणजे प्रत्येक प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहामध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू व बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्यप्रदेशीय भाषांतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने, भावार्थ न गमावता, भाषांतरित व रूपांतरित करण्यास समर्थ झालेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने आंतरभारतीय योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे मराठी सुशिक्षित मनुष्यास उर्दू, बंगाली, कानडी, गुजराती इत्यादी इंडो-आर्यन व द्रविडी भाषा स्वप्रयत्नाने शिकता याव्यात म्हणून प्रत्येक भाषेचा द्विभाषिक कोश (दोन्ही प्रकारे म्हणजे उर्दू-मराठी आणि मराठी-उर्दू असे), भाषा प्रवेश आणिवाचनपाठमाला अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. आतापर्यंत या आंतर-भारतीय योजनेत गुजराती-मराठी शब्दकोश, उर्दू-मराठी शब्दकोश, गुजराती भाषाप्रवेश ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

याच आंतभारतीय योजनेपैकी, संकलक-संपादक श्री. पुंडलीकजी कातगडे, बेळगाव यांनी रचलेला कन्नड-मराठी शब्दकोश छापून वाचकाच्या हाती देण्यात आम्हास समाधान वाटत आहे. अन्य भाषांप्रमाणेच कन्नडचाही भाषाप्रवेश व वाचनपाठमाला मराठी वाचकांच्या हाती देण्यास लवकर संधी मिळेल अशी कार्यवाही आम्ही करीत आहोत. या कोशाच्या संपादनाचे काम श्री. पुंडलीकजी कातगडे यांनी आस्थेने केले त्याबद्दल त्यांचे आम्ही हार्दिक आभार मानतो. त्याचप्रमाणे मौज मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. वि. पु. भागवत यांनी छपाईचे काम काळजीपूर्वक करून दिल्याबद्दल त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ.

सचिवालय, मुंबई – ३२
गांधीजयंति
२ ऑक्टोबर १९६९

# प्रस्तावना

'संस्कृत' देववाणी आहे. आणि देववाणीतच वेद प्रथम प्रगट झाले. जगांतील सर्व भाषांपेक्षां वेद हेच आदिवाङ्मय म्हणून सर्वांनी मान्य केलेलें आहे. अर्थात या भाषेमध्यें कोशकल्पना प्रथम आली असली तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कांहींच कारण नाहीं ! शब्द संग्रहित करण्याचा विचार या वेदग्रंथांतील 'निघंटु'मध्यें दिसून येतो. मराठीमध्येंहि अशा तऱ्हेनें प्रथम 'निघंटु' सदृश ग्रंथ तयार झाले. मात्र त्याना 'निघंटु' असें न म्हणतां 'कोश' अशीच संज्ञा वापरलेली आढळते. आजच्या प्रगत कोश-कल्पनेप्रमाणें या शब्दसंग्रह करण्याच्या पुस्तिकांना 'शब्दांच्या यादी'च म्हणावें लागेल. उदाहरणार्थ, शिवाजीमहाराजांनीं करविलेला 'राज्यव्यवहार कोश' हा ग्रंथ देखील 'शासनोपयोगी शब्दांची जाणीवपूर्वक शब्दमाला' एवढाच त्याचा मर्यादित अर्थ आहे.

मराठी भाषा ही संस्कृतोद्भव भाषा असल्यामुळें तिचा संसार संस्कृत भाषेच्या अनुषंगानें व अनुकरणानेंच होणें स्वाभाविक आहे. मराठींतील शब्दकोशाची कल्पना अकराबाराव्या शतकापेक्षां जुनी नाहीं. तरीसुद्धां इतिहाससंशोधकांच्या चिकाटीच्या प्रयत्नानें आणि मराठीच्या अभ्यासकानीं जें कांहीं लहान मोठे शब्दसंग्रह उजेडांत आणिले आहेत, त्यावरून मराठी शब्दसंग्रहकारांची कल्पना संस्कृत भाषेतील 'निघंटु' लेखकापेक्षां किंवा पाश्चात्यदेशीय ग्रीक शब्दयादीपेक्षां मुळीच वेगळी दिसत नाहीं. सामान्यतः सर्व देशांत कोशनिर्मितीची कारणें एकाच प्रकारचीं आढळतात. केवळ कालमानपरिस्थितीप्रमाणें व गरजेप्रमाणें जो फरक दिसेल तेवढाच. वेद हे भारतीय आर्यांचे धर्मग्रंथ ठरल्यामुळें धार्मिक विचारानुरोधानें व धार्मिक दृष्टीनेंच संस्कृतांतील 'निघंटु' अर्थात शब्दमाला तयार झाल्या. ग्रीसमध्यें आपल्या रामायण-महाभारताप्रमाणें ऐतिहासिक महाकाव्यें म्हणून मान्यता पावलेले 'इलियड व ओडेसी' हे ज्ञानग्रंथ असल्यामुळें, त्यांच्या शब्दयाद्या (ग्लॉसरीज) ऐतिहासिक दृष्टीनें तयार झाल्या, त्याचप्रमाणें आपल्या मराठींत देखील 'महानुभावीय वाङ्मय' आणि 'ज्ञानेश्वरी' हेंच सांप्रदायिक वाङ्मय प्रथम आल्यामुळें या वाङ्मयाच्या आधारानेंच शब्दमालिका, तयार झालेल्या आढळतात. आणि त्याची वाढहि त्याच दिशेनें झालेली आहे.

हेमाद्रीच्या रघुवंशटीकेंत कांहीं ठिकाणीं संस्कृत शब्दांना मराठी पर्यायशब्द दिलेले आहेत. त्यारून संस्कृत वाङ्मयांतील ज्ञान मराठी बहुजनसमाजापर्यंत पोहोचवावें, हा त्यामागील हेतु स्पष्टच दिसतो. याच संस्कृत पंडितानें शककालाप्रमाणें बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत संस्कृत–मराठी–कोश केला. द्विभाषिक कोशाची सुरवात या कालापासून समजण्यास हरकत नसावी. यापूर्वींचे शब्दकोश हे बहुधा संस्कृत भाषेंतच असल्यामुळें त्यांचा कल शब्दांचे अर्थ सांगण्याकडेच असे. म्हणून ते कधीं एकार्थक तर कधीं नानार्थ प्रतिपादक असत. यादवकालीं म्हणजे साधारणतः बाराव्या तेराव्या शतकांत संस्कृत–मराठी–कोश अगर मराठी–मराठी–कोश जे तयार झाले त्यांचें स्वरूपहि प्रायः असेंच नानार्थदर्शक आहे.

यानंतर मात्र कोशाचें-विशेषतः मराठी कोशाचें-स्वरूप आस्तेआस्ते बदलतच गेलें. मराठी जनतेचा विदेशी संस्कृतीशीं संघर्ष निर्माण झाला. महाराष्ट्राला मुसलमानाशीं मुकाबला करावा लागला. याचा परिणाम ओघानेंच वाङ्मयावर झाला. यादव कालोत्तर यावनी शब्दांचा–व्यवहारांत रूढ होत चाललेल्या व्यापार व जमाखर्चविषयक शब्दांचा–अर्थ देणारा एक पद्यमय कोशहि आढळतो. यानंतर शिवशाहींत छत्रपतींच्या प्रेरणेनें 'राजव्यवहारकोश' निर्माण झाला. या कोशांत मराठीपेक्षां फारशी शब्दांना संस्कृत प्रतिशब्द देण्याकडेच विशेष कल दिसून येतो. या कोशासंबंधीं शासनविभागांतील मराठीचें स्वरूप—महाराष्ट्र शासन भाषाविभाग पृ. ११ वर म्हटलें आहे कीं, "सदरहु कोश हा मराठींतील नसला तरी, मराठीसाठीं केलेला पहिला प्रशासन कोश होय. हें त्याचें ऐतिहासिक महत्त्व मान्यच केलें पाहिजे." मराठीच्या शुद्धीकरणाचा एक प्रयत्न, या दृष्टीनें याचें महत्त्व कदाचित् यामुळें कोणास कमी अधिक वाटलें तरी, मराठी शब्दकोशाच्या अभिवृद्धीच्या

दृष्टीनें विचार करतां, निजामाच्या दरबारीं असलेले पेशव्यांचे वकील व मुत्सद्दी गोविंदराव काळे यांनीं युरोपीय लष्कराची परिभाषा लिहून ठेविली ती अधिक मोलाची वाटते. बळावत जाणाऱ्या परकीय सत्तेचें बळ सैन्याच्या शिस्तींत आहे हें ओळखून त्याची लष्करी परिभाषा टिपून घेणारा काळे मुत्सद्दी तर खराच, पण या त्याच्या कृतीनें कोशरचनेंतील एक वेगळी दृष्टी, एक वेगळा उद्देश दिसून येण्यासारखा आहे.

या मराठ्यांच्या काळापूर्वी कोश लिहिण्यांत शब्दांचे अर्थ देणें, अन्य भाषेंतील ज्ञान आपल्या भाषेंत आणणें, संघर्षानें किंवा दळणवळणानें येणाऱ्या व्यवहार व व्यापार विषयक शब्दांचा संग्रह करणें, ऐवढाच हेतु असे; पण मराठी सत्तेनंतर त्याला राजकीय स्वरूप येऊं लागलें. धर्माची जागा राजकारणानें घेतली. हें वरील दोन्ही प्रयत्नांवरून उघड होण्यास हरकत नाहीं.

यानंतर मराठ्यांचा धर्म, वंश, संस्कृति, आणि लौकिक ध्येयदृष्टी या सर्वच बाबतींत भारतीय आर्यांचा वेगळ्या असलेल्या लोकांशीं संबंध आला. यांपैकीं डच, फ्रेंच, पोर्तुगीज आणि इंग्रज लोकांनीं कांहीं प्रांतांत आपल्या वसाहती स्थापल्या, व्यापारउदीम करतां करतां संरक्षणाच्या मिषाखाली सैन्यें उभारलीं, आणि येथील सरंजामशाही शासनाला मदत देतांदेतां राजकारणांत हात घातला, आणि पुढें इंग्रजांनीं येथें राज्यच केलें. हें करीत असतां, इंग्रज-पोर्तुगीजांनीं भारतीय वाङ्मयाची ओळख करून घेतली, धर्मप्रचारासाठीं येथील पंडितांच्या साह्यानें देशी वाङ्मय भाषांतरानें, आणि शब्दकोश-व्याकरण यांनीं समृद्ध केलें आणि आपला धर्मप्रसारहि केला. यापैकी वाङ्मयातील 'कोश' शाखेपुरताच येथें विचार करावयाचा आहे.

इंग्रजी अमदानींतील ज्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं मराठींत कोशरचना केली किंवा करण्याचा प्रयत्न केला, ते सर्व अधिकारी लष्करी पेचाचे किंवा लष्कराशीं संबंधित खात्यांत कामकरणारे आहेत. ही माणसें—पुढें त्यांची वाङ्मयीन कामगिरी लक्षांत घेऊन—शिक्षणक्षेत्रांत किंवा शासनांत आली तरी त्यांचा पहिला वापर लष्करांतीलच आहे. इ. स. १७ व्या शतकांत कांहीं पोर्तुगीज पंडित धर्मप्रचारकांनी कोकणी—पोर्तुगीज अथवा पोर्तुगीज-कन्नड-कोकणी कोश केले असले तरि त्यांचा वापर महाराष्ट्रांत फारसा नाहीं. इंग्रज पंडितांनीं जी कोशरचना केली त्याचें स्वरूप वेगळ्या प्रकारचें आहे. हेस्टिंगच्या खटल्याच्या प्रसंगानें जी शब्दांची विस्तृत यादी अठराव्या शतकांत प्रसिद्ध झाली, ती शब्दमाला म्हणजे एक छोटासा शब्दकोशच आहे. (स. १७८८). यानंतर इंग्रजांचें राज्य वाढूं लागलें. त्यांचा संबंध सामान्य जनतेच्या दैनंदिन व्यवहारापर्यंत पोचूं लागला आणि राजकर्त्यांना शब्दकोशाची आवश्यकता तीव्रतेनें जाणवूं लागली. म्हणून मराठी-इंग्रजी कोश तयार करण्यासाठीं त्या काळीं पाऊणलाख रुपये खर्चण्याची तयारी ठेवून तशी योजनाहि आखली गेली.

ईस्ट इंडिया कंपनीचे नोकरच पुढें हिंदुस्थानचे राज्यकर्ते होणार आहेत व येथे राज्य करावयाचें तर येथील लोकांची भाषा समजून घेतली पाहिजे हें कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सना वेलस्लीनें कळविलें. एवढेंच नव्हे तर ता. ४ मे १८०० च्या श्रीरंगपट्टण येथील लढाईच्या विजयदिवशीं त्यानें कलकत्ता येथें फोर्ट विल्यम कॉलेज स्थापलें. या कॉलेजमध्यें अरबी, फारशी, संस्कृत, बंगाली, मराठी, तेलगु, तामील, कन्नडादि अनेक भाषांचा अभ्यास चालू केला. डॉ. वुल्यम कॅरे हा मराठीचा कोशकार याच कॉलेजांत प्राध्यापक होता. त्यांचा A Dictionary of Maratha Language हा कोश १८१० सालीं प्रसिद्ध झाला. या कोशांत मराठीसाठीं मोडी लिपी वापरलेली आहे. आजच्या मराठी लोकांच्या बोलण्यांतून गेलेले बरेच मराठी शब्द या कोशांत आढळतात. पुढे या कोशाचा उपयोग करून व्हॅन्स केनेडी यानें १८२४ सालीं आपला कोश तयार केला.

मध्यंतरी कलकत्त्याप्रमाणे मुंबई येथेंहि डॉ. ड्रमंड यानें १८०८ सालीं एक व्याकरण ग्रंथ तयार केला. त्यांत गुजराती मराठी, आणि इंग्रजी भाषांतील व्याकरण विषयाचें सोदाहरण विवेचन केलें असून, त्यांतच एक लहानसा शब्दकोश, भारतांतील वर्ण-जाती-दर्शक तक्ता व वंशशास्त्राची त्रुटित माहितीहि दिली आहे. कॅ. हॅचिन्सन या लष्करी अधिकाऱ्याने देखील एक योजना केली होती. असाच प्रयत्न कॅ. केपनेंहि केला होता, पण त्यांच्या प्रयत्नाला यावें तसें यश आलें नाहीं.

केनेडीच्या आठ हजार शब्दांच्या कोशांत कॅ. कोकनें तयार करविलेला मराठी-हिंदुस्थानी-कोश आणि मराठींत तयार केलेल्या अमरकोशाची यादी, या सर्वांचा उपयोग केलेला आहे. तरी सुद्धा हा कोश जुजबी कामचलाऊ वाटतो. मराठी भाषेच्या अभ्यासकांना त्याच्या जुनेपणामुळें जो उपयोग होईल तेवढाच. त्यामुळें मोठ्या शब्दसंख्येचा व शब्दार्थांच्या विविध

वेगवेगळ्या छटा दाखविणारे शब्द देणारा कोश होईल तर बरें, असें वाटू लागलें. त्या दृष्टीनें मोल्स्वर्थनें १८२१ सालीं कोशाची जुळवाजुळव आरंभिली, व स. १८३१ सालीं त्यानें आपला मराठी-इंग्रजी-कोश छापून प्रसिद्ध केला. याच सुमारास शास्त्रीमंडळींनी तयार केलेला महाराष्ट्र भाषेचा कोश १८२९ मध्यें मुंबई-शिक्षा-मंडळीच्या शिला छापखान्यात छापला गेला. हा कोश एकभाषिक कोश आहे. या कोषांत 'अं' या स्वराचा अंतर्भाव 'अ' या अक्षराखालींच केला असून, 'क्ष' व 'ज्ञ' हीं जोडाक्षरे स्वतंत्र वर्णरूप मानलीं आहेत. याशिवाय, या कोशांत ग्रांथिक व प्रांतिक मराठी बोली-भाषेंतील शब्दांचा वापरहि केलेला आहे. त्यामुळें हे दोन्ही शब्दकोश जनतेला उपयुक्त ठरले. यानंतर याच वाटचालीनें प्रगती करीत करीत 'हंसकोश', 'रत्नकोश', 'मराठी भाषेचा नवीन कोश', 'मराठी शब्दरत्नाकर', 'सरस्वती कोश' आणि ज्ञानकोशाच्या संपादक मंडळींनीं केलेला 'महाराष्ट्र शब्दकोश' असे अनेक कोशग्रंथ झाले आहेत.

मोल्स्वर्थच्या द्विभाषिक कोशानंतर, 'बाबा पदमजीचा कोश', 'कँडीचा कोश' अशी अधिकाधिक शब्दभरणा असलेली कोशरचना झाली. शब्दसंख्याहि ६० हजारापर्यंत वाढली. पण या सर्व प्रयत्नावर ताण करणारा प्रो. एन्. बी. रानडे यांनीं १८ वर्षें खपून सुमारे २००० पृष्ठांचा इंग्लिश-मराठी कोश तयार केला. त्यांत वाङ्मय, शास्त्र, कायदा, वैद्यक, व्यापार, स्थापत्य, पदार्थ-विज्ञान, व रसायनशास्त्र वगैरे विविध विषयांतील पारिभाषिक शब्दहि दिलेले आहेत. द्विभाषिक कोशांच्या इतिहासाकडे पाहतां, प्रा. मा. त्र्यं. पटवर्धन यांचा फारशी-मराठी कोश, श्री. वा. गो. आपटेकृत 'बंगाली-मराठी कोश' आणि श्री. पुंडलीकजी कातगडे ( प्रस्तुत संपादक ) यांचा 'हिंदी-मराठी कोश', श्री. य. न. केळकर यांचा ऐतिहासिक फारसी-मराठी कोश असे कितीतरी कोशवाङ्मय प्रसिद्ध झालें आहे.

महाराष्ट्राच्या सीमेवर असणाऱ्या सर्व भाषांचे कोश होणे ही मराठीची गरज आहे. त्या दृष्टीनें श्री. ना. मो. सप्रे यांनीं 'मराठी-कन्नड कोश' लिहिला असून त्याला 'मराठी व कन्नड भाषेचें परिज्ञान' म्हटलें आहे. त्यांत देवनागरी लिपि देऊन तिच्याखालीं कन्नड लिपि दिली आहे. या ग्रंथाचा आणखी एक विशेष असा आहे कीं, 'त्यांत प्रथम मराठी व त्याच्यापुढें तद्वाचिक कन्नड शब्द, दोन्ही देवनागरी लिपीमध्यें दिले आहेत' कन्नडप्रमाणेंच गुजरातीहि मराठीची शेजार भाषा असूनहि 'गुजराती-मराठी' अगर 'मराठी-गुजराती' असा नांव घेण्यासारखा शब्दकोश झाला नव्हता याचें नवल वाटतें. वास्तविक मुंबईसारखें शहर, गुजराती धनिक समाजानें आपलेसें केलेलें, गुजरात आणि महाराष्ट्र यांचा ऐतिहासिक संबंध, बडोद्यासारखें संपन्न आणि प्रगत संस्थान पाठीशीं असूनहि, गुजराती–मराठी भाषांतील हा खजिना कोणीहि उघडा केला नाहीं; याचें एक कारण कदाचित् असेंहि असूं शकेल कीं, गुजराती वाङ्मयाचा इतर भाषांवर प्रभाव पाडील असें प्रांतिक जुनें गुजराती साहित्य विशेष नसावें, किंवा केवळ व्यापाराकडेच गुजरातची दृष्टी असल्यामुळें, गुजरातीसाहित्यिकांचें लक्ष या गोष्टीकडे गेलें नसावें.

आतां यानंतरचा मोठा शब्दकोश म्हणजे भारताच्या शासनानें स्वीकारलेल्या चौदाहि भाषारत्नांचा हार गुंफण्याचा प्रयत्न होय. याचा एक लहान प्रकार म्हणून मराठी शब्दांशीं समानार्थक अन्य भाषेंतील शब्द त्या त्या भाषेच्या रकान्यांतून देण्याचा प्रयत्न या पूर्वी झालेला आहे. पण तो मोलाचा असला तरी सर्वांना सहज हाताळण्यासारखा होणार नाहीं, आणि तितकी आवश्यकता वा तितका उपयोगहि सामान्य वाचकाला नेहमीं असतोच असें नाहीं. या क्षेत्रातील यापेक्षां सुलभ उपाय म्हणजे या चौदाहि भाषांचे मराठींत द्वैभाषिक कोश तयार करणें हाच आहे, आणि तें काम महाराष्ट्र राज्याच्या संस्कृति आणि साहित्य मंडळानें आपल्या अंगावर घेऊन नेटानें चालविलें आहे.

त्यापैकीं 'कन्नड–मराठी शब्दकोश' आज वाचकापुढें या ग्रंथाचे रूपानें येत आहे. या सर्व कोशांची रचना देवनागरी लिपींत झालेली असल्यामुळें, कन्नड न येणाऱ्या मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांला त्याचा अतिशय उपयोग होण्यासारखा आहे. कन्नड शिकूं इच्छिणाऱ्यांना तर त्याचा उपयोग आहेच आहे. किंबहुना या कोशांत देवनागरी लिपी वापरल्यानें त्यास अखिल भारतीय महत्त्व प्राप्त होणार आहे. देवनागरीशीं समान लिपी असणाऱ्याहिंदी, गुजराती, आदि भाषकांनाहि याचा उपयोग होण्यासारखा आहे. म्हणजे भारताच्या तीन चतुर्थांश इतक्या जनतेच्या डोळ्यांपुढें आंतरभारतीच्या स्वरूपाचा हा कोश झालेला आहे. साहजिकच भारताच्या एकात्मतेच्या वाढीला या कोशानें फार मोठा हातभार लागणार आहे.

या कन्नड–मराठी शब्दकोशांमध्यें मूळ कन्नड शब्द, देवनागरी व कन्नड या दोन्ही लिपीमध्यें दिला असल्यामुळें मराठी शिकूं इच्छिणाऱ्या कन्नड बंधूनांहि त्याचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं. हा कन्नड–मराठी शब्दकोश लिहीत असतांना, घरांतील सर्वच लहानथोर स्त्री–पुरुषांची, एवढेंच नव्हे, तर आजूबाजूंच्या शेजारी-पाजारी परिचितांचीहि मदत मला झालेली आहे. कन्नड शब्दाला एकादा दुर्मिळ मराठी शब्द हुडकून काढीत असतांना हे सर्वच संबंधी लोक आपापली बुद्धि चालवीत असत. तो सर्व इतिहास मनोरंजक असला तरी, त्याची नोंद विस्तारानें करण्याचें हें स्थळ नव्हे. पण त्या सर्वांचे आभार मानणें हा एक कृतज्ञता व्यक्त करण्याचा भाग आहे. हा शब्दकोश संपादनाच्या कामीं मी ज्यांना लेखनासाठीं गुंतविलें होतें, त्यांच्यापैकीं माझे स्नेही श्री कृष्णाजी बाबुराब मराठे यांची मदत, केवळ लेखनाच्या बाबतींतच नव्हे, तर शब्दांचे विविध अर्थ निश्चित करण्यांत व योग्य प्रतिशब्द निवडण्यांत आणि त्यांतील बारीकसारीक छटा व्यक्त करण्यांत, मला पुष्कळच झालेली आहे. त्यांच्या मदतीशिवाय हा शब्दकोश अनेक दृष्टींनीं अपुरा राहिला असता. म्हणून त्यांचे आभार मानणे व त्यांच्याविषयींची कृतज्ञता व्यक्त करणें मी माझें कर्तव्य समजतों. मराठी भाषेवरील त्यांचा ताबा व अधिकार कांहीं विशेष आहे. या शब्दकोशासाठीं मी निवडलेल्या सर्वच सहकाऱ्यांचा मी आभारी आहें. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें ही संधी मला दिली याबद्दल त्या मंडळाचाहि मी ऋणी आहे, एवढें नमूद करून मी ही प्रस्तावना येथेंच संपवितों.

गांधीजयंति<br>
२ ऑक्टोबर १९६९

**पुंडलीकजी कातगडे**

# कन्नड-मराठी-शब्दकोश वापरण्याच्या दृष्टीनें कांहीं आवश्यक माहिती

हा कन्नड-मराठी शब्दकोश हाताळणारा कन्नडलिपि जाणत आहे असें सामान्यतः गृहीत धरून, कन्नड लिपींतील स्वर व व्यंजनें आणि स्वरचिन्हें या शब्द-कोशाच्या प्रारंभीं देण्याचें विचारपूर्वक टाळलें आहे. तथापि कांहीं आवश्यक सामान्य माहिती येथें देत आहे.

मराठीप्रमाणें अक्षरांची बाराखडी कन्नडमध्यें नाहीं. कन्नडभाषेंत बाराखडीऐवजीं चौदाखडी आहे. कन्नडमध्यें तिला 'बळ्ळी' असें म्हणतात. कन्नड स्वरलिपींत उच्चार-णाच्या दृष्टीनें दोन वेगळे स्वर कल्पिलेले आहेत. मराठीं-तील 'अे–ओ' चीं चिन्हें कन्नड भाषेंतील ऱ्हस्व आणि दीर्घ 'अे-ओ' च्या स्वरोच्चाराचें काम भागवितात. तरीसुद्धां कन्नड भाषेच्या अभ्यासांत ही स्वरोच्चाराची अडचण मराठी भाषकांना राहूं नये म्हणून, या कोशापुरती मराठींत कन्नडमधील चौदाखडीची सोय दोन वेगळे दीर्घ स्वर अधिक कल्पून केली आहे. प्रचलित देवनागरी लिपींतील 'अे-ओ' कन्नड भाषेंतील ऱ्हस्व स्वर मानून, त्यांच्या दीर्घोच्चार स्वरासाठीं 'अें-ओं' असे नवे स्वर येथें उपयोजिले आहेत. एकदां हीं स्वरचिन्हें स्वीकारल्यावर 'कन्नड बळ्ळी' म्हणजे चौदाखडी कशी लिहीली जाईल हें कोणाच्याहि ध्यानांत येईल. कन्नडभाषेच्या उच्चारभेदानें या ऱ्हस्व व दीर्घ स्वरांचें लेखन करण्याची सोय देवनागरीलिपींत नाहीं. पण हें वैगुण्य मानण्याचें कारण नाहीं. खुद्द कन्नड भाषेंत तरी 'अ' व 'आ' यांच्या उच्चाराचे सर्व भेद दाखविण्याचीं चिन्हें कोठें आहेत? 'गत जीवन' आणि 'जीवनाची गत' या शब्दांतील 'गत'चे उच्चार, किंवा 'गवत' या शब्दांत जे 'अ'चे वेगवेगळे उच्चार आहेत, ते व्यक्त करण्याची वेगळी चिन्हें कन्नडलिपीमध्येंहि नाहींत.

कन्नडमधील जोडाक्षर लेखनपद्धति, मराठींतील जोडाक्षर लेखनपद्धतीपेक्षां वेगळी आहे. मराठींतील जोडाक्षरलेखन, मग तें आडवें अगर उभें कसेंहि असो, उच्चारानुवर्ती असतें. कन्नड लिपीमधील जोडाक्षर लिहिण्याची पद्धति प्रायः उभी म्हणजे एकाखालीं दुसरें अक्षर जोडून लिहिण्याची आहे. पण तीसुद्धा पूर्ण उच्चारानुवर्ती नाही. याप्रमाणें कन्नड जोडाक्षरलेखन हें अगदीं भिन्न असल्यानें, तें समजून घेतलें पाहिजे. कन्नड जोडाक्षरलेखनांत विशेष लक्षांत ठेवण्या-सारखी बाब ही आहे कीं, जें अक्षर जोडावयाचें तेंच पूर्ण लिहून ज्याला ते जोडावयाचें तें अर्धे म्हणजे व्यंजनांत लिहिलेलें असतें. या अगदीं भिन्न उच्चारलेखनाचा प्रभाव साध्या कोशरचनेंतहि दिसून येतो. 'ऱ्हद', 'ल्हाद', आणि 'व्हय' असे अनेक शब्द अकार विल्हप्रमाणें त्या त्या योग्य जागीं न येतां, त्यांचे संकलनक्रम एका 'ह' या अक्षराखालींच कोशांत सामावलेले आहेत. अर्थात तसाच क्रम आम्ही या 'कन्नड मराठी-शब्दकोशां'तहि घेतला आहे

मराठी लिपि तीनमजली आहे. तर कन्नड लिपि दुमजली आहे. स्वरचिन्हें, अनुनासिक (व अनुस्वार) हीं मराठी-प्रमाणें अक्षराच्या वर किंवा खालीं जोडलीं जात नसून तीं व्यंजनाच्या पुढें म्हणजे लेखनाच्या ओळींत लिहिण्याचा प्रघात कन्नडलिपीमध्यें आहे.

मराठी व कन्नड दोन्ही भाषांमधील व्याकरणांतील नामविचार जवळजवळ सारखाच आहे. म्हणून त्याविषयीं येथें अधिक ऊहापोह केलेला नाहीं. दोन्ही भाषांतील नामांच्या पोटभेदामध्येंहि म्हणण्यासारखा फरक नाहीं. नामविचार म्हणजे मुख्यतः 'लिंगविचार' व 'विभक्ति-विचार' यांचाच विचार होय. पण शब्दकोशाच्या क्षेत्रामध्यें यांचा किंवा संधीप्रकरणाचा ऊहापोह करण्याची आवश्यकता नाहीं.

या शब्दकोशांत वापरलेलीं संक्षिप्त चिन्हें (ॲब्रिव्हि-एशन्स) खालीलप्रमाणें आहेत.

अ. दे. ............ दुसऱ्या भाषेंतून आलेला शब्द.
ना. ............... नाम.
वि. ............... विशेषण.
धा. ............... धातु.
अ. ............... अव्यय.
क्रि. ............... क्रियापदाचें सिद्ध रूप.
क. ............... कन्नड.
सं. ............... संस्कृत.
प्र. ............... प्रत्यय.

**अ** (ಅ) (सं) ना. – वर्णमालेंतील पहिलें मूळाक्षर; विष्णु; वायु; अंतःपर; नकारात्मक उपपद; ब्रह्मा; महेश.

**अं** (ಅಂ) (सं) अ. – शब्दाच्या शेवटीं लागणारें अव्यय.

**अंश्** (ಅಂಶ್) (सं) धा. तुकडा करणें; भाग पाडणें.

**अंश (स)** (ಅಂಶ ಅಂಸ) (सं) ना. – भाग; तुकडा; गणितांतील एक संकेत; अक्षांश; वारसदार.

**अंशक** (ಅಂಶಕ) (सं) ना. – भागीदार; संबंधिक; भाग; तुकडा; सौर मासांतील एक दिवस.

**अंशमापक** (ಅಂಶಮಾಪಕ) (सं) ना. – द्रव पदार्थ मापण्याचें साधन; कोनमापक.

**अंशांक** (ಅಂಶಾಂಕ) (सं) ना. – भागांतील उपभाग; पोटभाग.

**अंशि** (ಅಂಶಿ) (सं) ना. – अंशातील उरलेला भाग; स्थिति.

**अंशु** (ಅಂಶು) (सं) ना. – किरण; प्रकाश; बिंदु; शेवट; अत्यंत लहान भाग; सूर्य; तेजोमंडल.

**अंशुक** (ಅಂಶುಕ) (सं) ना. – रेशमी वस्त्र; मलमल; पान; पकाशाचे कोमल किरण.

**अंशुमत् (मंत)** (ಅಂಶುಮತ್) (ಅಂಶುಮಂತ) (सं) वि. – चकाकणारे; कांतिमय; तेजस्वी; सूर्यवंशीय राजाचें नाव.

**अंशुमति** (ಅಂಶುಮತಿ) (सं) ना. – यमुना नदी.

**अंशुमत्फला** (ಅಂಶುಮತ್ಫಲಾ) (सं) ना. – केळ; केळ्यांचा घड; लोंगर.

**अंशुल** (ಅಂಶುಲ) (सं) वि. – चकाकणारे; तेजस्वी.
(सं) ना. – चाणक्याचें नाव.

**अंसल** (ಅಂಸಲ) (सं) वि. – बलशाली; घट्टमुट्ट; घडधाकट.
(सं) ना. – शक्तिमान भुज असलेला; मनगटांत जोर असलेला.

**अंह, अंहस्** (ಅಂಹ ಅಂಹಸ್) (सं) धा. – निघणें; जाणें; पोहोंचणें; बोलणें; प्रकाशणें; पाठविणें.
(सं) ना. – पाप; ताप; उपद्रव.

**अंहति** (ಅಂಹತಿ) (सं) ना. – वर; संकट; गंडांतर; विपत्ति; देणगी.

**अंहिति** (ಅಂಹಿತಿ) (सं) ना. – वर; दान.

**अः** (ಅಃ) (सं) अ. – आश्चर्यबोधक अव्यय; आनंदसूचक अव्यय.

**अक** (ಅಕ) (सं) ना. – दुःख; कष्ट; कळ; सुखाभाव; पाप; प्रत्यय.

**अकच** (ಅಕಚ) (सं) वि. – केशविहीन; खल्वाट; टकल्या.

**अकट** (ಅಕಟ) (सं) अ. – अरेरे.

**अकंटक** (ಅಕಂಟಕ) (सं) वि. – निष्कंटक; निरुपद्रवी; निर्वेध.

**अकर** (ಅಕರ) (सं) वि. – थोटा; कातरलेला; बेका.

**अकरण** (ಅಕರಣ) (सं) ना. – उद्योगशून्य; अवयवहीन; निरुद्योग.

**अकर्म** (ಅಕರ್ಮ) (सं) वि. – आळशी; निरुद्योगी; दुष्ट; अयोग्य.
(सं) ना. – अपराध; दुष्कृत्य.

**अकल** (ಅಕಲ) (सं) वि. – पूर्ण; सबंध;

**अकल्क** (ಅಕಲ್ಕ) (सं) ना. – दैवशक्ति; महासागराच्या पाण्याचा सांठा.

**अकल्का** (ಅಕಲ್ಕಾ) (सं) वि. – शुद्ध; पवित्र
(सं) ना. – चंद्रप्रकाश; चांदणें

**अकल्प** (ಅಕಲ್ಪ) (सं) वि. – अनियंत्रित; अशक्त; अतुलनीय.

**अकल्मष** (ಅಕಲ್ಮಷ) (सं) वि. – निर्दोष, घाण नसलेलें; स्वच्छ; निष्कलंक.

**अकलंक** (ಅಕಲಂಕ) (सं) वि. – निष्कलंक; निर्दोष; निष्पाप.

**अकळत्र** (ಅಕಳತ್ರ) (सं) ना. – ब्रह्मचारी; अविवाहित; विधुर;

**अकांड** (ಅಕಾಂಡ) (सं) वि. – आपोआप बंद; अकस्मात बंद; बिन बुडाचा;

**अकार्य** (ಅಕಾರ್ಯ) (सं) वि. – न करण्यासारखें.
(सं) ना. – दुष्कर्म; अकाम; वाईट काम.

**अकाल** (ಅಕಾಲ) (सं) वि. – कालाला न शोभणारे; विपरीत.

**आकिंचन** (ಅಕಿಂಚನ) (सं) वि. – दरिद्री; दुर्दैवी; हातांत कांहीं नसलेला.

**आकिंचित्कर** (ಅಕಿಂಚಿತ್ಕರ) (सं) वि. – मुग्ध; निरुपयुक्त.

**अकुटिल** (ಅಕುಟಿಲ) (सं) वि. – वाकडा नसलेला; सरळ; प्रामाणिक; निष्कपट.

**अकुतः** (ಅಕುತಃ) (सं) अ. – सर्वत्र अभाव

**—भय** (ಭಯ) (सं) वि. – निर्भय, कोठूनहि भय नसलेला.

**अकुप्य** (ಅಕುಪ್ಯ) (सं) ना. – चांदी; सोनें.

**अकूपार** (ಅಕೂಪಾರ) (सं) ना. कासव; कूर्मराज; समुद्र; सूर्य.

**अकृत** (ಅಕೃತ) (सं) वि. – न केलेलें; अपूर्ण; अकल्पित; स्वाभाविक; असिद्ध; स्वयंभु; कपटरहित.

**अकृष्ट** (ಅಕೃಷ್ಟ) (सं) वि. – न नांगरलेलें; पड; न ओढलेलें.

**अक्क (क्का)** ಅಕ್ಕ(ಕ್ಕಾ) (सं) ना. – वडील बहीण.

**अक्कज** (ಅಕ್ಕಜ) (क) ना. – आश्चर्यकारक वस्तु; मात्सर्य; असंतोष.

**अक्कडि (डे)** ಅಕ್ಕಡಿ(ಡೆ) (क) ना. – दोन पिकांमधील पाट; चाकोरी. नांगरानें पडलेली ओळ; संकट; वजनमापातील कपट.

**अक्कदाम** (ಅಕ್ಕದಾಮು) (क) ना. – जपमाळ; रुद्राक्षाची माळ;
**अक्कर** (ಅಕ್ಕರ) (क) ना. – अक्षर; प्रीति.
**अक्करिके** (ಅಕ್ಕರಿಕೆ) (क) ना. – प्रीति; एक वनस्पति.
**अक्करिग** (ಅಕ್ಕರಿಗ) (क) ना. – अक्षरज्ञ; पंडित.
**—बेळ्** (–ಬೆಳ್) (क) ना. – पडजमीन.
**अक्करु** (ಅಕ್ಕರು) (क) ना. – प्रीति.
**अक्करे** (ಅಕ್ಕರೆ) (क) ना. – लहान मुलांना प्रेमानें दिलेला घोट.
**—गुटुकु** (ಗುಟುಕು) घोट.
**अक्कवे** (ಅಕ್ಕವೆ) (क) ना. – प्रयोजन; अजीर्ण.
**अक्कस** (ಅಕ್ಕಸ) (क) ना. – अनुराग; ईर्षा; राग.
**अक्कळिसु** (ಅಕ್ಕಳಿಸು) (क) धा. – जांभई देणें; भुकेनें व्याकुळ होणें; चूळ भरणें.
**अक्कळे** (ಅಕ್ಕಳೆ) (क) ना. – झुरळ.
**अक्काजि** (ಅಕ್ಕಾಜಿ) (क) ना. – जैन सन्यासिनी.
**अक्काडु** (ಅಕ್ಕಾಡು) (क) धा. – तुडविणें; फेकणें; वाहणें; ओसरणें; बलहीन होणें; कांतिहीन होणें.
**अक्कारु** (ಅಕ್ಕಾರು) (क) धा. – रडून रडून कंठ सुकणें; कंठ दाटून येणें.
**अक्कि** (ಅಕ್ಕಿ) (क) ना. – तांदूळ; भातांतील धान्य.
**–कुच्चु** (–ಕುಚ್ಚು) (क) ना. – भाताची पेज; भातावरील पाणी; कांजी.
**अक्किसु** (ಅಕ್ಕಿಸು) (क) धा. – वितळविणें; पचविणें.
**अक्कु** (ಅಕ್ಕು) (क) धा. – वश करून घेणें; नियंत्रण धरणें; आलिंगणें; पकडणें; वितळविणें.
**अक्कुड** (ಅಕ್ಕುಡ) (क) वि. – उत्साही; बळवंत; सत्वशाली; आतुर; विश्वासु; राबणारा.
**अक्कुडिसु** (ಅಕ್ಕುಡಿಸು) (क) धा. – संकोचणें; उतरणें; कलाक्षय होणें.
**अक्कुळिसु** (ಅಕ್ಕುಳಿಸು) (क) धा. – 'अक्कळिसु' पहा. मागें सरणें; पाऊल मागें घेणें.
**अक्कुरळि** (ಅಕ್ಕುರಳಿ) (क) ना. – भय; घाबरेपणा; घाबरटपणा.
**अक्के** (ಅಕ್ಕೆ) (क) ना. – आक्रंदन; रडारड;
(क) अ – होऊ दे !
**अक्त** (ಅಕ್ತ) (सं) वि. – लुप्त; निश्चळ.
**अक्रम** (ಅಕ್ರಮು) (सं) वि. – क्रमहीन; आडवातिडवा; विसंगत.
(सं) ना. – अव्यवस्था; औचित्यभंग; अन्याय; वाक्यदोष; अनियमितपणा.
**अक्रोड** (ಅಕ್ರೋಡ) (सं) ना. – एक कवचीचें फळ; अक्रोडाचे झाड.
**अक्रोध** (ಅಕ್ರೋಧ) (सं) ना. – राग नसलेला; शांति.
**अक्लीब** (ಅಕ್ಲೀಬ) (सं) ना. – पौरुष नसलेला; नपूसक, षंट.

**अक्लेश** (ಅಕ್ಲೇಶ) (सं) वि. – दुःखहीन; तापहीन.
(सं) ना. – तापनिवारण; विघ्नविनाश.
**अक्ष** (ಅಕ್ಷ) (सं) ना. – गाडी; गाडीचा कणा; अक्षरेखा; गर्भसूत्र, डाळ; फांसा; द्यूत, साप; बिब्याचें झाड; गरूड; डोळा; मणि.
**अक्षमणे (णि)** (ಅಕ್ಷಮಣೆ(ಣಿ) (सं) ना. – जपमाळेतील मणि.
**अक्षत** (ಅಕ್ಷತ) (सं) वि. – क्षत नसलेलें; संपूर्ण; संपर्क नसलेलें.
(सं) ना. – मंत्राक्षता; मंगलसमयीं लावण्याचा तिलक.
**अक्षते** (ಅಕ್ಷತೆ) (सं) ना. – कुकु लावलेले तांदूळ; पुरुषसंपर्क नसलेली स्त्री.
**अक्षय (य्य)** (ಅಕ್ಷಯುಯ್ಯ) (सं) वि. – नाश न होणारे; रिकामें न होणारें.
(सं) ना – संवत्सरमालेंतील शेवटचें वर्ष.
**—पात्रें** (–ಪಾತ್ರೆ) (सं) ना. – कधींहि रिकामें न होणारें भांडें. सिद्धस्थाली.
**—वट** (ಅಕ್ಷಯುವಟ) (सं) ना. – गयाक्षेत्रांतील प्राचीन वटवृक्ष.
**अक्षर** (ಅಕ್ಷರ) (सं) वि. – नाश न होणारें; न बदलणारें; विषम.
(सं) ना. – परब्रह्म; लिपी चिन्ह; अकारापासूनची सर्व अक्षरें; पाणी; आकाश; धर्म.
**अक्षांति** (ಅಕ್ಷಾಂತಿ) (सं) ना. – तिरस्कार; असहनशीलता; मात्सर्य.
**अक्षांश** (ಅಕ್ಷಾಂಶ) (सं) ना. – भूमध्याच्या वर्तुळाशीं समांतर असा भूगोलावर काढलेला वर्तुळाचा भाग. विषुववृत्ताशीं समांतर वर्तुळ.
**अक्षार** (ಅಕ್ಷಾರ (सं) वि. – स्वभावसिद्ध; अकृत्रिम.
(सं) ना. – मीठ; लवण.
**अक्षि** (ಅಕ್ಷಿ) (सं) ना. – डोळा; दोन भाग दाखविणारा संकेत
**—गत** (–ಗತ) (सं) वि. – डोळ्याला दिसणारें; दृष्टिसमारचें; आजकालचें.
**अक्षिकर्ण** (ಅಕ್ಷಿಕರ್ಣ) (सं) ना. – सर्प; कानाचें काम करणारा डोळा.
**अक्षीण** (ಅಕ್ಷೀಣ) (सं) वि. – दरिद्री न होणारा; पूर्ण; अक्षय्य.
**अक्षीब** (ಅಕ್ಷೀಬ) (सं) वि. – मस्ती न येणारा.
**अक्षुण्ण** (ಅಕ್ಷುಣ್ಣ) (सं.) वि. – न फुटलेलें, न तुटलेलें; असाधारण.
**अक्षुद्र** (ಅಕ್ಷುದ್ರ) (सं.) वि. – लहान नसलेलें; विशाल; मोठें; बलाढ्य.
**अक्षुभित** (ಅಕ್ಷುಭಿತ) (सं) वि. – चलबिचल न होणारें; उद्रेक न पावणारें; क्षोभ न होणारें.
**अक्षूण** (ಅಕ್ಷೂಣ) (सं) वि. – कमी न होणारें; तुटवडा न पडणारें.
**अक्षेत्र** (ಅಕ್ಷೇತ್ರ) (सं) ना. – पडीक; न नांगरलेली भूमि.

**अक्षोट** (ಅಕ್ಷೋಟ) (सं) ना.—अक्रोड फळ; अक्रोडाचें झाड.
**अक्षोभ्य** (ಅಕ್ಷೋಭ್ಯ) (सं) वि.—अचल; उद्रेक न पावणारें, उत्तेजित न होणारें; दृढ; अभंग.
**अक्षौहिणी** (ಅಕ್ಷೌಹಿಣೀ) (सं) ना.—सैन्याची संख्या; अक्षोहिणी.
**अखंडन** (ಅಖಂಡನ) (सं) ना.—समय; संपूर्ण वस्तु; अविस्मरणीय गोष्ट; शाश्वत तत्त्व.
**अखंडभाग्य** (ಅಖಂಡಭಾಗ್ಯ) (सं) ना.—संपूर्ण श्रीमंती; गर्भश्रीमंती; अखंड सौभाग्य.
**अखंडमंडल** (ಅಖಂಡಮಂಡಲ) (सं) ना.—चक्राधिपत्य; संपूर्ण राज्याधिकार.
**अखर्व** (ಅಖರ್ವ) (सं) वि.—संपूर्ण; मोठें; पुष्कळ.
**अखल्य** (ಅಖಲ್ಯ) (सं) वि.—भित्रा; काळाला अनुसरून नसलेलें.
**अखाड** (ಅಖಾಡ) (क) ना.—कुस्तीचा आखाडा; रंगस्थळ, रंगभूमि; व्यासपीठ; आळशाचा अड्डा.
**अखात** (ಅಖಾತ) (सं) वि.—न उकरलेलें; पुरून ठेवलेलें.
(सं) ना.—नैसर्गिक जलाशय; आखात.
**अग** (ಅಗ) (सं) वि.—टाकलेलें.
(सं) ना.—वेट; दगड; झाड.
**अगचाटलु** (ಅಗಚಾಟಲು) (क) ना.—अडचण; कठिण प्रसंग.
**अगचु** (ಅಗಚು) (क) धा.—ढकलणें; ओढणें; हिसकणें.
**अगजा(जाते)** (ಅಗಜಾ[ಜಾತೆ]) (सं) ना.—पार्वती.
**अगड** (ಅಗಡ) (क) अ.—अनिर्बंधपणें.
(क) वि.—शूर; जाणता; दुष्ट; मारका; वेलगामी; कुणासहि न मानणारा; संस्कारविहीन.
**अगडु** (ಅಗಡು) (क) वि.—दुष्ट; क्रूर; क्षुद्र; हीन.
**—तन** (—ತನ) (क) ना.—क्रूरपणा; दुष्टपणा; क्षुद्रता.
**—मोरे** (—ಮೊೞೆ) (क) ना.—क्रूरमुख; कपाळाला आठ्या घातलेला चेहरा.
**अगणि** (ಅಗಣಿ) (क) ना.—अडणा; कडी; कुलूप; बंधन.
**अगण्य** (ಅಗಣ್ಯ) (सं) वि.—मोजतां न येणारें; अमुख्य; गौण; कमी प्रतीचें.
**अगत** (ಅಗತ) (क) ना.—उकरणी; जमीनखुदाई.
**अगति** (ಅಗತಿ) (सं) ना.—कष्ट; नरक; दिशाभूल.
**अगते** (ಅಗತೆ) (क) ना.—जमिनीची उकरणी.
**अगद** (ಅಗದ) (सं) ना.—रोग; दुखणें; आजार; गंडांतर.
**अगदंकार** (ಅಗದಂಕಾರ) (सं) ना.—वैद्य; रोगाचा नाश करणारा; रोग न होऊं देणारा.
**अगदि** (ಅಗದಿ) (क) अ.—पूरा; एकंदरींत; वट्ट.
**अगधर** (ಅಗಧರ) (सं) ना.—गोवर्धन पर्वत उचलून धरणारा; कृष्ण.

**अगपडु** (ಅಗಪಡು) (क) धा.—वश होणें; आधीन होणें.
**अगपे** (ಅಗಪೆ) (क) ना.—लाकूड; सालीची तयार केलेली वस्तु; भूस; कोंडा.
**अगभेदि** (ಅಗಭೇದಿ) (सं) ना.—पर्वत फोडणारा इंद्र; वीज; अशनिपात; लाकूडफोड्या; कुदळ.
**अगम** (ಅಗಮು) (सं) ना.—गतिनिरोध; खरडी; गतिरोधक.
**अगम्य** (ಅಗಮ್ಯ) (सं) वि.—न समजणारें; न पोंचणारें; हाताला न येणारें; न पटणारें.
**अगम्यागमन** (ಅಗಮ್ಯಾಗಮನ) (सं) ना.—न जावें तेथें जाणें; व्यभिचार.
**—गामी** (—ಗಾಮಿ) (सं) ना.—व्यभिचारी; परदारागमनी.
**अगर** (ಅಗರ) (क) ना.—जहाजाचा मागचा भाग.
**अगरणे** (ಅಗರಣೆ) (क) ना.—दुर्दैव; आरोप ठेवणें.
**अगरिपु** (ಅಗರಿಪು) (सं) ना.—पर्वतशत्रु; इंद्र.
**अगरु** (ಅಗರು) (क) ना.—डोक्यावरील टेंगुळ; आवाळू.
**अगरु** (ಅಗರು) (क) ना.—चंदन.
**—गंध** (—ಗಂಧ) (सं) ना.—चंदनाचें गंध
**अगल्** (ಅಗಲ್) (क) धा.—दूर करणें; दूर होणें; विस्तारणें; वेगळें होणें; नाहींसें होणें; मरणें.
**अगल** (ಅಗಲ) (क) वि.—पुरेसें; अघळपघळ;
(क) ना.—रुंदी; अडणा.
**अगलिके** (ಅಗಲಿಕೆ) (क) ना.—वेगळीक; दूर जाणें; वियोग.
**अगलिचु** (ಅಗಲಿಚು) (क) धा.—वेगळे करणें; रुंद करणें; दूर करणें.
**अगलित्तु** (ಅಗಲಿತ್ತು) (क) वि.—रुंद; विशाल; दीर्घ.
**अगलिसु** (ಅಗಲಿಸು) (क) धा.—वेगळे करणें; दूर करणें; कामावरून काढणें; विलग करणें.
**अगलु** (ಅಗಲು) (क) धा.—दूर होणें; विस्तारणें.
(क) वि.—विस्तृत; रुंद.
(क) ना.—दिवस.
**अगलुविके** (ಅಗಲುವಿಕೆ) (क) ना.—वियोग; विप्रयोग; मोकळीक.
**अगल्चु** (ಅಗಲ್ಚು) (क) धा.—दूर करणें; वेगळे होणें; विलग करणें.
**अगल्के** (ಅಗಲ್ಕೆ) (क) ना.—खड्डा; डबरा; भोंक; 'अगलुविके' पहा.
**अगल्ते** (ಅಗಲ್ತೆ) (क) ना. खड्डा, खळगा; डबरा.
**अगवडु** (ಅಗವಡು) (क) धा.—अडकून पडणें; सांपडणें.
**अगवैरी** (ಅಗವೈರಿ) (सं) ना.—पर्वतशत्रु; इंद्र.
**अगस** (ಅಗಸ) (क) ना.—परीट; धोबी.
**अगसगित्ति** (ಅಗಸಗಿತ್ತಿ) (क) ना.—परटीण; धोबीण; रजकपत्नि.
**अगसति (सिति)** (ಅಗಸತಿ(ಸಿತಿ) (क) ना.—परटीण;

**अगसाल** (ಅಗಸಾಲ) (क) ना. – 'अक्कसालिग' पहा, सोनार

**अगसाले** (ಅಗಸಾಲೆ) (क) ना. – अर्कशाळा; पाकगृह; स्वयंपाकघर; सोनारशाळा.

**अगसिग** (ಅಗಸಿಗ) (क) ना. – धोब्याचा गोतावळा.

**अगसुते** (ಅಗಸುತೆ) (सं) ना. – पर्वतकन्या; पार्वती.

**अगसुतेश** (ಅಗಸುತೇಶ) (सं) ना. – ईश्वर; पार्वतीपति.

**अगसे (गिसे)** (ಅಗಸೆ [ಗಿಸೆ]) (क) ना. – वेस; गावाबाहेर जाण्याचा महादरवाजा.

**अगसे** (ಅಗಸೆ) (क) ना. – गळित धान्य, तेलबी; जवस.

**अगस्ति** (ಅಗಸ್ತಿ) (सं) ना – अगस्तिऋषि; कुंभजन्मा; एक नक्षत्र.

**अगस्त्य** (ಅಗಸ್ತ್ಯ) (सं) ना. – मित्रावरुणांना उर्वशीपासून झालेला मुलगा; एक ज्ञानी मुनि.

**अगळ्** (ಅಗಳ್) (क) धा. – हलणें; निसटणें; उकरणें; खोदणें.

**अगळ** (ಅಗಳ) (क) ना. – किल्ल्याचा तट.

**अगळत** (ಅಗಳತ) (क) वि. – रुंद.
(क) ना. – खंदक, कोटाभोवतीचा खोल खड्डा.

**अगळि** (ಅಗಳಿ) (क) ना. – अडणा; अर्गल; कडी; बंद करण्याचें साधन.

**अगळु** (ಅಗಳು) (क) ना. – शिजलेला तांदूळ. शीत.
(क) धा. – उकरणें; दातानें चावणें.

**अगळुत (ळिते)** (ಅಗಳುತ [ಳಿತೆ]) (क) ना. – किल्ल्याच्या भोवतालचा खंदक.
**अगळ्ते** (ಅಗಳ್ತೆ)
**अगळंति** (ಅಗಳಂತಿ)

**अगाढ** (ಅಗಾಢ) (सं) वि. – विरल; सुलभ; सोपें.

**अगाध** (ಅಗಾಧ) (सं) वि. – खोल; तळ न लागणारें.
(सं) ना. – खोल खंदक; गुहा.

**अगाधजल** (ಅಗಾಧಜಲ) (सं) ना. – सरोवर; तळ न लागण्याइतकें खोल पाणी.

**अगाधिप** (ಅಗಾಧಿಪ) (सं) ना. – पर्वतराज; मेरुपर्वत.

**अगार** (ಅಗಾರ) (सं) ना. – घर, स्थान, वासस्थळ; जागा.

**अगि** (ಅಗಿ) (क) धा. – उकरणें; खोदणें; खड्डा काढणें; रवंथ करणें; हलविणें; दळणें; आनंदविणें; भिणें.
(क) ना. – लहान रोप; साल; मोड; कोंब.

**अगटिगे (ट्टिगे)** (ಅಗಿಟಿಗೆ[ಟ್ಟಿಗೆ]) (क) ना. – शेगडी; शेकोटी.

**अगिणि** (ಅಗಿಣಿ) (क) ना. – पाणी;

**अगिनि** (ಅಗಿನಿ) (क) ना. – अग्नि; निखारा, विस्तव; इंगळ.

**अगिर** (ಅಗಿರ) (सं) ना. – स्वर्ग.

**अगिल् (लु)** (ಅಗಿಲ[ಲು]) (क) ना. सुवास; सुगंध; सुगंधी द्रव्य.

**अगिविळि** (ಅಗಿವಿಳಿ) (क) वि. गंधहीन; वासरहित.

**अगु** (ಅಗು) (क) धा. – उकरणें; वाढविणें;

**अगुचु** (ಅಗುಚು) (क) धा. – घट्ट धरून ठेवणें, दाबून धरणें.

**अगुंडले** (ಅಗುಂಡಲೆ) (क) ना. – विस्तीर्णता; भरीवपणा; बाहुल्य.

**अगुर** (ಅಗುರ) (क) धा. – उकरणें, खणणें; खोदणें.

**अगुरु** (ಅಗುರು) (क) वि. – संकीर्ण, लहान; सोपे, लघु.

**अगुर्वु** (ಅಗುರ್ವು) (क) ना. – भीति; भयंकर आकृति.

**अगुर्विसु** (ಅಗುರ್ವಿಸು) (क) धा. – भिवविणें; भेडसावणें; वेडावणें.

**अगुलु** (ಅಗುಲು) (क) धा. – हलविणें; थरथरविणें, कापविणें.

**अगुवु** (ಅಗುಲುವು) (क) ना. – दाक्षिण्य; उपकार; आश्रय; आधार.

**अगुसु** (ಅಗುಸು) (क) धा. – 'अगुचु' पहा.

**अगुळ्** (ಅಗುಳ್) (क) धा. – उकरणें; खोदणें; पाण्यांत बुडणें.

**अगुळी** (ಅಗುಳಿ) (क) ना. – अडणा; अर्गळा.

**अगुळु** (ಅಗುಳು) (क) ना. – शिजवलेला तांदूळ; भाताची मूद, एकप्रकारची औषधी वनस्पति.

**अगुळिसु** (ಅಗುಳಿಸು) (क) धा. – उकरविणें, खोदविणें.

**अगुलचु** (ಅಗುಲುಚು) (क) धा. – बुडविणें; पाण्यात बुडविणें.

**अगूढ** (ಅಗೂಢ) (सं) वि. – अनाकलनीय; स्पष्ट

**अगृह** (ಅಗೃಹ) (सं) ना. – संन्यासी, अनिकेत; बेघर.

**अगे** (ಅಗೆ) (क) अ. – क्रियाविशेषणात्मक प्रत्यय.

**अगेंडि** (ಅಗೇಂಡಿ) (क) ना. – खड्डे काढण्याची जागा.

**अगेंद्र** (ಅಗೇಂದ್ರ) (सं) ना. – श्रेष्ठ पर्वतांपैकी एक

**अगेंद्रजे** (ಅಗೇಂದ್ರಜೆ) (सं) ना. – पर्वतराजकन्या, पार्वती.

**अगो (गों)** (ಅಗೊ[ಗೊಂ]) (क) अ. – दूरची वस्तु निर्देशिणारे उद्गारवाचक अव्यय.

**अगोचर** (ಅಗೋಚರ) (सं) वि. – डोळ्याला न दिसणारें; दृष्टीपलीकडचें; उठून न दिसणारें.
(सं) ना. इंद्रियांना अगम्य वस्तु; ब्रह्म.

**अग्ग** (ಅಗ್ಗ) (क) वि. – सवंग, स्वस्त; कमी किंमतीचें; अग्र; प्रथम; सर्वांत पुढचें.

**अग्गरणे** (ಅಗ್ಗರಣೆ) (क) ना. – दोरी; बांधण्याचे साधन; काढणी; सुतळी.

**अग्गल** (ಅಗ್ಗಲ) (क) ना. – रुंदी; विशालता; आधिक्य.

**अग्गलिसु** (ಅಗ್ಗಲಿಸು) (क) धा. – विस्तार पावणें; वाढणें.

**अग्गवणि** (ಅಗ್ಗವಣಿ) (क) ना. – तीर्थ; पाणी.

**अग्गळिके** (ಅಗ್ಗಳಿಕೆ) (क) ना. – अडणा; अडसर; कडी; अहंकार, ताठा.

**अग्गळु** (ಅಗ್ಗಳು) (क) ना. – अहंकार; भरंवसा; आधिक्य.

**अग्गळे** (ಅಗ್ಗಳೆ) (क) ना.—महाबळी; सामर्थ्यवान पुरुष.
**अग्गाडि** (ಅಗ್ಗಾಡಿ) (क) ना.—निर्लज्ज स्त्री; निलाजरी.
**—कार** (—ಕಾರ) (क) ना.—गारुडी; जादूगार; इंद्रजाल करणारा; कपटी मनुष्य.
**अग्गि** (ಅಗ್ಗಿ) (क) ना.—अग्नि; निखारा.
**अग्गिग** (ಅಗ್ಗಿಗ) (क) ना.—पुढारी; राजा; निरुपयोगी मनुष्य; निकामी.
**अग्गिटिके** (ಅಗ್ಗಿಟಿಕೆ) (क) ना.—शेकोटी; आगटी; शेगडी.
**अग्गिष्टिके** (ಅಗ್ಗಿಷ್ಟಿಕೆ) (क) ना.—'अग्गिटिके' पहा.
**अग्गिणि** (ಅಗ್ಗಿಣಿ) (क) ना.—जलाशय.
**अग्गिसु** (ಅಗ್ಗಿಸು) (क) धा.—तरू लावणें; रोपणें.
**अग्न्यस्त्र** (ಅಗ್ನ್ಯಸ್ತ್ರ) (सं) ना.—तोफ; बंदुक; अनलास्त्र.
**अग्नायि** (ಅಗ್ನಾಯಿ) (सं) ना.—अग्न्यस्त्र; त्रेतायुग.
**अग्निकण** (ಅಗ್ನಿಕಣ) (सं) ना.—किटाण; ठिणगी; स्फुल्लिंग.
**अग्निकार्य** (ಅಗ್ನಿಕಾರ್ಯ) (सं) ना.—यज्ञासाठीं अग्नि पेटवून तो तूप घालून पाजळणें.
**अग्निकाष्ठ** (ಅಗ್ನಿಕಾಷ್ಠ)(सं) ना.—सरपण; जळण; समिधा; लाकूड.
**अग्निकोण** (ಅಗ್ನಿಕೋಣ) (सं) ना.—आग्नेय दिशा.
**अग्निज** (ಅಗ್ನಿಜ) (सं) ना.—अग्नींतून उत्पन्न झालेला; षण्मुख.
**अग्निज्वाले** (ಅಗ್ನಿಜ್ವಾಲೆ) सं) ना.—जाळ; पेट; अग्नि ओकणारा वृक्ष; तांबड्या फुलाचें झाड.
**अग्नितारे** (ಅಗ್ನಿತಾರೆ) (सं) ना.—कृत्तिका नक्षत्र.
**अग्निदीपन** (ಅಗ್ನಿದೀಪನ) (सं) ना.—पचनशक्ति; पचनाची वाढ.
**अग्निदेवे** (ಅಗ್ನಿದೇವೆ) (सं) ना.—कृत्तिका नक्षत्र.
**अग्निनयन** (ಅಗ್ನಿನಯನ) (सं) ना.—अग्निप्रमाणें डोळे असलेला; शूर.
**अग्निनेत्र** (ಅಗ್ನಿನೇತ್ರ) (सं) ना.—ईश्वर, शंकर.
**अग्निपक्षी** (ಅಗ್ನಿಪಕ್ಷಿ) (सं) ना.—लांब पाय, मान आणि अग्निसारखी लाल चोंच असलेला पक्षी.
**अग्निपरीक्षे** (ಅಗ್ನಿಪರೀಕ್ಷೆ) (सं) ना.—कठीण प्रसंग, अग्निदिव्य.
**अग्निफल** (ಅಗ್ನಿಫಲ) (सं) ना.—वज्र; माणिक; हिरा.
**अग्निबाध** (ಅಗ್ನಿಬಾಧ) (सं) ना.— जळणे तोडणें; लाकूडफाटा तोडणें
**अग्निभू** (ಅಗ್ನಿಭೂ) (सं) ना.—अग्नीतून उत्पन्न झालेला षण्मुख; स्कंद.
**अग्निमथन** (ಅಗ್ನಿಮಥನ) (सं) ना.—लाकडावर लाकूड घासून अग्नि उत्पन्न करणें.
**अग्निमंथ** (ಅಗ್ನಿಮಂಥ) (सं) ना.—लाकडांच्या घर्षणानें अग्नि पेटविणें.
**अग्निमांद्य** (ಅಗ್ನಿಮಾಂದ್ಯ) (सं) ना. पचनशक्तिहीनता; खाल्लेलें न पचणें.
**अग्निरक्षणे** (ಅಗ್ನಿರಕ್ಷಣೆ) (सं) ना.—अग्निहोत्र.
**अग्निवर्ण** (ಅಗ್ನಿವರ್ಣ) (सं) ना.—सूर्यवंशातील शेवटचा राजा.
**अग्निवीर्य** (ಅಗ್ನಿವೀರ್ಯ) (सं) ना.—रुद्र.
**अग्निवेश्य** (ಅಗ್ನಿವೇಶ್ಯ) (सं) ना.—द्रोण व द्रुपद यांचा अस्त्रविद्येतील गुरु. द्रोणाचा काका.
**अग्निशिख** (ಅಗ್ನಿಶಿಖ) (सं) ना.—अग्नीच्या ज्वाळा; जाळ.
**अग्निशिखे** (ಅಗ್ನಿಶಿಖೆ) (सं) ना.—एक झाड; दिवा; बाण; सुवर्ण.
**अग्निष्टोम** (ಅಗ್ನಿಷ್ಟೋಮ) (सं) ना.—एका यज्ञाचें नांव; अग्निदीपन स्तोत्र.
**अग्निसख** (ಅಗ್ನಿಸಖ) (सं) ना.—अग्नीचा मित्र; वायु.
**अग्निसाक्षिक** (ಅಗ್ನಿಸಾಕ್ಷಿಕ) (सं) ना.—अग्निसमक्ष चाललेला (विवाह).
**अग्निस्तंभन** (ಅಗ್ನಿಸ್ತಂಭನ) (सं) ना.—मंत्रानें अग्नि शांत करणें.
**अग्निहोत्र** (ಅಗ್ನಿಹೋತ್ರ) (सं) ना.—अग्निदेवतेला अर्पण केलेले अर्घ्य.
**अग्निहोत्री** (ಅಗ್ನಿಹೋತ್ರಿ) (सं) ना.—यज्ञांतील अग्नि जोपासणारा; यज्ञकुंडाला जपणारा; अग्निहोत्र करणारा.
**अग्न्युत्पात** (ಅಗ್ನ್ಯುತ್ಪಾತ) (सं) ना.—धूमकेतु.
**अग्र** (ಅಗ್ರ) (क) ना.—तोंड येणें, ओठावर उठणारे फोड. (सं) ना.—शेवट; शिखर; पुढचा भाग; गावचें प्रवेशद्वार; स्तुति.
**अग्रग** (ಅಗ್ರಗ) (सं) ना.—पुढारी; मार्गदर्शक; नेता.
**अग्रगामी** (ಅಗ್ರಗಾಮಿ) (सं) ना.—पुढें जाणारा; पुढारी.
**अग्रज (जन्म)** (ಅಗ್ರಜ [ಜನ್ಮ]) (सं) ना.—आधीं जन्मलेला, आण्णा; ब्राह्मण; विष्णु.
**अग्रजाते** (ಅಗ್ರಜಾತೆ) (सं) ना.—आधीं जन्मलेली, अक्का.
**अग्रजे** (ಅಗ್ರಜೆ) (सं) ना.—अक्का; पार्वती.
**अग्रजेश** (ಅಗ್ರಜೇಶ) (सं) ना.—पार्वतीपति; शिव; अक्काचा नवरा; भावोजी.
**अग्रणि (णी)** (ಅಗ್ರಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—अक्षय; न संपणारे; वाढ; पुढारी; नायक.
**अग्रतःसर** (ಅಗ್ರತಃಸರ) (सं) वि.—पुढें जाणारा, नेता; नायक मुखंड.
**अग्रतनूज** (ಅಗ್ರತನೂಜ) (सं) ना.—पहिला मुलगा; अण्णा;
**अग्रतांबूल** (ಅಗ್ರತಾಂಬೂಲ) (सं) ना.—सर्वप्रथम अक्षता मिळणें; सभेंत मिळणारें पहिलें मानाचें पान.
**अग्रदूत** (ಅಗ್ರದೂತ) (सं) ना.—सर्वप्रथम सेवक; विश्वासु सेवक.
**अग्रपूजे** (ಅಗ್ರಪೂಜೆ) (सं) ना.—विशिष्ट पूजा; सभेंतील पहिला मान; मर्यादा; गौरव.

**अग्रफल** (ಅಗ್ರಫಲ) (सं) ना.—प्रथमफल; पहिला मुलगा.
**अग्रबल** (ಅಗ್ರಬಲ) (सं) ना.—बिनीवरील सैन्य; आघाडीची सेना, पहिली रांग
**अग्रमांस** (ಅಗ್ರಮಾಂಸ) (सं) ना.—हृदय.
**अग्रंबरं** (ಅಗ್ರಂಬರಂ) (अ.) क—शेवटपर्यंत; शेंड्यापर्यंत;
**अग्रसाले** (ಅಗ್ರಸಾಲೆ) (सं) ना.—देवस्थानांतील स्वयंपाकघर.
**अग्रस्थ** (ಅಗ್ರಸ್ಥ) (सं) ना.—सभापति; नायक; मुख्यस्थ
**अग्रहस्त** (ಅಗ್ರಹಸ್ತ) (सं) ना.—हाताचीं बोटें; हत्तीच्या सोंडेचा शेवटचा भाग.
**अग्रहार** (ಅಗ್ರಹಾರ) (सं) ना.—ब्राह्मणाचें वासस्थान; ब्राह्मणपुरी; ब्राह्मणगल्ली.
**अग्रहारिक** (ಅಗ್ರಹಾರಿಕ) (सं) ना.—ब्राह्मणपुरींत राहणारा.
**अग्राम्य** (ಅಗ್ರಾಮ್ಯ) (सं) वि.—खेडूत नसलेला, ग्रामवासी नसलेला; सुधारलेला.
**अग्राम्यवचनवृत्ति** (ಅಗ್ರಾಮ್ಯವಚನವೃತ್ತಿ)(सं) ना.—प्राचीन काव्यलक्षणामधील एक लक्षण.
**अग्रासन** (ಅಗ್ರಾಸನ) (सं) ना—मुख्यपीठ; स्वामीची गादी.
**अग्रासीन** (ಅಗ್ರಾಸೀನ) (सं) ना—सभापति; श्रेष्ठ जागीं बसलेला
**अग्राह्य** (ಅಗ್ರಾಹ್ಯ) (सं) वि.—अस्वीकार्य, धारणातीत;
**अग्रिम** (ಅಗ್ರಿಮ) (सं) वि.—प्रथम; मुख्य, उत्तम.
**अग्रिय** (ಅಗ್ರಿಯ) (सं) वि.—जास्तीचें; प्रथमचें.
(सं) ना. अण्णा; वडील बंधु.
**अग्रेश्वर** (ಅಗ್ರೇಶ್ವರ) (सं) ना.—महाप्रभु; सर्वश्रेष्ठ मनुष्य.
**अग्रेसर** (ಅಗ್ರೇಸರ) (सं) ना—पुढे जाणारा; नायक; पुरुषोत्तम; सर्वोत्तम.
**अग्रोदक** (ಅಗ್ರೋದಕ) (सं) ना.—मूर्तिपूजेचें पाणी.
**अग्र्य** (ಅಗ್ರ್ಯ) (सं) वि.—उत्तम; प्रथम; अर्घ्यपूर्वक.
**अघ** (ಅಘ) (सं) नां.—पाप; दोष; प्रमाद; दुःख; व्यसन; संकट; घाण.
**अघट** (ಅಘಟ) (सं) वि.—पुष्कळ; अतिशय; आश्चर्यकारक; अचिंत्य.
**अघटन** (ಅಘಟನ) (सं) ना.—असंभव; असंभाव्य गोष्ट; न घडण्यासारखी कठीण गोष्ट; अशक्य घटना.
**अघटमान** (ಅಘಟಮಾನ) (सं) ना.—न जुळणारी गोष्ट; विसंगत वाणी; असंभाव्य गोष्ट.
**अघटित** (ಅಘಟಿತ) (सं) वि.—कधी न घडलेली; कधीं न साधलेली; आश्चर्यकारक
(सं) ना. अपूर्व कृति; आश्चर्यकारक घटना.
**अघन** (ಅಘನ) (सं) ना.—लहान, कोवळे, मृदु.
**अघमर्षण** (ಅಘಮರ್ಷಣ) (सं) वि.—पापहारक, शापविमोचक मंत्र; अघमर्षणमंत्र; या मंत्राचा वेदातील एक ऋषि.
**अघरिपु** (ಅಘರಿಪು) (सं) ना.—अघासुराचा शत्रु; कृष्ण.
**अघ्न्ये** (ಅಘ್ನ್ಯೆ) (सं) ना—अघ्न्य स्त्री; गाय; बैल; ब्रह्मदेव.
**अं** (ಅಂ) (क) अ.—द्वितीया विभक्ति प्रत्यय. जनावराला बोलावण्याचा आवाज.
**अंक** (ಅಂಕ) (सं) ना.—आकडा; वाकडा; बांक; मांडी, पंख; संज्ञा, चिन्ह; दोष; कलंक, जड बोजा, अडचण; नाटकाचा भाग; मृत्यु.
**अंककार** (ಅಂಕಕಾರ) (सं) ना.—प्रभावी मनुष्य; प्रमुख सेवक; नायक;
**अंककार्ति** (ಅಂಕಕಾರ್ತಿ) (सं) ना.—नायिका; मुख्यसेविका.
**अंकण** (ಅಂಕಣ) (क) ना.—खण; दोन खांबांतील अंतर; दोन रेषांतील स्थळ;
**अंकत्रिणेत्र** (ಅಂಕತ್ರಿಣೇತ್ರ) (सं) ना.—शूर; शिव.
**अंकन** (ಅಂಕನ) (सं) ना.—खूण; चिन्हकरण; मुद्रा मारणें; मुद्रा परिचय चिन्हे.
**अंकपालि** (ಅಂಕಪಾಲಿ) (सं) ना.—आलिंगन; मिठी
**अंकपाश** (ಅಂಕಪಾಶ) (सं) ना.—गणितातील अंकचमत्कार. गणितातील कोडें; कूट; अंकसंभ्रम.
**अंकमाले** (ಅಂಕಮಾಲೆ) (सं) ना.—अंकसमूह; बिरुदावली; मणिमाला;
**अंकपीठ** (ಅಂಕಪೀಠ) (सं) ना.—मांडी; जंघा.
**अंकमुख** (ಅಂಕಮುಖ) (सं) ना.—नाटकाचा आरंभ; पुढील घटनेची प्रस्तावना.
**अंकलि** (ಅಂಕಲಿ) (क) ना.—वृक्षविशेष; अकोल.
**अंकलिपि** (ಅಂಕಲಿಪಿ) (सं) ना.—मूलाक्षर चिन्ह; मूळलिपि; अक्षरांची ओळख करून देणारी पुस्तिका.
**अंकवणे (णि)** (ಅಂಕವಣೆ[ಣಿ]) (क) ना.—शोभिवंत मणि; शोभिवंत पीठ.
**अंकवरे** (ಅಂಕವರೆ) (क) ना.—रणवाद्य; रणालगी; रणभेरी.
**अंकवातु** (ಅಂಕವಾತು) (क) ना.—सुंदर भाषण; गोडशब्द; सुभाषित; सूक्ति.
**अंकित** (ಅಂಕಿತ) (सं) वि.—चिन्हित; संख्या घातलेले.
(सं) ना.—चिन्ह; सही; आधीनता; शब्दार्पण.
**अंकिसु** (ಅಂಕಿಸು) (क) धा.—खून करणें; निरखणें; टक लावून पाहणें; गौरवदृष्टीनें पाहणें.
**अंकुर** (ಅಂಕುರ) (सं) ना.—कोंब; मोड; डोळा (बटाटा, ऊस वगैरेचा). रक्त; पाणी; घर; पुटकुळी; मुगारा पित्त उठणें.
**अंकुरित** (ಅಂಕುರಿತ) (सं) ना.—कोंब फुटलेलें; मोडाचे; अंकुरलेलें.

**अंकुरिसु** (ಅಂಕುರಿಸು) (क) धा.–उत्पन्न होणें; मोड येणें; डोळा फुटणें; कोंब फुटणें

**अंकुश (स)** (ಅಂಕುಶ [ಸ]) (सं) ना.–माहुताच्या हातांतील आयुध. हत्तीला आटोक्यांत ठेवण्याचे हत्यार.

**—चारण** (—ಚಾರಣ) (सं) ना.–अंकुश चालविणे.

**अंकुशचारणि** (ಅಂಕುಶಚಾರಣಿ) (सं) ना.–माहुत.

**अंके** (ಅಂಕೆ) (क) ना.–परवानगी; आधीनता; अधिकार; पकड; अनुज्ञा; विनंती; विश्वास; आसरा; अंकसख्या.

**अंकोठ** (ಅಂಕೋಠ) (सं) ना.–अंकोल वनस्पति

**अकोणि** (ಅಂಕೋಣಿ) (क) ना.–शक्ति; अधिकार; इच्छा; अभिप्राय.

**अंकोल** (ಅಂಕೋಲ) (सं) ना.–वनस्पति विशेष.

**अंकोलिका** (ಅಂಕೋಲಿಕಾ) (सं) ना.–आलिंगन; मिठी.

**अंकोलु(ले)** (ಅಂಕೋಲು)[ಲೆ] (क) ना.–एक झाड; एकजातीचा काटा.

**अंग** (ಅಂಗ) (क) ना.–रीति; मार्ग.
(सं) ना.–भाग; अवयव; पूरकशास्त्र; कवितेची ओळ; देह; नाटकातील अमुख्य पात्रे. मन; ज्ञान; अंगदेश; बंगाल.

**अंगचित्त** (ಅಂಗಚಿತ್ತ) (सं) ना.–हृदयाची हाक; इच्छित वस्तु.

**अंगचेष्टे** (ಅಂಗಚೇಷ್ಟೆ) (सं) ना.–देहाचे चलनवलन; चाळे; भ्रूभंग; भुवई हलविणें.

**अंगज** (ಅಂಗಜ) (सं) ना.–देहापासून उपजलेले; केस; पुत्र; प्रेम; रोग; रक्त; पाणी; घाम; कामदेव; पंचेंद्रियें.

**—जनक** (—ಜನಕ) (सं) ना.–कामपिता; विष्णु;

**अंगजन्म** (ಅಂಗಜನ್ಮ) (सं) ना.–काम, मदन; पुत्र; रक्त.

**अंगजन्मांतक** (ಅಂಗಜನ್ಮಾಂತಕ) (सं) ना.- शिव; मदनाला मारणारा.

**अंगज वैरी** (ಅಂಗಜವೈರಿ) (सं) ना.–मदनशत्रु शिव.

**अंगजात** (ಅಂಗಜಾತ) (सं) ना.–पुत्र; मन्मथ काम.

**अंगजांतक** (ಅಂಗಜಾಂತಕ) (सं) ना.–मदनाला जाळणारा; शंकर.

**अंगजारि** (ಅಂಗಜಾರಿ) (सं) ना शिव; मदनरिपु.

**अंगडि** (ಅಂಗಡಿ) (क) ना–दुकान; क्रयविक्रयस्थान. बाजारपेठ.

**अंगडिकार** (ಅಂಗಡಿಕಾರ) (क) ना.–दुकानदार; दुकान मालक.

**अंगण** (ಅಂಗಣ) (क) ना–अंगण; घरापुढील मोकळी जागा; घराचा पुढचा भाग.

**अंगत** (ಅಂಗತ) (क) वि.–उताणा; जमीनीला पाठलावून पडलेला.

**अंगत्त** (ಅಂಗತ್ತ) (क) वि.–'अंगत' पहा.

**अंगद** (ಅಂಗದ) (सं) ना.–वालीपुत्र; दंड; रट्टा; रट्ट्याचा वरचा भाग.

**अंगदार्ढ्य** (ಅಂಗದಾರ್ಢ್ಯ)–(सं) ना. शरीरबल; देहाचा बळकटपणा.

**अंगना (ने)** (ಅಂಗನಾ[ನೆ]) (सं) ना–स्त्री; पत्नि; कलत्र; सुंदरी.

**अंगनाजीवि** (ಅಂಗನಾಜೀವಿ) (सं) ना.–पत्नीच्या उत्पन्नावर जगणारा; भार्येच्याश्रमावर जगणारा.

**अंगन्यास** (ಅಂಗನ್ಯಾಸ) (सं) ना.–हावभाव; शरीराचें चलनवलन.

**अंगभव** (ಅಂಗಭವ) (सं) ना.–मन्मथ; मदन; काम.

**अंगभेद** (ಅಂಗಭೇದ) (सं) ना. अवयव; शरीराचा भाग.

**अंगमणि** (ಅಂಗಮಣಿ) (सं) ना–लग्नप्रसंगीं किंवा पहिलटकरणीला दिलेला अहेर; स्त्रीधन.

**अंगमर्द** (ಅಂಗಮರ್ದ) (सं) ना.–अंग मर्दन करणारा; सेवक, अंग रगडणारा.

**अंगमर्दी** (ಅಂಗಮರ್ದಿ) (सं) ना. मालिश करणारा.

**अंगयष्टि** (ಅಂಗಯಷ್ಟಿ) (सं) ना.–शरीर; अंगकाठी; सडपातळ देह;

**अंगय्सु** (ಅಂಗಯ್ಸು) (क) धा.–मिळणें; जवळ येणें; प्रवेश करणें; एकत्र येणें.

**अंगर** (ಅಂಗರ) (क) ना.–अग्नि; निखारा; अंगार; राख.

**अंगरक्ष (क्षक)** (ಅಂಗರಕ್ಷ[ಕ]) (सं) ना.–देहरक्षण; कवच; चिलखत.

**अंगरक्षे** (ಅಂಗರಕ್ಷೆ) (सं) ना.–देहरक्षण; कवच; मंत्र.

**अंगराग(रंग)** (ಅಂಗರಾಗ[ರಂಗ]) (सं) ना.–स्नानानंतर अंगाला लावावयाचें सुगंधी द्रव्य; उटी.

**अंगराज** (ಅಂಗರಾಜ) (सं) ना.–अंगदेशाचा राजा; कर्ण.

**अंगरुह** (ಅಂಗರುಹ) (सं) ना–रोमांच; अंगावरील केस; रोम.

**अंगल्** (ಅಂಗಲ್) (क) धा.–शोक; करणें; दुःखानें रडणें; स्फुंदणें.
(क) ना–शोक; विलाप.

**अंगल** (ಅಂಗಲ) (क) वि–पातळ; रुंद.

**अंगलाचु** (ಅಂಗಲಾಚು) (क) धा.–दैन्यवाणें मागणें; पदर पसरणें.

**अंगलाशु** (ಅಂಗಲಾಶು) (क) ना.–लोभी मनुष्य; दुःखीजीव.

**अंगवट्टि** (ಅಂಗವಟ್ಟಿ) (क) ना.–शारीरसौष्ठव; अगलट; देहरचना.

**अंगवडि** (ಅಂಗವಡಿ) (क) ना.–रिकीब; रिकाब; स्वाराची पाय ठेवण्याची जागा.

**अंगवणे** (ಅಂಗವಣೆ) (क) ना.–शक्ति; सामर्थ्य; अधिकार; इच्छा; अभिप्राय.

**अंगवस्त्र** (ಅಂಗವಸ್ತ್ರ) (सं) ना. – स्नानानंतर अंग पुसण्याचा पंचा; अगावरील उपकरणें; रखेली.

**अंगविकल** (ಅಂಗವಿಕಲ) (सं) वि. – कुरूप; विद्रुप; गलितगात्र.

**अंगविकार** (ಅಂಗವಿಕಾರ) (सं) ना. – विद्रूपता; मूर्छा; देहविकार.

**अंगविक्षेप** (ಅಂಗವಿಕ್ಷೇಪ) (सं) ना. – अवयवांचें चलनवलन; नाच; अभिनय.

**अंगविसु** (ಅಂಗವಿಸು) (क) धा. – देणें; सांधणें; एकत्रित होणें. गोळा होणें; मिसळणें.

**अंगवैकल्य** (ಅಂಗವೈಕಲ್ಯ) (सं) ना – गलितांग; अवयवविकृति.

**अंगसंग** (ಅಂಗಸಂಗ) (सं) ना – देहसंपर्क; भेट; मीलन.

**अंगसंयोग** (ಅಂಗಸಂಯೋಗ) (सं) ना. – अवयवाची सुस्थिति; मीलन; शरीरस्वास्थ्य.

**अंगसंस्कार** (ಅಂಗಸಂಸ್ಕಾರ) (सं) ना. – देहशृंगार; जामानिमा; स्नान; अनुलेपन; नट्टापट्टा.

**अंगसाधक** (ಅಂಗಸಾಧಕ) (सं) ना. – व्यायाम घेणारा; तालीमबाज; पेहेलवान.

**अंगहीन** (ಅಂಗಹೀನ) (सं) वि. – अवयवहीन; कामदेव.

**अंगहीनते** (ಅಂಗಹೀನತೆ) (सं) ना. – अवयवहीनता; पांगुपळणा.

**अंगळ** (ಅಂಗಳ) (क) ना. – टाळू; तोंडातील जिभेच्या वरचा भाग.

**अंगळु** (ಅಂಗಳು) (क) ना – टाळू 'अंगळ' पहा.

**अंगात** (ಅಂಗಾತ) (क) वि – 'अंगत' पहा.

**अंगाधिप** (ಅಂಗಾಧಿಪ) (सं) ना. – अंगदेशाचा राजा, कर्ण.

**अंगार** (ಅಂಗಾರ) (सं) ना – निखारा; विस्तव. रक्षा, राख; कोळसा.

**अंगारक** (ಅಂಗಾರಕ) (सं) ना – मंगळ ग्रह; अग्निसारखे लाल रंगाचे ग्रह.

**—वार** (—ವಾರ) (सं) ना – मंगळवार

**अंगारधनिके** (ಅಂಗಾರಧನಿಕೆ) (सं) ना – शेकोटी; शेगडी; प्रवासी चूल.

**अंगारवल्लि** (ಅಂಗಾರವಲ್ಲಿ) (सं) ना – एका जातीची वेली.

**अंगाल्** (लु) (ಅಂಗಾಲ[ಲು) (क) ना – पायाचा तळवा;

**अंगि** (ಅಂಗಿ) (सं) ना – अवयव असणारा, देहधारी. (क) ना – सदरा; बगलबंडी; कुडता; शर्ट.

**अंगिरस** (ಅಂಗಿರಸ)(सं) ना – एका ऋषीचें नाव.

**अंगीकरण** (ಅಂಗೀಕರಣ) (सं) ना – स्वीकार; अंगिकार; शब्ददान.

**अंगीकारिसु** (ಅಂಗೀಕಾರಿಸು) (क) धा – स्वीकारणें; अनुमती देणें; कबूल करणें.

**अंगीकार** (ಅಂಗೀಕಾರ) (सं) ना – स्वीकार; कबुली; संमति.

**अंगु** (ಅಂಗು) (क) ना – भीड; दाक्षिण्य; उपकार; आश्रय; आधार.

**अंगुट** (ಅಂಗುಟ) (क) ना – अंगठा; पादत्राणाचा अंगठा.

**अंगुल** (ಅಂಗುಲ) (सं) ना – बोट; चाणक्य ऋषीचें नाव; अगुष्ठमात्र; बोटमाप.

**अंगुलि** (ಅಂಗುಲಿ) (सं) ना – 'अंगुल' पहा

**अंगुलित्राण** (ಅಂಗುಲಿತ್ರಾಣ) (सं) ना – बोटाचे कवच; बाण सोडतांना वापरण्याचें अंगुलित्राण. बोटावरील टोपण.

**अंगुलिदर्शन** (ಅಂಗುಲಿದರ್ಶನ) (सं) ना – बोट दाखवणें; अंगुलि निर्देश.

**अंगुलिप्रहरण** (ಅಂಗುಲಿಪ್ರಹರಣ) (सं) ना – बोट दाखवणें.

**अंगुलिमुद्रे** (ಅಂಗುಲಿಮುದ್ರೆ) (सं) ना – करपल्लवी; मोहोर; ठसा.

**अंगुलिमोटन** (ಅಂಗುಲಿಮೋಟನ) (सं) ना – बोटें मोडणें; शाप देणे.

**अंगुलिसंदेश** (ಅಂಗುಲಿಸಂದೇಶ) (सं) ना – बोटानें दिलेले हुकूम; बोटाची आज्ञा.

**अंगुलीय** (क) (ಅಂಗುಲೀಯ [ಕ]) (सं) ना – बोट चावणें.

**अंगुष्ट** (ಅಂಗುಷ್ಠ) (सं) ना – 'अंगुट' पहा

**अंगुस** (ಅಂಗುಸ) (क) ना. – 'अंकुश' पहा.

**अंगुळ** (ಅಂಗುಳ) (क) ना. – अंगण; टाळू; तोडांतील तालुस्थान.

**अंगुळि** (ಅಂಗುಳಿ) (क) ना. – बोट; एक जातीचा रोग.

**अंगुळीयक** (ಅಂಗುಳೀಯಕ) (क) ना. – 'उंगुर' पाहा.

**अंगुळे** (ಅಂಗುಳೆ) (क) ना. – एक जातीचा रोग; हाताचे बोट.

**अंगूर** (ಅಂಗೂರ) (सं) ना. – द्राक्ष.

**अंगूष** (ಅಂಗೂಷ) (सं) ना. – वेगानें जाणें; बाण.

**अंगेय्** (ಅಂಗೆಯು) (क) ना. – तळहात.

**अंगेय्सु** (ಅಂಗೆಯ್ಸು) (क) धा. – एकत्रित करणें; आशा धरणें.

**अंगोद्भव** (ಅಂಗೋದ್ಭವ) (सं) ना. – देहापासून उपजणारा; मदन, काम.

**अंगोपांग** (ಅಂಗೋಪಾಂಗ) (सं) ना. – देह आणि अवयव.

**अंगोरा** (ಅಂಗೋರಾ) (अ. दे.) ना. – एक जातीची मेंढी.

**अंग्राणे** (ಅಂಗ್ರಾಣೆ) (क) ना. – दूषण; क्षुद्र; अंगोरा मेंढी.

**अंघवणे** (ಅಂಘವಣೆ) (क) ना. – इच्छा; अपेक्षा; मागणी.

**अंघ्रि** (ಅಂಘ್ರಿ) (सं) ना. – काल; पाद; मूळ; कवितेची ओळ. पाय.

**अंघ्रिज** (ಅಂಘ್ರಿಜ) (सं) ना. – नीच कुळांत जन्मलेला; शूद्र.

**अंघ्रितल** (ಅಂಘ್ರಿತಲ) (सं) ना. – पायाचा तळ.

**अंघ्रित्राण** (ಅಂಘ್ರಿತ್ರಾಣ) (सं) ना. – पादरक्षा; पायतन; चप्पल; वहाण; खडावा.

—इकर्द (—ಇಕ್ಕರ್ದಂ) (क) ना.—डोळे झाकलेली देवता; ध्यानस्थ देवता.
—बिडु (—ಬಿಡು) (क) धा.—डोळे झाकणें.
अेस (ಎಸ) (क) ना.—झांकण; आवरण.
अेसकद (ಎಸಕದ) (क) वि.—प्रख्यात; कीर्तिमान.
अेसक (ಎಸಕ) (क) ना.—कार्य; सामर्थ्य; बल; कीर्ति; रचना; चकाकी; तेज; कांती; चांगुलपणा; आनंद; रीति; रूप; प्रभाव; आकार; दैव; सोंग; ढोंग.
अेसकंगिडु (ಎಸಕಂಗಿಡು) (क) धा.—कांतीहीन होणें; निस्तेज होणें; विरूप होणें.
अेसगु (ಎಸಗು) (क) धा.—उद्योग करणें; आरंभणें; ध्वनि ऐकणें; वारा घालणें; प्रयत्न करणें; दाखविणें.
(क) ना.—प्रारंभ; सुरवात.
अेसडि ಎಸಡಿ) (क) ना.—खेंकडा; कर्कटक,
अेसर् (रु) (ಎಸರ್ [ರು]) (क) ना.—उकळी; द्रव; रस; निवळ.
अेसवु (ಎಸವು) (क) ना.—सौंदर्य; कांती; शोभा.
अेसळ् (ळु) (ಎಸಳ್ [ಳು]) (क) ना.—दळ; पाकळी.
—इसु (—ಇಸು) (क) धा.—पाकळी फुटणें; पानें फुटणें.
—कण्णु (—ಕಣ್ಣು) (क) ना.—कमलनेत्र.
—कुरुप (—ಕುರುಪ) (क) ना.—पाकळ्यांचा समूह.
—पसे (—ಪಸೆ) (क) ना.—पुष्पशय्या.
अेसिगे (ಎಸಿಗೆ) (क) ना.—'इसुगे' पहा.
अेसे (ಎಸೆ) (क) धा.—मारणें; बाण सोडणें; हलणें; चांगलें दिसणें; प्रकाशणें; उठून दिसणें.
(क) ना.—फेक; भिरकट; मार; ठोसा; भिरकाव.
अेसु (ಎಸು) (क) धा.—फेकणें; 'इसु' पहा.
अेसेगे (ಎಸೆಗೆ) (क) ना.—फेक; शोभा; मार; भिरकाव.
अेहगे (हंगे) (ಎಹಗೆ [ಹಂಗೆ]) (क) अ.—असें; कोणत्याहि रीतीनें.
अेळ् (ಎಳ್) (क) ना.—तिल; तीळ.
(क) वि.—नाजूक; कोवळा; विनयी; लहान; सात.
अेळ (ळक) (ಎಳ [ಳಕ]) (क) वि.—लहान; कोवळा; विनयी; अशक्त.
(क) ना.—सभ्यता; दुर्बलता; हलकेपणा; पातळपणा.
—नगे (—ನಗೆ) (क) ना.—गालांतल्या गालांत हसणें; स्मित.
—नीर (—ನೀರ) (क) ना.—शाहाळ्याचें पाणी.
अेळग (ಎಳಗ) (क) ना.—मेंढीची जात; एडका.
अेळदु (ಎಳದು) (क) धा. अ.—'अेर्दु' पहा.
अेळगु (ಎಳಗು) (क) वि.—कोमल; कोवळा; झुलता; डोलणारा.
अेळमे (ಎಳಮೆ) (क) ना.—कोवळेपणा; बाल्य.
अेळर् (ಎಳರ್) (क) ना.—भय; भीति; धसका. 'अळर्' पहा.
अेळल् (लु) (ಎಳಲ್ [ಲು]) (क) ना.—लोंबणें; तरंगणें.
अेळल्चु (ಎಳಲ್ಚು) (क) धा.—लोंबवणें; तरंगवणें; टांगणें; झोका देणें.
अेळवु (ಎಳವು) (क) धा.—झोका देणें; हलविणें; क्रम लावणें; विलंब लावणें.
(क) ना.—बालग्रह; अकडी; व्यवस्था; क्रम.
अेळवे (ಎಳವೆ) (क) ना.— बाल्य; कोवळेपणा.
अेळसु (ಎಳಸು) (क) धा.—इच्छिणें; आकांक्षा धरणें; ओढविणें; व्यापणें; आनंदणें.
अेळे (ಎಳೆ) (क) धा.—ओढणें; हिसकावणें; आकर्षणें.
(क) वि.—कोवळे; लहान; नाजूक.
(क) ना.—एक पंक्ति; रांग; दोरा; भूमि; 'इला' पहा.
अेळेकुळि (ಎಳೆಕುಳಿ) (क) ना.—ओढ; अरक्षण; ओढणारा.
अेळेत (ಎಳೆತ) (क) ना.—'अेळेकुळि' पहा.
अेळेतट (ಎಳೆತಟ) (क) ना.—हिसका; ओढ; बळजोरी. ओढाताण.
अेळेतरू (ಎಳೆತರು) (क) धा.—ओढून आणणें; भीड घालून बोलावणें.
अेळेदाट (ಎಳೆದಾಟ) (क) ना.—हिसकाहिसकी; ओढाताण; स्पर्धा.
अेळेदेर (ಎಳೆದೇರ) (क) ना.—भूमि हाच रथ म्हणणारा शिव.
अेळेवरेय (ಎಳೆವರೆಯ) (क) ना.—लहानपणा; कोवळीक; पोरवय; अर्भकवयी.
अेळ्चर (रु) (ಎಚ್ಚರ [ರು]) (क) धा.—जागे होणें; सावध होणें; संधि पाहात राहणें; डोळा ठेवून बसणें; टपून बसणें.
अेळ्तर् (ಎಳ್ತರ್) (क) धा.—जवळ येणें; उठून येणें; आदर करणें; सामोरे जाणें.
अेळ्तर (ಎಳ್ತರ) (क) ना.—उन्नति; श्रेष्ठता; अभ्युदय; वाढ; उंची.
अेळ्तु (ಎಳ್ತು) (क) ना.—बैल; खोंड; वृषभ.
अेळ्योगु (ಎಳ್ಯೋಗು) (क) धा.—उठून जाणें.
अेळ्विसु (ಎಳ್ವಿಸು) (क) धा.—उठविणें.
अेळ्बु (ಎಳ್ಬು) (क) धा.—'अेब्बु' पहा.
अेळ्बट्टु (ಎಳ್ಬಟ್ಟು) (क) धा.—पळविणें; पिटाळणें; पाठलाग करणें.
अेळ्ळु (ಎಳ್ಳು) (क) ना.—तीळ; गळित धान्य.
अेळ्ळुनीरू (ಎಳ್ಳುನೀರು) (क) ना.—तिलांजली विधि; निराशा.
—बिडु (—ಬಿಡು) (क) धा.—आशा सोडणें; प्राणाची पर्वा न करणें; तिलांजली देणें.
—कोडु (—ಕೊಡು) (क) धा.—ऋणमुक्त होणें; कर्ज वारणें.

# ऐ

**ऐ** (ಐ) (क) ना.—कन्नड वर्णमालेतील १२ वें अक्षर

**ऐम** (ಐಂ) (क) ना.—कोणतें; कसले; काय.

**ऐक** (ಐಕ) (क) वि.—अद्वितीय; एकमेव; एकुलता; एकटा; असमान; एक; दोहोंपैकी एक.

—**क** (—ಕ) (क) वि.—एकाकी; दुसऱ्याच्या सहाय्यावाचूनचें.

**ऐककाल** (ಐಕಕಾಲ) (सं) ना.—एक वेळ; एक काल.

**ऐककुंडल** (ಐಕಕುಂಡಲ) (सं) ना.—एक कुंडल असलेला; बलराम.

**ऐकगुरु** (ಐಕಗುರು) (सं) ना.—एका गुरूचे चेले; सहाध्यायी; वर्गबंधु.

**ऐकग्राहि** (ಐಕಗ್ರಾಹಿ) (सं) ना.—एकदाच सांगून समजून घेणारा; तैलबुद्धि; शीघ्रबुद्धि; आग्रही; एकच धरून बसणारा.

**ऐकग्रीव** (ಐಕಗ್ರೀವ) (सं) ना.—एककंठ; एकमुखी मागणी; एकसूर; एक आवाज.

**ऐकचक्र** (ಐಕಚಕ್ರ) (सं) ना.—एकछत्री राज्य; सूर्याचा एकचक्र रथ; बकासुराच्या तावडींत सापडलेलें शहर.

**ऐकचक्रवर्ति** (ಐಕಚಕ್ರವರ್ತಿ) (सं) ना.—सम्राट; बादशाह.

**ऐकचक्राधिपति** (ಐಕಚಕ್ರಾಧಿಪತಿ) (सं) ना.—चक्रवर्ति सम्राट.

**ऐकचर** (ಐಕಚರ) (सं) ना.—एका पायावर चालणारा; एकटाच फिरणारा; भूचर; मिळून चालणारा.

**ऐकच्छत्र** (ಐಕಚ್ಛತ್ರ) (सं) ना.—साम्राज्याचा कारभार; एकछत्री राज्य.

**ऐकच्छत्रि** (ಐಕಚ್ಛತ್ರಿ) (सं) ना.—सम्राट; साम्राज्य.

**ऐकच्छाय** (ಐಕಚ್ಛಾಯ) (सं) वि.—दाट छाया; छायाच छाया; काळोख; गर्द; दाट; छायाळ.

**ऐकजाति** (ಐಕಜಾತಿ) (सं) ना.—एकदाच जन्मणारा; एकाच रीतिरिवाजाचा; शूद्र.

**ऐकतर** (ಐಕತರ) (सं) ना.—तें नाहींतर हें; दोन्हीपैकीं एक.

**ऐकतान** (ಐಕತಾನ) (सं) ना.—एकचित्त; एक ध्येय; एक राग; एक स्थान; गाईलेलें गीत; तद्गत; एकमत.

**ऐकताल** (ಐಕತಾಲ) (सं) ना.—चार मात्रेचा ताल; गायन वादन आणि नर्तन यांतील सुसंगती.

**ऐकते** (ಐಕತೆ) (सं) ना.—एकत्व; ऐक्य; एकपणा.

**ऐकत्र** (ಐಕತ್ರ) (सं) अ.—एकीकडे; एका बाजूस; एकंदरींत; एकपक्षीं; एकदृष्टीनें विचार करतां.

**ऐकदंत** (ಐಕದಂತ) (सं) ना.—गणपति; (कुमारस्वामींनी गणपतीचा दुसरा दात उपटला अशी कथा आहे).

**ऐकदल** (ಐಕದಲ) (सं) ना.—एक पानवेल; सरस्वति वेल.

**ऐकदा** (ಐಕದಾ) (सं) अ.—एके वेळीं; कोण्या एका काळीं; त्यावेळीं.

**ऐकदृश्(श)** (ಐಕದೃಶ್[ಶ]) (सं) ना.—उत्तम दृष्टीचा; एकाक्ष; कावळा; शिव.

**ऐकदेश** (ಐಕದೇಶ) (सं) ना.—एक भाग; एक तुकडा.

—**तद्भव** (—ತದ್ಭವ) (सं) ना.—समासांतील एकपद तद्भव असलेला समास.

**ऐकदेशि** (ಐಕದೇಶಿ) (सं) ना.—एकाच देशाचे; समदेशी; एककल्ली; एकांगी.

**ऐकदेशीय** (ಐಕದೇಶೀಯ) (सं) वि.—एकाच देशासंबंधीं; एका भागाच्या जवळचा.

**ऐकदेह** (ಐಕದೇಹ) (सं) ना.—मित्र; जिवश्चकंठश्च; बुधग्रह.

**ऐकपतिके** (ಐಕಪತಿಕೆ) (सं) ना.—एकच पति असलेली स्त्री; परम पतिव्रता.

**ऐकपत्न** (ಐಕಪತ್ನ) (सं) ना.—एकच बायको असलेला; अव्यभिचारी; दुसरें लग्न न करणारा.

**ऐकपत्नि** (ಐಕಪತ್ನಿ) (सं) ना.—'एकपत्न' पहा.

**ऐकपत्नीव्रत** (ಐಕಪತ್ನೀವ್ರತ) (सं) ना.—एक भार्याव्रत; आयुष्यांत एकाच स्त्रीशीं विवाहित राहण्याचें व्रत.

**ऐकपद** (ಐಕಪದ) (सं) ना.—एक पाय असलेला; एक समय; कवितेंतील एक चरण; एकच पाद.

**ऐकपाठि** (ಐಕಪಾಠಿ) (सं) ना.—एकदाच वाचून वा ऐकून ध्यानांत ठेवणारा; ऐकग्राही.

**ऐकपादगति** (ಐಕಪಾದಗತಿ) (सं) ना.—लंगडा; लंगडी; एकाच पायावर जाणारा.

**ऐकपादशायि** (ಐಕಪಾದಶಾಯಿ) (सं) ना.—एकाच पायावर राहून झोपणारा; बगळा.

**ऐकपिंगळ** (ಐಕಪಿಂಗಳ) (सं) ना.—उमाशापानें डोळे पिंगळे (पिवळे) झालेला; कुबेर; पीतनयन.

**ऐकभुक्त** (ಐಕಭುಕ್ತ) (सं) ना.—दिवसांतून एकदांच जेवणारा.

**ऐकमत** (ಐಕಮತ) (सं) ना.—मतैक्य; एक अभिप्राय.

**ऐकमात्र** (ಐಕಮಾತ್ರ) (सं) अ.—एकच एक; एकटाच; सहोदर; एकाच आईच्या पोटचे.

**ऐकयष्टि** (ಐಕಯಷ್ಟಿ) (सं) ना.—एकावळी; एकदाणी. 'एकसर' पहा.

**ऐकरस** (ಐಕರಸ) (सं) ना.—श्रृंगाररस; एक प्रकारची मधुरता.

**ऐकरूप (पु)** (ಐಕರೂಪ[ಪು]) (सं) ना.—एकाच प्रकारची वेषभूषा; ऐक्य; अविभक्त; समरूप.

**ऐकलडि** (ಐಕಲಡಿ) (क) ना.—एकदाणी; एकसर.

**ऐकलिंगदेव** (ಏಕಲಿಂಗದೇವ) (सं) ना. – कुबेर; यक्षराज; शंकर.

**ऐकवचन** (ಏಕವಚನ) (सं) ना. – एक गणन सांगणारा शब्द.
**—इ** (—ಇ) (सं) ना. – सत्यवादी; एकवचनी.

**ऐकवाक्यते** (ಏಕವಾಕ್ಯತೆ) (सं) ना. – ऐक्य; परस्पर जुळणारे विचार.

**ऐकशेष** (ಏಕಶೇಷ) (सं) ना. – बाकी एक राहणारे; समासांतील एक भेद.

**ऐकस्थ** (ಏಕಸ್ಥ) (सं) वि. – मिळून राहणारा; एकत्र राहणारा; एकलकोंडा.

**ऐकसंधिग्राहि** ಏಕಸಂಧಿಗ್ರಾಹಿ) (सं) ना. – 'एकपाठि' पहा.

**ऐकसार** (ಏಕಸಾರ) (सं) ना. – एकलड; एकसर; एकदाणी.

**ऐकस्थानि** (ಏಕಸ್ಥಾನಿ) (सं) ना. – एकाच ठिकाणचे; एकाच स्थळाशीं संबंध असलेले.
**—ईय** (—ಈಯ) (क) वि. – एकाच गांवीं जन्मलेला.

**ऐकहस्त** (ಏಕಹಸ್ತ) (सं) ना – सिद्धहस्त; अप्रतिम; कलाकुशल; एकच हात असलेला.

**ऐकाकि (किन्)** (ಏಕಾಕಿ [ಕಿನ್]) (सं) ना. – एकटाच; एकलकोंडा.

**ऐकाकिनि (नी)** (ಏಕಾಕಿನಿ [ನೀ]) (सं) ना. – एकाकी स्त्री; एकलकोंडी

**ऐकाक्षि** (ಏಕಾಕ್ಷಿ) (सं) ना. – कावळी; शिव; 'एकाक्ष' पहा.

**ऐकाग्र** (ಏಕಾಗ್ರ) (सं) वि. – एकच टोक असलेला; एकाच ठिकाणीं दृष्टि स्थिर ठेवणारा.

**ऐकाग्रचित्त** (ಏಕಾಗ್ರಚಿತ್ತ) (सं) वि. – एकाच ठिकाणीं मन लावणारा; एकलय.

**ऐकांगि** (ಏಕಾಂಗಿ) (सं) ना. – एकांडा, अविवाहित; एकाकी.

**ऐकांगिनि** (ಏಕಾಂಗಿನಿ) (सं) ना. – एकटी, अविवाहित स्त्री.

**ऐकांघ्रि** (ಏಕಾಂಘ್ರಿ) (सं) ना. – एक पाय असलेला; लंगडा.

**ऐकांक** (ಏಕಾಂಕ) (सं) ना. – एकांकिका; नाटिका; एक अंकी नाटक.

**ऐकाधिपति** (ಏಕಾಧಿಪತಿ) (सं) ना. सम्राट; चक्रवर्ती.

**ऐकाधिपत्य** (ಏಕಾಧಿಪತ್ಯ) (सं) ना. – एकशासन; चक्रवर्तित्व.

**ऐकांत** (ಏಕಾಂತ) (सं) वि. – एक ध्येय; एकाच टोकाचा.
(सं) ना. – गुप्त स्थळ; गुजगोष्ट; रहस्य; मर्यादातिक्रमण; खुळेपणा.

**ऐकायन** (ಏಕಾಯನ) (सं) ना. – अधिकृत; एकच विषय; एकमत.

**ऐकार्थ** (ಏಕಾರ್ಥ) (सं) ना. – एकच प्रयोजन; एकलाभ.

**ऐकावलि** (ಏಕಾವಳಿ) (सं) ना. – मोत्याची एकदाणी; एक पदर; एक काव्यालंकार.

**ऐकाश्रय** (ಏಕಾಶ್ರಯ) (सं) ना. – अनन्य शरणागति; एकश्रद्ध; एक भाव; एकनिष्ठा.

**ऐकाह (हन्)** (ಏಕಾಹ [ಹನ್]) (सं) ना. – एक दिवस, दिवसाचा अवधि.

**ऐकीनि** (ಏಕೀನಿ) (सं) ना. – निर्भयता; सत्यवादित्व; प्रामाणिकपणा; एकमुखता; निष्कपट.

**ऐकीभविसु** (ಏಕೀಭವಿಸು) (क) धा. – एक होणें; संकलित होणें; मिसळून जाणें.

**ऐकीभाव** (ಏಕೀಭಾವ) (सं) ना. – एकता; संस्था; एकी.

**ऐकु** (ಏಕು) (क) ना. – धाप; उचकी; बोबडेपणा. 'उग्गु' पहा.

**ऐकोक्ति** (ಏಕೋಕ್ತಿ) (सं) ना. – एकवाक; सत्यवादित्व, एकवचनीयता.

**ऐकोदर** (ಏಕೋದರ) (सं) ना. – सहोदर; बंधु.

**ऐकोदरि** (ಏಕೊದರಿ) (सं) ना. – अक्का; बहीण; ताई.

**ऐकोद्देश** (ಏಕೋದ್ದೇಶ) (सं) ना. – एकध्येय; एक साधना.

**ऐगं** (ಏಗಂ) (क) अ. – केव्हांहि; खात्रीनें; प्रतिज्ञेवर.

**ऐगळ् (ळु)** (ಏಗಳ್ [ಳು] (क) अ. – नित्य; सदोदित;
**ऐगळुं** (ಏಗಳುಂ) अष्टौप्रहर; सदाकदा.

**ऐगु** (ಏಗು) (क) धा. – धापा टाकणें; उचकी येणें; शिजविणें; तापविणें; साध्य करून घेणें.

**ऐगुवुदु** (ಏಗುವುದು) (क) अ. – काय करावें?

**ऐगैवं (वें)** (ಏಗೈವಂ [ವೆಂ]) (क) अ. – काय करूं या? मी काय करतों आहे?

**ऐगोळ्** (ಏಗೊಳ್) (क) धा. – मान्य करणें; कबूल करणें; प्रीति करणें; माया करणें; गोंजारणें.
(क) ना. – संभावना; इनाम; पारितोषिक; बहुमान; अहेर.

**ऐट्ट** (ಏಟು) (क) ना. – मार; तडाखा; ठोसा; धक्का; तीर.

**ऐड(डक)** (ಏಡ [ಡಕ]) (क) ना. – मेंढी; एडका; रानमेंढी; किंवडा

**ऐडि** (ಏಡಿ) (क) ना. – 'असडी' पहा.

**ऐडिसु** (ಏಡಿಸು) (क) धा. – उपहास करणें; हसविणें; तिरस्कारणें; वाईट करणें; गांजणें; टोचून बोलणें; पूड करणें.

**ऐण् (णु)** (ಏಣ್ [ಣು]) (क) ना. – पदर; शेवट; शेंडा; उंचवटा.

**ऐण** (ಏಣ) (सं) ना. – हरिण; कृष्णमृग; काळवीट.

**ऐणधर** (ಏಣಧರ) (सं) ना. – हरिणांक; चंद्र.

**ऐणधरधर** (ಏಣಧರಧರ) (सं) ना. – चंद्रमौली; भालचंद्र; शंकर.

**ऐणरिपु** (ಏಣರಿಪು) (सं) ना. – मृगशत्रू; मृगेंद्र; सिंह.

**ऐणलांछन** (ಏಣಲಾಂಛನ) (सं) ना. – चंद्र.

**ऐणवाहन** (ಏಣವಾಹನ) (सं) ना. – वायुदेव.

**ऐणाक्षि** (ಏಣಾಕ್ಷಿ) (सं) ना. – मृगनयना.

**ऐणांक** (ಏಣಾಂಕ) (सं) ना. – 'ऐणलांछन' पहा.

**ऐणाजिन** (ಏಣಾಜಿನ) (सं) ना.—मृगाजिन; हरिणाचें कातडें.
**ऐणाधिनाथ** (ಏಣಾಧಿನಾಥ) (सं) ना.—शिव.
**ऐणाधिनायक** (ಏಣಾಧಿನಾಯಕ) (सं) ना.—शंकर; शिव.
**ऐणि** (ಏಣಿ) (सं) ना.—मृगी; हरिणी; शिडी; निसण.
**ऐणु** (ಏಣು) (क) ना.—शेव; पदर; शेवट; माता; म्यान.
**ऐणेवार** (ಏಣೆವಾರ) (क) ना.—समवयस्क; जोडीदार.
**ऐत** (ಏತ) (क) ना.—मोट; भात कुटण्याचें साधन; पहार.
**ऐतत् (द्)** (ಏತತ್ [ದ್]) (सं) ना.—हें; असें.
**ऐतद्देशीय** (ಏತದ್ದೇಶೀಯ) (सं) वि.—मूलदेशवासी.
**ऐतर्** (ಏತರ್) (सं) ना.—काय; कोणते; कोणीहि.
**ऐतर्हि** (ಏತರ್ಹಿ) (सं) अ.—आतां; आतांच; यावेळीं.
**ऐतादृश्य** (ಏತಾದೃಶ) (सं) वि.—असलें; या प्रकारचें.
**ऐतावत्** (ಏತಾವತ್) (सं) वि.—एवढें; इतकें; मोठें; या मापाचें.
**ऐतु** (ಏತು) (सं) ना.—'ऐतर' पहा.
**ऐदु** (ಏದು) (क) धा.—प्रयत्न करणें; साहस करणें; फुगवणें; तरंगणें.
(क) ना.—सालु; साळ; साळिंद्र.
**ऐदुपंदि** (ಏದುಪಂದಿ) (क) ना.—रानडुक्कर.
**ऐदोरे** (ಏದೊರೆ) (क) अ.—हें बरोबर होईल कां? अनुपम.
**—तु** (—ತು) (क) अ.—कोणत्याहि प्रकारें; कसें बरें होईल?
**ऐधे** (ಏಧೆ) (सं) ना.—अभ्युदय; प्रगती; वाढ; भरभराट.
**ऐन् (न्क)** (ಏನ್ [ನ್ಕು]) (क) ना.—काय; कशासाठीं; किती; कसें.
**ऐनानुं** (ಏನಾನುಂ) (क) अ.—कांहींतरी.
**ऐनः (नस्)** (ಏನಃ [ನಸ್]) (सं) ना.—पाप; दोष; अपराध.
**ऐनिके** (ಏನಿಕೆ) (क) ना.—गणती; कांहीं; काय म्हणतां म्हणतां क्षण.
**ऐपच्चं** (ಏಪಚ್ಚಂ) (क) अ.—हें काय भूषण आहे?
**ऐबंडं** (ಏಬಂಡಂ) (क) अ.—काय विचार! काय धन! तालमाल.
**ऐबंडु** (ಏಬಂಡು) (क) अ.—कोण अपमान!
**ऐब्रज** (ಏಬ್ರಜ) (क) ना.—इंद्रगोप; गांडुळ.
**ऐंबडि** (ಏಂಬಡಿ) (क) अ.—कशाचेंहि विरोधीपणें.
**ऐर्** (ಏರ್) (क) धा.—चढाई करणें; विरोध करणें; वाढणें; चढणें; योग्य होणें; समर्थ होणें; चकाकणें; प्रकाशणें; निवडणें.
(क) ना.—दुःखें; जखम; मार; घाव.
**ऐरका** (ಏರಕಾ) (क) ना.—गांठ नसलेले गवत; लव्हाळें.
**ऐरंड** (ಏರಂಡ) (सं) ना.—एरंडाचें झाड;
**ऐरदेगे** (ಏರದೆಗೆ) (क) धा.—ओढणें; वर चढणें.
**ऐरल्** (ಏರಲ್) (क) ना.—पीठ; आसन; गादी; पाट.
**ऐरलिक्कु** (ಏರಲಿಕ್ಕು) (क) धा.—आसन देणें; पाट मांडणें; बसकूर घालणें.
**ऐराट** (ಏರಾಟ) (क) ना.—चढण; स्वार होणें; राग; चीड; हल्ला; वर पडणें; चढाई.
**ऐराळि** (ಏರಾಳಿ) (क) ना.—चांगला स्वार; हल्ला करणारा; आक्रमक; चढाई करणारा.
**ऐरि** (ಏರಿ) (क) ना.—उंच प्रदेश; उंच बांध; चढाव; तलाव; उंचवटा.
**ऐरिरि** (ಏರಿರಿ) (क) धा.—जखम करणें; भोसकणें;
(क) ना.—नदीतीर.
**ऐरिहोगु** (ಏರಿಹೋಗು) (क) धा.—अंगावर जाणें; हल्ला करणें; चढाई करणें.
**ऐरिळित** (ಏರಿಳಿತ) (क) ना.—उंचसखल जमीन; सागराची भरती–ओहोटी; बरेंवाईट; चढउतार; भाग्याभाग्य.
**ऐरु** (ಏರು) (क) धा.—'ऐर्' पहा.
(क) ना.—उन्नति; प्रगति; अभ्युदय; भरभराट; मस्ती; अहंकार.
**ऐरंजव्वने** (ಏರುಂಜವ್ವನೆ) (क) ना.—प्रौढ स्त्री; प्रौढा.
**ऐरुत** (ಏರುತ) (क) ना.—अभ्युदय; उन्नती; वरचढ.
**ऐरेर्दे** (ಏರೆರ್ದೆ) (क) ना.—फुगवलेली छाती; जखम झालेली छाती.
**ऐर्पडु** (ಏರ್ಪಡು) (क) धा.—सिद्ध होणें; व्यवस्थित होणें; जखम होणें; व्यवस्था करणें.
**ऐर्पाट(ड)** (ಏರ್ಪಾಟ [ಡ]) (क) ना.—व्यवस्था; सिद्धता; रचना.
**ऐपाडु** (ಏಪಾಡು) (क) ना.—'ऐर्पाड' पहा.
**ऐर्वसे** (ಏರ್ವಸೆ) (क) धा.—जखम होणें; दुःख होणें.
**ऐर्वेस** (ಏರ್ವೆಸ) युद्धकार्य; समरसिद्धता.
**ऐलक्कि** (ಏಲಕ್ಕಿ) (क) ना.—वेलदोडा; वेलची; पानपट्टी; पान.
**ऐला** (ಏಲಾ) (सं) ना.—'ऐलक्कि' पहा.
**ऐलां** (ಏಲಾಂ) (क) ना.—लिलाव, उचट; उचल.
**ऐलापत्र** (ಏಲಾಪತ್ರ) (सं) ना.—सर्पराज; नागेंद्र; शेष.
**ऐव** (ಏವ) (क) ना.—मात्सर्य; हेवा.
**—इसु** (—ಇಸು) (क) धा.—द्वेष करणें; मत्सर करणें.
**ऐवं** (ಏವಂ) (सं) अ.—अशा प्रकारें; असेंच.
(सं) ना.—असें.
**ऐवंच** (ಏವಂಚ) (सं) अ.—असेंच; एकंदरींत.
**ऐवाळ्ते** (ಏವಾಳ್ತೆ) (क) अ.—काय कारण! कोण दुरवस्था!
**ऐविसु** (ಏವಿಸು) (क) धा.—हेवा करणें; द्वेष करणें.
**ऐवुदु** (ಏವುದು) (क) अ.—काय करावें? कशासाठीं हवें? काय कारणें.

**ऐवें** (ಏವಂ) (क) अ.–'ऐंतुदु' पहा.
**ऐवेळवें** (ಏವೇಳ್ವೆಂ) (क) अ.–काय सांगू ? काय सांगावें ?
**ऐषण** (ಏಷಣ) (सं) ना.–इच्छा; आशा; लोखंडी बाण; शोध.
 **—त्रय** (—ತ್ರಯ) (सं) ना.–सुत; पति; संपत्ति या तीन इच्छा.
**ऐसाडु** (ಏಸಾಡು) (क) धा.–फेकणें; पखरणें; उधळणें.
**ऐसु** (ಏಸು) (क) वि.–किती.
**ऐळ्** (ळु) (ಏಳ್ [ಳು]) (क) धा.–सावध होणें; वर येणें; उन्नत होणें; सिद्ध होणें; तयार राहणें.
 (क) वि.–सात (संख्या).
**ऐळगे** (ळिगे) (ಏಳ್ಗೆ [ಳಿಗೆ]) (सं) ना.–अभिवृद्धि; भरभराट; उन्नति; उत्तम स्थिति.
**ऐळिद** (ಏಳಿದ) (क) ना. तिरस्कार; तुच्छता; ओरबड; टोमणा; निंदा.
**ऐळिदिके** (ಏಳಿದಿಕೆ) (क) ना.–अपमान; तिरस्कार; निंदा.
**ऐळिसु** (ಏಳಿಸು) (क) धा.–उठविणें; फुगविणें; स्थानभ्रष्ट करणें; पदच्युत करणें; तिरस्कारणें; मुसकुट मारणें; तोंडावरून पांघरूण घेणें; 'ऐडिसु' पहा.
**ऐळगेवाडिव** (ಏಳ್ಗೆವಾಡಿವ) (क) ना.–पाडवा; शुक्लपक्षीय प्रतिपदा.
**ऐळवरु** (ಏಳ್ವರು) } (क) ना.–सातजण.
**ऐळबरु** (ಏಳ್ಬರು) }

# ऐ

**ऐ** (ಐ) (क) ना.–कन्नडवर्णमालेतील १० वें अक्षर.
 (क) अ.–संबोधक अव्यय.
**ऐककंठ्य** (ಐಕಕಂಠ್ಯ) (सं) ना.–एकसूर; 'क' वर्ग.
**ऐकमत्य** (ಐಕಮತ್ಯ) (सं) ना.–एकमनस्कता; ऐक्य; एकता; एकाभिप्राय.
**ऐकागारिक** (ಐಕಾಗಾರಿಕ) (सं) ना.–निर्जन घरांत घुसणारा.
 **—कळ्ळ** (—ಕಳ್ಳ) (क) ना.–चोर; दरवडेखोर.
**ऐकाग्र्य** (ಐಕಾಗ್ರ್ಯ) (सं) ना.–एकाग्रता; एकचित्त; एक ध्येय.
**ऐकात्म्य** (ಐಕಾತ್ಮ್ಯ) (सं) ना.–तद्रूपता; एकात्मता.
**ऐकांतिक** (ಐಕಾಂತಿಕ) (सं) वि.- एकांतसंबंधीं; एकटा; बलिष्ठ; एकपत्नि; एकध्येय.
**ऐकिल** (ಐಕಿಲ್) (क) ना.–हिम; बर्फ; धुकें; थंडी.
**ऐकिल्वेट्ट** (ट्टु) (ಐಕಿಲ್ಬೆಟ್ಟ[ಟ್ಟು]) (क) ना.–हिमाद्रि; हिमालय.
**ऐकिल्वेट्टणुगि** (ಐಕಿಲ್ [ಬೆ] ವೆಟ್ಟಣುಗಿ) (क) ना.–हिमालयकन्या; पार्वती.
**ऐक्य** (ಐಕ್ಯ) (सं) ना.–एकता; एकमत्य; एकरूपता; अभेद.
 **—आगु** (—ಆಗು) (क) धा.–एक होणें; समरस होणें; मरणें.
 **—भाव** (—ಭಾವ) (सं) ना.–एकात्मता; एकरूपता.
**ऐक्षव** (ಐಕ್ಷವ) (सं) वि.–उसापासून झालेलें; गूळ; साखर.
**ऐक्ष्वाक** (ಐಕ್ಷ್ವಾಕ) (सं) वि.–इक्ष्वाकुवंशातील.
**ऐगणेय** (ಐಗಣೆಯ) (क) ना.–(अशोक; अरविंद; चूत; नवमल्लिका व नीलोत्पल) हे पंचबाण; मदन; काम.
**ऐगळ** (ಐಗಳ) (क) ना.–पंचकंठ; शिव.
**ऐगरुळ** (ಐಗರುಳು) (क) ना.–उपाध्याय; अय्या.
**ऐगोरळ** (ಐಗೊರಳ) (क) ना.–पंचकंठ; शिव.
**ऐगोल** (ಐಗೋಲ) (क) ना.–'ऐगणेय' पहा.
**ऐच्छिक** (ಐಚ್ಛಿಕ) (सं) वि.–इच्छावर्ती; आपोआप आलेलें; वैकल्पिक.
**ऐडविड** (ಐಡವಿಡ) (क) ना.–कुबेरासंबंधीं
**ऐडूक** (ಐಡೂಕ) (क) ना.–शृंगार; सजावट; शोभा.
**ऐण** (ಐಣ) (सं) ना.–हरिण; 'ऐण' पहा.
**ऐणेय** (ಐಣೇಯ) (सं) वि.–हरिणीसबंधीं.
**ऐतर्** (रू) (ಐತರ್ [ರು]) (क) धा.–येणें; जवळ येणें.
**ऐतरेय** (ಐತರೇಯ) (सं) ना.–उपनिषदापैकी एक उपनिषद.
**ऐतिह्य** (ಐತಿಹ್ಯ) (सं) ना.–चरित्र; इतिहास; परंपरेचा वृत्तांत.
**ऐदने** (ಐದನೆ) (क) वि.–पांचवे.
 (क) अ.–खरखरमुंड्या वृत्तीनें
**ऐदलेय** (ಐದಲೆಯ) (क) अ.–पंचकंठ शिव.
 (क) धा.–जाणें; °कडे जाणें; सरकणें.
**ऐदु** (ಐದು) (क) वि.–पांच.
**ऐदे** (ಐದೆ) (क) अ.–उत्तम रीतीनें; पुरेपुर.
 (क) ना.–सुवासिनी; सुमंगला; सौभाग्यवती.
**ऐनु** (ಐನು) (अ. दे.) वि.–प्रमुख.
**ऐनुताळि** (ಐನುತಾಳಿ) (क) ना.–सौभाग्याभरण.
**ऐनीरु** (ಐನೀರು) (क) ना.–रजस्वलीचे पांचव्या दिवशीचें स्नान; विटाळशीचें शुद्धिस्नान.
**ऐंगुद** (ಐಂಗುದ) (सं) ना.–इंगुदी वृक्षसंबंधीं.
**ऐंदव** (ಐಂದವ) (सं) ना.–चंद्रासंबंधी; चंद्रकला
 **—कले** (—ಕಲೆ) (सं) ना.–चंद्रकला; मृगशीर्षनक्षत्र.
**ऐंदा** (ಐಂದಾ) अ. दे. अ.–नंतर; त्यानंतर.

ऐंद्र (ಐಂದ್ರ) (सं) वि.–इंद्रासंबंधीं.
(सं) ना.–ज्येष्ठानक्षत्र.
—जाल (—ಜಾಲ) (सं) ना.–मायाविद्या; जादू; इंद्रजाल.
—जालिक (—ಜಾಲಿಕ) (सं) ना.–जादूगार; कपटी; फसव्या.
—धनु (—ಧನು) (सं) ना.–रामाचें धनुष्य; इंद्रचाप.
—शर (—ಶರ) इंद्रधनुष्य.
ऐंद्रलुप्तिक (ಐಂದ್ರಲುಪ್ತಿಕ) (सं) ना.–टक्कल पडलेला; खल्वाट; रोगानें केस गळलेला.
ऐंद्रि (ಐಂದ್ರಿ) (सं) ना.–जयंत; वाली; अर्जुन; कावळा; पूर्वदिशा.
ऐंद्रिय (यक) (ಐಂದ್ರಿಯ[ಯಕ]) (सं) वि.–इंद्रियासंबंधीं.
ऐबु (ಐಬು) (क) ना.–न्यूनता; लोप; दोष; वाण.
ऐमोग (ಐಮೊಗ) (क) ना.–पंचमुखी शिव.
ऐयंब (ಐಯಂಬ) (क) ना.–पंचबाण; काम.
ऐरण (ಐರಣ) (क) ना.–सैंधव; लवण; मीठ; खारट; सौळ; मचूळ; तिखट.
ऐर (रे) दालि (ಐರ[ರೆ] ದಾಳಿ) (क) ना.–मंगळसूत्र.
ऐरावण (ಐರಾವಣ) (सं) ना.–ऐरावत; पूर्वेचा दिग्गज; नागजातीय एक राक्षस; अहिरावण.
ऐरावत (ಐರಾವತ) (सं) ना.–इंद्राचा सातसोंडेचा हत्ती.
ऐरावति (ಐರಾವತಿ) (सं) ना.–इंद्राची हत्तीण; वीज; ढग; नारिंगाचे झाड; इरावती नदीविषयीचें.
ऐरीय (ಐರೀಯ) (सं) ना.– दारु; शराब; मद्य; सोमरस.
ऐरे (ಐರೆ) (क) ना.–'ऐदे' पहा.
ऐरेदालि (ಐರೆದಾಳಿ) (क) ना.–सौभाग्यवती; मंगळसूत्र; गळ्यांतील काळ्या मण्याचा पोत.
ऐव (वं) डि (ಐವ[ವಂ] ಡಿ) (क) वि.–पाचपट; पंचगुण; पाच वेळा.
ऐल (ಐಲ) (सं) ना.–बुद्धपुत्र; चंद्रवंशी पुरुरव राजा.
ऐलविल (ಐಲವಿಲ) (सं) ना.–कुबेर; विश्रवस् ऋषीचा पुत्र.
ऐलेय (ಐಲೇಯ) (सं) ना.–सुवास; सुगंध.
ऐवजि (ಐವಜಿ) (अ. दे.) अ.–बद्दल; करिता; ऐवजीं.
ऐवजु (ಐವಜು) (अ. दे.) ना.–संपत्ती; धन; मालमत्ता.
—दार (—ದಾರ) (अ. दे.) ना.–धनवान्; श्रीमंत.
ऐवाय् (ಐವಾಯ್) (क) ना.–पंचानन; सिंह.
—सिंग (—ಸಿಂಗ) (क) ना.–सिंह.
ऐशानी (ಐಶಾನೀ) (सं) ना.–शिवस्थान; ईशान्यदिशेसंबंधीं.
ऐश्वर्य (ಐಶ್ವರ್ಯ) (सं) ना.–धन; श्री; अष्टविध संपत्ति; शक्ति; बल; विभूती; श्रेष्ठता.
—वंत (—ವಂತ) (सं) ना.–श्रीमान्; संपन्न; धनवान्.
ऐषमः (मस्) (ಐಷಮಃ[ಮಸ್]) (सं) अ.–चालू वर्षी; वर्तमानकालीं.
ऐसर (रल) (ಐಸರ[ರಲ]) (क) ना.–पंचबाण; काम; पांच पदरी हार.
ऐसे (सले) (ಐಸೆ[ಸಲೆ]) (क) अ.–होय ना? नव्हे का? एवढेंच ना?
ऐसिरि (ಐಸಿರಿ) (क) ना.–ऐश्वर्य; संपत्ति; धन.
ऐसु (ಐಸು) (क) वि.–एवढें; झाले.
ऐहिक (ಐಹಿಕ) (सं) वि.–लौकिक; या लोकींचें.

## ओ

ओ (ಒ) (क) ना.–कन्नड वर्णमालेंतील ११ वें अक्षर.
ओकरिके (ಒಕರಿಕೆ) (क) ना.–'ओंगडिके' पहा.
ओक (ಒಕ್ಕು) (क) वि.–एक; बाहेर पडलेलें; 'उगु' धातूचें भूतभूतकाली विशेषण; झोडपलेलें; मळलेलें; ओतलेलें; फेकलेलें.
ओकट्टु (ಒಕ್ಕಟ್ಟು) (क) ना.–नियमानुसार वर्तन; एकटा; एककूट; ऐक्य; एकमत.
ओकडे (ಒಕ್ಕಡೆ) (क) ना.–एक बाजू; एकांग; एक कड.
ओकण (ಒಕ್ಕಣ) (क) ना.–ढेकूण; मत्कुण; ऊं.
ओकणिके (ಒಕ್ಕಣಿಕೆ) (क) ना.–मळणी.
ओकणे (ಒಕ್ಕಣೆ) (क) ना.–व्याख्यान; लेखनरीति; शैली; म्हणणें; विवरण.
—इसु (—ಇಸು) (क) धा.–सांगणें; विवरणें, वृत्तांत देणें.
ओकण्ण (ಒಕ್ಕಣ್ಣ) (क) ना.–एकाक्ष; शिव; शुक्राचार्य; कावळा.
ओकतन (ಒಕ್ಕತನ) (क) ना.–आतव्य; फेक; झोडपणी.
ओकंदि (ಒಕ್ಕಂದಿ) वर्षाचे वीत; वर्षवणी वीत; एक वत्सा.
ओकर (ಒಕ್ಕರ) (क) ना.–एक कड; एक बाजू; वक्र; एक हाताचा मनुष्य.
ओकरणे (ಒಕ್ಕರಣೆ) (क) ना.–पुष्करणी; तळें; सरोवर.
ओकरिसु (ಒಕ್ಕರಿಸು) (क) धा.–ओकणें; वांती होणें; उलटी येणें; थुंकणें; खाकरून थुंकणें; निवृत्त होणें.
ओकरु (ಒಕ್ಕರು) (क) धा.–हसणें; वर उडणें; उडी मारणें.
ओकल्(लु) (ಒಕ್ಕಲ್[ಲು]) (क) ना.–घर; निवास; रयत; शेतकरी; प्रजा; भक्त; मळणी.

—माडु (—ಮಾಡು) (क) धा.—रास करणें; घर करणें; भाड्यानें राहणें.

**ओकल(लु)** (ಒಕ್ಕಲ [ಲು]) (क) ना.—कुटुंब; कुणबी; शेतीपेशाचा.

**ओकलगित्ति** (ಒಕ್ಕಲಗಿತ್ತಿ) (क) ना.—शेतकऱ्याची पत्नि; मजूर स्त्री.

**ओकलतन** } (ಒಕ್ಕಲತನ)
**ओकलुतन** } (ಒಕ್ಕಲುತನ) (क) ना.—शेती; शेतकाम.

**ओकलागु** (ಒಕ್ಕಲಾಗು) (क) धा.—घर करून राहणें; अभिवृद्धि पावणें; बिऱ्हाड करून राहणें.

**ओकलिक्कु** (ಒಕ್ಕಲಿಕ್ಕು) (क) धा.—आपटणें; बडविणें; नाश पावणें; विध्वंसणें.

**ओकलिग** (ಒಕ್ಕಲಿಗ) (क) ना.—शेतकरी; रयत; कुणबी.

—इति (—ಇತಿ) (क) ना.—शेतकरीण; कुळंबीण; शेती करणारी स्त्री.

**ओकविक्कु** (ಒಕ್ಕವಿಕ್ಕು) (क) धा.—'ओकलिक्कु' पहा.

**ओक(क्कु)ळ** (ಒಕ್ಕ[ಕ್ಕು]ಳ) (क) ना.—वीस पायलीचे माप; मण; मुडा.

**ओकालु** (ಒಕ್ಕಾಲು) (क) ना.—एकपाद; चतुर्थांश; लंगडा; वाचणें एकपट तर सांगणें तिप्पट (ओदु ओकालु बुद्धि मुक्कालु.)

**ओकिके** (ಒಕ್ಕಿಕೆ) (क) ना.—धान्य निवडणें; धान्य वेगळें करणें.

**ओकिल् (लु)** (ಒಕ್ಕಿಲ್ [ಲು]) (क) ना.—धान्यनिवड; 'ओकिके' पहा.

**ओक्कु** (ಒಕ್ಕು) (क) अ.—ओतवून; 'उगु' धातूचें भूतकृदंत. (क) धा.—धान्य गोळा करणें; बैलाकडून धान्य तुडविणें; फेकणें; उधळणें; नाश करणें.
(क) ना.—शकुन; शुभाशुभ लक्षण.

**ओक्कुडिते** (ಒಕ್ಕುಡಿತೆ) (क) ना.—घोट; ओंजळ.

**ओक्कुद** (ಒಕ್ಕುದ) (क) ना.—उष्टें; प्रसाद; भुक्त; जंगमाला वाढलेली भिक्षा.

**ओक्कुळिसु** (ಒಕ್ಕುಳಿಸು) (क) धा.—ढेकर देणें; लोंबकळणें; बोलून दाखवणें; समाधानाचा निःश्वास सोडणें; तृप्तीचा उमाळा घेणें.

**ओकेय्** (ಒಕ್ಕೆಯ್) (क) ना.—एक हाती; एकांडेपणा; एकाकी शौर्य.

**ओगटु** (ಒಗಟು) (क) ना.—समस्या; प्रहेलिका; उखाणा; कूट; गूढ गोष्ट.

**ओगटे** (ಒಗಟೆ) (क) ना.—उखाण्यानें घेतलेले नांव; प्रहेलिका.

**ओगडिके** (ಒಗಡಿಕೆ) (क) ना.—ओकारी; वांती; उलटी.

**ओगडु** (ಒಗಡು) (क) धा.—वांती करणें; ओकारी देणें.
(क) ना.—वांती; वमन; ओकारी; उलटी.

**ओग(गे)त** (ಒಗ [ಗೆ] ತ) (क) ना.—फेक; हिसकावून घेणें; अपयश; हानी; मरण.

**ओग(गे)तन** (ಒಗ [ಗೆ] ತನ) (क) ना.—आप्तत्व; नातें; सोयरीक; दंपतीजीवन; संसार.

**ओगनि** (ಒಗನಿ) (क) ना.—आंबटगोड; गोण; पोतें; सनक; अंबाडी; ताग.

**ओगर् (रु)** (ಒಗರ್ [ರು]) (क) ना.—कडूपणा; मीठ; माधुर्यहीन रुचि.

**ओगरे** (ಒಗರೆ) (क) ना.—समानता; योग्यता; साम्य; बरोबरी.

**ओगसुग** (ಒಗಸುಗ) (क) वि.—अतिशय; आश्चर्यकारक, (क) ना.—सोवळें करणारा; बुद्धिवंत.

**ओगु** (ಒಗು) (क) धा.—ओतणें; फेकणें; खालीं उतरवणें; ओझें लादणें; प्रवेश करविणें.

**ओगुमिगे** (ಒಗುಮಿಗೆ) (क) वि.—पुष्कळ; अतिशय, (क) अ.—उत्तम रीतीनें

**ओगे** (ಒಗೆ) (क) धा.—उपजणें; पुढें येणें; कारण होणें; उठणें; दाखवणें; घडी घालणें.

**ओगेतर् (रु)** (ಒಗೆತರ್ [ರು]) (क) धा.—जन्मणें; उपजणें; दाखवणें; सोवळ्यानें येणें; मारणें.

**ओग्गटु** (ಒಗ್ಗಟ್ಟು) (क) ना.—'ओकट्टु' पहा.

**ओग्गर** (ಒಗ್ಗರ) (क) ना.—रास; समूह; समाज.

**ओग्गरणे** (ಒಗ್ಗರಣೆ) (क) ना.—फोडणी; खमंगता.

**ओग्गरिसु** (ಒಗ್ಗರಿಸು) (क) धा.—फोडणी देणें; खमंग करणें; चमचमीत करणें; तिखटमीठ लावून बोलणें.

**ओग्गिसु** (ಒಗ್ಗಿಸು) (क) धा.—साधूची दीक्षा देणें; वाकविणें; मान्य होण्याजोगें करणें; जमणें; सलगी करणें; एकत्र होणें.

**ओग्गु** (ಒಗ್ಗು) (क) धा.—एक होणें; मनाला येणें; जमवून घेणें; अनुसरणें; एकत्रित होणें.
(क) ना.—रास; समूह; सुसंगति.

**ओग्गोडे** (ಒಗ್ಗೊಡೆ) (क) ना.—एकछत्री राज्य, एकछत्राधिपत्य.

**ओंकि** (ಒಂಕಿ) (क) ना.—कडें; सोन्याची वाकी; बंदी.

**ओच्** (ಒಚ್) (क) वि.—एक; एक संख्येचा निर्देश.

**ओच्च** (ಒಚ್ಚ) (क) वि.—सुप्रसिद्ध; कट्टर; हाडाचा.

**ओच्चत** (ಒಚ್ಚತ) (क) ना.—समानता; समरसता; मान्यता; संतोष; समाधानवृत्ति मनोहरता; बांधीवपणा; सुसूत्रता.

**ओच्चतकोळ्ळु** (ಒಚ್ಚತಕೊಳ್ಳು) (क) धा.—एकदम उचलणें; एकाएकी उचलून घेणें; एकदम अंत्राळी करणें.

**ओच्च (च्चो) त्तु** (ಒಚ್ಚ [ಚ್ಚೊ] ತ್ತು) (क) ना.—एक वेळ; दिवसाचा अर्धा भाग; पारोग.

**ओच्चय** (ಒಚ್ಚಯ) (क) ना.—तिरस्कार; अपमान; निंदा; अनौचित्य; हास्य.

**ओच्चर** (ಒಚ್ಚರ) (क) ना.—एकसर; एकदाणी; एकावळी; एकसूर; एककंठ.

**ओच्चि** (ಒಚ್ಚಿ) (क) ना.—अयोग्य वेळ; अवेळ; एक.

**ओच्चु** (ಒಚ್ಚು) (क) धा.—निर्मूल होणें; निर्नाम होणें.

**ओच्चे (च्चे) रे** (ಒಚ್ಚೆ [ಚ್ಚೆ] ರೆ) (क) ना.—ओंजळ, पसा, कुडचा.

**ओच्चेरेगण्** (ಒಚ್ಚೆರೆಗಣ್) (क) ना.—सुंदर नेत्र, सुलोचन.

**ओज्जर** (ಒಜ್ಜರ) (क) ना.—वज्र; झरा; कारंजा; उमळ; उद्रेक; चिलीम; गुडगुडी.

**ओट्टज** (ಒಟ್ಟಜ) (क) ना.—कर; खंडणी; करभार; देणगी.

**ओट्टजे** (ಒಟ್ಟಜೆ) (क) ना.—समूह; संघ; रास; श्रेणि; आधिक्य; अतिशयता; विस्मरण; शौर्य; विस्कटाविस्कट.

—**किडु** (—ಕಿಡು) (क) धा.—गौरव गमावणें; विसरणें; दुर्बल होणें; निस्तेज होणें; कोमेजणें.

**ओट्टण** (ಒಟ್ಟಣ (क) ना.—समूह; संघ; गर्दी; विरोध; स्पर्धा.

**ओट्टयिसु** (ಒಟ್ಟಯಿಸು) (क) ना.—गोळा करणें; एक होणें; रास करणें; स्पर्धा करणें; जिंकणें; ढकलणें; विरोधणें; झाडणें; बाहेर निघणें.

**ओट्टलु** (ಒಟ್ಟಲು) (क) ना.—'ओट्टजे' पहा.

**ओट्टारे** (ಒಟ್ಟಾರೆ) (क) अ.—एकंदरींत; सारांश; मुख्यतः; मुख्यत्वें; थोडक्यांत म्हणजे.

**ओट्टि** (ಒಟ್ಟಿ) (क) वि.—हट्टी; स्वेच्छाचारी.

(क) ना.—मूर्ख स्त्री.

**ओट्टिल्** (लु) (ಒಟ್ಟಿಲ್ [ಲು]) (क) ना.—ओंजळ; 'ओट्टजे' पहा.

**ओट्टिसु** (ಒಟ್ಟಿಸು) (क) धा.—रास करविणें; गोळा करविणें; ओतणें; बांध घालणें.

(क) ना.—रास; प्रतिज्ञा; बांध.

**ओट्टु** (ಒಟ್ಟು) (क) धा. ना.—'ओट्टिसु' पहा.

**ओट्टुकिच्चु** (ಒಟ್ಟುಕಿಚ್ಚು) (क) ना.—खांडव; भडका, स्मशानाग्नि.

**ओट्टि(ओंट्टि)** (ಒಟ್ಟಿ [ಒಂಟ್ಟಿ]) (क) धा.—भोंक पडणें; फट पडणें; भेग पडणें.

(क) ना.—भोंक; रंध्र; भेग; चीर; फट.

**ओड** (ಒಡ) (क) अ.—लागलीच; ताबडतोब; बरोबर; सह; मिळूनमिसळून.

**ओडकु** (ಒಡಕು) (क) ना.—भेग; फट; फूट; तूट; विस्मृति; भग्नता.

**ओडगविसु** (ಒಡಗವಿಸು) (क) धा.—एकत्रित करणें; जमविणें; गोळा करणें; भागविणें; संभाळणें; एकदम गर्दी करणें.

**ओडगूडु** (ಒಡಗೂಡು) (क) धा.—एक होणें; मिसळणें; आवडणें.

—**इसु** (—ಇಸು) (क) धा.—एक होणें; भागविणें; साध्य करणें.

**ओडगोडु** (ಒಡಗೊಡು) (क) धा.—फेकणें; भिरकाटणें; विसकटणें.

**ओडगोल्(लु)** (ಒಡಗೊಳ್ [ಳು]) (क) धा.—जोडीदार होणें; जमवून घेणें; हातमिळवणी करणें.

**ओडतन** (ಒಡತನ) (क) ना.—मित्रत्व; स्नेह; आप्तत्व.

**ओडति** (ಒಡತಿ) (क) ना.—यजमानीण; मालकीण; मालकाची बायको; पत्नि.

**ओडन** (ಒಡನ) (क) ना.—खेळ; सोबत; संगत; मैथुन.

**ओडनाट** (ಒಡನಾಟ) (क) ना.—सहजीवन; सहक्रीडा; संग; व्यवहार; उपयुक्तता.

**ओडनाडि** (ಒಡನಾಡಿ) (क) ना.—स्नेही; मैत्रीण; सहेली; सोबतीण.

**ओडनाडु** (ಒಡನಾಡು) (क) धा.—सहक्रीडा करणें; प्रेमानें वागणें; स्नेहानें राहणें; लाडिगोडी लावणें; गोंजारणें.

**ओडने** (ಒಡನೆ) (क) अ.—लागलीच.; ताबडतोब; मिळून; सह;

**ओडनोडने** (ಒಡನೊಡನೆ) (क) अ.—वारंवार; लागलीच. बोलतां बोलतां; जोडीनें; मिळून मिसळून.

**ओडबडि** (ಒಡಬಡಿ) (क) धा.—मोडणें; एकदम नाश करणें.

**ओड (डं) बडिके** (ಒಡ [ಡಂ] ಬಡಿಕೆ) (क) ना.—संमती; तह; अंगीकार; एकी; सल्ला;

**ओड (डं) बडु** (ಒಡ [ಡಂ] ಬಡು) (क) धा.—कबूल करणें; तृप्त करणें; मान्यता; देणें; सहमत होणें.

**ओडमे** (ಒಡಮೆ) (क) ना.—वस्तु; आभरण; संपत्ति.

**ओडंबि (बे)** (ಒಡಂಬಿ [ಬೆ]) (क) ना.—शरीर; देह; यष्टि.

**ओडर्** (ಒಡರ್) (क) धा.—मान्य करणें; मिळणें; गुंतणें; आरंभणें; पोचणें. मुक्त होणें; घासणें.

**ओडर्चु (रिचु)** (ಒಡರ್ಚು [ರಿಚು]) रचणें; प्रयत्न करणें; खुडसणें; पत्करणें; काम हातीं घेणें.

**ओडरिसु** (ಒಡರಿಸು) (क) धा.—'ओडरिचु' पहा.

**ओडर्पु** (ಒಡರ್ಪು) (क) धा.—उत्पन्न होणें; उपजणें; येणें.

**ओडल्** (ಒಡಲ್) (क) ना.—देह; शरीर; पोट; मुख्य भाग.

(क) अ.—पोट बांधून; कंजूषपणें.

**ओडलिच** (ಒಡಲಿಚ) (क) ना.—देहज, काम.

**ओडलु** (ಒಡಲು) (क) ना.— 'ओडल्' पहा.

**ओडलुगोल्** (ಒಡಲುಗೊಳ್) (क) धा.—देह धारण करणें; जन्म घेणें; अवतरणें.

**ओडलुरि** (ಒಡಲುರಿ) (क) ना.—पोटदुखी; जठराग्नि; द्वेष.

**ओडवरे** (ಒಡವರೆ) (क) अ.—सोबतीनें येतांना.

**ओडवे** (ಒಡವೆ) (क) ना.—वस्तु; अलंकार; 'ओडमे' पहा.

**ओडवेगेड्डु** (ಒಡವೆಗೇಡು) (क) ना.—संपत्तीचा नाश; वस्तुहानी; धनविनाश.

**ओडवेरसु** (ಒಡವೆರಸು) (क) अ.—मिळून; एकत्र येऊन.
(क) धा.—एकत्र येणें; मिळवून घेणें; जमवून घेणें.

**ओडवेरे** (ಒಡವೆರೆ) (क) धा.—सोबत होणें; जमवून घेणें; एकत्रित होणें.

**ओडवेळे** (ಒಡವೆಳೆ) (क) धा.—मिळून वाढणें; सोबतीनें राहणें; बरोबरीनें वाढणें.

**ओड (डे) सु** (ಒಡ [ಡೆ] ಸು) (क) धा.—फोडणें; फाडणें; फोडण्याला कारण होणें; तुकडे करणें; भेद पाडणें.

**ओडसीळ्ळु** (ಒಡಸೀಳು) (क) धा.—पूडपूड करणें; ठासणें.

**ओडहाय्** (ಒಡಹಾಯ್) (क) धा.—शीघ्र धावणें; सटकणें; येऊन जाणें.

**ओडहुट्टु** (ಒಡಹುಟ್ಟು) (क) ना.—सहोदरत्व; दिवस पाळण्या इतके नातें; सुतक पाळण्यासारखें नातें; निकटत्व.

**ओडे** (ಒಡೆ) (क) अ.—संबोधनार्थी अव्यय.
(क) ना.—वडीलकी; आधीनत्व पुढारीपण; स्वामित्व; तापवलेले दूध.
(क) धा.—नाश होणें; चूर होणें; विरघळणें; तोंडाळपणा करणें; थडाथडा बोलणें; अधिकार चालवणें.

**ओडेक** (ಒಡೆಕ) (क) ना.—फूट; तोंडाळपणा.

**ओडेगलसु** (ಒಡೆಗಲಸು) (क) धा.—मिसळणें; कालविणें; 'ओडेवेरसु' पहा.

**ओडेगाति** (ಒಡೆಗಾತಿ) (क) ना.—मालकीण; यजमानीण; स्वामिनी.

**ओडेतन** (ಒಡೆತನ) (क) ना.—मालकी; यजमानत्व; धनीपणा; स्वामित्व.

**ओडेति** (ಒಡೆತಿ)( (क) ना.—मालकी मिरवणारी स्त्री. स्वामिनी.

**ओडेतुळि** (ಒಡೆತುಳಿ) (क) धा.—मोडेपर्यंत तुडवणें; दमवणें; मागें रेटणें; खाली दाबणें; पाणउतारा करणें.

**ओडेमुरि** (ಒಡೆಮುರಿ) (क) धा.—जखम करणें; फोडणें; चिरणें.

**ओडेय** (ಒಡೆಯ) (क) ना.—स्वामी; नायक; पुढारी; राजा.
—ति (—ತಿ) (क) ना.—राणी; नायिका; मालकीण; स्वामिनी.

**ओडेसु** (ಒಡೆಸು) (क) धा.—भेदणें; चिरणें; भेद पाडणें.

**ओड्ड** (ಒಡ್ಡ) (क) ना.—रास; सैन्य; प्रतिज्ञा; द्यूतसाहित्य; गवंडी; पुढारी; घरधनी.

**ओड्डण (णे)** (ಒಡ್ಡಣ [ಣೆ]) (क) ना.—'ओड्ड' पहा.

**ओड्डमुरि** (ಒಡ್ಡಮುರಿ) (क) धा.—'ओडेमुरि' पहा.

**ओड्डयिसु** (ಒಡ್ಡಯಿಸು) (क) धा.—मिळून विरोध करणें; जिंकणें; पराजय करणें; प्रतिरोध करणें.

**ओड्डव** (ಒಡ್ಡವ) (क) ना.—लेखनशैली; शैलीसौंदर्य; सैन्य; प्रतिज्ञा.

**ओड्डवणे** (ಒಡ್ಡವಣೆ) (क) ना.—ओळ; पंक्ति; रांग; सिद्धता; तयारी; 'ओड्डण' पहा.

**ओड्डि** (ಒಡ್ಡಿ) (क) अ.—पदर पसरून; गयावया करून; सामोरे जाऊन.
(क) ना.—चौकडा; चौकडी.

**ओड्डिके** (ಒಡ್ಡಿಕೆ) (क) धा.—रास करणें; गोळा करणें; ठेवणें.

**ओड्डु** (ಒಡ್ಡು) (क) धा.—पदर पसरणें; तोंड वेंगाडून मागणें; पुढे सरकणें; एकत्र होणें; रांगेत राहणें; विरोध करणे.
(क) ना.—सैन्य; प्रतिज्ञा; गांभीर्य; विस्मय; आश्चर्य; गुणाकारासाठी दिलेली संख्या.

**ओड्डुगोळ्** (ಒಟ್ಟುಗೊಳ್) (क) धा.—गोळा होणें; जमणें.

**ओड्डुगल्** } (ಒಡ್ಡುಂಗಲ್ (क) ना.—मार्गातील धोंड; दगड;
**ओड्डुंकल्लु** } (ಒಡ್ಡುಂಕಲ್ಲು) गाडा; सील; कीलक.

**ओड्डुवलगे** (ಒಡ್ಡುವಲಗೆ) (क) ना.—रणवाद्य; भेरी; ढोल; दुंदुभी; रणालगी; रणहलगी.

**ओड्डुवेरे** (ಒಡ್ಡುವೆರೆ) (क) धा.—सैन्य जमवणें; सैन्याची पहाणी करणें; सैन्यांत भरती करणें;

**ओड्डैसु** ((ಒಡ್ಡೈಸು) क धा.—'ओड्डयिसु' पहा.

**ओड्डोलग** (ಒಡ್ಡೋಲಗ) (क) ना.—राजसभा; अधिवेशन; दरबार.

**ओड्याण** (ಒಡ್ಯಾಣ) (क) ना.—कमरपट्टा; मेखला; गोप. 'कांचीदाम' पहा.

**ओणकु** } (ಒಣಕು) (क) वि.—दुर्बळ; सुका; वाळविलेला.
**ओण** } ((ಒಣ) कृश; रोडलेला; किडकिडीत.
**ओणकलु** } (ಒಣಕಲು)

**ओणगु** (ಒಣಗು) (क) धा.—दुर्बळ होणें; रोडणें; सुकणें; वाळणें; किडकिडीत होणें.

**ओणमोरे** (ಒಣಮೋರೆ) (क) ना.—चिंतित मुख; सुकलेला चेहरा; निस्तेज मुद्रा; सपकचर्या; उतरलेलें तोंड.

**ओणहेम्मे** (ಒಣಹೆಮ್ಮೆ) (क) ना.—दुरभिमान; दिखाऊ मोठेपणा; दंभ; दिमाख.

**ओणर्** (ಒಣರ್) (क) धा.—समजणें; आलोचिणें; वाटणें; मोजणें; गणणे.

**ओंटि (टे)** (ಒಂಟಿ [ಟೆ]) (क) ना.—उंट; सांड; एकटा, एकाकी; कानांतील दागिना; कर्णफुल.

**ओंटिग** (ಒಂಟಿಗ) (क) ना.—एकाकी; एकांडा; सोबती नसलेला; एकला.

**ओंट्ट(ड्ड)** (ಒಂಟು [ಡು]) (क) ना.—चिखलाचा ढीग; बांध; उंचस्थळ.

**ओत्** (ಒತ್) (क) वि.—समासांतील एक वाचक 'त' बद्दल येणारा आदेश.

**ओत्तड (ट)** (ಒತ್ತಡ [ಟ]) (क) ना.—एक बाजू, दडपण; दबाव; विरोध; भीती; बागुलबुवा; बुजगावणें; भेडसावणी.

**ओत्तट्टु** (ಒತ್ತಟ್ಟು) (क) अ.—एका बाजूला; संबंध तोडून.

**ओत्तंड** (ಒತ್ತಂಡ) (क) ना.—एक समूह; गट; वर्ग.

**ओत्तंब (बर)** (ಒತ್ತಂಬ [ಬರ]) (क) ना.—बलात्कार; जबरदस्ती; शिरजोरी. हुंबपणा; अडदांडता.

**ओत्तर** (ಒತ್ತರ) (क) ना.—दबाव; दडपण; वेग; विवेकहीनता; बिसाडघाई; 'ओत्तड' पहा.

**ओत्तरिसु** (ಒತ್ತರಿಸು) (क) धा.—गडबड करणें; बाजूला सारणें, दाट होणें; निसटणें; मर्यादा ओलांडणें; 'अळवळि' पहा.

**ओत्ताट** (ಒತ್ತಾಟ) (क) ना.—दबाव; विरोध; प्रतिकार; 'ओत्तड' पहा.

**ओत्ताय** (ಒತ್ತಾಯು) (क) ना.—बळजोरी; जबरदस्ती; बलात्कार. 'ओत्तंब' पहा.

**ओत्तसर** (ಒತ್ತಾಸರ) (क) ना.—साहाय्य; मदत; पाठिंबा; पुष्टि; दुजोरा; जवळीक.

**ओत्तासे** (ಒತ್ತಾಸೆ) (क) ना.—साहाय्य; सहानुभूति; पाठिंबा; लांच.

**ओत्ति** (ಒತ್ತಿ) (क) अ.—दाबून; आवळून; चुरमडून; चुरडून. (क) ना.—सरडा; पाल.

**ओत्तिगे** (ಒತ್ತಿಗೆ) (क) अ.—जवळ; एकंदरीत; समीप. (क) ना.—समीपता; पुस्तक; वही.

**ओत्तलु** (ಒತ್ತಲು) (क) अ.—'ओत्ते' पहा.

**ओत्तिविडि** (ಒತ್ತಿವಿಡಿ) (क) धा.—घट्ट धरणें; दाबून धरणें; आवळून धरणें; करकचून आवळणें.

**ओत्तु** (ಒತ್ತು) (क) धा.—आवळणें; बलात्कार करणें; ढकलणें; राज्य करणें; जिंकणें; उल्लंघणें; लेपणें; फासणें; माखणें; आंत खुपसणें.

(क) ना.—दाटपणा; रास; सामीप्य; आखात; पूर; आधार; माप; राज्यकारभार; एकाखाली एक अक्षर—लेखन.

**ओत्तुकागद** (ಒತ್ತುಕಾಗದ) } **ओत्तुकरडु** (ಒತ್ತುಕರಡು) } (क) ना.—टीपकागद; ब्लॉटिंगपेपर; धारणा; पकड; वर्णांच्या द्वित्वाची खूण; आकलन.

**ओत्तुग** (ಒತ್ತುಗ) (क) ना.—दाबयंत्र; दबाव; दडपण.

**ओत्तुविके** (ಒತ್ತುವಿಕೆ) (क) ना.—दबाव; दडपण; रेटारेटी.

**ओत्तुह** (ಒತ್ತುಳ) (क) ना.—दबाव; दडपण; घासणी; पुसणी. 'ओत्तुग' पहा.

**ओत्ते** (ಒತ್ತೆ) (क) ना.—रांडरोटी; आडकाठी; तारण; गहाण. (क) अ.—आग्रह पूर्वक; जोरानें.

**ओत्तेगोंबळ्** (ಒತ್ತೆಗೊಂಬಳ್.) } **ओत्तेगोंडळ** (ಒತ್ತೆಗೊಂಡಳ) } (क) ना.—तारण ठेवून घेणारी; वेश्या.

**ओदगु** (ಒದಗು) (क) धा.—अनुकूल होणें; सिद्ध होणें; उपयोगी पडणें; मदत करणें; मिळविणें.

(क) ना.—आधिक्य; मिळकत.

—इसु —(ಇಸು) (क) धा.—गोळा करणें; कमावणें; अनुकूल करून देणें; प्राप्त करविणें.

**ओदड्ड** (ಒದಡು) (क) ना.—ओठ; ओष्ठ; लब.

**ओदर् (रु)** (ಒದರ್ [ರು]) (क) धा.—हळी मारणें; मोठ्यानें बोलावणें; हाक मारणें; थरकापणें; थरथरणें; कंप भरणें.

**ओदवु** (ಒದವು) (क) धा.—'ओदगु' पहा.

(क) ना.—अनुकूलता; सिद्धता; मदत; पुष्टि.

**ओदविद** (ಒದವಿದ) (क) वि.—उत्पन्न झालेलें; प्राप्त; मिळालेलें; मिळविलेलें.

**ओदविसु** (ಒದವಿಸು) (क) धा.—'ओदगिसु' पहा.

**ओदे** (ಒದೆ) (क) धा.—लाथ मारणें; पाय झाडणें.

(क) ना.—मागचे पाय बांधणें, लाथ.

**ओदेत** (ಒದೆತ) (क) ना.—गाईचे मागचे पाय बांधण्याची दोरी.

**ओद्दे** (ಒದ್ದೆ) (क) वि.—आर्द्र; ओले; भिजलेलें; कच्चे.

(क) ना.—ओल; दमटपणा; ओलेपणा; पाऊस; आर्द्रता.

**ओन (नि) के** (ಒನ [ನಿ] ಕೆ) (क) ना.—मुसळ; लाट.

**ओनकेवा (पा) डु** (ಒನಕೆವಾ [ಪಾ] ಡು) } **ओनकेहाडु** (ಒನಕೆಹಾಡು) } (क) ना.—धाणा घालतांना म्हणावयाचे गाणें; कांडतांना म्हणावयाचें गाणें; कुटतां वेळचें गाणें.

**ओन (ने) पु** (ಒನ [ನೆ])ಪು (क) ना.—मोह पाडणारे हावभाव; नाट्य; अभिनय.

**ओनपुगार** (ಒನಪುಗಾರ) (क) ना.—नट; अभिनय करणारा.

**ओनपुगाति** (ಒನಪುಗಾತಿ) (क) ना.—नटी; अभिनय करणारी.

**ओनल् (लु)** (ಒನಲ್ [ಲು]) (ध) धा.—अनिवार रागावणें; क्रोधानें भडकावणें; डोळे फिरविणें; डोळे लाल करणें.

(क) ना.—अतिक्रोध; तीव्र संताप; अनिवार राग.

**ओनलि** (ಒನಲಿ) (क) ना.—चाळण; गाळणी.

**ओने** (ಒನೆ) (क) धा.—चाळण घालणें; निवडणें; पाखडणें; लोंबत ठेवणें; टांगणें.

**ओंदरि** (ಒಂದರಿ) (क) ना.—'ओनलि' पहा.

**ओंदु** (ಒಂದು) (क) वि.—प्रथम संख्या; एक;

(क) धा.—जुळणें; आवडणें; घालणें; मिसळणें.

—आगु (—ಆಗು) (क) धा.–एकवटणें.

—गूडु (—ಗೂಡು) (क) धा.–सोबती बनणें; साथ देणें; एक होणें.

—तन (—ತನ) (क) ना.–ऐक्य; एकवटपणा; एकी.

**ओंदिग** (ಒಂದಿಗ) (क) ना.–सोबती; आप्त; जमवून घेतलेला.

**ओंदिसु** (ಒಂದಿಸು) (क) धा.–घालणें; एकत्रित होणें; जमवून घेणें; एक होणें.

**ओप्प** (ಒಪ್ಪ) (क) ना.–लेपन; प्रकाश; तेज; चकाकी; सौंदर्य; चमक; छाप; कांती; अभिनय.

**ओप्पकेडिसु** (ಒಪ್ಪಕೆಡಿಸು) (क) धा.–कुरूप करणें; विद्रूप करणें; फूट पाडणें; दुही निर्माण करणें.

**ओप्पचि (चि)** (ಒಪ್ಪಚ್ಚಿ [ಚಿ]) (क) वि.–अल्पस्वल्प; अतिथोडें.

**ओप्पणि** (ಒಪ್ಪಣಿ) (क) वि.–'ओप्पचि' पहा.

**ओप्पंद** (ಒಪ್ಪಂದ) )क) ना.–तहनामा; संधि; एकमत; मान्यता; कबुली; वारसदार.

**ओप्पंबडे** (ಒಪ್ಪಂಬಡೆ) (क) धा.–मान्य करणें; सुंदर होणें; चकाकणें; जुळणें.

**ओप्पयिसु** (ಒಪ್ಪಯಿಸು) (क) धा.–मान्य होण्यासारखें करणें; उजाळा देणें; ओप देणें; विनवणें; कबूल करवणें.

**ओप्पिके (गे)** (ಒಪ್ಪಿಕೆ [ಗೆ]) (क) ना.–संमती; मान्यता; समेट; अनुमति.

**ओप्पु** (ಒಪ್ಪು) (क) धा.–संमती देणें; होकार देणें; मान्य करणें; सुंदर दिसणें; जमवून घेणें; एकी करणें.

(क) ना.–चांगुलपणा; ओप; चकाकी; कांती.

**ओप्पुगे** (ಒಪ್ಪುಗೆ) (क) ना.–मान्यता; कबुली; संमती; उत्तमता.

**ओप्पुबज्जर** (ಒಪ್ಪುಬಜ್ಜರ) (क) ना.–पाजळलेलें शस्त्र, धार लावलेलें वज्र.

**ओब्ब** (ಒಬ್ಬ) (क) ना.–एकटा; एकाकी; एकांडा.

**ओब्बट्टू** (ಒಬ್ಬಟ್ಟು) (क) ना.–पोळी; आंबोळी; गोडखाद्य.

**ओब्बंटिग** (ಒಬ್ಬಂಟಿಗ) (क) ना.–एकटा; एकाकी.

**ओब्बुळि** (ಒಬ್ಬುಳಿ) (क) ना.–रास; समूह; एकवटता; एकत्रीकरण.

**ओब्बुळिगूडु** (ಒಬ್ಬುಳಿಗೂಡು) (क) धा.–एकवटणें; एकत्र येणें.

**ओब्बुळिसु** (ಒಬ್ಬುಳಿಸು) (क) धा.–रास होणें; रास करणें; एक होणें; एकीकडे येणें.

**ओब्बे** (ಒಬ್ಬೆ) (क) ना.– शिजवलेली वस्तु; वापरलेले जिन्नस; (झुडूप; दाट झाडी; भाता; छप्पर; मोटली; भारा; मोळी; जुडी.)

**ओंबय्वर्** (ಒಂಬಯ್ವರ್) (क) ना.–नऊ माणसें, 'ओंबत्त' ऐवजीं 'ओंबय्' आदेश होतो.

**ओम्मत** (ಒಮ್ಮತ) (क) ना.–एकमत; एक निर्णय; एक अल्प विचार.

**ओम्मन** (ಒಮ್ಮನ) (क) ना.–एकमत; एकमन.

**ओम्मु** (ಒಮ್ಮು) (क) धा.–शिरणें; जुळणें; अनुमति देणें; कबूल करणें.

(क) ना.–मान्यता; कबुली; सहमत.

**ओम्मे** (ಒಮ್ಮೆ) (क) अ.–एकदाच; एकावेळी; एकाकाळीं.

**ओम्मै** (ಒಮ್ಮೈ) (क) ना.–एकदेह; एकांडेपणा; विक्षिप्तपणा; धीटपणा; शौर्य.

**ओम्मोग** (ಒಮ್ಮೊಗ) (क) ना.–एक मुख; एक मत; एक बाजू.

**ओय् (य्यु)** (ಒಯು [ಯ್ಯು]) (क) धा.–निभावून नेणें; अपहार करणें; स्पर्श करणें; वाहून नेणें.

**ओय्कने** (ಒಯ್ಕನೆ) (क) अ.–सरळपणें; निश्चळत्वें; नीट.

**ओय्यगे (ने)** (ಒಯ್ಯಗೆ [ನೆ]) (क) अ.––सावकाशीनें; क्रमानें; स्पष्टपणें; विचारपूर्वक

**ओय्याने** (ಒಯ್ಯಾನೆ) (क) अ.–जपून; सावकाश; विचारपूर्वक

**ओय्यनागु** (ಒಯ್ಯನಾಗು) (क) धा.–निस्तेज होणें; कळा घालवणें; कोमेजणें

**ओय्य (य्या) र** (ಒಯ್ಯ [ಯ್ಯಾ] ರ) (क) ना.–'ओनपु' पहा. सौंदर्य; शोभा; सोंग; विलास.

**ओय्यारगाति** (ಒಯ್ಯಾರಗಾತಿ)
**—गित्ति** (—ಗಿತ್ತಿ) } (क) ना.–सौंदर्याभिमानी
**ओय्यारि** (ಒಯ್ಯಾರಿ)
नटी; नट्टापट्टा करणारी; विलासिनी.

**ओय्याळि** (ಒಯ್ಯಾಳಿ) (क) ना.–घोडदौड; लाकडी घोड्यांची मिरवणूक; घोड्याच्या सोंगाची मिरवणूक.

**ओर** (ಒರ) (क) वि.–एक या अर्थी 'ओंदु'चा 'ओर' आदेश.

**ओर (रु) गु** (ಒರ [ರು] ಗು) (क) धा.–वाकणें; पडणें; निजणें; झोप घेणें; आडवें होणें; वामकुक्षी करणें; पेंगणें; विश्रांति घेणे.

**ओरट्ट (ट्टतन)** (ಒರಟು [ಟುತನ) (क) वि.–मजबूत, घट्ट, खडबडीत; ओबडधोबड.

(क) ना.–मजबूती; घट्टपणा; मस्ती; तडाखा; खडबडीतपणा.

**ओरत** (ಒರತ) (क) ना.–घासणी; चोळणें; मालिश; मसाज; मर्दन,

**ओरते** (ಒರತೆ) (क) ना.–गुडगुडी; झरा; पाझर; स्राव.

**ओरल् (लु)** (ಒರಲ್ [ಲು]) (क) धा.–हाक मारणें; बोंबलणें; कण्हणें; प्रेम करणें; लागू असणें; किंचाळणें.

(क) ना.–मैत्री; आप्तपणा; हाक; कुणबाऊगीत.

**ओरल्चु** (ಒರಲ್ಚು) (क) धा.–किंचाळल्यासारखें ओरडणें; दुखविणें; रडविणें.

ओरवु (ಒರವು) (क) ना.—'ओरते' पहा. पाण्याचा पाझर; निचरा; निर्झर.

ओखारि (ಒಖಾರಿ) (क) ना.—एक प्रकारची कुदळ; खोरें.

ओरसु (ಒರಸು) (क) धा.—घासणें; स्पर्शणें; भरडणें; पुसणें; धान्यावरील फोल काढणें; टरफल काढणें; सोलणें.

ओरळ् (ळु) (ಒರಳ್ [ಳು]) (क) ना.—'ओरल्' पहा.

ओरे (ಒರೆ) (क) धा.—सांगणें; घासणें; ताडून पाहणें; स्पर्शिणें; जमणें; ओतणें; प्रवेशणें.

(क) ना.—म्यान; माता; साम्य; सारखेपणा.

—इडु (—ಇಡು)(क) धा.—गुणपरीक्षा करणें; पारखणें; ताडून पहाणें.

—कट्टु (—ಕಟ್ಟು) (क) धा.—विरोधणें; वजन करणें; गुण ओळखणें; किंमत करणें; रंग ओळखणें; आजमावणें.

—गार (—ಗಾರ) (का) ना.—रंगपारखी; जाणकार.

—गिडु (—ಗಿಡು) (क) ना.—समस्थान; समतोल; हीनता, पराजय, जातीसाम्य.

ओरेत (ಒರೆತ) (क) ना.—'ओरत' पहा; निरोप; म्हणणें.

ओरेदोरे (ಒರೆದೊರೆ) (क) ना.—साम्य; समानता; जुळणी.

ओरेयागु (ಒರೆಯಾಗು) (क) धा.—विसरणें; प्रवेश करणें, आडवें होणें; आटोक्यांत राहाणें.

ओर्काल (ಒರ್ಕಾಲ) (क) ना.—एक वेळ; एक काळ,

ओर्कुडिते (ಒರ್ಕುಡಿತೆ) (क) ना.—एक घोट; एक ओंजळ; एक पसा.

ओर्केसु (ಒರ್ಕೆಸು) (क) धा.—आलिंगणें; धरणें; वाहणें; घट्ट पकडणें; मिठी मारणें.

ओर्गु (ग्गु) (ಒರ್ಗು [ಗ್ಗು]) (क) धा.—सरळ होणें; कबूल होणें; जमवून घेणें; हात मिळविणें.

(क) ना. अतिपरिचय; समूह; गट; ओळ; रास.

ओर्गुडिसु (ಒರ್ಗುಡಿಸು) (क) धा.—एका ठिकाणी रास करणें. कलणें; झोले जाणें; 'ओरियागु' पहा.

ओर्गूडिसु (ಒರ್ಗೂಡಿಸು) (क) धा.—संधान बांधणें; एकत्रित करणें; कबूल करविणें.

ओर्गोडे (ಒರ್ಗೊಡೆ) (क) धा.—संघांतून फुटणें; दूर सरणें; बाजूला होणें.

(क) ना.—एक छत्र.

ओर्चर (ಒರ್ಚರ) (क) ना.—एकावळी; एकदाणी; एकसर; एकसूर.

ओर्चेरे (ಒರ್ಚೆರೆ) } (क) ना.—एक ओंजळ; पसा; अंजलि.
ओर्चिरे (ಒರ್ಚಿರೆ)

ओर्तुत्त (ಒರ್ತುತ್ತ) (क) घास; बोकणा; कवळ; एक तोंडभर घास.

ओर्पिडि (ಒರ್ಪಿಡಿ) (क) ना.—हातभर; ओंजळभरती; एकमूठ.

ओर्पिडिगोळ् (ಒರ್ಪಿಡಿಗೊಳ್) (क) ना.—पिंड; आहार; घासभर अन्न.

ओर्पु (ಒರ್ಪು) (क) धा.—कबूल करणें; संमती देणें; टिकणें.

(क) ना.—शक्ति; दृढालिंगन; टिकाव; जाडेभरडेपणा; स्थैर्य.

ओर्ब (र्वं) (ಒರ್ಬ [ರ್ವ]) (क) ना.—एकटा; एक मनुष्य; एकजण.

ओर्बुळि (ಒರ್ಬುಳಿ) (क) ना.—एकटी; रास; एकवटपणा. 'ओब्बुळि' पहा.

ओर्मे (ಒರ್ಮೆ) (क) अ.—एकदा; एका वेळीं.

ओर्मेय् (ಒರ್ಮೆಯ್) (क) ना.—एकटाच; एकदेह; एकांगवीर; असहाय्य; शूर; बलशाली; पुरुषार्थ गाजविणारा.

ओर्मोदल् (ले) (ಒರ್ಮೊದಲ್ [ಲೆ]) (क) अ.—सर्वांआधी; पहाटे; प्रथमारंभीं; मूळारंभीं.

ओर्वाग (ಒರ್ವಾಗ) (क) ना.—एकभाग; एकबाजू; अर्धा-सापिका; दुगाणी (दोन पै किंमतीचें नाणें)

ओल् (ಒಲ್) (क) धा.—संतोषणें; इच्छिणें; प्रेम करणें; नकोसा होणें; तिरस्कारणें.

(क) अ.—सारखें; जणुं; म्हणून; एतावता.

ओल (लवु) (ಒಲ [ಲವು]) (क) ना.—प्रीति; नम्रता; दया; ओढा; उपरणें; कापडाचा तुकडा.

ओलके (ಒಲಕೆ) (क) ना.—'ओनके' पहा.

ओलगार (ಒಲಗಾರ) (क) ना.—प्रियकर; सजण.

ओलगाति (ಒಲಗಾತಿ) (क) ना.—प्रिया; प्रेयसी.

ओलगट्टु (ಒಲಗಟ್ಟು) (क) धा.—सामोरे जाणें; स्वागत करणें.

ओलणिगे (ಒಲಣಿಗೆ) (क) ना.—घाणा; चरक; पिळण्याचें साधन.

ओल (ले) त (ಒಲ [ಲೆ] ತ) (क) ना.—प्रेम; प्रीति; नम्रता; विनय.

ओलपु (ಒಲಪು) (क) ना.—'ओलवु' पहा.

ओलपुगार (ಒಲಪುಗಾರ) (क) ना.—छानछोक करणारा; ऐटबाज; विलासी; खुशाल चेंडू.

ओलपुगाति (ಒಲಪುಗಾತಿ) (क) ना.—नट्टापट्टा करणारी; शृंगारसाज करणारी; विलासिनी.

ओलवंदु (ಒಲವಂದು) (क) अ.—संतोषेंकरून; आनंदपावून.

ओलवर् (रु) (ಒಲವರ್ [ರು]) (क) धा.—संतोषणें; आनंदणें.

ओलवर (ಒಲವರ) (क) ना.—आनंद; संतोष; पक्षपात.

ओलडु (ಒಲಡು) (क) धा.—झुलणें; मागेंपुढें झुकणें; झोकाळणें.

(क) ना.—संतोष; आनंद.

ओलि (ಒಲಿ) (क) धा.—प्रसन्न होणें; दया दाखवणें; आनंदणें; कलणें; योग्य असणें.

ओलिसु (ಒಲಿಸು) (क) धा.—वाकविणें; पसंत करणें; प्रेम करणें; पसंत पडणें.

**ओलिपु** (ಒಲಿಪು) (क) ना.—पसंती; प्रीति; आनद.
**ओलिमे** (ಒಲಿಮೆ) (क) ना.—प्रीति; 'ओलिपु' पहा.
**ओलु** (ಒಲು) (क) धा.—'ओल्' पहा.
**ओले** (ಒಲೆ) (क) ना.—विस्तव; चूल; शेगडी; नम्रता; शब्द; ऐटदारगति; पाहणी; निरीक्षण; अग्निस्थान.
**ओलेत** (ಒಲೆತ) (क) ना.—'ओलत' पहा.
**ओलेदाट** (ಒಲೆದಾಟ) (क) ना.—परस्पर प्रेम; स्नेहभाव.
**ओल्लणिगे** (ಒಲ್ಲಣಿಗೆ) (क) ना.—'ओलणिगे' पहा.
**ओल्मे** (ಒಲ್ಮೆ) (क) ना.—'ओलिमे' पहा.
**ओल्लदे** (ಒಲ್ಲದೆ) (क) अ.—नकोसें होऊन; तिरस्कारून; अमान्य करून.
**ओल्लने** (ಒಲ್ಲನೆ) (क) अ.—धीरेधीरे; सावकाश; 'नको ? कबूल नाही ?' या अर्थी प्रश्नार्थक अव्यय.
**ओवज** (ಒವಜ) (क) ना.—ओज; गुरु; हुरूप.
**ओसगु** (ಒಸಗು) (क) धा.—प्रयत्न करणें; चोळणें; घासणें; उगाळणें; अडचण उत्पन्न करणें.
**ओसगे** (ಒಸಗೆ) (क) ना.—संतोष; आनंदी प्रसंग, शुभवार्ता; समाराधना; बातमी; भाषण.
**ओसगेव (प) रे** (ಒಸಗೆವ [ಪ] ರೆ) (क) ना.—मंगलवाद्य (परे-वाद्य) परवानगी; समाचार; बातमी.
**ओसडि (डु)** (ಒಸಡಿ [ಡು]) (क) ना.—दांताची हिरडी.
**ओसर् (रु)** (ಒಸರ್ [ರು]) (क) धा.—पाझरणें; स्रवणें; थेंबाथेंबानें ओतणें; ठिबकणें.
(क) ना.—पाणी जिरपण्याचें ठिकाण; ओतण्याचीक्रिया; ओतणें.
**ओसगेल्** (ಅಸಗಲ್) (सं) ना.—चंद्रकांत मणी; स्फटिक.
**ओसे** (ಒಸೆ) (क) धा.—प्रसन्न होणें; आनंदणें; संतोषणें; प्रेम करणें; संमती घेणें; कबूल करणें; मंगल करणें.
**ओसेगे** (ಒಸೆಗೆ) (क) ना.—पारितोषिक; वर; देणगी.
**ओळ्** (ಒಳ್) (क) अ.—आंत; तेथें; ठीक; म्हणजे; उत्तम; छान.
(क) धा.—राहणें; असणें.
(क) वि.—उत्तम; ठीक; चांगलें.
**ओळक (के) य्** (ಒಳಕ [ಕೆ] ಯ್) (क) धा.—आधीन करून घेणें; समाविष्ट करणें; आत घेणें.
(क) ना.—तळहात.
**ओळकय्यु** } (ಒಳಕಯ್ಯು) (क) अ.—स्वीकारून; वश करून
**ओळकेय्दु** } (ಒಳಕೆಯ್ದು) घेऊन.
**ओळकुरूव** (ಒಳಕುರುವ) (क) ना—बेट; द्वीप; द्वीपकल्प.
**ओळकेय्** (ಒಳಕೆಯ್) (क) धा.—अंतर्भूत होणें; 'ओळकय्' पहा.
**ओळकै** (ಒಳಕೈ) (क) ना.—गुप्त मार्ग; चोरवाट.
**ओळकोळ्ळु** (ಒಳಕೊಳ್ಳು) (क) धा.—आंत घेणें; समाविष्ट करणें; मावणें; समरस करून घेणें; गृहीत धरणें.
**ओळकोंटे** (ಒಳಕೋಂಟೆ) (क) ना.—किल्ल्याच्या अंतर्भाग.
**ओळगागु** (ಒಳಗಾಗು) (क) धा—आधीन होणें; ऋणांत सापडणें; आटोक्यांत येणें; पकडींत येणें.
**ओळगु** (ಒಳಗು) (क) ना.—अंतर्भाग; रहस्य; मर्म; मध्य; गर्भागार.
**ओळगुडि** (ಒಳಗುಡಿ) (क) ना.—मंदिराचें गर्भागार; माजघर; झोपडीचा आंतील भाग.
**ओळगुदोरु** (ಒಳಗುದೋರು) (क) धा.—अंतरंग प्रगट करणें; रहस्य-स्फोट करणें.
**ओळगुमाडु** (ಒಳಗುಮಾಡು) (क) धा.—आपल्या बाजूला वळवून घेणें; आपलेसे करणें; वश करून घेणें.
**ओळगे** (ಒಳಗೆ) (क) ना.—'ओळगु' पहा.
**ओळगै** (ಒಳಗೈ) (क) धा.—'ओळगुमाडु' पहा; प्रेम करणें; वाहवा करणें.
(क) ना.—हेर; गुप्तचार; दुसऱ्याचें इंगित जाणणारा.
**ओळगोळ्ळु** (ಒಳಗೊಳ್ಳು) (क) धा.—'ओळकोळ्ळु' पहा.
**ओळतु** (ಒಳತು) (क) अ.—होय; ठीक; बरें.
**ओळतोटि** (ಒಳತೋಟಿ) (क) ना.— अंतःकलह; भाऊबंदकी; दायादी; घरगुती भांडण.
**ओळदु** (ಒಳದು) (क) ना.—'ओळगु' पहा.
**ओळदेगे** (ಒಳದೆಗೆ) (क) धा.—मागे; सरणें; हटणें; पाय मागें घेणें; कच खाणें; उलट फिरणें.
**ओळपडु** (ಅಳಪಡು) (क) धा.—आधीन होणें; अधिकारावर येणें.
**ओळपुगु** (ಒಳಪುಗು) (क) धा.—आंत शिरणें; आंत जाणें.
**ओळमातु** (ಒಳಮಾತು) (क) ना.—गुजगोष्ट; कानगोष्ट; रहस्य; मर्म; गुप्तगोष्ट.
**ओळमुख** (ಒಳಮುಖ) (क) ना.—अंतर्मुखता; आत्मनिरीक्षण; अंतर्ज्ञान.
**ओळमुच्चक** (ಒಳಮುಚ್ಚಕ) } (क) न..—लाजाळूचें झाड.
**ओळमुच्चुग** (ಒಳಮುಚ್ಚುಗ) }
**ओळर् (रु)** (ಒಳರ್ [ರು]) (क) धा.—ओरडणें; किंचाळणें; हाक मारणें; 'ओरल्' पहा.
(क) अ.—आहेत; असतील.
**ओळले** (ಒಳಲೆ) (क) ना.—शंख; शिंप; बोंडलें.
**ओळवण्गे** (ಒಳವರಗೆ) (क) ना. अंतःशत्रु; गृहशत्रु; अस्तनींतील निखारा; षड्रिपु.

ओळवरटे (ಒಳವರಟೆ) (क) ना.–खलबत; गुप्त विचार; कारस्थान; कट; कपट.
ओळवु (ಒಳವು) (क) अ.–आहेत; असतील.
(क) ना.–आधीनता; अंतर्भाग; गुप्त रहस्य; मर्म.
ओळसरि (ಒಳಸರಿ) } (क) धा.–मागें हटणें; पराजय होणें;
ओळसार (ಒಳಸಾರ್) } निष्फळ होणें.
ओळसंचु (ಒಳಸಂಚು) (क) ना.–खलबत; गुप्तविचार; कारस्थान; कपट; कट.
ओळसोरु (ಒಳಸೋರು) (क) धा.–धीर धरणें; हिय्या करणें.
ओळहु (ಒಳಹು) (क) ना.–अर्क; डबोलें; मिळकत; वश करून घेणें; छाप पाडणें; सत्य; चांगुलपणा; श्रेष्ठता; शोभा.
ओळहोगु (ಒಳಹೋಗು) (क) धा. आंत शिरणें; प्रवेशणें; घुसणें.
ओळहोरगु (ಒಳಹೊರಗು) (क) धा.–अंतर्बाह्यता; खुलंखुल्ला; उघडाउघडी; उघडे गुपित.
ओळागर (ಒಳಾಗರ) (क) ना.–आंतील भाग; बाग; मळा.
ओळाय (ಒಳಾಯು) (क) ना.–माजघर; मध्यस्थल.
ओळि (ळ्ळि) तु (ಒಳಿ [ಳ್ಳಿ]ತು) (क) ना.–कल्याण; मंगल.
—केडकु (—ಕೆಡಕು) (क) ना.–बरेंवाईट.
ओळ्ळ्दु (ಒಳ್ಳದು) (क) ना.–'ओळदु' पहा.
ओळ्कु (ಒಳ್ಕು) (क) धा.–सरणें; वाहविणें.
(क) ना.–प्रवाह; लोंढा; पूर.
ओळ्गन्नड (ಒಳ್ಗನ್ನಡ) (क) ना.–मधुर कन्नड; कन्नड़ बालभाषा,
ओळ्गब्ब (ಒಳ್ಗಬ್ಬ) (क) ना–शुभकार्य; अंतःपूर.
ओळ्गु (ಒಳ್ಗು) (क) धा.–'ओग्गु' पहा.
ओळ्गोने (ಒಳ್ಗೊನೆ) (क) ना.–गोड शेवट; सुखपर्यवसान.
ओळ्जस (ಒಳ್ಜಸ) (क) ना.–सत्कीर्ति; सुयश.
ओळ्तन (ಒಳ್ತನ) (क) ना.–चांगुलपणा; संभावितपणा.
ओळ्दळे (ಒಳ್ದಳೆ) (क) ना.–सुधारणें; सुंदर होणें.
ओळ्दुडिगे (ಒಳ್ದುಡಿಗೆ) (क) ना.–चांगला पोषाख; शुभालंकार.
अळोदोडे (ಒಳ್ದೊಡೆ) (क) ना.–मांडी; मांडीचा भाग; रंभोरु; केळींच्या सोटासारखी मांडी.
ओळ्दोरे (ಒಳ್ದೊರೆ) (क) ना.–मोठा प्रवाह; लोंढा.
ओळ्नाडु (ಒಳ್ನಾಡು) (क) ना.–चांगला देश; सुसंस्कृत देश.
ओळ्नुडि (ಒಳ್ನುಡಿ) (क) ना.–सुभाषित; सत्य; विवेकवाणी; अमृतवाणी.
—कार (—ಕಾರ) (क) ना.–सुभाषितकार; श्रेष्ठ कवि; साहित्यिक.
ओळ्नुडिदोर (रु) (ಒಳ್ನುಡಿದೋರ [ರು]) (क) धा.–चांगली भाषा वापरणेः उत्तम साहित्य निर्मिणें.
ओळ्नेरवु (ಒಳ್ನೆರವು) (क) ना.–उत्तम साहित्य; सहानुभूति.
ओळ्पु (ಒಳ್ಪು) (क) ना.–चांगुलपणा; शोभा; शैली; अभिवृद्धि.
ओळ्पुदि (ಒಳ್ಪುದಿ) (क) धा.–व्यापणें; पसरविणें; वाढविणें.
ओळ्मातु (ಒಳ್ಮಾತು) (क) ना.–'ओळ्नुडी' पहा.
ओळ्वरलु (ಒಳ್ವರಲು) (क) ना.–अनर्घ्यरत्न; अमूल्य माणिक.
ओळ्वेळगु (ಒಳ್ವೆಳಗು) (क) ना.–उत्तम प्रकाश; सुकीर्ति; नांव.
ओळ्वेट (ಒಳ್ವೇಟ) (क) ना.–श्रृंगारसमय; मीलनवेळा.
ओळ्ळरल् (लु) (ಒಳ್ಳರಲ್ [ಲು]) (क) ना.–सुपुष्प; सुगंधी फूल.
ओळ्ळाल [ळु] (ಒಳ್ಳಾಳ [ಳು]) (क) ना.–चांगला नोकर, नम्र सेवक; शूर सुंदर पुरुष; शक्तिमान मनुष्य.
ओळ्ळितु (ಒಳ್ಳಿತು) [ತ್ತು]) (क) वि.–उत्तम; चकाकणारे; दिपवणारे.
ओळ्ळिद (ಒಳ್ಳಿದ) (क) ना.–सभ्य; सहृदय.
ओळ्ळिह (ಒಳ್ಳಿಹ) (क) ना.–श्रेष्ठ; संभावित.
ओळ्ळुणिसु (ಒಳ್ಳುಣಿಸು) (क) ना.–रुचकर आहार; पक्वान्न; गोडधोड; पूर्णान्न; सारणयुक्त पक्वान्न.
ओळ्ळु (ಒಳ್ಳು) (क) ना.–म्हातारा कोल्हा.
ओळ्ळे (ಒಳ್ಳೆ) (क) ना.–चांगुलपणा; पाणसाप; वेरुळा.
ओळ्ळेतन (ಒಳ್ಳೆತನ) (क) ना.–सभ्यता; चांगुलपणा; नीति; विनय.
ओळ्ळेदे (ಒಳ್ಳೆದೆ) (क) ना.–सहृदयता; औदार्य; सहानुभूति.
ओळ्ळेदेय (ಒಳ್ಳೆದೆಯು) (क) वि.–सदय; उदार; सहृदय.
ओळ्ळोसगे (ಒಳ್ಳೊಸಗೆ) (क) ना.–संतोष; समाचार; सत्कार्य; शुभवार्ता; शुभाशीर्वाद.
ओळ्ळोज (ಒಳ್ಳೋಜ) (क) ना.–सद्गुरु; गुरुजी; शिक्षक.
ओळ्ळोप (ಒಳ್ಳೋಪ) (क) ना.–प्रिया सती; दयिता.

# ओं

**ओं** (ಓ) (क) ना.–कन्नड वर्णमालेतील १२ वें अक्षर; संबोधन; संबोधन; प्रत्युत्तर ध्वनि.
(क) अ.–प्रश्नसूचक अव्यय; विकल्पदर्शक अव्यय.
(क) धा. प्रेम करणें; आशा करणें; संतोषणें; जमवून घेणें; मैत्री करणें; स्मरण देणें.

**ओंक (कस्)** (ಓಕ [ಕಸ್]) (स) ना.–घर; आश्रय; वास; आनंद; पक्षी; शूद्र; 'ओक' वृक्ष.

**ओंकरि (के)** (ಓಕರಿ [ಕೆ]) (क) ना.–वांती; उलटी; ओकारी.

**ओंकरु** (ಓಕರು) (क) धा.–ओकणें; ओकारी काढणें; उलटी होणें;

**ओंकसौकस** (ಓಕಸೌಕಸ) (सं) ना.–अंतर्गृह; चिमणी.

**ओंक (कु) ळि** (ಓಕ[ಕು]ಳಿ) (क) ना.–मंगलकार्यांतील रंगखेळ; सणांत उडवलेला रंग; रंगशिंपड; गुलालक्रीडा.

**ओंग** (ಓಗ) (अ. दे) ना.– ओघ; प्रवाह; भर; वेग; समूह; रास.

**ओंगटे** (ಓಗಟೆ) (क) ना.–'ओगटु' पहा.

**ओंगडिसु** (ಓಗಡಿಸು) (क) धा.–वर उचलणें; ओकारी देणें; ओकारी येणें; ओकारी काढणें

**ओंगत्य** (ಓಗತ್ಯ) (क) ना.–अपशब्द; अशुभवचन; संकट; लोभ; कृपणता; कंजूषपणा; कासावीस; सुव्यवस्था.

**ओंगर** (ಓಗರ) (क) ना.–अन्न; आहार; खाणेंपिणें; खाद्य.

**ओंघ** (ಓಘ) (सं) ना.–'ओग' पहा; प्रवाह; वेग; समूह.

**ओंकार**(ಓಂಕಾರ) (सं) ना.–प्रणवाक्षर; बीजाक्षर; बीजमंत्र.

**ओंज** (ಓಜ) (क) ना.–गुरु; आचार्य; कार्यकर्ता; आकाश; कलावंत; सुतार; कौशल्य; कुंभार; सोनार; तेज; कळा; काठी.

**ओंजवाडु** (ಓಜವಾಡು) (क) ना. ग्रामदेवतेला बळी समर्पण करतांना म्हणावयाचें गाणें; डफावरील गाणें.

**ओंजस्** (ಓಜಸ್) (सं) ना.–बल; पौरुष; हिंमत; प्रकाश; सौंदर्य; कांतीं; स्पष्टार्थ; आधार; प्रगटपणा.

**ओंजायिल** (ಓಜಾಯಿಲ) (क) ना.–अधिकारी; वडिलधारा; औचित्य; अधिकृत पुरुष.

**ओंजिसु** (ಓಜಿಸು) (क) धा. व्यवस्था लावणें; जोपासणें. ओजविणें; ओप चढविणें.

**ओंजे** (ಓಜೆ) (क) ना.–ओळ; पंक्ति; क्रम; रास; संस्था; नियमितपणा; औचित्य; योग्यता; सदभिप्राय.
**—केडु (गेडु)** (—ಕೆಡು [ಗೆಡು]) (क) धा. अस्ताव्यस्त होणें; रीत सोडणें; मर्यादा उल्लंघणें.
**—कोल्**(—ಕೊಳ್) (क) धा.–नम्र होणें; कमीपणा स्वीकारणें.
**—तप्पु**(—ತಪ್ಪು) (क) धा.–आडमार्गाला जाणें; रीत सोडणें.
**—पिडी (विडी)** (—ಪಿಡಿ [ಏಡಿ]) (क) धा.–नियमानें चालणें; सन्मार्ग धरणें.
**—पेरु (वेरु)** (—ಪೆರು [ವೆರು]) (क) धा. नियमाला अनुसरणें; औचित्य साधणें; स्थानमान पाहून चालणें.

**ओंट** (ಓಟ) (क) ना. दौड; धावस्पर्धा; शर्यंत; वेग; प्रवाह; स्पर्धा; ओट धान्य.

**ओंटि** (ಓಟಿ) (क) ना. फट, भोक; फुंकणी; बांबूची नळी; ओटंबा; कोय; बी.

**ओंड** (ಓಡ) (क) ना. डोण; होडके, होडगे.

**ओंडु** (ಓಡು) (क) धा.–पळणें; वेगानें जाणें; पाय मागें वेणें; ढुंगणाला पाय लावणें.
(क) ना.–गंगाळ; फळाची साल; टरफल; पलायन; कवटी; डोक्याची कवची; ढाल; साल.

**ओंडाट** (ಓಡಾಟ) (क) ना.–पळापळी; येरझारा; यडताकपडी; यातायात.

**ओंडुकुळि** (ಓಡುಕುಳಿ) (क) ना.–पळणारा; यशस्वी स्पर्धक; हेजीब; गांवोगांवीं टपाल पोचविणारा; रनर.

**ओंडे** (ಓಡೆ) (क) ना.–डेरा; कणगी; धान्य साठवण्याचें मातीचें भांडें.

**ओंणि** (ಓಣಿ) (क) ना.–गल्ली; ओळ; पंक्ति; बोळ; लागूनच्या घरांची ओळ; शरणागति.

**ओंत** (ಓತ) (क) वि.–विणलेलें; शिवलेलें.
(क) ना.–वीण; धागा; ताणा.

**ओंतप्रोत** (ಓತಪ್ರೋತ) (सं) वि.–आडवा उभा; पुष्कळ; भरपूर.

**ओंति** (ಓತಿ) (क) ना.–सरडा; पाल.

**ओंतिकाट** (ಓತಿಕಾಟ) (क) ना.–'ओंति' पहा.

**ओंतु** (ಓತು) (क) अ.–प्रीति करून; पाठिंबा देऊन.
(क) ना.–वाचन; अभ्यास; वेदपठण; संपादित वस्तु; रानमांजर; मार्जार.

**ओंदन** (ಓದನ) (सं) ना.–अन्न; ब्रह्म; अशन; 'ओगर' पहा.

**ओंदाळि** (ಓದಾಳಿ) (क) ना.–वाचनप्रेमी; पुस्तकांतला किडा; पाठक; पंडित.

**ओंदु** (ಓದು) (क) धा.–शिकणें; अभ्यासणें; सांगणें; वाचून दाखविणें; वाचणें; ऐकविणें.
(क) ना.–विद्या; अभ्यास; वाचन; पठन.

—इसु (—ಇಸು) (क) धा.—शिकविणें; अभ्यास करणें; भक्तीनें अर्पिणें.

—गार (—ಗಾರ) (क) ना.—पंडित; विद्वान; ज्ञानी; अभ्यासक; वाचक; वाचून दाखविणारा; ऐकविणारा.

ओंप (ಒಂಪ) (क) ना.—रक्षणकर्ता; पालक; संरक्षक; प्रेमी; प्रियकर; पति; स्वामी.

ओंपळ् (ಒಂಪಳ್) (क) ना.—नातलग; प्रेमी; दयिता; प्रियतमा; प्रेमपात्र; 'ओं' चे वर्तमानकालवाचक साधित.

ओंपादि (ಒಂಪಾದಿ) (क) अ.—असें; म्हणून; सारखें; त्याप्रमाणें.

ओंबिराय (काल) (ಒಂಬಿರಾಯ [ಕಾಲ]) (क) ना.—अति प्राचीन राजाचा काल; अतिप्राचीन कालवाचक पर्याय शब्द.

ओंम (ಒಂಮ) (सं) ना.—दया; कृपा; साह्य; उपकार; एक सुगंधी द्रव्य; यज्ञीय आहुति देणारा; होता; अवकाश; आकाश.

ओंर् (ಒಂರ್) (क) वि.—समासामध्यें 'ओंदु' शब्दाऐवजीं होणारा आदेश.

ओंरगित्ति (ಒಂರಗಿತ್ತಿ) (क) ना.—जाऊ; भावजय.

ओंरगे (ಒಂರಗೆ) (क) ना.—समवयस्कता; समानता; सादृश्य; जोड; वारगी; एक वयाचा.

ओंरडि (ಒಂರಡಿ) (क) ना.—उतार; कमीअधिक; तराजू; ताजवा; तागडीचे पारडें; 'पासंग' पहा.

ओंरण (ಒಂರಣ) (क) ना.—ओळ; पंक्ति; शिस्त; व्यवस्था; भंगी.

ओंरणिसु (ಒಂರಣಿಸು) (क) धा.—व्यवस्थित ठेवणें; ओळीनें लावणें; रचणें; अनुक्रमानें लावणें.

ओंरंद (ಒಂರಂದ) (क) ना.—एक रीत; सादृश्य; सौंदर्य; समानता.

ओंरिगे (ಒಂರಿಗೆ) (क) ना.—'ओंरगे' पहा.

ओंरु (ಒಂರು) (क) धा.—आलोचणें; विचार करणें; समजून घेणें; लढणें; चौकशी करणें; ('होरु' पासून साधित); अंदाजणें.

ओंरे (ಒಂರೆ) (क) ना.—उतार; बाक; दुष्टपणा; प्रमाद; जमिनी-पासून वर भिंतीला लावलेला तांबडा रंगपट्टा.

—आगु (—ಆಗು) (क) धा. वाममार्गानें जाणें; दुष्ट होणें. आडमार्ग धरणें.

ओंरेगण्णु (ಒಂರೆಗಣ್ಣು) (क) ना.—वक्रदृष्टि; प्रेमार्द्र दृष्टि; दुष्ट दृष्टि; काणदृष्टीनें पाहणें.

ओंरेगार (ಒಂರೆಗಾರ) (क) ना.—रंगारी; चितारी; रंगकाम करणारा.

ओंरेगोरे (ಒಂರೆಗೋರೆ) (क) वि.—वाकडातिकडा; आडवातिडवा.

ओंरेचप्पर (ಒಂರೆಚಪ್ಪರ)—(क) ना.—छपराचें पाखें

ओंरेयागु (ಒಂರೆಯಾಗು) (क) धा.—'ओंरे आगु' पहा

ओंरोमें (ಒಂರೊಮೆ) (क) अ.—एखादे वेळीं; एकेकदां; केव्हां केव्हां.

ओंरोर्व (ಒಂರೊರ್ವ) (क) वि.—एकेकटा; एकटाच; कोणीएक.

ओंगुंडिसु (ಒಂಗುಂಡಿಸು) (क) धा.—एका बाजूला गोळा करणें; रास करणें; ढीग करणें.

ओंल् (लु) (ಒಂಲ್ [ಲು]) (क) अ.—म्हणे; असें; मित्रत्वानें. (क) ना.—जलक्रीडा; प्रेम; मैत्री; स्नान; राजस्वागत.

ओंलगु (ಒಂಲಗು) (क) ना.—सेवा 'ऊळिग' पहा. राजसभा; दरबार; वाद्यवादन.

—आर्त (—ಆರ್ತ) (क) ना.—स्वामिनिष्ठा दर्शविण्याची इच्छा; श्रद्धापूर्वक अभिवादन.

ओंलगंगोडु (ಒಂಲಗಂಗೊಡು) (क) ना.—राजसभाधिवेशन; दरबार भरविणें; स्वागतवाद्य.

ओंलगशाले (ಒಂಲಗಶಾಲೆ) (क) ना.—राजसभागृह; दरबारगृह.

ओंलगिकार (ಒಂಲಗಿಕಾರ) (क) ना.—सेवक; अनुयायी; अनुचर; साह्य.

ओंलगिसु (ಒಂಲಗಿಸು) }
ओंलवि [इ] सु (ಒಂಲವಿ [ಇ] ಸು) } सेवा करणें; अनुकरण करणें; राजनिष्ठा व्यक्त करणें; बोलल्याप्रमाणें वागणें; अनुसरणें; मिळणें; समाविष्ट होणें; मन जिंकणें.

ओंलाट (ಒಂಲಾಟ) (क) ना.—मैत्री; स्नेह; प्रेमलीला; चित्त-चांचल्य, नम्रता.

ओंलाडु (ಒಂಲಾಡು) (क) धा.—प्रेम करणें; वाकणें; पाण्यांत पोहून स्नान करणे; संतोषणें; उतूं जाणें; फुशारकी मारणें; गर्व करणे; आनंदानें फुगणें.

ओंलिडु (ಒಂಲಿಡು) (क) धा.—आतिथ्य करणें; स्वागत करणे; सामोरे जाणें.

ओंलु (ಒಂಲು) (क) ना.—वाकविणें; ताडणें; ओळखणें; अंदाजणें. (क) ना.—जबाबदारी; प्रतिज्ञा; आतिथ्य; भद्रता; क्षेम; 'अडवु' पहा

ओंलुगार )(ಒಂಲುಗಾರ) (क) ना.—जबाबदार; जमीनदार; जोखमदार; उत्तरदायी; उत्तरवादी.

ओंले (ಒಂಲೆ) (क)ना.—पत्र; ताडपत्रावरील लेख; सवाष्णीच्या म्हणजे सुवासिनीच्या कानांतील आभरणें; ताडाचें साल; बैलगाडीवरील सवारी; गाडीचा टप; छत.

ओंलेगा(का)र (ಒಂಲೆಗಾ [ಕಾ]ರ) (क) ना.—टपाल पोहचविणारा वार्ताहर; हिरोबनीस; ग्रामसेवक; रनर.

ओंलेदाट (ಒಂಲೆದಾಟ) (क) ना.—'ओंलाट' पहा.

ओंलेभाग्य (ಒಂಲೆಭಾಗ್ಯ) (क) ना.—सौभाग्य; मांगल्य; अहोभाग्य; सौभाग्यालंकार; मंगलाभरणें; मंगलसूत्र.

ओंलेमर (ಒಂಲೆಮರ) (क) ना.—तालवृक्ष; ताडवृक्ष.

ओंव (ಒಂವ) (क) ना.—'ओंम' पहा; 'ओंप' पहा; एकटा; परमात्मा; रक्षक.

ओंवदे (ಒಂವದೆ) (क) अ.—प्रेम न करतां; रागानें; रक्षण न करतां.

**ओंवरि** (ಓವರಿ) (क) ना.–देवघर; पडवी; माजघर; सोपा.

**ओंवु** (ಓವು) (क) धा.–रक्षण करणें; उपचार करणें; प्रेम करणें; लक्ष देणें; गौरवणें; मान्यता देणें; माया करणें; कुरवाळणें.

**ओंषधि (धी)** (ಓಷಧಿ [ಧೀ]) (सं) ना.–एकदाच फल देणारी वनस्पति; मोहाचें झाड; बांडगूळ; भांदुर्गी; ऋण.

**ओंषधीश** (ಓಷಧೀಶ) (सं) ना.–वनस्पतींचा स्वामी; चंद्र.

**ओंषधिप्रस्थ** (ಓಷಧಿಪ್ರಸ್ಥ) (सं) ना.–हिमालयाजवळील प्रसिद्ध शहर.

**ओंष्ठ** (ಓಷ್ಠ) (सं) ना.–ओठ; लब.

**—पल्लव** (—ಪಲ್ಲವ) (सं) ना.–लाल ओठ; ओठाची पाकळी.

**—पान** (—ಪಾನ) (सं) ना.–चुंबन; पापा; मुका.

**ओंष्ठपुट** (ಓಷ್ಠಪುಟ) (सं) ना.–ओठाची पावळी; पाकळी.

**ओंष्ठपुष्प** (ಓಷ್ಠಪುಷ್ಪ) (सं) ना.–ओठाप्रमाणें लाल फूल; बंधुक; जास्वंद; दासाळी.

**ओंष्ठ्य** (ಓಷ್ಠ್ಯ) (सं) वि.–ओठासंबंधीं; ओठापासून निघणारे. 'उ ऊ पवर्ग' आदि अक्षरें.

**ओंसर** (ಓಸರ) (क) ना.–नम्रता; उतार; ओंझ्यानें वांकणें.

**ओंसरिके** (ಓಸರಿಕೆ) (क) ना.–कल; झुकाव; वळण; रोख; ओढा.

**ओंसरिसु** (ಓಸರಿಸು) (क) धा.–एका बाजूस जाणें; विसरणें; हवाली करणें; सोडणें; निसरविणें; वजन करविणें; हटणें; अपमान करणें; कांकू करणें.

**ओंसु** (ಓಸು) (क) वि.–सर्व; सगळें सबंध; पूर्ण.

**ओंसुग (गर)** } (ಓಸುಗ [ಗರ]) (क) अ.–साठीं; कारणें;
**ओंस्कर** } (ಓಸ್ಕರ) करितां; उद्देशानें

**ओंहिल (ळ)** (ಓಹಿಲ [ಳ]) (क) वि.–मानवी; पार्थिव; ऐहिक

**ओंहो** (ಓಹೋ) (क) अ.–ओ हो! आश्चर्य; आनंद; गौरव इत्यादि व्यक्त करणारा उद्गार.

**ओंळ्** (ಓಳ್) (क) ना.–निधान; संभोग; मैथुन; भाग; फोड; अंश; चूर; तुकडा; फट; भेग; रतिसुख; वापर; भोगवटा.

**ओंळि** (ಓಳಿ) (क) ना.–'ओणि' पहा.

## औ

**औ** (ಔ) (क) ना.–कन्नड वर्णमालेतील १३ वें अक्षर.

**औकु (औंकु)** (ಔಕು [ಔಂಕು]) (क) धा.–दाबणें; पिळणें; मर्दन करणें; 'अदुमु' पहा.

**औक्ष (क्षक)** (ಔಕ್ಷ [ಕ್ಷಕ]) (सं) ना.–बैलांची झुंड; बैलांची जांगळ.

**औघ** (ಔಘ) (सं) ना.–ओघ; रास; पूर; लोंढा; समूह.

**औचिति (त्य)** (ಔಚಿತಿ [ತ್ಯ]) (सं) ना.–योग्यता; संतोष; आनंददायक वस्तु; उचिता.

**औचु** (ಔಚು) (क) धा.–'अवचु' पहा.

**औजस** (ಔಜಸ) (सं) ना.–चकाकी; तेज; कांती; सुवर्ण; उत्साह; शौर्य.

**औडल** (ಔಡಲ) (सं) ना.–एरंड; एरंडाचें झाड

**औडु (औंडु)** (ಔಡು [ಔಂಡು]) (क) ना.–ओठ; घुटका.

**—कच्चु** (—ಕಚ್ಚು) (क) धा.–ओठ चावणें; क्रोधाविष्कार करणें; रागानें दातओठ खाणें.

**औडुंबर** (ಔಡುಂಬರ) (सं) ना.–'उदुंबर' पहा.

**औतप** (ಔತಪ) (सं) ना.–जैनांचें मौनव्रत; मौनव्रताचें तप.

**औत्कंठ्य** (ಔತ್ಕಂಠ್ಯ) (सं) ना.–उत्कंठा; उत्साह; आतुरता; व्यसन.

**औत्तरेय** (ಔತ್ತರೇಯ) (सं) वि.–उत्तरापुत्र परीक्षिती; उत्तर दिशेचा; मागूनचा.

**औत्तानपादि** (ಔತ್ತಾನಪಾದಿ) (सं) ना.–उत्तानपादपुत्र; ध्रुव; ध्रुवतारा.

**औत्संगिक** (ಔತ್ಸಂಗಿಕ) (सं) वि.–मांडीपासून जन्मलेला; वैश्य; मांडीवर खेळणारे बालक.

**औत्सर्गिक** (ಔತ್ಸರ್ಗಿಕ) (सं) वि.–उत्सर्गयोग्य; त्याज्य; स्वाभाविक; सामान्य.

**औत्सुक्य** (ಔತ್ಸುಕ್ಯ) (सं) ना.–उत्सुकता; संभ्रम; आसक्ति; प्रेम; चिंता; कळकळ; आकांक्षा; हाव; भीति.

**औदानिक** (ಔದನಿಕ) (सं) ना.–आचारी; बल्लव; बवर्जी; आहार पदार्थ करणारा मनुष्य; स्वयंपाकी; महाराज.

**औदर्य** (ಔದರ್ಯ) (सं) वि.–उदरांतील; पोटच्चें; पोटासंबंधीं.

**औदार्य** (ಔದಾರ್ಯ) (सं) ना.–उदारपणा; दातृत्व; थोरमन; महती.

**औदासीन्य** (ಔದಾಸೀನ್ಯ) (सं) ना.–उदासीनता; मंदपणा; ढिलाई; दुर्लक्ष; बेफिकिरी; बेपरवाही.

**औदास्य** (ಔದಾಸ್ಯ) (सं) ना.–उदासता; वैराग्य; अनासक्ति; अप्रीति; बेफिकीरी; बेपरवाही.

**औदुंबर** (ಔದುಂಬರ) (सं) ना.–'उदुंबर' पहा.

**औद्धत्य** (ಔದ್ಧತ್ಯ) (सं) ना.–उद्धटपणा; मस्ती; अविनय; बेछूट वृत्ति; अविवेकता; अविधेयता.

**औद्वाहिक** (ಔದ್ವಾಹಿಕ) (सं) वि.–लग्नांतील आहेर; लग्नखर्च.

**औन्नत्य** (ಔನ್ನತ್ಯ) (सं) ना.–उन्नति; मोठेपणा; हट्ट; उंची; आडमुठेपणा.

**औपकार्य** (ಔಪಕಾರ್ಯ) (सं) ना.—पालपट; गुडार; बिडार.
**औपचारिक** (ಔಪಚಾರಿಕ) (सं) वि.—उपचारासंबंधी; वरपांगी; सामान्य; गौण्य.
**औपधर्म्य** (ಔಪಧರ್ಮ್ಯ) (सं) ना.—खोटा उपदेश; अर्धसत्य.
**औपधिक** (ಔಪಧಿಕ) (सं) वि.—कपटी; भानगडीचे; ढोंगी.
**औपधेय** (ಔಪಧೇಯು) (सं) ना.—रथचक्र; रथांग.
**औपपत्तिक** (ಔಪಪತ್ತಿಕ) (सं) वि.—सिद्ध; हस्तगत; योग्य; सुलभसाध्य; तात्त्विक; उचित.
**औपम्य** (ಔಪಮ್ಯ) (सं) ना.—साम्य; सारखेपणा; उपमात्त्व; जोड; तुलना; तुल्यता.
**औपयिक** (ಔಪಯಿಕ) (सं) वि.—योग्य उपचार करण्यासारखे; उपायक्षम.
**औपरोधिक** (ಔಪರೋಧಿಕ) (सं) वि.—संबंधी; निष्पन्न.
(सं) ना.—दया; करुणा; विरोध.
**औपल** (ಔಪಲ) (सं) ना.—दगडी; दगडविषयक.
**औपवस्त** (ಔಪವಸ್ತ) (सं) ना.—उपवास; निराहार; लंघन; उपोषण.
**औपवाह्य** (ಔಪವಾಹ್ಯ) (सं) ना.—मेणा; राजरथ; ऐरावत; राजहत्ती; श्रेष्ठ वाहन.
**औपसंख्यानिक** (ಔಪಸಂಖ್ಯಾನಿಕ) (सं) वि.—परिशिष्ट; पुरवणी.
**औपासन** (ने) (ಔಪಾಸನ [ನೆ]) (सं) ना.—अग्निपूजा; गृहस्थाचें नित्यकर्म.
**औरस** (ಔರಸ) (सं) ना.—वडील; शासनसंमत पुत्र; धर्मपती-पासूनची संतती; वडील पत्नीचे संतान; शासनसंमत वंश.
**और्ध्वदैहिक** (ಔರ್ಧ್ವದೈಹಿಕ) (सं) ना.—उत्तरक्रिया; शवसंस्कार.
**और्व** (ಔರ್ವ) (सं) ना.—वैद्य; भृगुवंशातील एक ऋषि.
**और्वअग्नि** (ಔರ್ವಅಗ್ನಿ) (सं) ना.—वडवानल.
**और्वानिल** (ಔರ್ವಾನಿಲ) (सं) ना.—झंझावात; वावटळ.
**औलूक्य** (ಔಲೂಕ್ಯ) (सं) वि.—घुबडाच्या थव्यासंबंधी.
**औशंस्** (ಔಶಂಸ್) (सं) राजनीति; शुक्रनीति.
**औषध** (ಔಷಧ) (सं) ना.—दारू; मादक द्रव्य; चिकित्सा; वनस्पती; चंद्र; वैद्य; मुळी.
**औष्ट्रक** (ಔಷ್ಟ್ರಕ) (सं) ना.—उंटाचा तांडा; उंटासंबंधी.
**औष्ठ्य** (ಔಷ್ಠ್ಯ) (सं) वि.—ओठासंबंधी; 'ओष्ठ्य' पहा.

## क

**क** (ಕ) (क) ना.—कन्नड व्यंजन मालेतील प्रथमाक्षर.
**कं** (ಕಂ) (क) ना.—ब्रह्मदेव; सूर्य; जीव; डोकें; पाणी; संतोष; आत्मा; यम; अग्नि; विष्णु; मोर; दक्षप्रजापति; काल; धन; शब्द; आजार; कामदेव; राजा; पति; डबोलें; ऐवज; गरुड; मन; देह; ढग; खीळ; प्रकार.
**कंस** (ಕಂಸ) (सं) ना.—पितळ; कंस-चिन्ह; कांसे; तांबट; पानदान; कंस राक्षस.
**—अरि, अराति** (—ಅರಿ, ಅರಾತಿ) (सं) ना.—कृष्ण.
**—ताल** (ळ) (—ತಾಲ [ಳ]) (सं) ना.—झांज; घाट.
**कंसाळ** (ಕಂಸಾಳ) (सं) ना.—झांज; घंटा; घांट.
**कंसाळक** (ಕಂಸಾಳಕ) (सं) ना.—सोनार; सुवर्णकार.
**ककुंजल** (ಕಕುಂಜಲ) (सं) ना.—चातक पक्षी.
**ककुत्** (ಕಕುತ್) (सं) ना.—वशिंड.
**ककुत्स्थ** (ಕಕುತ್ಸ್ಥ) (सं) ना.—ककुद्वंशातील राजा शशादाचा इंद्रस्वरूपी. बैलावरील स्वार.
**ककुत्स्थज** (ಕಕುತ್ಸ್ಥಜ) (सं) ना.—ककुद्वंशातील राजा; राम; ककुद घराण्याचा वंशज.
**ककुद्** (द) (ಕಕುದ್ [ದ]) (सं) ना.—वशिंड; प्रधान; खड्ग; आकाश; शिंग; पोळ; पालापाचोळा; छत्रचामरादि राजचिन्हें.
**ककुद्मत्** (ಕಕುದ್ಮತ್) (सं) ना.—बैल; वृषभ.
**ककुभ्** (भ) (ಕಕುಭ್ [ಭ]) (सं) ना.—दिशा; प्रदेश; श्रेष्ठ तरवार; आकाश; तंबोऱ्याच्या भोपळ्याचें कातडें; अर्जुन वृक्ष; तंबोऱ्याचा भोपळा; चतुर्थांश वर्तुळ; सौंदर्य; चंपकमाला; कुड्याचें फूल; कातळ; पर्वत शिखराचा दगड; चांगुलपणा.
**ककु** (क्कु) लते (ಕಕು [ಕ್ಕು]ಲತೆ (क) ना.—काकळूत; काकुळत; व्याकुळता; प्रीति; दया; चिंता; संकट; आशा; चापल्य; संदेश; अपेक्षा.
**ककूट** (ಕಕೂಟ) (सं) ना.—ककूट पक्षी.
**ककें** (ಕಕೇ) (अ. दे) ना.—कोकोचें झाड.
**कक्क** (ಕಕ್ಕ) (क) ना.—काका, चुलता.
**कक्कड** (ಕಕ್ಕಡ) (क) ना.—काकडा; हिलाल; दिवटी.
**कक्कडे** (ಕಕ್ಕಡೆ) (क) ना.—बरची; खड्ग; भोसकण्याचे शस्त्र.
**कक्कंबु** (ಕಕ್ಕಂಬು) (क) ना.—बाण; शर.
**कक्कर** (ಕಕ್ಕರ) (क) ना.—कक्कर पक्षी; एकबाण; पायांतील घागरी; नुपूर.
**कक्करि** (ಕಕ್ಕರಿ) (क) ना.—वाकडेपणा; वक्रता; दुष्टपणा; दुर्बुद्धि.
**कक्कस** (ಕಕ್ಕಸ) (क) ना.—आयास; वीट; कठीणपणा; ठणका; क्रौर्य.

**—गार** (— ಗಾರ) (क) ना.—क्रूर मनुष्य; कसाई; हिंसक; खाटीक; कटक,

**कक्कसु** (ಕಕ್ಕಸು) (क) ना.—पायखाना; शेतखाना; संडास,

**कक्किसु** (ಕಕ್ಕಿಸು) (क) धा.—ओकारी करवणें; बाहेर पाडणें; वांती करविणें; बाहेर हाकलणें; उलटी करविणें; वमन करविणें.

**कक्कु** (ಕಕ್ಕು) (क) धा.—वांती करणें; ओकणें;
(क) ना.—शस्त्राचें टोक; करवताचा दाता; असभ्यता; राकटपणा; हुंबपणा; बोलण्यांतील कठोरपणा.

**कक्कुदरि** (ಕಕ್ಕುದರಿ) (क) ना.—दतुरायुध; दाते असलेले शस्त्र; करवती तरवार.

**कक्कुल** (ಕಕ್ಕುಲ) (सं) ना.—बकुल वृक्ष.

**कक्कुला (लि) ते** (ಕಕ್ಕುಲಾ [ಲಿ]ತೆ) (क) ना.—'कक्कुलते' पहा.

**कक्कुलतेगार** (ಕಕ್ಕುಲತೆಗಾರ) (क) वि.—प्रेमळ; दयाळु; काकळूत करणारा.

**कक्कोलि (क)** (ಕಕ್ಕೊಲಿ [ಕ]) (सं) ना.—सुवासिक द्रव्य; कंकोळ; कापूरचिनी.

**कक्ष** (ಕಕ್ಷ) (सं) ना.—कंकोळ; छातीवरील पदर; कोना; खोली; दार; दलदल; विरोध; मनगट; नक्षत्र; राणीचें अंतःपूर; हत्तीला बांधण्याची चामड्याची दोरी; मिणी; पाप; जंगल; पक्ष; एक रोग; लपण्याची जागा; गुप्तस्थान; वेल; गवत.

**कक्षप** (ಕಕ್ಷಪ) (सं) ना.—कासव.

**कक्षपट** (ಕಕ್ಷಪಟ) (सं) ना.—काचा; कासोटा; लंगोट.

**कक्षपाल (लिके)** (ಕಕ್ಷಪಾಲ [ಲಿಕೆ]) (सं) ना.—बगलथैली; झोळी; हातथैली.

**कक्षशाय (यु)** (ಅಕ್ಷಶಾಯ [ಯು]) (सं) ना.—कुत्रा; श्वान; शुनक.

**कक्षांतर** (ಕಕ್ಷಾಂತರ) (सं) ना. मंत्रागार; खलबतखाना.

**कक्षा, कक्षापट** (ಕಕ್ಷಾ, ಕಕ್ಷಾಪಟ) (सं) ना.—चड्डी; लंगोटा; कासोट्याचें कापड.

**कक्षावेक्षक** (ಕಕ್ಷಾವೇಕ್ಷಕ) (सं) ना.—राणीवशावरील अधिकारी; कंचुकी; अंतःपुराचा कारभारी; राजोद्यानपालक; जार; खाजगी कारभारी; द्वारपाल; राजकवि; नट; खेळिया; नर्तक; रंगारी; भावना.

**कक्षि** (ಕಕ್ಷಿ) (सं) ना.—भांडण; तंटा; वाद; पक्ष; तट.

**—गार** (— ಗಾರ) (सं) ना.—तंटेखोर; वादीप्रतिवादी.

**कक्षे** (ಕಕ್ಷೆ) (सं) ना.—'कक्ष' पहा.

**कक्षेसु** (ಕಕ್ಷೇಸು) (सं) ना.—बाणविशेष; कवडीक नांवाचा बाण.

**कक्ष्ये (क्ष्या)** (ಕಕ್ಷ್ಯೆ [ಕ್ಷ್ಯಾ]) (सं) ना.—खोली; अंतःपूर; विभाग; उन्नति; प्रगति; जलाशय; हौद.

**कग्ग** (ಕಗ್ಗ) (क) ना.—नापीक जमीन; नीरस भाषण; गुळमुळित बोलणें; पीळ नसलेलें भाषण.

**कग्गंटु** (ಕಗ್ಗಂಟು) (क) ना.—सोडतां न येणारी गांठ; निर्गांठ; ब्रह्मगांठ; बैलगांठ; अनिवार्य बंधन.

**कग्गत्तले** (ಕಗ್ಗತ್ತಲೆ) (क) ना.—किर्र काळोख; घनदाट अंधार.

**कग्गने** (ಕಗ್ಗನೆ) (क) अ.—विशेषेंकरून; बहुतकरून; अधिकत्त्वें.
(क) ना.—काळोखी; काळेपणा.

**कग्गल्लु** (ಕಗ್ಗಲ್ಲು) (क) ना.—काळा पत्थर; कठीण दगड.

**कग्गवि** (ಅಗ್ಗವಿ) (क) ना.—काळोखी गुहा.

**कग्गाडु** (ಕಗ್ಗಾಡು) (क) ना. दाट जंगल; घोर वन; निबिड अरण्य.

**कग्गायि** (ಕಗ್ಗಾಯಿ) (क) ना.—कच्चें फळ; अपक्व फळ.

**कग्गारु** (ಕಗ್ಗಾರು) (क) ना.—अतिवृष्टि; नको होण्याइतका पाऊस; अमर्याद पर्जन्य.

**कग्गाल** (ಅಗ್ಗಾಲ) (क) ना.—दुष्काळ; अनावृष्टि; दुर्दिन; अवकाळ.

**कग्गु** (ಕಗ್ಗು) (क) ना.—प्रमाद; रसहीनता; असंस्कृतता; निःसत्त्व; कच्चें; बरड.

**कग्गोले** (ಕಗ್ಗೊಲೆ) (क) ना.—क्रूर हत्त्या; जाळें; फास; यमपाश; मृत्युपाश.

**कंक** (ಕಂಕ) (सं) ना.—धार; नारायण पक्षी; गिधाड; ब्राह्मण. वेषधारी युधिष्ठिर; कंकभट; यम; आम्रविशेष.

**कंकशाय** (ಕಂಕಶಾಯ) (सं) ना.—कुत्रा; शुनि; शुनक.

**कंकट (टक)** (ಕಂಕಟ [ಟಕ]) (सं) ना.—कवच; चर्म; पांघरूण; अंकुश.

**कंकण** (ಕಂಕಣ) (सं) ना.—बांगडी; कडें; काकण; अश्रुबिंदु.

**—ग्रहण** (— ಗ್ರಹಣ) (सं) ना.—कंकणाकार ग्रहण.

**कंकणतोडु** (ಕಂಕಣತೊಡು) (क) धा.—कंकण बांधणें; विडा उचलणें; प्रतिज्ञा करणें; शपथ घेणें.

**कंकणबद्ध** (ಕಂಕಣಬದ್ಧ) (सं) वि.—वचनबद्ध; प्रतिज्ञाबद्ध; कार्यप्रमुख.

**कंकत (तिके)** (ಕಂಕತ [ತಿಕೆ]) (सं) ना.—कंगवा; फणी; कंगई.

**कंकनरि** (ಕಂಕನರಿ) (क) ना.—लांडग्याप्रमाणें दिसणारा कंकजातीचा कोल्हा.

**कंकपत्र** (ಕಂಕಪತ್ರ) (सं) ना.—एक प्रकारचा बाण.

**कंकमाले** (ಕಂಕಮಾಲೆ) (सं) ना.—वाद्यविशेष.

**कंकर** (ಕಂಕರ) (क) ना.—'कग्गल्लु' पहा. वाळू; पातळ ताक.

**कंकरि** (ಕಂಕರಿ) (क) ना.—चाबूक; चव्वाटा; छडी.

**कंकरिके, कंकणिका** (ಕಂಕರಿಕೆ, ಕಂಕಣಿಕಾ) (क) ना.—मनगटी; किंकिणी; मनगटावरील अलंकार; वागरपट्टा.

कंकरिगोल् (ಕಂಕರಿಗೊಲ್) (क) ना.—मोठा चिमटा; साणस; तासणी; मोठा चाबूक.
कंकशाय (ಕಂಕಶಾಯು) (सं) ना.—कुत्रा; श्वान; शुनि.
कंकळ (ಕಂಕಳ) (क) ना.—'कंकण' पहा. बांगडी; काकण; सलकडी; गोट; कडें.
कंकाल (ळ) (ಕಂಕಾಲ [ಳ]) (सं) ना.—अस्थिपंजर.
—धर (—ಧರ) (सं) ना.—अस्थि वाहणारा शिव.
कंकालिय (ಕಂಕಾಲಿಯು) (सं) वि.—देह.
कंकालमालि (ಕಂಕಾಲಮಾಲಿ) (सं) ना.—शिव; कंकाली.
कंकि (ಕಂಕಿ) (क) ना.—बुरखुंड; धान्य काढून घेतल्यानंतरचें कणीस; धाट; रोड स्त्री.
कंकुळु (ಕಂಕುಳು) (क) ना.—कावळा; काक; काख; बगल.
कंकेल्ल (ल्लि) (ಕಂಕೇಲ್ಲ [ಲ್ಲಿ]) (सं) ना.—अशोकवृक्ष.
कंगने (ಕಂಗನೆ) (क) अ.—'कग्गने' पहा. अतिशयोक्तीनें.
कंगडे (ಕಂಗಡೆ) (क) ना.—काणा डोळा; तिरवा डोळा; अपांग.
कंगळ् (गाळ) (ಕಂಗಳ್) [ಗಾಳ]) (क) वि.—अंध; दृष्टिहीन.
कंगारु (ಕಂಗಾರು) (क) ना.—कुरुपता; असंतुष्टता; कांगारू.
कंगाल (ಕಂಗಾಲ) (अ. दे.) वि.—दरिद्री; गरीब; परदेशी; अनाथ; धनहीन.
कंगालु (ಕಂಗಾಲು) (अ. दे.) ना.—दारिद्र्य; गरिबी; भिक्षुकी.
कंगु (ಕಂಗು) (क) ना.—आश्चर्य; ढोंग; कोप; राग; सुपारी; सुवास; राळें; पोफळें; नाराजी; अतृप्ति.
—आगु (—ಆಗು) (क) धा.—नाराज होणें; रागावणें; त्रासणें; कोपणें.
कंगेडु (ಕಂಗೆಡು) (क) धा.—अंध होणें; डोळे दिपणें; दिशाभूल होणें; घाबरणें; भेदरणें.
कंगोळिसु (ಕಂಗೊಳಿಸು) (क) धा.—शोभिवंत होणें; प्रकाशणें; चांगलें दिसणें; चकाकणें; काजळ घालणें; मनोहर होणें.
कच (ಕಚ) (सं) ना.—केस; केशभार; बृहस्पतिपुत्र; शुक्राचार्य शिष्य; ढग; बांधणी; अलंकाराची बिरडी; फासा; फोडणीचा आवाज; हाक.
कचप (ಕಚಪ) (सं) ना.—दात; पान.
कचपक्ष (ಕಚಪಕ್ಷ) (सं) ना.—शोभिवंत केलेले केस; सावरलेले केस; दाट केस.
कचपु (ಕಚಪು) (सं) ना.—पानावर वाढलेलें अन्न; सार; सांबार; शेवटचा भात.
कचबंध (ಕಚಬಂಧ) (सं) ना.—वेणी; बुचडा; खोपा.
कचभर (ಕಚಭರ) (सं) ना.—'कचपक्ष' पहा.
कचमाल (ಕಚಮಾಲ) (सं) ना.—धुराचीं वलयें; गोल होत जाणारा धूर.
कचूर (ಕಚೂರ) (क) ना.—खजूर; खर्जूर.
कचेरी (ಕಚೇರಿ) (अ. दे.) ना.—चावडी; कार्यालय; सार्वजनिक कार्यांचें घर; ऑफिस.
कच्छ (ಕಚ್ಛ) (सं) ना.—'कक्ष' पहा, लंगोट; कासोटा. काचा.
कच्छट (ಕಚ್ಛಟ) (अ. दे.) ना.—'कक्षापट' पहा. कौपीन; लंगोटा; लंगोटी; काष्टा.
कच्छड (ಕಚ್ಛಡ) (अ. दे.) ना.—कचरा; घाण.
कच्छडि (ಕಚ್ಛಡಿ) (क) ना.—चटणी; कढण; ठेचा.
कच्छने (ಕಚ್ಛನೆ) (क) अ—कच्कन; एकदम; झटकन.
कच्छर (ಕಚ್ಛರ) (सं) वि.—घाण; वाईट; दुष्ट; अविवेकी; कचरा; नाठाळ.
कच्छरि (ಕಚ್ಛರಿ) (क) ना.—भजी; ठेचा; पाकविशेष.
कच्छलि (ಕಚ್ಛಳಿ) (क) ना.—पवित्रक; सरी; बाकी.
कच्छा (ಕಚ್ಛಾ) (अ. दे.) ना.—अर्धाकच्चा; हिरवा; प्रमादी.
कच्छाट (ಕಚ್ಛಾಟ) (क) ना.—भांडण; कलह; चावाचावी; झगडा.
कच्छिरि (ಕಚ್ಛಿರಿ) (क) धा.—जोडणें; मांडी घालणें; वाळवणें; उन्हें देणें.
कच्चु (ಕಚ್ಚು) (क) धा.—दातीं धरणें; धुवून स्वच्छ करणें; चावणें; जोडणें; निर्देशणें.
(क) ना.—चावा; दंतव्रण; चावल्याची खूण; कच्च; धुवणाचें पाणी.
कच्चुगालि (ಕಚ್ಚುಗಾಲಿ) (क) ना.—दंतुर चाक.
कच्चे (ಕಚ್ಚೆ) (क) ना.—'कच्च' पहा; दुटांगी नेसण; गाई-म्हशींचें जननेंद्रिय; निरण.
कच्छप (ಕಚ್ಛಪ) (सं) ना.—कासव; कुबेराच्या नवसिद्धीपैकीं एक; मल्लविद्या.
कज्ज (ಕಜ್ಜ) (क) ना.—कार्य; काम; काज; कज्जा; उद्योग.
कज्जल (ळ) (ಕಜ್ಜಲ [ಳ] (सं) ना.—काजळ; अंजन; शाई.
कज्जाय (ಕಜ್ಜಾಯು) (क) ना.—भाकरी; रोटी; गोड खाद्य.
कज्जि (ಕಜ್ಜಿ) (क) ना.—खरूज; खाज; चर्मरोग.
कंचडि (ಕಂಚಡಿ) (क) ना.—'कासि' पहा. कुस्तीची चड्डी.
कंचरे (ಕಂಚರೆ) (क) ना.—'कासि' पहा.
कंचि (ಕಂಚಿ) (क) ना.—एक प्रकारच्या आंबट लिंबाचें झाड; कांची क्षेत्र.
कंचिग (ಕಂಚಿಗ) (क) ना.—दैत्य; राक्षस; दानव,
कंचिनि (ಕಂಚಿನಿ) (क) ना.—नर्तकी; वेश्या.
कंचु (ಕಂಚು) (क) ना.—कांसें; मिश्रधातु.
—गार (—ಗಾರ) (क) ना.—कासार.
कंचुक (ಕಂಚುಕ) (सं) ना.—चोळी; कवच; बंडी; कात; नागफणी.
कंचुकि (ಕಂಚುಕಿ) (सं) ना.—अंतःपुर सेवक; कवचधारी; नागसाप.

**कंज** (ಕಂಜ) (सं) ना.—कमळ.

**कंजगर्भ** (ಕಂಜಗರ್ಭ) (सं) ना.—पद्मनाभ; विष्णु; ब्रह्मदेव; कमलनाभी; कमलजन्म.

**कंजगुण** (ಕಂಜಗುಣ) (सं) ना.—कमलनाळ; कमळाचें देंठ.

**कंजन** (ಕಂಜನ) (सं) ना.—कामदेव; कांदा; कंदर्प; पक्षी.

**कंजनाभ** (ಕಂಜನಾಭ) (सं.) ना.—'कंजगर्भ' पहा.

**कंजबाण** (ಕಂಜಬಾಣ) (सं) ना.—मदन; मन्मथ.

**कंजर** (ಕಂಜರ) (सं) ना.—पोट; ब्रह्म; सूर्य; हत्ती; कंजार नामक भटकी जात.

**कंजलोचन** (ಕಂಜಲೋಚನ) (सं) ना.—कमलनेत्र; विष्णु.

**कंजवैरी** (ಕಂಜವೈರಿ) (सं) ना.—चंद्र; कमलशत्रु.

**कंजसख** (ಕಂಜಸಖ) (सं) ना.—कमलमित्र; सूर्य.

**कंजसदने (सद्मे)** (ಕಂಜಸದನ [ಸದ್ಮೆ]) (सं) ना.—कमलालया; लक्ष्मी; कमलांत घर करणारी लक्ष्मी.

**कंजात** (ಕಂಜಾತ) (सं) ना.—नीरज; पाण्यांत जन्मलेलें कमल; चंद्र; तारकासुर.

**कंजाप्त** (ಕಂಜಾಪ್ತ) (सं) ना.—सूर्य; भास्कर; रवि.

**कंजारि** (ಕಂಜಾರಿ) (सं) ना. चंद्र.

**कंजासन** (ಕಂಜಾಸನ) (सं) ना.—कमलासन; ब्रह्मदेव.

**कंजोदर** (ಕಂಜೋದರ) (सं) ना.—विष्णु.

**कट्** (ಕಟ್) (क) ना.—एक प्रकारचा आवाज; 'कापणें' या अर्थी 'कट्' असा देणारा आदेश.

**कट** (ಕಟ) (सं) ना.—चौकट; कड; बाजू; कोपरा, चटई; दोरी; गाल; गंडस्थळ; प्रेत; बाण; पद्धति; कर; फाळा; सारा; स्मशान; अति.

**कटक** (ಕಟಕ) (सं) ना.—सैन्य; समुद्र; राजधानी; अतिशयता; समूह; दात; दाढ; मीठ; क्षार; बाणाचें टोक; उष्णता; बेट; नितंब; ढुंगण; अभिनय प्रकार; कंकण.

**कटकटे** (ಕಟಕಟೆ) (क) ना.—कटांजन; कठडा; कटकट; त्रास. पीडा.

**कटकरिसु** (ಕಟಕರಿಸು) (क) धा.—मोडणें; फोडणें; कटकरणें.

**कटकरोहिणि** (ಕಟಕರೋಹಿಣಿ) (सं) ना.—तापावरील वनस्पति;

**कटकि** (ಕಟಕಿ) (सं) बेट; पर्वत.
(क) ना.—निंदा; स्तुति; व्याजस्तुति; व्यंग भाषण; रागाचें बोलणें; टोमणा; कानपिचक्या.

**कटकु** (ಕಟಕು) (क) ना.—'कटक' पहा; रत्नकुंडल; वाळवणी.

**कटकोलु** (ಕಟಕೋಲು) (अ. दे) ना.—पिकदाणी; थुंकण्याचें भांडें.

**कटंकट** (ಕಟಂಕಟ) (सं) ना.—अग्नि; सुवर्ण; विनायक; गणपति.

**कटवायि** (ಕಟವಾಯಿ) (क) ना.—जिवणीचा कोपरा.

**कटाक्ष** (ಕಟಾಕ್ಷ) (सं) ना.—काणा डोळा; हास्य; डोळा; दया; ध्येय; उद्देश; दृष्टिक्षेप; आदर; श्रृंगारदृष्टि; सहानुभूति.

**कटाक्षिसु** (ಕಟಾಕ್ಷಿಸು) (क) धा.—दृष्टिक्षेप करणें; आदरणें; सहानुभूति दाखविणें.

**कटाग्नि** (ಕಟಾಗ್ನಿ) (सं) ना.—गवत; करड; अग्नि.

**कटांजन** (ಕಟಾಂಜನ) (सं) ना. लोखंडी अगर लाकडी कठडा; 'कटकटे' पहा.

**कटार** (ಕಟಾರ) (क) ना.—कढई; काहील; कटाह.

**कटारि** (ಕಟಾರಿ) (क) ना.—कट्यार.

**कटांबु** (ಕಟಾಂಬು) (अ. दे) ना.—कातरण; कातरणी.

**कटाह** (ಕಟಾಹ) ಕಟಾಹ) (सं) ना.—'कटार' पहा. चपटे पात्र; वाडगा; अर्धगोल विहीर; बेट; टेकडी; फुटकें कौल.

**कटि** (ಕಟಿ) (सं) ना.—कमर; कंबर; नितंब.

**—प्रमाण** (—ಪ್ರಮಾಣ) (सं) अ.—कमरेपर्यंत.

**कटिबंध** (ಕಟಿಬಂಧ) (सं) ना.—कडदोरा; कमरपट्टा; उडयाण; भूप्रदेश; मेखला; कांची; उष्णशीत हे कटिबंध.

**कटिल्लक** (ಕಟಿಲ್ಲಕ) (सं) ना.—कारलें.

**कटिसूत्र** (ಕಟಿಸೂತ್ರ) (सं) ना.—'कटिबंध' पहा.

**कटीर** (ಕಟೀರ) (सं) ना.—'कटि' पहा.

**कटु** (ಕಟು) (सं) ना.—कडु; तिखट; अयोग्याकृति; निंदा; चांफा.

**—वर** (—ವರ) (सं) वि.—तीक्ष्ण; विषयीं; तुरट; दुर्वासनी; जळजळीत; वेडूक; मांडूक.

**कटुक** (ಕಟುಕ) (क) वि.—दुष्ट; पाषाणहृदयी; खुनी; हत्यारि.
(सं) वि.—तिखट; तीक्ष्ण; असह्य; असंतुष्ट; कडु.

**कटुकते** (ಕಟುಕತೆ) (क) ना.—कठोरपणा; ओबडधोबडपणा; हुंबपणा; दुष्टपणा; कटुता.

**कटुकु** (ಕಟುಕು) (क) वि.—थोडें; लव; स्वल्प; पातळ; शेवटचें.

**कटुर** (ಕಟುರ) (सं) ना.—कठोर; क्रूर; तीक्ष्ण.

**कटूक्ति** (ಕಟೂಕ್ತಿ) (सं) ना.—कठोर भाषण; टोचून बोलणें; लागट बोलणें.

**कटे** (ಕಟೆ) (क) धा.—घुसळणें; मंथन करणें.

**कटोर** (ಕಟೋರ) (सं) ना.—मातीचें भांडें; ततराणी; तत्राणी; रांजण; डेरा; हरवी.

**कट्ट कट्टकडे** (ಕಟ್ಟ, ಕಟ್ಟಕಡೆ) (क) अ.—अंतीं; शेवटीं.

**कट्टगे** (ಕಟ್ಟಗೆ) (क) अ.—बुकणा होऊन; जहालपणें; जळजळीत रीतीनें.

**कट्टचरि** (ಕಟ್ಟಚ್ಚರಿ) (क) ना.—महदाश्चर्य; अपूर्वता; चमत्कार.

**कट्टड** (ಕಟ್ಟಡ) (क) ना.—इमारत; बांधलेला इमला.

**कट्टडवि** (ಕಟ್ಟಡವಿ) (क) ना.—घोर अरण्य; निबिड वन; दाट जंगल.

**कट्टण** (ಕಟ್ಟಣ) (क) ना.—इमारत.

**कट्टणक** (ಕಟ್ಟಣಕ) (क) ना.–अतिहास्य; सौंदर्य; प्राबल्य.
**कट्टणि** (ಕಟ್ಟಣಿ) (क) ना.–चिलीम; सुंदरी.
**कट्टप्पणे** (ಕಟ್ಟಪ್ಪಣೆ) (क) ना.–कडक हुकूम; सुग्रीवाज्ञा; अटळ हुकूम; अभिवचन.
**कट्टयसु** (ಕಟ್ಟಯ್ಸು) (क) धा.–आलिंगणें; मिठी मारणें; गळामिठी घालणें.
**कट्टरण्य** (ಕಟ್ಟರಣ್ಯ) (क) ना.–'कट्टडवि' पहा.
**कट्टरिके** (ಕಟ್ಟರಿಕೆ) (क) ना.–कीर्ति; प्रसिद्धि; प्रख्याति; नांवलौकिक.
**कट्टल्** (लु) (ಕಟ್ಟಲ್) [ಲು] (क) ना.–बद्धस्थिति; वेढा; घेरा.
**कट्टवालि** (ಕಟ್ಟವಾಳಿ) (क) ना.–दुष्ट स्त्री; मारकी गाय.
**कट्टळवि** (ಕಟ್ಟಳವಿ) (क) ना.–प्रबळ शक्ति; तुमुल युद्ध.
**कट्टळे** (ळे) (ಕಟ್ಟಳೆ) [ಲೆ] (क) ना.–मोठी लाट; सोनेचांदी तोलण्याचें वजन; दगड; नियम; क्रम; पद्धति; मठ्ठा; लस्सी; गोड ताक; अटळ हुकूम.
**कट्टाज्ञे** (ಕಟ್ಟಾಜ್ಞೆ) (क) ना.–'कट्टप्पणे' पहा.
**कट्टाडिसु** (ಕಟ್ಟಾಡಿಸು) (क) धा.–खांद्यावर घेऊन खेळवणें; गोंजारूण खेळवणें.
**कट्टाणि** (ಕಟ್ಟಾಣಿ) (क) ना.–अमूल्य वस्तु; रत्नहार; मोतीपेंडा.
**कट्टाणे** (ಕಟ್ಟಾಣೆ) (क) ना.–'कट्टप्पणें' पहा. अभिवचन.
**कट्टाय** (ಕಟ್ಟಾಯ) (क) ना.–दृढ सामर्थ्य; कठिण नियम. महाप्रतिज्ञा; स्थैर्य; निष्कर्ष; निर्णय; मार्मिक साहस.
**कट्टासरू** (ಅಟ್ಟಾಸರು) (क) ना.–दमछाट; अत्यायास; शीण; थकवा; तहान; पवित्र आश्रय.
**कट्टासुर** (ಕಟ್ಟಾಸುರ) (क) ना.–अतिक्रौर्य; अमर्याद क्रोध.
**कट्टाळ्** (ळु) (ಕಟ್ಟಾಳ್ [ಳು]) (क) ना. वि.–धैर्यशाली; बलिष्ठ; शूर; समर्थ सैन्य; सैनिक.
**—तन** (— ತನ) (क) ना.–अतिबल; सामर्थ्य; प्राबल्य; प्रस्थ.
**कट्टिदिर्** (रू) (ಕಟ್ಟಿದಿರ್ [ರು]) (क) अ.–अगदीं तोंडासमोर.
**कट्टिरूवे** (ಅಟ್ಟಿರುವೆ) (क) ना.–काडमुंगी; मुंगळा; चावणारी मुंगी; काळी मोठी मुंगी.
**कट्टु** (ಕಟ್ಟು) (क) धा.–बांधणें; आवळून गुंडाळणें; उत्पन्न करणें; रचणें; जुंरणें; शपथ घेणें; न येईलसें करणें.
(क) ना.–नियम; विलंब; किनारा; शेवट; बांध; रूप; रीति; आकार; बंधन; पेज; कट; पेंडी; भारा.
**कट्टुक** (ಕಟ್ಟುಕ) (क) ना.–बंधारा; बांधणारा; खोटेपणा; लबाडी; असत्य.
**कट्टुकडि** (ಕಟ್ಟುಕಡಿ) (क) धा.–नियम मोडणें; उल्लंघणें; व्याकुळणें; प्रतिज्ञा भंगणें; व्रत मोडणें.
**कट्टुकते** (ಕಟ್ಟುಕತೆ) (क) ना.–कल्पित कथा; भाकडकथा; दंतकथा; आख्यायिका; किंवदंती.
**कट्टुकोडुगे** (ಕಟ್ಟುಕೊಡುಗೆ) (क) ना.–इनाम जमीन; जुडी जमीन.
**कट्टुग्र** (ಕಟ್ಟುಗ್ರ) (क) वि.–अतिभंयकर; वज्रकठिण; अतिटणक.
**कट्टुंजुरिगे** (ಕಟ್ಟುಂಜುರಿಗೆ) (क) ना.–कमरेला बांधण्याची तरवार.
**कट्टुत्तर** (ಕಟ್ಟುತ್ತರ) (क) ना.–'कट्टप्पणें' पहा.
**कट्टुद्द** (ಕಟ್ಟುದ್ದ) (क) वि.–अतिदीर्घ; फार लांब; सन्नत; लांबच लांब.
**कट्टुपट्टि** (ಕಟ್ಟುಪಟ್ಟಿ) (क) ना.–जखमेवरील पट्टी; मलमपट्टी; बॅंडेज; जखम बांधणें.
**कट्टुपाडु** (ಕಟ್ಟುಪಾಡು [ಪಾಟು]) (क) ना.–नेमनियम; व्रतवैकल्य; मर्यादा.
**कट्टुपास** (ಕಟ್ಟುಪಾಸ) (क) ना.–निर्जळ उपवास; निराहार; उपोषण; कडकडीत उपास.
**कट्टुबीळु** (ಕಟ್ಟುಬೀಳು) (क) धा.–आधीन होणें; बांधून घेणें; मान देणें; ऋणी राहणें; उपकारबद्ध होणें.
**कट्टुब्बस** (ಕಟ್ಟುಬ್ಬಸ) (क) ना.–उर्ध्वश्वास; धाप; श्वासरोग; दमा; घूर.
**कट्टुब्बेग** (ಕಟ್ಟುಬ್ಬೆಗ) (क) ना.–अत्यातुरता; उत्कंठा; कटु उद्योग; अव्यापारेषु व्यापार.
**कट्टुलुहु** (ಚುಟ್ಟುಲುಹು) (क) ना.–ओरड; गोंगाट; गलबला; गोंधळ; कालवा; मोठा आवाज.
**कट्टुवडे** (ಕಟ್ಟುವಡೆ) (क) धा.–बंधनांत सांपडणें; इंद्रियनिग्रह करणें; मनोनिग्रह करणें.
**कट्टुवास** (ಕಟ್ಟುವಾಸ) (क) ना.–बासन; पांघरूण; आवरण.
**कट्टुशब्द** (ಕಟ್ಟುಶಬ್ದ) (क) ना.–सांकेतिक भाषा; खुणेची बोली; गुप्तभाषा; परवल; परवलीची भाषा.
**कट्टुह** (ಕಟ್ಟುಹ) (क) ना.–बंधन; बांधणूक; नियम.
**कट्टूळिग** (ಕಟ್ಟೂಳಿಗ) (क) ना.–कठीण सेवा; न सोडतां येणारें काम; टाळतां न येण्याजोगें काम.
**कट्टे** (ಕಟ್ಟೆ) (क) ना.–कट्टा; सोपा; ओसरी; तलाव; गाठोडें; 'अणेकट्टु' पहा.
**कट्टेसक** (ಕಟ್ಟೆಸಕ) (क) ना.–महत्त्वाचें काम; कल्याण; सोंग; विलास; डौल; चैन; आडंबर.
**कट्टेसुगे** (ಚಟ್ಟೆಸುಗೆ) (क) ना–शरवृष्टि; बाणांचा पाऊस; बाणांचा प्रबळ प्रयोग.
**कट्टेकांत** (ಕಟ್ಟೇಕಾಂತ) (क) ना.–अतिरहस्य; मेतकूट; इंगित; गौप्य; नीरव एकांत.
**कट्टेळगे** (ಕಟ್ಟೇಳ್ಗೆ) (क) ना.–अमर्याद प्रगती; पराकोटीची प्रगती.

कट्टोडे (ಕಟ್ಟೊಡೆ) (क) धा.–शब्दाबाहेर जाणें; नियम उल्लंघणें; सभा उधळणें; पक्ष तोडणें; फूटपाडणें; गट मोडणें.
कट्टोरलिके (ಕಟ್ಟೊರಲಿಕೆ) (क) ना.–असह्य ठणका; अति ओरडणें.
कट्टोल्मे (ಕಟ್ಟೊಲ್ಮೆ) (क) ना.–अतिप्रेम; ममता; असीम माया; अलोट प्रीति.
कट्ले (ಕಟ್ಲೆ) (क) ना.–'कट्टळे' पहा.
कठ (ಕಠ) (सं) ना.–वैशंपायनशिष्य कठमुनि; कठोपनिषद् यजुर्वेदशाखा.
कठारि (ಕಠಾರಿ) (क) ना.–कट्यार; तरवार; बरची.
कठिंजर (ಕಠಿಂಜರ) (सं) ना.–'काम कस्तुरि' पहा. परिमळ द्रव्य; कचोरा.
कठिन (ಕಠಿನ) (सं) वि.–घट्ट; अडचणीचा; न सुटणारा; घन.
--हृदय (—ಹೃದಯ) (सं) ना.–निर्दय.
कठिनि (ಕಠಿನಿ) (सं) ना.–करांगुलि; सीमाचिन्ह; खड्ग.
कठोर (ಕಠೋರ) (सं) वि.–निष्ठुर; क्रूर; निर्दय; कठिण; पुरा; भरपूर.
कड (ಕಡ) (सं) वि.–मूक; मूर्ख; अज्ञानी; असंस्कृत; वरट. (क) ना.–ओळ; कर्तव्य; जागृति.
कडकल् (ಕಡಕಲ್) (क) ना. किल्ल्याची चोरवाट; दाणागोटा; कडधान्य.
कडग (ಕಡಗ) (क) ना–'कटक' पहा.
कडगार (ಕಡಗಾರ) (क) ना–ऋणको; कर्जदार.
कड (डं) गु (ಕಡ [ಡಂ] ಗು) (क) धा.–उत्साहित होणें; उमाळा येणें; भरून येणें; भावनावश होणें.
(क) ना.–ल्हान खड्डा; कालवा; पाट; इच्छा; आकांक्षा.
कड (डे) गोल् (ಕಡ [ಡೆ]ಗೋಲ್) (क) ना.–रवी; मंथा; घुसळकाठी; अरणि.
कडंगर (कर) (ಕಡಂಗರ [ಕರ]) (क) ना.–डाळीचा साठा; भुस्सा; होट्ट; वाळका चारा; चारा खाणारे जनावर.
कडंगारत्त (ಕಡಂಗಾರ್ತ) (क) ना.–खास सेवक; खास कामगार.
कडंगु (ಕಡಂಗು) (क) धा.–'कडगु' पहा. त्वरा करणें; आतुरता दाखवणें; कळकळ दाखवणें; प्रयत्न करणें.
कडज (ಕಡಜ) (क) ना.–गांधीलमाशी; कणगी; धान्यसंग्रह; गंधोली.
कडजीरिगे (ಕಡಜೀರಿಗೆ) (क) ना. –'कडज' पहा.
कडत (ಅಡತ) (क) ना.–घाव; चावा; तुकडेतोड; कपड्यावर लिहिलेलें पुस्तक; पासोडी.
कडदु (ಅಡದು) (क) ना. एकदम उतार; वरटपणा; कठोरपणा; घट्टपणा.
कडदाळु (ಕಡದಾಳು) (क) ना.–बलिष्ठ; दणकट; दांडगेश्वर; पोलादी मनुष्य; दांडगोबा; दणकट नोकर.
कडदुगार (ಕಡದುಗಾರ) (क) वि.–धैर्यशाली; छातीवान; बलिष्ठ.
कडदुक्ष (ಕಡದುಕ್ಷ) (क) ना.–'कडज' पहा.
कडंदुरु (रुते) (ಕಡಂದುರು [ರುತೆ]) (क) ना.–'कडजीरिगे' पहा.
कडब (बे) (ಕಡಬ [ಬೆ]) (क) ना.–एक जातीचा हरिण, काळवीट,
कडबु (डुंबु)(ಕಡಬು [ಡುಂಬು) (क) ना.–कडबू; कानोला; पुराणाची करंजी.
कडमे (डिमे) (ಕಡಮೆ [ಡಿಮೆ]) (क) वि.–थोडें; अल्प; एवढेसें; इवलें.
कडंपरीय (ಕಡಂಪರೀಯ) (क) ना.–धान्याहारी मृग.
कडंबळ (ಕಡಂಬಳ) (क) ना.–काकणासारखीं वलयें असलेला साप.
कडय (ಕಡಯ) (क) ना.–कडें; वलय; 'कटक' पहा.
कडल् (लु) (ಕಡಲ್) [ಲು] (क) ना.–समुद्र; गाडीचा धक्का टाळण्यासाठीं रोवलेला वळणावरील दगड; प्रवाहात वर आलेला दगड; खडप; उघडा पडलेला खडक.
कडलणुग (ಕಡಲಣುಗ) (क) ना.–सागरोद्भव चंद्र.
कडलणुगि (ಕಡಲಣುಗಿ) (क) ना.–सागरसंभवा; लक्ष्मी.
कडलाण्म (ಕಡಲಾಣ್ಮ) (क) ना.–समुद्रदेवता; वरुण.
कडलिडु (ಕಡಲಿಡು) (क) धा.–प्रयत्न करणे; दमछाट करणें; श्रम करणें; प्रवाहाबरोबर जाणें.
कडलुरि (ಕಡಲುರಿ) (क) ना.–वडवाग्नि; और्वाग्नि.
कडल्गिच्चु (ಕಡಲ್ಗಿಚ್ಚು) (क) ना.–'कडलुरि' पहा.
कडव (ಕಡವ) (क) ना.–कदंब; ताल; काळवीट; हरीण; एक वनस्पति; अडुळसा.
कडवर (ಕಡವರ) (क) ना.–वासना; निधि; सोनें; आर्तध्वनि; चिन्ह; द्रव्य; किंचाळी.
कडवस (ಕಡವಸ) (क) ना.–त्वचा; चर्म; कृष्णाजिन; मृगाजिन; व्याघ्रांबर.
कडवळ् [ळ] (ಕಡವಳ್ [ಳ]) (क) ना.–देव; देवता.
कडवाल (ಕಡವಾಲ) (क) ना.–'कडव' पहा. कदंब; ताल.
कडवु (ಕಡವು) (क) ना.–उतार; प्रवाहापलीकडे जाण्याचा मार्ग.
कडवे (ಕಡವೆ) (क) ना.–'कडव' पहा.
कडसिगे (ಕಡಸಿಗೆ) (क) ना.–वृक्षविशेष.
कडसु (ಕಡಸು) (क) ना.–पुढवंत गाय, म्हैस; पहिल्या विताची गाय, म्हैस.
कडह (ಕಡಹ) (क) ना.–मंथन; घुसळण.
(सं) ना.–फुलझाड.

**कडाणि** (ಕಡಾಣಿ) (क) ना.—कुणी; गाडीचें चाक निसटूं नये म्हणून कण्यांत घातलेली खीळ.

**कडाय** (ಕಡಾಯು) (क) ना.—कढई; काहील. 'कटाह' पहा.

**काडायिसु** (ಕಡಾಯಿಸು) (क) धा.—'कट्' असा आवाज करणें; चाबकानें मारणें; मोठा आवाज करणें; वावटळीप्रमाणें वाहणें; तोंडीं येईल तशी शिवीगाळ करणें; घर बांधणें; खिळ्याप्रमाणें जाम ठोकणें.

**कडार** (ಕಡಾರ) (सं) वि.—माजलेला; मस्त; अविवेकी. (सं) ना.—अरुणवर्ण; तांबूस रंग; सेवक.

**कडारि** (ಕಡಾರಿ) (क) ना.—यज्ञदीक्षित; होता; यज्ञ करणारा; मेंढा; एडका; टकरीचा मेंढा.

**कडाविगे (वुगे)** (ಕಡಾವಿಗೆ [ವುಗೆ]) (क) ना.—पादुका; खडाव; लाकडी पादत्राण.

**कडावु** (ಕಡಾವು) (क) ना.—खडाव; पादुका.

**कडि (डिल्)** (ಕಡಿ [ಡಿಲ್]) (क) धा.—दात खाणें; खड्डा काढणें; उपटणें; माखणें; गुळगुळीत करणें; अंगावरून हात फिरवणें; चावणें; कातरणें; तुकडा पाडणें; कुरतडणें.
(क) ना.—फाकी; तुकडा; लड; भाग.

**कडिक (ग)** (ಕಡಿಕ [ಗ]) (क) वि.—चावरा; चावणारा; कुरतडणारा.

**कडिकु** (ಕಡಿಕು) (क) ना.—तुकडा; भाग; ओंडका.

**कडिकंड** (ಕಡಿಕಂಡ) (क) वि.—कुटलेले; चुरचूर झालेलें.

**कडिके** (ಕಡಿಕೆ) (क) ना.—धान्य; धान्यसंग्रह 'कडज' पहा.

**कडिगे** (ಕಡಿಗೆ) (क) ना.—'कुज्जे' पहा.

**कडित** (ಕಡಿತ) (क) ना.—ठोसा; तडाखा; 'कडत' पहा.

**—कार** (—ಕಾರ) (क) ना.—मारणारा; मारका.

**कडितले** (ಕಡಿತಲೆ) (क) ना.—खड्ग; चावडी; ढाल; हलगी; डफ; साहस.

**कडिदु** (ಕಡಿದು) (क) वि.—एकदम उतार; कडा असलेलें; 'कडदु' पहा. घट्ट; तीक्ष्ण; शक्तिमान; क्रूर; दाट; निबिड.

**कडिपु (डुपु)** (ಕಡಿಪು [ಡುಪು]) (क) ना.—वेग; गर्व; दर्प; बळ; सामर्थ्य; पराक्रम; साहस; आशा.

**कडिमे (डुमे)** (ಕಡಿಮೆ [ಡುಮೆ]) (क) ना.—'कडमे' पहा.

**कडिय** (ಕಡಿಯ) (क) वि.—घट्ट; बलिष्ठ; न तुटण्यासारखें.

**कडियण (याण)** (ಕಡಿಯಣ [ಯಾಣ) (क) ना.—लगाम.

**कडियाल** (ಡಿಯಾಲ) (क) ना.—शंखिणी; काटेरी लगाम; चोरपुष्प; खोगीर; जीन; थडी.

**कडिल्** (ಕಡಿಲ್) (क) अ.—धसमुसळेपणानें; जोरावरीनें; खटकन.

**कडिवण (वाण)** (ಕಡಿವಣ [ವಾಣ]) (क) ना.—'कडियण' पहा.

**कडु** (ಕಡು) (क) वि.—कटु; पुष्कळ; अधिक; स्थिर; बलिष्ठ; दुष्ट; उंच; कडवट; कर्कश; कठिण; चपल; आवेशपूर्ण; उद्देशपूर्वक; एकाच ठिकाणीं जाणारे मार्ग.

**कडुकंगेडु** (ಕಡುಕಂಗೆಡು) (क) धा.—दिशाभूल होणें; भ्रमणें; भिणें.

**कडुकय् (केय्)** (ಕಡುಕಯ್ [ಕೆಯ್]) (क) धा.—गडबड करणें; वेग वाढविणें; शीघ्र करणें; समर्थ होणें.

**कडुकरुणि** (ಕಡುಕರುಣಿ) (क) ना.—अतिदयाशीलत्व; कृपाळुपणा.

**कटुकार्पण्य** (ಕಡುಕಾರ್ಪಣ್ಯ) (क) ना.—फारकंजुषपणा; कवडीचुंबकता; अतिलोभ; अतिदारिद्र्य.

**कडुकापु** (ಕಡುಕಾಪು) (क) ना.—जागता पहारा; खडा पहारा.

**कडुकावलु** (ಕಡುಕಾವಲು) (क) ना.—जागरूक संरक्षण.

**कडुकावु** (ಕಡುಕಾವು) (क) ना.—अत्युष्णता; कडक पहारा; शेक.

**कडुकु** (ಕಡುಕು) (क) ना.—भाग; तुकडा; शव; प्रेत; कबंध; मुंड; धड; बुंधा; कर्णकुंडल; 'कटक' पहा.

**कडुकूरद** (ಕಡುಕೂರದ) (क) वि.—विशेष आसक्ति नसलेला; अधिक पराक्रमी नसलेला.

**कडुकोप** (ಕಡುಕೋಪ) (क) ना.—अतिक्रोध; अत्युग्रता; अतिराग; शीघ्र कोप.

**कडुग** (ಕಡುಗ) (क) ना.—खड्ग; तलवार.

**कडुगक्कस** (ಕಡುಗಕ್ಕಸ) (क) ना.—कटुकर्कशता; अतिक्रौर्य; अति ओबडधोबडपणा; असंस्कारिता.

**कडुगज्ज** (ಕಡುಗಜ್ಜ) (क) ना.—महान कार्य.

**कडुगडिग** (ಕಡುಗಡಿಗ) (क) वि.—क्रूर; हिंस्र; खुनी; हिंसक.

**कडुगंटु** (ಕಡುಗಂಟು) (क) ना.—सोडतां न येणारी गाठ; पक्की गांठ; निरगांठ.

**कडुगत्तले** (ಕಡುಗತ್ತಲೆ) (क) ना.—दाट अंधार; अमावास्येचा अंधार.

**कडुगंदि** (ಕಡುಗಂದಿ) (क) ना.—वत्सला; वासरावर प्रेम करणारी गाय.

**कडुगंपु** (ಕಡುಗಂಪು) (क) ना.—अति सुगंध; परिमळ; सुवास; दर्प.

**कडुगर्पु** (ಕಡುಗರ್ಪು) (क) ना.—काळाकुट्ट. अंधार; अधःकार; काळोख.

**कडुगलि** (ಕಡಗಲಿ) (क) ना.—अतिशूर; महावीर; सुधीर.

**कडुगळतले** (ಕಡುಗಳ್ತಲೆ) (क) ना.—दाट काळोख; अमावास्येची मध्यरात्र.

**कडुगायि** (ಕಡುಗಾಯಿ) (क) धा.—अति कोपणें; तापणें; संतापणें; अति रागावणें; रागानें पेटणें.

कडुगाय्पु (ಕಡುಗಾಯ್ಪು) (क) ना. – अतिकोप; संताप; अत्युष्णता.

कडुगासि (ಕಡುಗಾಸಿ) (क) ना. – अतिश्रम; अत्यायास.

कडुगु (ಕಡುಗು) (क) धा. – उकळणें; तापणें; रागाला येणें; निर्दय होणें; खंबीर होणें.
(क) ना. – उत्साह; हुरूप; पराक्रम; साहस; आवेश; गर्व; इच्छा.

कडुगेडुग (ಕಡುಗೇಡುಗ) (क) वि. – अकल्याण झालेला; पराजीत पावलेला.

कडुतवक (ಕಡುತವಕ) (सं) ना. – 'कडुदवक' पहा.

कडुदवक (ಕಡುದವಕ) (क) ना. – घाई; त्वरा; गडबड.

कडुपु (ಕಡುಪು) (क) ना. – शौर्य; मस्ती; उत्साह; दर्प; काळाभोर रंग.

कडुबेसगे (ಕಡುಬೇಸಗೆ) (क) ना. – अति उष्णता; कढतपणा.

कडुमे (ಕಡುಮೆ) (क) ना. – 'कडिमे' पहा.

कडुविल्ल (ಕಡುವಿಲ್ಲ) (क) वि. – तीक्ष्ण बाणधारी; धनुर्विद्या-निष्णात.

कडुसोंदि (ಕಡುಸೊಂದಿ) (क) वि. – शीलभ्रष्ट; दुराचारी; दुर्वर्तनी.

कडुहु (ಕಡುಹು) (क) ना. – 'कडिय' पहा.

कडुहुकार (ಕಡುಹುಕಾರ) (क) वि. – बलिष्ठ; पराक्रमी.

कडे (ಕಡೆ) (क) धा. – मोडणें; तुकडा पाडणें; गमावणें; अडकणें; घुसळणें; उल्लंघणें; पडणें; बुडणें; पार होणें.
(क) ना. – अंत्य; शेवट; मरण; टोक; पक्ष; दिशा; मर्यादा; कड; बाजू.

कडेगण् (ण्णु) (ಕಡೆಗಣ್ [ಣ್ಣು]) (क) ना. – कटाक्ष; डोळ्याचा कोपरा; अपांग.

कडेगणिसु (ಕಡೆಗಣಿಸು) (क) धा. – तिरस्कार करणें; अवाच्य बोलणें; दुर्लक्षिणें; निराकरण करणें; तुच्छतेनें पाहणें; संपविणें.

कडेगण्चु (ಕಡೆಗಣ್ಚು) (क) धा. – 'कडेगणिसु' पहा.

कडेगंदि (ಕಡೆಗಂದಿ) (क) ना. – शेवटचें वीत झालेली गाय; अत्यवत्स गाय; दूध आटत चाललेले जनावर; दूध बंद होणारें जनावर.

कडेगाल (ಕಡೆಗಾಲ) (क) ना. – मरणकाल; शेवटचा क्षण; प्रलयकाल.

कडेगोलु (ಕಡೆಗೋಲು) (क) ना. – रवी; मंथनदंड; मंथा; घुसळकांठी; घुसळ दांडी.

कडेचलु (ಕಡೆಚಲು) (क) ना. – तोडण्याचें साधन.

कडेचु (ಕಡೆಚು) (क) धा. – तिरस्कारणें; 'कडेगणिसु' पहा. वाकड्या डोळ्यानीं पहाणें.

कडेप (ह) (ಕಡೆಪ [ಹ]) (क) ना. – घुसळण; मंथन.

कडेय (ಕಡೆಯ) (क) ना. – काकण; कडें.
(क) वि. – शेवटचें; अखेरचें.

कडेवगल् (लु) (ಕಡೆವಗಲ್ [ಲು]) (क) ना. – संध्याकाळ; सायंकाळ; तिसरा प्रहर; सूर्यास्तापूर्वीचा प्रहर.

कडेवडु (ಕಡೆವಡು) (क) धा. – संपवणें; शेवट होणें; हातावेगळें होणें.

कडेसिल्कु (ಕಡೆಸಿಲ್ಕು) (क) धा. – मागें राहणें; रेंगाळणें; मागें हटणें; विलंब होणें.

कडेहाय् (यु) (ಕಡೆಹಾಯ್ [ಯು]) (क) धा. – पार होणें; निसटणें; उत्तीर्ण होणें; संकटांतून मुक्त होणें; दुसरें टोंक गांठणें.

कडेहोल्लु (ಕಡೆಹೊಲ್ಲು) (क) धा. – पार होणें; निसटणें; उत्तीर्ण होणें; 'कडेहाय्' पहा.

कड्ड (ಕಡ್ಡ) (क) ना. – दड्ड; गावडा; ग्रामीण; मूढ; धैर्य; मात्सर्य; वैर; हत्ती पकडण्याचा खड्डा; वाळलेले गवत.

कड्डण (णिगे) (ಕಡ್ಡಣ) [ಣಿಗೆ]) (क) ना. – वेणी; बुचडा; बांधलेले केस.

कड्डवार (ಕಡ್ಡವಾರ) (क) ना. – गदायुद्ध.

कड्डाय (ಕಡ್ಡಾಯ) (क) ना. – सामर्थ्य; जबरदस्ती; निर्बंध; अवश्य कर्तव्य; पिळणूक.

—गार (—ಗಾರ) (क) ना. – दुसऱ्याच्या हक्कावर गदा आणणारा.

कड्डि (ಕಡ್ಡಿ) (क) ना. – बारीक चिवा; लहान काठी; दुष्ट स्त्री.

कड्डे (ಕಡ್ಡೆ) (क) ना. – धीराची स्त्री; अव्यस्थित स्त्री.

कण् (ण्णु) (ಕಣ್ [ಣ್ಣು]) (क) ना. – नेत्र; डोळा; मोरपिसावरील डोळा; नखाखालील पोकळी; सुईचें नेडें; भोंक; छिद्र; दृष्टि.

कण्पापे (ಕಣ್ಪಾಪೆ) (क) ना. – 'कण्बापे' पहा.

कण (ಕಣ) (सं) ना. – धान्यकण; ठिणगी; तुकडा; चूर; बिंदु.
(क) ना. – अंगण; खण; खेळ; तळवे; मळणीची जागा; युद्धरंग; आखाडा; हौदा; खोली; बाण; क्षण; निमिष.

कणक (ಕಣಕ) (क) ना. – कणीक.

कण (ण्) कप्पडि (ಕಣ [ಣ್] ಕಪ್ಪಡಿ) (क) ना. – वाघुळ; धुबडाच्या जातीचा पक्षी; किलबिला.

कणकालु (ಕಣಕಾಲು) (क) ना. – पिंढरी; जंघा; मांडी.

कणगिल (लु) (ಕಣಗಿಲ [ಲು]) (क) ना. – सुवासिक फुलझाड; कण्हेर.

कणज (ಕಣಜ) (क) ना. – 'कडज' पहा.

कणप (ಕಣಪ) (सं) ना. – आयुधविशेष; बरची; लोहस्तंभ; जंघाशस्त्र.

कणब (ಕಣಬ) (क) ना. – पांढऱ्या खुराचा घोडा.

**कणभक्षक** (ಕಣಭಕ್ಷಕ) (सं) ना.—कणादमुनि; जलाशय; हौद; खोल जलकुंड.

**कणय** (ಕಣಯು) (क) ना.—वापरल्या कपड्याचें गांठोडें; 'कणप' पहा.

**कणसु** (ಕಣಸು) (क) ना.—शोभा; मनोहर दृश्य; सौंदर्यदर्शनानें देहभान हरपणें.

**कणा (काणा)** (ಕಣಾ [ಕಾಣಾ]) (क) अ.—पाहिलें काय ? नव्हे काय ?

**कणाद** (ಕಣಾದ) (सं) ना.—परमाणुवादाचा जनक; कणादऋषि वैशेषिक दर्शनकार.

**कणि** (ಕಣಿ) (क) ना.—खाण; खनि; भविष्यकथन; शकुन; उत्पत्तिस्थान; गांठोडें; पेंडी; चर्मवाद्य; दगडी चीप.

**कणिका (के)** (ಕಣಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—धान्य काढल्यानंतरचें कणीस; बुरखुंडा; तुकडा; चूर; ठिणगी; अणु; बिंदु.

**कणिकाल्** (ಕಣಿಕಾಲ್) (क) ना.—पिंढरी; गुडघ्यापासून खालचा पाय.

**कणिकु** (ಕಣಿಕು) (क) ना.—'कणिका' पहा.

**कणिगाति (तिं)** (ಕಣಿಗಾತಿ [ತಿ]) (क) ना.—शकुनसांगणारी; कोरवंजी; भविष्यवादिनी.

**कणितले** (ಕಣಿತಲೆ) (क) ना.—गंडस्थल; गालाचा वरचा भाग.

**कणिमे (वे)** (ಕಣಿಮೆ) [ವೆ] (क) ना.—दरी; बेटांतील पायवाट; पांद; पाण्यांतील पायउतार.

**कणिले (ळिले)** (ಕಣಿಲೆ) [ಳಿಲೆ] (क) ना.—कोवळा बांबूचा कोंब; रोप.

**कणिश** (ಕಣಿಶ) (क) ना.—भाताची लोंब; लोंगर; धान्यकणीस.

**कणे** (ಕಣೆ) (क) ना.—बाण; शर; काठी; 'कणय' पहा.

**कणेगरे** (ಕಣೆಗರೆ) (क) धा.—बाणाचा पाऊस पाडणें; बाणावर बाण सोडणें; खळ न पडता बाण टाकणें.

**कणेय** (ಕಣೆಯು) (क) ना.—कहाणी; कथा; आरंभ; मळणी; संघर्ष; तंटा; भांडण.

**कण्कट्टु** (ಕಣ್ಕಟ್ಟು) (क) धा.—हात चलाखी करणें; फसविणें; नकळत काम साधणें.

(क) ना.—इंद्रजाल; कपट; जादू; मायाविद्या.

**कण्गडे** (ಕಣ್ಗಡೆ) (क) ना.—कटाक्ष; 'कडेगण्णु' पहा.

**कण्गदिरु** (ಕಣ್ಗದಿರು) (क) ना.—डोळ्यांतील तेज; नेत्रशोभा; नेत्रसौंदर्य; डोळ्याचें पाणी.

**कण्गावुद** (ಕಣ್ಗಾವುದ) (क) ना.—निरीक्षण; प्रतीक्षा; पहाणी.

**कण्गिच्चु** (ಕಣ್ಗಿಚ್ಚು) (क) ना.—दुखरे डोळे; खुपणी; डोळयांची खूण; मत्सर.

**कण्गिसुर्** (ಕಣ್ಗಿಸುರ್) (क) ना.—पोट दुखी; पोटांत गोळा येणें; पंक्ति भेद; डोळेदुखी; दृष्टिदोष; मत्सर.

**कण्गिडु (डु)** (ಕಣ್ಗಿಡು, ಕಂಗಿಡು) (क) धा.—दिशाभूल होणें; कळेनासे होणें; श्रमणें; कष्ट करणें; आयास घेणें.

**कण्गोने** (ಕಣ್ಗೊನೆ) (क) ना.—कटाक्ष; 'कडेगण्णु' पहा.

**कण्चु** (ಕಣ್ಚು) (क) धा.—दाखवणें; पाहणें.

**कण्जर्वु** (ಕಣ್ಜರ್ವು) (क) ना.—अहंकारदृष्टि; डोळे वटारणें; डोळ्यांतील गर्व.

**कंट** (ಕಂಟ) (क) ना.—ताडपत्रावर लिहिण्याची लोखंडी लेखणी; दाभण; कंठ; गळा; भांड्यावरील खूण; मान; ध्वनि.

**कंटक** (ಕಂಟಕ) (सं) ना.—काटा; बाधा; पीडा; विघ्न; अडचण; पेच; हिंसा; युद्ध; जन्म; कुंडलीतील अशुभस्थान.

**कंटक द्रुम** (ಕಂಟಕದ್ರುಮ) (क) ना.—काटेरी झाड; बाभळ; बरूचें झाड;

**कंटकभक्षक** (ಕಂಟಕಭಕ್ಷಕ) (क) ना.—उंट; उष्ट्र.

**कंटकि** (ಕಂಟಕಿ) (क) ना.—समाज कंटक; घातकी; पीडाकारी; काटेरी.

**कंटणे (ळे)** (ಕಂಟಣೆ[ಳೆ] (क) ना.—पीच्छेहाट; भीति; अवनति; दुरवस्था.

**कंटणिसु** (ಕಂಟಣಿಸು) (क) धा.—दटावणें; भिवविणें; कंटाळणें; थकून मुद्दा होणें.

**कंटळिसु** (ಕಂಟಳಿಸು) (क) धा.—'कंटणिसु' पहा.

**कंटि (ठि)** (ಕಂಟಿ) (क) ना.—कंठी; गळेसर; काटेरी झाडाचें रोप; ढापी.

**कंटिके** (ಕಂಟಿಕೆ) (क) ना.—गळ्यांतील अलंकार; कंठिका; एकावळी.

**कंटिसु** (ಕಂಟಿಸು) (क) धा.—सरळ करणें; त्रास देणें; लाकूड लावणें.

**कंठ** (ಕಂಠ) (सं) ना.—गळा; मान; कंठध्वनि; नाद; किनारा; काठ; तीर.

(क) वि.—समीप; जवळ; 'कट' पहा.

**—नीलक** (—ನೀಲಕ) (क) ना.—हिलाल; मशाल.

**—नीडक** (ನೀಡಕ) (क) ना.—गरुड.

**कंठगे** (ಕಂಠಗೆ) (सं) ना.—'कठगे' पहा.

**कंठपाठ** (ಕಂಠಪಾಠ) (सं) ना.—तोंडपाठ; मुखोद्गत.

**कंठशोष (षण)** (ಕಂಠಶೋಷ [ಷಣ]) (सं) ना.—घसा फाटेपर्यंत ओरड; निरर्थक भाषण.

**कंठारु** (ಕಂಠಾರು) (सं) ना.—नौका; कुदळ; उंट; युद्ध.

**कंठिके** (ಕಂಠಿಕೆ) (क) ना.—'कंटि' पहा.

**कंठीरव** (ಕಂಠೀರವ) (सं) ना.—सिंह; मदोन्मत्त हत्ति; पारवा; कबूतर.

**कंड** (ಕಂಡ) (क) ना.—खंड; मांस; तुकडा; चूर.

**कंडणे (ने)** (ಕಂಡಣೆ [ನೆ]) (क) ना.—एकी; अंधुक दृष्टि; सत्य; योग्य; अंतिम निर्णय; तह; तहनामा.

**कंडपट** (ಕಂಡಪಟ) (सं) ना.—अंतरपाट; अंतःपट; पडदा.

**कंडरणे** (ಕಂಡರಣೆ) (क) ना.—घाव; टोला; शिल्पाकृति; खोदकाम; कोरीव काम.

**कंडरिसु** (ಕಂಡರಿಸು) (क) धा.—तासणें; कोरणें; तुकडा पाडणें.

**कंडि** (ಕಂಡಿ) (क) ना. पायवाट; मळवाट; वेस; स्थिति; रंध्र; भोंक; तोंड; उद्घाटण; मोरी; वजनाचा दगड.

**कंडिके** (ಕಂಡಿಕೆ) (क) ना.—तुकडा; धोत्यांतील सूतकांडी; बुंधा; पेर; कांड.

**कंडित** (ಕಂಡಿತ) (क) अ.—स्पष्ट; निश्चितपणें; वस्तुतः; दृढतापूर्वक; खरोखर.

(क) वि.—तुकडा पाडलेलें; खंडित.

**कंडिबले (वले)** (ಕಂಡಿಬಲೆ [ವಲೆ]) (क) ना.—श्वापद पकडण्याचें जाळें; मृगफांस.

**कंडिसु** (ಕಂಡಿಸು) (क) धा.—दर ठरवणें; भाव ठरवणें.

**कंडू** (ಕಂಡು) (क) ना.—भाग; तुकडा.

(क) अ.—पाहून; पहा बरें !

**कंडुग** (ಕಂಡುಗ) (क) ना.—धान्याचें माप; गंज; कोळगें; पंचपात्र.

**कंडूति** (ಕಂಡೂತಿ) (क) ना.—खाज; कोरडी खरूज; क्षीणता; चिंता; रोडपणा.

**कंडूयन** (ಕಂಡೂಯನ) (सं) ना.—'कंडूति' पहा.

**कंडेय** (ಕಂಡೆಯ) (क) वि.—आधीन; विशाल.

(क) ना.—खड्ग; आयुध.

**कंडेयसिरी** (ಕಂಡೆಯಸಿರಿ) (क) ना.—खड्ग; श्री; पराक्रम.

**कंडेरे** (ಕಂಡೇರೆ) (क) ना. 'कंडूति' पहा.

**कणजिटलि** (ಕಣಜಿಟಲಿ) (क) ना.—रांजणवाडी; अंधुरली.

**कण्ण** (ಕಣ್ಣ) (क) ना.—कृष्ण; कन्हैया.

**कण्णप्प** (ಕಣ್ಣಪ್ಪ) (क) वि.—कृष्णाप्रमाणें राहणारा; कृष्णोपम

(क) ना.—शिवशरण; 'नेमिनाथ' काव्याचा लेखक; एक जैन कवि.

**कण्णमणि (ण्मणि)** (ಕಣ್ಣಮಣಿ [ಣ್ಮಣಿ]) (क) वि. सुंदर; हितकारी; प्रियदर्शन; दृष्टिहर.

**कण्णरिके** (ಕಣ್ಣರಿಕೆ) (क) ना.—डोळयानें केलेली खूण; नेत्रपल्लवी; डोळेवटारणी.

**कण्णलर्** (ಕಣ್ಣಲರ್) (क) ना.—पुष्पनेत्र; कमलनेत्र.

**कण्णळते(वु)** (ಕಣ್ಣಳತೆ[ವು]) (क) ना.—दृष्टिपथावरील वस्तुजात; नेत्रसामर्थ्य.

**कण्णारे** (ಕಣ್ಣಾರೆ) (क) अ.—डोळाभर; डोळ्यासमोर; प्रत्यक्ष.

(ಕಣಿ) (क) ना.—दोर; दावें; 'कडिबले' पहा.

**कण्णिालि** (ಕಣ್ಣಿಲಿ) (क) ना.—अंधळा धृतराष्ट्र; अंधळेपणा.

**कण्णिवले** (ಕಣ್ಣಿವಲೆ) (क) ना.—'कंडिवले' पहा; दोरीचें जाळें.

**कण्णीरु** (ಕಣ್ಣೀರು) (क) ना.—अश्रु; अश्रुबिंदु.

**कण्णु** (ಕಣ್ಣು) (क) ना.—'कण्' पहा.

**—इडु** (—ಇಡು) (क) धा.—नजर देणें; डोळा ठेवणें; मन लावणें; अपेक्षिणें.

**—कूरु** (—ಕೂರು) (क) धा.—डोळे झाकणें; पेंगणें.

**—कोरइसु** (—ಕೋರಯಿಸು) (क) धा.—डोळे दिपविणें; झगझगाट करणें; शोभविणें; चकाकणें; 'कंगोलिसु' पहा.

**कण्णंजलु** (ಕಣ್ಣಂಜಲು) (क) ना.—दृष्ट; दृष्टिदोष.

**कण्णेले** (ಕಣ್ಣೆಲೆ) (क) ना.—'कण्णळते' पहा; लक्ष.

**कण्णेवे** (ಕಣ್ಣೆವೆ) (क) ना.—पापणीचे केस.

**कण्णुतणि** } (ಕಣ್ಣುತಣಿ)
**कण्तणि, कण्दणी** } (ಕಣ್ತಣಿ, ಕಣ್ದಣಿ) (क) अ.—डोळे भरून; डोळ्याचें समाधान होईतों; आनंद वाटण्याजोगें.

**कण्णुतेरवु** } (ಕಣ್ಣುತೆರವು)
**कण्तेरवु** } (ಕಣ್ತೆರವು) (क) ना.—डोळ्याची उघड; निद्रा; विश्रांति; पेंग; डोळे मिटून विश्रांति.

**कण्णुबीज** (ಕಣ್ಣುಬೀಜ) (क) ना.—'डोळे येणें' या रोगावरील औषधी बी.

**कंदेरे(कण्देरे)** (ಕಂದೆರೆ [ಕಣ್ದೆರೆ]) (क) धा.—डोळा उघडणें; लक्षपूर्वक पाहाणें; निहाळणें; जागृत होणें; भान राखणें; अहंकार सोडणें.

**कण्दोळलु** (ಕಣ್ದೊಳಲು) (क) ना.—डोळ्याचीं बुबुळें फिरवणें; भिरिभिरी पाहणें; चौफेर दृष्टिक्षेप.

**कण्बडिग** (ಕಣ್ಬಡಿಗ) (क) ना.—जादुगार; नजरबंदी करणारा; भुरळ पाडणारा.

**कण्बरि** (ಕಣ್ಬರಿ) (क) ना.—विवेक; जागृति; डोळे उघडणें.

**कण्बापे** (ಕಣ್ಬಾಪೆ) (क) ना.—बुबुळ; डोळयातील बाहुली.

**कण्बीलि** (ಕಣ್ಬೀಲಿ) (क) ना.—मोराचे पंख; मोरपीस; पापणीचे केस.

**कण्बेट** (ಕಣ್ಬೇಟ) (क) ना.—दृष्टिमीलन; प्रेमाकांक्षा; डोळा मारणें; डोळा घालणें.

**कण्बोल** (ಕಣ್ಬೊಲ) (क) ना.—दृष्टिक्षेपांतील प्रदेश; दृष्टिपथ; दृष्टिगोचरस्थळ.

**कण्मरल्(लर्)** (ಕಣ್ಮರಲ್[ಲರ್]) (क) ना.—नेत्रकमल; नयनकंज.

**कण्मणे** (ಕಣ್ಮಣೆ) (क) ना.—'कण्णमणि' पहा.

**कण्मुच्चलिके** } (ಕಣ್ಮುಚ್ಚಳಿಕೆ)
**कण्मुच्चणिके** } (ಕಣ್ಮುಚ್ಚಣಿಕೆ) (क) ना.—लपंडाव; अंधळी कोशिंबीर; पापणी. 'एमे' पहा.

**कम्मुट्टु** (ಕಣ್ಮುಟ್ಟು) (क) अ.–डोळ्यासमोर; प्रत्यक्ष; पहातरी
**कण्व** (ಕಣ್ವ) (सं) ना.–कण्वऋषि; शकुंतलेचा पिता.
**—सुता** (—ಸುತಾ) (सं) ना.–शकुंतला.
**कण्वापे** (ಕಣ್ವಾಪೆ) (सं) ना.–'कण्बापे' पहा.
**कण्सुळुकु** (ಕಣ್ಸುಳುಕು) (क) ना.–चिपडें; डोळ्यांची घाण.
**कण्सोल्लु** (ಕಣ್ಸೋಲು) (क) ना.–डोळ्याचा ताण; दृष्टिपराजय; नेत्रानंद.
**कत** (ಕತ) (क) ना.–कारण; निमित्त; कृत; कृत्रिमता.
**कतक** (ಕತಕ) (क) ना.–कृतक; कृत्रिम; कपट; फसवेगिरी.
(सं) ना.–पाणी शुद्ध करणारी वनस्पति.
**कतकतने** (ಕತಕತನೆ) (क) ना.–रक्ताची सळसळ; शिजण्याची खदखद.
**कतम(मत्)** (ಕತಮು) [ಮತ್] (सं) वि.–कितवा ?
**कतर(रत्)** (ಕತರ) [ರತ್] (सं) ना.–दोहोंपैकीं कोणतें ?
**कतमाल** (ಕತಮಾಲ) (सं) ना.–अग्नि.
**कति** (ಕತಿ) (सं) वि.–किती.
(क) ना.–क्रोध.
**कतिगोळ्** (ಕತಿಗೊಳ್) (क) धा.–'खतिगोल्' पहा.
**कतिपय** (ಕತಿಪಯ) (सं) वि.–कित्येक; कांहीं.
**कते** (ಕತೆ) (क) ना.–कथा; चरित्र; निवेदन; प्रसंग; अवस्था.
**कत्तरि** (ಕತ್ತರಿ) (क) ना.–कातरी; कात्री; कातरण्याचें साधन; गुणिलें चिन्ह.
**—इसु** (—ಇಸು) (क) धा.–कातरणें; तुकडे करणें; भाग करणें.
**कत्तरिवाणि** (ಕತ್ತರಿವಾಣಿ) (क) ना.–कटूक्ति, लागट बोलणें; टोमण्यानें बोलणें; कढत पाणि; नौकाग्र; नौकामुख; नावेचा पुढचा भाग.
**कत्तल्(लु)** (ಕತ್ತಲ್ [ಲು]) (क) ना.–अंधार; काळोख; दाट धुके; अंतराळ; रात्र; काळेपणा; अज्ञान.
**कत्तलिसु** (ಕತ್ತಲಿಸು) (क) धा.–काळोख करणें; प्रकाशाचा प्रतिबंध करणें.
**कत्तले** (ಕತ್ತಲೆ) (क) ना.–'कत्तल्' पहा.
**कत्तलेगवि** (ಕತ್ತಲೆಗವಿ) (क) धा.–मुसकुट मारणें, डोक्यावरून पांघरूण घेणें; नेणतेपण घेणें; मूर्ख होणें.
(क) ना.–गाढ अंधार; गुहेंतील अंधार.
**कत्तलेमणि** (ಕತ್ತಲೆಮಣಿ) (क) ना.–अंधारांत प्रकाश देणारा चंद्र; तमोहर चंद्र.
**कत्तळ** (ಕತ್ತಳ) (अ. दे.) ना.–हिंसा; खून; कत्तल.
**कत्ति** (ಕತ್ತಿ) (क) ना.–खड्ग; कट्यार; कातरी; चाकू; वस्तरा.
**कत्तिगे** (ಕತ್ತಿಗೆ) (क) ना.–कृत्तिका नक्षत्र; कातरी; कात्री.
**कत्तिसु** (ಕತ್ತಿಸು) (क) धा.–जाळ करणें; पेटवणें; उजेड करणें.
**कत्तु** (ಕತ್ತು) (क) धा.–पेटविणें; जाळ करणें; हाक मारणें; ज्वाळा वाढविणें; झगझगणें; उजेडच उजेड होणें.
**कत्तुपेन** (ಕತ್ತುಪೆನ) (क) ना.–भांडण; तंटा; भानगड.
(क) ना.–गळा; मान; लिखाण; पत्र; अक्षर; हस्ताक्षर.
**कत्तु (तू) रि** (ಕತ್ತು [ತ್ತೂ] ರಿ) (क) ना.–कस्तुरी, मृगनाभिगंध.
**कत्तुरिमिग** (ಕತ್ತುರಿಮಿಗ) (क) ना.–कस्तुरिमृग, कस्तुरि देणारा मृग.
**कत्तेकिरुब** (ಕತ್ತೆಕಿರುಬ) (क) ना.–गाढव, कुत्रे, खाणारा व हसल्याप्रमाणें ओरडणारा हिंस्र प्राणी.
**कत्थन** (ಕತ್ಥನ) (सं) ना.–प्रशंसा; आत्मस्तुति; विपरीत प्रशंसा.
**कथम्** (ಕಥಮ್) (सं) अ.–कसें ? कोणत्या प्रकारें.
**कथक** (ಕಥಕ) (सं) ना.–कथा सांगणारा; पुराणिक; एक नृत्य-पद्धति.
**कथक्कळि** (ಕಥಕ್ಕಳಿ) (अ. दे) ना.–केरळदेशीय नृत्य; कथा वा प्रसंग; अभिनयानें व्यक्त करण्याची पद्धति.
**कथन** (ಕಥನ) (सं) ना.–निवेदन; विवरण; सांगणें.
**कथा** (ಕಥಾ) (सं) ना.–गोष्ट; भाषण; सांगणें.
**—नायक** (—ನಾಯಕ) (सं) ना.–नाटकांतील व कथेंतील मुख्य पात्र.
**—प्राण** (—ಪ್ರಾಣ) (सं) ना.–नट.
**कथांतर** (ಕಥಾಂತರ) (सं) ना.–उपाख्यान; उपकथा; कथासंभाषणांतील भाग; पोटकथा; कथेंतील कथा.
**कथानक** (ಕಥಾನಕ) (सं) ना.–कथाप्रसंग; कथावस्तु; कथाकथन; आख्यान.
**कथाप्रसंग** (ಕಥಾಪ್ರಸಂಗ) (सं) ना.–कथासंभाषणाची जोडणी; चर्चा; गप्पीदासी तिखटमीठ लावून सांगितलेला प्रसंग; गोष्टीवेल्हाळपणा; पदरचे घालून सांगितलेली कथा.
**कथाभित्ति** (ಕಥಾಭಿತ್ತಿ) (सं) ना.–कथावस्तु.
**कथालाप** (ಕಥಾಲಾಪ) (सं) ना.–वार्तालाप; विवरण; आशय.
**कथिक** (ಕಥಿಕ) (सं) ना.–'कथक' पहा.
**कथित** (ಕಥಿತ) (सं) वि.–सांगितलेलें; विवेचिलेलें.
**कथिसु** } (ಕಥಿಸು) (क) धा.–सांगणें; विवेचन करणें;
**कथायिसु** } (ಕಥಾಯಿಸು) विवरणें.
**कथे (था)** (ಕಥೆ [ಥಾ]) (सं) ना.–गोष्ट; चरित्र; भाषण; प्रसंग; वर्णन.
**कद्** (ಕದ್) (सं) वि.–वाईट; कु; अल्प; निरुपयोगी; निरुपयुक्ततादर्शक उपसर्ग.
**कद** (ಕದ) (सं) ना.–मूढता; कळ; दुःख; ठणका; रड; हाक; खून; व्रण.

(क) ना.–कडी; दरवाजाची उघडझाप करण्याचे साधन; दरवाजा.

——अग्नि (—ಅಗ್ನಿ) (क) ना.–थोडा अग्नि; धुगधुगी; धग; ठिणगी.

**कद्क** (ಕದಕ) (क) वि.–चोर; कपटी.

(सं) ना.–चांदणें; छप्पर; विस्तार; जांभई; राहुटी.

**कद्कद्पु** (ಕದಕದಪು) (क) ना.–कंपन; कुडकुडणें; थरथर; हलणेंडोलणें.

**कद्क (क्क) दिसु** (ಕದಕ [ಕ್ಕ] ದಿಸು) (क) धा.–कंप पावणें; थरथरणें; थंडीनें कुडकुडणें; अट्टाहास करणें; गळगळणें; हातवारें करीत हसणें.

**कदडु** (ಕದಡು) (क) धा.–राड होणें; मिसळणें; हलविणें; क्षुब्ध करणें; क्रम चुकविणें; कलागत लावणें; गोंधळ माजविणें.

(क) ना.–राड; गोंधळ; पाठकोर कागद.

कलह; अडचण; क्षोभ; वावर; अशुद्ध प्रत; निरुपयोगी काम; नाश.

**कदडेंळ्** (ಕದಡೇಳ್) (क) धा.–राड होणें; भांडणें; आदळ आपट करणें.

**कद्ध्व** (ಕದಧ್ವ) (सं) ना.–दुर्मार्ग; वाईट वाट; खडकाळ रस्ता.

**कदन** (ಕದನ) (सं) ना.–तंटा; लढाई; कत्तल.

**कदनकलि** (ಕದನಕಲಿ) (क) ना.–शूर सैनिक; योद्धा; रणवीर.

**कदन्न** (ಕದನ್ನ) (सं) ना.–वाईट अन्न; निसत्त्व आहार; हलके खाद्य.

**कद (दं) पु** (ಕದ [ದಂ] ಪು) (क) ना.–साय; गाल; नाजूक गाल.

**कदंब (बक)** (ಕದಂಬ [ಬಕ]) (सं) ना.–कदंब वृक्ष; तालतरू; मोहरीचें झाड; समूह; दल; दहीभात; दहीवडा.

**कदर** (ಕದರ) (सं) ना.–करवत; अंकुश; चरख्याची चाती; गुणाची पारख; धाक.

**कदरु** (ಕದರು) (क) धा.–'कदडु' पहा.

(क) ना.–सूत गुंडाळण्याची चाती; किरण; कांती.

**कदर्थ** (ಕದರ್ಥ) (सं) ना.–नीच कार्य; क्षुद्र मागणी; कुमार्गानें मिळालेलें धन.

**कदर्थन (ने)** (ಕದರ್ಥನ [ನೆ]) (सं) ना.–पीडा; त्रास; गांजणूक; तिरस्कार; निंदा; पाणउतारा; हाल; डोकावणें.

**कदर्य** (ಕದರ್ಯ) (सं) वि.–कृपण; लोभी; कंजूष; चिक्कू; क्षुद्रमनस्क.

**कदल (लक)** (ಕದಲ [ಲಕ]) (सं) ना.–केळीचें झाड.

**कदलि (ली)** (ಕದಲಿ [ಲೀ]) (सं) ना.–केळीचें झाड; बावटा; मंदिर; ध्वज; समूह; शिव; आकाश; हत्ती; हरिणविशेष; काळोख; मध्यारण्य.

**कदलिके** (ಕದಲಿಕೆ) (क) ना.–वेग; हुरूप; गडबड; चलनवलन.

**कदलिसु** (ಕದಲಿಸು) (क) धा.–चालू करणें; हलविणें; अदलाबदल करणें; मिसळणें.

**कदलु** (ಕದಲು) (क) धा.–हलविणें; चालविणें; लोंबकळणें; टांगणें; जागा सोडणें; 'कदडु' पहा.

—**आडु** (—ಆಡು) (क) धा.–हलणें; डोलणें.

**कदले** (ಕದಲೆ) (क) ना.–समूह; समाज; जमात; एकूण.

**कदवु (हु)** (ಕದವು [ಹು]) (क) ना.–'कद' पहा.

**कदळि** (ಕದಳಿ) (क) ना.–'कदलि' पहा.

**कदा** (ಕದಾ) (सं) अ.–केव्हां; कोणत्या वेळीं.

**कदाचन** (ಕದಾಚನ) (सं) अ.–केव्हांतरी; केव्हां केव्हां; यदाकदाचित्; केव्हांहि.

**कदाचित्** (ಕದಾಚಿತ್) (सं) अ.–कधींतरी; एखादेवेळीं; चुकून; न जाणो.

**कदापि** (ಕದಾಪಿ) (सं) अ.–केव्हांहि; कोणत्याहि वेळीं; कधींहि.

**कदालिक** (ಕದಾಲಿಕ) (सं) ना.–'कदलि' पहा.

**कदि** (ಕದಿ) (क) धा.–चोरी करणें; अपहार करणें; लांबविणें.

**कदिन** (ಕದಿನ) (क) ना.–तोफ; बंदुक; खेळांतील वस्तु; खेळणें.

**कदिर् (रु)** (ಕದಿರ್ [ರು]) (क) ना.–किरण; कांती; चरख्याची चाती; कदर; धान्याचें कणीस.

**कदु (दुं) कु** (ಕದು [ದುಂ] ಕು) (क) धा.–चावून तुकडा पाडणें; दाबणें; 'कदडु' पहा.

**कदुपु** (ಕದುಪು) (क) ना. समूह; समाज; लोक.

**कदुबु** (ಕದುಬು) (क) धा.–बलात्कार करणें; जबरदस्ती करणें; अडचण उत्पन्न करणें; पांघरूण घालणें; घेरा देणें; आवरणें.

**कदुवु** (ಕದುವು) (क) ना.–प्रसंग; संभव; ताव; काव. तसलाल.

**कदुष्ण** (ಕದುಷ್ಣ) (सं) वि.–कोमट; ईषदुष्ण; ऊन; किंचित् तापलेलें; शेकलेलें; बोट न भाजण्याइतकें ऊन.

**कदृकु** (ಕದೃಕು) (क) धा.–'कदुंकु' पहा.

**कदे** (ಕದೆ) (क) धा.–मिळणें; एक होणें; शिरणें; जोडीदार होणें; साथ देणें; संकुचित होणें; दबणें; दाबलें जाणें.

**कद्दवणि** (ಕದ್ದವಣಿ) (क) ना.–रोमांच; अंगावरील कांटा.

**कद्दलिग** (ಕದ್ದಲಿಗ) (क) ना.–कोष्टी समाजातील एक पोटजात; विणकरसंघ.

**कद्दिकार** (ಕದ್ದಿಕಾರ) (क) वि.–धीट; शूर; प्रेमी; पारितोषिक जिंकणारा.

**कद्देयिसु** (ಕದ್ದೆಯಿಸು) (क) धा.–प्रेम करणें; वासना ठेवणें; शिवी देवविणें.

क्ष्वेला (ಕ್ಷ್ವೇಲಾ) (सं) ना. – विनोद; पोरकटपणा; खुळचटपणा; खूळ.

क्ष्वेळ (ಕ್ಷ್ವೇಳ) (सं) ना. – विष; 'क्ष्वेड' पहा.

क्ष्वेळगळ (ಕ್ಷ್ವೇಳಗಳ) (सं) ना. – विषकंठ; नीलकंठ; शिव.

## ख

ख (ಖ) (सं) ना. – 'क' वर्गातील दुसरें अक्षर; आकाश; इंद्रिय; मन; ब्रह्म; स्वर्ग; खूण; माप; बुद्धि; क्षेत्र; यति; संन्यासी; शून्यस्थळ; कलियुग; 'वे'चा पाढा.

खग (ಖಗ) (सं) ना. – पक्षी; विमान; बण; देवता; सूर्य; पतंग; मंदिर; घर.

—ईश्वर (ಈಶ್ವರ) (सं) ना. – गरूड; पक्षीराज.

—गति (ಗತಿ) (सं) ना. – पक्षाची झेप; पक्षांचें उडणें.

—त्व (ತ್ವ) (सं) ना. – गगनविहार.

खगम (ಖಗಮ) (सं) ना. – भारतकालांतील एक ब्राह्मण.

खगोल (ಖಗೋಲ) (सं) ना. – आकाश; नभोमंडल; आकाशांतील ग्रहगोल; नाक्षत्रशास्त्र; ज्योतिषशास्त्र.

खंकर (ಖಂಕರ) (सं) ना. – जटा; वेणी; केशकलाप.

खंकरि (ಖಂಕರಿ) (सं) ना. – केशकलाप.

खचर (ಖಚರ) (सं) ना. – गगनविहारी; पक्षी; सूर्य; गंधर्व; 'खग' पहा.

—अंगने (ಅಂಗನೆ) } (सं) ना. – देवता स्त्री; गंधर्व; स्त्री.
—अबले (ಅಬಲೆ) }

खचित (ಖಚಿತ) (सं) वि. – निश्चित; उपटून काढलेले; दान करविलेलें; कोंदणांत बसविलेलें; जडित.

खज (ಖಜ) (सं) ना. – पळी; मधाचें पोळें; मोहोळ; लाकडाची पळी.

खजक (ಖಜಕ) (सं) ना. – छत; वितान.

खजाने (ಖಜಾನೆ) (अ. दे) ना. – कोश; संग्रहस्थान; भांडार; तिजोरी.

खजांचि (ಖಜಾಂಚಿ) (अ. दे) ना. – खजिनदार; कोशाधिकारी; कोष्याधीश.

खंज (ಖಂಜ) (सं) ना. – लंगडा; पांगळा; लुला.

खंजन (रीट) (ಖಂಜನ [ರೀಟ]) (सं) ना. – काळी चिमणी; परटीणपक्षी.

—अक्षी (ಅಕ್ಷಿ) (सं) ना. – सुनेत्रा.

खंजरि (ಖಂಜರಿ) (सं) ना. – एक चर्मवाद्य; डफरी; टिमकी.

खट (ಖಟ) (सं) वि. – कार्यव्यापृत; प्रयत्नशील.
(सं) ना. – कोरडी विहीर; गवत; कफ; कुऱ्हाड; नांगर.

खटकटाहक (ಖಟಕಟಾಹಕ) (सं) ना. – पिकदाणी; तस्त; थुंकण्याचें भांडें.

खटपटि (ಖಟಪಟಿ) (अ. दे) ना. – प्रयत्न; साहस.

खटिके (ಖಟಿಕೆ) (सं) ना. – सीमादर्शक खडू.

खट्टिक (ಖಟ್ಟಿಕ) (सं) ना. – खाटीक; खून करणारा; कसाब.

खट्व (ಖಟ್ವ) (सं) ना. – मंच; पलंग; झोंपाळा; व्यासपीठ; पाळणा; 'उय्याल' पहा.

खट्वांग (ಖಟ್ವಾಂಗ) (सं) ना. – शिवहस्तांतील हाडाची गदा; पलंगाच्या पायाच्या आकाराची गदा; पाटी; दुरडी; यतीच्या डोक्यावरील छत्राची दांडी.

—धर (ಧರ) शिव.

खट्वा (ಖಟ್ವಾ) (सं) ना. – माचा; पलंग; अंथरूण; खाट.

खड (ಖಡ) (सं) ना. – कडी; गवत; विभाग; मोड; खड्ग.

खडाखडि (ಖಡಾಖಡಿ) (सं) ना. – खड्गयुद्ध; सडेतोड बोल; फटकळ भाषण.

खड्ग (ಖಡ್ಗ) (सं) ना. – तलवार; खड्गमृग; गंडक; गेंडा.

खड्गपिधान (ಖಡ್ಗಪಿಧಾನ) (सं) ना. – तरवारीचें म्यान.

खड्गफल (ಖಡ್ಗಫಲ) (सं) ना. – तरवारीची धार; तरवारीचें पाणी.

खड्गमृग (ಖಡ್ಗಮೃಗ) (सं) ना. – नाकावर शिंग असलेला गंडक; गेंडा.

खड्गहस्त (ಖಡ್ಗಹಸ್ತ) (सं) ना. – भैरव; योद्धा.

खड्गाखड्गि (ಖಡ್ಗಾಖಡ್ಗಿ) (सं) ना. – तरवारीचें युद्ध.

खड्गि (ಖಡ್ಗಿ) (सं) ना. – खड्गधारी; गेंडा.

खणत्कर (ಖಣತ್ಕರ) (सं) ना. – खणखणाट; तरवारीवर तरवार आपटून होणारा आवाज.

खणिगट्टु (ಖಣಿಗಟ್ಟು) (क) धा. – खणखणाट करणें.

खणि (णिल) (ಖಣಿ [ಣಿಲ]) (क) ना. – खणखणाट.

खंड (ಖಂಡ) (सं) ना. – तुकडा; अंश; विभाग; विस्तीर्णभूभाग; रहस्य; अर्धचंद्र; खडीसाखर.

खंडन (ने) (ಖಂಡನ [ನೆ]) (सं) ना. – तुकडा; भाग; पूड; विरोध; विधान खोडणें.

खंडपरशु (ಖಂಡಪರಶು) (सं) ना. – परशुराम; पर्शुराक्षसाला मारणारा; गणपति.

खंडमाणिक्य (ಖಂಡಮಾಣಿಕ್ಯ) (सं) ना. – लाल कमळ; माणिक रत्न.

**खंडरिसु** (ಖಂಡರಿಸು) (क) धा.—खंडन करणें; तुकडे पाडणें; तोडणें; खड्डा खणणें; भोंक पाडणें.
**खंडशशधर** (ಖಂಡಶಶಧರ) (सं) ना.—अर्धचंद्र.
**खंडशशि** (ಖಂಡಶಶಿ) (सं) ना.—चंद्रकोर; अर्धचंद्र.
—**धर, शेखर** (ಧರ, ಶೇಖರ) (सं) ना.—चंद्रशेखर; शिव.
**खंडि** (ಖಂಡಿ) (अ. दे.) ना.—खिंड; किल्ल्याची पायवाट; वीस मणांचें वजनमाप.
**खंडिक** (ಖಂಡಿಕ) (सं) ना.—भुइमूग; शेंगा.
**खंडित** (ಖಂಡಿತ) (क) अ.—'कडित' पहा; निश्चित; भाग पडलेले.
**खंडिसु** (ಖಂಡಿಸು) (क) धा.—फोडणें; मोडणें; बोलणें; खोडणें; भाषा उलटवणें; पराजय करणें. 'खडरिसु' पहा.
**खंडेय** (ಖಂಡೆಯ) (सं) ना.—आयुध; खड्ग; तलवार.
**खंडोबा** (ಖಂಡೋಬಾ) (सं) ना.—महाराष्ट्रांतील शिवस्वरूपी देवता.
**खतमाल** (ಖತಮಾಲ) (सं) ना.—ढग; धूर.
**खतं** (ಖತಂ) (अ. दे.) ना.—समाप्ति; शेवट.
**खतावणि** (ಖತಾವಣಿ) (अ. दे) ना.—खातेवही.
**खति** (ಖತಿ) (क) ना.—'कति' पहा. उपकरण.
—**गोळ्** (ಗೊಳ್) (क) धा.—रागावणें; कोपणें; क्रोध करणें.
**खतिलक** (ಖತಿಲಕ) (सं) ना.—सूर्य.
**खत्र** (ಖತ್ರ) (अ. दे) ना.—एक संगीत वाद्य.
**खदिर** (ಖದಿರ) (सं) ना.—खैराचें झाड; काताचें झाड.
**खदिरतांबूल** (ಖದಿರತಾಂಬೂಲ) (सं) ना.—कात घातलेला विडा.
**खद्योत** (ಖದ್ಯೋತ) (सं) ना.—काजवा; सूर्य; भ्रमर.
**खनक** (ಖನಕ) (सं) ना.—उकरणारा; खाणींत काम करणारा; घूस; उंदीर; विदुरमित्र.
**खनन** (ಖನನ) (सं) ना.—खुदाई; पुरणें; खणणें; उकरण.
**खनि** (ಖನಿ) (सं) ना.—खाण; धातु; निधि; विपुल संग्रह; स्थान.
**खनिज** (ಖನಿಜ) (सं) ना.—खाणींत मिळणारे लोहादि धातु.
**खनित्र** (ಖನಿತ್ರ) (सं) ना.—कुदळ; खणण्याचें साधन; पिकास; खोरें.
**खपुर** (ಖಪುರ) (सं) ना.—सुपारीचें झाड; त्रिपुर; मुख; वस्त्र; कोपरा; अपमान; मिठार माती.
**खप्रवाह** (ಖಪ್ರವಾಹ) (सं) ना.—देवगंगा नदी; दुग्धपथ.
—**जूट** (ಜೂಟ) (सं) ना.—जटेंत गंगा ठेवणारा शिव.
**खय** (ಖಯ) (सं) ना.—दाक्षिण्य; खोड; निरुपयुक्त वस्तु; नीचता; हीनता.
**खर** (ಖರ) (सं) वि.—घट्ट; ओबडधोबड; उग्र; तीक्ष्ण. (सं) ना.—वस्तरा; गाढव; एक राक्षस; रावणाचा सावत्र भाऊ; क्षार; क्रूर; एक संवत्सर; काटेरी झाड.
—**दंड** (ದಂಡ) (सं) ना.—कमल; नाळ.
—**नाद** (ನಾದ) (सं) ना.—शिंगरू.
—**प्रिय** (ಪ್ರಿಯ) (सं) ना.—पारवा; कबूतर; पारवळ.
—**नाल** (ನಾಲ) (सं) ना.—कमळ.
—**स्वरा** (ಸ್ವರಾ) (सं) ना.—रानजाई.
**खरकर** (ಖರಕರ) (सं) ना.—चंडकिरण; सूर्य.
**खरणस्** (स) (ಖರಣಸ್ [ಸ]) (सं) वि.—टोकदार नाक असलेला.
**खरवैरी** (ಖರವೈರಿ) (सं) ना.—खर राक्षसाला मारणारा राम.
**खरशाण** (ಖರಶಾಣ) (सं) ना.—तीक्ष्ण करवत; जातें.
**खरसार** (ಖರಸಾರ) (सं) ना.—भर्जे; माइनमूळ.
**खरारि** (रांतक) (ಖರಾರಿ [ರಾಂತಕ]) (सं) ना.—'खरवैरि' पहा.
**खरा** (रे) (ಖರಾ [ರೆ]) (अ. दे) ना.—सत्य; वस्तुस्थिति; खरेपणा.
**खर्चु** (ಖರ್ಚು) (अ-दे) ना.—खर्चवेच; व्यय.
**खर्जुर** (जूर) (ಖರ್ಜುರ [ಜೂರ]) (सं) ना.—चांदी; रुपें; पक्व खारीक; खजूर.
**खर्पर** (ಖರ್ಪರ) (सं) खापर; खापरी; कवटी; देशनाम; ठग; कासवाची पाठ; भिक्षापात्र; छत्री; चोर.
—**धर** (ಧರ) (सं) ना.—संन्यासी; शिव.
**खर्व** (ಖರ್ವ) (सं) ना.—ठेंगु; बुटका; कोंदट; दहा अब्ज संख्या
—**शाक** (ಶಾಖ) (सं) ना.—ठेंगणा; गिड्डा; खुजा; खोल्गट.
**खर्वट** (ड) (ಖರ್ವಟ [ಡ]) (सं) ना.—वेट; खेडें.
**खल** (ಖಲ) (सं) ना.—दुष्ट; नीच; हीन; व्यभिचारी; युद्ध; अंगण; रंगभूमि; स्थळ; चिखल.
—**उक्ति** (ಉಕ್ತಿ) (सं) ना.—शिवी; अपशब्द; दुष्टवाणी.
**खलकरण** (ಖಲಕರಣ) (सं) ना.—खळ्यांतील काम; खळ्यांतील धान्य; मळणी; तुडवण.
**खलति** (ಖಲತಿ) (सं) ना.—खल्वाट; टक्कल.
**खलतिक** (ಖಲತಿಕ) (सं) ना.—टक्कल; पर्वत.
**खलन्याय** (ಖಲನ್ಯಾಯ) (सं) ना.—चूकनिर्णय; दुरुपदेश; बदसल्ला.
**खलपु** (ಖಲಪು) (क) ना.—भंगी.
**खलिनि** (ಖಲಿನಿ) (सं) ना.—खळ्यांतील धान्य.
**खलीकरण** (ಖಲೀಕರಣ) (सं) ना.—हिसकाहिसकी; ठेचाठेच; जखम; दुखणें.
**खालिन** (लीन) (ಖಲಿನ [ಲೀನ]) (सं) ना.—लोखंडी कांब; लगाम.

**खलु** (ಖಲು) (सं) अ. – निश्चयेंकरून; खरोखर; न चुकतां; होय ना ?
(सं) ना. – प्रार्थना; विचारणा; तनखा; विरोध; बहिष्कार; कारण; अभ्यर्थना; वाक्यालंकारपूरण.

**खलुज** (ಖಲುಜ) (सं) ना. – काळोख; अंधार; कलंक; प्रमाद; काळोखी.

**खलूरिके** (ಖಲೂರಿಕೆ) (सं) ना. – व्यायामशाळा; तालीम; आखाडा; सैनिकांचें कवायत मैदान; रणांगण; युद्धभूमि.

**खलेंवालि** (ಖಲೇವಾಲಿ) (अ-दे) ना. – मल्लखांब; खेळातील मर्यादा खांब.

**खल्या** (ಖಲ್ಯಾ) (सं) ना. – मऊ मातीचा ढीग.

**खल्वाट** (ಖಲ್ವಾಟ) (सं) – ‘खलति’ पहा.

**खवखविसु** (ಖವಖಿಸು) (क) धा. – जाळणें; इच्छिणें; अत्यातुर होणें; खातांना मचमच करणें.

**खसूचि** (ಖಸೂಚಿ) (सं) ना. – दिग्दर्शन; आकाशाकडे तोंड करून पाहणें; संभ्रम; भ्रांति.

**खस्खस** (ಖಸ್ಖಸ) (सं) ना. – खसखस.
—**रस** (ರಸ) (सं) अफू.

**खळ** (ಖಳ) (सं) ना. – ‘खल’ पहा.

**खळिलेने** (ಖಳಿಲೆನೆ) (क) अ. – बळेंबळें; जोर करून; उद्धटपणें; गर्जून.

**खळग** (ಖಳ್ಗ) (सं) ना. – खड्ग; तलवार; तलवारीची धार; गेंड्याची मादी.

**खाट** (**टि**) (**टी**) (**टीका**) (ಖಾಟ [ಟಿ] [ಟೀ] [ಟೀಕಾ]) (सं) ना. – तिरडी; शवयान; प्रेतविमान; शववाहन.

**खाड** (ಖಾಡ) (सं) ना. – ‘खड्ग’ पहा.

**खाडाखाडि** (ಖಾಡಾಖಾಡಿ) (सं) ना. – खड्गयुद्ध; तुमुलयुद्ध.

**खाडि** (ಖಾಡಿ) (सं) ना. – प्रवाहाचा ओत; आखात.

**खाण** (ಖಾಣ) (सं) ना. – गवत; चारा; ऊस.

**खांडव** (ಖಾಂಡವ) (सं) ना. – अर्जुनानें जाळलेलें खांडववन.

**खात** (ಖಾತ) (सं) वि. – उकरलेलें; तळें; सरोवर; खळगा; ऋणको; कर्जदार.

**खातक** (ಖಾತಕ) (सं) ना. – खड्डा; उकरणारा.

**खात्कृ** (ತಖ್ಕೃಗ) (सं) ना. – खाकरा; घसा-सफाई; खाकरणे.

**खाति** (ಖಾತಿ) (सं) ना. – ‘खाति’ पहा; उकरण.

**खाते** (**ता**) (ಖಾತೆ [ತಾ]) (सं) ना; – पुष्करणी; दैनिक सेवा; हिशोब; खातेवही; हिशोबवही-खतावणी.

**खात्र** (ಖಾತ್ರ) (सं) ना. – कुदळ; उकरण; जंगल, भय; खिंडार भगदाड; सूत; दोरी.

**खाद** (**दन**) (ಖಾದ [ದನ]) (सं) ना. – आहारसेवन; खाणें; दात ओढणें.

**खाद्य** (ಖಾದ್ಯ) (सं) ना. – खाण्याचा पदार्थ; फराळाचें सामान.

**खाद्दि** (ಖಾದಿ) (अ. दे.) ना. – खादी कापड; हातसूत; हातविणीचें कापड.

**खाद्दित** (ಖಾದಿತ) (सं) वि. – खाल्लेलें; पचविलेलें; गिळलेले.

**खान** (ಖಾನ) (सं) ना. – उकरण; जखम.
(अ. दे.) ना. – सरदार; अमीर; मुसलमानी पदवी.
—**उद्क** (ಉದಕ) (सं) ना. – नारळाचें झाड.

**खानक** (ಖಾನಕ) (सं) वि. – उकरणारा; खळगा काढणारा.

**खानि** (ಖಾನಿ) (अ. दे) ना. – खाना; रकाना; कोठी; लहान भाग; चौकट; लहान घर.
(सं) ना. – खाण.

**खानिल** (ಖಾನಿಲ) (सं) ना. – दरवडेखोर; घरफोड्या.

**खाने** (ಖಾನೆ) (अ. दे) ना. – घर; वासस्थळ; पेटीचा कप्पा.

**खानेसुमारि** (ಖಾನೆಸುಮಾರಿ) (अ. दे) ना, – जनगणना; शिरगणती.

**खामखा** (ಖಾಮುಖಾ) (अ. दे) अ. – निश्चितपणें; खात्रीनें; अवश्य (हिंदी) खामखाह; खचित; नक्की.

**खारिगे** (ಖಾರಿಗೆ) (अ. दे.) ना. – खारीक; खुदाई; उकरण्याची क्रिया.

**खार्वा** (ಖಾರ್ವಾ) (सं) ना. – त्रेतायुग.

**खालि** (ಖಾಲಿ) (अ. दे) ना. – मोकळा वेळ; रिकामपण; निरुपयुक्तता.

**खासगि** (ಖಾಸಗಿ) (अ. दे) वि. – स्वतःचें; वैयक्तिक; रहस्यमय.

**खासा** (ಖಾಸಾ) (अ. दे) वि. – स्वतःचें; आपले.

**खिंकृत** (ಖಿಂಕೃತ) (सं) ना. – बाणाचा सूईं ऽऽ असा आवाज.

**खिंखिर** (ಖಿಂಖಿರ) (सं) ना. – (सं) ना. – कोल्हा; पलंगाचा पाय.

**खिजमत** (ಖಿಜಮತ) (अ. दे) ना. – सेवा; चाकरी; सुश्रूषा; परिचर्या.

**खिदिर** (ಖಿದಿರ) (सं) ना. – चंद्र; दारिद्र्य; अनाथ; भिक्षुक;

**खिन्न** (ಖಿನ್ನ) (सं) वि. – दुःखित; चिंतातुर; व्यथित; अपमानित.

**खिल** (ಖಿಲ) (सं) वि. – व्यर्थ; निरुपयोगी; शून्य; फाटलेलें; उरलेलें; मुक्त; मोकळें.
(सं) ना. – मरुभूमि; नापीक जमीन.
—**क्षेत्र** (ಕ್ಷೇತ್ರ) (सं) ना. – पड जमीन; पडीक शेत.

**खुद्द** (**द्दु**) (ಖುದ್ದ [ದ್ದು]) (अ. दे) अ. – स्वतः, जातीनें.

**खुर** (ಖುರ) (सं) ना. – पशूचा पाय; पलगांचा पाय; सुगंधी द्रव्य; कोळगें, वस्तरा.
—**आघात** (ಆಘಾತ) (सं) ना. – लत्ता; लाथ; दुगाण्या.

**खुरणस** (ಖುರಣಸ) (सं) ना. – फताडें नाक.

**खुरपुट** (ಖುರಪುಟ) (सं) ना.—खुर; गेळ.
**खुरली** (ಖುರಲಿ) (अ. दे.) ना.—सैनिकी कार्यक्रम.
**खुराकु** (ಖುರಾಕು) (अ. दे) ना.—खुराक; पक्वान्न; शक्ति वर्धक खाद्य.
**खुराल (लि)क** (ಖುರಾಲ [ಲಿ]ಕ) (सं) ना.—लोखंडी शस्त्र; उशी.
**खुनींसु** (ಖುನೀಸು) (अ. दे) ना.—नमस्कार; वंदना; प्रणाम.
**खुलासे** (ಖುಲಾಸೆ) (अ. दे) ना.—निर्णय; मुक्ति; सुटका; स्वतंत्रता; विशदीकरण.
**खुल्ल** (ಖುಲ್ಲ) (सं) वि.—क्षुल्लक; क्षुद्र; लहान; दुष्ट.
  **--तन** (ತನ) (क) ना.—दुष्टता; हीनता.
  (सं) ना.—आतुरता; अशांति; रोष; क्रोध.
  **--तात** (ತಾತ) (सं) ना.—काका; चुलता.
**खुल्ला** (ಖುಲ್ಲಾ) (अ. दे) वि.—मोकळा; खुला; उघडा.
**खून** (ಖೂನ) (अ. दे.) ना.—खूण; चिन्ह; रक्त.
**खूनि** (ಖೂನಿ) (अ. दे.) ना.—खून करणारा; हत्यारी.
**खेचर** (ಖೇಚರ) (सं) ना.—'खग' पहा.
  **--अहि** (ಅಹಿ) (सं)ना.—राहू.
**खेट (टक)** (ಖೇಟ [ಟಕ]) (सं) ना.—श्लेष्मा; कफ; लाळ; खेडें; ढाल; अडणा; शिकार; वाईट; दुष्ट; पुष्टी; दुजोरा.
**खेटितान (नन)** (ಖೇಟಿತಾನ) (ನನ) (सं) ना.—वैतालिक; भाट; स्तुतिपाठक; गाणे म्हणत राजाला जाग आणणारा.
**खेड** (ಖೇಡ) (क) वि—भयभीत.
  (क) ना.—खेडें; ग्राम.
  **--तन** (ತನ) (क) ना.—घाबरेपणा; भय; खेडवळपणा; उमळ.
**खेडाकुलि** (ಖೇಡಾಕುಳಿ) (क) ना.—माळा; सखल जमीन.
**खेडेय** (ಖೇಡೆಯ) (क) ना.—उतार; चर्म; चामडे; अडणा; फळी.
**खेड्य** (ಖೇಡ್ಯ) (अ. दे) ना.—हत्ती पकडण्याचा खड्डा.

**खेद** (ಖೇದ) (सं) ना.—दुःख; चिंता; दुखणें; व्यथा; चिवा; वेळ; विष.
  **--गोळ्** (ಗೊಳ್) (क) धा.—खेद होणें; दुखणें; दुखवणें.
**खेपु** (ಖೇಪು) (अ. दे) ना.—खेप; येरझारी; हेलपाटा; एक वेळ; एक पाळी.
**खेय** (ಖೇಯ) (सं) वि.—किल्ल्याभोवतीचा खंदक; अडणा.
**खेल (लन)** (ಖೇಲ [ಲನ]) (सं) ना.—खेळ; विनोद; फेक; उधळपट्टी.
**खेलमेलन** (ಖೇಲಮೇಲನ) (सं) ना.—बरोबरींच्याशीं झालेला खेळ; तुल्यबलींचा खेळ.
**खेले (ला)** (ಖೇಲೆ [ಲಾ]) (सं) ना.—खेळ; विनोद.
**खेळ** (ಖೇಳ) (सं) ना.—खेळाडु; विरोधी; भिडु; मल्याळी मनुष्य.
**खैरु** (ಖೈರು) (अ. दे) ना.—खैर ! ठीक ! बरें तर ! नमस्कार.
**खोजा** (ಖೋಜಾ) (अ. दे) ना.—मुसलमानांतील एक जात.
**खोड(डर)ल** (ಖೋಡ [ಡರ]ಲ) (सं) ना.—लंगडा; पांगळा.
**खोडि** (ಖೋಡಿ) (क) वि.—वाईट; नीच; निरुपयुक्त.
  **--तन** (ತನ) (क) ना.—वाईटपणा; नीचता; निरुपयोगिता.
**खोडु** (ಖೋಡು) (क) ना.—कुलक्षण; अडचण; नीचगुण.
**खोलि** (ಖೋಲಿ) (सं) ना.—खोली; कमरा; म्यान.
**ख्यात** (ಖ್ಯಾತ) (सं) वि. विख्यात; प्रसिद्ध; नावाजलेला; माहीत झालेला.
  **--क** (ಕ) (सं) वि.—नाव मिळवलेला; प्रसिद्ध असलेला.
  **--गर्हण** (ಗರ್ಹಣ) (सं) ना.—थोरांची निंदा; थोराविषयीं अपप्रचार; कुप्रसिद्धी; परमदुष्टता.
  **--यश** (ಯಶ) (सं) ना.—कीर्तिमान; अतिप्रसिद्ध.
**ख्याति** (ಖ್ಯಾತಿ) (सं) ना.—प्रसिद्धि; नाव लौकिक; यश; प्रशंसा; गौरव; पदवी; कथासंदर्भ; ज्ञान; वस्तुविवेक.
**ख्यापनं** (ಖ್ಯಾಪನಂ) (सं) ना.—प्रशंसा; प्रशस्ति; मानपत्र; प्रशस्तिपत्रक; मिरवणूक.
**ख्येय** (ಖ್ಯೇಯ) (सं) ना.—दिग्दर्शन; निवेदन; व्याकरणांतील आख्येय; विधेय.

## ग

**ग** (ಗ) (सं) ना.—कवर्गातील तिसरें अक्षर.
  (सं) वि.—चालू, प्रवेशणारे; संबंधित; संबंध जोडणारे.
  (सं) ना.—संगीतांतील गांधार स्वर; गंधर्व; गणेश; संगीत.
**गंहर** (ಗಂಹರ) (क) वि.—खोल; अगाध; कृत्रिम; बनावट.
  (सं) ना.—गुहा; यौवन; गवसणी.
**गक्कने** (ಗಕ್ಕನೆ) (क) अ.—एकदम; झटकन; त्वरित; शीघ्र.

**गक्कै** (ಗಕ್ಕೈ) (क) ना.—बकपक्षी.
  **--पाडु** (ಪಾಡು) (क) अ.—अकस्मात्; एकदम; अचानक.
**गगन** (ಗಗನ) (सं) ना.—आकाश; वातावरण; शून्य; स्वर्ग; सूर्य.
  **--अंगने** (ಅಂಗನೆ) (सं) ना.—अप्सरा.
  **--उल्मुक** (ಉಲ್ಮುಕ) (सं) ना.—मंगळग्रह.

—कुसुम (ಕುಸುಮ) (सं) ना.–असंभाव्य गोष्ट; असाध्य विचार; काल्पनिक घटना.
—गति (ಗತಿ) (सं) ना.–देवता; ग्रह; पक्षी; विमान.
—चर (ಚರ) (सं) ना.–पक्षी; सूर्य; देवता; ग्रह; गंधर्व.
—चरि (ಚರಿ) (सं) ना.–गंधर्व स्त्री; खेचरी.
—ध्वज (ಧ್ವಜ) (सं) ना.–ढग; सूर्य.
**गगनगंगे** (ಗಗನಗಂಗೆ) (सं) ना.–देवगंगानदी; स्वर्गंगा.
**गगनचाप** (ಗಗನಚಾಪ) (सं) ना.–इंद्रधनुष्य.
**गगनदरळ्** (ಗಗನದರಳ್) (क) ना.–'गगनकुसुम' पहा.
**गगनमणि** (ಗಗನಮಣಿ) (सं) ना.–सूर्य प्रभाकर.
**गगनलक्ष्मी** (ಗಗನಲಕ್ಷ್ಮಿ) (सं) ना.–आकाशलक्ष्मी.
**गगनलते** (ಗಗನಲತೆ) (सं) ना.–केवळ कल्पनाविलास; असंभव गोष्ट.
**गगनसिंधु** (ಗಗನಸಿಂಧು) (सं) ना.–आकाशगंगा.
**गगनस्थलीरमे** (ಗಗನಸ್ಥಲೀರಮೆ) (सं) ना.–'गगनलक्ष्मी' पहा.
**गगनांगण** (ಗಗನಾಂಗಣ) (सं) ना.–आकाशप्रदेश.
**गगनाध्वग** (ಗಗನಾಧ್ವಗ) (सं) ना.–सूर्य; चंद्र; ग्रह; नक्षत्र; देवता; विमान; पक्षी.
**गगनांबुधि** (ಗಗನಾಂಬುಧಿ) (सं) ना.–आकाश-सागर.
**गगनारविंद** (ಗಗನಾರವಿಂದ) (सं) ना.–'गगनकुसुम' पहा.
**गग्गर (रि)** (ಗಗ್ಗರ [ರಿ]) (सं) ना.–पायांतील पैंजण; घागरी.
**गग्गायि** (ಗಗ್ಗಾಯಿ) (क) ना.–कोवळें फळ; 'कग्गायि' पहा; मिडी; तोर.
**गंग** (ಗಂಗ) (क) ना.–दक्षिणेंतील एक राजघराणें.
**गंगडिकार** (ಗಂಗಡಿಕಾರ) (क) ना.–शूद्र; हीनयाति; गंगवाडी शूद्र.
**गंगसागर** (ಗಂಗಸಾಗರ) (सं) ना.–एक प्रकारची दारू.
**गंगळ** (ಗಂಗಳ) (क) ना. घंगाळ; थाळी; ताटवाटी.
**गंगाभृत्** (ಗಂಗಾಭೃತ್) (सं) ना.–शिव; हिंदी महासागर.
**गंगाल** (ಗಂಗಾಳ) (सं) ना.–भोजनपात्र.
**गंगे** (ಗಂಗೆ)(सं) ना.–गंगानदी.
**गंगेत्तु** (क) ना.–खेळांतील बैल.
**गंगेदोगलु** (ಗಂಗೆದೊಗಲು) (क) ना.–गाईच्या मानेखालील पोळी; गायीच्या मानेखाली लोळणारे कातडे.
**गंगेवालुकसम** (ಗಂಗೆವಾಳುಕಸಮ) (सं) वि.–असंभाव्य; अशक्य.
**गंगोत्रि** (ಗಂಗೋತ್ರಿ) (सं) ना.–गंगेचे उगमस्थान; गंगेचें यात्रास्थळ.
**गंगोल** (ಗಂಗೋಲ) (सं) ना.–गोमेध रत्न.
**गच्चु** (ಗಚ್ಚು) (क) ना.–चुनागच्च; गार; गिलाव्याची माती.
**गच्छ** (ಗಚ್ಛ) (सं) ना.–झाड; गणितांतील साखळी रीती.
**गज** (ಗಜ) (सं) ना.–हत्ती; राक्षस; सुग्रीव सैनिक; शकुनीचा नातलग; वारकाठी; आडव्या आकड्याचा संकेत; एक झाड.
**गजकवळ** (ಗಜಕಬಳ) (सं) ना.–हत्तीचा आहार; वेलफळ; अश्वत्थ वृक्ष; झाडाची साल.
**गजकर्ण** (ಗಜಕರ್ಣ) (क) ना.–खरूज; दद्रु; खाजवून झालेला व्रण.
(सं) ना.–शिव.
**गजग** (ಗಜಗ) (क) ना.–प्राचीन कन्नड महाकवि; गजगा; सागरगोटा.
**गजगमन** } (ಗಜಗಮನ)
**गजगति** } (ಗಜಗತಿ) (सं) ना.–हत्तीप्रमाणें मंद डौलदार चाल; इंद्र; मंदगामी स्त्री; मदगमना स्त्री.
**गजगमने** (ಗಜಗಮನೆ)(सं) ना.–गजगामिनी; मदगमना स्त्री.
**गजगलिसु** (ಗಜಗಲಿಸು) (क) धा.–चकाकणें; प्रकाशणें; प्रज्वलित करणें.
**गजचर्मधारि** (ಗಜಚರ್ಮಧಾರಿ) (सं) ना.–हत्तीचें कातडें पांघरणारा शिव.
**गज(जा)जीव** (ಗಜ [ಜಾ] ಜೀವ) (सं) ना.–सेवक; माहुत.
**गजते** (ಗಜತೆ) (सं) ना.–हत्तीचा कळप.
**गजदंत** (ಗಜದಂತ) (सं) ना.–गणपति; हस्तिदंत
**गजदान** (ಗಜದಾನ) (सं) ना.–हत्तीचे दान; हत्तीचा मदस्राव.
**गजदानव** ಗಜದಾನವ) (सं) ना.–गजासुर.
**गजदुळि** (ಗಜದುಳಿ) (सं) ना.–हत्तीचें बळ असणारा.
**गजनि** (ಗಜನಿ) (सं) ना.–विपुल भातपिकी जमीन.
**गजनिमीलिके (का)** (ಗಜನಿಮೀಲಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना.–अल्पनिद्रा; डुलकी; जागृत; झोप.
**गजपति** (ಗಜಪತಿ) (सं) ना.–राजबिरूद; राजाचा हत्ति.
**गजपुर** (ಗಜಪುರ) (सं) ना.–हस्तिनापूर; पांडवांची राजधानी.
**गजबंधन (नि)** (ಗಜಬಂಧನ [ನಿ]) (सं) ना.–हत्ती बांधण्याची जागा; हत्तीखाना.
**गजबिंदु** (ಗಜಬಿಂದು) (सं) ना.–अंगावरील शिबें; हत्तीच्या पाठीवरील ठिपके; पद्मकला.
**गजभक्षक** (ಗಜಭಕ್ಷಕ) (सं) ना.–'गजकवळ' पहा.
**गजमुख** (ಗಜಮುಖ) (सं) ना.–गणपति; गजानन.
**गजरगळे** (ಗಜರಗಳೆ) (क) ना.–चकाट्या; गप्पासप्पा.
**गजराज** (ಗಜರಾಜ) (सं) ना.–ऐरावत; मोठा हत्ती.
**गजरु** (ಗಜರು) (क) धा.–गर्जना करणें; शिवीगाळ करणें; भिवविणें.
(क) ना.–गर्जना; भीति.
**गजवदन** (ಗಜವದನ) (सं) ना.–गणपति; गजानन.

**गजलक्ष्मि** (ಗಜಲಕ್ಷ್ಮಿ) (सं) ना.—अपारसंपत्ति; गजांतलक्ष्मी.
**गजवैरि** (ಗಜವೈರಿ) (सं) ना.—गजारि; सिंह; गजासुरशत्रु; शिव.
**गजहस्त** (ಗಜಹಸ್ತ) (सं) ना.—हत्तीची सोंड.
**गजांतलक्ष्मि** (ಗಜಾಂತಲಕ್ಷ್ಮಿ) (सं) ना.—दारी हत्ती झुलत राहण्याएवढी संपत्ति.
**गजाराति** (ಗಜಾರಾತಿ) (सं) ना.—सिंह.
**गजासुर** (ಗಜಾಸುರ) (सं) ना.—' गजदानव ' पहा.
**गजारूढ (रोह)**(ಗಜಾರೂಢ[ರೋಹ]) (सं) ना.—हत्तीस्वार; माहूत; हत्तीवर आरोहण करणारा.
**गजालु** (ಗಜಾಲು (क) ना.—गोंधळ; गडबड; व्यर्थ गप्पा; ओरड; गायिका.
**गजुग (जग)** (ಗಜುಗ [ಜಗ]) (क)ना.—मुलांच्या खेळातील वस्तु; गजगा; नेत्ररोग; सारा.
**गजे** (ಗಜೆ) (क) ना.—गदा; मुद्गल.
**गजोत्कर** (ಗಜೋತ್ಕರ) (सं) ना.—हत्तीचा कळप.
**गज्जे** (ಗಜ್ಜೆ) (क) ना.—घुंगुर; चाळ; खुळखुळा.
**गंज** (ಗಂಜ) (सं) ना.—भांडार; ओंजळ खजिना; दारूचा गुत्ता; खाण; कणगी; तिरस्कार; द्वेष.
**गंजणि (ळि)** (ಗಂಜಣಿ [ಳಿ]) (क) ना.—कुसवळ गवत; गांजणगवत; कांटे.
**गंजन** (ಗಂಜನ) (क) ना.—अपमानाचा बळी; अपमान; अपयश; पराजय; तिरस्कार.
**गंजळ (ल)** (ಗಂಜಳ [ಲ]) (क) ना.—गांजणगवत; पशूंचें मूत्र.
**गंजा** (ಗಂಜಾ) (क) ना.—झोंपडी; बिऱ्हाड; पाणी पिण्याचें भांडें.
**गंजि** (ಗಂಜಿ) (क) ना.—गंजी; गव्हातांदळाचें गोडवणी.
**गंजिका** (ಗಂಜಿಕಾ) (सं) ना.—धर्मशाळा; पथिकाश्रम; गुत्ता.
**गट** (ಗಟ) (सं) ना.—घट; घागर; मृत्तिकापात्र; गटगट असा आवाज.
**गट्ट** (ಗಟ್ಟ) (क) ना.—घाट; पर्वतावलि; टेकड्यांची रांग.
**गट्टणे** (ಗಟ್ಟಣೆ) (क) ना.—मार; चोप; आपटी; दृढबंधन; आवळून करकचीत बंधन.
**गट्टि** (ಗಟ್ಟಿ) (क) वि.—बलिष्ठ; चपल; बल; घन; दृढ.
(क) ना.—खडबडीतपणा; घनीबंधन; शक्ति; योग्यता; स्थिरता; घनता; कर्कशपणा; चापल्य; सुगंध; विनयशीलता; सौंदर्य.
**गट्टिग** (ಗಟ್ಟಿಗ) (क) ना.—बलवंत; साहसी; धारिष्टवान.
**गट्टितन** (ಗಟ್ಟಿತನ) (क) ना.—बुद्धिमानता; चातुर्य; धैर्य; साहस; कौशल्य.
**गट्टिवळित, (ळिति)** (ಗಟ್ಟಿವಳಿತ [ಳಿತಿ]) (क) ना.—सुगंधी द्रव्यलेपन करणारी स्त्री.
**गट्टिसु** (ಗಟ್ಟಿಸು) (क) धा.—प्रयत्न करणें; ठासून सांगणें; घट्ट करणें; चोपणें; मारणें.
**गट्टु** (ಗಟ್ಟು) (क) ना.—घाट; धक्का; सागरतीर; नदीकिनारा.
**गड** (ಗಡ) (क) अ.—' गळ ' उपसर्गात्मक अव्यय; नव्हे का ? पाहिलेंस का ? सहज खरोखर; घाईनें; तीव्रतेनें.
(क) ना.—किल्ला; दुर्ग; गढ; सीमा; निश्चितता.
(सं) ना.—लाट; तरंग; पडदा; कुंपन; विघ्न; खंदक; एक सोनेरी मासा.
**गडगडे** (ಗಡಗಡೆ) (क) ना.—पाणी ओढण्याचा गडगडा; चाक; रहाट.
**गडचु (सु)** } (ಗಡಚು [ಸು]) (क) ना.—घट्टपणा;
**गड्सु** } (ಗಡಸು) कठीणता; जाडी; ओबडधोबडपणा; कर्कशता; भार; ओझें.
**गडण** (ಗಡಣ) (सं) ना.—समूह; रास; ढीग.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.—शिरणें; एकत्रित होणें; रास करणें; जुळवून घेणें; सिद्ध होणें; संबंध येणें.
**गडणे** (ಗಡಣೆ) (क) ना.—गायन; उद्देश; अर्थ; काल; गाणें; पाहण्यायोग्य; निरीक्षणीय; चिंता; मोजणी.
—**गोळ्** (ಗೊಳ್) (क) धा.—लक्ष देणें; दृष्टोत्पत्तीस येणें; दिसणें.
**गडद् (डु)** (ಗಡದ [ದು]) (क) वि.—दाट; जाड; घट्ट; स्थूल.
(क) ना.—ध्वनि; खोली; अतिशयता; आधिक्य.
**गडपु** (ಗಡಪು) (सं-दे) ना.—गडप; लपवालपवी; दृष्टिआड.
**गडबड** (ಗಡಬಡ) (क) ना.—घाई; गोंधळ; घाबरेपणा; अस्थिरता; चांचल्य.
**गडयंत** (ಗಡಯುಂತ) (क) ना.—ढग; मेघ.
**गडव** (ಗಡವ) (क) ना.—हुप्या; कोडगा; नरवानर.
**गडसु** (ಗಡಸು) (क) ना.—पौरुष; स्थूलता; लठ्ठपणा.
**गडह** (ಗಡಹ) (क) ना.—दाराचा खालचा भाग; उमरठा.
**गडा** (ಗಡಾ) (क) अ.—पाहिलेस का ? होय ना ? नव्हे का ?
**गडाइसु** (ಗಡಾಯಿಸು) (क) धा.—गाडणें; रोवणे; पुरणें; घडविणें.
(क) ना.—सीमादगड; बांधाचा दगड.
**गडारि** (ಗಡಾರಿ) (क) ना.—लोखंडी कांब; पहार.
**गडावणे** (ಗಡಾವಣೆ) (क) ना.—गडगडाट; शंख; गोंधळ; संभ्रम; मोठा आवाज.
**गडि** (ಗಡಿ) (क) ना.—मर्यादा; सीमा; मिति; अवधि; लहान किल्ला; अडचण; खांब; कोल्हेकुई; राष्ट्राची सीमा; सरहद्द, वास; गळति; घडि; घटिका.
**गडि (ड) गे** (ಗಡಿ [ಡ]ಗೆ) (क) ना.—घटका; घागर; जलपात्र; कुंभ; मडके; घट.

**गडिबिडि** (ಗಡಿಬಿಡಿ) (क) ना.–गडबड; घाई; चापल्य; घाबरेपणा; अधीरता.

**गडियर** (ಗಡಿಯಾರ) (क) घड्याळ; घटिका यंत्र; कालदर्शक यंत्र.

**गडु** (ಗಡು) (क) ना. समय; करार; नियमित; अवधि; मर्यादा. (सं) ना. प्रक्षित साहित्य; शल्य; शूल; पाण्याचें भांडें; गडू; कुबड.

**गडुक** (ಗಡುಕ) (सं) ना.–पाण्याचें भांडें; गडवा; हाताची नखें.

**गडुतर** (ಗಡುತರ) (क) वि. जड; स्थूल; धड धाकट; लठ्ठ; मस्त.

**गडुल (र)** (ಗಡುಲ [ರ]) (क) वि.–कुबड्या; वाकलेला; कुबड असलेला.

(क) ना.–मेंढी; शेळी.

**गडुसरि** (ಗಡುಸರಿ) (क) वि.–स्थूलकाय; गलेलठ्ठ; फोपसा; ढेऱ्या.

**गडुसु** (ಗಡುಸು) (क) वि.–खडबडीत; ओबडधोबड; कर्कश; कठीण.

(क) ना.–सुताची गुडी; सुताची गाठ; घसडी.

**गडे** (ಗಡೆ) (क) ना.–चिवा; वेळु; लोखंडी कांब; तारतम्य; समता; गडगडा.

**गडेकर** (ಗಡೆಕಾರ) (क) ना.–हत्तीवरील निशाण धरणारा; नाविक; डोंब.

**गडगडे** (ಗಡೆಗಡೆ) (क) ना.–गडगडा; रहाट; चाक.

**गड्ड** (ಗಡ್ಡ) (क) ना.–दाढी; दाढीचे केस.

**गड्डरिका (के)** (ಗಡ್ಡರಿಕಾ [ಕೆ]) (क) ना.–मेंढी; शेळी; प्रवाह; पाट; अजागति; विचार न करतां मेंढीप्रमाणें मागून जाणें.

**गड्डे** (ಗಡ್ಡೆ) (क) ना.–कंदमूल; विरजण; सोपा; रवि; कानाचा; गड्डा; कर्णमूल; द्वीप; मध्य; नदीतीर; १० दस्तें कागद.

**—कट्टु** (ಕಟ್ಟು) (क) धा.–घट्ट होणें; विरजणें.

**गण** (ಗಣ) (सं) ना.–समूह; रास; पक्ष; बाजू; धर्मपंथ; गुणगुण; छांदस मात्रावर्तन; संख्या; मांडी; जंघा; सैन्यविभाग; अक्षौहिणीचा भाग; ओवा; अजवान; प्रजा; जनस्तोम; गणपति; सोबती; सहयात्री; बाजारबुणगे.

**गणकार** (ಗಣಕಾರ) (क) ना.–गणती करणारा; भीमसेन.

**गणपीठक** (ಗಣಪೀಠಕ) (क) ना.–हृदय; हृदयस्पंदन.

**गणक** (ಗಣಕ) (सं) ना.–जोशी; ज्योतिषी; गणितज्ञ; हिशेबनीस;

**गणकी** (ಗಣಕಿ) (सं) ना.–ज्योतिष्याची पत्नि; ज्योतिषीण.

**गणकयंत्र** (ಗಣಕಯಂತ್ರ) (सं) ना.–गणित करणारें यंत्र.

**गणजिले** (ಗಣಜಿಲೆ) (क) ना.–वारेफोड्या; गोवर; देवीरोगाचा प्रकार.

**गणजे** (ಗಣಜೆ) (सं) ना.–हरिण; गंधर्व; शरभ.

**गणति (न) (ने)** (ಗಣತಿ [ನ] ನೆ) (सं) ना.–मोजमाप; हिशोब; परिगणना; आलोचन.

**गणदेवते** (ಗಣದೇವತೆ) (सं) ना.–शंकराचे गण; उपदेवता; गणदेवता.

**गणद्रव्य** (ಗಣದ್ರವ್ಯ) (सं) ना.–सार्वजनिक संपत्ति.

**गणनातीत** (ಗಣನಾತೀತ) (सं) वि.–असंख्य; अगणित; अमोज.

**गणनायिका** (ಗಣನಾಯಿಕಾ) (सं) ना.–दुर्गादेवी.

**गणनीय** (ಗಣನೀಯ) (सं) वि.–मोजतां येण्याजोगें; परिमित; सन्मान्य; वंद्य; पूजनीय.

**गणराज्य** (ಗಣರಾಜ್ಯ) (सं) ना.–प्रजातंत्रराज्य; लोकशाही; प्रजेच्या तंत्रानें चालणारें राज्य.

**गणरात्र** (ಗಣರಾತ್ರ) (सं) अ.–अनेक रात्रीपर्यंत; रात्रानुरात्र.

**गणरूप** (ಗಣರೂಪ) (सं) ना.–'एक्के' पहा, अर्काचें झाड; रूईचें झाड.

**गणलु** (ಗಣಲು) (क) ना.–चिवा; बोटाचे पेर; कांड; उसाचा डोळा.

**गणाचल** (ಗಣಾಚಲ) (सं) ना.–कैलासपर्वत.

**गणाधिक** (ಗಣಾಧಿಕ)<br>**गणाधीश्वर** (ಗಣಾಧೀಶ್ವರ) (सं) ना.–गणपति; शिव; संघनायक.

**गणि** (ಗಣಿ) (क) ना.–खाण; खनि.

(सं) ना.–मोजणी; हिशोब; गट असलेला; संघ असलेला.

**गणिका (के)** (ಗಣಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–वेश्या; विधवा; हत्तीण; हत्तीचें पिलूं; एक प्रकारचें फूल; देवदासी; नर्तकी.

**गणिसु** (ಗಣಿಸು) (क) धा.–मोजणें; हिशोब करणें; मानणें; मनावर घेणें; आदरणें.

**गणे** (ಗಣೆ) डोंबारी ज्यावर चढतो तो वेळु; नाव चालवण्याचा चिवा.

**—गार** (—ಗಾರ) (क) ना.–डोंबारी; नाविक;

**गणेरु** (ಗಣೇರು) (क) ना.–कर्णिकार; कण्हेर; वेश्या; कुंटिणी; दासी; घास; कवळ.

**गंटल्(लु)** (ಗಂಟಲ್ [ಲು]) (क) ना.–गळा; नरडें; कंठनाल; ध्वनि.

**गंटि** (ಗಂಟಿ) (क) ना.–गाठ; कुंडल; प्राणी; रुद्र; ब्रह्म.

**गंटिके** (ಗಂಟಿಕೆ) (क) ना.–गांठ; गुंता; गुतवळ.

**गंटु** (ಗಂಟು) (क) ना.–गांठ; ग्रंथि; बंधन; मोट; द्रव्य; संपत्ति; भांडवल; शरीराचा सांधा; गंडमाळ; गुल्म प्लेगाची गांठ; संबंध.

**—इक्कु** (ಇಕ್ಕು) (क) धा–गाठ मारणें; तुरुंगांत घालणें; बंधनांत टाकणें; जमविणें; सोयरीक करणें.

—**कोय्क** (ಕೊಯ್ಕ) (क) ना.—व्यापारांतील भांडवलच खाणारा.
—**बीळु** (ಬೀಳು) (क) धा.—गाठ पडणें; मैत्री जडणें; संबंध येणें; पीडेप्रमाणें मार्गे लागणें.
—**मोरे** (ಮೋರೆ) (क) ना.—आठ्या पडलेला चेहरा; दुर्मुखलेली चर्या.
—**लगामु** (ಲಗಾಮು) (क) धा.—काटेरी लगाम; (तुंड कुदरिगे गंट लगामु)
—**हाकु** (ಹಾಕು) (क) धा.—पैसा साठविणें; गुंतवणें; पैसा खाणें; संबंध आणणें.
**गंटे** (ಗಂಟೆ) (क) ना.—घंटा; समय; वेळ.
—**कायक** (ಕಾಯಕ) (क) ना.—घंटा वाजवून पोट भरणारा जंगम वर्ग.
**गंड** (ಗಂಡ) (क) ना.—पति; मालक; यजमान; वांड; शूर. (सं) ना.—गंडांतर; ग्रहपीडा; गंडस्थल; करट; ग्रहकंटक; संधि; जखम.
—**गर्व** (ಗರ್ವ) (क) ना.— दुरभिमान; खोटा अभिमान; दुराग्रह.
—**मत्सर** (ಮತ್ಸರ) (क) ना.—अतिद्वेष.
—**वसन** (ವಸನ) (क) ना.—उत्तम वस्त्र; तलम कापड.
**गंडक** (ಗಂಡಕ) (क) ना.—'खड्गमृग' पहा.
**गंडकि (की)** (ಗಂಡಕಿ [ಕೀ]) (सं) ना.—गंगेची उपनदी; गंडकी नदी.
—**शिले** (ಶಿಲೆ) (सं) ना.—शाळीग्राम; गंडकी नदीतील शिला.
**गंड (डु) गाडि** (ಗಂಡ [ಡು] ಗಾಡಿ) (क) ना.—पौरुष; वेषभूषण; वीरत्व.
**गंड भेरुंड** (ಗಂಡ ಭೇರುಂಡ) (सं) ना. दोन डोक्यांचा पक्षी; म्हैसूर राज्याचें ध्वजचिन्ह.
**गंडमाले** (ಗಂಡಮಾಲೆ) (सं) ना.—गंडमाळा; गुल्म.
**गंडवुत** (ಗಂಡವುತ) (क) ना.—हरिणविशेष; हरिणांचा कळप.
**गंडशैल** (ಗಂಡಶೈಲ) (क) ना.—पर्वतावरून गडगडत आलेला दगड.
**गंडसु** (ಗಂಡಸು) (क) ना.—पुरुष; पुत्ररत्न.
**गंडस्थल** (ಗಂಡಸ್ಥಳ) (सं) ना—करट; हत्तीचें गंडस्थळ.
**गंडागुंडि** (ಗಂಡಾಗುಂಡಿ) (क) ना.—अव्यवस्था; अवांतर; सटरफटर; अन्यायाचें भांडण; वितंडन; उकरून भांडण.
**गंडाडि** (ಗಂಡಾಡಿ) (क) ना.—साहसी वीर; आपत्तींशी झगडणारा; सत्त्वधीर.
**गंडांतर** (ಗಂಡಾಂತರ) (सं) ना.—विपत्ति; संकट; भीति.
**गंडि** (ಗಂಡಿ) (क) ना.—जकात घेणारा कारकून; किल्ल्याची चोरवाट; भूयारी रस्ता;
**गंडिग** (ಗಂಡಿಗ) (क) वि.—समर्थ; साहसी; शूर.
**गंडीर** (ಗಂಡೀರ) (क) ना.—वीर; नायक; शौर्यशाली.
**गंडु** (ಗಂಡು) (क) ना.—बल; पौरुष; मोठेपणा; सामर्थ्य; धीटता; वीर पुरुष.
**गंडुगलि** (ಗಂಡುಗಲಿ) (क) ना.—वीर; बलशाली मनुष्य.
**गंडुगच्चे** (ಗಂಡುಗಚ್ಚೆ) (क) ना.—वीरानें घालण्याचा कासोटा; पचंग; काचा.
**गंडुगाडि** (ಗಂಡುಗಾಡಿ) (क) ना.—वीरवेश; वीराचें चलनवलन; शूराची हालचाल; वीरावेश.
**गंडुगिडु** (ಗಂಡುಗಿಡು) (क) धा.—शक्ति घालविणें; पौरुषहीन होणें.
**गंडुकेलस** (ಗಂಡುಕೆಲಸ) (क) ना.—साहस; धीट वर्तन; पौरुष.
**गंडुगोडलि** (ಗಂಡುಗೊಡಲಿ) (क) ना.—परशु; फरशी; हात-कुऱ्हाड; परशुरामाचे आयुध.
**गंडुगोळ्** (ಗಂಡುಗೊಳ್) (क) धा.—धैर्य धरणें; साहस करणें.
**गंडुडे** (ಗಂಡುಡೆ) (क) ना.—वीरवेष; कवच; पुरुषी पेहराव.
**गंडुदोरे** (ಗಂಡುದೊರೆ) (क) धा.—धीर सोडणें; दुर्बल होणें; पौरुषहीन होणें.
(क) ना.—नद; (सिंधु; ब्रह्मपुत्रा वगैरे नद.)
**गंडुस** (ಗಂಡುಸ) (क) ना.—दीर.
**गंडसूळे** (ಗಂಡುಸೂಳೆ) (क) ना.—चतुर वेश्या.
**गंडू** (ಗಂಡೂ) (सं) ना.—उशी; गाठ; मिळकत; तेल.
**गंडूपद** (ಗಂಡೂಪದ) (सं) ना.—काडू; आमिष; गांडूळ.
**गंडूष (षे)** (ಗಂಡೂಷ [ಷೆ]) (सं) ना. चूळ; पाण्याचा घोट.
**गण्ण** (ಗಣ್ಣ) (क) ना.—भाताचा गादा.
**गण्णु** (ಗಣ್ಣು) (क) ना.—एक लहान माप; बोटाचें पेर; धाटाचें पेर; कांड.
**गण्य** (ಗಣ್ಯ) (सं) वि.—मान्य; मोजण्यायोग्य; गौरवास्पद; गणनीय.
**गत** (ಗತ) (सं) वि.—होऊन गेलेले; घालविलेलें; संपलेलें; दूर गेलेले; नियुक्त; न दिसणाऱ्या; अवस्थेला पोचलेलें.
(सं) ना.—वेग; स्थिति; अवस्था; घटना; गति; चाल.
**गतक** (ಗತಕ) (सं) वि.—कृतक; कृत्रिम; फसव्या; घातक.
**गतकांति** (ಗತಕಾಂತಿ) (सं) वि.—कांतिहीन; वैभवहीन.
**गतगोष्ठि** (ಗತಗೋಷ್ಠಿ) (सं) ना.—झाल्यागेल्या गोष्टी; झालेला प्रकार.
**गत तेजस** (ಗತ ತೇಜಸ್) (सं) ना.—'गतकांति' पहा.
**गतप्रत्यागत** (ಗತಪ್ರತ್ಯಾಗತ) (सं) ना.—आले गेले; आद्यंत; अस्थिर वृत्ति; सतारीची गत; अनुलोम प्रतिलोम.
**गतप्राण** (ಗತಪ್ರಾಣ) (सं) ना.—मृत्यु; मरण; समीपता.
**गतवर्ष** (ಗತವರ್ಷ) (सं) ना.—गेले वर्ष; गुदस्ता.

**गताक्ष** (ಗತಾಕ್ಷ) (सं) वि.—अंधळा; डोळे गेलेला.

**गतागत** (ಗತಾಗತ) (सं) ना.—आलेगेलेले; ये-जा; परंपरा; ग्रहगतीची अव्यवस्था.

**गतानुगतिक** (ಗತಾನುಗತಿಕ) (सं) ना.—मागीलप्रमाणें; पुढें चालवणारा; अनुकरण; एखाद्याचें अनुसरण.

**गताब्द** (ಗತಾಬ್ದ) (सं)—'गतवर्ष' पहा.

**गतायु** (ಗತಾಯು) (सं) वि.—वृद्ध; म्हातारा; दिवस झालेला.

**गतार्तव** (ಗತಾರ್ತವ) (सं) वि.—विटाळ गेलेली; वांझ.

**गतार्थ** (ಗತಾರ್ಥ) (सं) वि.—निराश झालेला; निर्धन.

**गतासु** (ಗತಾಸು) (सं) वि.—गतप्राण; मृत.

**गति** (ಗತಿ) (सं) ना.—चलन; बरीवाईट स्थिति; अवस्था; अभिवृद्धि; मार्ग; प्रगति; मोक्ष; पाप; उपाय; नर्तनगति; आश्रय; समजूत; यात्रा; वेग; मिरवणूक; सुख; ग्रहगति; क्रांति.

**—किडु (केडु)** (ಕಿಡು [ಕೆಡು]) (क) धा.—हीन स्थितीला येणें; निराधार होणें; दुःखी होणें.

**—की (के) डिसु** (ಕೀ [ಕೆ] ಡಿಸು) (क) धा.—नाश करणें.

**—के (गे) डि** (ಕೇ [ಗೇ] ಡಿ) (क) वि.—दुर्दैवी; दरिद्रि; हीनगति; अगतिक.

**—कोडु** (ಕೊಡು) (क) धा.—पुढें चालविणें; चालू लागणें.

**—पडे** (ಪಡೆ) (क) धा.—चालविणें; सुखी होणें; मोक्ष मिळविणें.

**—भंग** (ಭಂಗ) (सं) ना.—दिशाभूल; तालभंग; वाट चुकणें; दिङ्मूढता.

**गतिबंधन** (ಗತಿಬಂಧನ) (सं) ना.—वेगावरील ताबा.

**गतिलाघव** (ಗತಿಲಾಘವ) (सं) ना.—मंदचाल; नाजूक चाल.

**गतिसु** (ಗತಿಸು) (क) धा.—चालविणें; जाणें; मरणें; कालक्षेप करणें.

**गतिस्तंभ** (ಗತಿಸ್ತಂಭ) (सं) ना.—गतिरोध; वेगनिरोध; वाट रोकणें; गतिस्तंभन.

**गत्तु** (ಗತ್ತು) (अ-दे) ना.—गत; संगीतांतील लय; धोरण; रीत; नृत्यपद्धति.

**—गार** (ಗಾರ) (क) ना.—कालानुवर्ती; उपाय जाणणारा; युक्तिबाज; ठक.

**—गारिके** (ಗಾರಿಕೆ) (क) ना.—समयानुसंधान; योग्य उपायानें कार्यसिद्धि.

**गत्यंतर** (ಗತ್ಯಂತರ) (सं) ना.—भिन्न उपाय; अन्य युक्ति; दुसरा मार्ग; वेगळा आश्रय.

**गत्वर** (ಗತ್ವರ) (सं) ना.—नाश; अधिक्षेप; फेक; हानी; नुकसान; तोटा.

**गद** (ಗದ) (सं) ना.—रोग; वचन; वाक्य; विष; थरकांप; कापरें; एक यादव.

**गदक** (ಗದಕ) (क) ना.—कपट; कुतक; फसवणूक.

**गदकि** (ಗದಕಿ) (क) कपटी; फसव्या; वंचक.

**गदगदिसु** (ಗದಗದಿಸು) (क) धा.—गद्गद आवाज करणें; कांपणें; कापरें भरणें; दुःखोद्गार काढणें.

**गद (दु) गु** (ಗದ [ದು] ಗು) (क) ना.—गदगशहर; येथील वीर नारायणाच्या देवळांत कुमारव्यासानें वीर भारत लिहिल्याचें सांगतात.

**—ग** (ಗ) (क) ना.—पशुमूत्राची दुर्गंधी; शेळयामेंढ्यांचा उग्र दर्प; मिरची किंवा तंबाखु जळल्याचा खाट; दुर्गंधी; गंज; जंग;

**गदडु** (ಗದಡು) } औषधी द्रव्याचा दर्प; केरवचरा. (क) धा.—कळकणें; घाण करणें.

**गदरु** (ಗದರು) (क) धा. गर्जणें; भिवविणें; किंचाळणें; घोषणा करणें.

(क) ना.—हरळी; हळ्ळी; हाक; घोषणा.

**—इसु** (ಇಸು) (क) धा.—'ओरडणें; किंचाळणें; भिवविणें;

**गदा** (ಗದಾ) (सं) ना.—गदा; मुद्गर; एक आयुध.

**गदाग्रज** (ಗದಾಗ್ರಜ) (सं) ना.—गदाचा म्हणजे गदाधराचा भाऊ; श्रीकृष्ण.

**गदादंड** (ಗದಾದಂಡ) (सं) ना.—भीमाची गदा, जायफळ; पत्री

**गदाधर** (ಗದಾಧರ) (सं) ना.—श्रीकृष्ण.

**गदांबर** (ಗದಾಂಬರ) (सं) ना.—ढग; मेघ.

**गदि** (ಗದಿ) (सं) ना.—गदाधारी विष्णु; रोगी; रुग्ण.

**गदित** (ಗದಿತ) (सं) वि.—बोललेलें; शब्दांकित केलेलें; आश्वासलेलें.

**गदु (दुबु)** (ಗದು [ದುಬು]) (क) ना.—सूज; फूग; गांदड; दान.

**गदेगोळ** (ಗದೆಗೊಳ್) (क) धा.—गदा पेलणें; गदा उगारणें.

**गदोत्कर** (ಗದೋತ್ಕರ) (सं) ना.—अरिष्ट; व्याधी; दुखणें.

**गद्गद** (ಗದ್ಗದ) (सं) वि.—दुःखानें भारावलेला; कंपित स्वराचा.

**—कंठ** (ಕಂಠ) (सं) ना.—दुःखध्वनि, कंपितस्वर.

**गद्द** (ಗದ್ದ) (क) ना.—दाढी; दाढीचे केस; हनुवटी; चिबुक.

**गद्दण** (ಗದ್ದಣ) (क) ना.—कमी किंमतीचें तांब्याचें नाणें; सोन्याचें लहान नाणें.

**गद्दरिसु** (ಗದ್ದರಿಸು) (क) धा.—वाघसिंहाप्रमाणें ओरडणें; डरकाळी फोडणें; सुजणें; गोवर येणें; गर्जना करणें.

**गद्दल** (ಗದ್ದಲ) (क) ना.—गोंधळ, संभ्रम; कोलाहल: उसाभर; अस्पष्ट उच्चध्वनि.

**गद्दि (द्दु) गे** (ಗದ್ದಿ [ದ್ದು] ಗೆ) (क) ना.—सिंहासन; पाट; कट्टा; चौथरा; गादी; पीठ; समाधि.

**गद्दे** (ಗದ್ದೆ) (क) ना.—भातशेत, गादा; जमीन; क्षेत्र.

**गद्य** (ಗದ್ಯ) (सं) ना.—बोलीभाषेतील साहित्य.

—साहित्य (ಸಾಹಿತ್ಯ) (सं) ना.–कथाकादंबरी वगैरेचें लेखन.

गद्यपद्यात्मक (ಗದ್ಯಪದ್ಯಾತ್ಮಕ) (सं) ना.–चंपू; नाटक; प्रबंध वगैरे गद्यपद्य साहित्य.

गद्याण (न) (ಗದ್ಯಾಣ [ನ]) (सं) ना.–'गद्दण' पहा.

गन (ಗನ) (क) वि.–घन; घट्ट; भरीव; मोठे ढग, 'घन' पहा.

गनह (ಗನಹ) (सं) ना.–शिव; ब्राह्मण; महात्म्य.

गनि (ಗನಿ) (क) ना.–खाण; खनि.

गनीम (ಗನೀಮು) (अ. दे) ना.–वैरी; सार्वत्रिक शत्रु.

गने (ಗನೆ) (क) धा.–गर्जना करणें; ओरडणें.

गंति (ಗಂತಿ) (क) ना.–ग्रंथि; गाठ; आवाळु; 'गड्डे' पहा.

गंतु (ಗಂತು) (सं) ना.–गंतृ; जाणारा; यात्रिक; पथिक; वाटसरू; हालचाल; नर्तन; पथ; मार्ग; हास्यविनोद. 'कुलित' पहा.

गंतुकाम (ಗಂತುಕಾಮ) (सं) ना.–जाण्याची इच्छा करणारा.

गंतृ (ಗಂತೃ) (सं) ना.–'गंतु' पहा.

गंत्री (ಗಂತ್ರೀ) (सं) ना.–बैलजोडी; स्त्रीसंयोग; फेक.

गंद (ಗಂದ) (अ. दे) ना.–गंध; सुवास; चंदनवृक्ष; एक जातीचा दगड; स्वभाव; अहंकार; गर्व; स्वत्व.

गंदकस्तुरि (ಗಂದಕಸ್ತುರಿ) (सं) ना.–गंध आणि कस्तुरी; सुगंधी द्रव्य.

गंद्र (ಗಂದರ) (क) ना.–गंधर्व; एक देवजाति.

गंदरगिविय (ಗಂದರಗಿವಿಯ) (क) ना.–गानलुब्ध शिव; गंधर्वाचें गाणें.

गंदा (दी) (दें) (ಗಂದಾ [ದೀ] [ದೆ]) (अ. दे) वि.–घाण; कुजलेलें; दुर्गंधित.

गंदि (ಗಂದಿ) (क) ना.–पित्त; मांस; वायुयुक्तता; ब्रह्म.

गंदिग (ಗಂದಿಗ) (क) ना.–कुंटिणी; सुगंधी द्रव्यें विकणारा; गंधी.

गंदिगे (ಗಂದಿಗೆ)(क) ना.–औषधी दुकान.

गंधक (ಗಂಧಕ) (सं) ना.–गंधक द्रव्य.

—धृति (द्रावक) (ಧೃತಿ [ದ್ರಾವಕ]) (सं) ना.–तेजाब; गंधकाल

गंधकरसायन (ಗಂಧಕರಸಾಯನ) (सं) ना.–रक्तशुद्धीवर गंधक मिश्रितऔषध.

गंधका (कालि) (ಗಂಧಕಾ [ಕಾಲಿ]) (सं) ना.–व्यासमाता; सत्यवती.

गंधद्वीप (हस्ति) (ಗಂಧದ್ವೀಪ [ಹಸ್ತಿ]) (सं) ना.–उत्तम जातीचा हत्ती.

गंधन (ಗಂಧನ) (सं) ना.–अविश्रांत परिश्रम; हट्ट; साधना; प्रगटण.

गंधनकुल (ಗಂಧನಕುಲ) (सं) ना.–मुंगुस; ऊदमांजर; चिचुंद्री.

गंधनालि (लिका) (ಗಂಧನಾಲಿ[ಲಿಕಾ]) (सं) ना.–नाक; नासिका; घ्राणेंद्रिय.

गंधमादन (ಗಂಧಮಾದನ) (सं) ना.–गंधक; मेरुपर्वताजवळील सुगंधी पर्वत; मलयपर्वत.

—मादनी (ಮಾದನೀ) (सं) ना.–उच्च प्रतीचें मद्य.

—मादिनि (ಮಾದಿನೀ) (सं) ना.–अगरु; चंदन.

गंधमार्जाल (र) (ಗಂಧಮಾರ್ಜಾಲ) (ಗಂಧಮಾರ್ಜಾರ) (सं) ना.–ऊद; सुगंध सोडणारें मांजर.

गंधमाल्य (ಗಂಧಮಾಲ್ಯ) (सं) ना.–सुवासिक फुलमाळ; सुगंधी द्रव्य व फुलें यांनीं केलेली सत्कारपूजा.

गंधमूषिके (ಗಂಧಮೂಷಿಕೆ) (सं) ना.–चुचुंद्री.

गंधर्वविवाह (ಗಂಧರ್ವವಿವಾಹ) (सं) ना.–हिंदुविवाह-पद्धतींतील एक प्रकार; प्रेमविवाह.

गंधर्ववेद (ಗಂಧರ್ವವೇದ) (सं) ना.–सामवेद; संगीतशास्त्र; भरतशास्त्र.

गंधवति (ಗಂಧವತಿ) (सं) ना.–भूमि; मोगरीची एक जात; व्यासमाता; वायुवरुणांचे शहर; मद्य; सुगंधी द्रव्य; गंधक.

गंधवह (वाह) (ಗಂಧವಹ [ವಾಹ]) (सं) ना.–वारा; सुगंध; दरवळणारा वायु.

गंधवहे (ಗಂಧವಹೆ) (सं) ना.–वास घेणारें इंद्रिय; नाक; घ्राणेंद्रिय.

गंधसिंधूर (ಗಂಧಸಿಂಧೂರ) (सं) ना.–माजलेला हत्ती; मदस्राव होणारा हत्ती.

गंधहारिका (ಗಂಧಹಾರಿಕಾ)
गंधकारिका (ಗಂಧಕಾರಿಕಾ) (सं) ना.–सुगंधी द्रव्यें करून देणारी दासी.

गंधाक्षते (ಗಂಧಾಕ್ಷತೆ) (सं) ना.–मंगलाक्षता.

गंधापण (ಗಂಧಾಪಣ) (सं) ना.–सुगंधी द्रव्याची पेठ.

गंधालि (ಗಂಧಾಲಿ) (सं) ना.–गांधीलमाशी. 'कडज' पहा. दरवळणारा सुवास.

—गर्भ (ಗರ್ಭ) (सं) ना.–बारीक वेलदोडा.

गंधि (ಗಂಧಿ) (सं) ना.–सुगंधी द्रव्याचा व्यापारी; सुवास धारण करणारा.

गंधिक (ಗಂಧಿಕ) (सं) ना.–अत्तर विकणारा; गंधक.

गन्न, (कन्न) (ಗನ್ನ, [ಕನ್ನ]) (क) ना.–फसवणूक; वंचना; कपट; चोरी; दरवडा; दरोडा.

—गतक (ಗತಕ) (क) ना.–फसवणूक.

—गरुविके (ಗರುವಿಕೆ) (क) ना.–खोटा बडेजाव; कोरडा अहंकार; दंभ.

**गन्नदंक** (ಗನ್ನದಂಕ) (क) ना.—मानवी युद्ध; कपटी मनुष्य; वंचक.

**गप्चिप्** (ಗಪ್‌ಚಿಪ್) (अ. दे) ना.—स्तब्धता; मौन.

**गप्पने** (ಗಪ್ಪನೆ) (क) अ.—अकस्मात्; झटकन; एकदम.

**गबक्कने** (ಗಬಕ್ಕನೆ) (क) अ.—'गप्पने' पहा. एकदम; एका झपास्यांत.

**गब्ब** (ಗಬ್ಬ) (क) ना.—गर्भ; गर्व; गर्भवती; पोटाचा आतील भाग; अहंकार; मस्ती; अभिमान; खोटी प्रतिष्ठा; दंभ.

—**आगु** (ಆಗು) (क) धा.—पोट वाढणें; गर्भधारण करणें.

**गब्बरिसु** (ಗಬ್ಬರಿಸು) (क) धा.—व्यापणें; पसरणें; खोंदणें; खड्डा खणणें.

**गब्बि** (ಗಬ್ಬಿ) (क) ना.—गर्व करणारा; मस्ती करणारा; अहंकारी; हट्टी; अनावर मनुष्य.

**गब्बिल** (ಗಬ್ಬಿಲ) (क) ना.—'कणकप्पडि' पहा.

**गब्बु** (ಗಬ್ಬು) (क) ना.—दुर्गंधी; मस्ती; जळकावास; अहंकार.

**गभस्ति** (ಗಭಸ್ತಿ) (सं) ना.—कांती; सूर्य; चंद्र; सूर्य किरण; अग्निपत्नि स्वाहाः स्वधा.

**गभस्तिकर (मत्)** (ಗಭಸ್ತಿಕರ [ಮಂತ್]) (सं) ना.—सूर्य; पाताळ लोक.

**गभीर** (ಗಭೀರ) (सं) वि.—. खोल; गंभीर; रहस्यमय; एकांडा; एकाकी स्वभावाचा; पूर्ण.

—**आत्म** (ಆತ್ಮ) (सं) ना.—परमात्मा.

**गम** (ಗಮ) (सं) वि.—जाणारा; चलित.

(सं) ना.—उड्डाण; आतुरता; अविवेक; पुढची चाल; घमघमाट; सुवास; मार्ग.

**गमा (मि) क (का)** (ಗಮ [ಮಿ] ಕ [ಕಾ]) (सं) ना.—स्वरकंपन वेग; रीति; त्वरा; संगीतांतील एक गत; श्रम; थकवा.

**गमकि** (ಗಮಕಿ) (सं) ना.—रागयुक्त काव्यगायन; चीज; गायन.

**गमन** (ಗಮನ) (सं) ना.—जाणें; संचार; दृष्टि; लक्ष; कंपन; वासना; मिळकत.

**गमनागमन** (ಗಮನಾಗಮನ) (सं) ना.—ये—जा; येरझार; यडताकपट्टी.

**गमनिसु** (ಗಮನಿಸು (क) धा.—जाणें; चालू लागणें; यात्रा करणें; लक्ष देणें; गणणें.

**गमनीय** (ಗಮನೀಯ) (सं) वि.—जाणण्यास योग्य; ध्यान देण्यास योग्य; गण्य; गणनीय; लंघनीय; आचारणीय.

**गमित** (ಗಮಿತ) (सं) वि.—गत; गेलेलें; प्रेषित; पाठविलेलें; आणविलेले.

**गमिसु** (ಗಮಿಸು) (क) धा.—जाणेंयेणें; अंदाज चालविणें; विचारांत घेणें.

**गंपु** (ಗಂಪು) (क) ना.—परिमळ; सुवास.

**गम्म** (ಗಮ್ಮ) (क) ना.—घाम; घर्म; उकाडा; उष्णता.

**गम्मने** (ಗಮ್ಮನೆ) (क) अ.—एकदम; अकस्मात्; लागलीच तीव्रतेने.

**गम्मु** (ಗಮ್ಮು) (क) धा.—विस्कटणें; विचकणें; अस्ताव्यस्त करणें.

**गम्य** (ಗಮ್ಯ) (सं) वि.—जाणण्यायोग्य; समजण्यासारखें; स्वीकार्य; मान्य; प्राप्य; मिळविण्याजोगे; पटण्यासारखें.

**गय (ये)** (ಗಯ [ಯೆ]) (सं) ना.—गयाक्षेत्र; बुद्धगया; एक गंधर्व; एका राक्षसाचें नांव.

**गयावळ** (ಗಯಾವಳ) (सं) ना.—गयेतील क्षेत्रभिक्षुक; गयावळ; अव्यवस्थित ब्राह्मण; गबाळ्या; भोंगळ ब्राह्मण.

**गय्याळ** (ಗಯ್ಯಾಳ) (क) वि.—निरुपयोगी; दुबळा; बडबड्या; वाचाळ.

**गय्याळि** (ಗಯ್ಯಾಳಿ) (क) ना.—बडबडी स्त्री; लोचट स्त्री; मोंड बाई; हट्टी बाई.

**गर** (ಗರ) (सं) ना.—विष; वाईट करण्याची शक्ति; मद्य; प्रोक्षण; शिडकावा; सडा; शिंपडणूक.

(क) ना.—घरघर; ग्रह; नक्षत्र; पिशाच; भूत.

**गरकु** (ಗರಕು) (क) ना.—विषमता; खळगा; भूस; ओबधोबड; कठिण.

**गर्कु (गरकु)** (ಗರ್ಕು [ಗರಕು]) (अ. दे) ना.—निमग्नता; तल्लीनता.

**गरगरिके** (ಗರಗರಿಕೆ) (क) ना.—सौंदर्य; चांगुलपणा; आनंद; घरघर; ठक; अहंकार; गर्व; नियमबद्धता 'अच्चुकट्ट' पहा.

**गरगस** (ಗರಗಸ) (क) ना.—'करगस' पहा.

**गरडि** (ಗರಡಿ) (क) ना.—व्यायाम; तालीम; व्यायामशाळा.

—**साधक** (ಸಾಧಕ) (क) ना.—व्यायाम करणारा; तालीमबाज; व्यायामपटु.

**गरण** (ಗರಣ) (क) ना.—ग्रहण; स्वीकार; हात.

**गरति** (ಗರತಿ) (क) ना.—पतिव्रता; कुलीन स्त्री; मानिनी; गृहस्था.

**गरल** (ಗರಲ) (सं) ना.—विष; नंज; अपुऱ्या दिवसाच्या बाळंतपणामुळें येणारा रोग.

—**कंठ, ग्रीव** (ಕಂಠ, – ಗ್ರೀವ) (सं) ना.—नीलकंठ; शिव.

**गरलधर** (ಗರಲಧರ) (सं) ना.—शिव; विषधर.

**गरलपूर** (ಗರಲಪೂರ) (क) ना.—सर्प; विषारी साप.

**गरलभुक्** (ಗರಲಭುಕ್) / **गरलाशन** (ಗರಲಾಶನ) } (सं) ना.—विष सेवन करणारा; विष पचवणारा शिव.

**गरवट** (ಗರವಟು) (क) ना.—ग्रहपट; कुंडली; जातक; जन्म पत्रिका.

**गरवटिगे** (ಗರವಟಿಗೆ) (क) ना.—यज्ञशाळा; पहारा; चौकीदारी; राखणदारी; राखण.

गरवल (ಗರವಲ) (क) ना.—ग्रहबल; ग्रहनक्षत्राचा योगायोग.
गरवु (ಗರವು) (क) धा.—ओढणें; आकर्षिणें; आपल्याकडे खेचणें; वाकविणें.
गरवट्टिगे (ಗರವಟ್ಟಿಗೆ) (क) ना.—अद्भुतता; प्रचंडता.
गरळ (ಗರಳ) (क) ना.—'गरल' पहा.
गरास (ಗರಾಸ) (क) ना.—ग्रास; घास; कवळ; पक्कड.
गरि (ಗರಿ) (क) ना.—पक्ष्याची पिसें; पिसारा; पक्षाचे शेंपूट; तुरा; गवत; पाला; बाणाचा मागील भाग.
—कट्टु (ಕಟ್ಟು) (क) धा. कंबर कसणें; सुधारणें.
—केदरु (ಕೆದರು) (क) धा. पिसारा उभारणें; पसरणें.
गरिके (ಗರಿಕೆ) (क) ना.—एक जातीचें गवत.
गरिगण्णवकि (ಗರಿಗಣ್ಣವಕ್ಕಿ) (क) ना.—मोर; डोळे असलेल्या पिसाऱ्याचा मोर.
गरिग (ಗರಿಗ) (क) ना.—बाण; मोर.
गरिमुरि (ಗರಿಮುರಿ) (क) वि.—दृढ; घट्ट; बळकट.
गरिम (मा) (मे) (ಗರಿಮ [ಮಾ] ಮೆ) (सं) ना.—मोठेपणा; महात्म्य; श्रेष्ठता; जडपणा; स्थूलता; योग्यता.
गरिष्ठ (ಗರಿಷ್ಠ) (सं) वि.—थोर; श्रेष्ठ; जड; वजनदार; गौरवित; मस्त; अहंकारी.
गरिय (यस्) (ಗರೀಯ [ಯಸ್]) (सं) वि.—जड; मोठें; वजनदार.
गरुडध्वज (ಗರುಡಧ್ವಜ) (सं) ना.—विष्णु; कृष्ण.
गरुडपाताळ (ಗರುಡಪಾತಾಳ) (सं) ना.—गळ; पाताळगड.
गरुडपुराण (ಗರುಡಪುರಾಣ) (सं) ना.—संकट विनाशार्थ वाचावयाचें पुराण.
गरुडवाहन (ಗರುಡವಾಹನ) (सं) ना.—विष्णु.
गरुडवाहिनि (ಗರುಡವಾಹಿನಿ) (सं) ना.—सैन्याची विलक्षण रचना.
गरुडव्यूह (ಗರುಡವ್ಯೂಹ) (सं) ना.—सैन्याची विलक्षण रचना.
गरुडहरि (ಗರುಡಹರಿ) (सं) ना.—ग्रीक पुराणांतील एक प्राणी; गिधाड.
गरुडाग्रज (ಗರುಡಾಗ್ರಜ) (सं) ना.—गरुडाचा वडील भाऊ; अरुण.
गरुडांक (ಗರುಡಾಂಕ) (सं) ना.—गरुडध्वज; विष्णु; कृष्ण.
गरुडि (ಗರುಡಿ) (क) ना.—'गरडि' पहा; चावडी; जमीन; भिंत; गुहा.
—गैमे (ಗೈಮೆ) (क) ना.—कुस्ती; व्यायाम.
—साधने (ಸಾಧನೆ) (क) ना.—शरीरसौष्ठव.
गरुत् (ಗರುತ್) (सं) ना.—पंख; पीस; पक्ष.
गरुत्मत् (ಗರುತ್ಮತ್) (सं) ना.—गरुड; बाण; सूर्य; चंद्र.
गरुत्मंत (ಗರುತ್ಮಂತ) (सं) ना.—'गरुत्मत्' पहा; सूर्य; पक्षी.
गरुल (ಗರುಲ) (सं) ना.—गरुड.
गरुव (ಗರುವ) (सं) ना.—'गरिम' पहा; योग्यता; थोर पुरुष; पूज्य व्यक्ति; गर्व; मस्ती; अहंकार.
गरुवलि (ಗರುವಲಿ) (क) ना.—हवा; वारा.
गरुवायि (विके) (ಗರುವಾಯಿ [ವಿಕೆ]) (क) ना.—गंभीरगमन; गजगति; पायघड्या; विजयोन्माद; अहंकार; गरीमा; गांभीर्य मुनि; ब्रह्मदेवाचा मुलगा.
गर्ग (ಗರ್ಗ) (सं) ना.—यदुकुलपुरोहित; गर्गऋषि; गजग्याचा वेल; पाडा; खोंड; कृमि.
गर्गर (ಗರ್ಗರ) (सं) ना.—पाण्याचा डोह; एक संगीत वाद्य; रवि; मंथा.
गर्घर (ಗರ್ಘರ) (सं) ना—घरघर; घागर; वाळा; घुंगुर.
गर्जित (ಗರ್ಜಿತ) (सं) वि.—घोषित; पुकारलेलें.
(सं) ना.—भयंकर ध्वनि; हत्तीचा ध्वनि; चीत्कार; विजेचा कडकडाट; मेघगर्जना.
गर्जिसु (ಗರ್ಜಿಸು) (क) धा.—घोषणा देणें; गर्जना करणें; ओरडणें.
गर्त (ಗರ್ತ) (सं) ना.—तळें; ओढा; खड्डा; उच्चासन; सिंहासन; न्यायपीठ; युद्धरथावरील आसन; एक रोग; बुद्धिबळपटावरील एक घर.
—आश्रय (ಆಶ್ರಯ) (सं) ना.—बिळात राहणारा प्राणी.
गर्तिका (ಗರ್ತಿಕಾ) (सं) ना.—हातमाग; विणकराचा माग.
गर्दभ (ಗರ್ದಭ) (सं) ना.—गाढव; रासभ.
गर्दु (द्दु) गे (ಗರ್ದು [ದ್ದು] ಗೆ) (क) ना.—आसन; पीठ; सिंहासन; व्यासपीठ.
गर्दे (ಗರ್ದೆ) (क) ना.—गादी; क्षेत्र.
गर्धन (ने) (ಗರ್ಧನ [ನೆ]) (क) ना.—अत्याशा करणारा; लोभी; कृपण; कंजूष; चिक्कु.
गर्ब (ಗರ್ಬ) (क) ना.—गर्व; मस्ती; अहंकार; गर्भ; गर्भिणी; गर्भवास; पोटाशी; दिवस गेलेली स्त्री.
गर्बु (ಗರ್ಬು) (क) ना.—तीव्र दुराशा; गाभ; गर्भ. 'कोळे' पहा.
गर्भ (ಗರ್ಭ) (सं) ना.—गर्भकोश; पोटांतील अर्भक; गर्भिणी; आंतील भाग; मधोमध; अग्नि; आहार; गरा.
—करगु (ಕರಗು) (क) धा.—पोटचें पडणें.
—गुडि (ಗುಡಿ) (क) ना.—गर्भागार; मंदिराचा आंतील भाग; अंतर्मंदिर.
गर्भधरिसु (ಗರ್ಭಧರಿಸು) (क) धा.—दिवस जाणें; गर्भधारणा होणें.
गर्भक (ಗರ್ಭಕ) (सं) ना.—वेणींतील फूल.
गर्भगृह (ಗರ್ಭಗೃಹ) (सं) ना.—माजघर; अंतर्गृह; ओसरी; सोपा.

**गर्भधारण** (ಗರ್ಭಧಾರಣ) (सं) ना.—गाभण; दिवस जाणें; गर्भवती होणें.
**गर्भनृत्य** (ಗರ್ಭನೃತ್ಯ) (सं) ना.—गरबा; रास; नृत्यप्रकार; नाचण्यांतील पदन्यास.
**गर्भपदि** (ಗರ್ಭಪದಿ) (सं) ना.—गोगलगाय; पिकळी.
**गर्भपात** (ಗರ್ಭಪಾತ) (सं) ना.—गर्भ गळणें; पोटचें पडणें; अकालप्रसूति.
**गर्भमोचन** (ಗರ್ಭಮೋಚನ) (सं) ना.—बाळंतपण; हळजण; प्रसूति.
**गर्भवति** (ಗರ್ಭವತಿ) (सं) ना.—गर्भिणी; गरोदर; दिवस गेलेली.
**गर्भवास** (ಗರ್ಭವಾಸ) (सं) ना.—गर्भावस्था; माजवर.
**गर्भश्रीमंत** (ಗರ್ಭಶ್ರೀಮಂತ) (सं) वि.—परंपरागत श्रीमंत; जन्मश्रीमंत.
**गर्भसंस्कार** (ಗರ್ಭಸಂಸ್ಕಾರ) (सं) ना.—गर्भाधान; गर्भिणीच्या सहाव्या अगर आठव्या महिन्यांत करावयाचे धार्मिक विधी.
**गर्भस्राव** (ಗರ್ಭಸ್ರಾವ) (सं) ना.—'गर्भपात' पहा.
**गर्भागार** (ಗರ್ಭಾಗಾರ) (सं) ना.—सोपा; माजघर; अंतर्गृह.
**गर्भांगने** (ಗರ್ಭಾಂಗನೆ) (सं) ना.—गर्भिणी; गरोदरी.
**गर्भादान** (ಗರ್ಭಾದಾನ) (सं) ना.—ऋतुशांति; गर्भधारणा संस्कार.
**गर्भाशय** (ಗರ್ಭಾಶಯ) (सं) ना.—गर्भकोश.
**गर्भिणि** (ಗರ್ಭಿಣಿ) (सं) ना.—गर्भवति; गरोदर स्त्री.
**गर्भित** (ಗರ್ಭಿತ) (सं) वि.—सुत; भरलेले; गूढार्थक.
**गर्भीकृत** (ಗರ್ಭೀಕೃತ) (सं) वि.—सुत; समाविष्ट; अंतर्भूत.
**गर्भीकरिसु** (ಗರ್ಭೀಕರಿಸು) (क) धा.—एकत्रित करणें; लपवून ठेवणें; आड करणें; अंतर्धान करणें.
**गर्व** (ಗರ್ವ) (सं) ना.—मस्ती; अहंकार; दर्प; पोटदुखी; अभिमान; ताठा; बडेजाव.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.—गर्व करणें; मस्ती करणें; दाखविणें.
**गर्वाट** (ಗರ್ವಾಟ) (सं) ना.—पहारेकरी; चौकीदार; राखणा; राखणदार; रक्षक.
**गर्वित** (ಗರ್ವಿತ) (सं) वि.—मस्त; माजलेला; फुगलेला; चढेल.
**गर्विष्ठ** (ಗರ್ವಿಷ್ಠ) (सं) वि.—अहंकारी; मस्तीचा; घमेंडखोर; अभिमानी.
**गर्वु** (ಗರ್ವು) (क) ना.—'गर्व' पहा.
**गर्वोद्धत** (ಗರ್ವೋದ್ಧತ) (सं) वि.—गर्वानें फुगलेला; मस्तवाल; अतिगर्विष्ठ.
**गर्शक** (ಗರ್ಶಕ) (सं) ना.—वाटोळी वाटी; गुंडी; गोलभांडें.
**गर्हण** (ಗರ್ಹಣ) (सं) ना.—निंदा; शिवीगाळ.
**गर्हा** (र्हे) (ಗರ್ಹಾ [ರ್ಹೆ]) (सं) ना.—निंदा; अपमान; तिरस्कार; शिवीगाळ.
**गर्ह्य** (ಗರ್ಹ್ಯ) (सं) ना.—निंद्य; हीन; तुच्छ.
**—वादी** (ವಾದಿ) (सं) ना.—नीच भाषण करणारा; वाईट चालीचा; अपशब्द उच्चारणारा.
**गल** (ಗಲ) (सं) ना.—गळा; नरडे; आवाज; गळति; गडबड; गळगळ असा आवाज.
**गलकंडूति** (ಗಲಕಂಡೂತಿ) (सं) ना.—घशाची खवखव; घशाची खाज.
**गलकंदल** (ಗಲಕಂದಲ) (सं) ना.—शंखग्रीव; भरदार मानेचा.
**गलकंबल** (ಗಲಕಂಬಲ) (सं) ना.—गायबैलाच्या गळ्याखालची पोळी; गाईच्या गळ्याभोवती गुंडाळलेली शाल; कापड.
**गलन** (ಗಲನ)(सं) ना.—गळती; स्खलन; पात.
**गलंति** (तिके) (ಗಲಂತಿ [ತಿಕೆ]) (सं) ना.—पाण्याचें लहान भांडें; अभिषेकपात्र.
**गलबे** (भे) (ಗಲಬೆ [ಭೆ]) (क) ना.—गडबड; गोंधळ; कोलाहल; धांदल.
**गलहस्त** (ಗಲಹಸ್ತ) (सं) ना.—तळहाती हनुवटी धेणें; गळ्याला हात घालणें; कुस्तीतील एक डाव.
**गलित** (ಗಲಿತ) (सं) वि.—गळलेले; घालविलेलें; पक्व झालेले; पडलेले; सत्त्वहीन; जीर्ण.
**गलितक** (ಗಲಿತಕ) (सं) ना.—एक प्रकारचें नर्तन; नृत्यविशेष; एक तऱ्हेचा नाच; नर्तनांतील पदन्यास.
**गलुहु** (ಗಲುಹು)(क) ना.—घुंगुरांचा नाद.
**गलोद्देश** (ಗಲೋದ್ದೇಶ) (सं) ना.—गळा; नरडे.
**गल्भ** (ಗಲ್ಭ) (सं) वि.—धैर्यशाली; साहसी; प्रगल्भ; वयांत आलेला.
**गल्ये** (ल्या) (ಗಲ್ಯೆ [ಲ್ಯಾ]) (सं) ना.—गोंगाट; ओरडा.
**गल्ल** (ಗಲ್ಲ) (क) ना.—पति; गाल; दाराची कडी; दरवाजा; कपोल.
**—गुलि** (ಗುಳಿ) (क) ना.—गालावरील खळी; खळी पडणारा गाल.
**गल्लणे** (ಗಲ್ಲಣೆ) (क) ना.—अडचण; ताप; संकट; गलगल असा आवाज; पीडा; आयास; दमणूक; उपद्रव.
**गल्लि** (ಗಲ್ಲಿ) (अ. दे) ना.—बोळ; लहानवाट; बोदी; आळी.
**गल्लिसु** (ಗಲ್ಲಿಸು) (क) धा.—पीडा देणें; कष्ट करणें; दमविणें; हलविणें; ढकलणें; लोटणें; खालवर करणें.
**गल्लु** (ಗಲ್ಲು) (क) ना.—फाशी; फाशीचा खांब.
**गल्ले** (ಗಲ್ಲೆ) (क) ना.—वाळवलेला गोळा; कोय.
**गल्ले** (ಗಲ್ಲೆ) (अ. दे.) ना.—गल्ला; पैशाची पेटी.
**गव** (ಗವ) (सं) ना.—गाय; बैल; पशु.
**गवड** (ಗವಡ) (क) ना.—गौड; पाटील; ग्रामाधिकारी; ग्रामीण.
**गवन** (ಗವನ) (क) ना.—गमन; लक्ष; जागृति; जागर; काम चालू राखणें; जाणीव; ज्ञान.

गवनि (ಗವನಿ) (सं) ना.—आवरण; झांकण; पांघरूण.
गवय (ಗವಯ) (सं) ना.—रानबैल; रामाच्या कपिसैन्याचा मुख्य.
गवयि (ಗವಯಿ) (अ. दे) ना.—संगीतज्ञ; गायक; उस्ताद.
गवरिग (ಗವರಿಗ) (क) ना.—बुरुड; 'मेदार' पहा.
गवल (ಗವಲ) (सं) ना.—रेड्याचें शिंग; रानरेडा; गवा.
गवल्गण (ಗವಲ್ಗಣ) (सं) ना.=धृतराष्ट्राचा सारथि; संजयपिता.
गवसणि | गवसणिके(गे) (ಗವಸಣಿ) (ಗವಸಣಿಕೆ [ಗೆ]) (क) ना.—पांघरूण; आवरण; पोतें; आडोसा; पिशवी.
गवळि (ळिग) (ಗವಳಿ [ಳಿಗ]) (क) ना.—गोपालक; गुराखी; गोपाळ; दहीदूध विकणारा; दूधदुभते विकूण पोट भरणारा.
गवळिति (ಗವಳಿತಿ) (क) ना.—गवळण; गोपालिनी.
गवाक्ष (ಗವಾಕ್ಷ) (सं) ना.—खिडकी; सहाणें; बैलाचा डोळा.
गवास्पद (ಗವಾಸ್ಪದ) (सं) ना.—गोशाळा; गोठा; गोधन; गाईम्हशी बांधण्याचें ठिकाण.
गवि (ಗವಿ) (क) धा.—गुंडाळणें; आवरण घालणें; गाठ सोडणें; रुंद करणें; पुढें ढकलणें.
(क) ना.—गुहा; गव्हर; बीळ; झाकणी; विस्तार; रुंदी.
गविसु (ಗವಿಸು) (क) धा.—लक्षदेणें; ध्यानांत येणें.
गवीन (ಗವೀನ) (सं) वि.—गाईसंबंधी; पशूसंबंधी.
गवुजल (ಗವುಜಲ) (क) ना.—परटीण पक्षी; 'खंजन' पहा.
गवुडी (गौडि) (ಗವುಡಿ [ಗೌಡಿ]) (क) ना.—दासी; पाटीलकी करणारी. सेविका, पाटलीण; शेतकरीण.
गवुडगित्ति | गवुडित्ति (ಗವುಡಗಿತ್ತಿ) (ಗವುಡಿತ್ತಿ) (क) ना.—पाटलाची पत्नि; पाटलीण.
गवुर् (रु) (ಗವುರ್ [ರು]) (क) ना.—जोराची हाक; हरळी, पाखरें उठवणें; युद्धाचें आवाहन;
—कहळे (ಕಹಳೆ) (क) ना.—युद्धाचें आवाहन.
—उगि (ಉಗಿ) (क) धा.—मोठा आवाज करणें; दूरध्वनीची हाक मारणें पुकारणें.
गवुळि (वळि) (ಗವುಳಿ [ವಳಿ]) (क) ना.—पाल.
गवेंद्र (ಗವೇಂದ್ರ) (सं) ना.—मोठा बैल; पुंगव; श्रेष्ठ वृषभ.
गवेक्षित (ಗವೇಕ್ಷಿತ) (सं) वि.—चौकशींत पडलेलें; विचार चालू असलेलें.
गव्य (ಗವ್ಯ) (सं) वि.—गाईसंबंधी; गोरस; गोरससंबंधी; पंचगव्य
गव्यूत (ति) (ಗವ್ಯೂತ [ತಿ]) (सं) ना.—दोन कोसाचें अंतर; कुरणाची राखण; दसऱ्याला दिलेले धान्यतरु, गवती सोनें, शमी.
गव्वर (ಗವ್ವರ) (क) ना.—गव्हर; साणें; बीळ; खिडकी.
गसण (ಗಸಣ) (क) ना.—घर्षण; भांडण; घासाघीस.
गसणे (ಗಸಣೆ) (क) ना.—अडचण; संकट; घासाघीस; तंटा; आपत्ति; चिंता; वृद्धि.
—कोळ् (ಕೊಳ್) (क) धा.—चिंताक्रांत होणें; आतुर होणें.
गसि (ಗಸಿ) (क) ना.—चिखल; बांध; बंधारा; मेर.
गह (ಗಹ) (क) ना.—हास्यध्वनि.
—गहिके (ಗಹಿಕೆ) (क) ना.—हसहसाट; पोट धरधरून हसणें; खो खो हास्य; हास्यकल्लोळ.
—गहिसु (ಗಹಿಸು) (क) धा.—खिदळणें; सातमजली हसणें; तिरस्कारानें हसणें; पोट धरून हंसणें.
गहन (ಗಹನ) (क) ना.—दोषैक दृष्टि; अडचणीचे भाषण; टोचून बोलणें.
(सं) वि.—आश्चर्यजनक; अगाध; खोल; दुर्बोध; कठीण गति; प्रवेश दुःसाध्य.
(सं) ना.—अरण्य; मर्म; रहस्य.
गव्हर (ಗಹ್ವರ) (सं) वि.—खोल; अगाध; गहन; कृत्रिम; कपटी.
(सं) ना.—अरण्य; गुहा; न ओळखतां येण्याजोगा उखाणा; प्रहेलिका; अहित; कलंक; अंधकार; तमालवृक्ष; काळोख.
गव्हरि (री) (ಗಹ್ವರಿ [ರೀ]) (सं) ना.—भूमि; जमीन; पृथ्वी.
गळ (ಗಳ) (सं) ना.—'गल' पहा; गळा; नरडें; चिवा; सूज; गळगळ असा आवाज.
(क) अ.—पाहिलें कां? नव्हे का?
—तोडिगे (ತೊಡಿಗೆ) (क) ना.—कंठाभरण; सरी; कंठी वगैरे सारखा गळ्यांतील दागिना.
गळगळने (ಗಳಗಳನೆ) (क) अ.—घाईघाईनें; तीव्रतेनें,
गगळाळ (ಗಳಗಾಳ) (क) ना.—गळाला अडकणारा मासा; मासे धरण्याचें साधन.
गळगे (ಗಳಗೆ) (क) ना.—बांबूची केलेली कणगी.
गळग्रास (ಗಳಗ್ರಾಸ) (सं) ना.—सुसर; मगर.
गळत् (ಗಳತ್)(सं) वि.—पडणारे; गळणारे.
गळध्वनि (ಗಳಧ್ವನಿ) (सं) ना.—रति कूजित; कंठातून येणारा आवाज.
गळतिगे (ಗಳತಿಗೆ) (क) ना.—अंतर्गृह खोली; ओवरी; 'गळतिगे' पहा.
गळपु (ह्) (ಗಳಪು [ಹು]) (क) धा—गप्पा मारणें; व्यर्थ बोलणें; फुसकें बोलणें; असत्य भाषण करणें.
गळरव (ಗಳರವ) (सं) ना.—'गलध्वनि' पहा.
गळले (ಗಳಲೆ) (क) ना.—गालगुंड; गंडमाळा रोग; सांधेसूज.
गळह (ಗಳಹ) (क) वि.—वाचाळ; बडबड्या; असत्यभाषी; गप्पिष्ट.
गाळि (ಗಾಳಿ) (क) धा.—पक्व होणें; पिकणें; घालविणें.
गळिगे (ಗಳಿಗೆ) (क) ना.—घटका; चोवीस निमिषांचा अवधि; कापडाची घडी; घडी घातलेला कपडा; मोट; मोटली.

गळिगेबट्टलु (ಗಳಿಗೆಬಟ್ಟಲು) (क) ना. –घटकापात्र; वाळूचें घड्याळ.

गळित (ಗಳಿತ) (क) वि. –गमावलेलें; पक्व; पिकलेलें; कुजलेलें.
(सं) वि. –गत; हरवलेलें.

गळियिसु } (ಗಳಿಯಿಸು)
गळिसु } (ಗಳಿಸು) (क) धा. –संपादन करणें; स्पर्शणें; मिळणें; जमविणें; संभवणें; सिद्ध होणें; अस्तित्वांत येणें.

गळिपु (ಗಳಿಪು) (क) धा. –व्यर्थ गप्पा मारणें; कोरड्या गप्पा मारणें; चकाऱ्या पिटणें.

गळे (ಗಳೆ) (क) ना. –चिबाऱ्याची काठी; शेतकीचें साधन; रवि; डोंबारकाठी; डोंबाऱ्याची खेळकाठी.

गळेकार (ಗಳೆಕಾರ) (क) ना. –बुरुड; बांबूचें काम करणारा.

गळेवळि (ಗಳೆವಳಿ) (क) वि. –पंखाच्या आकाराचें बाहुभूषण वापरणारा; दंडावरील पंखालंकार.

गळ्ळे (ಗಳ್ಳೆ) (क) ना. –लदगा; लादा.

गा (ಗಾ) (क) अ. –बोलणें शिकण्यावेळचा बालकाचा ध्वनि.

गागल (ಗಾಗಲ) (क) ना. –गोंधळ; संभ्रम; उसाभर; गडबड.

गांगेय (ಗಾಂಗೆಯ) (सं) ना. –भीष्म; कार्तिकेय; सुवर्ण रुपें.

गाचार (ಗಾಚಾರ) (क) ना. –ग्रहाचार; ग्रहांची पीडा; त्रास; आपत्ति.

गाजु (ಗಾಜು) (क) ना. –कांच; आरसा; जायफळ; गैरिक.

गांज (जि) (ಗಾಂಜ [ಜಿ]) (क) ना. –गांजा; भांग.

गाट (ಗಾಟ) (क) वि. –गाढ; दाट; अतिशय; फार मोठें; खडबडीत; घट्ट; त्रस्त.
(क) ना. –त्रास; खाट; खोकला उत्पन्न करणारी धूळ.

गाटळिसु (ಗಾಟಳಿಸು) (क) धा. –त्रास देणें; पीडा देणें; अडचण उत्पन्न करणें. आडकाठी आणणें.

गाड (ಗಾಡ) (क) वि. –गाढ; घट्ट; दृढ; अतिशय; खरोखर.

गाडि (ಗಾಡಿ) (क) ना. –गांभीर्य; सौंदर्य; मनोहरता; शोभा; भरलेली गाडी; चाकाचा अरा; छकडी.
—पडे, —पेंरु (ಪಡೆ,ಪೆರು) (क) धा. –गंभीर होणें; शोभिवंत होणें. नटणें; सुंदर दिसणें.

गाडिकाति (ಗಾಡಿಕಾತಿ) (क) ना. –विलासिनी; गाडी हाकणारी सुंदरी; नट्टापट्टा करणारी; अभिनेत्री.

गाडिकार (ಗಾಡಿಕಾರ) (क) वि. –विलासी; सौंदर्योपासक; गाडी हाकणारा.

गाडिके (ಗಾಡಿಕೆ) (क) ना. चांगुलपणा; शोभा; अतिशयता; आधिक्य; मोठेपणा; डौल.

गाडिग (गार) (ಗಾಡಿಗ [ಗಾರ]) (क) ना. –जादुगार; गारुडी; हाकणारा; मांत्रिक; वंचक.

गाडिगाति (ಗಾಡಿಗಾತಿ) (क) ना. –मायावती; मंत्रतंत्र करणारी; 'गाडिकाति' पहा.

गाडिगतन (ಗಾಡಿಗತನ) (क) ना. –विलास; डौल; शोभा; नट्टापट्टा.

गाडिसु (ಗಾಡಿಸು) (क) धा. –घट्ट होणें; आवेशपूर्ण होणें; उत्तेजित होणें; मर्यादातिक्रमण करणें; आतुर होणें; बद्ध होणें.

गाढ (ಗಾಢ) (सं) वि. –बुडलेले; खुपसलेले; लपलेले; अंतर्भूत; घट्ट बांधलेले; निबद्ध; खोल; अगाध; निबिड; उद्देशपूर्ण उत्तेजित; अधिक दाट; घन; बळकट; सांद्र.

गाढांधकार (ಗಾಢಾಂಧಕಾರ) (सं) ना. –निबिड अंधकार; अतितिमिर; मिट्ट काळोख.

गाढायिल (ಗಾಢಾಯಿಲ) (क) वि. –बलिष्ठ; आतुर; गाढालिंगन देणारा.

गाढालिंगन (ಗಾಢಾಲಿಂಗನ) (सं) ना. –दृढालिंगन; आट्टिमिट्टि

गाढोक्ति (ಗಾಢೋಕ್ತಿ) (सं) ना. –निष्ठुर वचन; सडेतोड बोलणें.

गाण (ಗಾಣ) (क) ना. –गान; संगीत; गवईपणा; गायकी; घाणा; चरक; मासे धरण्याचा गळ; ग्रहण.

गाणर् (ಗಾಣರ್) (क) ना. –गायक; गवई.

गाणपत्य (ಗಾಣಪತ್ಯ) (सं) ना. –गणपतीचे उपासक.

गाणि (ಗಾಣಿ) (क) ना. –गायिका; संगीतज्ञ स्त्री.

गाणिक्य (ಗಾಣಿಕ್ಯ) (सं) ना. –वेश्यावृंद; गाणिकासमूह.

गाणिग (ಗಾಣಿಗ) (क) ना. –पांढऱ्या शेपटीचा कलिंग पक्षी.

गांडि (ಗಾಂಡಿ) (क) ना. –गांठ; गाठोडें; डबोलें; मोटली; पुडकें.

गांडिव (डीव) (ಗಾಂಡಿವ [ಡೀವ]) (सं) ना. –अर्जुनाचें धनुष्य.

गांडि (डी) वि (ಗಾಂಡಿ [ಡೀ] ವಿ) (सं) ना. –गांडीवधर; अर्जुन.

गांडु (ಗಾಂಡು) (सं) ना. –दणकट; गदा; टोणपा; बुद्धीहीन; प्रचंडगदा

गाण्प (ಗಾಣ್ಪ) (क)ना. –घड्डु; मूर्ख; 'अेग' पहा

गाण्णु (ण्पु) (ಗಾಣ್ಣು [ಣ್ಪು]) (क) ना. –जंगलीपणा; गांवढळपणा; मूर्खता; घड्डुता; अज्ञान.

गात (ಗಾತ) (क) ना. –घात. 'पट्टु' पहा.

गातु (ಗಾತು) (सं) ना. –गाणारी; गायिका; गवयित्री; नरकोकीळ.

गातृ (ಗಾತೃ) (सं) ना. –गाणारा; संगीतज्ञ; गंधर्व.

गात्र (ಗಾತ್ರ) (सं) वि. –शरीरधारी; देही.
(सं) ना. –अवयव; देह; अंग; हत्तीचा पुढचा पाय; जाडी; लठ्ठपणा.
–मार्जनी (ಮಾರ್ಜನಿ) (सं) ना. –पंचा; टॉवेल; अंग पुसणें.

गोंदण (ಗೋಂದಣ) (क) ना.—गोठा; गवानी; गवांदी;
गोंदलि (लु) (ले) (ಗೋಂದಲಿ [ಲು] ಲೆ) (क) ना.—'गोदण' पहा.
गोदान (ಗೋದಾನ) (सं) ना.—गायदान; समावर्तन संस्कार; जावळ; चौलकर्म.
गोदामु (ಗೋದಾಮು) (क) ना.— (Godown) या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश; गुदाम; वखार; धान्यकोठार; उग्राण; कणगी.
गोदारण (ಗೋದಾರಣ) (सं) ना.—नांगर; कुदळ; पिकास.
गोदावरि (ಗೋದಾವರಿ) (सं) ना.—गोदावरी नदी.
गोदि (दुवे) (ಗೋದಿ [ದುವೆ]) (क) ना.—गहू; धान्यविशेष; गोधूम.
गोदुह (दोह) (ಗೋದುಹ [ದೋಹ]) } (सं) ना.—गाईची
गोदोहन (ಗೋದೋಹನ) } धार काढणें; दूध काढणारा गवळी; मध्यान्ह काळ.
गोद्दु (ಗೋದ್ದು) (क) ना.—व्यायामशाळा; शक्तिमंदिर; आखाडा; तालीम.
गोदे (ಗೋದೆ) (क) ना.—झाडाची गाठ; मूळ; आखाडा; गोदानदी; गोदावरी नदी.
गोधन (ಗೋಧನ) (सं) ना.—गाय हीच संपत्ति; गाईचा कळप.
गोधि (धिके) (ಗೋಧಿ [ಧಿಕೆ]) (सं) ना.—सरडा; घोरपड.
गोधूम (ಗೋಧೂಮ) (सं) ना.—गहू; एक धान्य.
गोधूमवर्ण (ಗೋಧೂಮವರ್ಣ) (सं) ना.—गव्हाळी साप; गव्हाळी रंग.
गोधूलि (ली) (ಗೋಧೂಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—गाईच्या पावलांनी उधळलेली धूळ; संध्यासमय; संधिप्रकाश.
गोधे (धि) (ಗೋಧೆ [ಧಿ]) (सं) ना.—घोरपड; धनुर्धारीनें डाव्या दंडावर बांधलेली चर्मरक्षा.
गोध्र (धर) (ಗೋಧ್ರ [ಧರ]) (सं) ना.—पर्वत; डोंगर.
गोनालि (ಗೋನಾಳಿ) (क) ना.—कंठ; मान; गळा; नरडें.
गोनिकाय (ಗೋನಿಕಾಯ) (सं) ना.—गाईंचा कळप; पशूंचा समूह.
गोंद (ಗೋಂದ) (क) ना.—डिंक; सरस; चिकटविण्याचें साधन.
गोंदे (ಗೋಂದೆ) (क) ना.—बसव; वृषभ; बैल; शिंगाचें जनावर.
गोप (ಗೋಪ) (सं) ना.—पशुपालक; गुराखी; गोस्वामी सूर्य; राजा; कृष्ण; हिमाचल; सौरभ; विष्णु; इंद्र; चंद्र; वाताधिकारी; मेरू; सुपर्ण; गरूड.
गोपति (ಗೋಪತಿ) (सं) ना.—शिबिराजाचा नातु.
गोपध्वज (ಗೋಪಧ್ವಜ) (सं) ना.—वृषभध्वज; शिव.
गोपन (ಗೋಪನ) (सं) ना.—रक्षण; लपवणूक; लापन; संग्रह.
गोपवाहन (ಗೋಪವಾಹನ) (सं) ना.—ऐरावत; इंद्र; हंस; गरुड; नदी; शिव; सूर्य; विष्णु.
गोपस्त्री (ಗೋಪಸ್ತ್ರೀ) (सं) ना.—गवळण; गोपवधु; गोल्लकामिनी.
गोपायित (ಗೋಪಾಯಿತ) (सं) वि.—लपवलेला; आड झालेला; न दिसणारा.
गोपाल (लक) (ಗೋಪಾಲ [ಲಕ]) (सं) ना.—गवळी; गोप; कृष्ण.
गोपि (पी) (ಗೋಪಿ [ಪೀ]) (सं) ना.—गवळण; यशोदा.
गोपित (ಗೋಪಿತ) (सं) वि.—लपविलेला; झाकलेला; सुरक्षित; राखून ठेवलेला.
गोपु (ಗೋಪು) (सं) ना.—गोफ; आभरण; गळ्यांतील दागिना.
गोपुर (ಗೋಪುರ) (सं) ना.—शिखर; मंदीरावरील कळस; घुमट; शहराचें महाद्वार; वेस.
गोप्य (ಗೋಪ್ಯ) (सं) वि—गुप्त; अंतर्हित; रहस्यमय; रक्षणीय; आकलनीय; जागरणीय.
(सं) ना.—दासीपुत्र; सवतीपुत्र.
गोप्यक (ಗೋಪ್ಯಕ) (सं) ना.—सेवक; नोकर.
गोमनालि (ಗೋಮನಾಳಿ) (क) ना.—'गोनालि' पहा.
गोमय (ಗೋಮಯ) (सं) ना.—शेण; पशुविष्टा.
गोम (ಗೋಮ) (सं) ना.—बोण; पैसाकिडा; इंद्रगोप.
गोमंत (ಗೋಮಂತ) (सं) ना.—द्वारकेजवळील एक पर्वत.
गोमांतक (ಗೋಮಾಂತಕ) (सं) ना.—गोवें; भारताचा एक अविभाज्य भाग.
गोमिनि (नी) (ಗೋಮಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—लक्ष्मी.
गोमाय (ಗೋಮಾಯ) (सं) ना.—गोमय; कोल्हा; गंधर्व.
गोमु (ಗೋಮು) (क) ना.—अडीअडचण; दंभ; ढोंग; सोंग; वृथा अहंकार.
गोमुख (ಗೋಮುಖ) (सं) ना.—गाईचें तोंड असलेला; यक्ष जाति; सुसर; एक वाद्य; गंगोत्री; यात्रास्थळ.
—व्याघ्र (ವ್ಯಾಘ್ರ) (सं) ना.—दुष्टहृदयी; वरून गरीब दिसणारा पण अंतरी लबाड.
गोमेद (दिक) (ಗೋಮೆದ [ದಿಕ]) (सं) ना.—गोमेदरत्न; वैडूर्य; नवरत्नांपैकी एक.
गोमेध (ಗೋಮೇಧ) (सं) ना.—पशूची आहुति असणारा यज्ञ.
गोमेधिक (ಗೋಮೇಧಿಕ) (सं) ना.—'गोमेद' पहा.
गोर् (रु) (ಗೋರ್ [ರು]) (क) धा.—ओढून कौबणें; मासे मारणें; जाळे टाकणें.
गोरटे (ಗೋರಟೆ) (न) ना.—कोरंटी; एक फुलझाड.
गोरध (ಗೋರಧ) (सं) ना.—मगध देशातील पर्वत.
गोरस (ಗೋರಸ) (सं) ना.—दूध; गाइच्या दुधापासून झालेले पदार्थ.

गोराटके (ಗೋರಾಟಕೆ) (सं) ना. – मैना; पोपटाचें पिलु.
गोरि (ಗೋರಿ) (क) ना. – मृगादिकांना बेभान करणारे गाणें; ओढ; आकर्षण; एकत्रिकरण; एक प्रकारची शिकार.
(अ. दे) ना. – शवसमाधि; थडगें; स्मशान.
गोरिगोळिसु (ಗೋರಿಗೊಳಿಸು) (क) धा. – समाधि घेणें; ठार मारणें; नाश करणें.
(क) ना. – आकर्षण; ओढ; मोह; वशीकरण; शिकारी हरीण; शिकार आणणारे हरिण.
गोरिकल्लु (ಗೋರಿಕಲ್ಲು) (सं) ना. – थडगें; समाधीचा दगड.
गोरु (ಗೋರು) (क) धा. – रास करणें; गोळा करणें; पाखडणें; धान्याला वारा देणें; विंचरणें; लुटणें; परजणें; जखम करणें; जमीन सारखी करणें; ओढून आणणें; आडकाठी बाजूस करणें.
(क) ना. – कष्ट; अडचण; पीडा.
—मणे (ಮಣೆ) (क) ना. – जमीन सारखी करण्याची फळी. हेंडोरा. 'कोरडु' पहा.
गोरे (ಗೋರೆ) (क) ना. जहाजावरील झाडणी; मासे धरण्याची बुट्टी; लाकडानें बाजूला सारलेला गूळ; कापड.
गोरोच (चन) (ಗೋರೋಚ [ಚನ]) (सं) ना. – शरीरातील लाखी रंगाचे औषधी द्रव्य; अष्टगंध; एक पिवळे सुगंधी द्रव्य.
गोर्कल्लु (ಗೋರ್ಕಲ್ಲು) (क) ना. – हद्दीचा दगड; वेशीपुढील दगड.
गोर्ध (ಗೋರ್ಧ) (सं) ना. – मेंदू; 'गोद' पहा.
गोल (ಗೋಲ) (सं) ना. – वर्तुळ; वर्तुळाकार वस्तु; वाटोळी वस्तु; गाईची मान; विधवा पुत्र; अनौरस संतती.
गोलक (ಗೋಲಕ) (सं) ना. – 'गोल' पहा; नांगर.
गोलपट (ಗೋಲಪಟ) (सं) ना. – पृथ्वीचा गोल; ग्लोब.
गोलांगु (गू) ल (ಗೋಲಾಂಗುಲ) (सं) ना. – गाईप्रमाणें लांब (ಗೋಲಾಂಗೂಲ) शेपटीचा माकड; पिंगलीक.
गोलि (ಗೋಲಿ) (क) ना. – मुलांच्या खेळातील एक वस्तु; गोटी; बंदुकीची गोळी; मुद्रा करण्याची लाख; दगड; सील.
गोलु (ಗೋಲು) (सं) ना. – गोटी; वर्तुळ; ग्लोब.
गोले (ಗೋಲೆ) (सं) ना. – तांबडा शंख; पाषाण.
गोव (ಗೋವ) (क) ना – 'गोप' पहा
गोवत्साद (ಗೋವತ್ಸಾದ) (सं) ना. – लांडगा; वासरे खाणारा प्राणी.
गोवर्धन (ಗೋವರ್ಧನ) (सं) ना. – वृंदावनांतील एक पर्वत.
—धर (धारी) (ಧರ, [ಧಾರಿ]) (सं) ना. – श्रीकृष्ण.
गोवळ (ಗೋವಳ) (क) ना. – गोपाळ; गुराखी.
गोवाहन (ಗೋವಾಹನ) (सं) ना. – नंदीश्वर; शंकर.
गोविंद (ಗೋವಿಂದ) (सं) ना. – गाईचा मालक कृष्ण; इंद्रियावर ताबा मिळवणारा; विष्णु; बृहस्पति.



गोवि (ಗೋವಿ) (क) ना. – वेणु; बासरी; मुरली; पावा.
गोविट् (ಗೋವಿಟ್) (सं) ना. – गोमय; गाईचें शेण.
गोवु (ಗೋವು) (क) ना. – गाय; गोधन.
गोवृंद (ಗೋವೃಂದ) (सं) ना. – गाईचा कळप; गोकुळ; गोठा.
गोवे (ಗೋವೆ) (क) ना. – गोमंतक; गोवाप्रांत.
गोव्रज (ಗೋವ್ರಜ) (सं) ना. – गोकुल, 'गोवृंद' पहा.
गोशाले (ಗೋಶಾಲೆ) (सं) ना. – गोशाळा; गोठा; गुरे बांधण्याची जागा; 'कोंट्टिगे' पहा; गुरघर.
गोष्टि (ಗೋಷ್ಟಿ) (अ. दे) ना. – शब्द; कथा; वार्तालाप.
गोष्ठ (ಗೋಷ್ಠ) (सं) ना. – गोशाळा; 'गोट्ट' पहा.
गोष्ठपति ಗೋಷ್ಠಪತಿ) (सं) ना. गोठ्याचा मुख्य; गोपालक.
गोष्ठश्व (ಗೋಷ್ಠಶ್ವ) (सं) ना. – गवानीतील कुत्रा; स्वतःला नाहीं नि दुसऱ्याला नाहीं ही वृत्ति.
गोष्ठि (ಗೋಷ್ಠಿ) (सं) ना. – सभा; बोलणेंचालणें; संभाषण; चर्चा; समाज; गोठा; कोठी.
गोष्पद (ಗೋಷ್ಪದ) (सं) ना. – गाईच्या पावलाएवढे संजाब; डोक्यावरील शेंडीचा घेरा; गाईचे पाऊल.
गोषवारे (ಗೋಷವಾರೆ) (अ. दे) ना. – तपशिलावरून काढलेला सारांश; अभिप्राय; तात्पर्य; संक्षिप्त उतारा; टांचण; निष्कर्ष; संक्षेप.
गोस (ಗೋಸ) (क) ना. – खेडें; समावेश; 'गोष्ठ' पहा.
गोसणे (ಗೋಸಣೆ) (अ. दे) ना. – घोषणा; जाहीरात; डांगोरा. डंका.
गोसर्ग (ಗೋಸರ್ಗ) (सं) ना. – गुरें सोडण्याची वेळ; उदयकाळ.
गोसायि (वि) (ಗೋಸಾಯಿ [ವಿ]) (सं) ना. – गोस्वामी; बैरागी; संन्यासी; विरक्त; पशुपति.
गोसुंबे ಗೋಸುಂಬೆ) (क) ना. – सरडा.
गोस्तन (ಗೋಸ್ತನ) (सं) ना. – अचळ; गाईचें स्तन; सड; कास; पुष्पगुच्छ; चारपदरी फुलांचा हार.
गोस्तनि(नी) (ಗೋಸ್ತನಿ [ನೀ])(सं) ना. – द्राक्षें; द्राक्षांचा घोस; चौपदरी हार.
गोस्वामि (ಗೋಸ್ವಾಮಿ) (सं) ना. – गोपालक; गोवर्धन.
गोहत्या (ಗೋಹತ್ಯಾ) (सं) ना. – गाईच्या हत्येचे महापाप; संन्यास; गौरव पदवी; इंद्रियवासनाचें दमन करणारा संन्यासी;
गोहुर (ಗೋಹುರ) (क) ना. – गोपुर' पहा.
गोळ (ळु) (ಗೋಳ [ಳು]) (क) ना. – हाक; विलाप; रड; दुःख; पाप; संकट; विवळणे; कण्हणे; गोल; गोंधळ; अनवस्था.
गोळ (ಗೋಳ) (क) ना. – घोळ; गिजबीज; घाबरेपणा; गडबड; गोळ, अस्ताव्यस्तता. वाकडेतिकडेपणा.
गोळाडु (ळिडु) (ಗೊಳಾಡು [ಳಿಡು]) (क) धा. – दीणवाणें ओरडणें; कोमेजणें; धैर्यानें राज्य चालविणें.

**गोळायल्ल** (इल) (ಗೊಳಾಯಲ್ಲ [ಇಲ]) (क) ना.—घोडेस्वार; राऊत; अश्वस्थ; पिंपळ.

**गोळागोळि** (ಗೊಳಾಗೊಳಿ) (क) ना.—कोलाहल; उसाभर; गोंधळ; गडबड.

**गोळि** (ಗೊಳಿ) (क) ना.—'गोलि' पहा; एक वनस्पति; घोळी.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.—तुपांत तळणें; तुपावर परतणें; भाजणें; घासणें; उगाळणें; कालविणें.

**गोळ्मुरिगोळ्** (ಗೊಳ್ಮುರಿಗೊಳ್) (क) धा.—मुंडी मुरगळणें; गळा दाबणें; ठार करणें.

**गौ** (ಗೌ) (सं) ना.—गाय; बैल.

**गौड** (ಗೌಡ) (क) ना.—प्रदेश; जातिविशेष; ताक; संगीतांतील एक राग; गांवचा प्रमुख; पाटील.

**गौडमार्ग** (रीति) } (ಗೌಡಮಾರ್ಗ [ರೀತಿ]) (सं) ना.—
**गौडीरीति** } (ಗೌಡೀರೀತಿ) काव्यातील एक शैली.

**गौडा** (ಗೌಡಾ) (सं) ना.—कमलबीज.

**गौडि** (ಗೌಡಿ) (क) ना.—गौडपत्नि; पाटलीण; गुळापासून झालेले; एक प्रकारची दारू.

**गौडीयारीति** (ಗೌಡೀಯಾರೀತಿ) (सं) ना.—काव्यशैली भेद.

**गौण** (ಗೌಣ) (सं) ना.—अमुख्य, दुय्यम, प्रतिनिधी.
(सं) वि. गुणांसंबंधी; लाक्षणिक; अलंकारिक.
—**पक्ष** (ಪಕ್ಷ) (सं) ना.—अमुख्य सिद्धांत.

**गौतम** (ಗೌತಮ) (सं) ना.—गोतम कुलात जन्मलेला; मेधातिथि; नचिकेताचा पिता; शतानंदमुनि; बुद्ध; भारद्वाज; अहल्यापति.

**गौतमि** (ಗೌತಮಿ) (सं) ना.—एक नदी; राक्षसी; द्रोणपत्नि; गोरोचन; दुर्गा; कुशी; गोदावरी.

**गौर** (ಗೌರ) (सं) वि.—पांढरे; पिवळसर; लालसर; कुंकुम केशरी; चकाकणारे; तेजस्वी.
(क) ना.—पांढरी मोहरी; चंद्र; शुद्धात्मा.

**गौरव** (ಗೌರವ) (सं) ना.—गुरुत्व; भार; मोठेपणा; घनता; आदर; मान; प्रमुखता; श्रेष्ठता; वडीलकी.

**गौरांगप्रभु** (ಗೌರಾಂಗಪ್ರಭು) (सं) ना.—चैतन्य स्वामी; कृष्णभक्त.

**गौरिका** (ಗೌರಿಕಾ) (सं) ना.—मैना; राघूचें पिलूं; पोपट.

**गौरी** (ಗೌರೀ) (सं) ना.—पार्वती; गौरीदेवी; पिवळा रंग; निर्मल; शुद्ध; सोवळी; अष्टवर्षा; घास; कवळ.

**गौरीकांत** (ಗೌರೀಕಾಂತ) (सं) ना.—गौरीपति; शिव.

**गौळ** (ಗೌಳ) (क) ना.—एक देश; संगीतांतील एक राग; गौड.

**गौळि** (ಗೌಳಿ) (क) ना.—पाल; गवळण.

**ग्नान** (ಗ್ನಾನ) (अ-दे) ना.—ज्ञान; समजूत; बुद्धिमानता.

**ग्नापक** (ಗ್ನಾಪಕ) (अ-दे) ना.—ज्ञापक; ज्ञप्ति; आठवण.

**ग्रथन** (ಗ್ರಥನ) (सं) ना.—बांधणूक; ओवणी; वीण; रचना.

**ग्रथित** (ಗ್ರಥಿತ) (सं) वि. बांधलेलें; रचलेलें; ओवलेलें.

**ग्रंथि** (ಗ್ರಂಥಿ) (सं) ना.—गाठ; पोतडें; गड्डा; देहांतील रसग्रंथी.

**ग्रंथिक** (ಗ್ರಂಥಿಕ) (सं) वि.—ग्रंथासंबंधी; ग्रंथवाचन केलेला; गुंफलेला; वांती झालेला.

**ग्रसन** (ಗ್ರಸನ) (सं) ना.—गिळणें; स्वाहा; मटकाव; पक्कड; कवळ; घोट.

**ग्रस्त** (ಗ್ರಸ್ತ) (सं) वि.—पकडलेले; खाल्लेले; ग्रासलेले; अस्पष्ट.

**ग्रह** (ಗ್ರಹ) (सं) ना.—सूर्यचंद्रादि ग्रह; भूतपिशाच्च; स्वीकार; मान्यता; युद्धसिद्धता.

**ग्रहचार** (ಗ್ರಹಚಾರ) (सं) ना.—ग्रहगतीनें मिळणारे लाभालाभ.

**ग्रहचिंतक** (ಗ್ರಹಚಿಂತಕ) (सं) ना.—ज्योतिषी; जातक सांगणारा.

**ग्रहपति** (ಗ್ರಹಪತಿ) (सं) ना.—सूर्य; चंद्र; गुरु.

**ग्रहणि** (ಗ್ರಹಣಿ) (सं) ना.—अतिसार; संग्रहणी; लहान मुलांचा एक रोग.

**ग्रहद्रुम** (ಗ್ರಹದ್ರುಮ) (सं) ना.—पांढरीचें झाड; लहान झाड.
—**फल** (ಫಲ) (सं) ना.—पांढरीचीं फळें.

**ग्रहराज** (ಗ್ರಹರಾಜ) (सं) ना.—'ग्रहपति' पहा.

**ग्रहशांति** (ಗ್ರಹಶಾಂತಿ) (सं) ना.—पीडाकर ग्रहांची शांति.

**ग्रहसंगम** (ಗ್ರಹಸಂಗಮ) (सं) ना.—ग्रहांची युति.

**ग्रहिके** (ಗ್ರಹಿಕೆ) (सं) ना.—समजूत; स्वीकार; ग्रहीत गोष्ट.

**ग्रहिसु** (ಗ್ರಹಿಸು) (क) धा.—समजून घेणें; स्वीकारणें; ग्रहीत धरणें.

**ग्राम** (ಗ್ರಾಮ) (सं) ना.—खेडें; जनांग; देश; संकुल; समूह; रागभेद; भोग; रेतस; इंद्रिय; समुद्र; किरण; शब्द; ध्वनि; भूत.
—**कंटक** (ಕಂಟಕ) (सं) ना.—उपद्रव्यापी; खेड्यांत भांडणें लावणारा.

**ग्रामणि** (ಗ್ರಾಮಣಿ) (सं) ना.—कौशिक; ग्राममुख्यस्थ; व्यभिचारिणी.
(सं) वि.—उत्तम; श्रेष्ठ.

**ग्रामते** (ಗ್ರಾಮತೆ) (क) ना.—खेड्यांचा समूह.

**ग्रामरुह** (ಗ್ರಾಮರುಹ) एरंडाचें झाड.

**ग्रामशार्दूल** (ಗ್ರಾಮಶಾರ್ದೂಲ) (सं) ना.—ग्रामसिंह; कुत्रा; कुक्कुर; श्वान.

**ग्रामांतिक** (ಗ್ರಾಮಾಂತಿಕ) (सं) ना.—खेड्याचा आसमंत प्रदेश.

**ग्रामीण** (ಗ್ರಾಮೀಣ) (सं) वि.—गांवढळ; अनागरिक; हुंब; असंस्कृत.

**ग्रामीणे** (ಗ್ರಾಮೀಣೆ) (सं) ना.—नीळ; निळा रंग.

**ग्राम्य** (ಗ್ರಾಮ್ಯ) (सं) वि.—खेडूत; खेडवळ; असंस्कृत; असभ्य; अश्लील; जनपदरीति.

ग्राव (ಗ್ರಾವ) (सं) ना.—दगड; पर्वत; आकाश; अभ्र; ढग; धीटपणा; धैर्य.

ग्रावाल (ಗ್ರಾವಾಳ) (सं) वि.—दगड; कांतमणि; स्फटिक.

ग्रास (ಗ್ರಾಸ) (सं) ना.—घास; घोट; आहार; कवळ.

ग्राह (ಗ್ರಾಹ) (स) ना.—मगर; सुसर; पाणहत्ती; नक्र; ग्रहण; संयमन; पकड.

ग्राहक (ಗ್ರಾಹಕ) (सं) ना.—स्वीकारणारा; घेणारा; गिन्हईक.
 —यंत्र (ಯಂತ್ರ) (सं) ना.—फोटो काढण्याचे यंत्र; कॅमेरा.
 —शक्ति (ಶಕ್ತಿ) (सं) ना.—आकलनशक्ति; ग्रहणशक्ति.

ग्राहि (ಗ್ರಾಹಿ) (सं) ना.—परिशीलन; परिग्रहण; समजूत; स्वीकार; मूर्छा; देव्य; झंझावात; सोसाटा.

ग्राह्य (ಗ್ರಾಹ್ಯ) (सं) वि.—स्वीकार्य; स्वीकरणीय; योग्य; ग्रहण करण्यासारखें.

ग्रीव (वा) (वे) (ಗ್ರೀವ [ವಾ] ವೆ]) (सं) ना.—मान; गळा; कंठ; मुंडी.

ग्रीष्म (ಗ್ರೀಷ್ಮ) (सं) ना.—उष्णऋतु; उन्हाळा; उकाडा; तगमग.
 (सं) वि.—उष्ण; ऊन; तापलेले.
 —राज (ರಾಜ) (सं) ना.—वसंतऋतु; उन्हाळा.

ग्रैवेय (यक) (ಗ್ರೈವೇಯ [ಯಕ]) (सं) ना.—कंठाभरण; गळ्यातील हार; हत्तीच्या मानेभोवतीचा पट्टा.

ग्लपन (ಗ್ಲಪನ) (सं) ना.—निस्तेजता; ग्लानि; सुस्ती; खिन्नता; मांद्य.

ग्लह (ಗ್ಲಹ) (सं) ना.—स्पर्धा; पण; चढाओढ; मुष्टियुद्ध; द्यूत; सोंगट्याचा खेळ.

ग्लान (ಗ್ಲಾನ) (सं) वि.—दमलेला; थकलेला; वापरलेला; कोमेजलेला.
 (सं) ना.—अशक्तपणा; वापर; थकवा.

ग्लानि (ಗ್ಲಾನಿ) (सं) ना.—आयास; थकवा; श्रम; दमणूक; हानी; वीर्यनाश; असंतुष्टता; दुःख; भीती; चिंता; तळमळ; आतुरता; वापर; दुखणें.

ग्लौ (ಗ್ಲೌ) (सं) ना.—चंद्र; शशी.

## घ

घ (ಘ) (सं) ना.—क वर्गातील चौथें व्यंजन.

घट (ಘಟ) (सं) ना.—देह; मातीचें भांडें; घागर; घडा; समावेश; संग्रह; ऐनरंग; हत्तीचा कळप; काठ; शेवट; पदर; वटक.
 (सं) वि.—मिसळण्यासारखे; जुळते; जुळणारे.

घटक (ಘಟಕ) (सं) ना.—मिसळणारा; जोडीदार; सवंगडी; सैन्याचा मालक; बलवंत; धैर्यधर; समावेश; अवयव.

घटन (ना) (ने) (ಘಟನ [ನಾ] ನೆ]) (सं) ना.—प्रसंग; संनिवेश, प्रयत्न; साधन; नियम; शासन; प्रक्रिया; संभाव्यता; भवितव्यता.
 —बद्ध (ಬದ್ಧ) (सं) वि.—शासनसंबद्ध; नियमबद्ध.

घटनावलि (ಘಟನಾವಳಿ) (सं) ना.—नियमावलि; प्रसंग; परंपरा; संघ-संस्थांचे नियम.

घटयोगि (ಘಟಯೋಗಿ) (सं) ना.—घटांत जन्मलेला; द्रोण; अगस्ति.

घटवाद्य (ಘಟವಾದ್ಯ) (सं) ना.—मृदंगासारखे वाद्य; गाडग्याचे तोंडावर चामडे लावून केलेले वाद्य.

घटसर्प (ಘಟಸರ್ಪ) (सं) ना.—एक रोग; भयंकर सर्प; सर्प रोग.

घटि (टी) } (ಘಟಿ [ಟೀ]) (सं) ना.—घटका; २४
घटिका (के) } (ಘಟಿಕಾ [ಕೆ]) मिनिटांचा अवधि; वेळ; बिंदगा; जलपात्र; गाडगें; झांगट; तास; पंचवाद्यांपैकीं एक.

घटिकाशत (ಘಟಿಕಾಶತ) (सं) ना.—घटकाभरांत १०० पद्यें रचणारा कवि.

घटित (ಘಟಿತ) (सं) वि.—मिश्रित; समाविष्ट; चालू होऊन गेलेले; संभूत.

घटियिसु } (ಘಟಿಯಿಸು) (क) धा.—होणें; जन्मणें; जमविणें;
घटिसु } (ಘಟಿಸು) मिसळणें.

घटियंत्र (ಘಟಿಯಂತ್ರ) (सं) ना.—गडगडा; रहाट; विहिरीतून पाणी काढण्याचें चाक; बञ्याळ; रहाटगाडगे.

घटे (टा) (ಘಟೆ [ಟಾ]) (सं) ना.—गांधड; रास; गजदल; हत्तीचा कळप; प्रयत्न; साहस.

घटोत्कच (ಘಟೋತ್ಕಚ) (सं) ना.—भीम-हिडंबा पुत्र.

घटोद्भव (ಘಟೋದ್ಭವ) (सं) ना.—द्रोण; अगस्ति.

घट्ट (ಘಟ್ಟ) (सं) ना.—घाट; नदीतीरावरील घाट; पर्वतावलि; माळी; स्पर्श; धक्का; आदळआपट; आस्फालन; तळ.

घट्टण (णे) } (ಘಟ್ಟಣ [ಣೆ]) (सं) ना.—स्पर्श; मिश्रण;
घट्टन (ना) } (ಘಟ್ಟನ [ನಾ]) मीलन; घर्षण; चलन; झगडा; मार; घाव; जखम; घाय.

घट्टाघट्टी (ಘಟ್ಟಾಘಟ್ಟೀ) (सं) ना.—मारामारी; मारपीट.

घट्टि (ಘಟ್ಟಿ) (सं) ना.—बलशाली, कठिण, भरीव वस्तु; लोखंडी सळी.

घट्टित (ಘಟ್ಟಿತ) (सं) वि.–जबरदस्तीनें जोडलेलें; ठोकलेलें; हलविलेलें; मारलेलें.
घट्टिवळित (ಘಟ್ಟಿವಳಿತ) (सं) ना.–उदकाडी; गंध उगाळणारी.
घट्टिसु (ಘಟ್ಟಿಸು) (क) धा.–ठोकणें; मारणें; घडी घालणें; समर्थ होणें.
घडियार (ळ) (ಘಡಿಯಾರ [ಳ]) (अ. दे.) ना.–वेलायंत्र; घड्याळ.
घंटा (ಘಂಟಾ) (सं) ना.–घणघणणारे वाद्य; कालावधि; तास; लोखंडी लेखणी.
—मणि (ಮಣಿ) (सं) ना.–घंटा वाजवण्याचा ठोका; टिपरी.
—रव (ರವ) (सं) ना.–घंटेचा आवाज; घणघण.
घंटाकर्ण (ಘಂಟಾಕರ್ಣ) (सं) ना.–शिवगण; कार्तिकेयाचा गण.
घंटापथ (ಘಂಟಾಪಥ) (सं) ना.–राजमार्ग; हमरस्ता; प्रमुखपथ.
घंटिके (ಘಂಟಿಕೆ) (सं) ना.–लहान घंटा; घुंगुर; पैंजण; किंकिणी.
घन (ಘನ) (सं) वि.–मोठा; श्रेष्ठ; भरीव; भक्कम; तीच संख्या तीनदा घेऊन केलेला गुणाकार; गौरवित.
(सं) ना.–वजनदार वस्तु; मुद्गर; बल; गड्डा; ढग; देह; वन; वेदपठणरीति; पाणी; मोह; नृत्यविधान; रणकंदन; खून; योगी; वनवास; मेघ.
—पथ (ಪಥ) (सं) ना.–आकाश; गगन.
—पाठी•(ಪಾಠಿ) (सं) ना. वैदिक; घनपाठ म्हणणारा.
घनपुष्प (ಘನಪುಷ್ಪ) (सं) ना.–मेघपुष्प; पाणी.
घनदीप्ति (ಘನದೀಪ್ತಿ) (सं) ना.–वीज; ढगांतील प्रकाश.
घनमहिम (ಘನಮಹಿಮ) (सं) ना.–अपार शक्तिशाली देवता; अनंतमहिमा असणारी देवता.
घनरव (ಘನರವ) (सं) ना.–गडगडाट; विजेचा कडकडाट; वीज.
घनरस (ಘನರಸ) (सं) ना.–पाणी; काढा; द्रवपदार्थ; कापूर.
घनश्याम (ಘನಶ್ಯಾಮ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण; राम; ढगाचा रंग असलेला.
घनसमय (ಘನಸಮಯ) (सं) ना.–वर्षाऋतु; पावसाळा.
घनसार (ಘನಸಾರ) (सं) ना.–कापूर; पाणी; गारा; बर्फ.
घनाघन (ಘನಾಘನ) (सं) ना.–जलद; पाऊस; पाणी देणारा ढग; मस्तीला आलेला हत्ती; दुष्ट; क्रूर; देवेंद्र; संबंध, ऐक्य; समूह; ऐरावत.
घनिसु (ಘನಿಸು) (क) धा.–घट्ट होणें; सांद्र होणें; भरीव होणें; भक्कम होणें.
घनीभूत (ಘನೀಭೂತ) (सं) वि.–घट्ट झालेले; भरीव; घनघोर; दाट.
घनोपल (ಘನೋಪಲ) (सं) ना.–'अलिकल्लु' पहा. गारा; ओले.
घरट्ट (ಘರಟ್ಟ) (सं) ना.–जातें; दळण्याचें साधन.
—इसु (ಇಸು) (क) ना.–दळणें; फिरवणें; पूड करणें; पीठ करणें.
घर्घर (ಘರ್ಘರ) (सं) ना.–घरघर; डुकराचें ओरडणें; कर्कशध्वनि.
घर्घरिके (ಘರ್ಘರಿಕೆ) (सं) ना.–घंटामाळ; घंटातरंग; घर्घर.
घर्म (ಘರ್ಮ) (सं) ना.–घाम; उकाडा; 'गम्म' पहा. ऊन; ताप; उष्णता.
—अंबुकण (ಅಂಬುಕಣ) (सं) ना.–घामाचे थेंब; घर्मबिंदु.
घर्मोत्तर (ಘರ್ಮೋತ್ತರ) (सं) ना.–तीव्र उकाडा.
घर्षण(णे) (ಘರ್ಷಣ [ಣೆ]) (सं) ना.–घासणें; उजेड; शांत होणें.
घसणे (ಘಸಣೆ) (क) ना.–अंतक; चिंता; संकट; घर्षण; भांडण; वादावादी; चर्चा.
घाळिल्(लेने) (ಘಳಿಲ್ [ಲೆನೆ]) (क) अ.–लौकर; शीघ्र; त्वरया; आवाज करीत.
घाट (ಘಾಟ) (अ. दे.) ना.–'घट्ट' पहा.
घात (ಘಾತ) (सं) ना.–पेरें; मार; गुणाकार; मरण; हानी; नोकर.
घातक (ಘಾತಕ) (सं) वि.–घात करणारा; खुनी; कपटी.
घातळिके (ಘಾತಳಿಕೆ) (क) ना.–वाईट करण्याची वृत्ति; दुरुद्देश.
घाताळि (ಘಾತಾಳಿ) (क) वि.–खुनी; हिंसक; द्रोही; वाईट चिंतणारा.
घाति (ಘಾತಿ) (सं) ना.–मार; हानी; मरण; घात; गुणाकार; पक्षी धरण्याचें जाळें; अनादि कर्मवासना.
घातुक (ಘಾತುಕ) (सं) वि.–खुनी; कपटी; विध्वंसक; द्रोही.
घास (ಘಾಸ) (क) ना.–कवळ; आहार; गवत; घास.
घासि (ಘಾಸಿ) (सं) ना.–हिंसा; दमणूक; श्रम; दुखणें; वापर; फसवणूक; कष्ट; आयास; मार; नाश.
घींकार (ಘೀಂಕಾರ) (सं) ना.–हत्तीचा चीत्कार.
घुणाक्षरन्याय (ಘುಣಾಕ್ಷರನ್ಯಾಯ) (सं) ना.–सहज घडणारी गोष्ट; असंकलित घटना.
घूक (ಘೂಕ) (सं) ना.–कौशिक; घुबड; दिवाभीत; उलूक.
घूर्णन (ಘೂರ್ಣನ) (सं) ना.–चलनवलन; कंपन; वेष्टन; प्रदक्षिणा.
—इसु (ಇಸು) (क) धा.–विस्तारणें; कंप येणें; हलणें; फिरणें; गुंडाळणें; गर्जना करणें; पाहणें; कूस बदलणें.
घृणि (ಘೃಣಿ) (सं) ना.–उष्णता; किरण; कांती; प्रकाश; ज्वाला; तेज; असंतोष; तिरस्कार; जुगुप्सा; कोमल द्रव्य.
घृणा(णे) (ಘೃಣಾ [ಣೆ]) (सं) ना.–दया; सद्भावना; जुगुप्सा; कींव; निंदा.
घृत (ಘೃತ) (सं) ना.–तूप; पाणी; मध; अमृत; जलसिंचन.

**घृष्टि** (ಘೃಷ್ಟಿ) (सं) ना.—दळण; घर्षण; मर्दन; खलन.
**घोट (टक)** (ಘೋಟ [ಟಕ]) (सं) ना.—घोडा; अश्व.
**घोटायिल** (ಘೋಟಾಯಿಲ) (क) ना.—घोडेस्वार; राऊत; 'गोलाइल' पहा.
**घोण(णे)** (ಘೋಣ [ಣೆ]) (सं) ना.—नाक; घुणा; घ्राण; नासिका.
**घोर** (ಘೋರ) (सं) वि.—भयंकर; क्रूर; बलिष्ठ; शिव.
**—मूर्ति** (ಮೂರ್ತಿ) (सं) ना.—भैरव.
**घोष** (ಘೋಷ) (सं) ना.—जोराची हाक; गर्जना; घोषणा; डांगोरा; नदीतीरावरील गौळवाडा; खेडे; गलबा; कोलाहल; हूल.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.—घोषणा करणें; स्पष्ट सांगणें; सांगून टाकणें.
**घोषणे** (ಘೋಷಣೆ) (सं) ना.—निवेदन; प्रगटण; डांगोरा; म्हणणें.
**घोळ** (ಘೋಳ) (क) ना.—घोडा; 'घोट' पहा. भानगड.
**घ्राण** (ಘ್ರಾಣ) (सं) ना.—वास; परिमळ; नाक; नासिका.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.—वास घेणें; हुंगणें.
**घ्राणीय** (ಘ್ರಾಣೀಯ)(सं) वि.—वास घेण्यायोग्य; हुंगण्यायोग्य.
**घ्राणेंद्रिय** (ಘ್ರಾಣೇಂದ್ರಿಯ) (सं) ना.—नासिका; नाक.
**घ्रात** (ಘ್ರಾತ) (सं) वि.—वास घेतलेलें; हुंगलेलें.

## ङ

ङ (ಙ) (सं) ना.—क वर्गातील पांचवें व्यंजन; कवर्गीय अनुनासिक; या अक्षराने आरंभ होणारा शब्द नाहीं.

## च

**च** (ಚ) (सं) ना.—'च वर्गातील पहिले व्यंजन; चंद्र; कासव; चोर; निश्चय.
(सं) अ.—आणि व आणखी.
**चकमक** (ಚಕಮಕ) (क) ना.—चकाकी; कांती; प्रकाश; ओप; लकाकी; चमक.
**चकचकित** (ಚಕಚಕಿತ) (क) वि.—चकाकणारे तेजस्वी; घासून स्वच्छ केलेले; लकलकीत.
**चकडा** (ಚಕಡಾ) (अ. दे) ना.—छकडी; शकट; बैलगाडी; घोटी; छका; फळ काढण्याचा आकडा.
**चकमकि** (ಚಕಮಕಿ) (क) ना.—अग्निप्रस्तर चकमक; ठिणगी पडणारी गार; गरमागरम चर्चा; चुरशीची चढाओढ; स्पर्धा.
**चकळगुळि** (ಚಕಳಗುಳಿ) (क) ना.—गुदगुल्या; आनंदाची उकळी; सुखकर स्पर्श.
**चकार** (ಚಕಾರ) (सं) ना-—'च' नामक शब्द; कोणता हि उच्चारशब्द.
**चकास** (ಚಕಾಸ) (सं) वि.—विकसित; चकाकणारे; स्पष्टीकृत.
**चकित** (ಚಕಿತ) (सं) वि.—आश्चर्यावह; भयभीत; कंपित; भ्यालेला.
**चकिल** (ಚಕಿಲ) (सं) वि.—चकाकणारा; लकाकणारा; तेजस्वी.
**चको (क्को) त** (ಚಕೋ [ಕ್ಕೋ] ತ) (क) ना.—राजगिऱ्याचे साळ; चाकवताची भाजी; गोड लिंबू.
**चकोर (क)** (ಚಕೋರ [ಕ]) (सं) ना.—चकोरपक्षी; चंद्रकिरणावर जगणारा पक्षी; चांदण्यात फिरणारा पक्षी.
**चकोरि (री)** } (ಚಕೋರಿ [ರೀ]) (सं) ना. चकोर मादी.
**चकोरिका(के)** } (ಚಕೋರಿಕಾ [ಕೆ])
**चक्क** (ಚಕ್ಕ) (सं) ना.—चक्र.
(सं) वि.—चकाकणारे; चोख; षट्क; सहाचा संकेत.
**—चौक** (ಚೌಕ) (क) ना.—चौरस; हमचौक; चौथरा.
**चक्कडि** (ಚಕ್ಕಡಿ) (क) ना.—बैलगाडी; छकडी; शकट.
**चक्कने** (ಚಕ್ಕನೆ) (क) अ.—लागलींच; ताबडतोब; अकस्मात; एकदम; झटकन; लौकर.
**चक्कंद** (ಚಕ್ಕಂದ) (क) ना.—विलास; विनोद; गप्पा; वेळ काढण्यासाठी पिटलेल्या चकाट्या; संतोष; तृप्ति.
**चक्करिसु** (ಚಕ್ಕರಿಸು) (क) धा.—मेंढीचे में मे; बें बें करणें.
**चक्कलगुळि** (ಚಕಲಗುಳಿ) (क) ना.—'चक्कलगुळि' पहा. गुदगुल्या.
**चक्कळ** (ಚಕ್ಕಳ) (क) ना.—चर्म; साल; वेत—वेळुपासून केलेली चटई; बाजले; बाजा.
**चक्कळि**(ಚಕ್ಕಳಿ) (क) ना.—चकती; साल; दाबानें आलेला चपटेपणा; आवरण; कात; मेंग.
**चक्कुबंदि** (ಚಕ್ಕುಬಂದಿ) (अ)-दे) ना.—चक्कबंदी; स्थळाची चतुःसीमा.
**चक्कुलि** (ಚಕುಲಿ) (क) ना.—चकली; षट्कली; सहा कडा असलेली वस्तु; चष्कुली; तळलेला खाद्यपदार्थ.

**चक्के (चेक्के)** (ಚಕ್ಕೆ [ಚೆಕ್ಕೆ]) (क) ना.–लाकडाची छकलें; शक्की; ढलपी.
**चक्कोत** (ಚಕ್ಕೋತ) (क) ना.–राजगिरा; चकोरपक्षी.
**चक्रदंत** (ಚಕ್ರದಂತ) (सं) ना.–दंतुरचाक; दाते असलेले चाक.
**चक्रधर** (ಚಕ್ರಧರ) (सं) ना.–चक्रधारी विष्णु; कृष्ण; कुलाल; कुंभार.
**चक्रधारा (रे)** (ಚಕ್ರಧಾರಾ [ರೆ]) (सं) ना.–चक्राची धाव; चक्रायुधाची धार; चक्राची बाहेरील धारदार बाजू.
**चक्रपाणि** (ಚಕ್ರಪಾಣಿ) (सं) ना.–हाती चक्र धरणारा; 'चक्रधर' पहा.
**चक्रबड्डी** (ಚಕ್ರಬಡ್ಡಿ) (क) ना.–चक्रवाढव्याज.
**चक्रवाक** (ಚಕ್ರವಾಕ) (सं) ना.–दंपतीपक्षी; चक्रवाकपक्षी.
**चक्रवाल** (ಚಕ್ರವಾಲ) (सं) ना.–लोकालोक पर्वत; पृथ्वीभोवती कल्पिलेली पर्वतांची ओळ.
**चक्रवाळ** (ಚಕ್ರವಾಳ) (सं) ना.–मंडल; उंच पठार.
**चक्रवृद्धि** (ಚಕ್ರವೃದ್ಧಿ) (सं) ना.–चक्रवाढव्याज.
**चक्रव्यूह** (ಚಕ್ರವ್ಯೂಹ) (सं) ना.–चक्राकार सैन्यरचना विशेष.
**चक्रसन्ने** (ಚಕ್ರಸನ್ನೆ) (क) ना.–ब्रेक; चक्रगति थांबवण्याचें यंत्र; खरडी; गतिरोधक.
**चक्रांग** (ಚಕ್ರಾಂಗ) (सं) ना.–चक्रवाक; रथ; हंस; एक स्थूलकाय प्राणी.
**चक्रांगि** (ಚಕ್ರಾಂಗಿ) (सं) ना.–हंसी; चकोरी.
**चक्रादि** (ಚಕ್ರಾದಿ) (सं) ना.–नदीचें वळण; ओढ्याचें वळण; प्रवाहांतील भोवरा.
**चक्रायुध** (ಚಕ್ರಾಯುಧ) (सं) ना.–चक्र हेच आयुध वापरणारा; विष्णु; कृष्ण; चक्रपाणी.
**चक्रि** (ಚಕ್ರಿ) (सं) ना.–चक्रधारी; विष्णु; कृष्ण; कुंभार; सर्प; चक्रवाक; गाढव; चक्रवर्ति राजा.
**चक्रिपति** (ಚಕ್ರಿಪತಿ) (सं) ना.–खेचर; वाजितर.
**चक्रिकावर्ति** (ಚಕ್ರಿಕಾವರ್ತಿ) (सं) ना.–वंचक; कपटी.
**चक्रीवत्** (ಚಕ್ರೀವತ್) (सं) ना.–गाढव; खर.
**चक्रेश (श्वर)** (ಚಕ್ರೇಶ [ಶ್ವರ]) (सं) ना.–सार्वभौम; चक्रवर्ति; विष्णु.
**चक्लि** (ಚಕ್ಲಿ) (क) ना.–चिंचेचें झाड; फराळ; चक्कली; चकली; कोरडा फराळ.
**चक्षण** (ಚಕ್ಷಣ) (सं) ना.–दिसणारा; समजून येणारा; उत्तेजक पेय; समजूत; गोष्ट; म्हणणें; नांव; हाक.
**चक्षु** (ಚಕ್ಷು) (सं) ना.–डोळा; बृहस्पति; शिक्षक; अध्यात्मज्ञान देणारा; दृष्टि; दृश्य.
**—विषय** (ವಿಷಯ) (सं) वि.–दृष्टिपथांत येणारा.
**चक्षुश्रव (वस्)** (ಚಕ್ಷುಶ್ರವ [ವಸ್]) (सं) ना.–सर्प; नेत्र हेच कान आहेत ज्याला असा साप.
**चक्षुष्य** (ಚಕ್ಷುಷ್ಯ) (सं) वि.–मनोहर; सुंदर; प्रेक्षणीय.
**चग (गा) चे** (ಚಗ [ಗಾ] ಚೆ) (क) ना.–तगरीचें झाड; वृक्षविशेष.
**चं, (चेम्) (चेन्)** (ಚಂ [ಚೆಂ] ಚೆನ್) (क) वि.–तांबडा लाल.
**चंकसत्** (ಚಂಕಸತ್) (सं) वि.–अति चकाकणारे; झळकणारे; दैदीप्यमान.
**चंक्रमण** (ಚಂಕ್ರಮಣ) (सं) ना.–गति; येरझारा; पुढें चालणें; बौद्ध यतीचें आत्मनिरीक्षण; पुनःपुनः पाहून चूक शोधणें.
**चंगणगिलु** (ಚಂಗಣಗಿಲು) (क) ना.–'चेंगण गिलु' पहा.
**चंगदिर** (ಚಂಗದಿರ) (क) ना.–'चेंगदिर' पहा.
**चंगने** (ಚಂಗನೆ) (क) अ.–लागलीच; त्वरित; झटकन्.
**चंगलवे** (ಚಂಗಲವೆ) (क) ना.–'चेंगलवे' पहा.
**चंगळे** (ಚಂಗಳೆ) (क) ना.–चांगुणादेवी; चांगळादेवी; शिराळशेटची पत्नि.
**चंगु** (ಚಂಗು) (क) धा.–उडणें; उडी मारणें; अभिवृद्धि होणें; वर चढणें; प्रकाशांत येणें; चकाकणें; 'चेंगु' पहा.
(क) ना.–उडी; टणाटणा उडी.
(क) वि.–वक्र; वाकडा.
**चंगाट** (ಚಂಗಾಟ) (क) ना.–थयथयाट; नाचगाणें; हसेखिदळ.
**चंगूलि** (ಚಂಗೂಲಿ) (क) ना.–रोजमजुरी; रोजमजूर.
**चच्चकार** (ಚಚ್ಚಕಾರ) (क) ना.–संगीतामध्यें पायानें धरलेला ताल; तालयुक्त पदन्यास.
**चच्चर** (ಚಚ್ಚರ) (क) अ.–सत्वर; लागलींच; ताबडतोब; हुषारीनें.
**चच्चु** (ಚಚ್ಚು) (क) धा.–ठेचणें; कुटणें; मारणें; चोप देणें; चेंचणें; धान्य पाखडणें; आसडणें; वेचणें; कोचणें.
**चंच** (ಚಂಚ) (क) ना.–शबर; बेरड; पारधी.
**चंचत्** (ಚಂಚತ್) (सं) वि.–चकाकणारा; प्रकाशणारा; थरथरणारा; कापणारा; उड्या मारणारा; चंचल.
**—रूप** (ರೂಪ) (सं) ना.–अस्थिर प्रतिबिंब; हलतें बिंब.
**चंचर (रि)** (ಚಂಚರ [ರಿ]) (सं) ना.–भ्रमर; मधमाशी; काळी मधमाशी.
**चंचल** (ಚಂಚಲ) (सं) वि.–हलणारी; अस्थिर.
(सं) ना.–वीज; रानमैना; हवा; व्यभिचारिणी.
**—अपांग** (ಅಪಾಂಗ) (सं) ना.–अस्थिर दृष्टि.
**—नेत्र** (ನೇತ್ರ) (सं) ना.–चंचलाक्षी.

चंचले (ಚಂಚಲೆ) (सं) ना.—लक्ष्मीदेवी; संपत्ति; वीज; चंचल स्वभावी स्त्री.

चंचि (ಚಂಚಿ) (क) ना.—पानसुपारी ठेवण्याची पिशवी. शबरी; 'संचि' पहा.

चंचिति (ಚಂಚಿತಿ) (क) ना.—शबरी; भिल्लीण.

चंचु (ಚಂಚು) (सं) ना.—चोंच; पक्षाचें नाक; शबरालय; लाल एरंड.

(सं) वि.—जाणता; प्रसिद्ध; यथासांग; सशास्त्र.

—घात (ಘಾತ) (सं) ना.—चोचीचा टोचा; चोच मारणें.

चंचुपुट (ಚಂಚುಪುಟ)(सं)ना.—मिटलेली चोच; झाकलेली चोंच.

चंचुर (ಚಂಚುರ) (सं) वि.—निपुण; कुशल; चतुर; मनोहर.

चट (ಚಟ) (क) ना.—चटचट शब्द; आसक्ति; चाळा; दुरभ्यास; खोड; रूढी; नाद; व्यसन.

चटक (ಚಟಕ) (सं) ना.—चिमणी; चिमणा.

चटकश्राद्ध (ಚಟಕಶ್ರಾದ್ಧ) (सं) ना.—एक श्राद्धविधि; पिंडाविना श्राद्ध.

चटकायिसु (ಚಟಕಾಯಿಸು) (क) धा.—चटकन कापणें; थोडक्यांत उडवून देणें.

चटके (ಚಟಕೆ) (सं) ना.—चिमणी; चिमणीचें पिलू.

चटक्कने (ಚಟಕ್ಕನೆ) (क) अ.—झटकन; त्वरित; लौकर; लागलींच.

चटल्लने (ಚಟಲ್ಲನೆ) (क) अ.—'चटक्कने' पहा.

चटवटिके (ಚಟವಟಿಕೆ) (क) ना.—तीव्रता; चतुरता; चापल्य; कार्यकलाप; चळवळ.

चटाकु (ಚಟಾಕು) (क) ना.—छटाक; पाच तोळे वजन.

चटिके (गे) (ಚಟಿಕೆ [ಗೆ]) (क) ना.—रुंद तोंडाचें गाडगें; चट्टि; मोघा.

चटुल (ಚಟುಲ) (सं) वि.—हलणारें; कापणारें; चंचल; अस्थिर; कच्चे; सुंदर; विनयशील; क्रूर.

चटुलते (लिते) (ಚಟುಲತೆ [ಲಿತೆ]) (सं) ना.—थरकाप; आंदोलन; तीक्ष्णता.

चटुवटिके (ಚಟುವಟಿಕೆ) (क) ना.—'चटवटिके' पहा.

चटूक्ति (ಚಟೂಕ್ತಿ) (सं) ना.—मुखस्तुति; तोंडपुजेपणा; लाळघोटेपणा.

चटूरिसु (ಚಟೂರಿಸು) (क) ना.—फसविणें; वंचना करणें; विश्वासघात करणें; काळजाला हात घालणें.

चट्ट (ಚಟ್ಟ) (क) ना.—छात्र; विद्यार्थी; अनुयायी; गाळून किंवा पाखडून काढलेला कचरा; पठार; सपाट प्रदेश; चोखपणा; गाडीची चौकट; पलंग; खुर्ची; चित्राची चौकट; तिरडी; युक्ति; व्यवस्था; नियम.

(क) वि.—स्वच्छ; साफ.

चट्टने (ಚಟ್ಟನೆ) (क) अ.—लागलींच; एकदम; झटकन.

चट्टि (ಚಟ್ಟಿ) मातीचें भांडें; मोघा; पारडें; षष्टि.

चट्टिरि (ಚಟ್ಟಿರಿ) (क) धा.—उटी लावणें; लेपणें.

चट्टु (ಚಟ್ಟು) (क) ना.—सपाट जमीन; चपटेपणा; छकडीची आंतील बैठक; छत; वितान; अशुद्धता; नाश; खून; कठीणता; पालखीचें छत; बिब्बा; टरफलाचें बी; घाणेरडेपणा.

—आगु (ಆಗು) (क) धा.—चपटें करणें; नाश होणें; मरणें.

—बडि (ಬಡಿ) (क) धा.—नासणें; मागें खेचणें; पातळ करणें.

चट्टेकार (ಚಟ್ಟೆಕಾರ) (क) ना.—चट्टीपट्टी करणारा; युरोपियन पेहराव करणारा; मिश्र रक्तानें जन्मलेला; खुषमस्कऱ्या.

चटण (टिन) (ಚಟಣ [ಟಿನ]) (क) ना.—सांबारें; तिखट चटणी; ठेचा; चटका; कूट.

—माडु (ಮಾಡು) (क) धा.—मारून मऊ करणें; नाश करणें; ठार करणें.

चडति (ಚಡತಿ) (अ. दे.) ना.—रस्त्याची चढती; चढण; आधिक्य.

चडाय (ಚಡಾಯ) (क) ना.—चढ; आधिक्य; मगरमिठी; घट्टपणा.

चडायिसु (ಚಡಾಯಿಸು) (क) धा.—आवळणें; घट्ट बांधणें; चढणें; वर नेणें; अनुकरण करणें; चाबकानें मारणें.

चडावु (ಚಡಾವು) (अ दे) ना.—चढ; टेकडी; भूमीचा उंच भाग; भाववाढ; दुराग्रह; दुरहंकार; पादुका; चढाव; पायतण.

चडाळ (ಚಡಾಳ) (क) ना.—आधिक्य; करकोचा; चढ; उन्नति.

—इसु (ಇಸು) (क) ना.—आवळणें; वाढविणें; जुळवून घट्ट बांधणें; अधिक होणें.

चडि (ಚಡಿ) (क) ना.—पायरी; सोपान; जिना; छडी; जोड; ब्रांबू.

चडे (सेडे) (ಚಡೆ [ಸೆಡೆ]) (क) वि.—एकाकीगमन; (क) धा. चिडून जाणें; चिडणें.

चड्डि (ಚಡ್ಡಿ) (क) ना.—विजार; कौपीन; चोळणा; पाटलोण.

चण (ಚಣ) (सं) वि.—निपुण; प्रख्यात; माहीतगार; (सं) ना. नैपुण्यदर्शक प्रत्यय; निमिष; क्षण; कण्हणें.

चणक (ಚಣಕ) (क) ना.—चड्डी; चोळणा; मांडचोळणा.

चंड (ಚಂಡ) (सं) वि.—तीक्ष्ण; उग्र; क्रूर; गरम; हात पोळणारें; चकाकणारें; उद्रिक्त; रागीट; भयंकर; चपळ; हुषार; तीव्रगति; अत्याचारी; अविवेकी; दुष्ट; त्रासदायक; उकरलेला.

(क) ना.—यमाचा दूत; दैत्याचें नांव; चिंचेचें झाड; उष्णता; कोप; शिवषण्मुख.

—मुंडा (ಮುಂಡಾ) (सं) ना.—दुर्गा.

—दीधिति (ದೀಧಿತಿ) (सं) ना.—सूर्य.

**चंडकर** (ಚಂಡಕರ) (सं) ना. – सूर्यकिरण; प्रखर किरण; जकात.

**चंडकीर्ति** (ಚಂಡಕೀರ್ತಿ) (सं) ना. – शिवगणातील एक.

**चंडकोदंड** (ಚಂಡಕೋದಂಡ) (सं) ना. – प्रबल धनुष्य; भयंकर बाण; जड धनुष्य वापरणारा; शिव.

**चंडकौशिक** (ಚಂಡಕೌಶಿಕ) (सं) ना. – विश्वामित्र.

**चंडने** (ಚಂಡನೆ) (सं) ना. – उद्रेक; रौद्रता.

**चंडमृग** (ಚಂಡಮೃಗ) (सं) ना. – बलाढ्य हिंस्र पशु.

**चंडरुचि** (ಚಂಡರುಚಿ) (सं) ना. – चंडांशु; सूर्य.

**चंडवाळ** (ಚಂಡವಾಳ) (क) ना. – व्यापारातील संचकार; इसारा; अगाऊ दिलेला पैसा.

**चंडविक्रम** (ಚಂಡವಿಕ್ರಮ) भीम पराक्रम; परशुराम.

**चंडातक** (ಚಂಡಾತಕ)(सं) ना. – लांब पोलकें; जाकीट; काचोळी.

**चंडाल** (ಚಂಡಾಲ) (सं) ना. – महार; चांडाळ; दुर्वर्तनी; शूद्र व ब्राह्मणी याची संतती.

**चंडि** (ಚಂಡಿ) (सं) ना. – दुर्गा; काली; हट्टी स्त्री; चिडखोर स्त्री; क्रोध; हट्ट; गुदा.

**चंडिके (का)** (ಚಂಡಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना. – दुर्गा; काली. (क) ना. – शेंडी; केस; बुचडा; जटा; काथ्या

**चंडिकारमण** (ಚಂಡಿಕಾರಮಣ) (सं) ना. – शिव; परमेश्वर.

**चंडिकोळ् (गोळ्)** (ಚಂಡಿಕೊಳ್ [ಗೊಳ್]) (क) धा. – हट्ट धरणें; रागावणें; आग्रह धरणें.

**चंडिम** (ಚಂಡಿಮ) (सं) ना. – विकार; क्रोध; हिंसा; उष्णता; ऊब.

**चंडिल** (ಚಂಡಿಲ) (सं) ना. – रुद्र; क्षौरिक; न्हावी; कारागीर.

**चंडिसु** (ಚಂಡಿಸು) (क) धा. – रागाला येणें; शेंडी पकडणें; हट्ट धरणें.

**चंडु** (ಚಂಡು) (क) ना. – चेंडु; खेळांतील वस्तु; गडगडणारी वस्तु; गर्दन; मान.

**चंडेश (श्वर)** (ಚಂಡೇಶ [ಶ್ವರ]) (सं.) ना. शिव.

**चंडे (डा)** (ಚಂಡೆ [ಡಾ]) (सं) ना. – विकारवश स्त्री; दुर्गा; एक प्रकारचे पान; शेवट; अंत.

**चंडोल** (ಚಂಡೋಲ) (सं) ना. – पक्षीविशेष; चंडोल; रानमैना

**चण्ण** (ಚಣ್ಣ) (क) ना. – चोळणा; विजार; लंगोट. 'चड्डि' पहा.

**चतुः (स्) (र)** (ಚತುಃ [ಸ್] ರ) (सं) वि. – चार; चौक.

**चतुःपट्ट** (ಚತುಃಪಟ್ಟ) (सं) ना. – चौपाट; चौक; चौगुण; चौकोनी कापड.

**चतुःपद (पाद)** (ಚತುಃಪದ [ಪಾದ]) (सं) ना. – चार पायांचा प्राणी; पशु.

**चतुःशाले** (ಚತುಃಶಾಲೆ) (सं) ना. – चौक.

**चतुःषष्टि** (ಚತುಃಷಷ್ಟಿ) (सं) ना. – चौसष्ट संख्या; चौसष्ट कला.

**चतुर** (ಚತುರ್) (सं) वि. – चार; चारीचा पाढा.

**चतुर्** (ಚತುರ) (सं) वि. – निपुण; जाण; दक्ष; मनोहर. (सं) ना. – नैपुण्य; मनोहरता; हत्तीखाना.

**चतुरंग** (ಚತುರಂಗ) (सं) ना. – चौरंग खेळ; बुद्धिबळाचा खेळ. (हत्ती; उंट; घोडा; प्यादे) हीं चार अंगे.

—**बल** (ಬಲ) (सं) ना. – गज; अश्व; रथ; आणि पदाति ही सैन्याची चार अंगें; चतुरंग सैन्य.

**चतुरतर** (ಚತುರತರ) (सं) वि. – अतिचतुर; विशेष निपुण.

**चतुरंत** (ಚತುರಂತ) (सं) ना. – चहुबाजूंनें बंदिस्त भूमि; मळा; पालखी.

**चतुरश्र (स्र)** (ಚತುರಶ್ರ [ಸ್ರ]) (सं) ना. – चौकोन; चौरस; सर्वांगसुंदरता; संगीतातील लय; चारमात्रांचा ताल.

**चतुरानन** (ಚತುರಾನನ) (सं) ना. – चार मुखें असलेला ब्रह्मदेव; कवि.

**चतुरांतर** (ಚತುರಾಂತರ) (सं) ना. – यज्ञवेदी.

**चतुरुपाय** (ಚತುರುಪಾಯ) (सं) ना. – साम, दाम, दंड, आणि भेद असे चार उपाय; योग्य प्रयत्न.

**चतुर्गति** (ಚತುರ್ಗತಿ) (सं) ना. – कासव; जैनधर्मांतील चार गति.

**चतुर्थ** (ಚತುರ್ಥ) (सं) वि. – चौथा; तुरीय.

**चतुर्थाश्रम** (ಚತುರ್ಥಾಶ್ರಮ) (सं) ना. – ब्रह्मचर्य; गृहस्थ; वानप्रस्थ आणि संन्यास या चार आश्रमापैकी चौथा आश्रम; संन्यास.

**चतुर्थी** (ಚತುರ್ಥಿ) (क) ना. – चवथी तिथि.

**चतुर्दंत** (ಚತುರ್ದಂತ) (सं) ना. – ऐरावत; इंद्राचा हत्ती; चार दात असलेला.

**चतुर्दश** (ಚತುರ್ದಶ) (सं) वि. – चौदावा; चौदा भुवनें; चौदा लोक; चौदा विद्या.

**चतुर्दशि (शी)** (ಚತುರ್ದಶಿ [ಶೀ]) (सं) ना. – चौदावी तिथि.

**चतुर्बल** (ಚತುರ್ಬಲ) (सं) ना. – 'चतुरंग' पहा.

**चतुर्भद्र** (ಚತುರ್ಭದ್ರ) (सं) ना. – धर्मार्थकाममोक्ष हे चार पुरुषार्थ; चार प्रकारची इच्छा; एषणा.

**चतुर्भुज** (ಚತುರ್ಭುಜ) (सं) ना. – चार हातांचा विष्णु; विवाहबद्धता; सामर्थ्य.

**चतुर्मुख (वक्त्र)** (ಚತುರ್ಮುಖ [ವಕ್ತ್ರ]) (सं) ना. – 'चतुरानन' पहा.

**चतुर्युग** (ಚತುರ್ಯುಗ) (सं) ना. – कृत, त्रेता, द्वापार आणि कलि हीं चार युगें.

**चतुर्वर्ग** (ಚತುರ್ವರ್ಗ) (सं) ना. – चार पुरुषार्थ; चार वर्ग.

**चतुर्वर्ण** (ಚತುರ್ವರ್ಣ) (सं) ना.–ब्राह्मण; क्षत्रिय; वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण.
**चतुर्विंशति** (ಚತುರ್ವಿಂಶತಿ) (सं) ना.–चोवीस.
**चतुर्विध** (ಚತುರ್ವಿಧ) (सं) वि.–चार प्रकारचे; चहु बाजूचा.
**चतुर्वेद** (ಚತುರ್ವೇದ) (सं) ना.–ऋक्सामयजु व अथर्व हे चार वेद.
**चतुश्याल** (ಚತುಶ್ಯಾಲ) (सं) ना.–वाटी; चौसोपी घर.
**चतुष्क** (ಚತುಷ್ಕ) (सं) ना.–चौक; चौकडी; चव्हाठा.
**चतुष्पदि** (ಚತುಷ್ಪದಿ) (सं) ना.–पशु; कविता; चार चरणांचे पद्य.
**चतुष्टय** (ಚತುಷ್ಟಯ) (सं) ना.–चौकडी; चौकडा.
**चतुष्पाद** (ಚತುಷ್ಪಾದ) (सं) ना.–पशु; पद्य; कविता.
**चतुःसीमे** (ಚತುಃಸೀಮೆ) (सं) ना.–चकबंदी; चार दिशेकडील मर्यादा.
**चत्तरि (रिगे)** (ಚತ್ತರಿ [ರಿಗೆ]) (अ. दे.) ना.–छत्र; छत्री; आतपत्र.
**चत्ताण** (ಚತ್ತಾಣ) (क) ना.–पद्यजाति; गानप्रकार.
**चत्तु** (ಚತ್ತು) (क) ना.–छत; वितान; आवरण; झाकण.
**चत्र** (ಚತ್ರ) (क) ना.–छत्र; अन्नछत्र; धमार्थ वासग्रासाची व्यवस्था.
**चत्रिगे** (ಚತ್ರಿಗೆ) (क) ना.–'चत्तरि' पहा.
**चत्वर** (ಚತ್ವರ) (सं) ना.–यज्ञभूमि; अंगण.
**चत्वार (रि)** (ಚತ್ವಾರ [ರಿ]) (सं) ना.–चाराचा पाढा.
**चदर** (ಚದರ) (क) ना.–चतुर; चौक; विस्तीर्ण स्थळ.
**चदरु** (ಚದರು) (क) धा.–अस्ताव्यस्त होणें; दूर जाणें; विस्तारणें; फेकणें; विखुरणें.
(क) ना.–चातुर्य; समजूत; अव्यवस्था; विस्कट.
**चदरिसु** (ಚದರಿಸು) (क) धा.–वाढविणें; दूर करणें; रुंद करणें; फेकणें; विखुरणें.
**चदिर्** (ಚದಿರ್) (सं) ना.–चंद्र; कापूर; हत्ती; सर्प.
**चदुर् (रु)** (ಚದುರ್ [ರು]) (क) ना.–नैपुण्य; जाणतेपण; कौशल्य; जाणकारीपणा.
**चदुर** (ಚದುರ) (क) वि.–चतुर; कुशल; निपुण.
**चदुरंग** (ಚದುರಂಗ) (क) ना.–'चतुरंग' पहा.
**चदुरे** (ಚದುರೆ) (क) ना.–ज्ञानी स्त्री; हुषार स्त्री; समजदार स्त्री.
**चद्दर** (ಚದ್ದರ) (अ-दे) ना.–चादर; पांघरूण; प्रावरण.
**चन्** (ಚನ್) (क) ना.–तांबडेपणा; चांगुलपणा; स्वच्छता; नीटनेटकेपणा; सौंदर्य.
**चन** (ಚನ) (सं) अ.–केव्हांहि; तरीसुद्धा; 'चन' अव्ययात्मक प्रत्यय. जसे कदाचन, किंचन वगैरे.
**चंद** (ಚಂದ) (क) ना.–चंद्र; छंद; गुणधर्म; स्वभाव; इष्ट गोष्ट; लहर चेंडू; सौंदर्य; थाट; मनोहरता; आकार; रीति; औचित्य; योग्यता; लावण्य.
**चंदण (ल) (ळ)** (ಚಂದಣ [ಲ] ಳ) (क) ना.–चंदन; श्रीगंध चंदनाचें झाड; देवी; ऐतिहासिक स्त्री.
**चंदन** (ಚಂದನ) (सं) ना.–'चंदण' पहा.
—**अक्षता** (ಅಕ್ಷತಾ) (सं) ना.–गंधाक्षता.
**चंदनाचल** (ಚಂದನಾಚಲ) (सं) ना.–मलयपर्वत; सह्यगिरीचा एक भाग.
**चंदनावति** (ಚಂದನಾವತಿ) (सं) ना.–कुलिंद राजाची राजधानी.
**चदनोपल** (ಚದನೋಂಪಲ) (सं) ना.–सहाण.
**चंदर** (ಚಂದರ) (अ-दे) ना.–चंद्र.
**चंदवुर** (ಚಂದವುರ) (क) ना.–चंद्रपूर; चंद्रलोक.
**चंदि** (ಚಂದಿ) (क) ना.–आवार; भिंत; अर्धभिंत; पोवळें.
**चंदिर** (ಚಂದಿರ) (सं) ना.–चंद्र; शशी; कुंकु; तांबडी वस्तु.
**चंदु** (ಚಂದು) (क) ना.–चंद्र; दिनांक; तारीख; तिथि; मिति.
**चंद्रक** (ಚಂದ್ರಕ) मोरपिसावरचा डोळा; हाताच्या बोटाचे नख; चंद्राकार वर्तुळ; कंस ( ) चिन्ह.
**चंद्रकांत** (ಚಂದ್ರಕಾಂತ) (सं) ना.–चंद्रकांतमणि; अमृतशिला; दुग्धमणि; स्फटिक; चंद्र.
**चंद्रकांति** (ಚಂದ್ರಕಾಂತಿ) (सं) ना.–चांदणें; कौमुदी; ज्योत्स्ना.
**चंद्रकावि** (ಚಂದ್ರಕಾವಿ) (क) ना.–एक प्रकारचा तांबडा रंग; तांबडें लुगडें.
**चंद्रकि** (ಚಂದ್ರಕಿ) (सं) ना.–मोर; मयूर.
**चंद्रगुप्त** (ಚಂದ್ರಗುಪ್ತ) (सं) ना.–मौर्य सम्राट; चंद्रगुप्त.
**चंद्रचूड (शेखर)** (ಚಂದ್ರಚೂಡ [ಶೇಖರ]) (सं) ना.–शंकर; शिव.
**चंद्रज** (ಚಂದ್ರಜ) (सं) ना.–बुध; बुधग्रह.
**चंद्रज्योति** (ಚಂದ್ರಜ್ಯೋತಿ) (सं) ना.–चांदणे; चंद्रप्रकाश; चंद्रज्योत (दारूकाम); शुक्लपक्ष.
**चंद्रतिलक** (ಚಂದ್ರತಿಲಕ) (सं) ना.–कपाळावरील मंगल टिळा; सौभाग्यतिलक.
**चंद्रदार** (ಚಂದ್ರದಾರ) (सं) ना.–नक्षत्र; चंद्रपत्नि.
**चंद्रनखि** (ಚಂದ್ರನಖಿ) (सं) ना.–रावणाची बहीण.
**चंद्रप्रभ** (ಚಂದ್ರಪ್ರಭ) (सं) ना.–एक जैन तीर्थंकर.
**चंद्रभागा** (ಚಂದ್ರಭಾಗಾ) (सं) ना.–पंजाबकाश्मीरकडील एक नदी; पंढरपुराजवळील नदी.
**चंद्रम (मस्)** (ಚಂದ್ರಮ [ಮಸ್]) (सं) ना.–चंद्रमा; चंद्र; शशी.
**चंद्रमंडल** (ಚಂದ್ರಮಂಡಲ) (सं) ना.–चंद्रबिंब; चंद्राकार.
**चंद्रमति** (ಚಂದ್ರಮತಿ) (सं) ना.–हरिश्चंद्रपत्नि; तारामति.

**चंद्रमौळि** (ಚಂದ್ರಮೌಳಿ) (सं) ना.—'चंद्रचूड' पहा.
**चंद्रलेखे** (ಚಂದ್ರಲೇಖೆ) (सं) ना.—चंद्रकला; चंद्ररेखा.
**चंद्रवंश** (ಚಂದ್ರವಂಶ) (सं) ना.—चंद्राचा वंश; सोमवंश; यादव व कौरव पांडव यांचे कुल.
**चंद्रवदना** (ने) (ಚಂದ್ರವದನಾ [ನೆ]) (सं) ना.—सुंदरानना; चंद्रमुखी स्त्री; सुंदरा.
**चंद्रशाले** (ಚಂದ್ರಶಾಲೆ) (सं) ना.—गची; माडी.
**चंद्रशिले** (ಚಂದ್ರಶಿಲೆ) (सं) ना.—चंद्रकांत मणि; अमृतशिला; दुग्धमणि.
**चंद्रहार** (ಚಂದ್ರಹಾರ) (सं) ना.—गळ्यांतील दागिना.
**चंद्रहास** (ಚಂದ್ರಹಾಸ) (सं) ना.—कुंतल देशाचा राजा; चंद्राला लाजविणारें सौंदर्य असलेला.
**चंद्रांगद** (ಚಂದ್ರಾಂಗದ) (सं) ना.—इंद्रसेन राजाचा पुत्र.
**चंद्राचूड** (ಚಂದ್ರಾಚೂಡ) (सं) ना.—'चंद्रचूड' पहा.
**चंद्रातप** (ಚಂದ್ರಾತಪ) (सं) ना.—चंद्रिका; कौमुदी; चांदणें.
**चंद्रात्मज** (ಚದ್ರಾತ್ಮಜ) (सं) ना.—चंद्रपुत्र; बुध.
**चंद्रापीड** (ಚಂದ್ರಾಪೀಡ) (सं) ना.—शिव; तारापीडाचा पुत्र; कादंबरीचा प्रियकर.
**चंद्राभरण** (ಚಂದಾಭರಣ) (सं) ना.—चंद्रालंकार शिव.
**चंद्रावलि** (ಚಂದ್ರಾವಲಿ) (सं) ना.—राधेच्या वडील बहिणीचें नांव.
**चंद्राश्म** (ಚಂದಾಶ್ಮ) (सं) ना.—'चंद्रशिला' पहा.
**चंद्रि** (ಚಂದ್ರಿ) (सं) वि.—लकाकणारा; चकाकणारा.
(सं) ना.—चंद्रपुत्र बुध; कपाळावर पांढरा ठिपका असलेली गाय; म्हैस; पितळी वाटी.
**चंद्रिके** (ಚಂದ್ರಿಕೆ) (सं) ना.—चांदणें; ज्योत्स्ना; चंद्रप्रकाश; चाकी; मुद्रा.
**चंद्रे** (ಚಂದ್ರೆ) (क) ना.—छत असलेली मोकळी पडवी; राहुटी.
**चन्न** (ಚನ್ನ) (क) वि.—सुंदर; चांगलें.
**चन्न** (ಚನ್ನ) (क) ना.—चांगलेपणा; सुंदर पुरुष; श्रेष्ठपणा, 'चेन्न' पहा.
**चन्निग** (ಚನ್ನಿಗ) (क) ना.—'चेन्निग' पहा.
**चन्नंग** (ಚನ್ನಂಗ) (क) ना.—सुरूचे झाड; सरळ उंच वाढणारे झाड.
**चन्नंगि** (ಚನ್ನಂಗಿ) (क) ना.—चणी; मसूर.
**चन्ने** (ಚನ್ನೆ) (क) ना.—'चेन्ने' पहा.
**चन्नेमणे** (ಚನ್ನೆಮಣೆ) (क) ना.—मसूरानी खेळावयाचा खेळ; मुलींचा एक खेळ.
**चप** (ಚಪ) (क) ना.—वेळु; सळी.
**चपटे** (प्पटे) (ಚಪಟೆ [ಪ್ಪಟೆ]) (क) धा.—जमीन चोपणें; बडवून साफ करणें; चोपून गुळगुळीत करणें.
—**मूगु** (ಮೂಗು) (क) ना.—बसके नाक; नकटे नाक.
**चपल** (ಚಪಲ) (सं) वि.—हुषार; चंचल; क्षणिक; अस्थिर; तरतरीत; उद्धट; अशिक्षित.
(सं) ना.—आशा; आकांक्षा; चप्पल; पादरक्षा.
**चपला** (ले) (ಚಪಲಾ [ಲೆ]) (सं) ना.—विद्युत; वीज; भाग्य; संपत्ति; लक्ष्मी; आशा; चंचल स्त्री; व्यभिचारिणी; जीभ.
**चपलत्त्व** (ते) (ಚಪಲತ್ವ [ತೆ]) (क) ना.—चपळाई;
**चपलतन** (ಚಪಲತನ) चापल्य; चंचलता; अस्थैर्य.
**चपाटि** (ಚಪಾಟಿ) (क) ना.—सपाटी; गिजबीज; चापट; थप्पड; तुडवण; लूट.
**चपाति** (ಚಪಾತಿ) (अ-दे) ना.—चपाती; गव्हाची पोळी; रोटी; दशमी.
**चपायिसु** (ಚಪಾಯಿಸು) (क) धा.—चोरी करणें; छापणें; लपविणें; पत्ते पिसणें.
**चपेट** (ಚಪೇಟ) (सं) ना.—तळहाताची थप्पड; चापट; वाघ किंवा मांजर यांच्या पंजाचा तडाखा.
**चप्पडि** (ಚಪ್ಪಡಿ) (क) ना.—वंचना; फसवणूक; ठकबाजी.
—**हाकु** (ಹಾಕು) (क) धा.—व्यत्यय आणणें; धोंड घालणें; हरकत घेणें.
**चप्पटे** (ಚಪ್ಪಟೆ) (क) ना.—टाळी; चपेटा.
**चप्पन्न** (ಚಪ್ಪನ್ನ) (अ-दे) ना.—छपन्न.
—**देश** (ದೇಶ) (क) ना.—छप्पन्न प्रमुख राष्ट्रें; जगत्.
**चप्पर** (ಚಪ್ಪರ) (क) ना.—झोपडी; छप्पर; मांडव; मंडप; वरचें आवरण; छावणी.
**चप्परणे** (ಚಪ್ಪರಣೆ) (क) ना.—पोपटाचा ध्वनि; पक्षांची किलबिल; पवर्गी शब्द; मोह; प्राण्यांना दिलेले प्रोत्साहन.
**चप्परिग** (ಚಪ್ಪರಿಗ) (क) ना.—एक प्रकारचे गवत.
**चप्परिसु** (ಚಪ್ಪರಿಸು) (क) धा.—पाठ थोपटणें; छड्डू मारणें; दंड थोपटणें; प्रोत्साहन देणें; तोंडानें चपचप असा आवाज करणें.
**चप्पलि** (ಚಪ್ಪಲಿ) (अ. दे) ना.—वहाणा; पायतण; जोडा.
**चप्पळिसु** (ಚಪ್ಪಳಿಸು) (क) धा.—टाळी वाजविणें; दंड थोपटणें.
**चप्प** (प्पा) **ळे** (ಚಪ್ಪ [ಪ್ಪಾ] ಳೆ) (क) ना.—टाळी; करताडन; उत्तेजक शब्द.
**चप्पे** (ಚಪ್ಪೆ) (क) वि.—बेचव; सालपट; ठसा; छाप; मुद्रा; कमरेचे मागील खळगट.
**चबक** (कु) (ಚಬಕ [ಕು]) (अ. दे) ना.—चाबूक; कोरडा; कमची; वेत.
**चमकिसु** (ಚಮಕಿಸು) (अ. दे) ना.—तेजःपुंज करणें; ओप देणें; चकचकीत करणें.
**चमकु** (ಚಮಕು) (अ. दे) ना.—चकाकी; लकाकी; दीप्ति; कांती.

चमटिगे (ಚಮಟಿಗೆ) (क) ना.—कातड्याचा पट्टा; चामड्याचा कमरपट्टा.
चमत्करिसु (ಚಮತ್ಕರಿಸು) (क) धा.—विस्मय वाटणें; आश्चर्य वाटणें; हातचलाखी दाखवणें.
चमत्कार (कृति) (ಚಮತ್ಕಾರ [ಕೃತಿ]) (सं) ना.—चातुर्य; आश्चर्य; झळक; मनोहरता; विनोदी खेळ; माया विद्या.
चमर (ಚಮರ) (सं) ना.—तिबेटी याक बैल; झुबकेदार शेपटीचा बैल; एक दैत्य; लांबगंगावन; चवरी; चामर.
चमररुह (ಚಮರರುಹ) (सं) ना.—चामर.
चवरि (री) (ಚಮರಿ [ರೀ]) (सं) ना. वनगाय; याकमादी; चवरी; चौरी; गंगावन.
चमस (ಚಮಸ) (सं) ना.—ऋषभ देवाचा पुत्र; सोमरस पिण्याचें पात्र; एक गोड खाद्य.
चमु (मू) (ಚಮು [ಮೂ]) (सं) ना.—सैन्य विभाग; सेना.
चमूप (पति) (ಚಮೂಪ [ಪತಿ]) (सं) ना.—सेनापति; सेनाध्यक्ष.
चमूर (ಚಮೂರ) (सं) ना.—पुंडरीक; कमळ; वाघ; चित्ता.
चमरु (ಚಮರು) (सं) ना.—एक जातीचा मृग; सांबर.
चंप (ಚಂಪ) (सं) ना.—एक फुलझाड; चंपक.
चंपक (ಚಂಪಕ) (सं) ना.—चाफा; चाफ्याचें फूल.
चंपकमाले (ಚಂಪಕಮಾಲೆ) (सं) ना.—चाफ्याच्या फुलांची माळ; चंद्रहासपत्नि.
चंपका (ಚಂಪಕಾ) (सं) ना—हंसध्वजाची राजधानी.
चंपु (ಚಂಪು) (सं) ना.—गद्यपद्यात्मक काव्य.
चंपे (ಚಂಪೆ) (सं) ना.—सुगंध; सुवास; परिमळ.
चंबक (कवरे) (ಚಂಬಕ [ಕವರೆ]) (क) ना.—एक चर्मवाद्य; संबळ; ढोल.
चंबार (ಚಂಬಾರ) (क) ना.—मसाल्याचे साहित्य; चांभार; चर्मकार.
चंबु (ಚಂಬು) (क) ना.—तांब्या; जलपात्र; तांब्याचें वा पितळेचें भांडें; गडू.
चंबुकुटिग (ಚಂಬುಕುಟಿಗ) (क) ना.—तांबट; घिसाडी.
चंबोन् (ಚಂಬೊನ್) (क) ना.— तांबे; ताम्र 'चेंबोन्' पहा.
चम्म (ಚಮ್ಮ) (क) ना.—चर्म, कातडें.
चम्मचे (ಚಮ್ಮಚೆ) (क) ना.—चमचा, डाव.
चम्मटिगे (ಚಮ್ಮಟಿಗೆ) (सं) ना.—'चमटिगे' पहा.
चम्मळि (ळिके) (ಚಮ್ಮಳಿ [ಳಿಕೆ]) (सं) ना.—केतु राहु ग्रह; एक प्रचंड मासा.
चम्मळिगे (ಚಮ್ಮಳಿಗೆ) (क) ना.—चप्पल; पायतन; पादत्राण.
चय (ಚಯ) (सं) ना.—समूह; रास; ढीग; संघ.
चयन (ಚಯನ) (सं) ना.—संचय; गुंप; वेच; गोळा केलेले; एकत्रीकरण; संग्रह.
कुसुमचयन (ಕುಸುಮಚಯನ) (सं) ना.—माळ; गुच्छ.
चर (ಚರ) (सं) वि.—चालणारा; जाणारा; हलणारा; संचलणारा; चरणारा.
(सं) ना.—चारक; सेवक; दूत; गुप्तचर.
चरक (ಚರಕ) (अ. दे.) ना.—सूत काढण्याचा रहाट; चरखा.
(सं) ना.—गुप्तचर; मंत्रवादी; भिक्षु; खाऊन फिरणारा; 'चरक' ग्रंथाचा लेखक.
चरकि (ಚರಕಿ) (क) ना.—लहान चरक; घाणा.
चरट (ಚರಟ) (क) ना.—भुसा; नीरस; निरुपयोगी वस्तु; टरफल; निःसत्त्व पदार्थ.
चरण (ಚರಣ) (सं) ना.—खाद्य; चारणी; सरणें; हालचाल; पाय; वेदांतील एक शाखा.
—सेवक (की) (ಸೇವಕ [ಕಿ]) (सं) ना.—दासदासी; पदसंवाहक; मर्दन करणारे सेवक.
चरणकमल (ಚರಣಕಮಲ) (सं) ना.—पदकमल; पद्मपद.
चरणतल (ಚರಣತಲ) (सं) ना.—पायाचा तळवा.
चरणयुग (गुल) (ಚರಣಯುಗ [ಗುಲ]) (सं) ना.—पायांची जोडी; पदयुग्म.
चरणवाल्मिकि (ಚರಣವಾಲ್ಮಿಕಿ) (सं) ना.—हत्तीरोग झालेला पाय.
चरणायुध (ಚರಣಾಯುಧ) (सं) ना.—तरवार; झुंजार कोंबडा; गाढव.
चरपु (ಚರಪು) (सं) ना.—गणपतीला समर्पण केलेला नैवेद्य.
चरबि (ಚರಬಿ) (अ. दे.) ना.—चरबी; मांदा; मेद.
चरम (ಚರಮ) (सं) वि.—अंतिम; शेवटचा; नीच; अवमान कालीन; शाश्वत.
(सं) ना.—पाठ; पृष्ठ.
—अंग (ಅಂಗ) (सं) ना.—मोक्षप्राप्तीच्या पूर्वीचा देह.
चरयिसु (ಚರಯಿಸು) (क) धा.—चारणें; हलविणें; चालविणें; स्थलांतर करणें.
चरंति (ಚರಂತಿ) (सं) ना.—जंगम; ब्रह्मचारिणी; अस्थिर फिरस्ता.
चरलिंग } (ಚರಲಿಂಗ) (सं) ना.—वीरशैवस्वामी;
चरजंगम } (ಚರಜಂಗಮ) जंगम; भ्रमंती.
चरविगे (ಚರವಿಗೆ) (क) ना.—चरवी; कासंडी; मोठ्या तोंडाचा गुंड.
चराचर (ಚರಾಚರ) (सं) ना.—स्थावरजंगम; स्थिरचर; चलाचल.
चरादाय (ಚರಾದಾಯ) (सं) ना.—बेवारशी वस्तूपासून सरकारांत येणारा पैसा; लाचेचा पैसा; लाच.

**चरायि** (ಚರಾಯಿ)(क) ना.–गवतचारा वगैरेसाठीं मालकाला दिलेला पैसा; चारणीचा फाळा.

**चरास्ति** (ಚರಾಸ್ತಿ) (अ. दे) ना.–पैसा; सोनें, मोती, रत्ने वगैरे धन.

**चरि** (ಚರಿ) (सं) ना.–जाणारा; संचारी; आचरण.

**चरिगे** (ಚರಿಗೆ) (क) ना.–सुगीच्या पूर्वी केलेलें शेतजेवण; चर्या; चलन; आचरण; जैनभोजन; सूर्यास्तापूर्वी होणारी जैनमुनीची पाद्यपूजा; तांब्या; जलपात्र; भात शिजवण्याचें भांडें.

**चरिगेवोगु** (ಚರಿಗೆವೋಗು) (क) धा.–प्रयाणास निघणें; फिरणें.

**चरित** (ಚರಿತ) (सं) ना.–चरित्र; वर्तन; स्वभाव; इतिहास; बखर; साहस कृत्य; संगीत काव्य; छंदोबद्ध पद्य.

**चरितार्थ** (ಚರಿತಾರ್ಥ) (सं) ना.–उपजीवन; कृतकृत्यता; कर्तव्यपूर्ति; साफल्य; उद्देशसमाप्ति; सिद्धी; लाभालाभ.

**चरित्र** (ಚರಿತ್ರ) (सं) ना.–इतिहास; 'चरित' पहा.

—**क (गा) र** (ಕಾ [ಗಾ] ರ) (सं) ना.–बखरकार; इतिहास-लेखक.

**चरिसु (इसु)** (ಚರಿಸು [ಇಸು]) (क) धा.–जाणें; हलणें; फिरणें; चालविणें; जमवून घेणें; हातीं घेणें; आचरणें; पाहणें; जमविणें.

**चरिष्णु** (ಚರಿಷ್ಣು) (सं) वि.–चंचल; चपळ; अस्थिर; आंदोलित.

**चरु** (ಚರು) (सं) ना.–यज्ञांतील आहुति; हविष्य; अन्नपात्र; बलिदानाची वस्तु.

**चरुपु** (ಚರುಪು) (क) ना.–'चरपु' पहा.

**चरुट** (ಚರುಟು) (क) ना.–मांसान्न; गोड खाद्य.

**चर्च** (ಚರ್ಚ್) (अ. दे) ना.–खिस्तमंदीर इगरजा; गिरिजा; सूर्य.

**चर्चरि** (ಚರ್ಚರಿ) (सं) ना.–एक वाद्य; चुरशीची चढाओढ; संगीतविशेष; श्लोक पठण; खेळांतील गोंगाट; तोंडपुजेपण; सण; कुरळे केस.

**चर्चिके** (ಚರ್ಚಿಕೆ) (सं] ना.–सुगंधलेप; उटणें; उजळणी; पुनराभ्यास; प्रतिबिंब; झाकण.

**चर्चित** (ಚರ್ಚಿತ)] (सं) वि.–चर्चा केलेले; विचार केलेलें; वादविलेलें; चोपडलेलें.

**चर्पट** (ಚರ್ಪಟ) (सं) ना.–तळहात.

**चर्चु** (ಚರ್ಚು) (क) धा.–संगोपन करणें; ठेचणें; कुटणें; (अ. दे.) ना.–खिस्तमंदीर.

**चर्चे** (ಚರ್ಚೆ) (सं) ना.–सुगंधिद्रव्यलेपन; आलोचना; विचार; मनन; चिंता; चामुंडी; दंगा; शोध; वाद; उक्ति; व्रत; चेष्टा; प्रतिमा; बुदबुद; पोरकटपणा.

**चर्म** (ಚರ್ಮ) (सं) ना.–कातडे ढालः शस्त्र; 'गुराणि' पहा.

—**कार** (ಕಾರ) (सं) ना.–चांभार; कातडकाम करणारा.

—**गत** (ಗತ) (सं) वि.–अंगाला चिकटलेले.

—**कर्पट** (ಕರ್ಪಟ) (सं) ना.–पोते; बुदला.

—**चक्षु** (ಚಕ್ಷು) (सं) ना.–भौतिक दृष्टि; बाह्य दृष्टि.

**चर्मण** (ಚರ್ಮಣ) (सं) वि.–हजरजबाबी; बिरबल; प्रत्युत्पन्नमति; वाग्मी.

**चर्मसेवक** } (ಚರ್ಮಸೇವಕ) (क) ना.–भाता; लोहाराचा
**चर्मसेविके** } (ಚರ್ಮಸೇವಿಕೆ) भाता; फुंकणी.

**चर्मयष्टिके** (ಚರ್ಮಯಷ್ಟಿಕೆ) (क) ना.–चाबूक; कमची; कोरडा;

**चर्मरत्न** (ಚರ್ಮರತ್ನ) (सं) ना.–उत्तम ढाल;, 'गुराणी' पहा.

**चर्मि** (ಚರ್ಮಿ) (सं) ना.–ढालधारी सैनिक; ढालाईत; शिर-च्छेद करणारा.

**चर्य** (ಚರ್ಯ) (सं) ना. चर्या; वागणूक; वृत्ती; आचरण; रूढी; जैनमुनीचे भोजन.

**चर्वण** (ಚರ್ವಣ) (सं) ना. चर्चा; ओढाताण; समारोप.

**चर्वित** (ಚರ್ವಿತ) (सं) वि. गत; दातांनी चावून तोडलेलें.

—**चर्वण** (ಚರ್ವಣ) (सं) ना.–उधळणूक; पिष्टपेषण. गाइलेलेच गाणें; बोललेले बोलणें.

**चर्वितक** (ಚರ್ವಿತಕ) (सं) ना.–ओढाताण; भक्षण; कृतकार्य.

**चल** (ಚಲ) (सं) वि.–हलणारा; चंचल; कंपित; भ्रमित; अस्थिर; उठणारा.
(क) ना.–छळ; हेकेखोरपणा; निग्रही स्वभाव; हट्टी.

—**वादी** (ವಾದಿ) (सं) वि.–हटवादी; आपला हट्ट न सोडणारा;
महाराची पोटजात.

**चलक** (ಚಲಕ) (सं) ना.–हस्त लाघव; हातचलाखी; नजरबंदी; गारुडी; जादुगार.

**चल(लं) कु** } (ಚಲ [ಲಂ] ಕು) (क) धा.–फेकणें; हातातून
**चलंगु** } (ಚಲಂಗು) निसटणें; हिसकावणें; हात फिरवणें.

**चलत** (ಚಲತ್) (सं) वि.–हलणारे; चालणारा; कापणारा; वापरांत असलेला.

—**चित्र** (ಚಿತ್ರ) (सं) ना.–चित्रपट; सिनेमा; बोलपट.

**चलत्व** (ಚಲತ್ವ) (सं) ना.–फिरती; गतिमानता; अस्थिरता.

**चलवि** (ಚಲವಿ) (क) ना.–कोंबड्याच्या मांसाचे निवालेले पदार्थ.

**चलनक** (ಚಲನಕ) (सं) ना.–चोळी; स्त्रियांचे कपडे.

**चलाकु (खि)** (ಚಲಾಕು [ಖಿ]) (अ.दे) ना.–चापल्य; चुणचुणीतपणा; 'चलक' पहा.

**चलायिसु** (ಚಲಾಯಿಸು) (क) धा.–चालविणें; संपविणे; सांगितल्याप्रमाणें करणें; प्रयोग करणें; यथासांग करणें.

**चलावणे** (ಚಲಾವಣೆ) (क) वि.–वर्तन; आचरण; चाल; वापर; नाण्याची अदलाबदल; चलनविनिमय. पद्धती;

**चलि** (ಚಲಿ) (सं) वि.–जाणारी; गतिमान; चालणारी.
—**पुमनूचलि** (ಪುಮನ್ಚಲಿ) (सं) वि.–पुरुषाच्या मागें लागणारी.
**चलि** (ಚಲಿ) (क) धा.–खुरटणें; खुजे होणें; दमणें; शिंपडणें; थंड होणें.
**चलित** (ಚಲಿತ) (सं) वि.–गत; गतिमान; चालविलेला; निघालेला; डुलणारा; डोलणारा.
**चलुवु** (ಚಲುವು) (क) ना.–'चेलक' पहा.
**चलो** (ಚಲೋ) (क) वि.–सुंदर; उत्तम; चांगलें; मनोहर.
**चल्ल** (ಚಲ್ಲ) (क) ना.–विनोद; आत्मानंद; हास्य; हर्ष; सुख; सरस.
—**आट** (ಆಟ) (क) ना.–विनोद; खेळ; रंगखेळी.
—**गाति** (ಗಾತಿ) (क) ना.–रसिका; विनोदिनी; आश्चर्यवती; पिटाळी; पळवणूक.
—**वत्तर** (ವತ್ತರ) (क) ना.–विदूषक; हंसत टोमणे मारणारा.
**चल्लण** (ಚಲ್ಲಣ) (क) ना.–चड्डी; विजार; पायजमा.
**चल्लापिल्लि** (ಚಲ್ಲಾಪಿಲ್ಲಿ) (क) ना.–अव्यवस्थितपणा; अस्ताव्यस्तता; वाट फुटेल तिकडे गमन.
**चल्लि** (ಚಲ್ಲಿ) (क) ना.–आरसा; आयना; दर्पण; आदर्श; 'जल्लि' पहा.
**चल्लु** (ಚಲ್ಲು) (क) धा. फेकणें; निघणें; खाऊन फिरणें; तुडवून बाहेर निघणें.
**चल्लु(तन)** (ಚಲ್ಲು[ತನ]) (क) ना.–वांडपणा; अपहास्य; निंदा; हलकी वागणूक.
**चल्वु** (ಚಲ್ವು) (क) ना.–सौंदर्य; मनोहारिता; चांगुलपणा; तेज.
**चल्ले** (ಚಲ್ಲೆ) (क) ना.–लांबी; दातृत्व; दानीपणा.
**चेल्लेगण्** (ಚಲ್ಲೆಗಣ್) (क) ना.–तीव्र दृष्टि; दूरदृष्टि; विशाल नेत्र.
**चवकि** (ಚವಕಿ) (क) ना.–चतुष्किका; चौकी; लाक्षागृह; पोलीसचौकी; यल्लमा देवीच्या भक्ताचे एक तंतुवाद्य.
**चवडिके** (ಚವಡಿಕೆ) (क) ना.–चौक; चावडी; चवरी.
**चवर** (ಚವರ) (क) ना.–'चमरि' पहा; चोर; चोरी; चोरकर्म.
**चव** (ಚವ) (क) ना.–'चमरि' पहा.
**चवल** (ಚವಲ) (क) ना.–चौलकर्म; जावळ; क्षौर; चर्म; दोन आण्याचें नाणें.
**चवलंब** (ಚವಲಂಬ) (क) ना.–डोळ्याची पापणी.
**चवि** (ಚವಿ) (क) ना.–कांती; छबी; झळाळी; प्रकाश.
**चवुकळि** (ಚವುಕಳಿ) (क) ना.–चौक; चौकोन; चौकडा.
**चवुकि** (ಚವುಕಿ) (क) ना.–चामुंडी; क्रूर देवी; कलिका.
**चवुरि (लि)** (ಚವುರಿ [ಲಿ]) (क) ना.–चवरि; केसाळ घोडा; केसाची डोक्यातील चवरीग; गंगावन; केसांचें शिरोभूषण.
**चषक** (ಚಷಕ) (सं) ना.–पानपात्र; मद्याचा प्याला.
**चहड(डि)** ಚಹಡ[ಡಿ]) (क) ना.–चहाडी; अपप्रचार.
**चहा** (ಚಹಾ) (क) ना. चहाची पूड; चहापेय. (चहा चीनातून भारतांत आला.)
**चळक** (ಚಳಕ) (क) ना.–वेग; चमत्कार; तीव्रता; सामर्थ्य; जबरदस्ती; शिडकावा; शिंपडणी; प्रोक्षण; सांधेधरणें.
—**नीरु** (ನೀರು) (क) ना.–प्रोक्षणाचें पाणी; मार्जनाचें जल.
**चळ** (ಚಳ) (क) ना.–'चल' पहा. चपलता; खाज; चकाकी.
**चळगति** (ಚಳಗತಿ) (सं) ना.–चपलगति; वेग; तीव्रता; चुणचुणीतपणा.
**चळचमत्कृति** (ಚಳಚಮತ್ಕೃತಿ) (सं) ना.–अत्यंत विस्मयकारक वेग; अतिशीघ्र गति.
**चळत्** (ಚಳತ್) (सं) वि.–'चलत्' पहा.
**चळते** (ಚಳತೆ) (सं) ना.–चांचल्य; कंपन; थरकाप; डोल; वेग.
**चळवळिके** (ಚಳವಳಿಕೆ) (क) ना.–चळवळ; चमत्कार; क्रांती; गडबड.
**चळय** (ಚಳಯ) (क) ना.–पाण्याचा शिडकावा; फवारा; शिंपडणी.
**चळवळ** (ಚಳವಳ) (अ.दे.) ना.–चलनवलन; क्रांतीकारक आंदोलन; अशांति; योजना; कार्यकलाप.
**चळि** (ಚಳಿ) (सं) धा.–चालणें; दमणें; अडचणीत येणें; कंटाळा येणें; मूर्छित होणें; निस्तेज होणें; तळहातास जखम होणें; न निभावणें; शक्तिहीन होणें.
(क) धा.–वोस लगडणें.
(क) ना.–शीत; थंडी; धुकें; हिम; गारवा.
**चळिकदिर्** (ಚಳಿಕದಿರ್) (क) ना.–शीत कर; शीतलकिरण; चंद्रकिरण.
**चळिकदिर** (ಚಳಿಕದಿರ) (क) ना.–शीत किरण चंद्र.
**चळिकदिरकल्** (ಚಳಿಕದಿರಕಲ್) (क) ना.–चंद्रकांतमणि; स्फटिक; दुग्धमणि.
**चळिके** (ಚಳಿಕೆ) (क) ना.–फुलांचें कंकण.
**चळितु** (ಚಳಿತು) (क) अ.–थंडी वाजून; दमून; कुरूपपणें; दात कुचकामी झाल्यानें; कुडचाभर.
**चळिबेट्टु** (ಚಳಿಬೆಟ್ಟು) (क) ना.–हिमपर्वत, बर्फाचा डोंगर.
**चळिवेट्टणुगि** (ಚಳಿವೆಟ್ಟುಣುಗಿ) (क) ना.–हिमनगकन्या; पार्वती.
**चळिवेट्टळिय** (ಚಳಿವೆಟ್ಟಳಿಯ) (क) ना.–शिव; हिमालयाचा जावई.
**चळिय (यु)** (ಚಳಿಯ [ಯು]) (क) ना.–कूज; लकाकी; फवारा; शिंपडणूक.

चळिसु (ಚಳಿಸು) (क) धा.–दमविणें; हुंगवणें; निंदा करणें; पुढें चालविणें, 'छलिसु' पहा.

चळे,(कोडु) (ಚಳೇ [ಕೊಡು]) (क) धा.–पाणी शिंपडणें, सडा घालणें; पसरणें; भरून राहणें; गाळणें.

चळ्ळु (ಚಳ್ಳು) (क) ना.–वाकणारा वेत; लहान सलाकी; शलाका.

चळ्ळुगुरु (ಚಳ್ಳುಗುರು) (क) ना.–लांब चांगलीं नखें.

चळ्ळुहण्णु (ಚಳ್ಳುಹಣ್ಣು) (क) ना.–लोणच्याच्या उपयोगी फळ.

—तिनिसु (ತಿನಿಸು) (क) धा.–पुरेपुरें करणें; उडाणटप्पूपणा करणें.

चा (ಚಾ) (क) ना.–बैल हाकण्याचा उद्गार; चहाचें पान.

चाक (ಚಾಕ) (क) ना.–वेग; चापल्य; हुषारी; चोखपणा; चक्र.

चाकचक्यते (ಚಾಕಚಕ್ಯತೆ) (क) ना.–अतिचपलता; उत्तम कार्यक्रम; चकाकी.

चाकर (ಚಾಕರ) (अ. दे) ना.–सेवक कार्यकर्ता; नोकर; कामकरी.

चाकरि (ಚಾಕರಿ) (अ. दे) ना.–सेवा; नोकरी; काम; अधिकार; हुद्दा.

चाक्रिक (ಚಾಕ್ರಿಕ) (क) वि.–स्तुतिपाठक; खुषमस्कऱ्या; तोंडपूजक.

चाक्षुष (ಚಾಕ್ಷುಷ) (सं) वि. डोळ्यासंबंधी; डोळ्याला दिसणारा; दृष्टिसमोरचा.

चाग (ಚಾಗ) (क) ना. त्याग; दान; सुटका; मुक्ति; वितरण; हिरवा रंग.

चागि (ಚಾಗಿ) (क) वि. त्यागी; दानी.

चा (चां) गु ಚಾ [ಚಾಂ] ಗು) (क) अ. भले! बापु! भले रे भले.

चाचु (ಚಾಚು) (क) धा.–पुढे ढकलणें; विस्तारणें; रुंद करणें; उताणें झोपणें; लांब करणें.
(क) ना.–देह; बाण; किरीट.

चांचल्य (ಚಾಂಚಲ್ಯ (सं) ना.–चंचलपणा; हेलकावा; अस्थिरता; चलन.

चाटक (ಚಾಟಕ) (सं) ना.–मंत्रवाद; मायाविद्या; जादू.

चाट (ಚಾಟಿ) (क) ना.–चाबूक; कमची; कोरडा; चामड्याची वादी.

चाटु (ಚಾಟು) (सं) वि.–प्रिय; कुशल; स्तुति करणारा; जादू करणारा; चतुरोक्ति; तोंडपूजे भाषण; गौरवानें बोलणें.
(क) ना.–आश्रय; आधार.

—तन (ತನ) (क) ना.–फसवणूक; चातुरी; चमत्कार.

चाडि (ಚಾಡಿ) (क) ना.–चहाडी; निंदा; आक्षेप; दुरुत्तर.

—ग (गार) (ಗ [ಗಾರ] (क) वि.–चहाडखोर; निंदक.

चाण (ಚಾಣ) (क) ना.–छन्नी; उळी; पटाशी.

चाणक्य (ಚಾಣಕ್ಯ) (सं) ना.–विष्णुगुप्त; कौटिल्य; चंद्रगुप्ताचा मंत्री.

चाणूर (ಚಾಣೂರ) (सं) ना.–कृष्णबलरामांशी युद्ध करणारा जेठी; कंसाचा आश्रित मल्ल.

चांडाल (ಚಾಂಡಾಲ) (सं) ना.–महार; चांडाळ; घाण पदार्थ खाणारा.

चात (ಚಾತ) (सं) ना.–एक राक्षस; सूत कातण्याची चाती; कदर.

चातक (ಚಾತಕ) (सं) ना.–याचक; चातकपक्षी; मेघांतील जलपानावर जगणारा पक्षी.

चातुर (ಚಾತುರ) (सं) वि.–चातुर्याचे; चारीशी संबंध असलेले

चातुरंग (ಚಾತುರಂಗ) (सं) वि.–चतुरंग सैन्याशी संबंधित.

चातुरिय (ಚಾತುರಿಯ) (सं) ना. चातुर्य; नैपुण्य; जाणतेपणा.

चातुर्दंत (ಚಾತುರ್ದಂತ) (सं) ना.–ऐरावत; चार दातांचा हत्ती.
(सं) वि.–हत्तीविषयक; ऐरावती.

चातुर्बल (ಚಾತುರ್ಬಲ) (सं) ना.–'चातुरंग' पहा.

चातुर्मास (ಚಾತುರ್ಮಾಸ) (सं) ना.–चार महिने आचारण्याचें व्रत; आषाढ एकादशी ते कार्तिक एकादशीपर्यंतचा काळ.

चातुरमास्य (ಚಾತುರ್ಮಾಸ್ಯ) (सं) ना.–चार महिने आचरण्याचें व्रत.

चातुर्य (ಚಾತುರ್ಯ) (सं) ना.–चतुरपणा; कौशल्य; नैपुण्य; जाणतेपणा.

चातुर्वर्ग (ಚಾತುರ್ವರ್ಗ) (सं) वि.–चारवर्गासंबंधी.

चातुर्वर्ण } (ಚಾತುರ್ವರ್ಣ) (सं) वि.–चारवर्णासंबंधी.
चातुर्वर्ण्यम् } (ಚಾತುರ್ವರ್ಣ್ಯಂ)

चातुःश्रुति (ಚಾತುಃಶ್ರುತಿ) (सं) वि.–चार वेदविषयक.

चादगे (ಚಾದಗೆ) (क) ना.–'चातक' पहा.

चांदणि (णी) (ಚಾಂದಣಿ [ಣೀ]) (अ-दे) ना.–चंद्रप्रकाश; चांदणें.

चांदस (ಚಾಂದಸ) (क) वि.–छंद्राविषयीं; वेदानुयायी ब्राह्मण; वैदिक.

चांद्र } (ಚಾಂದ್ರ) (सं) वि.–चंद्रासंबंधीचें.
चांद्रमस } ಚಾಂದ್ರಮಸ) (सं) ना.–अमृतशिला; चंद्रकांत; चंद्रकला.

चांद्रमास (ಚಾಂದ್ರಮಾಸ) (सं) ना.–चंद्रगतीवरून केलेली कालगणना; चैत्रवैशाखादि बारा महिने.

चांद्रमान (ಚಾಂದ್ರಮಾನ) (सं) ना.–चंद्रगतीनुसार केलेली कालगणना.

चांद्रायण (ಚಾಂದ್ರಾಯಣ) (सं) ना.–चंद्रगतीवर आधारलेलें व्रत.
(सं) वि.–चंद्रगतीसंबंधी.

जमुने (ಜಮುನೆ) (क) ना. – यमुनानदी; जमुना.

जं (जों) प (ಜಂ [ಜೊಂ] ಪ) (क) ना. – रास; ढीग; समुदाय; डुलकी; मध्यस्थ; पेंग; वामकुक्षी; झोप.

जंपति (ಜಂಪತಿ) (क) ना. – दांपत्य; दंपती; जायापति; पतिपत्नि.

जं(जों)पु (ಜಂ[ಜೊಂ]ಪು) (क) ना. – 'जंप' पहा.

जंपे(पताळ) (ಜಂಪೆ) (ಪತಾಳ) (क) ना. – झंपा; पांच किंवा दहा मात्रांचा झंप ताल.

जंब (ಜಂಬ) (क) ना. – दंभ; आडंबर; अवडंबर; अहंकार; मस्ती; स्वतःलाच घेतलेला चावा; अतिशयोक्ति; अतिरंजितता; दिमाख; ऐट; खोटा डौल.

—गार (ಗಾರ) (क) वि. – दंभ मिरवणारा; ढोंगी; स्तुतिपाठक; चारण; भाट.

—गाति (ಗಾತಿ) (क) ना. – ढोंगी स्त्री.

जंबर (ಜಂಬರ) (क) ना. – काम; उद्योग; अंगीकार; पत्करा.

जंबाल (ಜಂಬಾಲ) (सं) ना. – राड; चिखल; बुरडी; पोहण्याचा भोपळा; असत्य; अंतर्गंगा; शेवाळ; कंजाळ; थापा.

जंबि (ಜಂಬಿ) (क) ना. – शमीचें झाड.

जंबिया (ಜಂಬಿಯಾ) (अ. दे.) ना. – एक आखुड तलवार.

जंबीर(भीर) (ಜಂಬೀರ [ಬೀರ]) (क) ना. – पपनस; बंपार; लिंबू.

जंबु(बू) (ಜಂಬು [ಬೂ]) (सं) ना. – जांभूळ; सुवास.

जंबु(बू)क (ಜಂಬು [ಬೂ] ಕ) (सं) ना. – वरुण; कोल्हा; श्रृगाल.

जंबुद्वीप (ಜಂಬುದ್ವೀಪ) (सं) ना. – प्राचीन भारत; हिंदुस्थानाचें प्राचीन नांव.

जंबुमालि (ಜಂಬುಮಾಲಿ) (सं) ना. – एक राक्षस; प्रहस्तपुत्र.

जंबुनदि (द) (ಜಂಬೂನದಿ [ದ]) (सं) ना. – मेरुपर्वतातून उगम पावलेली एक नदी.

जंभ (ಜಂಭ) (सं) ना. – इंद्रानें मारलेला एक राक्षस; लिंबु; चावा; दाढ; सुळेदात; तोंड.

जम्मविसु (ಜಮ್ಮವಿಸು) (क) धा. – थरथर कापविणें; भिवविणें.

जम्मने (ಜಮ್ಮನೆ) (क) अ. – लागलीच; त्वरित; चटकन; एकदम.

जय (ಜಯ) (सं) ना. – विजय; शुभ; शौर्य; जयाचीयुक्ति; जयजयकार; एक संवत्सर.

—इसु (ಇಸು) (क) धा. – जिंकणें; विजय पावणें;

—शाली (ಶಾಲಿ) (सं) वि. – जय मिळवणारा;

—स्तंभ (ಸ್ತಂಭ) (सं) ना. – विजयस्मारक; विजयस्मरणार्थ खांब.

जयघोष (ಜಯಘೋಷ) (सं) ना. – जयजयकार; विजयाची घोषणा.

जयत् (ಜಯತ್) (सं) वि. – जयशाली; विजयी.

जयद्रथ (ಜಯದ್ರಥ) (सं) ना. – कौरवपक्षीय राजा; सिंधुदेशाचा राजा; महाराष्ट्रीय.

जयन (ಜಯನ) (सं.) ना. – जय; चिलखत; युद्धकवच.

—शालिका (के) (ಶಾಲಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना. – शस्त्रागार; शस्त्रभांडार.

जयंत (ಜಯಂತ) (सं) ना. – इंद्रपुत्र; धृतराष्ट्राचा एक मंत्री

जयंति (ಜಯಂತಿ) (सं) ना. – जन्मतिथि; वाढदिवस; जन्मदिनोत्सव; पताका; निशाण.

जयमान (ಜಯಮಾನ) (सं) ना. – विजय; जयप्राप्ति.

जयलक्ष्मि, (श्री) (ಜಯಲಕ್ಷ್ಮಿ[ಶ್ರೀ]) (सं) ना. – विजया; विजयलक्ष्मी.

जयविजय (ಜಯಾವಿಜಯ) (सं) ना. – वैकुंठाचे द्वारपाल.

जया (ये) (ಜಯಾ [ಯೆ]) (सं) ना. – दुर्गा; कालिदेवी; शक्ति.

जयि (यी) (ಜಯಿ [ಯೀ]) (सं) वि. – विजयी; जय मिळवलेला.

जयिनि (नी) (ಜಯಿನಿ [ನೀ]) (सं) ना. – विजयिनी; जय मिळवलेली स्त्री.

जय्य (ಜಯ್ಯ) (सं) वि. – विजययोग; जयसाध्य.

जर (ಜರ) (सं) ना. – जरा; वार्धक्य; म्हातारपण; जीर्णता; कृष्णाला जखम करणारा वेरड.

(क) ना. – ज्वर; ताप; पुरळ; जर.

जरगु (ಜರಗು) (क) धा. – होणें; भरणें; मिरवणें; गमावणें; चकाकणें; निसरणें; पळून जाणें; निसटणें.

(क) ना. सोन्याची पूड; धान्यांतील केर; राड; उतार; निसरडे; गडबडा लोळणें; सुटका; कृति.

—इसु (ಇಸು) (क) धा. – चालविणें; संपविणें; उतरविणें.

जरठ (ಜರಠ) (सं) वि. – कठोर; क्रूर; घट्ट; वृद्ध; जीर्ण.

जरड (ಜರಡ) (क) वि. – ओबडधोबड; घट्ट.

(क) ना. – क्रूर मनुष्य; क्रोधी मनुष्य.

जरडु (ಜರಡು) (क) वि. – पोकळ; निःसार; अल्प; क्षुद्र; निरुपयोगी; अप्रयोजक.

जरडे (डि) (ಜರಡೆ [ಡಿ]) (क) ना. – चाळण; गाळणी; गाळण्याचें साधन.

जरण (ಜರಣ) (सं) ना. – वृद्धावस्था; जीर्णता.

जरत् (रंत) (ಜರತ್ [ರಂತ]) (सं) वि. – जुना; जीर्ण; कोमेजलेला; अस्थिर.

जरद्गव (ಜರದ್ಗವ) (सं) ना. – म्हातारा बैल; जुना बैल.

जरह (ಜರಹ) (सं) ना. – जरा; तिरस्कार; निंदा.

जरा (ಜರಾ) (सं) ना. – म्हातारपण; वार्धक्य.

जरायु (ಜರಾಯು) (सं) ना. – गर्भकोष; गर्भिणी.

—ज (ಜ) (सं) ना. – गर्भकोषांतून जन्मणारे जीव.

जरासंध (ಜರಾಸಂಧ) (सं) ना. – मगध देशाचा राजा.

जरि (ಜರಿ) (क) धा. – पडणें; पाय घसरणें; चिंता करणें; खड्डा खणणें; पाणउतारा करणें.

(क) ना.—खड्डा; प्रवाह; नदी; प्रपात; धबधबा; विषजंतु; शतपदी-जरतारी भृगु.
**जरिगल्लु** (ಜರಿಗಲ್ಲು) (क) ना.—सुवर्णखाणीचे दगड.
**जरुबु** (ಜರುಬು) (क) धा.—वायफळ गप्पा मारणें; रिकामे बडबडणें; वाचाळता करणें; अर्थशून्य बोलणें.
**जरुहु** (ಜರುಹು) (क) धा.—वाढविणें; वृद्धि पावविणें; नाश करणें.
**जरे** (ಜರೆ) (सं) ना.—'जरा' पहा.
(क) धा.—हिणविणें; हुंगवणें; टोचून बोलणें; निंदणें.
**जरेह** (ಜರೆಹ) (क) ना.—घसरगुंडी; आपलेच बोलणें अंगलट येणें.
**जर्कु** (ಜರ್ಕು) (क) धा.—दाबणें; दडपणें.
(क) ना.—'कुट्टकु' पहा.
**जर्जर (रित)** (ಜರ್ಜರ [ರಿತ]) (सं) वि.—शिथिल; जुनेंपुराणें; जीर्ण; चोळामोळा झालेले; फुटलेले; जखम झालेले.
**जर्जरिसु** (ಜರ್ಜರಿಸು) (क) धा.—दुर्बल करणें; अटणें; अटविणें; भिवविणें; शक्तिहीन करणें.
**जर्जोर** (ಜರ್ಜೋರ) (क) वि.—उद्धट; अहंकारी; 'जर्जर' पहा.
**जर्बु (र्बु)** (ಜರ್ಬು [ರ್ಬು]) (क) धा.—डोळ्याच्या खुणेनें सांगणें; डोळे वटारणें; शिवी देणें; निंदणें; अवमानणें; भिवविणें.
(क) ना.—भीति; अहंकार; उद्धटता; अवमान; निंदा.
**जल** (ಜಲ) (सं) ना.—पाणी; जड मनुष्य; मंदमति.
—**ज** (ಜ) (सं) ना.—कमळ; मासळी; चंद्र.
—**मय** (ಮಯ) (सं) वि.—जलानें भरलेलें; पाणीपाणी झालेले.
**जलक** (ಜಲಕ) (सं) ना.—स्नान; अंघोळ; वीरलता.
**जलकन्ये** (ಜಲಕನ್ಯೆ) (सं) ना.—नागकन्या; नागस्त्री.
**जलकरन** (ಜಲಕರನ) (सं) ना.—शंख; कमल; ढग; आकाश; ताजें पाणी.
**जलकाक** (ಜಲಕಾಕ) (सं) ना.—पाण्यांत बुडणारा कावळा; पाणबुडा; पाणडुबा पक्षी.
**जलक्कने** (ಜಲಕ್ಕನೆ) (क) अ.—लागलीच; झटकन; एकदम; स्वच्छपणें.
(क) ना.—निर्मलता; झळझळीतपणा; स्वच्छता; घाई.
**जलक्रीडे** (ಜಲಕ್ರೀಡೆ) (सं) ना.—पाण्यांतील विहार; खेळ; डुंबणें; जलांतील विलास; जलक्रीडा.
**जलगार** (ಜಲಗಾರ) (क) ना.—वंचक नावाडी; कचऱ्यांतून सोनेचांदी काढणारा; केर काढणारा, गारुडी; कोळी; मासे धरणारा.
**जलगु** (ಜಲಗು) (क) ना.—सोनें; सोन्याच्या खाणींतील दगड.
**जलग्रह** (ಜಲಗ್ರಹ) (सं) ना.—मगर; सुसर; मोठा मासा.
**जलचर** (ಜಲಚರ) (सं) ना.—पाण्यांत राहणारा प्राणी; नाव; जहाज.
**जलजनित-विद्युत्** (ಜಲಜನಿತ-ವಿದ್ಯುತ್) (सं) ना.—पाण्याच्या शक्तीवर उत्पन्न झालेली वीज; वारा आणि ढग यांच्या घर्षणानें झालेली वीज.
**जलजलिसु** (ಜಲಜಲಿಸು) (क) ना.—प्रज्वलित करणें; प्रकाशणें.
**जलजज** (ಜಲಜಜ) (सं) ना.—ब्रह्मदेव; 'अलरिच' पहा.
**जलजजांड** (ಜಲಜಜಾಂಡ) (सं) ना.—ब्रह्मांड.
**जलजनाभ** (ಜಲಜನಾಭ) (सं) ना.—विष्णु; पद्मनाभ.
**जलजासन** (ಜಲಜಾಸನ) (सं) ना.—ब्रह्मदेव.
**जलजीव** (ಜಲಜೀವ) (सं) ना.—मासे धरणारा.
**जलतरंग** (ಜಲತರಂಗ) (सं) ना.—पाण्याची लाट; एक वाद्य
**जलद** (ಜಲದ) (सं) ना.—मेघ; ढग; आकाश.
(अ. दे.) ना.—तीव्रता; वेग.
**जलदागम** (ಜಲದಾಗಮ) (सं) ना.—पावसाळा; पहिला पाऊस; वळीवाचे पाऊस.
**जलदान** (ಜಲದಾನ) (सं) ना.—तर्पण; पाणी सोडणें.
**जलदुर्ग** (ಜಲದುರ್ಗ) (सं) ना.—सभोवार खंदक किंवा पाणी असलेला किल्ला.
**जलधर** (ಜಲಧರ) (सं) ना.—मेघ; ढग; आकाश.
—**मार्ग** (ಮಾರ್ಗ) (सं) ना.—आभाळ; आकाश; सूर्य.
**जलधि (निधि)** (ಜಲಧಿ [ನಿಧಿ) (सं) ना.—पाण्याचा साठा; समुद्र; पावसाचें पाणी.
—**जे** (ಜೆ) (क) ना.—लक्ष्मी.
—**रशने** (ರಶನೆ) (सं) ना.—भूमी; पृथ्वि.
**जलंधर** (ಜಲಂಧರ) (सं) ना.—जलंधर राक्षस; मेघ; ढग.
**जलपति** (ಜಲಪತಿ) (सं) ना.—वरुणदेव; महासागर.
**जलपुष्प** (ಜಲಪುಷ್ಪ) (सं) ना.—मासा; समुद्रफूल.
**जलपूरकनलिका** (ಜಲಪೂರಕನಲಿಕಾ) (सं) ना.—पाण्याचा नळ; पाण्याची चावी.
**जलप्रलय** (ಜಲಪ್ರಲಯ) (सं) ना.—जगाचा पाण्यांत बुडून विनाश; सर्वनाश.
**जलप्राय** (ಜಲಪ್ರಾಯ) (सं) ना.—डोह.
**जलप्रिय** (ಜಲಪ್ರಿಯ) (सं) ना.—वैडूर्य रत्न.
**जलफलकविमान** (ಜಲಫಲಕವಿಮಾನ) (सं) ना.—नौका; जहाज.
**जलभृत्** (ಜಲಭೃತ್) (सं) ना.—मेघ; ढग; जलधर.
**जलमग्न** (ಜಲಮಗ್ನ) (सं) ना.—पाण्यांत बुडलेलें; भिजलेले.
(सं) ना.—कमल; जलचर वगैरे जलांतील वस्तु.
**जलमुच् (क्)** (ಜಲಮುಚ್ (ಕ್) (सं) ना.—मेघ; ढग.
**जलराशि** (ಜಲರಾಶಿ) (सं) ना.—समुद्र; सागर; डोह.

**जलरुह** (ಜಲರುಹ) (सं) ना.–कमल; जलांत रुजणारें–वाढणारें.

—**मित्र** (ಮಿತ್ರ) (सं) ना.–सूर्य.

—**रिपु** (ರಿಪು) (सं) ना.–चंद्र.

—**अक्ष** (ಅಕ್ಷ) (सं) ना.–कमलनेत्र विष्णु; कृष्ण.

**जलरुहोदर** (ಜಲರುಹೋದರ) (सं) ना.–कमल ज्याच्या उदरातून आलें तो विष्णु; पद्मनाभ.

**जलशयन** (ಜಲಶಯನ) (सं) ना.–जलावर निजणारा; विष्णु; नारायण.

**जलशूक** (ಜಲಶೂಕ) (सं) ना. कमलकंद; शेवाळ; अंतर्गंगा.

**जलसंधि** (ಜಲಸಂಧಿ) (सं) ना.–दोन सागरांना जोडणारा कालवा. सामुद्रधुनि.

**जलहास** (ಜಲಹಾಸ) (सं) ना.–जलफेस; सागरफेण; बुडबुडा; फेस.

**जलाकर** (ಜಲಾಕರ) (सं) ना.–जलाशय; समुद्र; झरा; बुडबुडा; चिलीम; गुडगुडी.

**जलाधिप** (ಜಲಾಧಿಪ) (सं) ना.–वरुणदेव.

**जलांतनौके** (ಜಲಾಂತನೌಕೆ) (सं) ना.–पाणबुडी; जहाज; मोटक

**जलावतार** (ಜಲಾವತಾರ) (सं) ना.–धक्का; गोदी; जहाज लागण्याचा किनारा.

**जलावर्त** (ಜಲಾವರ್ತ) (सं) ना.–भोवरा; पाणवेरा; पाणचक्र.

**जलाशय** (ಜಲಾಶಯ) (सं) ना.–सरोवर; पाण्याचा सांठा; मासा. मंदमति; अज्ञानी; वाला.

**जलाह्वय** (ಜಲಾಹ್ವಯ) (सं) ना.–कमल.

**जलिक** (ಜಲಿಕ) (सं) वि.–वंचक; फसव्या; मायाकार.

**जलुगु** (ಜಲುಗು) (क) धा.–गळणें; गाळणें.

(क) ना.–राड; गाळ.

**जलूके (का)** (ಜಲೂಕೆ) (ಕಾ) (सं) ना.–जळू; रक्तशोषण करणारा जंतु; कांटी.

**जलो (लौ) के** ಜಲೋ (ಲೌ) [ಕೆ]) (सं) ना.–जलचर; मासा; जलच वर असलेलें.

**जलोच्छ्वास** (ಜಲೋಚ್ಛ್ವಾಸ) (सं) ना.–पाणी बाहेर नेण्याचा पाट; परिवाह; तळ्यातील मोरी.

**जलोत्तरण** (ಜಲೋತ್ತರಣ) (सं) ना.–जलतरण; पोहणें; पाणी तोडून परतीरीं गमन.

**जलोदर** (ಜಲೋದರ) (सं) ना.–उदररोग; पोटात पाणी साठण्याचा रोग.

**जलौक्ष** (ಜಲೌಕ್ಷ) (सं) ना.–सरोवर; समुद्र; तटाक; जलाशय.

**जल्प (ल्पन)** (ಜಲ [ಲ್ಪನ]) (सं) ना.–कथन; गोष्ट; चर्चा; गप्पा; मुखस्तुति; खुशामत.

**जल्पाक** (ಜಲ್ಪಾಕ) (सं) वि.–बावडी उडवणारा; गप्पिष्ट; थापाड्या.

**जल्पित** (ಜಲ್ಪಿತ) (सं) वि.–सांगितलेले; कथित.

(सं) ना.–शब्द; वचन.

**जल्लडि (डे)** (ಜಲ್ಲಡಿ [ಡೆ]) (क) ना.–चाळणी; गाळणी गाळण्याचे साधन.

**जल्लने** (ಜಲ್ಲನೆ) (क) अ.–झटकन; लागलीच.

**जल्लि** (ಜಲ್ಲಿ) (क) ना.–कणगी; वेताची टोपली; हारा; घडीव दगड; खडी; खोटेपणा.

(सं) ना.–गोंडा; चवरी;पुष्पमाला; झालर.

**जल्लु** (ಜಲ್ಲು) (क) ना.–शीड; नाबेतील खांब; धांदोटी; कपड्याचे किंवा पानाचे तुकडे.

**जल्ले** (ಜಲ್ಲೆ) (क) ना.–बांबूची बुट्टी; लोखंडी पाटी.

**जव** (ಜವ) (क) ना.–यम; अंतक.

—**केडिसु** (ಕೆಡಿಸು)(क) धा.–वेग थांबविणें; बलहीन करणें.

(सं) ना.–त्वरा; वेग; शक्ति; बल; स्थानांतर.

**जवन** (ಜವನ) (क) ना.–यवनदेशीय; वेगवान घोडा; यमसंबंधी; दवना.

**जवनिके** (ಜವನಿಕೆ) (सं) ना.–यवनिक; पडदा; घोषा.

**जवरक्के** (ಜವರಕ್ಕೆ) (क) ना.–यमरक्षा; कवच; चिलखत, देहत्राण.

**जवहुर** (ಜವಹುರ) (क) ना.–यमलोक; यमपुरी.

**जवळ** (ಜವಳ) (क) ना.–जोड; आवळे जावळें; जावळ.

**जवळि** (ಜವಳಿ) (क) ना.–वस्त्राची जोडी; साडी; कापड.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.–एकत्रित होणें; समाविष्ट होणें.

—**कालु** (ಕಾಲು) (क) ना.–पदयुग्म.

—**मद्दळे** (ಮದ್ದಳೆ) (क) ना.–मृदंग; जोडचर्मवाद्य.

**जवि** (ಜವಿ) (क) ना.–घोड्याच्या शेपटीचे केस; सारंगीचा तंतुगज.

**जवुगु (ळु)** ಜವುಗು [ಳು]) (क) ना.–पाणथळ जमीन; दलदलीचा प्रदेश; ओल; दलदल.

**जवे** (ಜವೆ) (क) ना.–सातु; जव; यव.

**जवारि** (ಜವಾರಿ) (क) वि.–देशी; देशावरी.

**जवाहीर** (ಜವಾಹೀರ) (अ. दे) ना.–मोती; रत्ने वगैरे जडजवाहीर; कोंदणांतील रत्नाचा दागिना.

**जव्वन** } (ಜವ್ವನ) (अ. दे.) ना.–यौवन; तारुण्य; वाढतें वय;
**जौवन** } (ಜೌವನ) स्तन; कुच.

—**इग** (ಇಗ) (क) ना.–तरुण; वयात आलेला.

**जव्वने** (ಜವ್ವನೆ) (क) ना.–युवती; तरुणी; लहान वयाची स्त्री.

**जव्वाजि** (ಜವ್ವಾಜಿ) (क) ना.–एक सुगंधी द्रव्य.

**जस** (ಜಸ) (क) ना.–यश; कीर्ति; प्रख्याति.

—वंत (युत) (ವಂತ [ಯುತ]) (क) वि. – कीर्तिमान; प्रसिद्ध पुरुष.

जस्र (ಜಸ್ರ) (सं) अ. – केव्हा केव्हा; अकस्मात्.
(सं) ना. – थकवा; कंटाळा; आयास.

जहागीरुदार (ಜಹಗೀರುದಾರ) (अ. दे) ना. – जहागीरदार; प्रांताधिकारी.

जहजु (ಜಹಜು) (अ. दे) ना. – जहाज; मोठी नाव.

जहल्लक्षण (ಜಹಲ್ಲಕ್ಷಣ) (सं) ना. – शब्दावृत्तीतील लक्षणभेद; लक्षणेनें घ्यावयाचा अर्थ.

जह्नु (ಜಹ್ನು) (सं) ना. – गंगेचा पिता जन्हुऋषि.
—तनये (ತನಯೆ) (सं) ना. – जान्हवी; गंगानदी.

जल (ಜಳ) (क) ना. – पाणी; जड.
(क) ना. – झळ; उष्णता; उकाडा; स्वच्छता; कांति; प्रकाश.

जळकु (ಜಳಕು) (क) धा. – हलविणें; झोक देणें; थरथरणें; कापणें.

जळंब (ಜಳಂಬ) (क) ना. – पांघरूण; आवरण; झाकण; आच्छादन; पंखा.

जळंब्रात्त (ಜಳಂಬಾಯ್ತ) (क) ना. – चामर; पखा; भालदार.

जळरुह (ಜಳರುಹ) (सं) ना. – कमल; 'तावरे' पहा.

जळ्ळु (ಜಳ್ಳು) (क) वि. – अयोग्य. अडचणीचें; खोटें; पोकळ;

जाग (ಜಾಗ) (क) ना. – स्थळ; हिरवा रंग; पाच; रत्न; पन्नारत्न; याग; यज्ञ; वेध.
—परल् (ಪರಲ್) (क) ना. – पाचेच्या रंगाचा;

जागटे (ಜಾಗಟೆ) (क) ना. – झांगट; लोहवाद्य; ताश; झणाणा; पूजेची घंटा.

जागर (ಜಾಗರ) (सं) ना. – जागृति; लक्ष: निद्रानाश; पहारा; कवच; पौरुष; बल; धैर्य.

जागरण (ಜಾಗರಣ) (सं) ना. – जाग्रण; जागृति; जागरूकता; निद्रानाश.

जागरता (ते) (ಜಾಗರತಾ [ತೆ]) (सं) ना. – जागृति; जागरूकता.

जागरि (ಜಾಗರಿ) (सं) ना. – जागृत मनुष्य; गूळ.

जागरिणी (ಜಾಗರಿಣೀ) (सं) ना. – जागृत स्त्री; न झोपलेली स्त्री.

जागरित (ಜಾಗರಿತ) (सं) वि. – जागृत; झोपून उठलेला.

जागरूक (ಜಾಗರೂಕ) (सं) वि. – जागा; जागृत; मागचापुढचा विचार करणारा; जाणीव असलेला.
—ते (ತೆ) (सं) ना. – जाणीव; जागृति; विवेक; समजूत.

जागरे (यें) (र्ति) (ಜಾಗರೆ [ಯೆ] ತಿ) (सं) ना. – जाणीव; जागृति.

जागिसु (ಜಾಗಿಸು) (क) धा. – जागणें; ताठ उभे राहणें; वाकविणें; वाहवा करणें; प्रोत्साहन देणें; देह ताठ करणें.

जागु (ಜಾಗು) (क) अ. – भले ! वाहवा !
(क) ना. – मौन.

जागुड (ಜಾಗುಡ) (क) ना. – कुंकुमकेशर; केशर.

जागृ (ग्र) त (ಜಾಗೃ [ಗ್ರ] ತ) (सं) वि. – जागा झालेला; जाणीव झालेला; संभाळून चालणारा.

जागृ (ग्र) ति (ಜಾಗೃ [ಗ್ರ] ತಿ) (सं) ना. – भान; विवेक; जागरूकता.

जाग्रत् (ಜಾಗ್ರತ್) (सं) ना. – 'जागृत' पहा.

जाग्रते (ಜಾಗ್ರತೆ) (सं) अ. – लागलीच; झटकन.
(सं) ना. – जागरूकता; जागृति.

जांगल (ಜಾಂಗಲ) (सं) ना. – जंगल; अरण्य; क्रूर; अनागरिक; हिंसक; निर्जल प्रदेश; रेताड.

जांगुल (ಜಾಂಗುಲ) (सं) ना. – मायाविद्या; विषपरिहारविद्या; विष उतरवणारा; वैद्य.

जांगुलि (क) (ಜಾಂಗುಳಿ [ಕ]) (सं) ना. – वैद्य; गारुडी; सर्प खेळवणारा; जादुगार.

जांघिक (ಜಾಂಘಿಕ) (सं) वि. – पळपुट्या; पायावर भरंवसा ठेवणारा; भीतीनें पळणारा.

जाजि (ಜಾಜಿ) (क) ना. – मालतीपुष्प; जायफळ; मोगऱ्याचें फूल.

जाजु (ಜಾಜು) (क) ना. – तांबडा दगड; काव; इंद्रजाल; मायाविद्या; जादू; गारुडी.

जाज्वल्यमान (ಜಾಜ್ವಲ್ಯಮಾನ) (सं) वि. – प्रज्वलित; प्रकाशमान; जळणारा; तेजःपुंज.

जाठर (ಜಾಠರ) (सं) वि. – औदरीय; पोटासंबंधी.
—रस (ರಸ) (सं) ना. – पित्त; पाचक रस.

जाडणे (ಜಾಡಣೆ) (क) ना. – दान; वापर; हालचाल; फेक; सहनशीलता; मेंदी.

जाडि (ಜಾಡಿ) (क) ना. – अखंड प्रवाह; उकळी; झरा; ओढा; उमळी; क्रोध; बलात्कार; उष्णता; समूह; कांबळें; भर.

जाडिसु (ಜಾಡಿಸು) (क) धा. – झडणें; स्वच्छकरणें; हलविणें; फेकणें; पेटविणें; प्रोत्साहन देणें; टोचून बोलणें; तोंडावर सांगणें; केर काढणें.

जाडु (ಜಾಡು) (क) ना. – रीति उपयोग; वासरक्रम; पद्धति; शैली; ओळ; मार्ग; पंक्ति; सूचना; सुगावा; शोध.

जाडे (ಜಾಡೆ) (क) ना. – पावलाची खूण; गाडीच्या चाकाची खूण; सूचना; चाहुल; अंथरूण; कांबळें; चुणचुणीतपणा; अनुभव; चापल्य, वेग; उपाय; युक्ति; सुट्टी; विश्रांति; मध्यंतर; रजा.

जाड्य (ಜಾಡ್ಯ) (सं) ना. – मंदपणा; जडत्व; अस्वस्थता; रोग; आलस्य; रोग; थंडपणा; मूर्खपणा; सुस्ती; जडपणा.

**जाण्** (ಜಾಣ್) (क) ना. – चातुर्य; समजूत; शहाणपणा.

**—इमे (मे)** (ಇಮೆ [ಮೆ]) (क) ना. – समजूत; ज्ञान; शहाणपणा; चतुराई.

**—ओडेय** (ಒಡೆಯ) (क) ना. – ज्ञानी; तज्ञ.

**—किडु** (ಕಿಡು) (क) धा. – न समजणें; मति कुंठित होणें.

**—नुडि** (ನುಡಿ) (क) ना. – चांगले बोलणें; विचारी भाषण.

**जाण** (ಜಾಣ) (क) (क) ना. – ज्ञाता; जाणकार.

**जाणि (णु) वे** (ಜಾಣಿ [ಣು] ವೆ) (क) ना. – ज्ञान; जाणीव; प्रतिपत्ति; प्रगल्भता.

**जात** (ಜಾತ) (सं) वि. – जन्मलेले; अस्तित्वात असलेलें.
(सं) ना. – समूह; पुत्र; सत्कुलीन.

**जातक** (ಜಾತಕ) (सं) ना. – जन्मकुंडली; बुद्धदेवाची पूर्व जन्मकथा; जन्माला आलेला.

**जातकर्म** (ಜಾತಕರ್ಮ) (सं) ना. – नामकरण; बारसें; जन्मल्या बाळाचें संस्कार; पुत्रावण; जातक.

**जातरूप** (ಜಾತರೂಪ) (सं) ना. – सोनें; जन्मलेल्या मुलाचें रूपरंग; नग्नावस्था; नग्नता.

**जातवेद (दस्)** (ಜಾತವೇದ [ದಸ್]) (सं) ना. – अग्नि.

**—मुनि** (ಮುನಿ) (सं) ना. – बसवेश्वरांच्या गुरूचें नाव.

**जातसूतक** } (ಜಾತಸೂತಕ) (सं) ना. – मिश्र रक्ताची संतति.
**जातशौच** } (ಜಾತಶೌಚ) अशुद्ध जन्म.

**जाति** (ಜಾತಿ) (सं) ना. – ब्राह्मणादि चतुर्वर्ण; जातकुळि; वडिलोपार्जित औद्योगिक संस्कार; कुळकसब; मालती-पुष्प; जायफळ; जन्म; गोत्र; आवळ्याचे झाड; उत्तम कूळ; समूह; विनय.

**—कर्म** (ಕರ್ಮ) (सं) ना. – जातीचें कर्तव्य; जातीचें मुख्य कार्य.

**जाति (ती) कोश** (ಜಾತಿ [ತೀ] ಕೋಶ) (सं) ना. – जायपत्री.

**जातिगार** (ಜಾತಿಗಾರ) (क) ना. – गुंड; खाऊन फिरणारा. फटिंग; 'उंडाडि' पहा.

**जातिफल** (ಜಾತಿಫಲ) (सं) ना. – जायफळ.

**जातिभ्रष्ट** (ಜಾತಿಭ್ರಷ್ಟ) (सं) वि. – जातिबहिष्कृत; बाटगा; जातिबाह्य; नीतिहीन; निरुपयोगी.

**जातिवळ** (ಜಾತಿವಳ) (क) ना. उद्योगी; अनुवंशिक धंदा करणारा.

**जातिवैर** (ಜಾತಿವೈರ) (सं) ना. – जातिद्वेष; जन्म शत्रुत्व.

**जातिवैरि** (ಜಾತಿವೈರಿ) (सं) कुलकंटक; कुऱ्हाडीचा दांडा. (लक्षणा)

**जातिसंकर** ಜಾತಿಸಂಕರ) (सं) ना. – जातिमिश्रण; कुलभ्रष्टता; जातीजातीचे एकीकरण.

**जातीय** (ಜಾತೀಯ) (सं) वि. – जातिसंबंधी; जातीला सोपवून दिलेलें; जातवार; जातिप्राधान्य दिलेलें.

**जातु** (ಜಾತು) (सं) अ. – केव्हा केव्हा; कधीतरी; कदाचित्; कथंचित्.

**जातुधान** (ಜಾತುಧಾನ) (सं) ना. – राक्षस; पिशाच.

**जाते** (ಜಾತೆ) (सं) ना. – मुलगी; कथा.

**जात्य** (ಜಾತ್ಯ) (सं) वि. – कुलीन; सत्कुलात जन्मलेला; योग्य.

**जात्यतीत** (ಜಾತ್ಯತೀತ) (सं) वि. – जातिभेद न मानणारा; सत्कुल जन्माचा अभिमान धरणारा.

**जात्यंध** (ಜಾತ್ಯಂಧ) (सं) वि. – जातीच्या अभिमानानें पछाडलेला; दुरभिमानी.

**जात्रे** (ಜಾತ್ರೆ) (क) ना. – यात्रा; उत्सव; देवाची मिरवणूक; सण; पवित्र देवदर्शन.

**जादि** (ಜಾದಿ) (सं) ना. – मोगरा; मालती; जाति; जाई.

**जादु** (ಜಾದು) (सं) ना. – काव; तांबडी माती; जायफळ.
(अ. दे) ना. – इंद्रजाल; मायाविद्या; नजरबंदी.

**जान** (ಜಾನ) (क) ना. – जाण; ज्ञान; ध्यान; समजूत; योजना; चिंता; विचार; स्मृति.

**—इसु** (ಇಸು) (क) धा. – समजून घेणें; योजना करणें; योजिणें; आठवणें; स्मरणें.

**जानकि (की)** (ಜಾನಕಿ [ಕೀ]) (सं) ना. – जनककन्या; सीता.

**जानकीजानि** (ಜಾನಕೀಜಾನಿ) (सं) ना. – जानकीजीवन; राम; जानकीपति.

**जानपद** (ಜಾನಪದ) (सं) वि. – जनपदासंबंधी; खेड्यासंबंधी.
(सं) ना. – देश; खेडें; जनगण; जनता.

**जानि** (ಜಾನಿ) (क) वि. – ज्ञानी; समजूतदार; आलोचक; विचारक. (सं) ना. – पत्नि; बायको.

**जानिसु** (ಜಾನಿಸು) (क) धा. – ध्यान करणें; विचार करणें; स्मरणें; आठवणें; विवंचून पाहणें.

**जानु** (ಜಾನು) (सं) ना. – गुडघ्यापासून खालचा भाग; पिंढरी.

**—दघ्न (मात्र)** (ದಘ್ನ [ಮಾತ್ರ]) (सं) ना. – गुडघ्या-पर्यंतचा भाग; जंघा.

**जापाळ** (ಜಾಪಾಳ) (क) ना. – जेपाळ बी; मलसारक बी.

**जापु** (ಜಾಪು) (क) ना. – लांबट पाऊल; मृदंगवादन; तालगति.

**जाप्य** (ಜಾಪ್ಯ) (सं) ना. – आलस्य; अंगचोरपणा; सुस्ती.

**जाबाल** (ಜಾಬಾಲ) (सं) ना. – जाबालोपनिषत्; धनगर; अजाजीवन कंठणारा; सुखी.

**जाबालि** (ಜಾಬಾಲಿ) (सं) ना. – प्राचीन ऋषि; दशरथाचा गुरु.

**जाम (व)** (ಜಾಮ [ವ]) (सं) ना. – प्रशंसा; चाल; चलन; घटका; दिवसाचा आठवा भाग.

**जामदग्न्य** (ಜಾಮದಗ್ನ್ಯ) (सं) ना. – परशुराम; जगदग्नीचा पुत्र.

**जामात (तृ) (ता)** (ಜಾಮಾತ [ತೃ] [ತಾ]) (सं) ना. – जावई; मुलीचा नवरा; कन्यापति.

**जामि (मिनि)** (ಜಾಮಿ) [ಮಿನಿ] (सं) ना.–पतिव्रता; कुलीना; गरती स्त्री.

**जामीनु** (ಜಾಮೀನು) (अ. दे.) ना.–मध्यस्थ; हमीदार; भद्रता; जबाबदारी.

**जांबव (वंत)** ಜಾಂಬವ [ವಂತ]) (सं) ना.–अस्वलासारखा दिसणारा मानवाचा पूर्वज.

**जांबवति** (ಜಾಂಬವತಿ) (सं) ना.–जांबवानाची कन्या; कृष्णपत्नि.

**जांबवि (जांबु)** ಜಾಂಬವಿ [ಜಾಂಬು]) (सं) ना.–जांभळ; जंबीर.

**जांबूनाद** (ಜಾಂಬೂನಾದ)(सं) ना.–जांबूनदींत सापडणारें सोनें.

**जायक** (ಜಾಯಕ) (सं) ना.–सुगंधीवृक्ष; चंदन.

**जायमान** (ಜಾಯಮಾನ) (सं) ना.–जन्म; जीवन; संसार; प्राप्ति.

**जाया** (ಜಾಯಾ) (सं) वि.–नष्ट झालेलें.
(सं) ना.–हानी; नाश; अकल्याण; पत्नि.

**जायाजीव** (ಜಾಯಾಜೀವ) (सं) ना.–पत्निजीवि; नर्तक; नट.

**जायापति** (ಜಾಯಾಪತಿ) (सं) ना.–दंपती; जोडपे.

**जायि (यिपत्रे)** ಜಾಯಿ [ಯಿಪತ್ರೆ]) (सं) ना.–जायफळ; जायपत्री; संगीत पद्धति; झरझुरी वाद्य.

**जायिल** (ಜಾಯಿಲ) (क) ना.–न्हावी; कुक्कुर; कुत्रा; काळवीट; सारमेय.

**जायु** (ಜಾಯು) (सं) ना.–मद्य; दारू; रोगनिवारक औषध.

**जाये** (ಜಾಯೆ) (सं) ना.–पत्नि; घरधनीण; जाया.

**जार** (ಜಾರ) (सं) ना.–व्यभिचारी; परस्त्रीलोलुप; पाय घसरणारा; व्यभिचारी.

**जारिके** (ಜಾರಿಕೆ) (सं) ना.–निसरडे; व्यभिचार; पायचूक; निसरा.

**जारिणि** } (ಜಾರಿಣಿ) (सं) ना.–व्यभिचारिणी; विधवा;
**जारि(रै)** } (ಜಾರಿ [ರೈ]) वेश्या.

**जारु** (ಜಾರು) (क) धा.–दिसेनासा होणें; वाट चुकणें; पाय चुकणें; चुकून भलतें बोलणें; प्रवाहाच्या उलट जाणें.
–**इसु** (ಇಸು) (क) धा.–खालीं सरणें; दूर होणें; चालू करणें.
–**केडहु** (ಕೆಡಹು) (क) धा.–कडेलोट करणें; उतरणें; नकळत लोटणें; अज्ञानांत लोटणें.

**जाल** (ಜಾಲ) (सं) ना.–जाळें; भिंतींतील जाळें; कपटजाल; झरोका; कोंडवाडा; समूह; अंहकार; दड्डी; श्रृंगार; आकाश; इंद्रिय; गुरें सावलीला आणण्याची जागा; इंद्रजाल; आवरण; मुस्कट.

**जालक** (ಜಾಲಕ) (सं) ना.–गाळणी; गळंतिका; गळंती; फिल्टर; जाळें फेकणारा; कोळी; धीवर; विणलेले कापड; जगण्याची इच्छा करणारा; झरोका; साणें.

**जालकरण** (ಜಾಲಕರಣ) (सं) ना.–मच्छीमार; मासेमारीचा धंदा.

**जालगार** (ಜಾಲಗಾರ) (क) ना.–वंचक; फसविणारा; नावाडी; धीवर; कचऱ्यांतून सोनेचांदी निवडणारा.

**जालंधर (द्र)** ಜಾಲಂಧರ [ದರ]) (सं) ना.–खिडकी; जाळी; जाळीचें वातायन.

**जालरि** (ಜಾಲರಿ) (क) ना.–झालर; श्रृंगारवस्त्र; जाळीचें काम.

**जालि** (ಜಾಲಿ) (सं) ना.–जाळेवाला; कोळी; धीवर.
(क) ना.–बाभळ; बर्बूरवृक्ष.

**जालिक** (ಜಾಲಿಕ) (सं) ना.–नावाडी; नाविक; मासे धरणारा; जादुगार; इंद्रजालिक; वंचक.

**जालिका (के)** (ಜಾಲಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–कवच; चिलखत; लोखंडी जाळें; ठक स्त्री, मंत्रतंत्र करणारी; जादुगारिणी.

**जाल्म** (ಜಾಲ್ಮ) (क) वि.–नीच; वंचक; क्षुद्र; क्रूर; तुच्छ.

**जाव** (ಜಾವ) (क) ना.–याम; प्रहर; तीन तास.

**जावडि** (ಜಾವಡಿ) (क) वि.–अल्प; क्षुद्र; दुर्बल.
(क) ना.–गीत; स्त्रियाच्या हातापायाला लावण्याचा रंग; अळिता.

**जावळ** (ಜಾವಳ) (क) वि.–सामान्य; सर्वसाधारण; मामुली; हीन; क्षुद्र.

**जावळि** (ಜಾವಳಿ) (क) ना.–'चावडि' पहा.

**जाविगे** (ಜಾವಿಗೆ) (क) ना.–सरपण; जळणाचें लाकूड; विश्रांति; सुटी; काकडा; पोत; ठक; वंचक.

**जाहिरात** (ಜಾಹೀರಾತ) (अ. दे) ना.–प्रसिद्धी; प्रगटना; डांगोरा; दवंडी; परिपत्रक; प्रख्याति.

**जान्हवि (वी)** (ಜಾಹ್ನವಿ [ವೀ]) (सं) ना.–गंगानदी; जन्हुतनया.
–**धर** (ಧರ) (सं) ना.–गंगाधर; शिव.

**जाळ** (ಜಾಳ) (क) वि.–पातळ; जाळीदार; झिरझिरीत.

**जाळक** (ಜಾಳಕ) (सं) ना.–जाळें; भोकें असलेलें वस्त्र; समूह; कपट; (सं) वि.–उपद्व्यापी; लफडेबाज; दुर्वर्तनी.

**जाळरिग** (ಜಾಳರಿಗೆ) (क) ना.–झालर; 'जालरि' पहा.

**जाळवणे** (ಜಾಳವಣೆ) (क) ना.–फसवणूक; नजरबंदी; मोह.

**जाळिगे** (ಜಾಳಿಗೆ) (क) ना.–विणलेली पिशवी; भटार; हमीणी; पैशाची पिशवी; वस्त्रप्रावरण.

**जाळिसु** (ಜಾಳಿಸು) (क) धा.–गाळणें; हलवणें; गमावणें; घसरणें; हिणवणें; तुच्छ लेखणें.

**जाळू** (ಜಾಳು) (क) ना.–पोकळी; असत्य भाषण; दूरचा नातेवाईक; जाळें लावणारा.

—नुडि (ನುಡಿ) (क) ना.—पोकळ बोलणें; फोलभाषा; थाप

जिंहे (जिव्हे) ಜಿಂಹೆ [ಜಿಹ್ವೆ] (सं) ना.—जिव्हा; जीभ; रसना.

जिगट्टु (ಜಿಗಟ್ಟು) (क) ना.—डिंक; गोंद; खळ; चिकाटी.
(क) ना.—चिमटा घेणें; चिमटणें; बोचकरणें.

जिगणि (णे) ळि (ಜಿಗಣಿ (ಣೆ) ಳಿ) (क) ना.—'जळूक' पहा; जळू; रक्तपिपासु; दुर्नाम; बदलौकिक.

जिगळु (ಜಿಗಳು) (क) ना.—कालवा; समानता; साम्य; युक्ति; उपाययोजना; संधि.

जिगि (ಜಿಗಿ) (क) धा.—फाडणें; उडणें; उकरणें; खाणें; चकाकणें; अभिवृद्धि होणें; उडी मारणें.

जिगिल् (ಜಿಗಿಲ್) (क) धा.—चिकटणें; खेटून राहणें; अडचणीला कारण होणें; संकटांत सांपडणें; अडकून पडणें.

जिगीषा (षे) (ಜಿಗೀಷಾ [ಷೆ])(सं) ना.—विजयेच्छा; जिंकण्याची इच्छा.

जिगीषु (ಜಿಗೀಷು) (सं) वि.—जयाची इच्छा करणारा; विजयापेक्षा बाळगणारा.

जिगुळे (ಜಿಗುಳೆ) (क) ना.—'जिगणिळि' पहा; जळू.

जिघत्सु (ಜಿಘತ್ಸು) (सं) वि.—भुकेलेला; क्षुधित.

जिघत्से (ಜಿಘತ್ಸೆ) (सं) ना.—भूक; क्षुधा.

जिघांसु (ಜಿಘಾಂಸು) (सं) वि.—घातक; मारण्याची इच्छा करणारा; वैरी.

जिंके (ಜಿಂಕೆ) (क) ना.—हरिण; कुरंग; मृग.

जिंगि (ಜಿಂಗಿ) (क) ना.—मस्ती; झिंग; निशा; अमल; भान हरपणें; मासळी.

जिज्ञासु (ಜಿಜ್ಞಾಸು) (सं) वि.—जाणण्याची इच्छा करणारा; विचारक.

जिज्ञासे (ಜಿಜ್ಞಾಸೆ) (सं) ना.—समजण्याची इच्छा; विचाराची आकांक्षा; परीक्षा.

जिट्ट (ट्टि) (ಜಿಟ್ಟ [ಟ್ಟಿ]) (क) ना.—टोळ; पतंग; फुलपांखरूं; टिटवी; देवपक्षी; टोळधाड.

जिड्डि (ಜಿಡ್ಡಿ) (क) ना.—खिंड; दिंडीदरवाजा.

जिड्डु (ಜಿಡ್ಡು) (क) ना.—'गसि' पहा, चिखल; घड्डुपणा; असंस्कृतता; सुगंधी धूप; मूर्ख स्त्री; गोंद; डिंक.

जिण (णु) गु (ಜಿಣ [ಣು] ಗು) (क) धा.—गळणें; ठिबकणें; पाझरणें; झिरपणें.

जित् (ಜಿತ್) (सं) वि.—जिंकलेला; जिंकणारा.
(सं) ना.—विजयी; विजेता.

जित (ಜಿತ) (सं) वि.—जिंकला गेलेला; आधीन झालेला; निश्चित; स्थिर; प्राप्त.

—पडिसु (ಪಡಿಸು) (क) धा.—निश्चित करणें; स्मरण देणें; तोंडपाठ करणें; आठवण राहीलसें करणें.

—पडु (ಪಡು) (क) धा.—मन ठाम करणें; निर्धार करणें; विद्वान होणें.

जितकाम (ಜಿತಕಾಮು) (सं) ना.—काम जिंकणारा; शिव; यति; बुद्ध; जिन अर्हत; विरक्त.

जितकामे (ಜಿತಕಾಮೆ) (सं) ना.—काम जिंकलेली स्त्री; घरंदाज स्त्री; पतिव्रता; वरवधु.

जितकाशि (ಜಿತಕಾಶಿ) (सं) वि.—विजयानें मिरवणारा; पापावर जय मिळवलेला.

जितशत्रु (ಜಿತಶತ್ರು) (सं) ना.—शत्रूवर विजय मिळवणारा; अजितसेनाचा पुत्र.

जिताक्ष (ಜಿತಾಕ್ಷ) (सं) वि.—इंद्रिये जिंकलेला; मनोनिग्रही; संयमी.

जितांतक (ಜಿತಾಂತಕ) (सं) ना.—मृत्युंजय; कालांतक; शिव.

जितेंद्रिय (ಜಿತೇಂದ್ರಿಯ) (सं) वि.—ज्यानें इंद्रियें जिंकलीं आहेत असा; मनोनिग्रही; संयमी.

जित्य (ಜಿತ್ಯ) (सं) वि.—जिंकण्यासारखा; जयसाध्य; नांगराचा फाळ.

जित्वर (ಜಿತ್ವರ) (सं) वि.—जयशाली; विजयी.

जिद्दु (ಜಿದ್ದು) (क) ना.—पण; हट्ट; सूड; उट्टें; तिरस्कार.

जिन (ಜಿನ) (सं) ना.—वीतराग; तीर्थंकर; बुद्ध; विष्णु; चोवीसचा संकेत; अर्हंत.

जिनगृह (ಜಿನಗೃಹ) (सं) ना.— जैनवस्ती; जैनमंदिर.

जिन (नु) गु ಜಿನ [ನು] ಗು) (क) धा.— गुणगुणणें; व्यर्थ खंगणें; अल्पवृष्टि होणें; बुरबुरणें; वितळणें; झिरपणें; ओतणें.

जिनिगिसु (ಜಿನಿಗಿಸು) (क) धा.—वेग कमी करणें; मूर्छित होणें; निश्चेष्ट होणें; जळफळणें; वर्षाव करणें; वितळणें;

जिंदगी (ಜಿಂದಗಿ) (अ.दे.) ना.—जिनगानी; पुंजी; सर्वस्व; चीजवस्त; स्वत्व; जीवन.

जिंदाबाद (ಜಿಂದಾಬಾದ) (अ. दे.) वि.—चिरंजीव; चिरायु होवो! आयुष्यमान.

जिप (पु) ण ಜಿಪ (ಪು) ಣ) (क) वि.—कृपण; लोभी; चिकट; चिक्कू; कंजुष; हात राखून खर्च करणारा.

जिबरु (ಜಿಬರು) (क) ना.—डोळ्याचें चिपडें; कसर; डोळ्याचें पिच.

जिट्टु (ಜಿಟ್ಟು) (क) ना.—चिकटपणा; ध्वनि; स्वर; नाद; चाहुल; आवाज.

जिर् (ಜಿರ್) (क) धा.—भिणें; घाबरणें; हाय खाणें.
(क) ना.—चिरचीर.

जिर्ले (रले) (रिले) ಜಿರ್ಲೆ [ರಲೆ] ರಿಲೆ) (क) ना.—पोरकिडे; गोम; झुरळ.

जिराफ् (ಜಿರಾಫ್)(क) ना.—चित्रोष्ट्र; लांब मानेचे जनावर; जिराफ.

**जिल्लि** (ಜಿಲ್ಲಿ) (क) ना.–लहान मोक; तडा; चीर; भेग.

**जिल्लु** (ಜಿಲ್ಲು) (क) ना.–झुणझूण; बधिरता; चर्मसंकोच; तंटा; गोंधळ.

**जिवुळि** (ಜಿವುಳಿ) (ग) ना.–'जवळी' पहा.

**जिष्णु** (ಜಿಷ್ಣು) (सं) वि.–विजयाकांक्षी; विजयी; जयेच्छु. (सं) ना.–जिन; इंद्र; अर्जुन; विष्णु; काम; सूर्य; शिव; शेषराज.

**जिष्णुचाप** (ಜಿಷ್ಣುಚಾಪ) (सं) ना.–इंद्रधनुष्य; पाऊस; मदनबाण.

**जिहासे** (ಜಿಹಾಸೆ) (सं) ना.–त्यागाची इच्छा; वैराग्य; त्यागबुद्धि; निर्वेद; कंटाळा.

**जिह्म** (ಜಿಹ್ಮ) (सं) वि.–कुटिल; वक्र; वाकडे; मंद; मूर्ख; कपटी; अप्रामाणिक; लुच्चा; फसवा.

**जिह्मग** (ಜಿಹ್ಮಗ) (सं) ना.–वक्रगति; साप.

**जिह्वा (ह्वे)** (ಜಿಹ್ವಾ) [ಹ್ವೆ] (सं) ना.–जीभ; रसना.

**जिह्वाडंबर** (ಜಿಹ್ವಾಡಂಬರ) (सं) ना.–तोंडपाटीलकी; वाचाळता; बढाई; बंडल (लक्षणा).

**जीकळि** (ಜೀಕಳಿ) (क) ना.–झाडांना पाणी घालण्याची झारी.

**जीत** (ಜೀತ) (क) ना.–जीवित; राबणूक; कुली पगार; रोजमजुरी.

—**गार** (ಗಾರ) (क) वि.–रोजमजूर; मजुरीनें काम करणारा; श्रमजीवि; निढळाचा घाम गाळून जगणारा.

**जीन** (ಜೀನ) (क) वि. जीर्ण; जुनें; निष्प्रयोजक; कृपण; लोभी; क्षुद्र; दीन; गरीब.

**जीन (नु)** (ಜೀನ [ನು]) (अ-दे) ना.–घोड्याच्या पाठीवरील आसन; खोगीर.

**जीनगार** (ಜೀನಗಾರ) (क) ना.–बाहुल्या, खेळणीं, तयार करणारा; जिनगर.

**जीनशाले** (ಜೀನಶಾಲೆ) (सं) ना.–शस्त्रागार, युद्धसामग्री ठेवण्याचे ठिकाण.

**जीमूत** (ಜೀಮೂತ) (सं) ना.–ढग; मेघ; पर्वत; हत्ती; काळा डाग; देवनळ; एक राठ गवत; राक्षसाचें नांव.

—**लते** (ಲತೆ) (सं) ना.–विद्युत; वीज.

—**वाहन** (ವಾಹನ) (सं) ना.–इंद्र; 'नागानंद' नाटकाचा कथानायक.

**जीय** (ಜೀಯ) (क) अ.–अय्या! स्वामी! वगैरेसारखे सन्मानबोधक अव्यय.

**जीयेने** (ಜೀಯೆನೆ) (क) अ.–जी जी करून; हांजी हांजी करून; दीनवाणें; गयावया करून.

**जीर् (रु)** (ಜೀರ್ [ರು]) (क) धा.–किंचाळणें; ओरडणें; चिर्र असा आवाज करणें.

**जीर** (ಜೀರ) (क) ना.–अतिवेग; खड्ग; तलवार.

**जीरके (गे)** (ಜೀರಕೆ [ಗೆ]) (सं) ना.–जिरें; मसाल्याचा जिन्नस.

**जीरु** (ಜೀರು) (क) धा.–'जीर्' पहा.

**जीरुंडे** (ಜೀರುಂಡೆ)<br>**जीरुदुंबि** (ಜೀರುದುಂಬಿ) } (क) ना.–किर्र ध्वनि करणारे किडे; झिल्ली; टोळ; पतंग.

**जीरॆळ्** (ಜೀರೆಳ್) (क) धा.–ओरडणें; किंचाळणें; शीळ घालणें.

**जीकॊळवि** (ಜೀಕೊಳವಿ) (क) वि.–पिचकारी; पाणी घालण्याची झारी.

**जीर्ण** (ಜೀರ್ಣ) (सं) वि.–वितळलेलें; जुनें; विरघळलेलें; झिजलेलें; शक्तिहीन; शिथिल; वाहून गेलेलें; कोमेजलेलें. अतिप्राचीन; नष्ट.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.–पचविणें; पचन करणें; झिजवणें; जुनें होणें; वितळविणें.

—**कारि** (ಕಾರಿ) (क) वि.–पचनक्रियेला साह्य करणारा.

—**कोश** (ಕೋಶ) (सं) ना.–जठर; पचनक्रियास्थान.

—**विजीर्ण** (ವಿಜೀರ್ಣ) (सं) वि.–अतिजीर्ण; चिंध्याचिंध्या झालेले; अतिशिथिल.

**जीर्ति** (ಜೀರ್ತಿ) (सं) ना.–पचन; वितळण्याची क्रिया.

**जीव** (ಜೀವ) (सं) ना.–जीवन; हयात; आयुष्य; अस्तित्व; प्राणी; शारदा; घोडा; जीवात्मा; व्यक्ति; उद्योग; भाषा; जीवनाधार; बृहस्पति; बाणाचें फूल; मौर्वी; सत्त्व; रहस्य; प्रधान.

—**ई, ईयु** (ಈ, ಈಯು) (क) धा.–जीव घालणें; प्रोत्साहन देणें; शिफारस करणें.

—**अॆत्तु** (ಎತ್ತು) (क) धा.–जन्माला येणें.

—**क** (ಕ) (सं) ना.–दास; जिन; साधु; गारुडी; वनस्पतिविशेष.

—**कळे** (ಕಳೆ) (सं) ना.–सुखी जीवन.

—**कळ्ळ** (ಕಳ್ಳ) (क) ना.–अंगचोर; चुकारतट्टु.

—**कोडु** (ಕೊಡು) (क) धा.–प्राणार्पण करणें; प्रोत्साहन देणें.

**जीवगॆळॆय** (ಜೀವಗೆಳೆಯ) (क) ना.–जिगरदोस्त; जीवश्च कंठश्च; प्रिय मित्र.

**जीवत्** (ಜೀವತ್) (सं) वि.–जिवंत; जीव असलेला; जिता.

**जीवतोके** (ಜೀವತೋಕೆ) (सं) ना.–मुलेंबाळें जिवंत असलेली स्त्री; लेकुरवाळी.

**जीवत्पति** (ಜೀವತ್ಪತಿ) (सं) ना.–सौभाग्यवति; सुमंगला; सधवा; 'अैदे' पहा.

**जीवचय** (ಜೀವಚಯ) (सं) ना.–प्राणिजात; प्राणीसृष्टि.

**जीवदान** (ಜೀವದಾನ) (सं) ना. – प्राणरक्षण; प्राणार्पण; प्राण वाचवणें.
**जीवधन** (ಜೀವಧನ) (सं) वि. – प्राणाला धन मानणारा; जीवसंपदा.
**जीवधारण** (ಜೀವಧಾರಣ) (सं) ना. – जीवन; निर्वाह; प्राणधारणा; अस्तित्व.
**जीवन** (ಜೀವನ) (सं) ना. – पाणी; उद्योग; निर्वाह; वृत्ति; अस्तित्व.
—**वाह** (ವಾಹ) (सं) ना. – मेघ; ढग.
**जीवनांश** (ಜೀವನಾಂಶ) (सं) ना. – पोटासाठीं मिळणारें धन. पोटगी; उपजीविकेचें साधन; जीवननिर्वाह.
**जीवनिधि** (ಜೀವನಿಧಿ) (सं) ना. – महासागर; पाण्याचा सांठा.
**जीवनीय** (ಜೀವನೀಯ) (सं) वि. – जीवनाधार; धारोष्ण दूध.
**जीवनोपाय** (ಜೀವನೋಪಾಯ) (सं) ना. – जीवनोद्योग; निर्वाहसाधन; वृत्ति.
**जीवंत** (ಜೀವಂತ) (अ-दे) ना. – 'जीवत्' पहा.
**जीवन्मुक्त** (ಜೀವನ್ಮುಕ್ತ) (सं) वि. – जननमरणांतून मुक्त; सिद्धपुरुष; मोक्षगामी.
**जीवन्मुक्ति** (ಜೀವನ್ಮುಕ್ತಿ) (सं) ना. – जन्मफेऱ्यापासून सुटका; सिद्धावस्था; सजीव मोक्षप्राप्ति.
**जीवमान** (ಜೀವಮಾನ) (सं) ना. – हयात; जीवन; आयुर्मर्यादा; आयुष्य; जीवित काळ.
**जीवरत्न** (ಜೀವರತ್ನ) (सं) ना. – जीवरूपी रत्न; प्राणीश्रेष्ठ.
**जीवल** (ಜೀವಲ) (सं) ना. – ऋतुपर्णाचा सारथी.
**जीवश (च्छ) व** (ಜೀವಶ [ಚ್ಛ] ವ) (सं) वि. – जिवंत असूनहि मृताप्रमाणें असणारा; अस्थिपंजर; जीवन्मृत.
**जीवातु** (ಜೀವಾತು) (सं) ना. – प्राणरक्षण; जीवसत्त्व; संजीवनी.
**जीवात्म (त्मा)** (ಜೀವಾತ್ಮ [ತ್ಮಾ]) (सं) ना. – परमात्म्याचा अंश; जीवात्मा.
**जीवाळ** (ಜೀವಾಳ) (क) ना. – जीवनकळा; सत्त्व; रहस्य; सार; जिव्हाळें; वाद्यांतील ध्वनिसाधन. 'जीवल' पहा.
**जीवि** (ಜೀವಿ) (सं) ना. – जीव असलेला; प्राणी.
—**के** (ಕೆ) (सं) ना. – वृत्ति; जीवनोपाय; अस्तित्व; कुली; मजूरी; निर्वाहव्यय.
—**इसु** (ಇಸು) (क) धा. – जिवंत राहणें; प्राणधारण करणें.
**जीवितेश (श्वर)** (ಜೀವಿತೇಶ [ಶ್ವರ]) (सं) ना. – पति; वल्लभ; राजा; महाराज; जीवनाचा मालक.
**जीवे (वा)** (ಜೀವೆ [ವಾ]) (सं) ना. – हृदय; छाती; मौर्वी; प्रत्यंचा; बाण जोडण्याची रज्जु.
**जुकुति** (ಜುಕುತಿ) (अ. दे) ना. – युक्ति; योजना; उपाय; मार्ग
**जुग** (ಜುಗ) (अ. दे) ना. – युग; जोडीदार; सहचर; सहकारी.
**जुगम** (ಜುಗಮು) (क) ना. – युग्म; जोडी; जोड; दोन.
**जुगुप्सा (से)** (ಜುಗುಪ್ಸಾ) (ಸೆ) (सं) ना. – तिरस्कार; कंटाळा; असह्यता; निंदा; तुच्छता; हीनता.
**जुगुम** (ಜುಗುಮು) (क) ना. – युग्म; 'जुगम' पहा.
**जुगुल्** (ಜುಗುಲ್) (क) धा. – निबणें; निघून जाणें.
**जुंजु** (ಜುಂಜು) (क) ना. – पिसारा; झिमझिम; गुंजांचें कणीस; कोंबड्याच्या डोक्यावरील फूल; लालफणी.
**जुंजुरु** (ಜುಂಜುರು) (क) ना. – कुरळे केस; पावसाची भुरभूर.
**जुंजुळली** (ಜುಂಜುಳ್ಳಿ) क वि. – तांबडे, लाल; रक्तवर्णी.
**जुंजूटि** (ಜುಂಜೂಟಿ) (क) ना. – संगीतातील एक राग; झिंजोटी
**जुंजूरि** (ಜುಂಜೂರಿ) (क) ना. – गुडगुडी; हुक्का; चिलीम.
**जुट्टु** (ಜುಟ್ಟು) (क) ना. – शिखा; शेंडी; मोरतुरा; कोंबडफणी.
—**हिडि** (ಹಿಡಿ) (क) धा. – शेंडी धरणें; कात्रींत पकडणें; खोड्यांत पाडणें; खिंडीत गाठणें.
**जुणुगु** (ಜಿಣುಗು) (क) धा. – मागें खेचणें; मुरडणें; कुरकरणें.
**जुद्ध (द्द)** (ಜುದ್ಧ [ದ್ದ]) (क) ना. – युद्ध; रणकंदन; समर.
**जुम्मु** (ಜುಮ್ಮು) (क) ना. – हर्षामर्षाचा उद्रेक; रोमांच; हातापायाला मुंग्या येणें; झुमझुम.
**जुम्मेने** (ಜುಮ್ಮೆನೆ) (क) अ. – अंगावर काटा आल्यानें; शरीर जुमजुमून.
**जुरि** (ಜುರಿ) (क) धा. – ओतणें; पाझरणें; गळणें.
(क) ना. – झुरका; दम; उठाव; ओढ.
**जुरिके** (ಜುರಿಕೆ) (क) ना. – ओढ; झपाटा; धूम्रपान; दम; झुरका
**जुलुमे** (ಜುಲುಮೆ) (अ. दे) ना. – जुलूम; जबरदस्ती; आग्रह; निर्बंध; अवश्य कर्तव्य; 'कड्डाय'. पहा.
**जुष्ट** (ಜುಷ್ಟ) (सं) वि. – पिकलेले; सेवा केलेलें; उष्टें; सेवित.
**जुहू** (ಜುಹೂ) (सं) ना. – तांबड्या लाकडाचें यज्ञपात्र. अर्धवर्तुळ; मुंबईजवळील सुंदर सागरकाठचा भाग.
**जुहूराण** (ಜುಹೂರಾಣ) (सं) ना. – अग्नि; यज्ञपुरोहित; ऋत्विज चंद्र.
**जुगळिसु** (ಜೂಗಳಿಸು) (क) धा. – पेंगणें; झुकांडी देणें. हेलकावणें; टांगणें; रुजणें; खालीं मान घालून पुढें सरकणें.
**जुगु** (ಜೂಗು) (क) धा. – लोंबणें, लोंबकळणें; हलणें; रागावणें;
**जूजु** (ಜೂಜು) (क) ना. – द्यूत; सोंगट्याचा डाव; पद्य; जिद्द; प्रतिज्ञा; हट्ट.
**जूट** (ಜೂಟ) (सं) ना. – जटा; बांधलेली शेंडी; शिवाची जटा; बालकाचे बळ; चिकटपणा; त्राण.
(अ. दे) ना. – सनक; वाक; वाकाचे झाड; अंबाडी.
**जूडि** (ಜೂಡಿ) (अ.दे) ना. – सारामाफ इनाम जमीन; वतनी जमीन.

जूति (ಜೂತಿ) (क) ना.–तीव्रता: चुणचुणीतपणा; चापल्य; चेतना; पादत्राण; जोडा; दूति; दूदि; दासी.

जूदाळि (ಜೂದಾಳಿ) (क) वि.–द्यूत खेळणारा; पण लावून खेळणारा; जुगारी.

जूदु (ಜೂದು) (क) ना.–द्यूत; जुगार; चुरशीचा खेळ; पैज; 'जूजु' पहा.

जूपर (रु) } (ಜೂಪರ [ರು]) (क) ना.–पावसाची झिमझिम;
जूबरु } (ಜಬರು) कोईवरील केसर.

जूल (जूलु) (ಜೂಲ [ಜೂಲು]) (क) ना.–झूल; आयाळ; कपड्याचा चोळामोळा.

जूळि (ಜೂಳಿ) (क) ना.–झारी; तोटी असलेले पात्र.

जूळेय (ಜೂಳೆಯು) (क) ना.–कपाळाला लावलेलें गंध.

जृंभे (भण) (ಜೃಂಭೆ [ಭಣ]) (सं) ना.–जांभई; जृंभा; विकास; तोंडाची उघड; जबडाउघड; विस्तार; वाढ.

जृंभित (ಜೃಂಭಿತ) (सं) वि.–विकसित; हसित; उघडलेले; पसरलेले.

जृंभे (भा) (ಜೃಂಭೆ) (ಭಾ) (सं) ना.–'जृंभे' पहा.

जेंकिसु (ಜೆಂಕಿಸು) (क) ना.–गर्जणें; निंदणें; ओरडणें; किंचाळणें 'जंकिसु' पहा.

जेंगि (ಜೆಂಗಿ) (क) ना.–युद्धसंबंधीचे, भांडखोरपणा; वेढा; घेरा.

जेट्टि (ट्टिग) (ಜಟ್ಟಿ) (ಟ್ಟಿಗ) (क) ना.–कुस्तिगीर; बलशाली; वडीलधारा; श्रेष्ठ पुरुष.

जेर्कु (ಜೆರ್ಕು) (क) धा.–बोचकारणें; ओरबाडणें; खाजविणें; चिमटा घेणें.

जेंगेय् (ಜೇಗೆಯ್) (क) धा.–धनुष्याचा टंकार करणें; टणत्कारणें.

जेंकरिसु (ಜೇಂಕರಿಸು) (क) धा.–झंकारणें; गुंजारव करणें; स्तुती करणें; शिफारस करणें; टंकार करणें.

जेंगरे (ಜೇಂಗರೆ) (क) धा.–साखर पेरणें; गोड बोलणें; गोड खाणें; मधाचा वर्षाव करणें; मिष्टान्न जेवणें.

जेड (ಜೇಡ) (क) ना.–कोळ्याचें जाळें; विणकर, कोष्टी.

—बले (ಬಲೆ) (क) ना.– कोळ्याचें जाळें.

जेडि (ಜೇಡಿ) (क) ना.–गोपीचंदन; विभूति; शाडूमाती; धूर; काजळ; शाई; 'इह्रण' पहा.

जेतव्य (ಜೇತವ್ಯ) (सं) वि. जिंकण्यायोग्य; जिंकता येण्यासारखें.

जेतार (ಜೇತಾರ) (सं) वि.–जेता; विजेता.

जेन् (नु) (ಜೇನ್) (ನು) (क) ना.–मध; मकरंद; गोडपदार्थ; मधुरभाषण.

जेनेय् (ಜೇನೆಯ್) (क) ना.–मध; मकरंद.

जेमन (ಜೇಮನ)(सं) ना.–जेवण; भोजन; खाणेंपिणें; आहार; खानपान.

जेय (ಜೇಯು) (सं) वि.–जिंकले जाणारे; जिंकण्यायोग्य; विजय मिळविण्याजोगें.

जेरु (ಜೇರು) (क) वि.–अशक्त; थकलेला; दुर्बल; 'गोडे' पहा. (क) ना.–किल्ला; तट; कूड.

जेरुकिंडी (ಜೇರುಕಿಂಡಿ) (क) ना.–झरोका; वातायन; गवाक्ष; जाळी.

जेवडे (ಜೇವಡೆ) (क) धा.–धनुष्याचा टणत्कार करणें; प्रत्यंचा छेडणें; 'जेंगेय्' पहा.

जेवण (ಜೇವಣ) (अ. दे) ना.–'जेमन' पहा.

जेवणिगे (ಜೇವಣಿಗೆ) (क) ना.–माधुर्य; चव; सरसपणा.

जेवोडे (ಜೇವೊಡೆ) (क) धा.–'जेवडे' पहा.

जेष्टे (ष्टि) (ಜೇಷ್ಟೆ) (ಷ್ಟಿ) (क) ना.–वडीलधारी स्त्री.

जेष्ठ (ष्ठि) (ಜೇಷ್ಠ) (ಷ್ಠಿ) (सं) ना.–ज्येष्ठमास; प्रमुख; ज्ञानी.

जैत्र (ಜೈತ್ರ) (सं) ना.–जिंकलेलें; जयशाली; विजय.

—यात्रे (ಯಾತ್ರೆ) (क) ना.–विजयानें पुढची चाल; विजयचाल.

—रथ (ರಥ) (क) ना.–विजयरथ.

जैन (ಜೈನ) (सं) ना.–जैनपंथी; जैनसाधु; संसारविजेता.

—आगम (ಆಗಮ) (सं) ना.–जैन तत्त्वशास्त्र; तत्वज्ञान.

जैमिनीय (ಜೈಮಿನಿಯು) (सं) वि.–जैमिनीचे अनुयायी; पूर्वमीमांसक.

जैमिनिभारत (ಜೈಮಿನಿಭಾರತ) (क) ना.–लक्ष्मीश कवीनें लिहिलेलें भारतपुराण.

जैवातृक (ಜೈವಾತೃಕ) (सं) ना.–चंद्र; दीर्घायु; चिरंजीव; सूट.

जोंके (ಜೊಂಕೆ) (क) ना.–किरीट; वेणी; बुचडा; अंत्य.

जोंगुळि (ಜೊಂಗುಳಿ) (क) ना.–मूर्छा; विस्मृति; देहभान; विसर; बेभानता.

जोंडु (ಜೊಂಡು) (क) ना.–शेवाळ; जंजाळ; गंजाळ; घोडघास; पाचूचें झाड.

जोते (ಜೊತೆ) (क) ना.–जोडी; कूट; मैत्री.

—कूडु (ಕೂಡು) (क) धा.–मैत्री करणें.

—कोळिसु (ಕೊಳಿಸು) (क) धा.–सिद्ध ठेवणें; सज्ज करणें; तयार राहणें.

जोत्तु (त्तिगे) (ಜೊತ್ತು [ತ್ತಿಗೆ])(क) ना.–जोडलेली बैलजोडी; ओळ; समूह; जोडी.

जोन्न (ಜೊನ್ನ) (क) ना.–ज्योत्स्ना; चांदणे; चंद्रिका; चंद्रप्रकाश; कौमुदी.

जोन्नवक्कि (ಜೊನ್ನವಕ್ಕಿ) (क) ना.–चांदण्यावर जगणारा पक्षी; चकोर.

जोन्ने (ಜೊನ್ನೆ) (क) ना.–द्रोण.

जोन्नोडल (ಜೊನ್ನೊಡಲ) (क) ना.–चंद्र.

जोंप (ಜೊಂಪ) (क) वि.—पेंगणारा; झोपणारा.
(क) ना.—घोस; घड; कुंचला; रास; समूह; छप्पर; मंडप.
जोंपिसु (ಜೊಂಪಿಸು) (क) धा.—घालवणें; थरथरणें; निघणें; उन्मत्त होणें; निशा चढणें; बेभान होणे; दिङ्मूढ होणें; घाबरणें.
जोंपु (ಜೋಂಪು) (क) ना.—बेभानता; निःचेष्टता; थरकाप; कंपन; झोप.
जोंपे (ಜೊಂಪೆ) (क) ना.—'जोंप' पहा.
जोंबिसु (ಜೊಂಬಿಸು) (क) धा.—वाकणें; झोक जाणें; तोल जाणें.
जोम्मु (ಜೊಮ್ಮು) (क) ना.—'जोंपु' पहा. आलस्य; निद्रा.
जोल्लु (ಜೊಲ್ಲು) (क) ना.—लालरस; लाळ.
जोल्लिय (ಜೊಲ್ಲಿಯ) (क) ना.—केसाची गाठ घातल्यावर राहणारा केसांचा शेपटा; 'चोल्लिय' पहा.
जोळ्ळु (ಜೊಳ್ಳು) (क) वि.—पोकळ; निःसार; सत्त्वहीन; निष्प्रयोजक; निरुपयोगी.
जो (ಜೋ) (क) ना.—जो जो कार; अंगाई; बाळ झोपण्यासाठी केलेला जो जो.
जोकालि (ಜೋಕಾಲಿ) (क) ना.—झोकाळा; झोपाळा; फोपशा देहाचा.
जोकु (ಜೋಕು) (क) ना.—झोक; तोल; बोलण्याची ढब; बोलण्याचें तंत्र; शब्दछल; वेशभूषण; शिंके; शिंकाळें.
जोके (ಜೋಕೆ) (क) ना.—जागृति; हुषारी; चमत्कार; प्रौढता; क्रम; लक्ष; सौंदर्य; मनोहारिता; ऐक्य; अवडंबर.
जोग (ಜೋಗ) (क) ना.—योग; तप; ऐक्य; समावेश; उपाय; ध्यान; आत्मसंयमन; चित्तस्थैर्य; प्रार्थना.
जोगरिसु (ಜೋಗರಿಸು) (क) धा.—उपचार करणें; भान हरपणें; विस्मरणें; जो जो करणें; झोके देणें.
जोगि (ಜೋಗಿ) (क) ना.—आत्मसंयमी; परमात्म चिंतन करणारा; बैरागी; योगी; तपस्वी.
जोगिनी (ಜೋಗಿನಿ) (क) ना.—योगिनी; तपस्विनि.
जोगु (ಜೋಗು) (क) ना.—जलपात; धबधबा; प्रपात; शरावती नदीचा धबधबा; 'अरबि' पहा.
जोगुळ (ಜೋಗುಳ) (क) ना.—अंगाईगीत; पाळणागीत; दोलागीत.
जोड (ಜೋಡ) (क) ना.—जार; व्यभिचारी; नीच; उद्धट; पण्यांगना; जारिणी.
जोडि (ಜೋಡಿ) (क) ना.—पादुका; प्राणी; संभोग; सहचर; 'जोते' पहा.
जोडिके (डणे) (ಜೋಡಿಕೆ [ಡಣೆ]) (क) ना.—एकत्रीकरण; मिश्रण; मिळवणी.
जोडिदार (ಜೊಡಿದಾರ) (क) ना.—जुडीदार; दोन खेड्यांचा वतनदार.
जोडु (ಜೋಡು) (क) ना.—पादरक्षा; पायतण; 'जोडि' पहा; साम्य; सारखेपणा.
जोडे (ಜೋಡೆ) (क) ना.—व्यभिचारिणी; पण्यांगना; जारिणी.
जोति (ಜೋತಿ) (क) ना.—दीप; प्रकाश; उजेड; ज्योति.
जोतिष (यिस) (ಜೋತಿಷ [ಯಿಸ]) (क) ना.—ज्योतिषी; ग्रहाचें गतिशास्त्र व शुभाशुभ फल जाणणारा.
जोतिष्क (ಜೋತಿಷ್ಕ) (क) ना.—'जोतिष' पहा.
जोद (ಜೋದ) (क) ना.—माहुत.
—काळेग (ಕಾಳೆಗ) (क) ना.—साठमारी; हत्तीझुंज; योद्धा; वीर; सैनिक; कलि.
जोदक (ಜೋದಕ) (क) ना.—योद्धा; सैनिक; लढवय्या.
जोनि (ಜೋನಿ) (क) ना.—जलमयता; पाणीपाणी. वितळवणी. राब; काकवी.
जोनेग (ಜೋನೆಗ) (क) ना.—यवन; तुर्क.
जो (जों) पडि (ಜೋ [ಜೋಂ] ಪಡಿ) (क) ना.—लहान छप्पर; कुटी; झोपडी.
जोपान (ಜೋಪಾನ) (क) ना.—संरक्षण; जोपासना; ध्यान; सेवा; सुश्रूषा.
जोब (ಜೋಬ) (क) ना.—आळशी; उंडगा; टोळभैरव; अंगचोर.
जोब (भ) द्र (ಜೋಬ [ಭ] ದ್ರ) (क) ना.—'चोंगु' पहा.
जोमाले (ಜೋಮಾಲೆ) (क) ना.—लोंबती माळ; माळेप्रमाणें लोंबणारी वस्तु.
जोयिस (ಜೋಯಿಸ) (क) ना.—'जोतिष' पहा.
जोरु (ಜೋರು) (क) धा.—वाहणें; झिरपणें; उतरणें; गळणें.
(क) ना.—वेग; तीव्रता; भार; अतिशयता; तृप्ति; संरक्षण; ओझें वाहणारा.
(अ. दे.) ना.—पत्नि.
—इसु (ಇಸು) (क) धा.—गळणें; झिरपणें.
जोल् (ಜೋಲ್) (क) धा.—टांगणें; बलिष्ठ होणें; लोंबकळणें; वाकणें; शिथिल होणें.
—आडु (ಆಡು) (क) धा.—लोंबणे.
—मुडि (ಮುಡಿ) (क) ना.—सोडलेली वेणी. मुक्तवेणी; मोकळे लोंबते केस.
जोलि (ಜೋಲಿ) (क) ना.—झोळी; लहान पोतें; पिशवी; संयोग; संभोग; उद्योग; झोका; वळण; आधार; घसरगुंडी.
जोल्गूद्लु (ಜೋಲ್ಗೂದಲು)(क) ना.—मानेपर्यंत कापलेले केस.
जोवळेय (ಜೋವಳೆಯ) (क) ना.—वीर; समर्थ; पेहेलवान.
(क) ना.—रणकंदन करणारा; कली.
जोष (ಜೋಷ) (सं) अ.—गुपचुप; सुखानें; आनंदभरानें मौनपूर्वक; मुकस्थाने.
(सं) ना.—सुख; संतोष; समाधान.

**जोसे** (ಜೋಸೆ) (क) ना.–योषा; योषिता; युवती; स्त्री.

**जोह** (ಜೋಹ) (क) ना.–योग; वेषांतर; वेष; सोंग; ढोंग.

**जोहर** (ಜೋಹರ) (क) ना.–उत्सव; संभ्रम; समारंभ; खेळ; विनोद; विलास; जोहुकूम; जी; जोहारमायबाप.

**जोहार** (ಜೋಹಾರ) (अ. दे.) ना.–रजपूत स्त्रियांची चिता-प्रवेश रूढी.

**जोळ** (ಜೋಳ) (क) ना.–ज्वारी; जोंधळा; आहारधान्यविशेष; 'जोड्डु' पहा; 'जोते' पहा.

**जोळवाळि** (ಜೋಳವಾಳಿ) (क) ना.–अन्नाची जाग; दाक्षिण्य; ऋण; उपकार; आश्रय; आधार; स्वामिभक्ति; स्नेह; भागी-दारी; जोंधळ्याचें पीक.

**जोळि** (ಜೋಳಿ) (क) ना.–साम्य; सारखेपणा; जोडी; सहचर.

**जोलिगे** (ಜೋಳಿಗೆ) (क) ना.–झोळी; पोतें; बगल थैली; चौपदरी.

**ज्ञ** (ಜ್ಞ) (सं) वि.–ज्ञानी; जाणता; तज्ञ; समजूतदार. (सं) ना.–बुद्धिमान्; बुधग्रह; मंगळ; ब्रह्मदेव.

—**ते** (ತೆ) (सं) ना.–समजूत; ज्ञान; जाणीव.

**ज्ञप्ति** (ಜ್ಞಪ್ತಿ) (सं) ना.–आठवण; स्मरण; ज्ञान; समजूत; बुद्धि; शिक्षण.

**ज्ञपित** (ಜ್ಞಪಿತ) (सं) वि.–समजलेले; परिशीलन केलेले; परीक्षित; तपासलेले; समजून सांगितलेलें.

**ज्ञा** (ಜ್ಞಾ) (सं) धा.–समजणें; शिकणें; परीक्षणें; परिचय होणें; अनुभवणें; सत्य जाणणें; सांगणें; शोधणें; जागृत करणें; विचारून घेणें; मागणें.

**ज्ञात** (ಜ್ಞಾತ) (सं) वि.–'ज्ञापित' पहा.

**ज्ञाति** (ಜ್ಞಾತಿ) (सं) वि.–पितृवंशातील व्यक्ति; संबंधिक; नात्याचा; सगोत्री.

**ज्ञातृ** (ಜ್ಞಾತೃ) (सं) ना.–ज्ञानी; जाणता; समजूत; जाणीव.

**ज्ञातेय** (ಜ್ಞಾತೇಯ) (सं) ना.–बांधव्य; संबंध; नातें; सोयरीक; आप्तपणा.

**ज्ञान** (ಜ್ಞಾನ) (सं) ना.–माहिती; अनुभव; ब्रह्मज्ञान; सत्यज्ञान.

—**चक्षु** (ಚಕ್ಷು) (सं) वि.–अंतर्ज्ञानी.

—**धन** (ಧನ) (सं) वि.–विद्वान्; ब्रह्मज्ञानी.

—**मार्ग** (ಮಾರ್ಗ) (सं) ना.–पारमार्थिक विचार.

—**वृद्ध** (ವೃದ್ಧ) (सं) वि.–ज्ञानी; अनुभविक.

**ज्ञानि** (ಜ್ಞಾನಿ) (सं) ना.–पंडित; विद्वान; ब्रह्मज्ञानी.

**ज्ञापक** (ಜ್ಞಾಪಕ) (सं) वि.–स्मरण देणारा; आठवण देणारा. (सं) ना.–स्मरण; आठवण.

**ज्ञापिसु** (ಜ್ಞಾಪಿಸು) (क) धा.–स्मरणें; आठवणें; अक्कल शिकणें; समजणें.

**ज्ञेय** (ಜ್ಞೇಯ) (सं) वि.–इंद्रियगोचर; समजण्यायोग्य; सोपे.

**ज्या** (ಜ್ಯಾ) सं. ना.–मौर्वी; प्रत्यंचा; नारी; भूमि; पृथ्वि; माता.

—**रव** (ರವ) (सं) ना.–टणत्कार; धनुष्टंकार.

—**घात** (ಘಾತ) (सं) ना.–मोर्वीचा आघात.

**ज्यानि** (ಜ್ಯಾನಿ) (सं) वि.–कोमेजलेले; म्हातारें; जुनें.

**ज्यामुडि** (ಜ್ಯಾಮುಡಿ) (क) ना.–वाळ्याचा पंखा.

**ज्यायस्** (ಜ್ಯಾಯಸ್) (सं) वि.–वडीलधारा; लाडका; आवडता; उत्कृष्ट; वडील पुत्र.

**ज्यायांस** (ಜ್ಯಾಯಾಂಸ) (सं) वि.–'ज्यायस्' पहा.

**ज्येष्ठ** (ಜ್ಯೇಷ್ಠ) (सं) वि.–'ज्यायस' पहा, ज्येष्ठ महिना.

**ज्येष्ठे** (ಜ್ಯೇಷ್ಠೆ) (सं) ना.–वडील मुलगी; अक्का; ज्येष्ठ लक्ष्मी.

**ज्योति (स्)** ಜ್ಯೋತಿ [ಸ್]) (सं) ना.–दीप्ति; ज्योत; प्रकाश; उजेड; दिवा; अग्नि; किरण; तारा; डोळा; नक्षत्र; सहृदयता.

—**चक्र** (ಚಕ್ರ) (सं) ना.–बारा राशींचें मंडळ.

—**मंडल** (ಮಂಡಲ) (सं) ना.–ग्रहमंडळ.

—**लोक** (ಲೋಕ) (सं) ना.–तेजोवलय.

**ज्योतिर्मय** (ಜ್ಯೋತಿರ್ಮಯ) (सं) वि.–प्रकाशमय.

**ज्योतिर्लते** (ಜ್ಯೋತಿರ್ಲತೆ) (सं) ना.–वीज; एक प्रकारची वेल.

**ज्योतिष (षि) ष्क** (ಜ್ಯೋತಿ [ಷಿ] ಷ್ಕ) (सं) ना.–'ज्योतिस' (ಜ್ಯೋತಿಷ್ಯ) ज्योतिषशास्त्रज्ञ.

**ज्योतिष्टोम** (ಜ್ಯೋತಿಷ್ಟೋಮ) (सं) ना.–एक विशिष्ट यज्ञ; याग.

**ज्योतिष्मति** (ಜ್ಯೋತಿಷ್ಮತಿ) (सं) ना.–चांदरात; चांदणीरात.

**ज्योतिष्मंत** (ಜ್ಯೋತಿಷ್ಮಂತ) (सं) ना.–कुशद्वीपातील प्रियव्रत राजाचा मुलगा.

**ज्योत्स्ना** (ಜ್ಯೋತ್ಸ್ನಾ) (सं) ना.–चांदणें; चंद्रप्रकाश.

—**प्रिय** (ಪ್ರಿಯ) (सं) ना.–चकोर; चंद्रप्रकाश.

—**वृक्ष** ವೃಕ್ಷ) (सं) ना.–मेणबत्ति.

**ज्वर** (ಜ್ವರ) (सं) ना.–ताप; जाळ.

**ज्वल (लत्)** (ಜ್ವಲ [ಲತ್]) (सं) वि.–जळणारे; प्रकाशणारे; (सं) ना. जाळ; अग्नि.

**ज्वलन** (ಜ್ವಲನ) (सं) ना.–अग्नि; अग्निशिखा; प्रकाश.

—**नेत्र** (ನೇತ್ರ) (सं) ना.–शिव.

**ज्वलनाक्ष** (ಜ್ವಲನಾಕ್ಷ) (सं) ना.–शिव; 'ज्वलन नेत्र' पहा.

**ज्वलनि** (ಜ್ವಲನಿ) (सं) ना.–'ज्योतिष्मति' पहा.

**ज्वलित** (ಜ್ವಲಿತ) (सं) वि.–पेटविलेलें; जळणारें; पेटणारें.

**ज्वलितारिके** (ಜ್ವಲಿತಾರಿಕೆ) (सं) ना.–भित्तिचित्र; भिंतीवर डकविलेले किंवा काढलेले चित्र.

**ज्वलिसु** (ಜ್ವಲಿಸು) (क) धा.–जळणें; प्रकाशणें; चकाकणें.

**ज्वाला (ले)** (ಜ್ವಾಲಾ [ಲೆ])(सं) ना.–जाळ; अग्नि; स्त्रीचें नांव; नीलध्वजाची पत्नी.

—**मुख** (ಮುಖ) (सं) ना.–शिव.

**ज्वालामुखि** (ಜ್ವಾಲಾಮುಖಿ) (सं) ना.–अग्निपर्वत; आग ओकणारा पर्वत; पेटतापर्वत; भूगर्भातील उष्णता बाहेर पडण्याचें स्थान.

**ज्वालि** (ಜ್ವಾಲಿ) (सं) ना.–अग्नि; शिव.

**ज्वालिकाविलोचन** (ಜ್ವಾಲಿಕಾವಿಲೋಚನ) (सं) ना.–अग्निनेत्र; सूर्य; शिव.

## झ

**झ** (ಝ) (सं) नां.–च वर्गातील चौथें व्यंजन.

**झगझगायमान** (ಝಗಝಗಾಯಮಾನ) (सं) वि.–झगझगणारा; चकाकणारा; दीप्तिमान.

**झगा** (ಝಗಾ) (अ.दे) ना.–पायघोळ अंगरखा; प्रकाश; ऊब; झळ.

**झंकार** (ಝಂಕಾರ) (सं) ना.–मधमाशाचा गुंजारव; धनुष्याचा टणत्कार.

**झंकिसु** (ಝಂಕಿಸು) (क) धा.–गर्जणें; भिवविणें; घाबरविणें.

**झंके** (ಝಂಕೆ) (सं) ना.–तिरस्कार; निंदा; टोचणी.

**झंझानिल (वात)** (ಝಂಝಾನಿಲ [ವಾತ]) (सं) ना. झंझावात; वावटळ; वादळ.

**झटिति** (ಝಟಿತಿ) (सं) अ.–लौकर; ताबडतोब; लागलीच.

**झणत्** (ಝಣತ್) (क) ना.–झणझणणारा घुंगुराचा आवाज.

—**कार** (ಕಾರ) (सं)ना.–झंकार; झणझण करणारा.

—**नूपुर** (ನೂಪುರ) (सं) ना.–घुंगुर; पैंजण.

**झणर (रु)** (ಝಣರ [ರು]) (सं) ना.–झणझणा; झणाणा.

**झणु** (ಝಣು) (सं) अ.–धन्यधन्य ! वाहवा ! भलें !

**झंपा** ಝಂಪಾ (सं) ना.–पांचमात्रिक ताल; दशमात्रिक ताल.

**झंपाळ (जंपाल)** (ಝಂಪಾಳ [ಜಂಪಾಲ])(क) ना.–आवरण; पांघरूण; दादरा; मुस्कट.

**झरि (री)**(ಝರಿ [ರೀ])(सं) ना.–गिरिनदी; निर्झर; डोंगरावरून आलेला प्रवाह; शतपदी; गोम.

**झर्झर** (ಝರ್ಝರ) (सं) ना.–चर्मवाद्य; वेताची काठी.

**झर्झरा** (ಝರ್ಝರಾ) (सं) ना.–वेश्या; विधवा.

**झर्झरि** (ಝರ್ಝರಿ) (सं) ना.–शिव.

**झला (ले)** (ಝಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–सूर्यप्रकाश; डोळे दिपवणारा प्रकाश; कन्या; मुलगी.

**झल्ल** (ಝಲ್ಲ) (सं) ना.–आग्रही; हट्टी; नीच जातीचा मनुष्य.

—**कंठ** (ಕಂಠ) (सं) ना.–पारवा; कबूतर.

—**त्रि** (ತ್ರಿ) (सं) ना.–ढोर; डोंब.

**झल्लरि** (ಝಲ್ಲರಿ) (सं) ना.–एक चर्मवाद्य; कुरळे केस; मखर; तोरण; झांज; 'जालरि' पहा.

**झल्लळि** (ಝಲ್ಲಳಿ) (सं) ना.–'झल्लरि' पहा.

**झल्लि** (ಝಲ್ಲಿ) (सं) ना.–झालर; माळा; चवरी; ओळ; समूह.

**झल्लिका** (ಝಲ್ಲಿಕಾ) (सं) ना.–स्निग्धता; अंगाला चोपडलेल्या उटीची स्निग्धता; प्रकाश.

**झष** (ಝಷ) (सं) ना.–मासा; मत्स्य.

—**उदरि** (ಉದರಿ) (सं) ना.–सत्यवती; व्यासमाता,

—**केतन,–ध्वज** (ಕೇತನ–ಧ್ವಜ) (सं) ना.–मीनकेतु; काम.

**झषकेतनध्वंसि** (ಝಷಕೇತನಧ್ವಂಸಿ) (सं) ना.–कामांतक; शिव; मदनसंहारक.

**झळ** (ಝಳ) (सं) ना.–'झला' पहा.

**झळप** (ಝಳಪ) (सं) ना.–चकाकी; प्रकाश; ज्वाळा.

—**इसु** (ಇಸು) (सं) ना.–'चकाकणें; मिरवणें; हलवणें.

**झळंब** (ಝಳಂಬ) (सं) ना.–'जळबायत' पहा.

**झाडने** (ಝಾಡನೆ) (अ. दे) ना.–झाडलोट; झाडझूड.

**झाडमालि** (ಝಾಡಮಾಲಿ) (अ. दे) ना.–गावरस्ते झाडणारा; झाडूवाला.

**झाळिसु** (ಝಾಳಿಸು) (क) धा.–दूर ठेवणें; संबंध तोडणें; दुसरीकडे ठेवणें; गाळणें; चाळणें.

**झिल्लि** (ಝಿಲ್ಲಿ) (सं) ना.–'जीरुंडे' पहा; जळू; एक यादववीर.

—**कंठ** (ಕಂಠ) (सं) ना.–पारवा; कबूतर.

—**के** (ಕೆ) (सं) ना.–सूर्यप्रकाश; आवाज करणारा किडा; 'जीरुंडे' पहा.

**झेंकार** (ಝೇಂಕಾರ) (सं) ना.–बाणाच्या दोरीचा टंकार; झंकृति.

**झेंपिसु** (ಝೋಂಪಿಸು) (क) धा.–पेंगणें; झोपणें; एकत्रित होणें.

**झौलिक** (ಝೌಳಿಕ) (क) ना. चंची; पानसुपारीचा बटवा.

**ञ** (ಞ) (सं) ना.–च वर्गातील पांचवे व्यंजन; अनुनासिक.

## ट

**ट** (ಟ) (सं) ना. –'ट' वर्गातील पहिलें व्यंजन.
**टक्क** (ಟಕ್ಕ) (क) वि. –ठक; वंचक; खोटारडा; लुच्चा.
**टक्कु** (ಟಕ್ಕು) (क) ना. –फसवणूक; वंचना; असत्य; ठकपणा; शिलाईची टीप; टक.
**टक्कुवगे** (ಟಕ್ಕುವಗೆ) (क) ना. –फसवण्याची बुद्धि; लबाडी; खोटेपणा
**टगरू** (ಟಗರು) (क) ना. –ठगर; टकरीचा बकरा.
**टंक** (ಟಂಕ) (क) ना. –टेकडीचा उतार; छन्नी; चलनी नाणें; पाय; ज्ञान; अभिमान; चांदी; पितळी भांडें; टांकी.
—साले (ಸಾಲೆ) (क) ना. –टांकसाळ, नाणीं पाडण्याचें घर.
**टंकक** (ಟಂಕಕ) (क) ना. –चांदीचें नाणें; टांकसाळ.
**टंकण (णकार)** (ಟಂಕಣ [ಣಕಾರ]) (क) ना. –कासार; बांगडीवाला.
**टंकार** (ಟಂಕಾರ) (क) ना. –'टं' असा आवाज; धनुष्याचा टणत्कार; हांक; हरली.
**टंकाहति** (ಟಂಕಾಹತಿ) (सं) ना. –पायाची लाथ; तुडवणूक; पदाघात; लत्ता प्रहार; दुगाणी.
**टंकृति** (ಟಂಕೃತಿ) (सं) ना. –टणत्कार; छातीचे ठोके.
**टंके** (ಟಂಕೆ) (क) ना. –नाणें; काठी; ठोसा; बुक्की.
**टपा (प्पा) लु** (ಟಪಾ [ಪ್ಪಾ] ಲು) (अ. दे) ना. –टपाल; पोष्ट; पत्र.
**टमाळ** (ಟಮಾಳ) (अ. दे) वि. –टवाळ; उडाळ; कपटी.
**टर्किकोळि** (ಟರ್ಕಿಕೋಳಿ) (अ. दे) ना. –टर्की कोंबडा.
**टवणे** (ಟವಣೆ) (क) धा. –हिशेब जमविणें.
**टव (वु) ळि** (ಟವ [ವು] ಳಿ) (क) ना. –फसवणूक; वंचना; ठकपणा.
**टाकण** (ಟಾಕಣ) (अ. दे) ना. –तट्टू; शिंगरू; पेगुघोडा.
**टाकु** (ಟಾಕು) (अ. दे) ना. –भिंत; आधार; लेखणी; टाक; टाकाचें टोंक.
**टाठडाढण** (ಟಾಠಡಾಢಣ) (क) ना. –निर्विवाद गोष्ट; निःसंदिग्ध भाषण; कठोर भाषाशैली; निरर्थक शब्दयोजना.
**टावु** (ಟಾವು) (अ. दे) ना. –डाव; स्थळ; ठिकाण; जागा.
**टिकाणि** (ಟಿಕಾಣಿ) (अ. दे) ना. –ठिकाणा; निवास; स्थान.
**टिकरिगळे** (ಟಿಕ್ಕರಿಗಳೆ) (क) धा. –निंदा करणें; हीन लेखणें; घसरणें; तिरस्कार करणें.
**टिक्कि** (ಟಿಕ್ಕಿ) (क) ना. –रत्नखचित अंगठी; कुंडल; भिकबाळी; टिकली; टिळा.
**टिंगल्** (ಟಿಂಗಲ್) (अ. दे) ना. –पोरकटपणा; फालतुपणा; स्फुरण; खालच्या दर्जाचा विनोद.
**टिट्टिभ** (ಟಿಟ್ಟಿಭ) (सं) ना. –टिटवी; देवपक्षी; लावी पक्षी; लाऊक.
**टिप्पण (णे)** (ಟಿಪ್ಪಣ [ಣೆ]) (अ. दे) ना. –संक्षिप्त लेखन; टीका.
**टिस (सि) लु** (ಟಿಸ [ಸಿ] ಲು) (क) ना. –उपनदी; शाखा; कोंब; मोड.
**टीका (के)** (ಟೀಕಾ) [ಕೆ]) (सं) ना. –विमर्श; टिप्पण; अर्थ; व्याख्यान; विवरण.
(क) ना. –कंठाभरण.
**टीकाकार** (ಟೀಕಾಕಾರ) (सं) ना. –व्याख्याता; विमर्षकार; विवेचनात्मक लेखन करणारा.
**टीकाराय** (ಟೀಕಾರಾಯ) (सं) ना. –माध्वसांप्रदायी एक स्वामी.
**टीवक (टिंबक)** (ಟೀವಕ [ಟಿಂಬಕ]) (क) ना. –तंबोऱ्याच्या तारांचा ध्वनि; तंबोऱ्याच्या लयीत होणारा नाच.
**टुम (मु) की** (ಟುಮ [ಮು] ಕಿ) (क) ना. –चर्मवाद्य; टिमकी; डफ; दिमडी; डफरी.
**टुलिप्** (ಟುಲಿಪ್) (अ.दे) ना. –ट्यूलिप नामक इंग्रजी फूल; घंटा; पुष्पक; घंटीचें फूल.
**टेक्के** (ಟೆಕ್ಕೆ) (अ.दे) ना. –बावटा; ध्वज; आलिंगन; अठीमिठी; उशी; लोड; तक्या.
**टेक्किय** (ಟೆಕ್ಕಿಯ) (क) ना. –ध्वज; बावटा.
**टेंटणिसु** (ಟೆಂಟಣಿಸು) (क) धा. –रागाला येणें; रागावणें; उद्रेक होणें.
**टेप्पर** (ಟೆಪ್ಪರ) (क) ना. –झेप; उडी; अभिवृद्धि; चकाकी; निर्मलता; सूज; फुगोटा; पानाचा पुडा.
**टेप्परिसु** (ಟೆಪ್ಪರಿಸು) (क) धा. –उडणें; उडी मारणें; वाढणें; चकाकणें; पळणें.
**टेब्बरिसु** (ಟೆಬ್ಬರಿಸು) (क) धा. –उजळणें; प्रगटणें; कुंठित करणें; निश्चेष्ट करणें; दिङ्मूढ करणें; देहभान विसरणें.
**टोकळि (ळे)** (ಟೊಕಳಿ [ಳೆ]) (क) ना. –झाडाची साल; खुराचे तासलेले तुकडे; बुडबुडा; वांझ वस्तु; पोकळ बोलणें.
**टोंक** (ಟೊಂಕ) (क) ना. –कटिभाग; कमर; माज; मध्यमा.
**टोंकायिसु** (ಟೊಂಕಾಯಿಸು) (क) धा. –पांघरूण घालणें; हळूच चापटी मारणें; थापटणें; थोपटणें.
**टोंगे** (ಟೊಂಗೆ) (क) ना. –शाखा; पालवी; कोंब; 'टिसुलु' पहा; कमल.
**टोणप** (ಟೊಣಪ) (क) ना. –दांडगा; हुप्या; त्रासदायक मनुष्य; दांडोबा; अडमुठा; टोणपा.
**टोणपे** (ಟೊಣಪೆ) (क) ना. –सोटा; लाठी; लठ्ठ काठी.
**टोणे** (ಟೊಣೆ) (क) धा. –गिळणें; थुंकणें; थप्पड देणें; फोडणें; वंचिणें; फसविणें; चुकविणें; उकरणें.

टोणेय (ಟೊಣೆಯ) (क) ना. – 'टोणप' पहा.
टोप्पर (ಟೊಪ್ಪರ) (क) ना. – टोपी; टोपरे; टोपडें; कुंची.
टोप्पि (प्पिगे) (ಟೊಪ್ಪಿ [ಪ್ಪಿಗೆ]) (क) ना. – शिरस्त्राण; टोपी.
—हाकु (ಹಾಕು) (क) धा. – फसवणें; वंचना करणें; टोपी घालणें.
टोळ्ळु (ಟೊಳ್ಳು) (क) वि. – निरर्थक; व्यर्थ; असार; दम नसलेला.
टोळ्ळे (ಟೊಳ್ಳೆ) (क) ना. – डोळ्याची खाच; डोळ्याची खोबण.
टोंकु (ಟೋಂಕು) (क) ना. – हिशेब; ठोक; वट्ट हिशेब.
टोळि (ಟೋಳಿ) (अ.दे) ना. – ढीग; रास; पक्ष; टोळके; टोळी; कुल; जात.
ट्राम्बंडि (ಟ್ರಾಮ್‌ಬಂಡಿ) (अ.दे) ना. – ट्रामगाडी; लोहरथ्या.

## ठ

ठ (ಠ) (सं) ना. – ट वर्गाचें दुसरें व्यंजन.
ठक्क (ಠಕ್ಕ) (क) वि. – वंचक; ठक; खोटारडा.
ठक्कु (ಠಕ್ಕು) (क) ना. – असत्य; फसवणूक; वंचना.
—इसु (ಇಸು) (क) धा. – फसवणें; वंचिणें; आडमार्गाला लावणें.
ठक्के (ಠಕ್ಕೆ) (क) ना. – 'ठक्क' पहा.
ठणत्कार (ಠಣತ್ಕಾರ) (क) ना. – ठण्ठण् असा आवाज; झंकार; झणत्कार.
ठमाळ (ಠಮಾಳ) (क) वि. – ढेंडगा; भांडखोर; आळशी.
ठवणे (ಠವಣೆ) (क) धा. – जमविणें; तोंडमिळवणी करणें. 'टवणे' पहा.
ठवुळि (ಠವುಳಿ) (क) ना. – टवाळी; कुचेष्टा; लुच्चेगिरी; फसवणूक.
ठसे (ಠಸೆ) (अ. दे) ना. – मुद्रा; ठसा; तिकीट; परवाना.
ठाकूर (ಠಾಕೂರ) (अ. दे) ना. – गौरवाचे बिरुद; पदवी; देवमूर्ति; कृष्णमूर्ति; तस्कर; चोर.
ठाण (णे) (णेय) (ಠಾಣ [ಣೆ] [ಣೆಯ]) (क) ना. – स्थान; ठाणें: बिन्हाड; वसती; सैन्याचा तळ; पाहारा; चौकी.
ठाणेदार (ಠಾಣೆದಾರ) (अ. दे) ना. – पहारेकरी; चौकीदार.
ठायि (ये) (ಠಾಯಿ [ಯೆ]) (अ. दे) ना. – संगीत वादन प्रकार; मंदताल; मध्यलय.
ठाव (वु) (ಠಾವ (ವು) (क) ना. – जागा; बिन्हाड; स्थान; निवास.
—काणु (ಕಾಣು) (क) धा. – आसरा मिळणें; गति लाभणें; ठाव लागणें; तळ सांपडणें.
ठावुडि (ಠಾವುಡಿ) (क) ना. – टोळी; टोळकें.
ठिकाणी (ಠಿಕಾಣಿ) (अ. दे) ना – ठिकाण;
ठीक (कु) (ಠೀಕ [ಕು]) (अ. दे) अ. – योग्य ! बरें !
(अ; दे) ना. – चिन्ह; सोंग; वाळलें आडंबर; डौल, मिजास; चैन.
ठीकुठाकु (ಠೀಕುಠಾಕು) (अ. दे) ना. – ठाकठीक; 'ठीक' पहा.
ठीवि (ಠೀವಿ) (अ. दे) ना. – गांभीर्य; संभ्रम; डौल; अवडंबर; दर्प प्रतिष्ठा; सोंगलाडा.
ठेवणाति (ಠೇವಣಾತಿ) / ठेवणि (ಠೇವಣಿ) (अ- दे) ना. – ठेव; गहाण; तारण; गुप्त; धन; निधान.
ठेवु (ಠೇವು) (अ. दे) ना. – ठेव; तारण; गहाण.
ठौळि (ಠೌಳಿ) (क) ना. – वंचना; फसवणूक; ठकपणा; असत्यता.
—ग (ಗ) (क) वि. – वंचक; ठक; फसव्या; लुच्चा; खोटारडा

## ड

ड (ಡ) (सं) ना. – ट वर्गातील तिसरें व्यंजन.
डकायति (ಡಕಾಯತಿ) (अ-दे) ना. – डाका; दरोडा; लूट; डोळ्यादेखतची चोरी.
डक्के (ಡಕ್ಕೆ) (क) ना. – डग्गा; चर्मवाद्य; मृदंग; डमरू; डफ.
डगे (ಡಗೆ) (अ-दे) ना. – फसवणूक; दगाफटका; विश्वासघात.
(क) ना. – ज्वर; ताप; जाळ; धग; सूज; उकाडा; भीति; अपाय; पीडा; त्रास.
डंक (का) (ಡಂಕ [ಕಾ]) (अ-दे) ना. नौबत; नगारा; भेरी.
डंके (ಡಂಕೆ) (क) ना. – टिपरी; तालकांठी.
डंगुर (ಡಂಗುರ) (क) ना. – डांगोरा; दवंडी; घोषणा; प्रगटना.
—होय् (ಹೊಯ್) (क) धा. – दवंडी पिटणें; डांगोरा देणें.
डंगे (ಡಂಗೆ) (अ-दे) ना. – मुद्गल; गदा; वीट; बर्ची.
डब्बु (ಡಬ್ಬು) (क) अ. – खालीं डोके घालून; वाकडेतिकडेपणें; पालथे होऊन.
(क) वि. – जाडी; पालथें; मोठें.
(क) ना. – हलगी; चर्मवाद्य.

(अ-दे) ना.—दंभ; अवडंबर; पोकळपणा; कोरडी ऐट.

**डब्बुगळिळ** (ಡಬ್ಬುಗಳ್ಳಿ) (क) ना.—शेर; निवडुंग; कव्ळी; काटेरी शेर.

**डब्बे** (ಡಬ್ಬೆ) (क) ना.—डबा; सामानपेटी.

**डमर** (ಡಮರ) (क) ना. दंगा; पीडा; विपत्ति; उपद्रव; मारामारी; कोलाहल; गंडातर; 'डामर' पहा.

**डमरु (रुक)** (ಡಮರು [ರುಕ]) (सं) ना.—एक चर्मवाद्य; कुडबुडें; शिवहस्तांतील एक वाद्य; करडी; कोरण्याचें एक कर्मवाद्य.

**डमाण (र)** (ಡಮಾಣ [ರ]) (क) ना.—ढोल; दुंदुमी; भेरी.

**डंब** (ಡಂಬ) (क) ना.—दंभ; व्यर्थ अहंकार; गर्व; अवडंबर; 'जाभ' पहा; कोरडी बढाई; कपट; फसवणूक.

**डंबक** (ಡಂಬಕ) (क) वि.—दंभक; वंचक; गर्विष्ठ; कपटी; (क) ना. अवडंबर माजवणारा; वाद्य विशेष.

**डंबर** (ಡಂಬರ) (सं) ना.—अवडंबर; अहंकार; गर्व; ख्याती; प्रसिद्धि; घडण; साम्य; सारखेपणा.

**डंबु** (ಡಂಬು) (क) ना.—पोकळ बढाई; कोरडे आडंबर; दिखाऊ ऐट.

—**क** (ಕ) (क) ना.—'डंबक' पहा.

**डंभ** (ಡಂಭ) (क) ना. दंभ; 'डंब' पहा.

**डवन** (ಡವನ) (सं) ना.—उड्डाण; गगनविहार; पालखी; वाहनाची भरधाव.

—**ऊत्** (ಊತ್) (क) ना.—गगनोड्डाण; भरारी.

**डवके** (ಡವಕೆ) (क) ना.—पिकदाणी; थुंकण्याचें भांडें; 'काळंजी' पहा.

**डवडविके** (ಡವಡವಿಕೆ) (क) ना.—धडधड; उरस्फोट; अत्याशा; हांव; छाती फुटणें.

**डवणे** (ಡವಣೆ) (क) ना.—डमरूसारखें चर्मवाद्य.

**डवळ** (ಡವಳ) (क) वि.—नीतिरीतिहीन; कुपथगामी; कुमार्गी; क्रमचुकार.

**डवालि** (ಡವಾಲಿ) (क) ना.—शिपाई; पट्टेवाला; शिपायाचा पट्टा; हुद्दादर्शक फीत.

**डवि (वु) गे** (ಡವಿ [ವು] ಗೆ) (क) ना.—वेळू; बांबू; पोकळ, जाड वेळु; बुरडी; हारा.

**डवुडे** (ಡವುಡೆ) (क) ना.—एक चर्म वाद्य; डिंडिम; दिमडी; डफ.

**डवुलु (डौलु)** (ಡವುಲು [ಡೌಲು]) (क) ना.—दिमाख; दंभ; नसती मिरवण; शिस्त.

**डळहु** (ಡಳಹು) (क) ना.—अहंकार; गर्व.

**डाक** (ಡಾಕ) (क) ना.—एका राजाचें नाव; डाकरस. (अ. दे) ना.—टपाल; पत्र.

**डाकिणी (नी)** (ಡಾಕಿಣಿ [ನಿ]) (क) ना.—राक्षसी; भांडखोर स्त्री; पिशाच्चिका.

**डाकु** (ಡಾಕು) (अ. दे) ना.—दरवडेखोर; देवी; टपाल; देवी काढणें.

**डाडिम** (ಡಾಡಿಮ) (क) ना.—डाळिंब; दाडिम.

**डाणे (णि)** (ಡಾಣೆ (ಣಿ) (क) ना.—द्रोण; पळा; खाद्य पदार्थ; चारा; चंदी; खुराक.

**डाबु** (ಡಾಬು) (क) ना.—आभरण; कमरपट्टा; 'ओड्याण' पहा. दाब; दट्ट्या.

**डामर** (ಡಾಮರ) (सं) ना.—भयंकर; अद्भुत; लग्गा; दंगा; रोगादि विपत्ति; पीडा; क्षोभ; गोंधळ; आकस्मिक घटना; ताप; दुष्काळचें भय 'इतिबाधे' पहा.

**डामरु** (ಡಾಮರು) (अ. दे) ना.—डांबर.

**डांबिक (ग)** (ಡಾಂಬಿಕ [ಗ]) (क) वि.—दांभिक; वंचक; कपटी; ढोंगी; गर्विष्ठ; घमेंडखोर.

**डालु** (ಡಾಲು) (क) ना.—ढाल; 'गुराणि' पहा.

**डालायित** (ಡಾಲಾಯಿತ) (क) ना.—ढालायित; ढालपटु.

**डावणि (णे)** (ಡಾವಣಿ (ಣೆ) (क) ना.—दावण; गोठा; गोदन; दावें.

**डावर** (ಡಾವರ) (क) ना.—दाह; तल्खली; तहान; खोड्याचा पाठपुरावा; उपद्रव; आतुरता; पीडा; हाव. 'कोटले' पहा. 'डामर' पहा.

—**इसुः** (ಇಸು) (क) धा.—जळणें; टाळणें; आवरणें; आतुर होणें; क्रोधानें ओरडणें; रागानें थरथरणें.

**डावरि** (ಡಾವರಿ) (क) ना.—जलन; जाळ; दाह; धग; उष्णता; ताप; संकट.

**डावरिग** (ಡಾವರಿಗ) (क) ना.—क्रोधानें भडकणारा; जळफळणारा.

**डावुर** (ಡಾವುರ) (सं) ना.—'डावर' पहा.

**डावु** (ಡಾವು) (अ. दे) ना.—कुस्तीचा पेच; सूड; तंत्र; युक्ति.

**डाळ (ळि)** (ಡಾಳ [ಳಿ]) (क) ना.—प्रकाश; कांती; लावण्य; कळा; मनोहारिता; चकाकी; ठसठशीतपणा; उठून दिसणें; चमक; चवरा.

**डाळिसु** (ಡಾಳಿಸು) (क) धा.—दळणें; झळकणें; चमकणें; सुंदर होणें.

**डाळिम** (ಡಾಳಿಮ) (क) ना.—डाळिंब; दाडिम.

**डिक्कि (ढि)** (ಡಿಕ್ಕಿ [ಢಿಕ್ಕಿ]) (अ. दे) ना.—ढकला ढकली; रेटारेटी.

**डिंगर** (ಡಿಂಗರ) (सं) ना.—सेवक; दास; चोर; नीच; वंचक; भक्त; टोणपा; दांडगा; दुष्ट; 'दडिय' पहा.

**डिंगरिग** (ಡಿಂಗರಿಗ) (क) ना.—सेवक; दास 'डिंगर' पहा.

**डिंडिम** (ಡಿಂಡಿಮ) (सं) ना.—झांगट; ढोल; चर्मवाद्य; मृदंग; भेरी.

**डिंडीर** (ಡಿಂಡೀರ) (सं) ना.—समुद्राचा फेस; बुडबुडा; समुद्रकिनाऱ्याचा फेस-किनाऱ्याचा प्रदेश.

**डिबिक** (ಡಿಬಿಕ) (सं) ना.—जरासंधाचा मंत्री;

**डिंब** (ಡಿಂಬ) (सं) ना.—दंगा; कोलाहल; विपत्ति; संकट दुष्काळभय; अंडें; गर्भस्थ शिशु; गोल.

**डिंबु** (ಡಿಂಬು) (क) ना.—जळता दिवा; लामण दिवा.

**डिंभ** (ಡಿಂಭ) (सं) ना.—अर्भक; नूतन बालक; पिलूं; वासरूं; अज्ञाण; मूढ; मतिमंद; निर्बुद्ध

**डिंभक** (ಡಿಂಭಕ) (सं) ना.—डिंभ' पहा.

**डिळ्ळ** (ಡಿಳ್ಳ) (क) ना.—भय; आतुरता; निरुत्साह; घाबरेपणा; भोळसरपणा.

—**पोगु** (ಪೋಗು) (क) धा.—भिणें; निरुत्साहणें.

**डिळ्ळि** (ಡಿಳ್ಳಿ) (क) ना.—दिल्लीशहर.

**डीन** (ಡೀನ) (सं) वि.—उड्डाण घेतलेला; भरारी मारलेला.

**डुंडुभ** (ಡುಂಡುಭ) (सं) ना.—पाणसाप; विरुळा; वेल; नागवेल.

**डुबरि** (ಡುಬರಿ) (क) ना.—कुबड; कुब्ज; उंटाची मदार.

**डुब्ब** (ಡುಬ್ಬ) (क) ना.—'डुबरि' पहा.

**डुरुकु** (ಡುರುಕು) (क) धा.—वाकणें; ओणवणें; वाकडा होणें; डुरकणें.

**डुलि** (ಡುಲಿ) (क) ना.—कासवी; कुंभाराचा आवा.

**डेंडणिसु** (ಡೆಂಡಣಿಸು) (क) धा.—भीतीनें कापणें; तळमळणें; दिङ्मूढ होणें; दचकणें.

**डेंकण (णि)** (ಡೆಂಕಣ) (ಣಿ) (क) ना.—तटावरील ध्वजस्तंभाची जागा; तटावरील बुरूज; पडकोट. 'कोत्तल' पहा. अंतरकोट; तोफाठेवण्याचा बुरुज 'बतेरि' पहा मोर्चाची जागा.

**डेगे** (ಡೇಗೆ) (क) ना.—शिकरा, ससाणा; शिकारी पक्षी 'गिडुग' पहा.

**डेरे** (ಡೇರೆ) (अ. दे) ना.—सैन्याचा तळ; गुडार; तंबू; तात्पुरती वसती.

**डोकर** (ಡೊಕ್ಕರ) (क) ना.—मार; मुका मार; तुडवातुडवी; सामना; कुस्ती.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—नरडें दाबणें; श्वासोच्छास करणें.

**डोक्के** (ಡೊಕ್ಕೆ) (क) ना.—शरीर; देह; पोट; चेहरा.

**डोगरु** (ಡೊಗರು) (क) ना.—पोकळपणा; फुसकेपणा; खड्डा.

**डोगे** (ಡೊಗೆ) (क) धा.—भोंक पाडणें; छिद्र करणें; उकरून खड्डा करणें; बळ दाखवणें.

**डोग्गे** (ಡೊಗ್ಗೆ) (क) ना.—घनीकरण; विरजण.

**डोंक** (ಡೊಂಕ)(क) वि.—वाकडें; वक्र; कलंकित; अडीअडचणीचा.

**डोंकणि** (ಡೊಂಕಣಿ) (क) ना.—बर्ची; वीट; शस्त्र; लाठी; आयुध.

**डोंकु** (ಡೊಂಕು) (क) ना.—वाकडेपणा; वक्रता; कौटिल्य; वंचना; मान वाकणें; आधीनता; शरणचिठी.

—**आगु** (ಆಗು) (क) धा.—वाकणें; वाकडे होणें; शरण जाणें.

**डोंगर** (ಡೊಂಗರ) (क) ना.—पर्वत; टेकडी; प्रपात; मोठी चिंच; गोरख चिंच; उंच बांधा; धरण.

**डोंगुर** (ಡೊಂಗುರ) (क) ना.—जंगल; पर्वत; अरण्य.

**डोंगु** ಡೊಂಗು (क). ना.—दंभ; गर्व; अहंकार; ढोंग.

**डोणग** (ಡೊಣಗ) (क) ना.—'डोणेय' पदा.

**डोणे** (ಡೊಣೆ) (क) ना.—कुंड; डोण; टाकें; बांधावरील डबकें; 'डोगरु' पहा. भाता; तूणीर; निषंग; मीठ.

—**कण्णु** (ಕಣ್ಣು) (क) ना.—खोल डोळे; बारीक डोळे.

**डोणेय** (ಡೊಣೆಯ) (क) वि.—लठ्ठ; दांड्या; उडाणटप्पू; टोणपा; असंस्कृत.

**डोंडोळे** (ಡೊಂಡೊಳೆ) (क) ना.—फुलवेल; कमळ; एक वेली.

**डोण्णे** (ಡೊಣ್ಣೆ) (क) ना.—लाठी; सोटा; द्रोण;

**डोंब** (ಡೊಂಬ) (क) ना.—डोंबारी; दोरीवर नाच करणारे.

—**गणे** (ಗಣೆ) (क) ना.—डोंबारकाठी; सडपातळ उंच मनुष्य.

**डोंबकागे** (ಡೊಂಬಕಾಗೆ) (क) ना.—डोमकावळा; अधाशी कावळा.

**डोंबि** (ಡೊಂಬಿ) (क) ना.—समूह; युग्म; कोलाहल; टोळींतील भांडण.

**डोंबु** (ಡೊಂಬು) (क) ना.—दंभ; आडंबर; भगदाड; मोठे भोंक; डबकें.

**डोळ्ळारि** (ಡೊಳ್ಳಾರಿ) (अ.दे.) ना.—पलंग; माचा; डोलारा.

**डोळ्ळास** (ಡೊಳ್ಳಾಸ) (क) ना.—युक्ति; तंत्र; फसवणूक; वंचना; विलक्षण रूप.

**डोळ्ळु** (ಡೊಳ್ಳು) (क) ना.—चर्मवाद्य; भेरी; नगारा; ढोल.

—**होट्टे** (ಹೊಟ್ಟೆ) (क) ना.—ढेरपोट; ढेरी.

**डोका** (ಡೋಕಾ) (अ.दे) ना.—धक्का; आपत्ति; संकट; तोटा; वंचना; धोका.

**डोकारि** (ಡೋಕಾರಿ) (क) वि.—ठक; फसव्या; वंचक; नक्राश्रु ढाळणारी; ढोंगी; सोंगलाडी.

**डोणि** (ಡೋಣಿ) (क) ना.—द्रोण; पानाची वाटी; नाव; होडी; सांगड.

**डोम** (ಡೋಮ) (सं) ना.—नीच जातीचा; डोंब.

**डोर** (ಡೋರ) (क) ना.—ढोर; चामड्याचीं कामें करणारा; चांभार.

**डोरिय** (ಡೋರಿಯ) (अ.दे) ना.— नवार; कापडपट्टी.
**डोरु** (ಡೋರು) (क) ना.—बीळ; भांडणतंटा; ठोसा; झाडाची ढोली; 'डोगरु' पहा.
**डोरुगळे** (ಡೋರುಗಳೆ) (क) धा.—भोक पाडणें; छिद्र करणें; उकरणें; एकत्र करणें; मिसळणें.
**डोलायमान** (ಡೋಲಾಯಮಾನ) (सं) वि.—हलणारे; लोंबतें; संशयित.
**डोलि** (ಡೋಲಿ) (क) ना.—डोली; पालखी; मेणा; हातडोली; हातपलंग.
**डोलु** (ಡೋಲು) (अ. दे.) ना.—ढोल; भेरी; डोल; शिधा; शिधावाटप.
**डोह** (ಡೋಹ [ರ]) (क) ना.—'डोर' पहा. 'डोहरकक्कय' नामक एक जंगम.
**डौडे** (ಡೌಡೆ) (क) ना.—दिमडी; चर्मवाद्य; नगारा.

## ढ

**ढ** (ಢ) (सं) ना.—ट वर्गातील चौथें व्यंजन.
**ढक्का** (ಢಕ್ಕಾ) (क) ना.—मृदंग; डग्गा; चर्मवाद्य.
**ढक्कुळि** (ಢಕ್ಕುಳಿ) (क) ना.—वंचना; कपट; अंगचोरपणा; आळस.
**ढगे** (ಢಗೆ) (क) ना.—'डगे' पहा.
**ढंबर** (ಢಂಬರ) (सं) ना.—अवडंबर; ठेव.
**ढाकु** (ಢಾಕು) (अ. दे.) ना.—विरोध; प्रतिहल्ला; निराकरण; खंडण.
**ढालु** (ಢಾಲು) (अ. दे.) ना.—ढाल; 'डालु.' पहा.
**ढाळु** (ಢಾಳು) (क) ना.—चतुर; मार्ग; शैली; स्पष्टता; खुलासा.
**ढिक्कि** (ಢಿಕ್ಕಿ) (क) ना.—'डिक्कि' पहा.

## ण

**ण** (ಣ) (सं) ना. ट वर्गातील पांचवे व्यंजन. या वर्णानें आरंभ होणारे कन्नड शब्द नाहींत.

## त

**त** (ತ) (सं) ना.—त वर्गातील १ लें व्यंजन; कानडींतील एक कृदंत प्रत्यय.
(सं) अ.—भूतकृदंताचा संस्कृत प्रत्यय.
**तकरारु** (ತಕರಾರು) (अ. दे) ना.—आक्षेप; तकरार; आपत्ति; विरोध.
**तकायि (वि)** (ತಕಾಯಿ [ವಿ]) / **तगायि** (ತಗಾಯಿ) (अ. दे) ना.—सरकारी कर्ज; शेतीसाठीं दिलेली हातउसनी रक्कम.
**तक्क** (ತಕ್ಕ) (क) वि.—योग्य; सम; बांधीव; जुळणारे.
(क) ना.—तागा; ठाण; समानता; सद्गृहस्थ; मित्र.
—**अंते (तिके)** (ಅಂತೆ [ತಿಕೆ]) (क) अ.—योग्य रीतीनें.
—**अनितु** (ಅನಿತು) (क) वि.—जेवढ्यास तेवढें.
**तक्कडि** (ತಕ್ಕಡಿ) (क) ना.—तराजू; तागडी; कांटा; तोलकांटा.
—**काणु** (ಕಾಣು) (क) धा.—विषमता, योग्यता गमावणें; योग्यता कसाला लावून पाहणें.
**तक्कायिसु** (ತಕ್ಕಾಯಿಸು) / **तक्कय्सु** (ತಕ್ಕಯ್ಸು) / **तक्किसु** (ತಕ್ಕಿಸು) / **तक्कविसु** (ತಕ್ಕವಿಸು) (क) धा.—आलिंगणें; मिठी मारणें; गळा मिठी घालणे.
**तक्कळि** (ತಕ್ಕಳಿ) (क) धा.—योग्यता कमी होणें; योग्यता गमावणें; सामर्थ्य नाहीसें होणें.
**तक्कळिसु** (ತಕ್ಕಳಿಸು) (क) धा.—शिंपडणें; चिमटणें; मान घालवून घेणें; 'चिमुकिसु' पहा.
**तक्कि** (ತಕ್ಕಿ) (क) ना.—वंचना; फसवणूक; दगा; विश्वासघात.
**तक्कु** (ತಕ್ಕು) (क) ना.—योग्यता; मोठेपणा; श्रेष्ठता; भरीवपणा; उन्नति; स्नेह; प्रीति; इच्छा; अहंकार; उत्साह.
—**ऊदु,-दु** (ಉದು,-ದು) (क) वि.—योग्य; समान.
—**मे** (ಮೆ) (क) ना.—स्नेह; योग्यता; गरिमा; मोठेपणा.
—**किडु** (ಕಿಡು) (क) धा.—योग्यता घालवून घेणें.
**तक्कुमे** (ತಕ್ಕುಮೆ) (क) ना.—योग्यता; समानता; औचित्य.

तक्कै (ತಕ್ಕೈ) (क) ना.–आलिंगन; अठीमिठी; मित्रत्व; समूह; रास. (अ. दे) ना.–तवक्या; उशी.
तक्कैय्सु (कैय्सु) (ತಕ್ಕೈಯಿಸು [ಕೈಯಿಸು]) (क) धा.–आलिंगन देणें; मिठी मारणें; समाधान पावणें; तृप्त होणें; शांत होणें; 'संतइसु' पहा.
तक्कोल (ತಕ್ಕೊಲ) (क) ना.–एक प्रकारचें सुगंधी द्रव्य.
तक्ते (ತಕ್ತೆ) (अ. दे) ना.–तक्ता; पत्रक.
तक्र (ತಕ್ರ) (सं) ना.–लोणी काढलेलें ताक; चतुर्थांश पाणी असलेलें ताक.
तक्ष (ತಕ್ಷ) (सं) ना.–सुतार; कातरणारा; तासणारा; मन्मथाचा धाकटा भाऊ.
तक्षक (ತಕ್ಷಕ) (सं) ना.–कद्रूचा पुत्र; काठी.
तक्षण (ತಕ್ಷಣ) (क) अ –तत्क्षण; ताबडतोब.
तक्षन (ತಕ್ಷನ) (सं) ना.–शिल्पी; देवशिल्पी; विश्वकर्मा; चित्रा नक्षत्र.
तक्षशिला (ತಕ್ಷಶಿಲಾ) (सं) ना.–प्राचीन विद्यापीठाचे स्थान.
तक्षीरु (ತಕ್ಷೀರು) (अ. दे) ना.–फिर्याद; खटला; दावा; अपवाद; चहाडी; निंदा.
तग (ತಗ) (क) ना.–अंत; विलंब; मध्यंतर; विश्रांति; कामाचा खंड.
तगडु (ತಗಡು) (क) ना.–लोह; सीमेंटपत्रा; छपराचें साधन.
तगदु (ತಗದು) (क) अ.–एकंदरींत अयोग्य; तात्पर्य पाहतां अयोग्य.
तगर् (ತಗರ್) (क) अ.–योग्य समजून; योग्य जाणून.
(क) धा.–विलंब होणें; हरकत घेणें, हातांत घेतलेलें काम थांबवणें.
(क) ना.–ठगर; टकरीचा बोकड.
तॆर (ತೆರ) (क) ना.–ठगरवाहन; बोकडाला वाहन करणारा; अग्नि.
—पोणर्के (ಪೊಣರ್ಕೆ) (क) ना. बोकडझुंज; ठगरांची टक्कर.
तगर (ತಗರ) (क) ना.–एक झाड; शिसे; तगरीचें फुलझाड.
तंगलु (ತಗಲು) (क) धा.–संपर्क येणें; स्पर्श करणें; मारणें; चुंबणें; घासणें.
(क) अ.–योग्य होऊन; योग्यता पावून.
(क) ना.–वंचना; असत्य.
—गार (ಗಾರ) (क) वि.–वंचक; फसव्या.
तगवे (ತಗವೆ) (क) ना.–प्रतिबंध; हरकत; संकट; अडचण; वेडेवाकडे;
तगहु (ತಗಹು) (क) ना.–हरकत; अडचण; संबंध वाढणारी रेषा; अनुकरण; परंपरा; ओळ; पंक्ति; आवरण.
तगळ्चु (ತಗಳ್ಚು) (क) धा.–भाजणें; जळणें; शिजणें; सोडणें; बंद करणें.
तगादे (ತಗಾದೆ) (अ. दे) ना.–तगादा; आग्रह; लकडा; पाठ पुरावा.
तगु (ತಗು) (क) धा.–योग्य होणें; कबूल करणें; जुळणें; लायक होणें.
तगुसि (ತಗುಸಿ) (क) ना.–संकोच, झीज; घट.
तगुळ् (ळु) (ತಗುಳ್ [ಳು]) (क) धा.–जवळ येणें; मिसळणें; एकजीव होणें; हटणें; मागें रेटणें; तंटा करणें; समाविष्टणें; आरंभणें; अंगावर पडणें; पालथे पडणें; ढकलणें; सोडणें.
तगुळिसु (ತಗುಳಿಸು) (क) धा.–मागें रेटणें; मागे ढकलणें; मागे घेववणें.
तगुळ्चु (ತಗುಳ್ಚು) (क) धा.–सोडणें; काढून टाकणें; समाविष्ट करणें; आरंभणें; उद्योगाला लावणें.
तगुळ्प (ळ्पु) (ತಗಳ್ಪ [ಳ್ಪು]) (क) ना.–जम; सारखेपणा; साम्य; समावेश.
तगुळुमुगुळु (ತಗಳುಮುಗುಳು) (क) धा.–जवळ येणें; उलटणें; थांबवणें.
तगे (ತಗೆ) (क) धा.–हरकत घेणें; विलंब लावणें.
(क) ना.–हरकत; विलंब; आडकाठी; विरोध.
तगेतगेव (ತಗೆತಗೆವ) (क) वि.–हरकत घेणारा; थांबवणारा; खंडण करणारा; प्रतिरोधक.
तगेमुगिल (ತಗೆಮುಗಿಲ) (क) ना.–आडवा येणारा मेघ; घनीभूत मेघमाला.
तग्गि (ತಗ್ಗಿ) (क) अ.–वाकून; ओणवून; लवून.
(क) ना.–जयंतीवृक्ष; एक धान्य; मुलेंचोरी; मुलें पळवणें.
तग्गु (ತಗ್ಗು) (क) धा.–वाकणें; उतरणें; कमी होणें; रोडणें; खालच्या थराला येणें; अवनति होणें; नम्र होणें; किंमत कमी होणें.
(क) ना.–हीनता; अवनति; विनाश; विकलता; महागाई; अडचण; अभाव; खड्डा; खळगा.
तङ (ತಙ) (क) अ.–क वर्गाचा अनुनासिकाशी संयोग होतांना ङकार होणें.
तंक (ತಂಕ) (क) ना.–'टंक' पहा.
तंगदिर् (रु) (ತಂಗದಿರ್ [ರು]) (क) ना.–शीतकरण; हिमकरण; थंड करणें.
तंगदिर (ತಂಗದಿರ) (क) ना.–चंद्र; शीत किरण; चंद्रमा.
तंगदिर् कल्लु (ತಂಗದಿರ್ಕಲ್ಲು) (क) ना.–चंद्रकांत; अमृतशिला; दुग्धमणि; स्फटिक.
तंगदिर्वक्कि (ತಂಗದಿರ್ವಕ್ಕಿ) (क) ना.–चकोर.
तंगाळि (ತಂಗಾಳಿ) (क) ना.–थंड हवा.
तंगु (ತಂಗು) (क) धा.–उतरणें; बिऱ्हाड करणें; मुक्काम करणें; थांबणें.

तंगु (गू) लु (ತಂಗು [ಗೂ]ಳು) (क) ना. – शीत आहार; शिळेंपाकें खाणें.

तंगे (गि) (ತಂಗೆ [ಗಿ]) (क) ना. – लहान बहीण; पाठची बहीण.

तंगोळ (ತಂಗೊಳ) (क) ना. – शांत सरोवर.

तच्चण (ತಚ್ಚಣ) (क) अ. – तत्क्षणीं; लागलीच; ताबडतोब.

तजवीज (ತಜವೀಜ) (अ. दे.) ना. – व्यवस्था; उपचार; उपाय; शोध; ठराव; प्रस्ताव.

तज्ज (ತಜ್ಜ)(सं) वि. – तद्भव; त्यापासून झालेलें; त्यामुळें झालेलें.

तज्ञ (ತಜ್ಞ) (सं) ना. – ज्ञानी; विद्वान पंडित; अनुभविक; खोल अभ्यासु; माहीतगार; जाणकार.

तट (ತಟ) (सं) ना. – काठ; तीर; प्राणांतिकता; कड; शेवट; अभाव; असमर्थता; असमग्रता; अडचण; असत्य; तांत्रिकता; क्षेत्र; आकाश; उतरण.

तटकु (ತಟಕು) (क) धा. – ठिबकणें; थेंबथेंबणें; थेंबथेंब पडणें.
(क) ना. – थेंब; ठिपका; थानाची बोंडी.
(क) वि. – थोडकें; अल्प; लहान.
—इक्कु (ಇಕ್ಕು) (क) धा. – सारखें गळणें; ठिबकणें.

तटक्कने (ತಟಕ್ಕನೆ) (क) अ. – थेंबेंथेंबें; ठिबकून; लौकर; लागलीच.

तटगुट्टु (ತಟಗುಟ್ಟು) (क) धा. – थेंबाथेंबानें गळणें; संतत धार धरणें; हातोड्यानें बडवणें; भटकणें.

तटस्थ (ತಟಸ್ಥ) (सं) वि. – बाजूला राहणारा; उदासीन; संबंध नसलेला; तिन्हाइतवृत्तीचा; सहेतुक मौन पाळणारा.

तटस्थ–इके (ತಟಸ್ಥ–ಇಕೆ) (क) ना. – तटस्थता; मौन; उदासीनता.
—ते (ತೆ) (सं) ना. – तटस्थता.

तटाक (ತಟಾಕ) (सं) ना. – तडाग; तीर्थ; सरोवर; तळें.

तटाय् (यु) (ತಟಾಯ್ [ಯು]) (क) धा. – पार होणें; तीर गाठणें; पैलतीरीं पोचणें.

तटायिसु (ತಟಾಯಿಸು) (क) धा. – पार करणें; तड लावणें; संपविणें.

तटि (टी) (ತಟಿ[ಟೀ]) (सं) ना. – 'तट' पहा.

तटित् (त्तु) (ತಟಿತ್ [ತ್ತು]) (सं) ना. – विद्युत; वीज; तडित.

तटिनि (नी) (ತಟಿನಿ [ನೀ]) (सं) ना. – नदी.

तटिल्लते (ತಟಿಲ್ಲತೆ) (सं) ना. – विद्युल्लता; वीज.

तट्ट (ತಟ್ಟ) (क) ना. – चपटेपणा; पातळपणा; सपाटी; समपातळी.

तट्टने (ತಟ್ಟನೆ) (क) अ. – लागलीच; अविलंबे करून.

तट्टिय (ತಟ್ಟಿಯ) (क) वि. – चपटे; निरुत्साही; अशक्त; निर्बल.

तट्टि (ತಟ್ಟಿ) (क) अ. – बडवून; कुटून; ठोकून.
(क) ना. – आडोसा; वई; कूड; चटई; एक जाळें; ताटी.

तट्टु (ತಟ್ಟು) (क) धा. – ठोक देणें; थापटणें; स्पर्शणें; जवळ येणें; रस्त्यांत येणें; पाठ थोपटणें; टाळी वाजवणें; दार ठोठावणें; मागें सारणें; वाजवणें.
(क) ना. – मार; स्पर्श; टाळी; दुर्दैवाचा टोला; पीडा; चपटी वस्तु; समूह; पक्ष; दिशा; पोतें; तट्टु.

तट्टे (ತಟ್ಟೆ) (क) ना. – ताट; तवा; घाट; रुंदी; सपाटता.

तड (ತಡ) (क) धा. – विलंब लावणें; निरीक्षणें; सहन करणें.
(क) ना. – उशीर; विलंब; भ्रम; अडचण; टोला; भीती; सावधपणा; अनुरूपता.
—केय (ಕೆಯ) (क) धा. – आलिंगणें; अठीमिठी घालणें; वाकडें पाऊल टाकणें; तोल जाणें; हुडकणें.
—मे (ಮೆ) (क) ना. – दिंडीदरवाजा; फाटक; मागीलदार.

तडकस (ತಡಕಸ) (क) ना. – उपद्रव; अडचण; मार; ज़खम; दुखणें.

तडकु (ತಡಕು) (क) धा. – हुडकणें; निवडणें; हात फिरवणें; चकणें पाहाणें; काणे पाहणें.

तडकबेलि (ತಡಕಬೇಲಿ) (क) ना. – उंचउडीची चौकट; उंच उडीचें साधन.

तडगस (ತಡಗಸ (क) ना. – 'तडकस' पहा.

तडंगाल (ತಡಂಗಾಲ) (क) ना. – कार्यहानी; कामातील व्यत्यय; आडकांठी.
—होडे (ಹೊಡೆ) (क) धा. – पायांत पाय घालणें; व्यत्यय आणणें; काम बिघडणें; काम बिघडविणें.

तडप } (ತಡಪ) (क) ना. – विलंब; धिमेपणा.
तडेप } (ತಡೆಪ)(अ.दे) ना. तडफडाट; कपड्याची घडी.

तड (डे) पु (ತಡ) [ಡೆ] (ಪು) (क) ना. – अडचण; हरकत; विलंब.

तडंबड (ತಡಂಬಡ) (क) ना. – घाबरेपणा; कासावीस; निराधार शोध.

तडवरिसु (ತಡವರಿಸು) (क) धा. – अंगावरून हात फिरवणें; उत्तेजन देणें; समाधान मानणें; झोला जाणें; चाचपडणें; बोबडे बोलणें.

तडवु (ತಡವು) (क) धा. – थांबविणें; हरकत घेणें; विरोध करणें; विलंब करणें; उत्तेजिणें; पायानें उकरणें.

तडवे (ತಡವೆ) (क) अ. – एकदां; एक वेळ; कारणानें; बाबतींत.

तडसलु (ತಡಸಲು) (क) ना. – प्रपात; धबधबा; 'जोगु' पहा.

तडाक (ग) (ತಡಾಕ [ಗ]) (सं) ना – 'तटाक' पहा.

तडि (ತಡಿ) (क) ना. – 'तटि' पहा.
(अ. दे) ना. – खोगीर; बैठकीची गादी.

तडिके (ತಡಿಕೆ) (क) ना. – 'तट्टि' पहा.

तडित् (ತಡಿತ್) (सं) ना. – 'तटित्' पहा.

**तडे** (ತಡೆ) (क) धा.–'तड' पहा.
—**कट्टु** (ಕಟ್ಟು) (क) धा.–थांबवणें; हरकत घेणें; बांध घालणें.
—**कालु** (ಕಾಲು) (क) ना.–'तडंगाल' पहा.
—**केडे** (ಕೆಡೆ) (क) धा.–तोंडघशी पडणें
—**त** (ತ) (क) ना.–उशीर; विलंब; सहनशीलता.
**तण्** (ತಣ್) (क) धा.–थंड होणें.
**तणलु** (ತಣಲು) (क) ना.–निखारा; इंगळ; विस्तव.
**तणसु** | **तण्णसु** (ತಣಸು) (ತಣ್ಣಸು) (क) ना.–थंडपणा; गारवा, जमिनीची ओल; शीतलपणा.
**तणि** (ತಣಿ) (क) धा.–तृप्ति पावणें; थंड वाटणें; शीतल होणें.
(क) ना.–लाज; लज्जा.
**तणिगे** (ತಣಿಗೆ) (क) ना.–काठाचें उथळ भांडें; परात; थाळी.
**तणिपु** (ತಣಿಪು) (क) धा.–तृप्ति पावणें; समाधान होणें; थंडावणें.
(क) ना.–तृप्ति; समाधान; तर्पण.
**तणिवु** (ತಣಿವು) (क) ना.–तृप्ति, 'तणिपु' पहा.
**तणिसु** (ತಣಿಸು) (क) धा.–तृप्ति पावणें; समाधान करणें; निववणें; थंड करणें.
(क) ना.–तृप्ति; समाधान.
**तण्गदिर** (ತಣ್ಗದಿರ) (क) ना.–'तंगदिर' पहा.
**तण्णदिर** (ತಣ್ಣದಿರ) —**अन्वय** (ಅನ್ವಯ) (क) ना.–चंद्रवंश; सोमवंश; यादववंश; पांडववंश.
**तण्गदिर्वक्कि** (ತಣ್ಣದಿರ್ವಕ್ಕಿ) (क) ना.–चकोर पक्षी; 'तंगदिरवक्कि' पहा.
**तण्गदिराडि** (ತಣ್ಗದಿರಾಡಿ) (क) ना.–चकोर.
**तण्गल्** (ತಣ್ಗಲ್) (क) ना.–चंद्रप्रकाश; चांदणें; अमृतशिला; दुग्धमणि.
**तण्जोडर** (ತಣ್ಜೊಡರ) (क) ना.–नंदादीप; शांत दिवा; मालवलेला दिवा.
**तंटे** (ತಂಟೆ) (क) ना.–संबंध; भांडण; मतभेद.
—**आठ** (ಆಟ) (क) ना.–भांडखोरपणा; वांडपणा.
—**गा** (**का**) **र** (ಗಾ [ಕಾ]ರ) (क) वि.–भांडखोर; उपद्रवी; वाद करणारा.
**तंड** (ತಂಡ) (क) ना.–समूह; पक्ष; ढीग; समाज; दल; श्रेणि.
—**उपतंड** (ಉಪತಂಡ) (क) ना.–पक्षोपपक्ष; लहानमोठे ढीग.
**तंडक** (ತಂಡಕ) (क) ना.–सिद्धता; शृंगार; इंद्रजालिक; जादुगार; कपट; झाडाचा बुंधा; कांडें; पेर.
**तंडकार** (ತಂಡಕಾರ) (क) ना.–धनिक; कांठावरचा; तटस्थ.
**तंडवाळ** (ತಂಡವಾಳ) (क) ना.–बीड; पोलाद; मिश्रलोह.
**तंडस** (**सि**) (**सु**) (ತಂಡಸ [ಸಿ][ಸು]) (क) ना.–चिमटा; सांडस.
**तंडु** (ತಂಡು) (क) ना.–काठी; सोटा; मुद्गल; शिवाचा द्वारपाल; सैन्य.
**तंडुल** (ತಂಡುಲ) (सं) ना.–तांदूळ; वनस्पति सत्त्व.
—**प्रक्षाल** (ಪ್ರಕ್ಷಾಲ) (सं) ना.–तांदूळ-धुवण.
**तंडुलीय** (**यक**) (ತಂಡುಲೀಯ) (ತಂಡುಲೀಯಕ) (सं) ना.–तांदुळजा; तांदळीची भाजी.
**तंडे** (ತಂಡೆ) (क) ना.–साखळ्यावाळे; पैंजण; लमाण स्त्रीसमूह.
**तंडेल्** (ತಂಡೇಲ್) (क) ना.–तांडेल; कप्तान.
**तण्ण** (**ण्णगे**) (ತಣ್ಣ [ಣ್ಣಗೆ]) (क) अ.–शांतपणें; मुकाट्यानें; आरोग्य कारकतेनें, काम संपवून; दिवा मालवून–शांत करून.
**तण्णस** (**सु**) (ತಣ್ಣಸ [ಸು]) (क) वि.–शांत; थंड.
(क) ना.–शांतपणा; थंडावा; गारवा; थंडपणा.
**तण्णितु** (**त्तु**) (ತಣ್ಣಿತು [ತ್ತು] (क) ना.–शांति; गारपणा; धिमेपणा.
**तण्णिदं** (ತಣ್ಣಿದಂ) (क) वि.–थंड झालेला; शांत झालेला.
**तण्णिदे** (ತಣ್ಣಿದೆ) (क) वि.–थंड; शीतल; गार.
**तंण्णेरल्** (**लर्**) (ತಣ್ಣೆರಲ್ [ಲರ್]) (क) ना.–गार वारा; थंड हवा; शीत वायु.
**तण्णेळल्** (ತಣ್ಣೆಳಲ್) (क) ना.–थंड सावली; शीतल छाया.
**तण्णु** (ತಣ್ಣು) **तण्पु** (ತಣ್ಪು) (क) ना.–गारवा; शीतलता.
—**पडे** (ಪಡೆ)(क) धा.–गारवा येणें.
—**बीरु** (ಬೀರು) (क) ना.–गारपाणी; गारवा.
**तण्बनि** (ತಣ್ಬನಿ) (क) ना.–गारपाणी; शीतळजल; पावसाचे थेंब.
**तण्बिसिल्** (ತಣ್ಬಿಸಿಲು) (क) ना.–उतरलेलें ऊन्ह; माघांतील उन्ह.
**तण्बु** (**ण्पु**) **ळि** (ತಣ್ಬು [ಣ್ಪು]ಳಿ) (क) ना.–निवालेलें सांबारें.
**तण्बु** (**ण्पु**) **ळिल्** (ತಣ್ಬು [ಣ್ಪು]ಳಿಲ್) (क) ना.–थंड वाळु; शीत पुष्प.
**तण्बे** (**तंबे**) **ळगु** (ತಣ್ಬೆಳಗು) (ತಂಬೆಳಗು) (क) ना.–गार चांदणे; शांत प्रकाश.
**तण्मले** (ತಣ್ಮಲೆ) (क) धा.–आवरणें; व्यापणें; गुंडाळणें; लपेटणें.
**तण्वण** (ತಣ್ವಣ) (क) ना.–वीणेचा सौम्य रव.
**तत्** (ತತ್) (सं) ना.–तें हें.
**ततः** (ತತಃ) (सं) वि.–विस्तृत; विस्तारलेलें; वाढलेलें; ओढून आणलेलें. (क) ना.–तंतुवाद्य.

**ततस्** (तः) (ತತಸ್ [ತಃ]) (सं) अ.–अर्थात्; त्यामुळें; त्यासाठीं; त्यानंतर.

**तति** (ತತಿ) (सं) ना.–हंगाम; ओळ; समूह; ढीग; अधिकचा; एक याग.

**तत्काल** (ತತ್ಕಾಲ) (सं) अ.–लागलीच; समयानुसार; जवळचा काळ.

**तत्क्षण** (ತತ್ಕ್ಷಣ) (सं) अ.–लागलीच; वेळेवर; समयानुकूल.

**तत्त** (ತತ್ತ) (क) ना.–तथ्य; सत्य; यथार्थ; रहस्य; आशय; आदर. (क) वि.–मिळवलेलें; संबंधित.

**तत्तकार** (ತತ್ತಕಾರ) (क) ना.–सत्यसंध; सत्यसंधान; सत्यवादि.

**तत्तनंदन** (ತತ್ತನಂದನ) (सं) ना.–सहजप्राप्त पुत्र; औरस पुत्र.

**तत्तर** (ತತ್ತರ) (क) ना.–थरकाप; भीति; धमकी; पीछेहाट; कळवळा; आतुरता; घाबरेपणा.

**तत्तरि** (ತತ್ತರಿ) (क) धा.–कातरणें.
(क) ना.–कळवळा; आतुरता; कंप; घाबरटपणा.

**तत्तरिसु** (ತತ್ತರಿಸು) (क) धा.–घाबरणें; थरथरणें; कापणें; कळवळणें.

**तत्तरिदरि** (ತತ್ತರಿದರಿ) (क) धा.–तुकडे तुकडे करणें.

**तत्तळ** (ತತ್ತಳ) (क) ना.–भीति; कळकळ; घाबरेपणा; भय.
—**अंकोल** (ಅಂಕೊಳ) (क) धा.–घाबरे होणें; हातपाय गाळणें; भय वाटणें; तिरपिट होणें.

**तत्ति** (ತತ್ತಿ) (क) ना.–अंडें; गोल वस्तु; सोपा; आवर्तन; प्रदक्षिणा.

**तत्तु** (ತತ್ತು) (क) धा.–प्राप्त होणें; आस्तित्त्वात येणें; संभवणें.

**तत्तु** (ತತ್ತು) (क) ना.–विपत्ति; संकट; नाश; दुर्दैव; विलंब.

**तत्तुक** (ತತ್ತುಕ) (क) ना.–नाळ कापलेलें मूल; अर्भक; कोवळें मूल.

**तत्त्व** (ತತ್ತ್ವ) (सं) ना.–आविर्भाव; स्वरूप; निजस्थिति; परमात्मा; सत्यसिद्धांत; चित्त.
—**ज्ञ** (ಜ್ಞ) (सं) ना.–सत्यज्ञानी; साक्षात्कारी.
—**ज्ञान** (ಜ್ಞಾನ) (सं) ना.–ब्रह्मज्ञान; वास्तव जाणीव.

**तत्त्वमसि** (ತತ್ತ್ವಮಸಿ) (सं) ना.–तूंच तो परमात्मा आहेस (तत् त्वं असि), अद्वैत वेदांताचें परमार्थ वाक्य.

**तत्त्वालोक** (ತತ್ತ್ವಾಲೋಕ) (सं) ना.–तात्त्विक दृष्टि; सत्य शोधनाची दृष्टि.

**तत्पर** (ತತ್ಪರ) (सं) वि.–त्यांतच रमलेला; एकामधेंच आसक्त; एकनिष्ठ; त्यानंतरचें.
—**ते** (ता) (ತೆ [ತಾ]) (सं) ना.–एकनिष्ठता; एकासक्ति.

**तत्परं** (ತತ್ಪರಂ) (सं) अ.–त्यानंतर; त्याला लागून.

**तत्परायण** (ತತ್ಪರಾಯಣ) (सं) वि.–'तत्पर' पहा.

**तत्पुरुष** (ತತ್ಪುರುಷ) (सं) ना.–परम पुरुष; परमात्मा; शिवाचें एक मुख; राजपुरुष; एक संस्कृत समास.

**तत्पूर्वं** (ತತ್ಪೂರ್ವಂ) (सं) अ.–प्राचीनकालीन; तत्पूर्वीचें; पुरातन; मागील काळचें.

**तत्र** (ತತ್ರ) (सं) अ.–तेथें; त्यांत; म्हणून; त्यानंतर.

**तत्रापि** (ತತ್ರಾಪಿ) (सं) अ.–तेथें सुद्धा; तथापि; असें असूनहि.

**तत्सम** (ತತ್ಸಮ) (सं) वि.–कन्नडमध्यें आलेले वापरातील संस्कृत शब्द; त्या सारखे शब्द.

**तथा** (ತಥಾ) (सं) अ.–त्याप्रमाणें; त्याच रीतीनें; निश्चयेकरून.

**तथागत** (ತಥಾಗತ) (सं) ना.–त्या स्थितींत असलेला; बुद्ध देव; निजस्वामी, गुरु.

**तथास्तु** (ತಥಾಸ್ತು) (सं) अ.–ठीक! तसेंच होवो. स्वीकार-सूचक अव्यय.

**तथ्य** (ತಥ್ಯ) (सं) ना.–सत्य; यथार्थ.
—**मिथ्य** (ಮಿಥ್ಯ) (सं) ना.–सत्यासत्य.

**तद्** (ತದ್) (सं) ना.–'तत्' पहा.

**तदकु** (ತದಕು) (क) धा.–मारणें; धोपटणें; अंग मऊ करणें; शरीर तिंबणें.

**तदगिणि** (नि) (ತದಗಿಣಿ [ನಿ]) (क) ना.–नृत्यांतील एक गति.

**तदनंतरं** (ತದನಂತರಂ) (सं) अ.–त्यानंतर; मग; एवढें होतांच; एवढें झाल्यावर.

**तदलु** (ತದಲು) (क) ना.–काटेरी कुंपण; ताटी; स्थिरता; स्थाइत्त्व; दिंडी; तडा.

**तदा** (ತದಾ) (सं) ना.–नंतर; त्यावेळीं; तेव्हां.

**तदात्मते** (ತದಾತ್ಮತೆ) (सं) ना.–तादात्म्य; एकनिष्ठता; एकासक्ति.

**तदानीं** (ತದಾನೀಂ) (सं) अ.–त्यावेळीं; त्याकाळीं; तेव्हां.

**तदारभ्य** (ತದಾರಭ್ಯ) (सं) अ.–तेव्हांपासून; त्याकाळापासून.

**तदिगे** (ತದಿಗೆ) (क) ना.–तृतीया; पंधरवड्यांतील तिसरी तिथी.

**तदीय** (ತದೀಯ) (सं) वि.–त्यासंबंधी; त्याचें; तिचें.

**तदुकु** (दिकु) (ತದುಕು [ದಿಕು]) (क) धा.–'तदकु' पहा.

**तदे** (ತದೆ) (क) धा.–हड्डी नरम करणें; नाश करणें; 'तगलु' पहा.

**तद्गत** (ತದ್ಗತ) (सं) वि.–त्यांतलें; तत्पर; अंतस्थ; एकनिष्ठ; एकासक्त; तद्गुण.

**तद्गुण** (ತದ್ಗುಣ) (सं) ना.–तो गुण असलेला; एक काव्यालंकार.

**तद्दु** (ತದ್ದು) (क) ना.–एक चर्मरोग; वाळली खरूज; घट्टा; दद्रु.

**तद्दिन** (ತದ್ದಿನ) (सं) अ.–त्या दिवशीं; रोजरोज; (सं) ना. श्राद्ध; मृताची उत्तरक्रिया.

**तद्भव** (ತದ್ಭವ) (सं) वि. – त्यापासून उत्पन्न झालेलें; त्यांतून जन्मलेलें; संस्कृत शब्दांचें कानडी वापरांतील रूप.

**तद्भाव** (ತದ್ಭಾವ) (सं) ना. – त्याची स्थिति; तो गुण; सारांश; वस्तुस्वभाव; समानता.

**तद्यम** (ತದ್ಯಮ) (सं) ना. – विनय; सभ्यता; मार्दव; शांतगुण.

**तद्वत्** (ತದ್ವತ್) (सं) अ. – त्याप्रमाणें; तसेच.

**तन्** (ತನ್) (सं) ना. – स्वतः; आपण.

**तनक** (ತನಕ) (क) अ. – पर्यंत; पावेतों; वेरी.

**तनतु** (**नत्तु**) (ತನತು [ನತ್ತು]) (क) ना. – आपलें; त्याचें
**तन्नतु** (ತನ್ನತು) स्वतःचें; स्वतःचें.

**तनय** (ತನಯ) (सं) ना. – पुत्र; कुमार; मुलगा.

**तनये** (ತನಯೆ) (सं) ना. – पुत्री; कन्या; मुलगी.

**तनि** (ತನಿ) (क) वि. – लाल; पक्व; पूर्ण वाढीचा; समृद्ध; संपन्न; मनोहर; उज्ज्वल; केवल; बलिष्ठ.

**तनिगंध** (**पु**) (ತನಿಗಂಧ [ಪು]) (क) ना. – सुवास; मधुरवास.

**तनिगब्बुं** (**ब्बुं**) (ತನಿಗಬ್ಬು [ಬ್ಬು]) (क) ना. – गोड ऊस; रसदार ऊस.

**तनिगिडि** (**गेंड**) (ತನಿಗಿಡಿ [ಗೆಂಡ]) (क) ना. – निखारा; प्रज्वलित इंगळ.

**तनिगुदि** (ತನಿಗುದಿ) (क) वि. – पूर्णपक्व; पूर्ण शिजलेलें.

**तनिगेदरु** (ತನಿಗೆದರು) (क) धा. – विस्तारणें; बेसुमार वाढणें.

**तनियेरे** (ತನಿಯೆರೆ) (क) धा. – गारठण्या इतके भिजणें; अभिषेक करणें; भिजत घालणें.

**तनिरस** (ತನಿರಸ) (क) ना. – मधुरस; मध; अमृत.

**तनिव** (**प**) **ण्** (ತನಿವ [ಪ] ಣ್) (क) ना. – पक्व फळ; कुजलेलें फळ; गोड फळ.

**तनिवा** (**पा**) **ल्** (ತನಿವಾ [ಪಾ] ಲ್) (क) ना. – निरसें दूध; अकडी दूध; धारोष्ण दूध.

**तनिवे** (**बे**) **ळगु** (ತನಿವೆ [ಬೆ] ಳಗು) (क) ना. – पहाट; कांती; तेज.

**तनिसोबगु** (ತನಿಸೊಬಗು) (क) ना. – अति सौंदर्य; सुंदर मुखकांती; चांगुलपणा.

**तनिहरके** (ತನಿಹರಕೆ) (क) ना. – शुभाकांक्षा; उत्तम वर.

**तनु** (ತನು) (सं) वि. – लहान; कृश; छळकाटा; सूक्ष्म; कोवळा; थंड. (सं) ना. – देह; शरीर; चर्म; थंडपणा.

—**कंपु** (ಕಂಪು) (क) ना. – अंगसुगंध.

—**केडु** (ಕೆಡು) (क) धा. – अंगहीन होणें; आजारी पडणें.

—**भवे**—**जे** (ಭವೆ,–ಜೆ) (सं) ना. – कन्या; कुमारी; मुलगी; पुत्री.

**तनुत्र** (**त्राण**) (ತನುತ್ರ [ತ್ರಾಣ]) (सं) ना. – कवच; चिलखत.

**तनुत्व** (ತನುತ್ವ) (सं) ना. – लहानपणा; क्षुद्रता; थोटकेपण.

**तनुपत्र** (ತನುಪತ್ರ) (सं) ना. – 'इंगुदि' पहा; 'इंगुळ' पहा.

**तनुरुह** (ತನುರುಹ) (सं) ना. – केस; रोम; रोमांच.

**तनू** (ತನೂ) (सं) ना. – 'तनु' पहा.

**तनूकरण** (ತನೂಕರಣ) (सं) ना. – लघुकरण; कृश होणें; मेद झडणें.

**तनूकृत** (ತನೂಕೃತ) (सं) वि. – बारीक केलेला; कृश केलेला.

**तनूज** (**भव**) (ತನೂಜ [ಭವ]) (सं) ना. – पुत्र; कुमार; मुलगा.

**तनूदरि** (**री**) (ತನೂದರಿ [ರೀ]) (सं) ना. – कृशोदरी; शुभांगी; कोमला.

**तनूनपात्** (ತನೂನಪಾತ್) (सं) ना. – औरसपुत्र; वारसदार; अग्नि.

**तनूरुह** (ತನೂರುಹ) (सं) ना. – 'तनुरुह' पहा.

**तंति** (ತಂತಿ) (क) ना. – तार; तंत्री; सरि.

—**वाद्य** (ವಾದ್ಯ) (सं) ना. – तंतुवाद्य; वीणा; तंबोरा.

**तंतु** (ತಂತು) (सं) ना. – धागा; सूत; दोरा; पाळी; शिशु; तंत्र; पाण्यांतील प्राणी; सुसर.

—**करण** (ಕರಣ) (क) ना. – सूतकताई; दोरवळण.

—**गार** (ಗಾರ) (क) वि. – कपटी; वंचक; युक्तिवान.

—**नाभ** (ನಾಭ) (सं) ना. – कोळी; कोष्टी.

—**पट** (ಪಟ) (सं) ना. – सुती वस्त्र; कापसाचें कापड.

—**वाय** (ವಾಯ) (क) ना. – विणकर; कोष्टी; माग; विणाई.

**तंतुकीट** (ತಂತುಕೀಟ) (सं) ना. – रेशीम किडा.

**तंतुर** (ತಂತುರ) (क) ना. – तंत्र; सुतीवस्त्र; कमळाचा देठ; युक्ति; कपट; वंचना.

**तंत्र** (ತಂತ್ರ) (सं) ना. – 'तंतुवाय' पहा. धार्मिक विधान; सांगता; झांकण; परिधान; युक्ति; पद्धति; उपदेश; उपाय; शृंगार; रहस्यविद्या; इंद्रजाल; औषध; ठक; प्रतिज्ञा; शाप; शासन; सेना; क्रम; सत्यतत्त्व; जातिभेद; कुलभेद; परमार्थ; निश्चय.

—**गार** (ಗಾರ) (क) ना. – ठक; लुच्चा; युक्तिबाज; वंचक.

**तंत्राध्यक्ष** (ತಂತ್ರಾಧ್ಯಕ್ಷ) (सं) ना. – पुरोहित; आचार्य; उपाध्याय.

**तंत्रि** (**त्री**) (ತಂತ್ರಿ [ತ್ರೀ]) (सं) ना. – धागा; सूत; पूजारी; उपाय योजणारा; सिद्धांत.

**तंदल्** (ತಂದಲ್) (क) ना. – पाण्याचे थेंब; पाऊस; पावसाची भुरभूर; सर; वृष्टि.

**तंदूरिसु** (ತಂದೂರಿಸು) (क) धा. – चिंता करणें; दुःख करणें.

**तंदे** (ತಂದೆ) (क) ना. – तात; पिता; जनक; बाप; वडील.

**तंदेवादि** (ತಂದೆವಾದಿ) (क) ना. – पित्याकडील नातेवाईक.

**तंदेविर्** (ತಂದೆವಿರ್) (क) ना. – 'तंदे'चे अनेकवचन,
**तंदेगळु** (ತಂದೆಗಳು) वडीलधारी माणसें.

**तंद्र** (ತಂದ್ರ) (सं) वि.–थकलेला; दमलेला; वापरलेला; आळशी; सुस्त; मेंगळा.
**तंद्रि (द्री)** (ತಂದ್ರಿ [ದ್ರೀ]) (सं) ना.–थकवा; पेंग; डुलकी; आयास; आसक्ति; वापर; भंपकपणा.
**तंद्रालु** (ತಂದ್ರಾಲು) (सं) वि.–सुस्त; पेंगणारा; आळशी; झोपाळु.
**तन्नन्नं** (ತನ್ನನ್ನಂ) (सं) वि.–आपल्यासारख्या.
**तन्नळ्** (ತನ್ನಳ್) (क) ना.–सौभाग्यवति; पत्नि; स्वतःची स्त्री.
**तन्नि** (ತನ್ನಿ) (क) वि.–आण; आणावे; 'तरु'चा आज्ञार्थ.
**तन्मध्य (ध्ये)** (ತನ್ಮಧ್ಯ [ಧ್ಯೆ]) (सं) अ.–त्यांत; इतक्यांत; मध्येंच यापूर्वी; मध्यंतरी.
**तन्मय** (ತನ್ಮಯ) (सं) वि.–तद्रूप; तदाकार; आपल्या-आपल्यांत; एकरूप.
**तन्मात्र** (ತನ್ಮಾತ್ರ) (सं) ना.–तद्रूपता; मूळरूप; इंद्रियधर्म.
**तन्वि (न्वी)** (ತನ್ವಿ [ನ್ವೀ]) (सं) ना.–सडपातळ स्त्री; कोमला; मनोहारिणी; वयांत आलेली बाला.
**तप (पस्)** (ತಪ [ಪಸ್]) (सं) ना.–उष्णता; ग्रीष्म; जाळ; उन्हाळा; झळ; उष्मा; तपश्चर्या; देहदंडना; रवि; एक ग्रह.
**तपःप्रभाव** (ತಪಃಪ್ರಭಾವ) (सं) ना.–तपःसामर्थ्य; तपाची शक्ती.
**तपन** (ತಪನ) (सं) ना.–सूर्य; जलन; ताप; नरकाचा एक भाग; देव; मानसिक व्यथा; गरुडविरोधी दैत्य.
**—सुत** (ಸುತ) (सं) ना.–कर्ण; सुग्रीव; यम; शनि.
**तपनीय** (ತಪನೀಯ) (सं) वि.–तापवण्याला योग्य; सुवर्ण; सोनें.
**तपनी** (ತಪನೀ) (सं) ना.–गोदावरी नदी.
**तपशीलु** (ತಪಶೀಲು) (अ. दे) ना.–विवर; विस्तार; तपशील.
**तपश्चर्य** (ತಪಶ್ಚರ್ಯ) (सं) ना.–तप; योग; ध्यान; देहदंडन.
**तपसि (वसि)** } (ತಪಸಿ [ವಸಿ]) (सं) ना.–तपस्वी; मुनी;
**तप (व) सिग** } (ತಪ [ವು] ಸಿಗ) योगी; ऋषि; दीनदरिद्री.
**तपस्वि (स्विन्)** (ತಪಸ್ವಿ [ಸ್ವಿನ್]) (सं) ना.–'तपसि' पहा.
**तपस्विनि (नी)** (ತಪಸ್ವಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–तप करणारी.
**तपस्सु** (ತಪಸ್ಸು) (क) ना.–'तपस्' पहा.
**तपात्यय** (ತಪಾತ್ಯಯ) (सं) ना.–उन्हाळ्याचा शेवट आणि पावसाळ्याचा प्रारंभ यांचा संधिकाळ.
**तपासु (सणे)** (ತಪಾಸು [ಸಣೆ]) (अ. दे.) ना.–शोध; हुडकणें; चौकशी; तलास; विचारपूस.
**तपित** (ತಪಿತ) (सं) वि.–तापलेलें; जळतें; शिजलेलें.
**तपिसु** (ತಪಿಸು) (क) धा.–जळणें; पोळणें; चिंताग्रस्त होणें; मनस्ताप करणें; तपश्चर्या करणें.
**तपोधन** (ತಪೋಧನ) (सं) ना.–तप हेंच धन असणारा; योगी; मुनी; ऋषि.

**तपोनिधि** (ತಪೋನಿಧಿ) (सं) ना.–'तपोधन' पहा.
**तपोवन** (ತಪೋವನ) (सं) ना.–तप करण्यास योग्य असें एकांत वन.
**तप्त** (ತಪ್ತ) (सं) वि.–तापलेलें; भाजलेलें; जळतें; शिजलेलें.
**तप्पल् (लु)** (ತಪ್ಪಲ್ [ಲು]) (क) अ.–चूक करून; नासवून; बिघडवून.
(क) ना.–पालापाचोळा; समभूमी; सपाटी; पायथ्याचा प्रदेश; पर्वतशिखर; साल.
**तप्पु** (ತಪ್ಪು) (क) धा.–चूक करणें; बिघडवणें; घसरणें; च्युत होणें; गमावणें; प्राप्त न होणें.
(क) ना.–च्युति; प्रमाद; दोष; घसरगुंडी; गमावणूक; अनौचित्य; अडचण; वाकडेपणा; अपराध; पाप; स्खलन; त्याग.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.–चुकविणें; बिघडवणें; साध्य न होणें.
**—गंटु** (ಗಂಟು) (क) ना.–चुकामूक; न सुटणारी गांठ; नीति विरुद्ध वर्तन; बोलण्यांतील चूक.
**तप्पुदु** (ತಪ್ಪುದು) (क) क्रि.–आणलें पाहिजे. ('तपु' धातूचें रूप). संपलें; नाश पावलें.
**तबक** (ತಬಕ) (सं) ना.–समूह; ताटवा; ताट; पानसुपारीचें ताट.
**तबला (ले)** (ತಬಲಾ [ಲೆ]) (अ. दे) ना.–मृदंग; एक चर्मवाद्य.
**तब्बरिसु** (ತಬ್ಬರಿಸು) (क) धा.–घाबरणें; आश्चर्यचकित होणें; घाबरें होणें; वसरणें; लोळणें.
**तब्ब (ब्बि) लि** (ತಬ್ಬ [ಬ್ಬಿ] ಲಿ) (क) ना.–परदेशी; पोरका; अनाथ; नातेवाईक नसलेला; एकाकी.
**ताब्बिब्बु** (ತಬ್ಬಿಬ್ಬು) (क) ना.–धमकी; भीति; भ्रम; गोंधळ; गडबड; दिङ्मूढता; बेभानता.
**—आगु** (ಆಗು) (क) धा.–भीति दाखविणें; भ्रम होणें; बेभान करणें; भ्रमिष्ट करणें.
**तब्बु** (ತಬ್ಬು) (क) धा.–आलिंगणें; मिठी मारणें.
(क) ना.–विश्वास; वेग; वाव; मोळी.
**तम्** (ತಮ್) (क) ना.–'तंप्' शब्दाचा 'प' वर्गापूर्वी होणारा सामासिक आदेश.
**तम (मस्) (मस्सु)** (ತಮ) [ಮಸ್][ಮಸ್ಸು]) (सं) ना.–अंधार; रात्र; अज्ञान; दोष; कलंक; पाप; राहुग्रह; तमोगुण.
**—विडि** (ಪಿಡಿ) (क) धा.–अंधार होणें; रात्र होणें.
**तम** (ತಮ) (सं) प्र.–'सर्वाधिक' वाचक संस्कृत प्रत्यय.
**तमंग** (ತಮಂಗ) (सं) ना.–वेदिका; माळी; नाट्यरंगभूमी.
**तमक्षीर** (ತಮಕ್ಷೀರ) (सं) ना.–आंब्याचें पन्हें; कैरीची कढी.
**तमटे (तंमटे)** (ತಮಟೆ [ತಮ್ಮಟೆ]) (क) ना.–हलगी; टिमकी; चर्मवाद्य.

**तमत** (ತಮತ) (सं) वि.—इच्छित; इष्ट; आशाळभूत; भिकारी.
**तमतु** (**त्तु**) (ತಮತು [ತ್ತು]) (क) ना.—आपापलें; आपलें; तुमचें. 'तुमतु' पहा.
**तमन** (ತಮನ) (क) ना.—दमछाट; श्वासावरोध.
**तमंध** (ತಮಂಧ) (सं) ना.—अंधार; घोर तिमिर; घनांधकार.
**तमर्** (ತಮರ್) (क) ना.—आप्त; स्वकीय
—**ऊर्** (ಊರ್) (क) ना.—आपलें गांव; माहेर घर.
**तमसा** (ತಮಸಾ) (सं) ना.—एक नदी.
**तमस्विनी** (**नि**) (ತಮಸ್ವಿನೀ [ನಿ]) (सं) ना.—अंधार; काळोख.
**तमाकु** (ತಮಾಕು) (अ-दे) ना.—तंबाखु; तमाखू.
**तमाम** (ತಮಾಮು) (अ-दे) ना.—सर्व; पूर्ण; पुरा.
**तमाल** (ತಮಾಲ) (सं) ना.—वृक्षविशेष; काळ्या सालीचें झाड; मसाल्याचें झाड.
**तमाशा** (**शे**) (ತಮಾಶಾ [ಶೆ]) (अ-दे) ना.—मौज; नक्कल; विनोद; हास्य.
**तमालपत्र** (ತಮಾಲಪತ್ರ) (सं) ना.—तमालवृक्षाचें पान; कपाळावरील टिळा.
**तमालरेखे** (ತಮಾಲರೇಖೆ) (सं) ना.—'तमाल पत्र' पहा. कपाळावरील लांबट टिळा.
**तमि** (ತಮಿ) (सं) ना.—रात्र; अंधारी रात्र; अंधार.
**तमिस्त्र** (**स्त्रा**) (**स्त्रे**) (ತಮಿಸ್ರ [ಸ್ರಾ] ಸ್ರೆ) (सं) ना.—निबिड अंधार; घनांधकार; तिमिर.
**तमिळ** (ತಮಿಳ) (क) ना.—द्राविड; तामिळ देशाचा; तामिळभाषी.
**तमोगुण** (ತಮೋಗುಣ) (सं) ना.—सत्त्व, रज, तम, या त्रिगुणांतील शेवटचा गुण. काळा.
**तामोघ्न** (ತಮೋಘ್ನ (सं) ना.—तमाचा नाश करणारा; अंधार हारक सूर्य; चंद्र; अग्नि.
**तमोपह** (ತಮೋಪಹ) (सं) ना.—'तमोघ्न' पहा.
**तमोमणि** (ತಮೋಮಣಿ) (सं) ना.—खद्योत; काजवा; चंद्र.
**तमोमय** (ತಮೋಮಯ) (सं) वि.—अंधारमय; किर्र काळोख.
**तंपु** (ತಂಪು) (क) ना.—गारवा; शैत्य; ओल; शीतलता; शांति; तृप्ति; समाधान.
—**पडे** (ಪಡೆ) (क) धा.—थंडावणें; गारवा येणें; भिजणें; शांत होणें; तृप्ति होणें.
—**देर** (**रु**) (ಪೆರ [ರು]) (क) धा.—थंड होणें; समाधान करणें.
**तंबट** (**टे**) (ತಂಬಟ [ಟೆ]) (क) ना.—ढुमकी; एक चर्मवाद्य.
**तंबल** (**बुल**) (ತಂಬಲ [ಬುಲ]) (क) ना.—तांबूल; विडा; पानसुपारी; बाळमुखात चावून घातलेला विडा.

**तंबाक** (**कु**) (ತಂಬಾಕ [ಕು]) (क) ना.—तंबाखु; एक उत्तेजक वनस्पति.
**तंबिसु** (ತಂಬಿಸು) (क) धा.—थांबविणें; स्तंभित करणें; विलंब करणें; ओढून धरणें; आवरणें.
**तंबिट्टु** (ತಂಬಿಟ್ಟು) (क) ना.—तांदुळाच्या पिठाचे लाडू.
**तंबु** (ತಂಬು) (अ. दे) ना.—राहुटी; डेरा; गुडार; तात्पुरती वसती.
**तंबुलिग** (ತಂಬುಲಿಗ) (क) ना.—पानदान; विड्याचा डबा; विड्याचें तबक; पानसुपारी विकणारा; तांबोळी.
**तंबुळि** (ತಂಬುಳಿ) (क) ना.—चिंचेचें खार; चिंचेचें कालवण.
**तंबेळगु** (ತಂಬೆಳಗು) (क) ना.—थंड प्रकाश; चांदणें.
**तंबेळग** (ತಂಬೆಳಗ) (क) ना.—शीत किरण; चंद्र.
**तम्म** (ತಮ್ಮ) (क) ना.—धाकटा भाऊ; लहान मुलगा.
(सं) ना.—स्वतःसंबंधीं.
—**तु-त्तु** (ತು [ತ್ತು]) (क) वि.—आपले; स्वतःचे; तुमचे.
**तम्मट** (**टे**) (ತಮ್ಮಟ [ಟೆ]) (क) ना.—टिमकी; एक चर्मवाद्य.
**तम्मडि** (ತಮ್ಮಡಿ) (क) ना.—पूजारी; अर्चक; पादसेवक; स्वतःचें मन.
**तम्मुवं** (ತಮ್ಮುವಂ) (क) वि.—आपला ; तुमचा.
**तर्** (**रु**) (ತರ್ [ರು]) (क) धा. घेऊन येणें; विकत घेणें; मार्ग दाखविणें; प्राप्त करून घेणें.
**तर** (ತರ) (क) धा.—फिरविणें; कापणें; थरारणें.
(क) ना.—प्रकार; विध; रीति; क्रम; पद्धति; ओळ; परंपरा; औचित्य; पाया; आधार.
(सं) वि.—'तुलनेनें अधिक' दर्शक प्रत्यय.
**तरकलु** (ತರಕಲು) (क) ना.—खडबडीत जमीन; कठोरता; काठिण्य; चढउतार; (क) वि. मस्तखोर; माजुरी; माजलेला.
**तरकस** (ತರಕಸ) (क) ना.—एक आयुध; तलवार; खड्ग.
**तरकारि** (ತರಕಾರಿ) (अ. दे) ना.—भाजी; फळभाजी.
**तरक्षु** (ತರಕ್ಷು) (सं) ना.—चित्ता; वाघ; बिबळ्या वाघ; तरवारीची सोनेरी मूठ.
**तरगडे** (ತರಗಡೆ) (क) ना.—केरकचरा; निरुपयोगी वस्तु; हानी; उणीव; अभाव; अपहार; लुबाडणूक.
**तरगु** (ತರಗು) (क) ना.—पाचोळा; वाळलेले पान. ओबडधोबड; पणा; बुडवणी; हानी; अस्पृश्यता; अडत बट्टा; दलाली; उत्तेजनपर द्रव्य; ऋणको.
**तरं** (ತರಂ) (क) ना.—क्रम; योग्यता; सारखेपणा.
**तरंग** (ತರಂಗ) (सं) ना.—लाटा; लहर; वीचि; घोड्याची दुडकी चाल.
**तरंगिणि** (**णी**) (ಅರಂಗಿಣಿ (ಣೀ) (सं) ना.—नदी; ओढा; लाटा असलेला प्रवाह.

**तरंगित** (ತರಂಗಿತ) (सं) वि. – लाटा असलेले; लहरयुक्त; चंचल; लंबकासारखे हलणारे.

**तरजे** (ತರಜೆ) (क) ना. – एक घोड्याचा दागिना.

**तरट (ट्ट)** (ತರಟ [ಟ್ಟು]) (क) वि. – डोक्याला केस नसलेला; टक्कल पडलेला.

**तरण** (ತರಣ) (सं) ना. – नाव; होडगें; पैलपार; सुटका; त्राण; बल; शक्ति; संरक्षण.

**तरणि** (ತರಣಿ) (सं) ना. – सूर्य; होडी; नाव; पुढारीपण; काटेरी झाड; शेवंती; पोपट; राघु.

**––कांत** (ಕಾಂತ) (सं) ना. – सूर्यकांत मणि; स्फटिक.

**––ज** (ಜ) (सं) ना. – कर्ण; सुग्रीव; यम; शनि; वैवस्वत.

**तरणीय** (ತರಣೀಯು) (सं) वि. – पार होण्यास योग्य; परतीरीं जाण्यास सुलभ.

**तरत्** (ತರತ್) (सं) वि. – तरंगणारा; वेगानें पळणारा; पार होणारा; परतीरीं पोचणारा.

**तरतम** (ತರತರವು) (सं) वि. – थोडें अधिक; अल्पस्वल्प; न्यूनाधिक.

**––भाव** (ಭಾವ) (सं) ना. – उच्चनीचभाव; तारतम्य.

**तरतरिसु** (ತರತರಿಸು) (क) धा. – थरथरणें; कंप होणें; बावरणें; भय वाटणें; विलंब न होऊं देणें.

**तरपण्य** (ತರಪಣ್ಯ) (सं) ना. – नावाड्याला दिलेले पैसे; नावेचा कर; नाविकाचें भाडें; अंबीकाला दिलेले पैसे.

**तरपु** (ತರಪು) (क) ना. – कमी किमतीचे रत्न; पैलू पाडलेला खडा.

**तरबेंतु (पेंतु)** (ತರಬೇತು [ಪೇತು]) (अ. दे) ना. – शिक्षण; खाट; खोडाखोड.

**तरमु** (ತರಮು) (अ. दे) ना. – सरकारी फाळा; तरम आकार; सारा.

**तरल** (ತರಲ) (सं) वि. – चंचल;हलणारा; झोके खाणारा; हेलकावणारा; चपल; मनोहर; चकाकणारा; मिरवणारा.

(सं) ना. – प्रवाही; पुत्र; हारातील मध्य रत्न; मध्यमणी; छंदःशास्त्रांतील एक वृत्त.

**––अक्षि** (ಅಕ್ಷಿ) (सं) ना. – चंचलाक्षी; सुंदरी; कामिनी.

**––त्व (ते)** ತ್ವ (ತೆ) (सं) ना. – चकाकी; सौंदर्य; पोरकटपणा; झोला.

**तरलित** (ತರಲಿತ) (सं) वि. – चलित; प्रकाशमान; चकचकीत; हलते.

**तरले** (ತರಲೆ) (सं) ना. – तांदळाची गंजी; भाताची पेज; बाल.

(क) ना. – भांडण; तंटा; पीडा.

**तरवार् (रि)** (ತರವಾರ್ [ರಿ]) (क) ना. – खड्ग; कट्यार; पुष्कर.

**तरस्** (ತರಸ್) (सं) ना. – तीव्रता; वेग; शक्ति; सामर्थ्य.

**तरस** (ತರಸ) (सं) ना. – मांस; मांसाहार.

**तरसु** (ತರಸು) (क) वि. – ओबडधोबड; खडबडीत; कठिण; नापीक (जमीन); बिनपिकाऊ (जमीन).

**तरस्वि** (ತರಸ್ವಿ) (सं) वि. – चपल; वेगवान; सामर्थ्यवान.

(सं) ना. – वेग; वायु; गरुड.

**तरह** (ತರಹ) (अ.दे.) ना. – रीत; तऱ्हा; प्रकार; विध.

**तरहर** (ತರಹರ) (क) ना. – थांबणूक; संशयितता; मनःशांति; समाधान.

**––इसु** (ಇಸು) (क) धा. – टिकणें; शांत होणें; सहन करणें; प्रस्थापणें.

**––कोळ्ळु** (ಕೊಳ್ಳು) (क) धा. – सहन करणें; ‘तत्तरिसु’. पहा.

**तरहीन** (ತರಹೀನ) (क) ना. – वाईटपणा; रीतिहीनता; अनीतिमानता.

**तरळ** (ತರಳ) (सं) ना. – ‘तरल’ पहा. माणिक्य; तुळसी.

**––तन** (ತನ) (क) ना. – पोरकटपणा; बालभाव.

**––ता (त्व)** (ತಾ [ತ್ವ]) (सं) ना. – पोरकटपणा; बालिशता.

**तरळु** (ತರಳು) (क) ना. – पिकून वाळलेलें फळ; नारळ; श्रीफळ.

**तरळे** (ತರಳೆ) (सं) ना. – मुलगी; लहान वयाची पोर; चंचला.

(क) ना. – तक्रार; चहाडी. ‘तरले’ पहा.

**तरातुरि** (ತರಾತುರಿ) (अ.दे.) ना. – अत्यातुर; घाई; आवश्यकता.

**तरि** (ತರಿ) (सं) ना. – नाव; होडगी; जहाज; पाण्यातून पैल जाण्याचें साधन; घोटा; लाळी.

(क) धा. – कापणें; तुकडे करणें; चिमटणें; मिसळणें; निश्चय करणें.

(क) ना. – तुकडा; कण; वाळु; निश्चय; आवड; साम्य; सारखेपणा; सुंदरी; कोमला; वाळवंट; खांब; पडभूमि; सोटा.

**तरिमिंडि (डे)** (ತರಿಮಿಂಡಿ [ಡೆ]) (क) ना. – युवती; भरज्वानी; भर जवानी.

**तरिसंदु** (ತರಿಸಂದು) (क) अ. – निश्चयेंकरून; पूर्णपणें; उत्तम रीतीनें.

**तरिसल्** (ತರಿಸಲ್) (क) धा. – निश्चय करणें; निर्णय घेणें; माहीत करून घेणें.

**तरिसल** (ತರಿಸಲ) (क) ना. – निर्णय; निश्चय; दृढसंकल्प; प्रतिज्ञा.

**तरिसलवु** (ತರಿಸಲವು) (क) ना. – निष्कर्ष; सिद्धांत; निर्णय; ‘तरिसल’ पहा.

**तरिसु** (ತರಿಸು) (क) धा. – पैल जाणें; पार होणें; तरंगणें; पोहणें; आणविणें; जवळ आणणें.

**तरिळ** (ತರಿಳ) (क) ना.—पातळ; लहान; पातळ तुकडा; चकती; कण.

**तरिंचु** (ತರಿಂಚು) (क) धा.—आणविणें; जवळ करणें.
(क) ना.—कोरडी वाळू; तापलेली वाळू; वाळवंट.

**तरु** (ತರು) (सं) ना.—वृक्ष झाड.
(क) धा.—वेऊन येणें; जवळ नेणें; समाविष्ट करणें.
—ह (हु) (ಹ [ಹು]) (क) ना.—आनयन; उपनिवेश.
—वळि (ವಳಿ) (क) ना.—निमंत्रण.

**तरुण** (ತರುಣ) (सं) ना.—कोमल; नवा; मऊ; चांगला; कोवळा; जवान.

**तरुण** (ತರುಣ) (सं) ना.—युवक; जवान; वयात आलेला.

**तरुणशशि** (ತರುಣಶಶಿ) (सं) ना.—बालचंद्र; अर्धचंद्र.

**तरुणातप** (ತರುಣಾತಪ) (सं) ना.—कोवळें ऊन; सकाळचें ऊन्ह.

**तरुणि** (ತರುಣಿ) (सं) ना.—युवति; वयात आलेली; जाणती; न्हाणवली; पदर आलेली.

**तरुणिम (मा)** (ತರುಣಿಮ [ಮಾ]) (सं) ना.—यौवन; तारुण्य.

**तरुणेंदुधर** (ತರುಣೇಂದುಧರ) (सं) ना.—भालचंद्र; शिव.

**तरुबु (रुंबु)** (ತರುಬು [ರುಂಬು]) (क) धा.—हरकत घेणें; थांबविणें; विलंब करणें; विरोध करणें.

**तरुरुह** (ತರುರುಹ) (सं) ना.—बांडगुळ; ऋणतरु; कलम; उपतरू.

**तरुलते** (ತರುಲತೆ) (सं) ना.—झाड; वेली.

**तरुवलि** (ತರುವಲಿ) (क) ना.—बालक; मुलगा; मुलगी;
—तन (ತನ) (क) ना.—पोरकटपणा; बालिशता; शैशव; बालत्व; चांचल्य; पोराटकी.

**तरुवायिं** (ತರುವಾಯಿಂ) (क) अ.—क्रमानें; अनुक्रमें; त्यानंतर.

**तरुषंड** (ತರುಷಂಡ) (सं) ना.—बाग; राई; झाडी.

**तरुसार** (ತರುಸಾರ) (सं) ना.—डिंक; झाडाचा चीक; वृक्षरस.

**तरुह** (ತರುಹ) (क) ना.—उपनिवेश; आनयन; साम्य; सारखे-पणा.

**तरुहि** (ತರುಹಿ) (क) वि.—स्वेच्छाचारी; क्षुद्र; दुर्बळ.

**तरुंबु** (ತರುಂಬು) (क) धा.—'तरुबु' पहा.
(क) ना.—मार्गदर्शक फलक; दिशा दाखवणारा हात.

**तरे (रि)** (ತರೆ [ರಿ]) (क) धा.—कातरणें; तुकडे करणें.

**तर्क** (ತರ್ಕ) (सं) ना.—वादविवाद; चर्चा; मीमांसा; तर्कशास्त्र; ऊहापोह; विचार; संशय; जाणीव; हेतु; कारण; संपादित कर्म; कृतकर्म.

**तर्कयि (वि) सु** (ತರ್ಕಯಿ [ವಿ] ಸು) (क) धा.—तर्क करणें; ऊहापोह करणें; आलिंगणें; मिठी मारणें.

**तर्कविद्ये** (ತರ್ಕವಿದ್ಯೆ) (सं) ना.—मीमांसादि शास्त्रें.

**तर्किग** (ತರ್ಕಿಗ) (क) वि.—तार्किक; तर्कशास्त्रज्ञ; तर्कटी.

**तर्के** (ತರ್ಕೆ) (क) क्रि.—आणू दे; घेऊन येऊं दे.
(क) ना.—आलिंगन; मिठी.

**तर्गु** (ತರ್ಗು) (क) धा.—वाकणें; खड्डा खणणें; खालीं येणें.
(क) ना. खड्डा; सरोवर; तळवटी; खालाटी.

**तर्ज (र्जि) नि** (ತರ್ಜ [ರ್ಜಿ]ನಿ) (सं) ना.—दर्शनांगुली; अंगठ्याजवळील बोट.

**तर्जिसु** (ತರ್ಜಿಸು) (क) धा.—भिवविणें; घाबरविणें; गर्जना करणें; धाक दाखविणें.

**तर्जित** (ತರ್ಜಿತ) (सं) वि.—घाबरविलेलें; बेभान केलेलें; भयभीत.

**तर्जुमे** (ತರ್ಜುಮೆ) (अ. दे) ना.—भाषांतर; परिवर्तन; अनुवाद.

**तर्णक** (ತರ್ಣಕ) (सं) ना.—वासरु; गोवत्स.

**तर्पण** (ತರ್ಪಣ) (सं) ना.—तृप्ति; पितृयज्ञ; तिलांजली; समाधान; जहाजावरील स्वयंपाकगृह.

**तर्पिसु** (ತರ್ಪಿಸು) (क) धा.—तृप्ति होणें; समाधान होणें; पितृयज्ञ करणें.

**तर्बु** (ತರ್ಬು) (क) धा.—अलिंगणें; मिठी मारणें; थांबविणें.
(क) ना.—बाब; आलिंगन; वेढा.

**तर्ष (र्षण)** (ತರ್ಷ [ರ್ಷಣ]) (सं) ना.—दाह; तोंडाची कोरड; तहान; दगा; इच्छा; आकांक्षा.

**तर्षित** (ತರ್ಷಿತ) (सं) वि.—तहानेलेला; इच्छुक; वंचित; आकांक्षी.

**तल** (ತಲ) (सं) ना.—तळ; बूड; तळहात; तळपाय; अंतर्भाग; जमिनींतील भोंक; नेम; खड्डा; वृक्षविशेष; मूळ. नरकातील एक भाग; कर; मुख्याची गोष्ट; मनगट; तरवारीची मूठ; सोटा; आधार; आश्रय.

**तलपु** (ತಲಪು) (क) धा.—शिवणें; पोहोचणें; सारखे होणें; शिरणें; समावेश करणें.
—इसु (—ಇಸು) (क) धा.—पोहोचविणें; जुळवून घेणें; दान करणें.

**तलबु** (ತಲಬು) (क) ना.—पगार; वेतन; दुर्व्यसन; कैफ; तलफ; आमंत्रण; आवाहन.

**तलवार** (ತಲವಾರ) / **तलारि** (ತಲಾರಿ) (क) ना.—खड्ग; कट्यार; चौकीदार; पहारेकरी.

**तलाधार** (ತಲಾಧಾರ) (सं) ना.—लोखंडी रुळाखालील पट्ट्या; आधारपाट; कडेपाटाची जंती; राफ्टर.

**तलिन** (ತಲಿನ) (क) वि.—लहान; पातळ; खालचे; खालच्या प्रतीचे; सूक्ष्म; अलग झालेले.
(क) ना.—अंथरूण; पलंग.

तले (ತಲೆ) (क) ना.—डोकें; प्रमुख; सर्वश्रेष्ठ; पिढी; एक पुरुष उंच माप.

—कट्टु (ಕಟ್ಟು) (क) ना.—अक्षराचा वरील भाग; गहाण जमीन.

—करे (ಕರೆ) (क) धा.—टाळणें; चुकवणें.

—कायि (ಕಾಯಿ) (क) धा.—रागावणें; कोपणें; संरक्षणें; पालन करणें.

—केदरु (ಕೆದರು) (क) धा.—डोकें खाजवणें; विंचरणें; पुनःपुनः विचार करणें; खोलवर विचार करणें.

—केळगु (ಕೆಳಗು) (क) अ.—अस्ताव्यस्त; उलटसुलट; मागेपुढें; वरखालीं.

—कोडु (ಕೊಡು) (क) धा.—प्राण देण्यास तयार होणें; बलिदान करणें; लक्ष देणें.

—तिरगु (ತಿರಗು) (क) धा.—रागावणें; कोपाविष्ट होणें; क्रुद्ध होणें.

—तूगु (ತೂಗು) (क) धा.—कबूल करणें; मान्य करणें.

—तोडवु (ತೊಡವು) (क) ना.—शिरोभूषण; डोक्यावरील अलंकार.

—तोरु (ತೋರು) (क) धा.—उत्पन्न होणें; मोड फुटणें; अंकुरणें; उठणें.

—पट्टि (ಪಟ್ಟಿ) (क) ना.—डोक्याला बांधण्याचें कापड; रुमाल; मंदील; फेटा; चौकटीचा वरचा भाग.

—बरेह (ಬರೆಹ) (क) ना.—मथळा; शीर्षक; दैव.

—बागु (ಬಾಗು) (क) धा.—नमस्कार करणें; मान्यता देणें; विनय दाखविणें; नमणें.

—बागुह (ಬಾಗುಹ) (क) ना.—नम्रता; नमस्कार; संमति; रुकार.

—बेसरु (ಬೇಸರು) (क) ना.—असह्यता; कंटाळा; नकोसें वाटणें; तिटकारा.

—मणे (ಮಣೆ) (क) ना.—सर्पाच्या डोक्यावरील मणी; शिरोभूषण.

—होयक (ಹೊಯ್ಕ) (क) वि.—आग्रही; धरलेला हट्ट न सोडणारा; डोके फोडणारा; खुनी.

—होंक (ಹೋಂಕ) (क) वि.—जिवाची पर्वा न करणारा; हट्टी.

तलेगुत्तु (ತಲೆಗುತ್ತು) (क) धा.—मान वाकणें; नमणें; शिर लववणें.

तलेगोळ् (ತಲೆಗೊಳ್) (क) धा.—प्राण घेणें; खून करणें; संकटाला तोंड देणें.

तलेतिरुकु (ತಲೆತಿರುಕ) (क) वि.—माथेफिरू; डोकेफिरू; हट्टी; उन्मत्त; दुरहंकारी.

तलेदेरिगे (ತಲೆದೆರಿಗೆ) (क) ना.—डोईपट्टी; यात्राकर; लोकसंख्येच्या प्रमाणात बसविलेला जनदंड; लोककर.

तलेमडु (ತಲೆಮಡು) (क) धा.—टक्कर देणें; विरोधणें; दंड थोपटणें; छद्दु मारणें.

तलेमारु (ತಲೆಮಾರು) (क) ना.—परंपरा; पिढ्यानुपिढी.

तलेमेरे (ತಲೆಮೆರೆ) (क) धा.—पुढारीपण स्वीकारणें; सर्वोपरी होणें; स्वतःचें वैशिष्ट्य राखणें.

तलेयुर्चु (ತಲೆಯುರ್ಚು) (क) धा.—टाळणें; चुकविणें; निसटणें.

तलेवरि (ತಲೆವರಿ) (क) धा.—अंकुशाचा मार खाऊन सुधारणें वळणावर येणें; जुळवून घेणें; 'पळगु' पहा.

तलेविल् (ತಲೆವಿಲ್) (क) ना.—धनुष्कोटी; बाणाचे फळ.

तलेवीसु (ತಲೆವೀಸು) (क) धा.—विरोध करणें; नाकबूल करणें; निराकरण करणें; खंडन करणें.

तलेवीडु (ತಲೆವೀಡು) (क) ना.—मुख्य स्थळ; प्राकार; वाडा.

तलेवोय्लु (ತಲೆವೊಯ್ಲು) (क) ना.—टपली; डोक्यावरील मार; डोक्यावरील जखम; गोबा.

तलेवोरे (ತಲೆವೊರೆ) (क) ना.—डोक्यावरून वाहून नेण्याइतकें वजन; बोजा.

तलोदरि (ತಲೋದರಿ) (सं) ना.—पातळ पोटाची स्त्री; कृशोदरी; कोमलांगी; सुंदरी.

तल्प (ತಲ್ಪ) (सं) ना.—शय्या; अंथरूण; पलंग; माडी; पत्नि; भार्या; कुलीन स्त्री; होडी; तराफा; पेव; वाहून आलेल्या धाणीचा ढीग.

तल्ल (ತಲ್ಲ) (सं) ना.—तळें; पाणवठा; दलदल; चिखल.

तल्लज (ತಲ್ಲಜ) (सं) ना.—सुख; क्षेम; श्रेष्ठ; कमळ; सौंदर्य.

तल्लण (ळ) (ತಲ್ಲಣ [ಳ]) (क) ना.—भय; घबराट; गडबड; दुःख; चिंता; कळवळ; आतुरता.

—इसु (ಇಸು) (क) धा.—भिणें; घाबरणें; तळमळणें; आतुर होणें.

तल्लीन (ತಲ್ಲೀನ) (सं) वि.—तद्रूप; मग्न; तदाकार.

तव (ತವ) (सं) ना.—तुझें.

(क) ना.—आपलें; आपल्यापुरतें.

तवक (ತವಕ) (सं) ना.—प्रीति; इच्छा; अपेक्षा; आतुरता; त्वरा.

—इसु (ಇಸು) (क) धा.—गडबड करणें; आतुर होणें.

—कंपेरु (ಕಂಪೇರು) (क) धा.—आतुर होणें; औत्सुक्य दाखविणें;

तवकि (किग) (ತವಕಿ [ಕಿಗ]) (क) वि.—आतुर; गडबड्या; उत्सुक.

तव (वं) (ग) } (ತವ [ವಂ]ಗ) (सं) ना.—नाट्यरंग; रंगभूमि. 'इंद्रकोष' पहा.
तमंग } (ತಮಂಗ) चंद्रशाला; आवार; सोपा.

तवचु (ट्ट) (ತವಚು [ಟು) (क) धा.—पाखडणें; फोल काढणें; स्वच्छ करणें.
तवडु (तौडु) (ತವಡು [ತೌಡು]) (क) ना.—कोंडा; भूस; भुसार.
तवशोगे (ತವದೊಣೆ) (क) ना.—अक्षय भाता; अविनाशी तुणीर; नित्य भरलेला बाणकोष.
तवनिधि (ತವನಿಧಿ) (सं) ना.—भांडार; अविनाशी संपत्ति; पुण्य.
तवर् (रु) (ತವರ್ [ರು]) (क) ना.—जन्मभूमि; मातृभूमि; माहेर.
—मने (ಮನೆ) (क) ना.—माहेर; माहेरघर; मायभूमि.
तवराज (ತವರಾಜ) (क) ना.—अमृत; अत्यंत गोड साखर.
तवलाय (यि) (ತವಲಾಯ [ಯಿ]) (क) ना.—तांबूल; विडा; पानपट्टी.
तवसि (ತವಸಿ) (क) ना.—तपस्वी; ऋषि; मुनी.
तवळिसु (ತವಳಿಸು) (क) धा.—कोमेजविणें; नाश करणें; झडणें; रोडणें.
तवायि (ತವಾಯಿ) (क) ना.—दंड; व्यापारांतील हानि; दुर्दैव; नाश; महाविपत्ति.
तविर् (लु) (ತವಿರ್ [ಲು]) (क) ना.—विराम; टाळाटाळ; त्याग; प्रयाण; न्यून्य; उणीव; गरीबी; 'तलेवोरे' पहा.
तविसु (ತವಿಸು) (क) धा.—उतरविणें; कमी करणें; विझवणें; संपवणें; नाश करणें; घालविणें; टाळणें.
तवु (ತವು) (क) धा.—क्षीण होणें; नाश होणें; कमी होणे; झिजणें. (क) ना.—क्षय; हानी; क्षीणता; कमतरता.
—गे (ಗೆ) (क) ना.—अंत; मुक्ति; समारोप; नाश.
—तले (ತಲೆ) (क) ना.—थरथरतें शिर; कंप पावणारी मान.
तवुलित (ತವುಳಿತ) (क) ना.—युद्धनीति; एक युद्धपद्धति.
तवे (ತವೆ) (क) धा.—नाश करणें; क्षीण करणें; न शोभण्यासारखे होणें; अतृप्त राहणें. (क) ना.—तवा; झाकणी. (क) अ.—शिवाय; संपूर्णपणें; अतिशये करून; अमर्यादपणें; चांगल्या रीतीनें.
तसकु (ತಸಕು) / तसकलु (ತಸಕಲು) } (क) ना.—चोरी; चौर्य; वंचना; ठकबाजी; युक्तिप्रयुक्ति.
तसबीरु (ತಸಬೀರು) (अ.दे) ना.—चित्र; चित्रपट; भावचित्र; प्रतिमा.
तस्कर (ತಸ್ಕರ) (सं) ना.—चोर; भामटा; वंचक; निशाचर; दरोडेखोर.
तस्तीकु (ತಸ್ತೀಕು) / तसदीकु (ತಸದೀಕು) } (अ.दे) ना.—देवालय, मशीद, वगैरेचे वर्षासन; तनखा; देणगी.

तह (ತಹ) (क) बि.—जीर्ण; 'तरुह' पहा; 'तप्प' पहा. (क) ना.—आतुरता; गडबड; कष्ट; कळवळा. (अ.दे) ना.—समेट; एकी; करार; निर्णय.
तहनामा (ತಹನಾಮಾ) (अ.दे) ना.—करारनामा; समेटपत्र.
तहतह (ತಹತಹ) (क) ना.—कळकळ; कष्ट; आतुरता.
तहसीलु (ತಹಸೀಲು) (अ.दे) ना.—करवसुली; करवसुलीचें ठिकाण; तालुका.
—दार (ದಾರ) (अ.दे) ना.—तालुकदार; मामलतदार; मामलेदार.
तहि (ತಹಿ) (क) ना.—संगति; जोडीदारी.
—कार (ಕಾರ) (क) ना.—नातेवाईक; सांगाती; मित्र.
तळ् (ತಳ್) (क) धा.—मिळणें; मिसळणें; अलिंगणें; संबंध येणें; दिसून येणें; आंत जाणें; पालवी फुटणें; अंगावर पडणें; अंगावर धावून जाणें; विरोध करणें; मागें हटणें; विलंब होणें;
तळ (ತಳ) (क) ना.—तळाखालचा भाग; तळहात; तळपाय; चकाकी; स्थळ.
तळकु (ತಳಕು) (क) ना.—चकाकी; कांति; गुंतागुंत; चांगलेपणा. विज्ञान आश्रय; विलास; शोभा; सौंदर्य.
तळतंत्र (ತಳತಂತ್ರ) (सं) ना.—अधिकारांतील सैन्य.
तळप (पु) (ತಳಪ [ಪು]) (क) ना.—प्रकाश; कांती; चकाकी.
तळप (व) ट (ತಳಪ [ವ] ಟ) (क) ना.—खुली जागा; मैदान; अरण्य; अस्ताव्यस्तता.
तळम (व) ळ (ತಳಮ [ವ] ಳ) (क) ना.—चिंता; दुःख; घाबरेपणा; संताप; कळकळ; गोंधळ.
—कुट्टु (ಕುಟ್ಟು) (क) धा.—चिंता करणें; आश्चर्य करणें.
—गु (ಗು) (क) ना.—कळवळ; शांति.
तळर् (रु) (ತಳರ್ [ರು]) (क) धा.—हलणें; चळणें; आंदोलणें; निघणें; उडून जाणें; थरथरणें; कंपित होणें. (क) ना.—थरकाप; चलनवलन; हालचाल; बोबडे बोल.
—अडि (ಅಡಿ) (क) ना.—वाकडे पाऊल; ठेच.
—चु (ಚು) (क) धा.—बाहेर पाठविणें; उडविणें; हाकालणें.
—नडे (ನಡೆ) (क) ना. कूच; वाकडे पाऊल; प्रमाद; ठेंच; लहान पाऊल.
—नुडि (ನುಡಿ) (क) ना.—बोबडे बोल; विषयांतर.
तळल् (ತಳಲ್) (क) धा.—पालवी फुटणें; मोहरणें; विकसणें; सहन करणें. (क) ना.—वाळलेलें फळ; पालवी; कोंब.
तळव (वा)र (ತಳವ [ವಾ]ರ) (क) ना.—नगररक्षक; पहारेकरी; ग्रामरक्षक; तराळ; बलुतेदार.
तळवे (बे) ळगु (ತಳವೆ [ಬೆ] ಳಗು) (क) ना.—आश्चर्य; तळमळ; घाबरेपणा; भय.

**तळहदि** (ತಳಹದಿ) (क) ना.–पाया; पंचांग; 'अडिगट्टु' पहा.

**तळहु (ह्रु)** (ತಳಹು [ಹ್ರು]) (क) धा.–हरकत घेणें; विलंब लावणें; उशीर करणें;

(क) ना.–हरकत; उशीर; विलंब.

**तळाडि** (ತಳಾಡಿ) (क) ना.–'तळहदि' पहा.

**तळामळ (लक)** (ತಳಾಮಳ [ಲಕ]) (सं) ना.–तळहातावरील आवळा; स्पष्टार्थ; क्रमप्राप्ति.

**तळार** (ತಳಾರ) (क) ना.–'तळवार' पहा.

**तळि** (ತಳಿ) (क) धा.–मोड येणें; पालवी फुटणें; शिंपडणें; फेकणें; हिसकणें; हरवणें; सारखें करणें; विस्तरणें; पाहणें; पेरणें; धारण करणें; प्रोक्षण करणें.

(क) ना.–कुल; वंश; सत्र; तीर्थक्षेत्र; कुंपण; ढापी; कोंब; सैन्यविभाग; ठाणें.

**तळिके** (ತಳಿಕೆ) (क) ना.–अडचण; गुंतागुंत; ओळ; जोड; सहकार.

**तळिगे** (ತಳಿಗೆ) (क) ना.–चटई; ढाल; परात.

**तळिर्** (ತಳಿರ್) (क) धा.–कोंब फुटणें; पालवी फुटणें.

(क) ना.–पालवी; प्रवाळ.

—**अडि** (ಅಡಿ) (क) ना.–निमूळता पाय

—**अंबु** (ಅಂಬು) (क) ना.–टोंकदार बाण.

—**इडि** (ಇಡಿ) (क) धा.–पालवी फुटणें; पालवीमय होणें.

—**उडे** (ಉಡೆ) (क) ना.–पालवी हे च वस्त्र; पर्णवसन.

—**उय्यल्** (ಉಯ್ಯಲ್) (क) ना.–पर्णवसन.

—**कोंबु** (ಕೊಂಬು) (क) ना.–शाखा; पालवी फुटलेली फांदी

—**चु** (ಚು) (क) धा.–पालवणें; पालवी फुटणें.

—**तोरण** (ತೋರಣ) (क) ना.–पालवीचें तोरण; पल्लवमाला.

—**जोंप** (ಜೊಂಪ) (क) ना.–पालवीचा झुबका.

—**तुटि** (ತುಟಿ) (क) ना.–पालवीसारखे पातळ ओठ.

—**तुरुगु (गल्)** (ತುರುಗು [ಗಲ್]) (क) ना.–पालवीचा झुबका; पर्णसंभार.

—**पट** (ಪಟ) (क) ना.–पालवीची छत्री; गोरप; इरलें.

**ताळिर्वासे (वांसु)** (ತಳಿರ್ವಾಸೆ [ವಾಸು]) (क) ना.–पर्णशय्या; पर्णमंच.

**तळिसु** (ತಳಿಸು) (क) धा.–कुटणें; धान्याचा कोंडा काढणें; मारणें; शिंपडणे.

**तळु (ळुवु)** (ತಳು [ಳುವು]) (क) धा.–विलंब करणें; घाबरे करणें.

(क) ना.–विलंब; हरकत; अवकाश; उशीर.

**तळुकु** (ತಳುಕು) (क) धा.–मारणें; आलिंगणें; मिठी मारणें;

(क) ना.–आलिंगन; मिठी.

**तळे** (ತಳೆ) (क) धा.–जमणें; जमवून घेणें; धारण करणें; पकडणें; नेणें; आधार देणें; सहन करणें; स्वीकारणें; रूपाला येणें; मिळविणें; वस्त्र देणें.

(क) ना.–आलिंगन; बंधन; छत्री; नियम; चौकट.

**तळोदरि** (ತಳೋದರಿ) (सं) ना.–'तलोदरी' पहा.

**तळ्कु** (ತಳ್ಕು) (क) धा.–लेपणें; लावून घेणें.

(क) ना.–आलिंगन; मिठी; लेपन; चकाकी; कांती; अनुलेपन; भाव.

**तळ्के** (ತಳ್ಕೆ) (क) ना.–आलिंगन; मिठी.

—**इसु** (—ಇಸು) (क) धा.–आलिंगणें; मिठी मारणें; चुंबन घेणें.

—**हाकु** (—ಹಾಕು) (क) धा.–ओळींत बांधणें; जोडीदार बनवणें.

**तळ्केरसु** (ತಳ್ಕೆಯಿಸು) (क) धा.–आलिंगणें; मिठी मारणें.

**तळ्गु** (ತಳ್ಗು) (क) धा.–खालीं घसरणें; वाकणें; कमी होणें; खालावणें.

(क) ना.–दारिद्र्य; नीचपणा; हीनता; क्षय; क्षीणत्व; खळगा.

**तळ्तरि** (ತಳ್ತರಿ) (क) धा.–अंगावर जाऊन मारणें; झोंबाझोंबी करणें.

**तळ्पल्** (ತಳ್ಪಲ್) (क) ना.–'तप्पल्' पहा; पाला; पाचोळा; पायथ्याचा प्रदेश; खालाटी; उपत्यका.

**तळ्वलु** (ತಳ್ವಲು) 'तळ्पल्' पहा

**तळ्पु (ळ्बु)** (ತಳ್ಪು [ಳ್ಬು]) (क) धा.–आलिंगणें; मिठी मारणें.

(क) ना.–आलिंगन; मिठी.

**तळ्पोय** (ತಳ್ಪೊಯ್) (क) धा.–हातघाईवर येणें; झोंबाझोंबी करणें; ओतणें; आवळून धरून बडवणें.

**तळ्वु** (ತಳ್ವು) (क) धा.–वेळ घालविणें; विलंब करणें.

(क) ना.–विलंब; उशीर; हरकत; धिमेपणा.

**तळ्वुदु** (ತಳ್ವುದು) (क) वि.–समाविष्ट होण्याजोगें; जुळल्यासारखें.

**तळ्ळंक** (ತಳ್ಳಂಕ) (क) ना.–भय; चिंता; कळवळ; पेंच; गोंधळ; 'तळ्ळण' पहा.

—**कोळ्** (ಕೊಳ್) (क) धा.–भिणें; घाबरे होणें; गोंधळणें.

**तळ्ळि** (ತಳ್ಳಿ) (क) ना.–भांडण; तंटा; उपद्रव; चहाडी; संबंध; संपर्क; आलोचना; उसाभर; 'गोडवे' पहा.

**तळ्ळिळके** (ತಳ್ಳಿಳಕೆ) (क) ना.–भय; भीति.

**तळ्ळु** (ತಳ್ಳು) (क) धा.–ढकलणें; दाबणें; लोटणें; काढून घेणें; फेकणें; सोडून देणें; पुढें ढकलणें; गोळा करणें.

(क) ना.–अपहार; त्याग; ढकल; चालढकल.

**तळु (ळ्) पडि** (ತಳು [ಳ್] ಪಡಿ) (क) ना.–बाजूला सारणें; दूरीकरण; लांबण; लांबवण; चालढकल.

**तळिळक्कु** (ತಳ್ಳಿಕ್ಕು) (क) धा.–शोभिवंत होणें; विलास करणें; चांगले दिसणें.

**ता** (ತಾ) (क) क्रि.–घे; घेऊन ये.
(सं) ना.–स्वतः तो; आपण; एक भाववाची प्रत्यय.

**तां** (ತಾಂ) (सं) ना.–तो ते.

**ताकु** (ತಾಕು) (क) धा.–मिसळणें; स्पर्शणें; संबंध येणें; टक्कर देणें; अंगावर जाणें.
(क) ना.–स्पर्श; हरकत; क्षेत्र; गादी; पीठ; संगीत स्वर संमेलन; 'तगलु' पहा.

**ताकुळ** (ತಾಕುಳ) / **तागुळ** (ತಾಗುಳ) (क) ना.–दुराराध्य; दुर्निवार; क्रौर्य; अतिरौद्र.

**तागु** (ತಾಗು) (क) धा.–मिसळणें; मागणें; उडणें; उडी मारणें; वाकणें; विनय दाखविणें; पार होणें. 'ताकु' पहा.

**तागुडि** (ತಾಗುಡಿ) (क) ना.–लपून राहण्याचें स्थळ; गुप्त स्थळ; भूमिगतता; गायब्रपणा.

**तागुळ** (ತಾಗುಳ) (क) ना.–क्रोध; चीड; उद्रेक; रौद्रता; अनावर कोप.

**तांकु** (ತಾಂಕು) (क) धा.–'तागु' पहा.

**तांगु** (ತಾಂಗು) (क) धा.–आधार देणें; ठेवणें; टिकणें; सहन करणें.

**ताजा** (ತಾಜಾ) (अ-दे) वि.–नूतनतम; नवोनव; गरमागरम; ताजा; आत्ताचा.

**ताट** (ತಾಟು) (क) ना.–थाळा; तट्टया; ताठरपणा; अविनय; घट्टपणा; भरीवपणा; सामर्थ्य; हट्ट; अहंकार; पक्कड.

**ताटका (कि)** (ತಾಟಕಾ[ಕಿ]) (सं) ना.–एक राक्षसी; मारीचाची आई.
**—अंतक** (ಅಂತಕ) (सं) ना.–ताटकीला मारणारा; राम.

**ताटकितन** (ತಾಟಕಿತನ) (क) ना.–दुष्टपणा; वंचना; भामटेगिरी; भांडखोरपणा.

**ताटं (डं) क** (ತಾಟಂ [ಡಂ] ಕ) (सं) ना.–स्त्रियांच्या कानांतील दागिना; तानवडे.

**ताटि** (ತಾಟಿ) (क) ना.–साल; वल्कल; चर्म; घट्टपणा.

**ताटिसु** (ತಾಟಿಸು) (क) धा.–बडवणें; संबंध आणणें; मारपीट करणें;

**ताटु** (ತಾಟು) (क) धा.–विरोधणें; स्पर्शणें; संबंध येणें; मारणें.
(क) ना.–हल्ला; मारामारी; छप्पर; छत; अस्थिपंजर; अहंकार; गर्व; डौल; थाट; वाढलेलें पान.
**—आडिसु** (—ಆಡಿಸು) (क) धा.–गुंतवणे.
**—आडु** (—ಆಡು) (क) धा.–मारहाण करणें; झोके खाणें.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.–मारामारी करणें; हातघाईवर येणें.
**—गार** (ಗಾರ) (क) वि.–भांडखोर; कलहप्रिय.

**ताड** (ತಾಡ) (क) ना.–तालवृक्ष; बांध; एकप्रकारचें गवत; आवाज; ध्वनि; चाहुल.

**ताडंक** (ತಾಡಂಕ) (क) ना.–'ताटंक' पाहा.

**ताडन (ने)** (ತಾಡನ (ನೆ)) (सं) ना.–मारपीट; चोर मार.

**ताडनि (नी)** (ತಾಡನಿ (ನಿ)) (सं) ना.–माराचें साधन; चाबूक; कोरडा; कमचि.

**ताडपत्र** (ತಾಡಪತ್ರ) (सं) ना.–तालवृक्षाचें पान.

**ताडिग्य** (ತಾಡಿಗ್ಯ) (क) ना.–वात; फोपसेपणा; देहस्थूलता; जलचर.

**ताडित** (ತಾಡಿತ) (सं) वि.–ठोकलेला; मारलेला; बडविलेला.

**ताण** (ತಾಣ) (क) ना.–स्थान; स्थळ; चावडी; ठाणें; आश्रय; वीत.
**—बट्ट** (ಬಟ್ಟು) (क) वि.–स्थानभ्रष्ट; दुर्वृत्त; नीच; हीन.

**ताणंतर** (ತಾಣಂತರ) (क) ना.–स्थानांतर; अन्य ठिकाण.

**ताणु** (ತಾಣು) (क) ना.–स्थाणु; खांब; शिव; प्रतान; सोटवृक्ष.

**तांटु** (ತಾಂಟು)(क) धा.–हसणें; पार होणें; उडी मारणें; नाचणें.

**तांडव** (ತಾಂಡವ) (सं) ना.–एक नृत्य; शिवाचें नर्तन.

**तात** (ತಾತ) (सं) ना.–पिता; आजा; पूज्य; पूजनीय.

**तात्कालिक** (ತಾತ್ಕಾಲಿಕ) (सं) वि.–लागलीच होणारे; त्या काळाशीं संबंधित.

**तात्पर्य** (ತಾತ್ಪರ್ಯ) (सं) ना.–अभिप्राय; सारांश; रहस्य; तत्परता; एकनिष्ठता; एकासक्ति.

**तात्पूर्ति (र्तिक)** (ತಾತ್ಪೂರ್ತಿ [ರ್ತಿಕ]) (सं) अ.–तेवढ्यापुरतें; त्यासाठींच; नाममात्र.

**तात्सार** (ತಾತ್ಸಾರ) (सं) ना.–तिरस्कार; निंदा; कंटाळा.

**तादर्थ्य** (ತಾದರ್ಥ್ಯ) (सं) अ.–साठीं, पुरतें.
(सं) ना.–अर्थसंबंध; त्याच अर्थीं.

**तादात्म्य** (ತಾದಾತ್ಮ್ಯ) (सं) ना.–तदाकारता; तल्लीनता; समरसता; एकात्मता.

**तादृश** (ತಾದೃಶ) (सं) वि.–त्यासारखें; तादृक्; तसाच.

**तान** (ತಾನ್) (क) ना.–तो स्वतः; बोलणारा; बोलणारी व्यक्ति.

**तान** (ತಾನ) (सं) ना.–कमलनाळ; संगीतांतील आलाप; विस्तार; रुंदी; विशालता.

**तांत** (ತಾಂತ) (सं) वि.–थकलेला; कंटाळलेला; कोमेजलेले; 'त' अंती असलेला शब्द.

**तांत्रिक** (ತಾಂತ್ರಿಕ) (सं) वि.–तंत्रासंबंधी; विज्ञानशास्त्री; तत्त्वज्ञ; शास्त्राप्रमाणें वागणारा; शिल्पी; कलाविध.

**ताप** (ತಾಪ) (क) वि.–लोंबतें; टांगलेलें; मारणारा; हिशेबांत घेण्याजोगें.

**ताप** (ತಾಪ) (सं) ना.–उष्णता; जाळ; ऊन; दुःख; चिंता; काळ; चटका; संकट.

**तापणे** (ತಾಪಣೆ) (क) ना.—स्थापना; प्रतिष्ठापना; ज्वलन; थांबणे; स्थैर्य.

**तापत्रय** (ತಾಪತ್ರಯ) (सं) ना.—आधिदैविक; आधिभौतिक; आध्यात्मिक असा त्रिविध ताप.

**तापमानयंत्र** (ತಾಪಮಾನಯಂತ್ರ) / **तापमापक** (ತಾಪಮಾಪಕ) (सं) ना.—थर्मामीटर; तापनळी.

**तापस** (ತಾಪಸ) (सं) ना.—तपस्वी; तपासंबंधी.

**तापसतरु** (ತಾಪಸತರು) (सं) ना.—इंगुदी वनस्पति; जटा बांधण्यासाठी उपयोगी तेल निघणारे झाड; 'तनुपत्र' पहा.

**तापाळ्** (ತಾಪಾಳ್) (क) ना.—खीळ; कडी; दडपण.

**तापसि (सी)** (ತಾಪಸಿ [ಸೀ]) (सं) ना.—तपस्विनी; तप करणारी.

**तापि** (ತಾಪಿ) (सं) ना.—कोपिष्ठ; जमदग्नि.

**तापिंज** (ತಾಪಿಂಜ) (सं) ना.—एका जातीचें झाड; करंजीचें झाड; करंज.

**तापी** (ತಾಪೀ) (सं) ना.—मध्यभारतातील एक नदी.

**तापे** (ತಾಪೆ) (अ.दे) ना.—नर्तकांचा मेळा; ताफा; थवा; नृत्यसंच.

**ताबा** (ತಾಬಾ) (अ.दे) ना.—आधार; वश्यता; आश्रय.

**ताम्** (ತಾಮ್) (सं) ना.—आपण.

**तामरस** (ತಾಮರಸ) (सं) ना.—कमल; सुवर्ण; सोने.

**तामरे (वरे)** (ತಾಮರೆ [ವರೆ]) (क) ना.—'तद्दु' पहा.

**तामस** (ತಾಮಸ) (सं) वि.—तमासंबंधी; अंधारी; काळोखी.
(सं) ना.—नीच स्वभाव; अज्ञान; मंदबुद्धि; जडमति; अंधार; विलंब; राहूची प्रजा; रात्र.
**—गार** (ಗಾರ) (क) वि.—आळशी; विलंब लावणारे.
**—गेय्** (ಗೆಯ್) (क) धा.—विलंब लावणें; मस्ती दाखवणें.

**तामसि** (ತಾಮಸಿ) (क) ना.—आळशी; अंधार; रात्र; जडप्रकृति.

**तामिस्र** (ತಾಮಿಸ್ರ) (सं) ना.—एक राक्षस; अज्ञान; महानर्क.

**तांबूल** (ತಾಂಬೂಲ) (सं) ना.—विड्याची पानें; विडा; पानसुपारी.

**तांबूलि (लिक)** (ತಾಂಬೂಲಿ [ಲಿಕ]) (सं) ना.—विडा देणारा; पानसुपारी देणारा; विड्याचे स्तबक.

**तांबूलिग** (ತಾಂಬೂಲಿಗ) (सं) ना.—तांबोळी; पानसुपारी विकणारा.

**तांबेलु** (ತಾಂಬೇಲು) (क) अ.—प्रसंगानुसार; अपूर्वपणें.

**ताम्र** (ತಾಮ್ರ) (सं) ना.—तांबे; तांब्याचा पत्रा; रंग; अरुणप्रभा; कुष्ठरोग; रोगप्रकार.

**ताम्रक** (ತಾಮ್ರಕ) (सं) ना.—तांब्या; तांब्याचें जलपात्र; तांबें.

**ताम्रकर्णि** (ತಾಮ್ರಕರ್ಣಿ) (सं) ना.—एका हत्तिणीचें नांव.

**ताम्रकेतु** (ತಾಮ್ರಕೇತು) (सं) ना.—मयूरध्वजाचा पुत्र.

**ताम्रचूड** (ತಾಮ್ರಚೂಡ) (सं) ना.—तांबडा तुरा असलेला; कोंबडा.

**ताम्रतुंड** (ತಾಮ್ರತುಂಡ) (सं) ना.—तांबडी चोच असलेला; पोपट.

**ताम्रपर्णि** (ತಾಮ್ರಪರ್ಣಿ) (सं) ना.—एक नदी; सीलोनमधील एक शहर; सीलोन.

**ताम्रमुखी** (ತಾಮ್ರಮುಖಿ) (सं) ना.—तांबड्या तोंडाचें माकड; रेडइंडियन.

**ताम्राक्ष** (ತಾಮ್ರಾಕ್ಷ) (सं) ना.—तांबड्या डोळ्याची कोकिळा. रागाचे डोळे; 'केंभूत' पहा.

**ताम्राधरे** (ತಾಮ್ರಾಧರೆ) (सं) ना.—सुंदरी; लाल ओठाची स्त्री; रक्तोष्ठा.

**ताय् (यि)** (ತಾಯ್ [ಯಿ]) (क) ना.—जन्मदात्री; जननी; अंबा.

**तायि (य) त** (ತಾಯಿ [ಯ] ತ) (क) ना.—ताईत; ताविज; मंत्रयुक्त डाग; मंतरलेली राख.

**तायगळ्** (ತಾಯ್ಗಳ್) / **तायिवर** (ತಾಯಿವ್ರ) (क) ना.—आई; 'ताई' शब्दाचे अनेकवचन.

**तायमळल् (लु)** (ತಾಯ್ಮಳಲ್ [ಲು]) (क) ना.—जन्मभूमि; नंदी; समुद्रतळची वाळू.

**तायवने** (ತಾಯ್ವನೆ) (क) ना.—माहेर; वासस्थळ; घरटें; आश्रय; गुहा; तळघर; प्रार्थना; विनंती.

**तायिपडि** (ತಾಯಿಪ್ಪಡಿ) (क) ना.—हत्तीण; करभिणी.

**तायवावि** (ತಾಯ್ವಾವಿ) / **तायिवावि** (ತಾಯಿವಾವಿ) (क) ना.—आईकडील नातें.

**तायवीडु** (ತಾಯ್ವೀಡು) (क) ना.—माजघर; तळघर; स्थिरस्थान. 'तायवने' पहा.

**तायवेरू** (ತಾಯ್ವೇರು) (क) ना.—आधार; मूळ; सोटमूळ; मातृमूल.

**तार्** (ತಾರ್) (क) धा.—वाळणें; थंड होणें; शोषणें; शुष्क होणें; गळणें; कोमेजणें; बुडणें; पातळ होणें.
(क) शकुन.

**तार** (ತಾರ) (सं) ना.—एक तांब्याचें नाणें; पार होणें; सुटका; पोहणें; तरणें; उतार; तारस्वर; नदी; आकाश; मुक्ताफळ; कपट; पर्वत; मारुती; वारा; शुभ्रता; चांदणी; नक्षत्र; बुबूळ; एक राक्षस.

**तारक** (ತಾರಕ) (सं) ना.—तारणारे; संरक्षक; नाविक; नक्षत्र; एक राक्षस.
**—अरि** (ಅರಿ) (सं) ना.—कार्तिकेय, षण्मुख.
**—मंत्र** (ಮಂತ್ರ) (सं) ना.—ॐ कार मंत्र.

**तारका** (के) (ತಾರಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—नक्षत्र; नाव; होडी डोळ्यांतील बुबूळ.
—**राज** (ರಾಜ) (सं) ना.—तारापति; चंद्र.
**तारकामीन** (ತಾರಕಾಮೀನ) (सं) ना.—नक्षत्राकार मासा.
**तारगे** (ತಾರಗೆ) (क) ना.—'तारका' पहा; नक्षत्र; ग्रह.
—**आण्म** (ळ्व) (ಅಣ್ಮ [ಳ್ವ]) (क) ना.—नक्षत्रस्वामी; चंद्र;
—**बट्टे** (ಬಟ್ಟೆ) (क) ना.—आकाश; भानु; पोकळी; नक्षत्र; मार्ग.
**तारडि** (ತಾರಡಿ) (क) ना.—वाळून हलके होण्याची स्थिति; कोरडेपणा; निस्तेजता.
**तारण** (ತಾರಣ) (सं) ना.—पैलपार; एकसंवत्सर; गहाण ठेवलेलीं वस्तु; जामीन.
**तारतम्य** (ತಾರತಮ್ಯ) (सं) ना.—कमीजास्त; तरतमभाव; विपरीतता; विरुद्धपणा; व्यत्यास.
**तारय्सु** (ತಾರಯ್ಸು) (क) धा.—शीळ घालणें; उच्चस्वरानें हाक मारणें: तान घेणें; आलाप काढणें; ओरडणें.
**तारल्** (लु) (ತಾರಲ್) (ಲು) (क) ना.—कांटे, प्रकाश; उत्साह; स्फुरण.
**तारसि** (ತಾರಸಿ) (क) ना.—वीट; चिखलकाम.
**तारहार** (ತಾರಹಾರ) (सं) ना.—मोत्याचा पेंडा; सर; किंमती मोत्याची माळ.
**तारा** (ತಾರಾ) (सं) ना.—नक्षत्र; बालीची पत्नि.
**ताराचल** (ತಾರಾಚಲ) (सं) ना.—कैलास पर्वत; हिमालय; उदयगिरी.
**ताराधिप** (पति) (ತಾರಾಧಿಪ) (ಪತಿ) (सं) ना.—चंद्र; नक्षत्र स्वामी.
**तारापथ** (ತಾರಾಪಥ) (सं) ना.—गगन; आकाश.
**ताराबल** (ತಾರಾಬಲ) (सं) ना.—ग्रह-नक्षत्रांचा शुभाशुभ योग.
**तारामंडल** (ತಾರಾಮಂಡಲ) (सं) ना.—नक्षत्रपुंज; तारकांचा समूह.
**तारि** (ತಾರಿ) (सं) ना.—शकुन; उतार; दृष्टि; कड.
**तारिग** (ತರಿಗ) (क) ना.—वाळका ढीग; सुकीरास.
**तारिणि** (णी) (ತಾರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—दुर्गा; पार्वती; नौका; बौद्धदेवता.
**तारित** (ತಾರಿತ) (सं) वि.—रक्षित; जीवित; पार झालेला; पैल नेलेला.
**तारु** (ತಾರು) (क) धा.—धावाधाव करणें; अव्यवस्थितपणें, हलवणें; रोडणें; गरीब होणें; कृश होणें.
(क) ना.—कोरडेपणा; तार; रेशमी धागा; तात; शकुन; तारेनें आलेली बातमी; जोडीदार.
—**तट्टु-माड्डु** (ತಟ್ಟು, -ಮಾಡು) (क) ना.—असत्य; कपट; अव्यवस्था; वंचना
—**उंबळि** (ಉಂಬಳಿ) (क) ना.—भ्रम; संभ्रम; अव्यवस्था.
**तारुण्य** (ತಾರುಣ್ಯ) (सं) ना. तरुणपण; यौवन; ज्वानी.
**तार्कणे** (ತಾರ್ಕಣೆ) (सं) ना.—प्रत्यक्ष प्रमाण; आत्मनिरीक्षण; स्वयंपरिशीलन; तारतम्य.
**तार्किक** (ತಾರ್ಕಿಕ) (सं) ना.—तर्कशास्त्रज्ञ; (गौतम; कणाद; बृहस्पति वगैरे) तर्कशास्त्रप्रवर्तक.
**तार्क्ष्य** (ತಾರ್ಕ್ಷ್ಯ) (सं) ना.—गरुड; अश्व.
—**ध्वज** (ಧ್ವಜ) (सं) ना.—विष्णु; गरुडध्वज.
**तार्गूड्ड** (ತಾರ್ಗೂಡು) (क) धा.—चहूकडून गोळा करणें; एकत्रित करणें.
**तार्ण** (ತಾರ್ಣ) (सं) वि.—गवती; गवतकाडीचे; गवतापासून केलेलें.
**तार्मुट्टु** (ತಾರ್ಮುಟ್ಟು) (क) धा.—वाळविणें; केर काढणें; झाडणें; विरोध करणें;
**तार्य** (ತಾರ್ಯ) (सं) वि.—तारणीय; विजयार्ह.
(सं) ना.—नावेचा कर; जकात; सुटका; मुक्ति; मोकळीक.
**ताल** (ತಾಲ) (सं) ना.—तालवृक्ष; टाळ; झांज; टाळी; ठेका; तलवारीची मूठ; वीत; अडणा; अर्गल.
—**पत्र** (ಪತ್ರ) (सं) ना.—ताडपत्र; तालवृक्षाची साल.
—**मधु** (ಮಧು) (सं) ना.—ताडी.
**तालिजंघ** (ತಾಲಿಜಂಘ) (सं) ना.—लांबटांग्या; लंबू.
—**ध्वज** (ಧ್ವಜ) (सं) ना.—बलराम; भीष्म.
—**वृंत** (ವೃಂತ) (सं) ना.—पंखा; व्यजन.
**तालव्य** (ತಾಲವ್ಯ) (सं) ना.—तालुस्थानातून उच्चार होणारे वर्ण; चवर्गातील अक्षरें.
**तालांक** (ತಾಲಾಂಕ) (सं) ना.—ताडवृक्षाचें ध्वजचिन्ह ठेवणारे; बलराम; भीष्म.
**तालि** (ತಾಲಿ) (क) ना.—लहान जलपात्र; थाली; गिंडी; पंचपात्री; तालवृक्ष; मंगळसूत्र.
**तालीम** (ತಾಲೀಮು) (अ.दे) ना.—अभ्यास; रूढी; व्यायाम; शिक्षण.
—**खाने** (ಖಾನೆ) (अ.दे) ना.—व्यायामशाळा; औषधी वनस्पतीचे बी.
**तालु** (लुक) } (ತಾಲು [ಲುಕ]) (सं) ना. तालुका; अंगण;
**तालुगे** } (ತಾಲುಗೆ) घराचा पुढील भाग; गाल; भाल.
**तालुजिव्ह** (ತಾಲಜಿಹ್ವ) (सं) ना.—मगर; सुसर.
**तावक** (कीन) (ತಾವಕ [ಕೀನ]) (सं) वि.—संबंधिक; आप्त; नातेवाईक; आपापले.
**तावड** (ತಾವಡ) (क) ना.—कमलहार; पुष्पहार.

तावत् (ತಾವತ್) (सं) अ.–त्यावेळीं; तेवढें; तोंपर्यंत; कितीतरी; त्याप्रमाणें.
तावरे (ತಾವರೆ) (क) ना.–कमळ; तामरस.
—कण् (ಕಣ್) (क) ना.–कमळनेत्र.
—कण्ण (ಕಣ್ಣ) (क) ना.–रक्ताक्ष; विष्णु.
—पगेय (ಪಗೆಯ) (क) ना.–चंद्र.
—पसेय (ಪಸೆಯ) (क) ना.–कमलासन; ब्रह्मदेव.
—मनेयळ् (ಮನೆಯಳ್) (क) ना.–लक्ष्मी; कमलांत राहणारी.
तावु (ತಾವು) (क) ना.–आपण; स्थळ; वसति; डेरा; कँप.
ताळ् (ತಾಳ್) (क) धा.–जमविणें; धारण करणें; सहन करणें; दमानें घेणें; खाली उतरणें; बुडणें; वश होणें; घसरणें; मिळवणें.
ताळ् (ತಾಳ್) (क) धा.–स्वीकारणें; स्वाधीन ठेवणें; अनुभवणें; कष्ट घेणें; शांत होणें; निरीक्षणें; कंटाळा न येणें; उत्तमरीतीने धारण करणें; क्षमा करणें; कौतुक वाटणें.
(क) ना.–तालवृक्ष; अडणा; कडी; खील; झाडाचा बुंधा; कणीस; फुलांचा देठ; अवनति; तळ; बुडती; घसरगुंडी.
—उद्द (ಉದ್ದ) (क) वि.–ताडमाड उंच.
—परि (ಪರಿ) (क) ना.–झाडाचा बुंधा; खोड; सोट.
—पार (ಪಾರ) (क) ना.–पाखे; छप्पर; पडवी.
—मे (ಮೆ) (क) ना.–सहनशीलता; शांति, सबूरी.
ताळ (ತಾಳ) (क) ना.–वीत; झांज; टाळ; वजन; वजन मूट; रथाचा खालचा भाग; अर्गल; जीभ; तालवृक्ष.
—गणने (गति) (ಗಣನೆ [ಗತಿ]) (क) ना.–ताल; मात्र.
—धर (ಧರ) (क) धा.–शब्दवेधी; ठेका धरणारा; सम पकडणारा.
ताळवट्ट (ತಾಳವಟ್ಟ) (सं) ना.–ताडपत्री पंखा; व्यजन.
ताळि (ತಾಳಿ) (क) ना.–मांगल्य; मंगळसूत्र; केशकलाप.
ताळि (ळि) का (ತಾಳಿ [ಳಿ] ಕಾ) (सं) ना.–वेळापत्रक; कोष्टक.
ताळिके (ತಾಳಿಕೆ) (क) ना.–सहनशीलता; शांति; समाधान; उपयोगिता; गांभीर्य; जीवन; संसार.
ताळि (ळु) गे (ತಾಳಿ [ಳು] ಗೆ) (क) ना.–टाळू; घसा; गळा.
ताळिद (ತಾಳಿದ) (क) वि.–धारण केलेले; जमलेले.
(क) ना.–परतलेली भाजी; शिजवलेली भाजी; मसालेभाजी.
ताळिसु (ತಾಳಿಸು) (क) धा.–वाचविणें; टिकविणें; घासणें; परतणें; भाजणें; शिजविणें.
(क) ना.–तळभाग; बूड.
ताळु (ತಾಳು) (क) धा.–सहन करणें; धारण करणें; बुडणें; कोसळणें.
(क) ना.–देठ; बुंधा; भ्रम; विस्मरण; अव्यवस्था; अडचण.
ताळे (ತಾಳೆ) (क) ना.–ताळा; कबुली; मान्यता; संधान; पत्रव्यवहार; भिन्न अभिप्रायांतील एकता; कथा.
—नोडु (ನೋಡು) (क) धा.–जुळवून पाहाणें; ताडून पाहणें; मेळ बसविणें; मेळ घालणें.
—बीळु (ಬೀಳು) (क) धा.–मेळ बसणें; जुळून येणें; हिशेब करणें; आलोचन करणें.
ताळुं तट्टुं (ತಾಳುಂ ತಟ್ಟುಂ) (क) अ.–अस्ताव्यस्त होऊन; विखरून; पगळपणें; पसरून; भिरकाटून.
ताळगे (ळुगे) (ತಾಳ್ಗೆ [ಳುಗೆ]) (क) ना.–'ताळिगे' पहा.
ताळद (ತಾಳ್ದ) (क) वि.–धारण केलेला; जमवलेला; जुळलेला
(क) ना.–धारण करणारा.
ताळ्दु (ತಾಳ್ದು) (क) धा.–धारण करणें; जुळणें
(क) अ.–धारण करून; जुळवून.
ताळ्ळु (ತಾಳ್ಳು) (क) ना.–मसालेभाजी; उकडी भाजी; फोडणीची भाजी.
ति (ತಿ) (क) ना.–तीन; त्रि; स्त्रीवाचक कृत्प्रत्यय.
तिक (ತಿಕ) (क) ना.–त्रिकूट; ढुंगण; नितंब.
तिक (ग) डि (ತಿಕ [ಗ] ಡಿ) (क) ना.–त्रिकोण; ओळंबा; समपातळी पाहण्याचें साधन.
तिक्क (ತಿಕ್ಕ) (क) वि.–तीक्ष्ण; चपल; चुरचुरीत; बुद्धिमान.
तिक्कट (ತಿಕ್ಕಟ) (क) ना.–तीक्ष्णता; तिखटपणा; तिखट.
तिक्कलु (ತಿಕ್ಕಲು) (क) ना.–मानसिक अस्वस्थता; वैचारिक गोंधळ; संकटप्राप्ति.
—आट (ಆಟ) (क) ना.–पेचप्रसंग; भांडखोरी; विचाराची सोडवणूक.
तिक्कु (ತಿಕ್ಕು) (क) धा.–घासणें; मर्दन करणें; अडचण उत्पन्न करणें; कठोरपणें वागविणें.
—आट (ಆಟ) (क) ना.–घर्षण; मर्दन; भांडण; घासाघीस; संकट; विघ्न; पेच.
तिक्त (ತಿಕ್ತ) (सं) वि.–तुटलेला; धार लावलेले; पाजळलेलें; तीक्ष्ण.
(सं) ना.–कडूपणा; रुचि; तिखट; तुरट.
—क (ಕ) (सं) ना.–तिखट; कडु; रोहिणी; कडू पडवळ.
तिग (ತಿಗ) (क) ना.–'तिक' पहा.
तिगटु (ತಿಗಟು) (क) ना.–सोपट; साल; उसाचें वाडें.
तिगडु (ತಿಗಡು) (क) धा.–'तिकु' पहा. थरथरणें; कापणें.
(क) ना.–साल; टरफल; (क) वि. अनाकलनीय,; न रुजणारे; दुरुह्य.
तिगरि (ತಿಗರಿ) (क) ना.–कुंभाराचें चाक.

**तिगळ** (ತಿಗಳ) (क) ना.–तामीळप्रांतीय; टकल्या; खल्वाट.
**तिगुड्ड** (डे) (ತಿಗಡ್ಡ [ಡೆ]) (क) ना.–झाडाची साल; छक्की.
**तिगुरि** (ತಿಗುರಿ) (क) ना–'तिगरी' पहा.
**तिगुरू** (ತಿಗುರು) (क) ना.–घासणें; वास घेणें; लेपणें; मर्दन करणें.
(क) ना.–एक सुगंधी द्रव्य.
**तिगुण** (ತಿಗುಣ) (क) ना.–सत्त्व, रज, तम हे तीन गुण.
**तिगुणि** (ತಿಗುಣಿ) (क) ना.–त्रिगुणी; ढेकूण; मत्कुण.
**तिग्गालिग** (ತಿಗ್ಗಾಲಿಗ) (क) ना.–तीनचाकी गाडी 'त्रिचक्रक' पहा.
**तिग्म** (ತಿಗ್ಮ) (सं) वि.–तीक्ष्ण; हुषार; गरम; धारदार; तिखट; टोकदार; उत्तेजक; जळता.
**—अंशु** (+ (ಅಂಶು) } प्रखर किरण असलेला; सूर्य; भास्कर.
**—कर** (+ (ಕರ) }
**तिंगळ्** (ळु) (ತಿಂಗಳ್ [ಳು]) (क) ना.–महिना; चंद्र; चांदणें.
**—अणुग** (ಅಣುಗ) (क) ना.–चंद्रपुत्र; बुध.
**—बेळगु** (ಬೆಳಗು) (क) ना.–चांदणें, चंद्रिका; कौमुदी.
**—सूडिग** (ಸೂಡಿಗ) (क) ना.–चंद्रशेखर; शिव.
**तिंगळिगे** (ತಿಂಗಳಿಗೆ) (क) ना.–गोपीचंदन; तिलक; गंध; टिळा.
**तिजिल** (ತಿಜಿಲ) (क) ना.–चंद्र; एक राक्षस.
**तिट्ट** (ತಿಟ್ಟು) (क) ना.–रास; समूह; परिमाण; गणना; माप; चित्रगृह; टेकडी; पद्धति.
**—इडु** (ಇಡು) (क) धा.–अति चकाकणें; उठून दिसणें; चित्रासारखे दिसणें.
**तिट्टने** (ತಿಟ್ಟನೆ) (क) अ.–गरकन फिरून; घाईघाईनें; भ्रमिष्टपणें; वेगानें; गडबडीनें.
**तिट्टु** (ತಿಟ್ಟು) (क) धा.–शिवी देणें; निंदा करणें; निर्भर्त्सना करणें.
(क) ना.–चढाई; शिवीगाळ; वाऱ्यावरील गोष्ट; टोळ; पतंग.
**तिट्टे** (ತಿಟ್ಟೆ) (क) ना.–'तिट्ट' पहा.
**तिण(णि)कु** } (ತಿಣ [ಣಿ] ಕು) (क) धा.–दम धरून रेटणें;
**तिणुकु** } उचकी लागणें; कष्ट होणें; साहस करणें.
**तिण** (ತಿಣ) (क) ना.–तृण; गवत.
**तिणि** (ತಿಣಿ) (क) ना.–दडपण; दृढबंधन; ठोरभर
**तिंडि** (ತಿಂಡಿ) (क) ना.–खानपान; खाऊ; परिपोषण; खाज; कंडु.
**—गार** (—ಗಾರ) (क) ना.–खादाड; विकारी.
**—पोक** (त) (ಪೋಕ [ತ]) (क) ना.–पोटार्थी; आशाळभूत; खा खा करणारा; खादाड.
**तिण्ण** (ತಿಣ್ಣ) (क) ना.–घनता; सांद्रता; जाडपणा; भार; गुरुत्व; श्रेष्ठता; दाटपणा; भरीवपणा.
**—कोंबु** (—ಕೊಂಬು) (क) ना.–फांदी; मोठी ढापी. मोठा प्रवाह.
**—आगु** (—ಆಗು) (क) धा.–कठीण होणें; घट्ट होणें;
**—ने** (—ನೆ) (क) अ.–अतिशयत्त्वें; अधिकपणें.
**तिण्णु** (ತಿಣ್ಣು) (क) ना.–'तिण्ण' पहा.
**तितवु(ऊ)** (ತಿತವು [ಊ]) (क) ना.–चाळण; गाळणी.
**तिति** (ತಿತಿ) (क) ना.–स्थिति; जीवन; नीतिरीति; अवस्था; तिथि; मुहूर्त; दिन; काल.
**तितिक्षा(क्षे)** (ತಿತಿಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.–सहनशीलता; 'ताळ्मे' पहा.
**तितिक्षु** (ತಿತಿಕ್ಷು) (सं) ना.–सहनशीलता; शांत मनुष्य.
**तित्ति** (ತಿತ್ತಿ) (क) ना.–पोतें; पिशवी; जठर; चर्मवाद्य; भात्याचें वाद्य (पेटी); कातड्याची पिशवी.
**तित्तिरि** (ತಿತ್ತಿರಿ) (क) अ.–दडपून; कोंबून.
(क) ना.–तित्तीर पक्षीण.
**—तुंबु** (ತುಂಬು) (क) धा.–ठासून भरणें; कोंबणें.
**तिथि** (ತಿಥಿ) (सं) ना.–दिवस; श्राद्ध; चांद्रमानातील एक दिवस.
**—क्षय** (—ಕ್ಷಯ) (सं) ना.–तिथिलोप.
**तिदि** (ತಿದಿ) (क) ना.–भाता; 'तित्ति' पहा.
**तिदिकोळलु** (ತಿದಿಕೊಳಲು) (क) ना.–फुंकून वाजविण्याचे वाद्य मुरली; सनई वगैरे सारखे वाद्य.
**तिद्दु** (ತಿದ್ದು) (क) धा.–सारखें करणें; सुधारणें; व्यवस्थित करणें; शिकविणें; दुरुस्त करणें; डागडुजी करणें.
(क) ना.–शिक्षण; सुधारणा; व्यवस्था.
**—पडि,—पाट** (ಪಡಿ, – ಪಾಟ) (क) ना.–खाडाखोड; दुरुस्ती; डागडुजी; शुद्धि.
**तिन्** (न्नु) (ತಿನ್ [ನ್ನು] (क) धा.–खाणें; उकरणें; जेवण करणें; चावणें; भोजन करणें; जखमेचा अनुभव घेणें; अपहार करणें.
**तिन** (नि) **सु** (ತಿನ [ನಿ]ಸು) (क) ना.–न्याहारी; खानपान; खाद्य; नैवेद्य.
**तिना** (न्ना) **ळि** (ತಿನಾ [ನ್ನಾ]ಳಿ) (क) वि.–आशाळभूत; खादाड पोटार्थी; जिव्हालौल्य असलेला.
**तिनिहि** (ತಿನಿಹಿ) (क) ना.–'तिनाळि' पहा.
**तिनिसु** (ತಿನಿಸು) (क) ना.–'तिनसु' पहा.
**तिंतिडि** (ತಿಂತಿಡಿ) (क) ना.–चिंच, चिंचेचे झाड.
**तिंतिणि** (त्रिणि) (ತಿಂತಿಣಿ [ತ್ರಿಣಿ]) (क) ना.–चिंच; समह; ओळ; घडण.
**तिंतिणिसु** (ತಿಂತಿಣಿಸು) (क) धा.–एकत्र होणें; जबरदस्तीनें शिरणें.
**तिंति** (त्रि) **णीक** (ತಿಂತಿ [ತ್ರಿ] ಣೀಕ) (क) 'तिंतिणि' पहा.

तिंदुक (ತಿಂದುಕ) (क) ना. – 'तुंबुक' पहा.
तिन्न (ತಿನ್ನ) (क) वि. – उच्छिष्ट; उष्टें; खाऊन उरलेलें.
तिपुर (ತಿಪುರ) (क) ना. – त्रिपुर; राक्षसाचें नांव; त्रिपुरासुराची तीन नगरें.
—अरि—अंतक (ಅರಿ [ಅಂತಕ]) (क) ना. – त्रिपुरे जाळणारा, त्रिपुराचा वध करणारा, शिव.
तिपुरवगे (ತಿಪುರವಗೆ) (क) ना. – त्रिपुरारि शिव.
तिप्प (प्पे) (ತಿಪ್ಪ [ಪ್ಪೆ]) (क) ना. – गार; गाईर; पेव; उकीरडा; केराचा ढीग.
तिप्पुळ् (ತಿಪ್ಪುಳ್) (क) ना. – पक्षाच्या अंगावरील केस; पर; पिसारा; पीस.
तिब्ब (ತಿಬ್ಬ) (क) ना. – वेग; गडबड; तीव्रता.
तिब्बळि (ತಿಬ್ಬಳಿ) (क.) ना. – भान; स्मरण; ज्ञान; समजूत; बोध; जाणीव.
तिब्बु (ತಿಬ್ಬು) (क) ना. – बाणाची दोरी, मौर्वी; ज्या; भ्रमंती; फेरफटका.
तिमि (ತಿಮಿ) (क) धा. – टोचणें; मोसकणें; खुपसणें.
(क) ना. – मोठा मासा; तिमींगिल जातीचा मासा.
तिमिंगिल (ತಿಮಿಂಗಿಲ) (क) ना. – एक प्रकारचा मोठा मासा.
तिमित (ತಿಮಿತ) (क) वि. – स्तिमित; स्थिर; गप्प बसणारा; अवाक्.
तिमिर् (रु) (ತಿಮಿರ್ [ರು]) (क) धा. – कातडें सोलून कमावणे; लेपणें; लावणें; गुंतवणें.
(क) ना. – सुगंधी द्रव्य; मस्ती; दर्प; खाद्य पदार्थ.
तिमिर (ತಿಮಿರ) (सं) ना. – अंधार; धुकें; एक नेत्ररोग; अज्ञान; तमोगुण; दुःख; शोक; राहु; मूढ; कपट.
—रिपु–वैरि (ರಿಪು, ವೈರಿ) (सं) ना. – सूर्य; ज्ञान.
तिंबु (ತಿಂಬು) (क) धा. – भरवणें; जेऊ घालणें; खावविणें; जेवविणें.
तिम्म (ತಿಮ್ಮ) (क) ना. – तिरुमलेश्वर; तिमप्पा; माकड.
तिर (ತಿರ) (क) वि. – स्थिर; अचल; न फिरणारा,
तिरक (ತಿರಕ) (क) ना. – भटक्या; फिरस्ता; भिक्षुक; तिलक.
तिर (रु) पे (ತಿರ [ರು] ಪೆ) (क) ना. – भ्रमंती; भटकंती; भिक्षा; वर्षासन.
तिरश्चीन (ತಿರಶ್ಚೀನ) (सं) वि. – आडवा; तिरवा; वाकडातिकडा.
(सं) ना. – मादी पशु.
तिरस् (रः) (ತಿರಸ್ [ರಃ]) (सं) अ. – शिवाय; पर्यायानें; एकांतीं.
(सं) ना. – तिरस्कार; पडदा; झाकण.
तिरस्करण (ತಿರಸ್ಕರಣ) (सं) ना. – तिरस्कार; घसरगुंडी; हिणवणूक; शाप; अनादर; शिवीगाळ.
तिरस्करिणि (णी) (ತಿರಸ್ಕರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना. – लाट; पडदा; पांघरूण; झाकण; मायाविद्या.
—विद्या (ವಿದ್ಯೆ) (सं) ना. – मायाविद्या; संमोहनास्त्र; मोहिनीमंत्र; वशीकरण,
तिरस्करिसु (ತಿರಸ್ಕರಿಸು) (क) धा. – अपमान करणें; निंदा; करणें; तिरस्कारणें; खालीं ओढणें; नीच स्थितीला नेणें.
—इके (ಇಕೆ) (क) ना. – अपमान; निंदा; शिवी; प्रत्याख्यान
तिरस्कृत (ತಿರಸ್ಕೃತ) (सं) वि. – अपमानित; निंदित; त्यक्त.
तिरि (ತಿರಿ) (क) धा. – भटकणें; हलणें; भिक्षा मागणें; तुकडे करणें; चिरणें; फुलें वेचणें; कापणें; वाकविणें; हिसकणें; बदलणें.
(क) ना. – बांक; मोडतोड; भिक्षाटन;
—क (ಕ) (क) ना. – भिक्षेकरी; भटक्या.
—कूळ् (ಕೂಳ್) (क) ना. – कोरडी भिक्षा; भिक्षा; यज्ञप्रसाद.
—तिन् (ತಿನ್) (क) धा. – भिक्षेवर उपजीविका करणें.
तिरिकल्लु (ತಿರಿಕಲ್ಲು) (क) ना. – गार; गारवी; गारा; छप्पा; वज्री.
तिरिके (ತಿರಿಕೆ) (क) ना. – भिक्षाटण; भीक; भिक्षा; फिरती.
तिरिचु (ತಿರಿಚು) (क) धा. – पीळ घालणें; पिळणें; पिरगळणें; मोडणें; सूत गुंतवणें.
तिरिसुळि (ತಿರಿಸುಳಿ) (क) ना. – त्रिशूळधारी; शिव; डोह; पाण्याचा सांठा.
तिरिपु } (ತಿರಿಪು) } (क) ना. – मोडतोड; गुंडाळी; फिरती;
तिरुहु } (ತಿರುಹು) } वेढा.
तिरु (ತಿರು) (क) ना. – मोडतोड; मौर्वी; प्रत्यंचा; फिरती; पीळ; विनिमय; मागणी; मंगलकर.
—पु (ಪು) (क) ना. – भटकण; भ्रमंती; फिरती; वळण; फेरा.
—वु (ವು) (क) ना. – वक्रता; मौर्वी; पाणवठा.
—हु (ಹು) (क) ना. – फेरा; वक्रता.
तिरुक (ತಿರುಕ) (क) ना. – फिरस्ता; भिक्षेकरी; भिकारी.
—इ (ಇ) (क) ना. – भिक्षेकरीण; भिकारीण.
तिरुकुळी (ತಿರುಕುಳಿ) (क) ना. – भिक्षा मागत फिरणारा; चिरप्रवासी; घुमक्कड.
तिरुगणे (ತಿರುಗಣೆ) (क) ना. – मंगळसूत्र.
—मुडु (ಮುಡು) (क) ना. – तलाव; तडाग; सरोवर.
तिरुगणिकील (ತಿರುಗಣಿಕೀಲ) (क) ना. – बिजागरें; खीळ.
तिरुगु (ತಿರುಗು) (क) धा. – फिरविणें; हलविणें; वाकविणें.
—मुरुगु (ಮುರುಗು) (क) अ. – आगेमागें; आरूनफिरून; मागेंपुढें.
तिरुचूर्ण (ತಿರುಚೂರ್ಣ) (सं) ना. – वैष्णवांचें मुद्रादान; तीट; गंध; अक्षंति.

**तिरुनाम** (ತಿರುನಾಮ) (सं) ना.—त्रिपुंड्र; कपाळावरील गंधाच्या तीन उभ्या रेषा.
**तिरुनीर** (ತಿರುನೀರ) (सं) ना.—पवित्र जल; तीर्थ.
**तिरुपळि** (ತಿರುಪಳಿ) (क) वि.—मंगळसूत्र असलेली.
—**ओले** (ಓಲೆ) (क) ना.—कर्णफूल; कर्णभूषण.
—**हु** (ಹು) (क) ना.—कर्णफूल.
**तिरुपु** (**हु**) (ತಿರುಪು [ಹು]) (क) धा.—फिरणें; फिरविणें.
**तिरुपे** (ತಿರುಪೆ) (क) ना.—भिक्षाटन; भ्रमंती.
**तिरुंबु** (ತಿರುಂಬು) (क) धा.—फिरविणें; फेरा घालणें; प्रदक्षिणा घालणें.
**तिरुवाय्** (ತಿರುವಾಯ್) (क) ना.—बाणाची दोरी; मौर्वी; प्रत्यंचा.
**तिरुविल्** (ತಿರುವಿಲ್) (क) ना.—बाण; मौर्वी, प्रत्यंचा.
**तिरुवु** (ತಿರುವು) (क) ना.—फेरा; प्रदक्षिणा; मौर्वी.
**तिरुवोय्** (ತಿರುವೊಯ್) (क) धा.—बाण लावणें; प्रत्यंचा चढविणें; धनुष्याला दोरी लावणें.
**तिरुवोय्लु** (ತಿರುವೊಯ್ಲು) (क) ना.—टणत्कार; झंकार.
**तिरुळ्** (**ळ**) (ತಿರುಳ್ [ಳು]) (क) ना.—सार; रहस्य; तत्व; गर; बल.
**तिरे** (ತಿರೆ) (क) ना.—भूमि; धात्री; धरणी.
**तिरोधान** (ತಿರೋಧಾನ) (सं) ना.—झाकण; गुप्तता; खंडन; अंतर्धान.
**तिरोहित** (ತಿರೋಹಿತ) (सं) वि.—गुप्त; सुप्त; लपलेला; मुजलेला; झाकलेला; (जखम) भरून आलेला.
**तिरोहिसु** (ತಿರೋಹಿಸು) (क) धा.—झाकणें; लपविणें; अंतर्धान पावणें; खंडन करणें.
**तिर्चु** (ತಿರ್ಚು) (क) धा.—संपविणें; तड लावणें; शेवटास नेणें.
**तिर्दु** (ತಿರ್ದು) (क) धा.—दुरुस्त करणें; सरळ करणें; नीट करणें; सुधारणें.
—**उंपोरि** (ಉಂಪೋರಿ) (क) ना.—साद करावयाचा बैल; वळण लावण्याचा पोळ; वठणीवर आणण्याचें जनावर.
**तिर्यक्** (ತಿರ್ಯಕ್) (सं) वि.—वाकडातिकडा; तिरकस.
—**गामी** (—ಗಾಮಿ) (सं) ना.—खेकडा; दुष्ट मनुष्य; वाकडे पाऊल टाकणारा पक्षी, पशु.
—**लोक** (—ಲೋಕ) (सं) ना.—भूलोक; मृत्युलोक.
—**पुष्प** (—ಪುಷ್ಪ) (सं) ना.—करंजवृक्षाचें फूल.
**तिर्रने** (ತಿರ್ರನೆ) (क) अ.—गिर्कन; गिर्की मारून; चक्राकार फिरून.
**तिल** (ತಿಲ) (सं) ना.—तीळ; एक गळित धान्य; अंगावरील तीळ; लहानसा डाग; क्षुरक.
**तिलक** (ತಿಲಕ) (सं) ना.—त्रिपुंड्र; टिळा; अभक्षण; एक घोड्याची जात; फुप्पुस; मूत्रकोश.
**तिलघातक** (ತಿಲಘಾತಕ) (सं) ना.—तेली; तेलारी.
**तिलज** (ತಿಲಜ) (सं) ना.—तिळेल; तिळाचें तेल; गोडेल.
**तिलंतुद** (ತಿಲಂತುದ) (सं) ना.—तेली; तेल काढणारा.
**तिलपर्ण** (ತಿಲಪರ್ಣ) (सं) ना.—त्रिगंध; तर्पेणतेल; टर्पेंटाइन
**तिलपर्णि** (ತಿಲಪರ್ಣಿ) (सं) ना.—रक्तचंदन; कुचंदन.
**तिलभामिनि** (**नी**) (ತಿಲಭಾಮಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—मालती; मोगरा; जातिपुष्प; जायफळ; जायपत्र.
**तिलप्राय** (ತಿಲಪ್ರಾಯ) (सं) अ.—तिलमात्र; तिळाएवढेंहि; स्वल्पसुद्धा; थोडेंदेखील.
**तिलशः** (ತಿಲಶಃ) (सं) अ.—कणाकणानें भरून.
**तिलोत्तमे** (ತಿಲೋತ್ತಮೆ) (सं) ना.—स्वर्गीय अप्सरा.
**तिलोदक** (ತಿಲೋದಕ) (सं) ना.—मृताच्या स्मरणार्थ केलेलें तिल तर्पण; तिलांजलि.
**तिलौदन** (ತಿಲೌದನ) (सं) ना.—तिळ–तांदुळ–तुपाची वाटी.
**तिल्लान** (**ण**) (ತಿಲ್ಲಾನ [ಣ]) (सं) ना.—संगीतांतील तराणा; एक नृत्यविशेष.
**तिल्व** (ತಿಲ್ವ) (सं) ना.—लोध्रवृक्ष; हुरा; एक औषधी वनस्पति.
**तिवदि** (ತಿವದಿ) (क) ना.—त्रिपदी; तिवई; तिकाटणें; सर्वज्ञ कवीची त्रिपदि रचना.
**तिवळि** (ತಿವಳಿ) (क) ना.—स्त्रीच्या पोटावरील तीन वळया; तिपदरी माळ.
**तिवासि** (ತಿವಾಸಿ) (क) ना.—मऊ अंथरूण; गादी; जमखाना; लोड.
**तिवि** (ತಿವಿ) (क) धा.—टोचणें; भोसकणें; ठोसा देणें; मारणें; ओढणें; गळ्यांतील पट्टा सैल करणें.
—**त** (ತ) (क) ना.—टोचणी; आक्रमण.
**तिवुडे** (ತಿವುಡೆ) (क) ना.—त्रिपुट; कवितेंतील एक छंद; दीपचंदी ठेका; बिलंदी ताल.
**तिष्ठिसु** (ತಿಷ್ಠಿಸು) (क) धा.—स्थिर करणें; थांबविणें; स्थापणें; प्रतिष्ठापणें.
**तिष्टे** (ತಿಷ್ಟೆ) (सं) ना.—विराम; स्थापना.
**तिष्य** (ತಿಷ್ಯ) (सं) ना.—कलियुग; पौषमास.
**तिष्यरक्षिते** (ತಿಷ್ಯರಕ್ಷಿತೆ) (सं) ना.—अशोकराजाची पत्नि.
**तिसर** (ತಿಸರ) (क) ना.—त्रिसर; मोत्याचें तिपदरी पेंडें; एक राक्षस.
**तिसुळ** (ತಿಸುಳ) (क) ना.—त्रिशूळ; तीन टोकांचें आयुध.
**तिसुळि** (ತಿಸುಳಿ) (क) ना.—त्रिशूळधारी शंकर; तिकाटणें; तिपाई; अडणी.
**तिळि** (ತಿಳಿ) (क) धा.—समजून घेणें; पटणें; पटवून घेणें; समजणें; बुद्धि येणें.

(क) ना.–स्वच्छ पाणी; कांजी; समज; ज्ञानप्रकाश; स्वच्छता.
—पु,–(वु),–(हु) (ಪು [ವು] [ಹು]) (क) धा.–समजावणें; स्वच्छ करणें; समाधान करणें.
(क) ना.–जाणीव; समजूत.
—सु (ಸು) (क) धा.–सांगणें; माहिती देणें; समजून सांगणे.
—कोळ (ಕೊಳ್) (क) ना.–स्वच्छ पाण्याचें सरोवर; समजूत; ज्ञान; निर्मिति; पू.
—वळिके (ವಳಿಕೆ) (क) ना.–माहिती; ज्ञान; बुद्धिमत्ता; समजूत.

**तिळिवेळ्** (ತಿಳಿವೇಳ್) (क) धा.–जाणीव देणें; माहिती देणें; खुलासा करणें.

**ती** (ತೀ) (क) धा.–गाळणें; भाजणें; पोळणें.
(क) ना.–अग्नि; निखारा; इंगळ.

**तीक्ष्ण** (ತೀಕ್ಷ್ಣ) (सं) वि.–धारदार; चुरचुरीत; चपळ; कडु; कठिण.
(सं) ना.–ऊब; तिखट; विष; युद्ध; लोखंड; त्वरा; तांबडा कांदा.
—अंशु,–रश्मि (ಅಂಶು, ರಶ್ಮಿ) (सं) ना.–सूर्य; उष्ण किरण असलेला.
—कंद (ಕಂದ) (सं) ना.–कांदा.
—गंध (ಗಂಧ) (सं) ना.–मोहरी; प्रखर दर्प असलेली.
—तर (ತರ) (सं) वि.–प्रखर; अधिक तीक्ष्ण.
—दंष्ट्र (ದಂಷ್ಟ್ರ) (सं) ना.–वाघ.
—पुष्प (ಪುಷ್ಪ) (सं) ना.–लवंग.
—लोह (ಲೋಹ) (सं) ना.–पोलाद.

**तीक्ष्णोपाय** (ತೀಕ್ಷ್ಣೋಪಾಯ) (सं) ना.–उग्र इलाज; जबरदस्ती.

**तीट** (ತೀಟ) (क) ना.–वाऱ्याचा झोत; सुधारणा; फुंकर; खाजकुलती.

**ती (तीं) टे** (ತೀ (ತೀಂ) [ಟೆ]) (क) ना.–खाज; हुरहूर; अत्यापेक्षा; चापल्य; कामुकता.
—गार (ಗಾರ) (क) ना.–भांडण लावणारा; चहाडखोर; कामुक.

**तीडु** (ತೀಡು) (क) धा.–शुद्ध करणें; दळणें; फुंकणें; स्पर्श करणें; ढकलणें; गळा दाबणें; घासणें; धार लावणें; व्यापणें; पीळ घालणें; सुरळी नीट करणें.

**तीन्** (ತೀನ್) (क) ना.–खाज; कामुकता; हुरहूर; अत्यापेक्षा.

**तीनाळि** } (ತೀನಾಳಿ) (क) ना.–खादाड; खाबू; खावबा;
**तीनिहाळि** } (ತೀನಿಹಾಳಿ) पोटार्थी.

**तीनु** (ತೀನು) (क) ना.–कुंपणाचा खांब; खुंटा; खुंटी.

**तीबु** (ತೀಬು) (क) ना.–लवंग; देवकुसुम; भरणी; माधुरी; रुचि.

**तीर्** (ತೀರ್) (क) धा.–संपविणें; शेवट लावणें; मरणें; थांबविणें; विलंब करणें; मिरवणें; साध्य होणें; देणें; निश्चय करणें; परिणाम होणें; रोग नाहींसा होणें; त्यागणें; दिवाळे निघणें.
—अचुं (क) धा.–संपविणें; तड लावणें.
—पु (ಪು) (क) ना.–ठराव; शेवट; परिणाम.
—मे (ಮೆ) (क) ना.–समाप्ति; मुक्ति; पूर्ति; शेवट.

**तीर** (ತೀರ) (सं) ना.–किनारा; बाजू; काठ; बाण; माहेर; चीड

**तीरमे** (ತೀರಮೆ) (क) ना.–निर्णय; अनुभव; पूर्णता; विचार.

**तीरिके** (ತೀರಿಕೆ) (क) ना.–समाप्ति; समारोप; निर्णय; मध्यंतर; विश्रांति; मधली सुट्टी.

**तीरिकोलु** } (ತೀರಿಕೊಳು) (क) धा.–मरणें; संपणें.
**तीरकोलु** } (ತೀರಕೊಳು)

**तीरित** (ತೀರಿತ) (सं) वि.–निश्चित; प्रत्यक्ष; निर्णीत; सुधारलेले; सारखे केलेलें.

**तीरु** (ತೀರು) (क) धा.–'तीर्' पहा.
(क) ना.–निर्णय; ठराव; व्यवस्था; स्थापना; अंत; बाण; कडें; सौंदर्य; मुक्तता; समाप्ति; समारोप.
—पडे,–पाटु (ಪಡೆ, – ಪಾಟು) (क) ना.–विश्रांति; प्रसंग; संनिवेश; सुटका; सोडवणूक.
—मान (ಮಾನ) (क) ना.–निर्णय; निकाल; ठराव.

**तीरे** (ತೀರೆ) (क) ना.–कृमिकीटक; किडा; जंतु.

**तीर्कणे** (ತೀರ್ಕಣೆ) (क) ना.–समारोप; अंत; अवभृत.

**तीर्ण** (ತೀರ್ಣ) (सं) वि.–पार झालेलें; तरंगलेलें; वाहत गेलेले; निघालेले.

**तीर्थ** (ತೀರ್ಥ) (सं) ना.–पवित्र जल; पूज्य; गुरु; मार्ग; सोपान; नदीकाठ; पुण्यक्षेत्र; पवित्र वस्तु; नदी; तटाक; पवित्र शास्त्र; दार्शनिक शिक्षण; सत्पात्रता; योग्यता; कुलीनता; ब्राह्मण; राज्यमंत्री; मुनि; यति; विद्वान; पतिव्रता; पताका; बावटा; जिन.
—कर (ಕರ) (सं) ना.–जैन साधु; तीर्थंकर; अर्हंत;
—जळ (ಜಲ) (सं) ना.–पादोदक; पवित्र स्थाळीचे पाणी; तीर्थ यात्रा; प्रशंसा.
—रूप (ರೂಪ) (सं) ना.–पितृगौरव.
—स्वरूप (ಸ್ವರೂಪ) (सं) ना.–पित्याप्रमाणें; पूज्य असलेले; गुरुजन; वडीलधारे.

**तीर्पु** (ತೀರ್ಪು) (क) ना.–तीर; मार; निर्धार; निर्णय.

**तीर्मान** (ತೀರ್ಮಾನ) (सं) ना.–न्यायदान; समाप्ति.

**तीर्वे** (ತೀರ್ವೆ) (क) ना.–कर; फाळा; खंड; दावणी.

**तीवु** (ತೀವು) (क) धा.–भरणें; भरविणें; ठेवणें; अधिक होणें; भरून घेणें; विस्तार करणें. रुंदकरणें; पूर्ण होणें; दाट होणें; उकरणें.

**तीव्र** (ತೀವ್ರ) (सं) वि.–वेगवान; लौकर; बलिष्ठ; भयानक; हिंसात्मक; उग्र; धारदार; ताळमेळ नसलेला; उष्ण; निष्ठुर; सहनशक्ति नसलेला; अतिचपल; पुरोगामी.

—**कोळ्** (ಕೊಳ್) (क) धा.–धारदार होणें; आतुर होणें; प्रखर होणें.

—**त्व** (ते) (ತ್ವ [ತೆ]) (क) ना.–गडबड; दौड; आतुरता; तीव्रपणा.

**तु** (ತು) (सं) अ.–परंतु; पण; तरी; किंतु.

**तुक** (**क्क**) **डि** (ತುಕ [ಕ್ಕ] ಡಿ) (क) ना.–तुकडा; चूर; खंड; विभाग; पक्ष; सैन्यविभाग.

**तुक्कु** (ತುಕ್ಕು) (क) धा.–दपसणें; कोंबणें; एकत्र करणें; गोळा करणें; वेढा घालणें; पांघरूण घेणें; मुस्कट मारणें.

(क) ना.–लोखंडावरील जंग; गंज, बुरशी.

**तुक्त** (**तुक्**) (ತುಕ್ತ [ತುಕ್]) (क) ना.–वत्स; बालक; अर्भक;

**तुंग** (ತುಂಗ) (सं) वि.–उंच; उन्नत; श्रेष्ठ; प्रमुख; लांबट; दीर्घ; बलिष्ठ; विकारी.

(क) ना.–तुंगभद्रानदी; पर्वत; गिरी; बुधग्रह; नारळाचें झाड.

—**शेखर** (ಶೇಖರ) (सं) ना.–पर्वत.

—**कुचे** (ಕುಚೆ) (क) ना.–उन्नत स्तनाची तरुणी; पीनस्तनी; उरोजा.

**तुंगभद्र** (ತುಂಗಭದ್ರ) (सं) ना.–मंगलकर हत्ती.

**तुंगभद्रा** (**द्रे**) (ತುಂಗಭದ್ರಾ [ದ್ರೆ]) (सं) ना.–कृष्णानदीची उपनदी; तुंगभद्रा.

**तुंगा** (ತುಂಗಾ) (सं) ना.–तुंगभद्रा; गोड्या पाण्याची प्रसिद्ध नदी.

**तुंगि** (**गी**) (ತುಂಗಿ [ಗೀ]) (सं) ना.–रात्र; हळद.

—**ईश** (ಈಶ) (सं) ना.–चंद्र; सूर्य; शिव; कृष्ण.

**तुच्छ** (**च्छक**) (ತುಚ್ಛ [ಚ್ಛಕ]) (सं) वि.–शून्य; व्यर्थ; लहान; निंद्य; नगण्य; तिरस्करणीय; हीन. 'तेरबु' पहा.

**तुच्छीकरिसु** (ತುಚ್ಛೀಕರಿಸು) (क) धा.–निंदणें; तुच्छ लेखणें; हीन समजणें; घसरविणें.

**तुंज** (ತುಂಜ) (सं) ना.–वज्रायुध.

**तुटार** (ತುಟಾರ) (क) वि.–तुटक; तुटलेले; खर्चलेले; निष्प्रयोजक; संबंधहीन.

(क) ना.–तिरस्कार; निंदा; अविचारी.

**तुटि** (ತುಟಿ) (क) ना.–ओठ; ओष्ठ; अधर.

**तुट्टि** (ತುಟ್ಟಿ) (क) ना.–महागाई; टंचाई; वाण; दुर्मिळता; घट; अनर्धता; बलहीनता; शक्तिक्षय.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.–बलहीन होणें; अशक्त होणें; हानी होणें; क्षीण होणें; नाश होणें.

**तुडि** (ತುಡಿ) (क) धा.–पाठीं लागणें; चढून जाणें; पळविणें.

(क) ना.–चोरीची वस्तु; चोरीचा माल.

**तुडिके** (ತುಡಿಕೆ) (क) ना.–अडी; फळागार; फळपिकवण.

**तुडि** (**डु**) **गे** (ತುಡಿ [ಡು] ಗೆ) (क) ना.–आभरण; दागिना; वापरण्याची वस्त्रे.

**तुडिसु** (ತುಡಿಸು) (क) ना.–शृंगारणें; वापरणें; अंगावर घेणें; घालणें; धारण करणें.

**तुडु** (ತುಡು) (क) ना.–गोळा करणें; धारण करणें; धनुष्याला बाण लावणें; शृंगारणें; चोरी करणें; लुटणें; हिसकावणें.

—**तिन्नि** (ತಿನ್ನಿ) (क) वि.–चोरून खाणारा.

**तुडुकु** (ತುಡುಕು) (क) धा.–एकदम हात घालून घेणें; अंगावर बळजोरीने हुसकणें; हुडकणें; पळविणें; धारण करणें; जाणें;

—**आडु** (ಆಡು) (क) धा.–हुडकणें; पळापळीचा खेळ करणें.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.–बलात्कारानें घेणें; लुटणें; लूट करविणें.

**तुडुकुगाय** (ತುಡುಕುಗಾಯ) (क) ना.–हातावरील जखम.

**तुडुकुगुदुरे** (ತುಡುಕುಗುದುರೆ) (क) ना.–लगाम लावलेला; घोडा.

**तुडुकुळि** (ತುಡುಕುಳಿ) (क)ना.–दरवडेखोर; लुटारू; घरफोड्या.

**तुडुकुवेळगु** (ತುಡುಕುವೆಳಗು) (क) ना.–जोडबत्ती; जोडदिवा; द्विज्योति.

**तुडु** (**ड**) **ग** (ತುಡು [ಡ] ಗ) (क) ना.–चोर; दरवडेखोर; कपटी; वंचक; फसव्या.

**तुडुगु** (ತುಡುಗು) (क) ना.–दरोडा; चोरी; फसवणूक; चोरीचा माल.

**तुडुगुणि** (ತುಡುಗುಣಿ) (क) ना.–चोरी करणारा; गुरेचोर; जनावर चोरणारा.

**तुडुगे** (ತುಡುಗೆ) (क) ना.–वस्त्रप्रावरण; आभरण; वापरावयाचा कपडा; अलंकार.

**तुडुंकु** (ತುಡುಂಕು) (क) धा.–'तुडुकु' पहा.

**तुडुपु** (ತುಡುಪು) (क) ना.–नाव चालविण्याचे वल्हें; लाकडी पळी; डाव; चमचा.

**तुडुबु** (ತುಡುಬು) (क) ना.–एक वाद्य; ढोल.

**तुडुवे** (ತುಡುವೆ) (क) ना.–मधमाशी.

**तुण** (**णु**) **कु** (ತುಣ [ಣು] ಕು) (क) धा.–तुडविणें; तुडुंब भरणें.

(क) ना.–तुकडा; चूर.

**तुंट** (ತುಂಟ) (क) ना.–भांडखोर; दुर्गुणी; उपद्रवी; चेष्टेखोर; राबणारा; मेहनती.

—**तन** (ತನ) (क) ना–नीचपणा; चेंगटपणा; चालढकल; भांडखोरपणा.

**तुंड** (ತುಂಡ) (क) ना.–चंचु; चोंच; नाभी; बेंबी.

तुंडरसु (ತುಂಡರಸು) (क) धा.–तोडणें; तुकडे तुकडे करणें.
(क) ना.–सामंत; पाळेगार; लहान मालक.
तुंडरिसु (ತುಂಡರಿಸು) (क) धा.–कातरून तुकडे करणें.
—के (– ಕೆ) (क) ना.–बारीक कातरण.
तुंडि (ತುಂಡಿ) (सं) ना.–'तुंड' पहा.
तुंडिके } (ತುಂಡಿಕೆ)
तुंडिकेरि (शि) } (ತುಂಡಿಕೇರಿ [ಶಿ]) (क) ना.–तोंडलें; बिंबा; तोंडलीचा वेल.
तुंडिभ (ತುಂಡಿಭ) (सं) ना.–मोठी बेंबी असलेला; ढेरपोट्या.
तुंडिल (र) (ತುಂಡಿಲ [ರ]) (सं) वि.–तुंदिल; ढेरपोट्या. मोठी बेंबी असलेला; वाचाळ; निष्ठुर; निर्दय.
तुंडिसु (ತುಂಡಿಸು) (क) धा.–तुकडे पाडणें; कातरणें.
तुंडु (ತುಂಡು) (क) ना.–चूर; लव; खंड; खांडके; तुकडा; चिंधी; नीचस्थिति; क्षुद्रता; अविवेक.
—किडी (—ಕಿಡಿ) (क) ना.–ठिणगी; स्फुलिंग.
—गेय् (—ಗೆಯ್) (क) धा.–कातरणें; तुकडे करणें.
—दोरे (ದೊರೆ) (क) ना.–पाळेगार; सामंत. छोटा मालक.
तुति (ತುತಿ) (क) ना.–स्तुति; वाखाणणी; अहंकार; बढाई; स्तोत्र; पूजा.
—इसु (—ಇಸು) (क) धा.–वर्णन करणें; बढाई मारणें.
तुत् (त्तू) रि (ತುತೂ [ತ್ತೂ] ರಿ) (क) ना.–तुतारी; शिंग; फुंकून वाजवण्याचे वाद्य.
तुत्ततुदि (ತುತ್ತತುದಿ) (क) ना.–अगदीं शेवटचें स्थान. शेवट; टोक.
तुत्तु (ತುತ್ತು) (क) धा.–घास घेणें; गिळणें; खाणें; रवंथ करणें.
(क) ना.–घास; आहार; कवळ; आहुति; चरू; हविष्य.
—गोळ् (उंगोळ्)(ಗೊಳ್ [ಉಂಗೊಳ್])(क) धा.–बकाणा भरणें; तोंडभर खाणें; जेवणें.
तुत्ते (ತುತ್ತೆ) (क) ना.–मोरचूद; दगड; फरशी; लादी.
तुत्थ (ತುತ್ಥ) (सं) ना.–'तुत्ते' पहा.
तुद (दन) (ತುದ [ದನ]) (क) ना.–दुखणें; ठणका; टोचणी; चावा; मार; मुका मार.
तुदि (ತುದಿ) (क) ना.–अग्रभाग; वरचें टोक; कड; वरचा थर; अंतिम थर; अतिशयता; हत्तीच्या सोंडेचें टोक.
—केय (क) ना.–मनगट; हत्तीच्या सोंडेचें टोक.
—कोडु (ಕೋಡು) (क) ना.–श्रृंगाग्र; शिखर; शिंगाचें टोक.
—नेले (ನೆಲೆ) (क) ना.–सर्वात वरचा मजला.
—बाल (ಬಾಲ) (क) ना.–केसाचें अग्र; केसाचा शेवटचा भाग.
—मोदल (ಮೊದಲ) (क) ना.–मूळारंभ; प्रारंभ; सुरुवात.
तुंतुरु (र) (ತುಂತುರು [ರ್]) (क) ना.–बारीक थेंब; तुषार; थेंबथेंब; झिमझिम.
—पनि (ಪನಿ) (क) ना.–भुरभूर; झिमझिम; पाण्याचा फवारा; प्रोक्षण; अवहेलना; ओकारी.
तुंद (ತುಂದ) (सं) ना.–ढेरपोट; मोठें पोट; दोंद.
तुंदि (ತುಂದಿ) (सं) ना.–मोठी बेंबी.
—क (ಕ) (सं) वि.–तुंदिल; मोठी बेंबी असलेला.
तुंदिल (ತುಂದಿಲ) (सं) वि.–भरलेलें; कोंबलेलें.
(सं) ना.–ढेरपोट्या.
तुन्न (ತುನ್ನ) (सं) वि.–दुखविलेला; जखमी; पीडित; भोसकलेला; घायाळ; चावलेला.
तुन्नवाय (ತುನ್ನವಾಯ) (सं) ना.–शिंपी; दर्जी; कपडे शिवणारा.
तुप (प्प) ट } (ತುಪ [ಪ್ಪ]ಟ (क) ना.–पक्षाचे पर; पक्षाच्या
तुप्पळ } (ತುಪ್ಪಳ) अंगावरील मऊ केस; लव; पीस; लोकर.
तुपा (बा) क (की) (ತುಪಾ [ಬಾ] ಕ [ಕಿ]) (अ. दे.) ना.–बंदूक; गोळी घालण्याचें साधन; 'कोवि' पहा.
तुप्पुळ् (ळु) (ತುಪ್ಪುಳ್ [ಳು]) (क) ना.–'तुप्पट' पहा.
तुब्बु (ತುಬ್ಬು) (क) धा.–कोरून देणें; खूण करणें; हुडकून देणें; शोध करणें.
(क) ना.–हुडकणी; निर्दिष्टता; अंगुलीदर्शन; अंगुलीनिर्देश.
तुमुरु (ತುಮುರು) (क) ना.–चूर; तुकडा; कळ; तळ; बूड.
—आगु (ಆಗು) (क) धा.–चुरचूर होणें; तुकडे होणें.
तुमुल (ತುಮುಲ) (सं) ना.–गोंधळ; गडबड; भयंकरता; कोलाहल; बिनबुडाचे भांडण.
—युद्ध (ಯುದ್ಧ) (सं) ना.–चुरशीचे युद्ध; हमरीतुमरीची लढाई.
तुमुळ् (ತುಮುಳ್) (क) धा.–चेतविणें; जागे होणें; नवा जोम येणें. 'चेंतरिसु' पहा.
तुंब (बा) (ತುಂಬ [ಬಾ]) (क) अ.–पूर्णपणें; पुष्कळ; पुरें; अखंडत्वेकरून.
(क) ना.–कोहाळा; काळा भोपळा.
तुंबर (ತುಂಬರ) (क) ना.–एक पक्व फळ; एक शिवगण; एका जातीचें पांढरें गवत.
तुंबि (ತುಂಬಿ) (क) अ.–भरून; पूर्ण होऊन.
(क) ना.–भुंगा; भ्रमर; मधमाशी; तेरडा; एक फुलझाड.
—कुरुळ (ಕುರುಳ) (क) ना.–काळे कुरळे केस.
—हाडु (ಹಾಡು) (क) ना. गुंजारव; झंकार; तुंबिध्वनि.

**तुंबितुळुकु** (ತುಂಬಿತುಳುಕು) (क) धा.–तुडुंब भरणें; कांठोकांठ भरणें; उत्साहाला भरतें येणें.

**तुंबु** (ತುಂಬು) (क) धा.–संपविणें; पूर्ण होणें; व्यापणें; वाढणें ठेचून भरणें. 'तुरुगु' पहा.
(क) ना.–देठ; गाडीच्या चाकाचा गड्डा; बेंबी; परिहार; जल-प्रणाली; फुलांच्या देठावरील फुगीर भाग; पाण्याची सांड; मोरी; कुटुंबवत्सल; शेतकरी; वस्ती.
**––जव्वन** (ಜವ್ವನ) (क) ना. भरज्वानी; ऐनतारुण्य
**––पेरे** (ಪೆರೆ) (क) ना.–पूर्णचंद्र; पुनवेचा चांद.
**––परि** (ಪರಿ) (क) धा.–दुथडी वाहणें; उतू येणें.

**तुंबुर** (ತುಂಬುರ) (सं) ना.–गंधर्व; शिवगणांतील एक जात; तांडव; स्वर्गातील एक गवई.

**तुंबुरु** (ತುಂಬುರು) (क) ना.–गावठी आंब्याचे झाड.

**तुंबुरुगोळि** (ತುಂಬುರುಗೊಳ್ಳಿ) (क) ना.–ठिणगी उडणारे जळते लाकूड.

**तुय्** (तोय्) (ತುಯ್ [ತೊಯ್]) (क) धा. भिजणें; भिजवणें; ओले करणें; ओलसर करणें.

**तुयि** (ತುಯಿ) (क) धा.–ओढणें; फरपटणें; विस्तार करणें; आशिर्वाद देणें; शुभेच्छा करणें.

**तुय्यल्** (लु) (ತುಯ್ಯಲ್ [ಲು]) (क) ना.–खीर; दुधांतील खीर; गव्हाची खीर; परमान्न.

**तुर** (ತುರ) (सं) ना.–त्वरा; वेग; गडबड; घाई.

**तुरकि** (ತುರಕಿ) (अ. दे.) ना– घोड्याची एक चाल; धौरीतक चाल; जवळजवळ पाउल टाकून जाण्याची चाल; तुरुतुरु गति.

**तुर** (रं) **ग** (ತುರ [ರಂ] ಗ) (सं) ना.–अतिवेगानें चालणारा घोडा; सूर्याचे सात घोडे; सात (संख्या).
**तुरंगम.** (ತುರಂಗಮ)
**––ई** (ಈ) (सं) ना.–घोडी.
**––दल** (ದಳ) (सं) ना.–अश्वसेना; घोडदळ; राऊत सैन्य.

**तुरगगति** (ತುರಗಗತಿ) (सं) ना.–घोड्याची चाल; संगीतातील एकताल.

**तुरग मुखलोह** (ತುರಗ ಮುಖಲೋಹ) (सं) ना.–घोड्याचा लगाम.

**तुरग मेध** (ತುರಗ ಮೇಧ) (सं) ना.–अश्वमेधयज्ञ.

**तुरगारूढ** (ತುರಗಾರೂಢ) (सं) ना.–स्वार; राऊत; घोडेस्वार.

**तुरंग** (ತುರಂಗ) (अ. दे.); बंदीखाना; बंधन; कैद; तुरुंग.

**तुरं** (र) **गि** ತುರಂ [ರ] ಗಿ) (सं) ना.–घोडेस्वार; राऊत.

**तुरंजि** (ತುರಂಜಿ) (सं) ना.–ईडलिंबू; मोठें लिंबू

**तुरनस्** (ತುರನಸ್) (सं) ना.–निरंकुश अधिकारी; एकतंत्री; मुखत्यार

**तुरायि** (ತುರಾಯಿ) (अ.दे) ना.–तुरा; मोत्याचा तुरा; फुलतुरा; शिरपोची; शिरपेच.

**तुराषट्** (ತುರಾಷಾಟ್ [ಡ್]) (सं) ना.–इंद्र.

**तुरि** (ತುರಿ) (क) धा.–फळाचें टरफल काढणें; सोलणें.
(क) ना.–खाज; व्रणें; सूर्य; तुतारी; नारळाची शेंडी.

**तुरित** (ತುರಿತ) (क) अ.–त्वरित; वेगानें; शीघ्रतेनें.

**तुरिप** (ह) (ತುರಿಪ [ಹ]) (क) धा.–बडबडणें; आतुर होणे.
(क) ना.–वेग; शीघ्रता.

**तुरीय** ತುರೀಯ (सं) वि.–चतुर्थ अवस्था
(सं) ना.–चतुर्थांश; आत्म्याची चौथी अवस्था; जीवशिवैक्य.

**तुरीयातीत** (ತುರೀಯಾತೀತ) (सं) ना. तुरीयावस्थेपलीकडील आत्मा; परमात्मा.

**तुरु** (ತುರು) (क) ना.–गाय; गोधन; पशु; काटेरी झाड; कढीलिंब; धावपळ.
**—कुरु** (ಕರು) गाईचें वासरू; पशुधन.
**—काहि** (ಕಾಹಿ) (क) ना.–गुराखी; गोवळा; गोपाळ; गोल्ल.
**—पळ्ळि** (ಪಳ್ಳಿ) (क) ना.–गौळवाडा; गोकुळ.
**—मंदे** (ಮಂದೆ) (क) ना.–कोंडवाडा; गोठा; गुरांचे विसाव्याचें स्थान.
**—सिंडि** (ಸಿಂಡಿ) (क) ना.–वयांत आलेली मुलगी; पदर आलेली तरुणी.
**—पिंडु** (ಪಿಂಡು) (क) ना.–गाईचा कळप; जांगळ; पशुसमूह.
**—वळ** (ವಳ) (क) ना.–गुराखी; गोप; गोल्ल; गोवळा.
**—हट्टी** (ಹಟ್ಟಿ) (क) ना.–कोंडवाडा; गौळवाडा.

**तुरुकार** (ತುರುಕಾರ) (क) ना.–गुराखी; गोवळा; गोप.

**तुरुक** (ತುರುಕ) (क) ना.–यवन; म्लेंच्छ तुर्कदेशीय.

**तुरुकाण्य** (ತುರುಕಾಣ್ಯ) (अ.दे) ना.–अरबी देश; तुर्कस्थान.

**तुरु** (रुं) **कु** (ತುರು [ರುಂ] ಕು) (क) धा.–कोंबणें; ठेचून-भरणें; दाबून घालणें; ठोकणें; खुपसणें; जोरानें ओढणें.

**तुरुग** (गल) (ತುರುಗ [ಗಲ]) (क) ना.–गुच्छ; समूह; गट; 'तोंगल' पहा.

**तुरुगु** (ತುರುಗು) (क) धा.–चिकटून बसणें; दाटीवाटीनें बसणें.
(क) ना.–दाटण; घोस; कुचला.

**तुरुगेमे** (ತುರುಗೆಮೆ) (क) ना.–जाड साल; पापणीचे दाट केस.
**—कण्** (ಕಣ್) (क) ना.–केसाळ पापणीचे डोळे; सुनेत्र.

**तुरुगोळ्** (ತುರುಗೊಳ್) (क) धा.–दावणीला बांधणें.
(क) ना. गोग्रहण.

**तुरुंगल्** (ತುರುಂಗಲ್) )क) ना.–'तुरुंग' पहा.

**तुरुचि** (चे) (ತುರುಚಿ [ಚೆ]) (क) ना.–लाजाळूचें झाड; **दुस्पर्श.**

तुरु (रुं) बु (ತುರು [ರುಂ] ಬು) (क) धा.–'तरुबु' पहा. दान घालणें; अडकविणें; पेंडी बांधणें; भारा बांधणें. फूल खोवणें.

तुरुवाळ (ळव) (ತುರುವಾಳ [ಳ್ವ]) (क) ना.–पशुपति; गोधन असलेला; पशुस्वामी.

तुरुवु (ತುರುವು) (क) धा.–भोक पाडणें; रिकामें करणें; उकरणें; कोरणें; सोलणें; किसणें; खाजवणें.

तुरुमणि (ತುರುಮಣಿ) (क) ना.–किसणी; खोवणी.

तुलन (ತುಲನ) (सं) ना.–साम्य; साधर्म्य; सारखेपणा. वजन; टांगणी.

तुलसि (सी) (ತುಲಸಿ [ಸೀ]) (सं) ना–तुळस; वैजयंती; सब्जा; वृंदा.

तुला (ತುಲಾ) (सं) ना.–तूळ रास; तोळा; वजन; तागडी; समानता; सारखेपणा; छाटी.

तुलापात्र (ತುಲಾಪಾತ್ರ) (सं.)–पारडें; परडी.

तुलाभार (ತುಲಾಭಾರ) (सं) ना.–व्यक्तीच्या वजनाइतकें वस्तू वजन करून त्या वस्तूचें दान.

तुलि (ತುಲಿ) (सं) ना.–समानता; तागडी; जोडीदार; छाटी.

तुल्य (ತುಲ್ಯ) (सं) वि.–तुलनीय; वजन करण्यायोग्य. साम्य असलेला; समान.

तुवर (ತುವರ) (क) धा.–तूर; कडूकाढा; दाढी नसलेला; चोरवाट; चोरखिडी.

तुवरि (रिके) (ತುವರಿ [ರಿಕೆ]) (क) ना.–तूर; सुवासिक माती; 'तोगरे' पहा.

तुष (ತುಷ) (सं) ना.–भूस; कोंडा; कुट्टा; 'उमि' पहा.

तुषाग्नि (ತುಷಾಗ್ನಿ) (सं) ना.–झगरा; कोंडयाचा अग्नि; तुसाचा विस्तव.

तुषार (ತುಷಾರ) (सं) ना.–हिम; धुकें; फवारा; भुरभूर; थंडी.

—अद्रि (ಅದ್ರಿ) (सं) ना.–दाट धुकें; हिमपर्वत; हिमालय.

तुषित (ತುಷಿತ) (सं) ना.–उपदेवता; देवगण.

तुषोदक (ತುಷೋದಕ) (सं) ना.–तांदळाचें धुवण.

तुष्ट (ತುಷ್ಟ) (सं) वि.–तृप्त; समाधानी; आनंदी; संतुष्ट.

तुष्टि (ತುಷ್ಟಿ) (सं) ना.–तृप्ति; संतोष; आनंद; समाधान.

—पडिसु (ಪಡಿಸು) (क) धा.–तृप्ति होणें; समाधान पावणें.

तुस (ತುಸ) (क) वि.–थोडें; स्वल्प; ईषत्.

तुहिन (ತುಹಿನ) (सं) ना.–धुकें; हिम; शीत; थंड; चांदणें; कापूर.

—कर (ಕರ) (सं) ना.–चंद्र.

—षोणीध्र (ಷೋಣೀಧ್ರ) (सं) ना.–हिमालय; दाट धुकें.

—दीधिति (ದೀಧಿತಿ) (सं) ना–धुक्याच्या कांतीचा चंद्र.

तुळ (ತುಳ) (सं) ना.–'तुला' पहा.

तुळि (ತುಳಿ) (क) धा.–तुडवणें; पायानें दाबणें; मार्गे सरणें; पुढें येण्यासारखें न करणें; पुरणें; झाकणें; रेटणें 'अदुमु' पहा.

तुळिकल् (ತುಳಿಕಲ್) (क) वि.–कोमेजलेलें; वाळलेलें; निस्तेज झालेलें.

तुळित (ತುಳಿತ) (क) ना.–वाळवण; रेटारेटी; दडपण; घर्षण; ढकलाढकली.

तुळिल् (ತುಳಿಲ್) (क) ना.–वंदना; नमस्कार; सेवा; दास्य; पराक्रम; शौर्य.

—आळ (ಆಳ) (क) ना.–वीर; शूर; कलि; वीर सैनिक.

—गेयू (ಗೆಯ್) (क) धा.–नमस्कार करणें; वंदणें; सेवा करणें.

तुळिप (ह) (ತುಳಿಪ ([ಹ]) (क) धा.–लत्ताप्रहार; लाथाळी; तुडवणूक.

तुळु (ತುಳು) (क) ना.–तुळु भाषिकांचा प्रदेश.

तुळुव (ತುಳುವ) (क) ना.–तुळु देशवासी; तुळु नागरीक.

तुळु (ळुं) कु (ತುಳು [ಳುಂ] ಕು) (क) धा.–बाहेर फेकणें; हलविणें; भिरकटणें; भरून वाहणें; उतू जाणें; पसरणें; जोडीला येणें; समान होणें.

(क) ना.–उकळी; बुडबुडा; फेस; लाट.

—आडु (ಆಡು) (क) धा.–फेकणें; बाहेर भिरकाटणें; उतू जाणें; चढाई करणें.

—इसु (ಇಸು) (क) धा.–उतू जाणें; फेकणें; उल्लंघणें; ढकलणें; शिंपणें; शिंपडणें; जमविणें; रेटणें; दडपणें.

तुळुगत्ति (ತುಳುಗತ್ತಿ) (क) ना.–विळी; कट्यार.

तुळुकु (ತುಳುಕು) (क) धा.–हिंदकळणें; डुचमळणें; गौरवानें चढाई करणें; उतु जाणें; जमविणें; बाण मारणें; शोभणें.

तुळ्ळु (ತುಳ್ಳು) (क) धा.–लोळणें; खिदळणें; उडी मारणें; आनंदानें नाचणें.

तू (ತೂ) (क) ना.–पिपाणीचा आवाज; तुतारीची ललकारी; 'थूः' असा तिरस्कारदर्शक शब्द.

तूक (ತೂಕ) (क) ना.–ओझें; भार; वजन; गौरव; प्रतिष्ठा; किंमत; अधिकार; घनता; योग्यता.

तूक (ग) डिके (ತೂಕ [ಗ] ಡಿಕೆ) (क) ना.–पेंग; पेंगूळ; आळस; हेलकावा; झुकांडी; पेंगेचा झुकावा.

तूक (ग) डिसु (ತೂಕ [ಗ] ಡಿಸು) (क) धा.–झोपणें; निजणें; डोळे मिटणें; लोंबणें; हलणें; हेलकावे खाणें.

तूकिरि (ತೂಕಿರಿ) (क) धा.–उडी मारणें; नाचणें; बागडणें.

(क) ना.–नाच; उडणें; बागडणें.

तूकु (ತೂಕು) (क) ना.–गुणविमर्श; 'तूक' पहा.

तूगितोनेदाडु (ತೂಗಿತೊನೆದಾಡು) (क) धा.–लोंबकळणें; वारंवार झोले जाणें; मनाला येणें; मान डोलवणें; मान्य करणें; प्रेम करणें.

**तूगु** (ತೂಗು) (क) धा. – वजन करणें; मान्य करणें; विवेचिणें; लोंबत राहणें.
(क) ना. – हेलकावा; झोका; डोल; पाळण्याचा झोका.
**—कट्टु,–हाकु** (ಕಟ್ಟು,–ಹಾಕು) (क) धा. – टांगणें; लोंबत ठेवणें.

**तूगुकोलु** (ತೂಗುಕೋಲು) (क) ना. – तराजूची दांडी; दांडी; कपडे वाळत घालण्याची आडवी काठी.

**तूगुंजोडर्** (ತೂಗುಂಜೋಡರ್) (क) ना. – टांगता दिवा; लामण दिवा.

**तूगुंदले** (ತೂಗುಂದಲೆ)
**तूगुदले** (ತೂಗುದಲೆ)(क) ना. – कंप पावणारे डोकें; पेंगणारें डोकें.

**तूगु (गुं) दीविगे** (ತೂಗು [ಗುಂ] ದೀವಿಗೆ)(क) ना.– 'तूगुंजोडर' पहा.

**तूगु(गुं) देने** (ತೂಗು [ಗುಂ] ದೆನೆ) (क) ना. – हलणारें कणीस; लोंबी.

**तूगु (गुं) दोट्टिल्** (ತೂಗು [ಗುಂ] ದೊಟ್ಟಿಲ್)(क) ना. – हलता पाळणा; हुंदका; हिंदोळा.

**तूगुमंच** (ತೂಗುಮಂಚ) (क) ना. – हलता पलंग; झोपाळा;
**तूगुमणि** (ತೂಗುಮಣಿ)

**तूगुय्यले** (ತೂಗುಯ್ಯಲೆ) (क) ना. – झोकाळा; झोपाळा; दोरीचा झोका; झुला.

**तूंकु** (ತೂಂಕು) (क) धा. – 'तूगु' पहा.
**—आडु** (ಆಡು) (क) ना. – झुकांडी; पेंग; झोका; डुलकी.
**—आडिसु** (ಆಡಿಸು) (क) धा. – पेंगणें; डुलकी घेणें.

**तूण (ळ)** (ತೂಣ [ಳ]) (क) ना. – हिंसा प्रवृत्ति; आवेश; उद्रेक; तिरस्कार; त्वरा; मार्दव; दडपण; कल्लोळ.
**—अंकोळ्** (ಅಂಕೊಳ್) (क) धा. – आवेश येणें; उद्रेक येणें.

**तूणि (णीर)** (ತೂಣಿ [ಣೀರ]) (सं) ना. – भाता; शरधि.

**तूतु** (ತೂತು) (क) ना. – अभाव; उणीव; कलंक; रंध्र; छिद्र.

**तून** (ತೂನ) (क) ना. – खांब; बाळलेलें झाड; सोट; केळीचा उभा सोट.

**तूंतु** (ತೂಂತು)(क) धा. – कोंबणें; ठेचून भरणें; खुपसणें; प्रवेशणें.
(क) ना. – भोंक; रंध्र; 'तूं तूं' असा आवाज.

**तूपरु** (ತೂಪರು) (क) ना. – लहान लहान थेंब; पावसाची भुरभूर; 'तुंतुरू' पहा; दांडगाई करणारा; पुण्ड.

**तूपिडि (रि)** (ತೂಪಿಡಿ [ರಿ]) (क) धा. – फुर्र करून थुंकणें;
**तूपु** (ತೂಪು) पिचकारी मारणें; खुळखुळून थुंकणें, ओकणें.

**तूबर** (ತೂಬರ) (क) धा. – नपूंसक; बिनशिंगाचा पोळ; दाढी नसलेला पुरुष.

**तूबु** (ತೂಬು) (क) ना. – गाडीच्या चाकाचा तुंबा; बेंबी; तळ्याचें पाणी जाणारा पाट; 'गुंभ' पहा.

**तूरल (लु)** (ತೂರಲ್ [ಲು]) (क) अ. – वाऱ्यावर टाकून; आकाशांत फेकून.
(क) ना. – वियोग; विरह; अंतर.

**तूरिसु** (ತೂರಿಸು) (क) धा. – हलविणें; उडविणें; प्रवेश करविणें; आंत शिरणें; खाजवणें; ओरबडणें.

**तूरु** (ತೂರು) (क) धा. – धान्याला वारा देणें; रान उठवणें; शिकार उठविणें; ओवणें; कोंबणें; झडणें; टोचणें; ठिबकणें; पळून जाणें; प्रवेशणें.
**—किडी** (ಕಿಡಿ) (क) ना. – ठिणगी; अग्निपात; अशनिपात.
**—इके** (ಇಕೆ) (क) ना. – वारवणी; पाखडण; भरारी.

**तूर्ण** (ತೂರ್ಣ) (सं) अ. – शीघ्र; लागलीच; वेगानें; त्वरित.
(क) ना. त्वरा; (क) वि. वेग; उत्सुक; आतुर; गडबड्या; घाई करणारा.
**—ऊदित** (ಉದಿತ) (सं) वि. – घाईनें बोललेलें; वेगानें बोललेलें.

**तूर्य** (ತೂರ್ಯ) (सं) ना – तुतारी; तुर्यावस्था.
**—त्रय** (ತ್ರಯ) (सं) ना. – नृत्य, गीत आणि वाद्य या तीन्हींचा मेळ.

**तूल** (ತೂಲ) (सं) ना. – कापूस.

**तूलक** (ತೂಲಕ) (सं) ना. – कापूस; आकाश.

**तूलि (लिके)** (ತೂಲಿ [ಲಿಕೆ]) (सं) ना. – रंगाचा कुंचला; कलम; ब्रश.

**तूलिके (का)** (ತೂಲಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना. – चित्रकाराचें कलम; गादी; फुलवात; निखारे फिरवण्याची लोहाराची शलाका.

**तूवर** (ತೂವರ) (क) ना. – कद्रू; तुरट; बिनशिंगाचा बैल. नपूंसक 'तूबर' पहा.

**तूष्णीर** (ತೂಷ್ಣೀರ) (सं) अ. – मौनयुक्त; मुकाट्यानें; निमूटपणें.

**तूष्णीक** (ತೂಷ್ಣೀಕ) (सं) वि. – मूक; नीरव; मुकाट.

**तूष्णीरुत** (ತೂಷ್ಣೀರುತ) (सं) ना. – मौन; मौनी; स्तब्धता; मुग्धता.
(सं) अ. – मुकाट्यानें; निःशब्दपणें; निमूटपणें.

**तूळ (ळु)** (ತೂಳ [ಳು]) (क) धा. – पुढें ढकलणें; गमणें; चालणें; जाणें; मागें लागणें; दूर पळविणें; नाश करणें; पाय मागें घेणें; 'तळ्ळु' पहा.

**तूळ (ल)** (ತೂಳ [ಲ]) (क) वि. – स्थूल; जाड.
(क) ना. – उत्साह; आवेश.

**तूळिके** (ತೂಳಿಕೆ) (क) ना. – 'तूलिका' पहा.

**तूळिसु** (ತೂಳಿಸು) (क) धा. – पुढे ढकलणें; पुढें चालविणें; 'तळ्ळु' पहा.

तूळ्दु (ತೂಳ್ದು) (क) धा.—मागें सरणें; हटविणें; रुंद करणें; गांठ सोडणें; फाडून जाणें.

तृट् (ತೃಟ್) (सं) ना.—तृषा; तहान; तोंडाची कोरड; दाह; दगा.

तृण (ತೃಣ) (सं) ना.—गवत; दर्भ.

—कुटि (ಕುಟಿ) (सं) ना.—कुटीर; कोपी; खोपट; छप्पर.

—ग्राही (ಗ್ರಾಹಿ) (सं) ना.—गवताचा गंज; दुग्धमणी; एक रत्न; अबररत्न; तैलस्फटिक; राळेचा दगड; शिलाराळ.

—द्रुम (ದ್ರುಮ) (सं) ना.—राळवृक्ष; ताल; नारळी; पोफळी.

—राज (ರಾಜ) (सं) ना.—तालवृक्ष.

तृणकृंतक (ತೃಣಕೃಂತಕ) (सं) ना.—गवत कापण्याचे साधन; कोयती; विळा.

तृणध्वज (ತೃಣಧ್ವಜ) (सं) ना.—बांबू; चिवा; तालवृक्ष.

तृणपुरुष (ತೃಣಪುರುಷ) (सं) ना.—बांबू; बुजगावणी; गवताची मनुष्याकृति.

तृणप्राय (ತೃಣಪ್ರಾಯ) (सं) वि.—कस्पटासमान; क्षुल्लक; क्षुद्र; अत्यल्प; तिरस्करणीय.

तृणसंग्रहणी (ತೃಣಸಂಗ್ರಹಣೀ) (सं) ना.—मांगोरें; 'जेतगुंटी' पहा.

तृणीकृत (ತೃಣೀಕೃತ) (सं) वि. तिरस्कृत; कस्पटाप्रमाणें लेखलेला.

तृतीय (ತೃತೀಯ) (सं) वि.—तिसरें; तृतीयांश; चुना.

तृतीया (ತೃತೀಯಾ) (सं) ना.—तिसरी तिथी; तिसरी विभक्ती.

तृप्त (ತೃಪ್ತ) (सं) वि.—समाधान झालेला; संतुष्ट; पूर्णेच्छ; आशापूरित.

तृप्ति (ತೃಪ್ತಿ) (सं) ना.—संतोष; समाधान; शांति; मनमुराद.

—पडिसु (ಪಡಿಸು) (क) धा.—शांति होणें; समाधान पावणें; मनमुराद होणें.

तृषित (ತೃಷಿತ) (सं) वि.—तहानलेला; तोंडाला कोरड पडलेला; इच्छुक.

तृषे (षा) (ತೃಷೆ [ಷಾ]) (सं) ना.—'तृट्' पहा.

तृष्णक (ತೃಷ್ಣಕ) (सं) वि.—आतुर; लालसित; तोंडाला कोरड पडलेला.

तृष्णा (ತೃಷ್ಣಾ) (सं) ना.—आशा; इच्छा; अभिलाषा; आतुरता; तहान; तोंडकोरड.

तेक्कने (ತೆಕ್ಕನೆ) (क) अ.—अतिशयत्वानें; चट्ट; पटकन; अनपेक्षित; एकदम; अचानक.

तेक्कु (ತೆಕ್ಕು) (क) ना.—पशुप्रमाणें चाटणें; तरंगणें; तारणें; मूर्च्छित होणें; दिङ्मूढ होणें; घाबरविणें.

तेक्के (ತೆಕ್ಕೆ) (क) ना. आलिंगन; मिठी; पाठीवरील केस; सुरळी; सापाचें वेटोळें; 'तळके' पहा; 'इरिके' पहा.

—कट्टू (ಕಟ್ಟು) (क) धा.—आलिंगणें; कवटाळणें; कवळणें विळखा घालणें; मिठी मारणें.

—केडिसु (ಕೆಡಿಸು) (क) धा.—पगळणें; विखरणें; गोंधळ माजवणें.

—परि (ಪರಿ) (क) धा.—आलिंगणें; मिठी सोडवणें.

—(ह) परिगे (ಪ [ಹ]ರಿಗೆ) (क) ना.—ढालाईत सैन्य; ढालधारी; अनेक ढाली.

तेगल् (ತೆಗಲ್) (क) ना.—खांदा; हातोप्याचा वरचा भाग; 'जंगुडि' पहा.

तेगले (ತೆಗಲೆ) (क) ना.—छाती; ऊर; हृदय; मस्ती; मद.

तेगसु (ತೆಗಸು) (क) धा.—काढविणें; हटणें; मागें रेटणें; ढकलणें; दूर नेणें; बाहेर ओढणें; दरवाजा उघडणें; सोलणें; टरफल काढणें.

तेगह्नु (ತೆಗಹು [ಳು]) (क) ना.—विकास; धारणा.

तेगळ् (ळु) (ತೆಗಳ್ [ಳು]) (क) धा.—निंदणें; शिवी देणें; दोष लावणें; पाणउतारा करणें; घासणें.

(क) ना.—निंदा; शिवीगाळ; दूषण.

—के (ಕೆ) (क) ना.—निंदा; दोष; शिवीगाळ.

तेगिसु (ತೆಗಿಸು) (क) धा.—'तेगसु' पहा. दमणें; दमविणें; संपणें; संपविणें; नाहींसे करणें.

तेगे (ತೆಗೆ) (क) धा.—आपल्याकडे ओढणें; आकर्षणें; काढून देणें; वाहून नेणें; ओढून घेणें; चोरणें; नाहींसें करणें; धरणें; उलटणें; मालवणें; दिवा फुंकणें; बाण ओढणें; उचलणें; मागें खेचणें; मिळवणें; उघडणें; हातीं घेणें; आरंभणें; पायानें उकरणें; जीवन कंठणें; उपयोग करणें; चित्र काढणें; नेमणें; कशीदा काढणें; देवी काढणें; विचार करणें; प्रतिनिधित्व करणें; कमी करणें; दृष्टिआड करणें; मागें पाऊल घेणें; निर्मूलन करणें; तासणें; रंधा मारणें; घासणें; पळणें.

(क) ना. हाकलपट्टी; निर्मूलन; निर्दालन.

तेगेनेरे (ತೆಗೆನೆರೆ) (क) धा.—पूर्णपणें ओढणें; पूर्ण फाडणें.

तेगेयिसु (ತೆಗೆಯಿಸು) (क) धा.—'तेगसु' पहा.

तेंक (कण) } (ತೆಂಕ [ಕಣ]) (क) ना.—दक्षिणदिशा.
तेंकल् (लु) } (ತೆಂಕಲ್ [ಲು])

—पक्क,—(वंक) (ಪಕ್ಕ, [ವಂಕ]) (क) ना.—दक्षिणभाग; उजवी बाजू; शेजारबाजू.

तेंकु (ತೆಂಕು) (क) धा.—पोहणें; तरंगणें; मूर्छित होणें.

(क) ना.—दक्षिण दिशा.

तेंगले (ತೆಂಗಲೆ) (सं) ना.—विशिष्टाद्वैती; रामानुज पंथी; त्रिपुंड्राखालीं अडवी रेघ लावणारे.

तेंगु (ತೆಂಗು) (क) ना.—नारळाचें झाड.

(क) धा.—पक्षाचें उतरून बसणें; 'दिगिसु' पहा.

**देवकि (की)** (ದೇವಕಿ [ಕೀ]) (सं) ना.–कृष्णाची आई; देवकाची कन्या.

——**तनय——नंदन** (ತನಯ; ನಂದನ) (सं) ना.–देवकीपुत्र; कृष्ण.

**देवकुल** (ದೇವಕುಲ) (सं) ना.–'देगुल' पहा.

**देवकुसुम** (ದೇವಕುಸುಮ) (सं) ना.–लवंग.

**देवखात** (ದೇವಖಾತ) (सं) ना.–स्वयंभु सरोवर; नैसर्गिक तळें; देवनिर्मीत तडाग.

**देवगंगा (गे)** (ದೇವಗಂಗಾ [ಗೆ]) (सं) ना.–सुरगंगा; आकाशगंगा.

**देवगण** (ದೇವಗಣ) (सं) ना.–देवतासमूह; नक्षत्रवृंद; सत्त्वगुणी मनुष्य.

**देवगंधर्व** (ದೇವಗಂಧರ್ವ) (सं) ना.–देवलोकीचा गायक.

**देवडि** (ದೇವಡಿ) (क) ना.–देहली; उंबरा; पूज्यपाद.

**देवडिग** (ದೇವಡಿಗ) (क) ना.–देवसेवक; पूजारी; भक्त.

**देवडिति** (ದೇವಡಿತಿ) (क) ना.–देवता स्त्री; अप्सरा; देवसेविका; भक्तीण; 'अचरि' पहा.

**देवतरू** (ದೇವತರು) (सं) ना.–कल्पवृक्ष; (मंदार; अश्वत्थ; हरिचंदन; पारिजात; संतान असे पंचवृक्ष).

**देवता** (ದೇವತಾ) (सं) ना.–देवी;

—**अंश** (—ಅಂಶ) (सं) ना–देवशक्ति विभाग; अवतार; देवतांना दिलेली आहुती; परमात्म्याचा अंशावतार.

**देवतात्म** (ದೇವತಾತ್ಮ) (सं) ना.–सत्त्वगुणशाली; देवत्व असलेला; महात्मा; दैवीशक्ति असलेला.

**देवदत्त** (ದೇವದತ್ತ) (सं) वि.–देवानें दिलेले; जातीचें; जन्मजात.

(सं) ना.–अर्जुनाचा शंख.

**देवदाय** (ದೇವದಾಯ) (सं) ना.–वर्षासन; शिखर.

**देवदारू** (ದೇವದಾರು) (सं) ना.–देवदार; देवद्वार.

**देवदासि** (ದೇವದಾಸಿ) (सं) ना.–देवाची सेवेकरीण; देवाचे नांवानें व्रतस्थ राहणारी स्त्री; नर्तकी; परिचारिका; 'सूळे' पहा.

**देवदुंदुभि** (ದೇವದುಂದುಭಿ) (सं) ना.–नगारा; देवाची भेरी.

**देवदूत** (ದೇವದೂತ) (सं) ना.–देवसेवक; प्रेषित.

**देवदेव** (ದೇವದೇವ) (सं) ना.–देवाचा देव; शिव; विष्णु.

**देवन** (ದೇವನ) (सं) ना.–खेळ; लीला; विनोद; सौंदर्य; कांती; द्यूत; क्रीडारंग; उद्यान; कमल; महत्त्वाकांक्षा; उद्योग; काम; घोळ; दुःख; चलन; लावी पक्षी.

**देवनगरि** (ದೇವನಗರಿ) (सं) ना.–अमरावती; देवनार; सुरपुर; लक्ष्मीश कवीचें जन्मग्राम.

**देवनट** (ದೇವನಟ) (सं) ना.–कडू दोडका.

**देवनदि** (ದೇವನದಿ) (सं) ना.–आकाशगंगा; सुरनदी.

**देवनागरि** (ದೇವನಾಗರಿ) (सं) ना.–संस्कृत लिपी; गीर्वाण लेखन चिन्हें

**देवनाल** (ದೇವನಾಲ) (सं) ना.–देवनळ; बांबू; चिवा.

**देवपथ** (ದೇವಪಥ) (सं) ना.–स्वर्ग; जोतिमार्ग; आकाशमार्ग.

**देवपुरोध** (ದೇವಪುರೋಧ) (सं) ना. देवगुरु; बृहस्पति.

**देवभूमि** (ದೇವಭೂಮಿ) (सं) ना.–स्वर्ग; तीर्थक्षेत्र.

**देवमातृक** (ದೇವಮಾತೃಕ) (सं) ना.–पावसावर पिकणारी जमीन; जिराइत जमीन; देवकृपा झालेला; आईप्रमाणें असणारा.

**देवमार्ग** (ದೇವಮಾರ್ಗ) (सं) ना.–देवपथ; आकाशमार्ग; स्वर्ग.

**देवयज्ञ** (ದೇವಯಜ್ಞ) (सं) ना.–देवतांच्या संतोषासाठीं करावयाचा याग; होमविधि.

**देवयान** (ದೇವಯಾನ) (सं) ना.–देवतेचा रथ; आकाश; देवांचा मार्ग;

**देवयानि** (ದೇವಯಾನಿ) (सं) ना.–शुक्राचार्यांची मुलगी; ययातीची पत्नि.

**देवयोनि** (ದೇವಯೋನಿ) (सं) ना.–देवापासून जन्मलेले; यक्ष; गंधर्व; किन्नर; किंपुरुष; पिशाच्च.

**देवर** (ದೇವರ) (क) ना.–दीर; देव्य; भावोजी; पतीचा भाऊ.

**देवरथ** (ದೇವರಥ) (सं) ना.–विमान; देवाचें वाहन.

**देवराज** (ದೇವರಾಜ) (सं) ना.–देवेंद्र; देवांचा राजा.

**देवरात** (ದೇವರಾತ) (सं) ना.–परीक्षिती; अभिमन्यूचा मुलगा.

**देवर्षि** (ದೇವರ್ಷಿ) (सं) ना.–नारद; देवलोकीचा ऋषि.

**देवल(लक)** (ದೇವಲ [ಲಕ]) (सं) ना.–देवांग ऋषि; वस्त्र विणण्याची विद्या देणारा मुनि; देवपूजारी.

**देवव्रत** (ದೇವವ್ರತ) (सं) ना.–भीष्माचार्य.

**देवस्व** (ದೇವಸ್ವ) (सं) ना.–देवसंपत्; दैविक भाग्य; देवाचा खजिना.

**देवांग** (ದೇವಾಂಗ) (सं) ना.–कापड; रेशमी वस्त्र; देवांग ऋषिकुलांतील विणकर समाज.

**देवाज्ञे** (ದೇವಾಜ್ಞೆ) (सं) ना.–देवाकडून झालेली आज्ञा, देवाचे बोलावणें; मृत्यु.

**देवादाय** (ದೇವಾದಾಯ) (सं) ना.–'देवदाय' पहा.

**देवाद्रि** (ದೇವಾದ್ರಿ) (सं) ना.–मेरुपर्वत; देव ज्यावर राहतात तो पर्वत.

**देवाधिदेव** (ದೇವಾಧಿದೇವ) (सं) ना.–'देवदेव' पहा; महादेव.

**देवाराधने** (ದೇವಾರಾಧನೆ) (सं) ना.–देवपूजा; देवतार्चन.

**देवि** (ದೇವಿ) (सं) ना.–दुर्गादेवी; महाकाली; अंगावर उठणाऱ्या देवी; राणी; श्रेष्ठ स्त्री.

**देवेंद्र** (ದೇವೇಂದ್ರ) (सं) ना.—इंद्र; शचीपति.

**देवोद्यान** (ದೇವೋದ್ಯಾನ) (सं) ना.—नंदनवन; देवतांचे उपवन.

**देश (स)** (ದೇಶ [ಸ]) (सं) ना.—स्थळ; अवकाश; आश्रय; प्रदेश; सीमा.

**—रूप** (—ರೂಪ) (सं) ना.—देशाला अनुरूप; प्रांतीय.

**—स्थ** (—ಸ್ಥ) (सं) ना.—देशात राहणारा; कोकणाशिवाय अन्य विभागांत जन्मलेला; ब्राह्मणातील एक पोटभेद.

**देशकालानुरूप** (ದೇಶಕಾಲಾನುರೂಪ) (सं) वि.—त्या त्या देशाला आणि कालाला जमणारे; परिवर्तनशील.

**देशद्रोह** (ದೇಶದ್ರೋಹ) (सं) ना.—स्वतःच्या देशाविषयी द्वेष.

**देशद्रोहि** (ದೇಶದ್ರೋಹಿ) (सं) ना.—देशाचे अकल्याण करणारा; नीच; राष्ट्रद्वेषी; राष्ट्रविघातक.

**देशबंधु (बांधव)** (ದೇಶಬಂಧು [ಬಾಂಧವ]) (सं) ना.—देशाचा भाऊ; राष्ट्रमित्र; देशहितैषी; जनहितकर्ता.

**देशभाषे** (ದೇಶಭಾಷೆ) (सं) ना.—देशाची भाषा; राष्ट्रभाषा; प्रांतभाषा.

**देशभ्रष्ट** (ದೇಶಭ್ರಷ್ಟ) (सं) वि.—देशांतून बाहेर गेलेला; परगंदा; देशत्यागी.

**देशमुख** (ದೇಶಮುಖ) (सं) ना.—राष्ट्रनायक; एक प्रमुख अधिकारी.

(अ.दे) ना.—परगण्याचा मुख्य अधिकारी.

**देशाचार** (ದೇಶಾಚಾರ) (सं) ना;—देशाची चालरीत; समाजनीति; रूढी.

**देशाटन** (ದೇಶಾಟನ) (सं) ना.—देशोदेशीचा प्रवास; देशांतरीचें भ्रमण; देशयात्रा.

**देशांतर** (ದೇಶಾಂತರ) (सं) ना.—अन्यदेश; परदेश; एक प्रदेशातून दुसऱ्या प्रांतांत जाणें.

**—वास** (ವಾಸ) (सं) ना.—परदेशांत केलेली वसती.

**देशाभिमान** (ದೇಶಾಭಿಮಾನ) (सं) ना.—जन्मभूमीविषयींची प्रीति; देशप्रेम; राष्ट्रभक्ति.

**देशावर** (ದೇಶಾವರ) (सं) ना.—भिक्षाटन; गांवोगांव हिंडून मागितलेली भिक्षा.

**देशि** (ದೇಶಿ) (सं) वि.—देशरूढीचे; सामान्य जनाचे वापरातील; प्रांतीय; गावरान; जवारी.

**देशिक** (ದೇಶಿಕ) (सं) ना.—आचार्य; गुरु; उपदेशक; आपल्या गांवचा; देशबांधव; प्रयाणिक; अपरिचित; पांथ; परस्थलाचा; परस्थ.

**देशिग (सिग)** (ದೇಶಿಗ [ಸಿಗ]) (क) ना.—अनाथ; निराधार; 'देशिक' पहा. 'तब्बलि' पहा.

**देशीय (देश्य)** (ದೇಶೀಯ [ದೇಶ್ಯ]) (सं) ना.—देशासंबंधी; राष्ट्रविषयीं; प्रांतीय.

**—भाषे** (ಭಾಷೆ) (सं) ना.—त्या त्या देशाची भाषा; प्रांतभाषा.

**देसि** (ದೇಸಿ) (क) ना.—चांगुलपणा; सौंदर्य; शोभा; प्रांतीय भाषेतील सौंदर्य; देशभाषा; गौरव.

**देसिकीर्ति** (ದೇಸಿಕೀರ್ತಿ) (क) ना.—सुंदरी; अप्सरा; कामिनी.

**देसिगार** (ದೇಸಿಗಾರ) (क) वि.—कलाविद; कलाजीवी; कुशल; कलाकार.

**देसिपडे** (ದೇಸಿಪಡೆ) (क) धा.—चांगलें होणें; सुंदर होणें.

**देसे** (ದೇಸೆ) (क) ना.—'देशि' पहा.

**देह** (ದೇಹ) (सं) ना.—शरीर; काया; ज्योतिषशास्त्रातील लग्नस्थान.

**—ते** (ತೆ) (क) ना.—शरीराविषयीचा आपलेपणा; देहाविषयी ममत्त्व; ममकार.

**—बिडु** (ಬಿಡು) (क) धा.—मरणें; मरण येणें.

**देहत्याग** (ದೇಹತ್ಯಾಗ) (सं) ना.—देह ठेवणें; मरण; देहदान.

**देहधारक** (ದೇಹಧಾರಕ) (सं) ना.—शरीरधारणा; देहधारी; आत्मा; शरीरधारी; हाड.

**देहधारि** (ದೇಹಧಾರಿ) (सं) ना.—'देहधारक' पहा.

**देहभृत (त)** (ದೇಹಭೃತ್ [ತ]) (सं) ना.—जीवात्मा.

**देहलि (ली)** (ದೇಹಲಿ [ಲೀ] (सं) ना.—उंबरा, दिल्ली.

**देहांत** (ದೇಹಾಂತ) (सं) ना.—देहाचा शेवट; मरण; मृत्यु.

**—शिक्षा (क्षे)** (ಶಿಕ್ಷೆ) (सं) ना.—फाशीची शिक्षा; मृत्युदंड.

**देहार** (ದೇಹಾರ) (सं) ना.—दुर्गति; दुरवस्था.

**देहि** (ದೇಹಿ) (सं) क्रि.—दे. दया कर.

(सं) ना.—प्राणी; जीव; आत्मा; शरीरी.

**दैतेय (दैत्य)** (ದೈತೇಯ [ದೈತ್ಯ]) (सं) ना.—राक्षस; दितीचीं मुलें; असुर.

**—अरि,—वैरि** (ಅರಿ; ವೈರಿ) (सं) ना.—शिव; विष्णु.

**—गुरु** (ಗುರು) (सं) ना.—शुक्राचार्य.

**दैत्यसेना** (ದೈತ್ಯಸೇನಾ) (सं) ना.—राक्षस सैन्य; दक्षब्रह्माची कन्या.

**दैनंदिन** (ದೈನಂದಿನ) (सं) वि.—रोजचे; रोजरोज; दिसंदीस.

**दैनास** (ದೈನಾಸ) (क) ना.—दीनता; दैन्य; दीनाशा; दीन याचना.

**दैनिक** (ದೈನಿಕ) (सं) वि.—रोजचें; नित्याचें; दिवसाचें.

**— पत्रिका (के)** (ಪತ್ರಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—दैनिक वर्तमानपत्र.

**दैन्य** (ದೈನ್ಯ) (सं) ना.—दीनता; विनय; मृदुता; गरीबीचें जीवन; गरीबीची भाषा; लाचारी; व्यथा; हीन भावना; हीन स्थिति; दीनवृत्ति.

**दैर्घ्य** (ದೈರ್ಘ್ಯ (सं) ना.—दीर्घता; लांबी.

**दैव** (ದೈವ) (सं) ना.—देवासंबंधी; अदृष्ट; नशीब; भाग्य; भूत; श्रीमंती; वडीलधारे.
**दैवक** (ದೈವಕ) (सं) ना.—नशीबासंबंधी; दैवाधीन.
**दैवगति** (ದೈವಗತಿ) (सं) ना.—देवाची इच्छा; विधिलिखित; नशीब; ललाटलेख; कर्मगति; दैवाचा फेरा.
**दैवज्ञ** (ದೈವಜ್ಞ) (सं) ना.—भविष्य सांगणारा; सामुद्रिकवेत्ता; भाग्यज्ञानी; सोनार.
**दैवत** (ದೈವತ) (सं) वि.—देवासंबंधी; दैवाधीन.
(सं) वि.—इष्ट देवता.
**दैवतंत्र** (ದೈವತಂತ್ರ) (सं) ना.—नशीबाचा खेळ; विधिविलास; ब्रह्मलीला.
**दैववाणि** (ದೈವವಾಣಿ) (सं) ना.—अशरीरिणी; आकाशवाणी; देवाचा आदेश.
**दैवाधीन** (ದೈವಧೀನ) (सं) वि.—देवाच्या इच्छेनुसार; मरण; मृत्यु.
**दैविक** (ದೈವಿಕ) (सं) वि.—नशीबासंबंधी; देवामुळें अस्तित्वात आलेलें, देवाच्या इच्छेप्रमाणें चालणारा.
**दैहिक** (ದೈಹಿಕ) (सं) वि.—देहाविषयीचें; शारीरिक; कायिक; तनूसंबंधी.
**—क्रिया (ये)** (ಕ್ರಿಯಾ [ಯೆ]) (सं) ना.—शरीराचें चलनवलन; स्वाभाविक कृत्य.
**दोगरु** (ದೊಗರು) (क) धा.—उकरणें; पोकळ करणें.
(क) ना.—खड्डा; पोकळी; तोटा.
**दोटा (ठा) र** (ದೊಟಾ [ಠಾ]ರ) (क) ना.—घट्ट मनाचा; दृढचित्त; स्थिरकाय; बलिष्ठ; दांडगा; समर्थ.
**—इसु** (ಇಸು) (क) धा.—स्थिरावणें; गर्व करणें.
**—तन** (ತನ) (क) ना.—दृढमनस्कता; दांडगेपणा; गर्व; अहंकार.
**दोड्ड (ड्डित्तु)** (ದೊಡ್ಡ [ಡ್ಡಿತ್ತು]) (क) वि.—वडील; उन्नत; श्रेष्ठ; विशाल; घन; मुख्य; दांडगा.
**दोड्डस्त न** } (ದೊಡ್ಡಸ್ತ [ನ]) (क) ना.—वडीलपणा;
**दोड्डस्तिके** } (ದೊಡ್ಡಸ್ತಿಕೆ) श्रेष्ठता; विशालता; उन्नति; औदार्य; घनता; वडीलकी.
**दोड्डनिद्दे** (ದೊಡ್ಡನಿದ್ದೆ) (क) ना.—दीर्घ निद्रा; मरण; मृत्यु; काळझोप; घोर निद्रा.
**दोड्डाने** (ದೊಡ್ಡಾನೆ) (क) ना.—मोठा हत्ती; महाहत्ती.
**दोड्डि** (ದೊಡ್ಡಿ) (क) ना.—कोठी; गायरान; कोंडवाडा; जंगली हत्ती धरण्याचा खड्डा.
**दोड्डीळे** (ದೊಡ್ಡೀಳೆ) (क) ना.—रुई; शेवरीचे फळ; कच्चे फळ.
**दोड्डेस** (ದೊಡ್ಡೆಸ) (क) ना.—नृत्य; नाच; नृत्यभंग; नाचातील अभिनय.
**दोणे** (ದೊಣೆ) (क) ना.—बाणांचा भाता; तळें; सरोवर; मागावरील कापड गुंडाळण्याचें लाकूड.
**दोंडे** (ದೊಂಡೆ) (क) वि.—घट्ट बांधलेलें; करकचून बांधलेलें; चुरमडलेलें; गोळा केलेलें.
**दोण्णे** (ದೊಣ್ಣೆ) (क) ना.—सोटा; लाठी; दंड; काठी.
**दोद्दे** (ದೊದ್ದೆ) (क) ना.—ढीग; समूह; रास; असमर्थ; बलहीन; बोबडे बोल.
**दोद्देग** (ದೊದ್ದೆಗ)(क) ना.—पक्षामध्यें सामावलेला; पक्षातील एक.
**दोंति** (ದೊಂತಿ) (क) ना.—उतरंड; एकावर एक ठेवलेली भांडीं; थप्पी; चळत. 'अडकल' पहा.
**दोंदण** (ದೊಂದಣ) (क) ना.—अस्पष्ट भाषा; तोतरे बोलणें; बोबडे बोल.
**दोंदि (दुंदि)** (ದೊಂದಿ [ದುಂದಿ]) (क) ना.—हिलाल; दिवटी; पोत.
**दोंदुळि** (ದೊಂದುಳಿ) (क) ना.—समूह; ढीग; संतोष; समाज.
**दोन्ने** (ದೊನ್ನೆ) (क) ना.—द्रोण; पानाची वाटी.
**दोप्पने** (ದೊಪ್ಪನೆ) (क) अ.—धप्पकन्.
**दोप्पळिसु** (ದೊಪ್ಪಳಿಸು) (क) धा.—आपटणें; बडविणें; धोपटणें; धाडकन पडणें.
**दोब्बु** (ದೊಬ್ಬು) (क) धा.—'दब्बु' पहा.
**दोंब** (ದೊಂಬ) (क) ना.—डोंब; डोंबारी; दोरीवरचा नाच करणारा.
**दोंबि** (ದೊಂಬಿ) (क) ना.—कोलाहल; मारामारी; गोंधळ; पुंडांची टोळी; गुंडांचा तांडा.
**दों बिग (गार)** (ದೊಂಬಿಗ [ಗಾರ]) (क) ना.—भांडखोर; भांडण काढणारा; गोंधळ माजवणारा.
**दोंबिदासरु** (ದೊಂಬಿದಾಸರು) (क) ना.—दशावतारी नाटके करणारी एक जात; किर मुखोटा; किर्मोखोटा.
**दोम्मलु** (ದೊಮ್ಮಲು) (क) ना.—छाती; छातीठोकपणा; धैर्य.
**दोम्मळिसु** (ದೊಮ್ಮಳಿಸು) (क) धा.—आरडाओरडा करणें; ऐटीनें फिरणें; धैर्य दाखवणें.
**दोरकु** (ದೊರಕು) (क) धा.—सापडणें; आधीन होणें; प्राप्त होणें.
**—इसु** (—ಇಸು) (क) धा.—मिळविणें; जुळविणें; प्राप्त करविणें; मिळण्यासारखे करणें.
**दोरगु** (ದೊರಗು)(क) ना.—अविनय; असंस्कृतता; असार; फोल.
**दोरे** (ದೊರೆ) (क) धा.—प्राप्त होणें; स्वाधीन होणें: जवळ येणें.
(क) ना.—राजा; यजमान; मालक; नायक.
**—किडिसु** (—ಕಿಡಿಸು) (क) धा.—अयोग्य होईलसें करणें.
**—कोळ्** (ಕೊಳ್) (क) धा.—प्राप्त होणें; सांपडणें; अस्तित्वांत येणें.

—तन (ತನ) (क) धा.–राजेपणा; अधिकार; मालकी.
—तु (ತು) (सं) ना.–समानता; सादृश्य.
(क) अ.–सांपडून; सापडण्यानें.
(क) वि.–सारखें; समान; जुळणारें.
दोरेसानि (ದೊರೆಸಾನಿ) (क) ना.–स्वामिनी; मालकीण; मालकपत्नि; राणी; यजमानीण.
दोळ्ळास (ದೊಳ್ಳಾಸ) (क) ना.–कपट; वंचना; फसवणूक.
दोळ्ळु (ದೊಳ್ಳು) (क) ना.–ढोल; एक मोठे चर्मवाद्य; ढोल्या; ढेरपोट्या.
दोकु (ದೋಕು) (क) ना.–सतत काम करणें; अविश्रांत राबणें; रांगणे; रेंगाळणें.
दोचु (ದೋಚು) (क) धा.–असेल नसेल ते काढून घेणें; लुबाडणें; लुटणें; नागवणें; अपहार करणें.
दोटि (ದೋಟಿ) (क) ना.–धोटी; फळे तोडण्याची आकडी; फुलें तोडण्याची लांब काठीची अकडी. 'तोटि' पहा.
दोण (णु) (ದೋಣ [ಣು])(क) वि.–नग्न; उघडा; वस्त्रविहीन.
दो (द्रो) णि (ದೋಣಿ [ದ್ರೋಣಿ]) (सं) ना. नाव; होडी; सांगड.
दोणिमुख (ದೋಣಿಮುಖ) (सं) ना.–नावेचे तोंड; होडींत पाणी शिरू नये म्हणून निरनिराळ्या प्राण्याचे तोंडाचे आकार करतात ते. 'हरि नालिके' पहा. पन्हाळ.
दोपु (ದೋಪು) (क) ना.–लूट; अपहरण; नाडणूक; नागवण.
दोबि (ದೋಬಿ) (अ.दे.) ना.–धोबी; परीट; रजक; कपडे धुणारा.
दोमे (ದೋಮೆ) (क) ना.–चिलट; डास; मशक; कॅमरे; नाकाचे टोक.
दोः, (दोस्) (ದೋ [ದೊಸ್]) (सं) ना.–हात; बाहु; हातोपा; भुज.
दोर (ದೋರ) (क) ना.–द्वार; दरवाजा; पुढचें दार.
दोरु (ದೋರು) (क) ना.–गुहा, ढोली; पोटरी; 'दोगरु' पहा.
दोरे (ದೋರೆ) (क) ना.–पाडाचे फळ; अर्धपक्व फळ.
—कायि (ಕಾಯಿ) (क) ना.–पिकायाला आलेले फळ; पाडाचे फळ.
दोर्दंड (ದೋರ್ದಂಡ) (सं) ना.–पीळदार दंड; रट्टा; भुज.
दोर्बल (र्वल) (ದೋರ್ಬಲ [ರ್ವಲ]) (सं) ना.–दंडातील सामर्थ्य; रट्ट्यातील शक्ति.
दोर्मूल (ದೋರ್ಮೂಲ) (सं) ना.–काख; खाकोटी.
दोल (ला) (ದೋಲ [ಲಾ]) (सं) वि.–लोंबतां; टांगतां; डोलणारा; झुला; पाळणा; झोपाळा.
दोलांदोल (ದೋಲಾಂದೋಲ) (सं.) ना.–चांचल्य; हेलकावा; तळमळ; अस्थिरता; कल्लोळ.
दोलायमान (ದೋಲಾಯಮಾನ) (सं) वि.–हलणारा; झुलणारा; लोंबता; चंचल; अस्थिर.
दोलासेतु (ದೋಲಾಸೇತು) (सं) ना.–झुलतां पूल; तरंगता पूल.
दोलि (लिका) (ದೋಲಿ [ಲಿಕಾ]) (सं.) ना.–मेणा, पालखी; डोली; अंदण.
दोले (ದೋಲೆ) (सं) ना.–'दोलि' पहा. नीळीचे झाड; जांभळीचे झाड.
दोष (ದೋಷ) (सं) ना.–प्रमाद; उणेपणा; अवगुण; न्यूनता; अभाव; अकल्याण; राग; हानी; मोह; कलंक; डाग; पाप; दुखणें; खाज; देहातील त्रिदोष; शिवी.
—कर (—ಕರ) (सं) वि.–हानीकारक; नुकसानीचे.
—कारि (—ಕಾರಿ) (सं) वि.–पीडादायक; हिंसक; अकल्याणकृत.
—ग्राहि (—ಗ್ರಾಹಿ) (सं) वि.–दोषैकदृष्टि.
—ज्ञ (—ಜ್ಞ) (सं) वि.–दोष जाणणारा; वैद्य; ज्ञानी.
—त्रय (—ತ್ರಯ) (सं) ना.–कफवात पित्त हे त्रिदोष.
—भाजन (—ಭಾಜನ) (सं) ना.–पापमूल; दोषकारण; प्रमादी.
—हर (—ಹರ) (सं) वि.–दोष नाहींसे करणारा; धुवून काढणारा.
दोषा (ದೋಷಾ) (सं) ना.–रात्र; सायंकाल; अंधार; काळोख.
दोषाकर (ದೋಷಾಕರ) (सं) ना.–चंद्र; शशी; काळे किरण असणारा.
दोषि (ದೋಷಿ) (सं) ना.–प्रमादी; पापी; अपराधी; चंद्र.
दोषैकदृक् (ದೋಷೈಕದೃಕ್) (सं) ना.–केवळ दोषच पहाणारी दृष्टि; पुरोभागी असणारा; बिनीवर असणारा.
दोस (ದೋಸ) (सं) ना.–'दोष' पहा.
दोस्त (ದೋಸ್ತ) (अ. दे) ना.–जोडीदार; सांगाती; मित्र; सवंगडी.
दोस्ति (ದೋಸ್ತಿ) (अ.दे) ना.–मित्रत्व; स्नेह; मैत्री.
दोह (ದೋಹ) (क) ना.–द्रोह; असूया; सूड; द्वेष; प्रतिकार; अहित चिंतन; दुरिच्छा; धारा काढणे.
दोहद (ळ) (ದೋಹದ [ಳ]) (सं) ना.–आशा; इच्छा; डोहाळे.
—वति (—ವತಿ) (सं) ना.–डोहाळकरीण; गर्भिणी; गर्भिणीची इच्छा; डोहाळे लागलेली स्त्री.
दोहन (ದೋಹನ) (सं) ना.–दूध काढणें; धारा पिळणें.
दोळायमान (ದೊಳಾಯಮಾನ) (सं) ना.–हलणारे; लोंबणारें.
दौति (ದೌತಿ) (अ.दे) ना.–दौत; शाईचें भांडें.
दौत्य (ದೌತ್ಯ) (सं) ना.–दूताचे काम; निरोप; रायभार; सांगावा.

**दौरात्म्य** (ದೌರಾತ್ಮ್ಯ) (सं) ना.—दुरात्म्याची स्थिति; नीचपणा; खलत्व; दुष्टपणा.
**दौर्जन्य** (ದೌರ್ಜನ್ಯ) (सं) ना.—दुर्जनता; दुष्टपणा; वाईटपणा.
**दौर्बल्य** (ದೌರ್ಬಲ್ಯ) (सं) ना.—अशक्तपणा; शक्तिहीनता; असमर्थपणा.
**दौर्भाग्य** (ದೌರ್ಭಾಗ್ಯ) (सं) ना.—अगतिकता; दारिद्र्य, दुरदृष्ट.
**दौलत (त्तु)** (ದೌಲತ [ತ್ತು]) (अ.दे) भाग्य; श्रीमंती; ऐट; विलास; अवडंबर,
**दौवारिक** (ದೌವಾರಿಕ) (सं) ना.—पहारेकरी; द्वारपाळ; देवडीवाला; चौकीदार.
**दौष्टय** (ದೌಷ್ಟ್ಯ) (सं) ना.—दुष्ट स्वभाव; पापकर्म; नीचता.
**दौष्यंति** (ದೌಷ್ಯಂತಿ) (सं) ना.—भरत; दुष्यंतपुत्र.
**दौहित्र** (ದೌಹಿತ್ರ) (सं) ना.—मुलीचा मुलगा; नातवंड;
**दौहृद** (ದೌಹೃದ) (सं) ना.—शत्रुत्व; वैर; दुजाभाव; गर्भिणींचे डोहाळे.
**द्यु** (ದ್ಯು) (सं) ना.—दिवस; आकाश; स्वर्ग.
**द्युक** (ದ್ಯುಕ) (सं) ना.—घूक; घुबड.
**द्युकारि** (ದ್ಯುಕಾರಿ) (सं) ना.—कावळा.
**द्युति** (ದ್ಯುತಿ) (सं) ना.—कांती; प्रकाश; उजेड; ओप; लकाकी.
**द्युनदि (दी)** (ದ್ಯುನದಿ [ದೀ]) (सं) ना.—आकाशगंगा; सुरनदी; स्वर्धुनि.
**द्युमणि** (ದ್ಯುಮಣಿ) (सं) ना.—आकाशरत्न; आकाशदीप; सूर्य.
**द्युमुख** ದ್ಯುಮುಖ) (सं) ना.—दिनारंभ; सकाळ; प्रभात; अरुणोदय.
**द्युम्न** (ದ್ಯುಮ್ನ) (सं) ना.—संपत्ति; प्रकाश; अधिकार; सामर्थ्य.
**धृष्टद्युम्न** (ಧೃಷ್ಟದ್ಯುಮ್ನ) (सं) ना.—समर्थ; द्रौपदीचा वडील भाऊ.
**द्यूत** (ದ್ಯೂತ) (सं) ना.—जुगार; पगडी; सोंगटी; नरद.
—**कारि** (ಕಾರಿ) (सं) ना.—जुगारी; सोंगट्या खेळणारा.
**द्यों** (ದ್ಯೋ) (सं) ना.—स्वर्ग; आकाश.
**द्योत** (ದ್ಯೋತ) (सं) ना.—प्रकाश; कांती; उजेड; ऊन्ह; वैभव.
—**खद्योत** (ಖದ್ಯೋತ) (सं) ना.—काजवा; सूर्य.
**द्योतक** (ದ್ಯೋತಕ) (सं) वि.—उजेड असलेला; प्रकाशमय; दाखवणारा.
(सं) ना.—सूचना; आदर्श; उदाहरण.
**द्योतन** (ದ್ಯೋತನ) (सं) ना.—प्रकाश; चकाकी; कांती; प्रदर्शन; ज्ञान; दृष्टि; विवरण; आदर्श.
**द्योतिरिंगण** (ದ್ಯೋತಿರಿಂಗಣ) (सं) ना.—काजवा.
**द्रढिम** (ದ್ರಢಿಮ) (सं) ना.—घट्टपणा; दृढता; निश्चय; भार; पक्कड; मिठी.

**द्रमिड** (ದ್ರಮಿಡ) (सं) ना.—तमीळ देशाचा; द्रवीड.
**द्रव** (ದ್ರವ) (सं) ना.—तहान; प्रवाही पदार्थ; रस; वेग; प्रवाह.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.—पाणी सुटणें; वाहविणें; पाणी सोडणें; वितळणें; द्रवणें; कळवळणें; पाझर फुटणें; दया येणें; 'मरगु' पहा.
**द्रवण** (ದ್ರವಣ) (सं) ना.—वितळणी; पाझर; विद्रव; प्रवाह.
**द्रवविशिष्ट** (ದ್ರವವಿಶಿಷ್ಟ) (सं) ना.—द्रवाचें गुरुत्वमापक;
—**गुरुत्वमापक** (ಗುರುತ್ವಮಾಪಕ) हायड्रोमीटर.
**द्रविड** (ದ್ರವಿಡ) (सं) ना.—'द्रमिड' पहा.
**द्रविण** (ದ್ರವಿಣ) (सं) ना.—द्रव्य; संपत्ति; सोनें; शक्ति; सामर्थ्य.
**द्रवीकरण** (ದ್ರವೀಕರಣ) (सं) ना.—घन पदार्थाला दिलेलें द्रवरूप; धातुवितळणी.
**द्रव्य** (ದ್ರವ್ಯ) (सं) ना.—प्रवाही पदार्थ; वितळलेली वस्तु; लाख; मद्य; अत्तर; सुगंधी पदार्थ; धन; संपत्ति; गुत्ता.
**द्रव्यानुकूल्य** ದ್ರವ್ಯಾನುಕೂಲ್ಯ) (सं) ना.—अर्थानुकूलता; श्रीमंती.
**द्रव्यार्जन** (ದ್ರವ್ಯಾರ್ಜನ) (सं) ना.—धनसंपादन; पैशाचा संग्रह; मिळकत.
**द्रष्टृ** (ದ್ರಷ್ಟೃ) (सं) ना.—डोळ्यांनी पाहणारा; शोधून काढणारा; साक्ष्य.
**द्रष्टार** (ದ್ರಷ್ಟಾರ) (सं) ना.—शोधक; द्रष्टा; ऋषि; मंत्राचा साक्षात्कारी मुनी.
**द्रा** (ದ್ರಾ) (सं) धा.—झोप घेणें; फाडणें; दडपणें.
**द्राक्षा (क्षे)** (ದ್ರಾಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.—द्राक्षे; बेदाणा; मनुका.
—**रस** (—ರಸ) (सं) ना.—द्राक्षार्क; द्राक्षासव.
**द्राक्षापाक** (ದ್ರಾಕ್ಷಾಪಾಕ) (सं) ना.—मृदुमधुर काव्यशैली; रसाळ साहित्य.
**द्राक्षाराम** (ದ್ರಾಕ್ಷಾರಾಮ) (सं) ना.—द्राक्षीचा मळा; द्राक्षाचा बाग.
**द्राघिम** (ದ್ರಾಘಿಮ) (सं) ना.—रेखांशाची मोजणी; दक्षिणोत्तर ध्रुवांतर
**द्राघियस्** (ದ್ರಾಘಿಯಸ್) (सं) ना.—दीर्घतर; लांबींतील तरतम-भाव.
**द्राघिष्ठ** (ದ್ರಾಘಿಷ್ಠ) (सं) वि.—दीर्घतम; सर्वांत मोठें.
**द्रामिल** (ದ್ರಾಮಿಲ) (सं) ना.—चाणक्याचें एक नांव.
**द्राव** (ದ್ರಾವ) (सं) ना.—रसरूप; प्रवाहरूप.
**द्रावक** (ದ್ರಾವಕ) (सं) ना.—वितळलेला प्रवाह; वितळविणारा पदार्थ; चंद्रकांत; आम्ल; मेणबत्ती; चोर; चतुर मनुष्य; मन द्रवविण्याचें साधन.
**द्रावण** (ದ್ರಾವಣ) (सं) ना.—वितळण्याची क्रिया; शुद्ध करण्याची क्रिया; गर्भाधान; शुद्धि.

द्राविके (ದ್ರಾವಿಕೆ) (सं) ना.–लालारस; लाळ; मुखरस; तोंडाला सुटलेलें पाणी; मुखरस; उष्टें.

द्राविड (ದ್ರಾವಿಡ) (सं) ना.–'द्रविड' पहा; तमीळ; तेलंग; कर्नाटक; गुर्जर; महाराष्ट्र या देशांतील पंचद्रवीड ब्राह्मण.

—धरा (रे)(ಧರಾ (ರೆ) (सं) ना.–तामीळ देश; द्रविड देश.

द्राव्य (ದ್ರಾವ್ಯ) (सं) ना.–वितळलेला पदार्थ; पन्हे; सरबत वगैरे पानक पदार्थ.

द्रुण (ದ್ರುಣ) (सं) ना.–विंचु; वृश्चिक; 'तेंळ' पहा.

द्रुणि (ದ್ರುಣಿ) (सं) ना.–लक्ष्मी; विंचु; शतपदी; कासवी; मुसळाचें कडें-जानवें.

द्रुत (ದ್ರುತ) (सं) वि.–वितळलेलें; पाणी दिलेलें; त्वरापूर्ण; घाईचें; वेगवान; (सं) ना. संगीतातील गतीची लय.

—गति (—ಗತಿ) (सं) ना.–दौडचाल; संगीतातील लय.

द्रुतविलंबित (ದ್ರುತವಿಲಂಬಿತ) (सं) ना.–तीव्रमंद वेग असलेले; एक वृत्त; पद्यधाटी.

द्रुपद (ದ್ರುಪದ) (सं) ना.–द्रौपदीचा पिता; बारा मात्रांचा एक ताल.

—जा,-जे (–ಜಾ–ಜೆ) (सं) ना.–द्रुपदकन्या; द्रौपदी.

द्रुम (ದ್ರುಮ) (सं) ना.–वृक्ष; झाड.

द्रुहिण (ದ್ರುಹಿಣ) (सं) ना.–ब्रह्मदेव; शिव.

द्रोण (ದ್ರೋಣ) (सं) ना.–द्रोणाचार्य; एक माप; डोमकावळा; होडी; नाव; द्रोण; वाटी; पर्वतप्रांत; वृक्षविशेष; सरोवर.

द्रोणि (णी) (ದ್ರೋಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–खंदक; दरी; प्राचीन देशविशेष.

द्रोह (ದ್ರೋಹ) (सं) ना.–वैर; अभिशाप; तळतळाट; असूया; अपकार; अहित चिंतन; दंगा; बंड; 'दोह' पहा.

द्रोहि (ದ್ರೋಹಿ) (सं) वि.–दुष्टावा करणारा; अहितचिंतक; कपटी; हिंसक; अपकारी.

द्रौणि (ದ್ರೌಣಿ) (सं) ना.–द्रोणपुत्र; अश्वत्थामा.

द्रौपदि (दी) (ದ್ರೌಪದಿ [ದೀ]) (सं) ना.–द्रुपदकन्या; पांडवपत्नि.

द्वंद्व (ದ್ವಂದ್ವ) (सं) ना.–जोडी; दोनची संख्या; युग्म; प्रिया-प्रियकरांचा कलह; युद्ध; हातघाई; संदेह; संशय; संभोग; मीलन; विवाद; जन्ममरण; ढकलाढकली; द्विधा मन; स्पर्धा; एक समास; सुखदुःख; शीतोष्ण; गूढ.

द्वंद्वचर (ದ್ವಂದ್ವಚರ) (सं) ना.–जोडीनें राहणारे; चक्रवाक पक्षी.

द्वंद्वयुद्ध (ದ್ವಂದ್ವಯುದ್ಧ) (सं) ना.–दोघांची हातघाई; दोघांची लढाई.

द्वंद्वातीत (ದ್ವಂದ್ವಾತೀತ) (सं) ना.–जन्ममरण; सुखदुःख अशा द्वंद्वाच्या पलीकडील; अद्वैती.

द्वय (ದ್ವಯ) (सं) ना.–जोडी; दोहोंची गणती.

द्वादशकर (ದ್ವಾದಶಕರ) (सं) ना.–बाराहात असलेला; षण्मुख; कार्तिकेय; सूर्य.

द्वादशि (शी) (ದ್ವಾದಶಿ [ಶೀ]) (सं) ना.–बारावी तिथी.

द्वापर (पार) (ದ್ವಾಪರ [ಪಾರ]) (सं) ना.–युग कल्पनेतील तिसरें युग; सदभिमानी असुर; युद्ध; भांडण; संशय.

द्वामुषायण (ದ್ವಾಮುಷಾಯಣ) }
द्वैमुष्यायण (ದ್ವೈಮುಷ್ಯಾಯಣ) } सं. ना.–आडवी भिंत.

—दत्तक (—ದತ್ತಕ) (सं) ना.–दोन्ही घराण्याला वारस ठरणारी दत्तकपद्धति; मोघम; संदिग्ध.

द्वार (ದ್ವಾರ) (सं) ना.–दरवाजा; पुढचा दरवाजा; वेश; रीत; मार्ग; प्रवेश; मूलक.

द्वारकलश (ದ್ವಾರಕಲಶ) (सं) ना.–फाटक; आवाराचें दार; खांबावरील कलश; गोपुर; वागर; खड्डा.

द्वारदेश (ದ್ವಾರದೇಶ)(सं) ना.–दरवाजा; दरवाजाजवळची जागा.

द्वारबंध (ದ್ವಾರಬಂಧ) (सं) ना.–चौकट; अडणा; खीळ; खिटी; चिमणी.

द्वारमंटप (ದ್ವಾರಮಂಟಪ) (सं) ना.–दारातील मांडव; कुंज; दरवाजावरील मंडप.

द्वारावति (ದ್ವಾರಾವತಿ) }
द्वारका (ದ್ವಾರಕಾ) } (सं) ना.–द्वारका; कृष्णाची राजधानी.

द्वारिक (ದ್ವಾರಿಕ) (सं) ना.–द्वारपाल; पहारेकरी; चौकीदार.

द्वि (ದ್ವಿ) (सं) वि.–दोन.

द्विक (ದ್ವಿಕ) (सं) ना.–जोडी; युग्म; दोन चरणांच्या पदांचा अन्वय होणारी पद्यरचना.

द्विककुद (ದ್ವಿಕಕುದ) (सं) ना.–दोन मदार असणारा; उंट; दोन दिशा.

द्विकर्मक (ದ್ವಿಕರ್ಮಕ) (सं) ना.–दोन कर्मांचे वाक्य.

द्विकवचि (ದ್ವಿಕವಚಿ) (सं) ना.–दोन कवचांचा प्राणी; कालव.

द्विगु (ದ್ವಿಗು) (सं) ना.–एक समास; दोन गायींचा मालक.

द्विगुण (ದ್ವಿಗುಣ) (सं) ना.–दुप्पट; द्विविध.

द्विगुणित (ದ್ವಿಗುಣಿತ) (सं) ना.–दोन वेळ गुणलेले; वर्ग.

द्विज (ದ್ವಿಜ) (सं) ना.–ब्राह्मण; पक्षी; पाल; नक्षत्र; सर्प; दोनदां जन्मणारा.

—त्व (—ತ್ವ) (सं) ना.–ब्राह्मणत्व.

—राज (—ರಾಜ) (सं) ना.–चंद्र; गरूड; आदिशेष.

द्विजन्म (जात) (ದ್ವಿಜನ್ಮ [ಜಾತ]) (सं) ना.–'द्विज' पहा. ब्राह्मणादि त्रिवर्ग. दोनदा जन्मणारा.

द्विजिव्ह (व्हा) (ದ್ವಿಜಿಹ್ವ [ಹ್ವಾ]) (सं) ना.–सर्प; दोन जिभा असलेला; वचनभंग करणारा; दुतोंड्या; थापेबाज; गप्पिष्ट; बोलण्यांत बोलणें नसलेला.

द्विट् (ದ್ವಿಟ್) (सं) ना.–वैरी; शत्रु; द्रोही; पेव.
द्वितय (ದ್ವಿತಯ) (सं) ना.–जोडी; युग्म; युति.
द्वितीय (ದ್ವಿತೀಯ) (सं) वि.–दुसरा.
द्वितीया (ದ್ವಿತಿಯಾ) (सं) ना.–दुसरी तिथी; दुसरी विभक्ति; कर्म विभक्ति; द्वितीया विभक्ति.
द्वित्व (ದ್ವಿತ್ವ) (सं) ना.–दुसरेपणा; दंपती; पतिपत्नी; जोडी; द्वित्ताक्षर.
द्विदल (ದ್ವಿದಲ) (सं) ना.–दोन दळांचें धान्य; दोन भाग असलेले.
 —धान्य (—ಧಾನ್ಯ) (सं) ना.–कडधान्य, मोडधान्य; ज्याला मोड फुटतात ते धान्य.
द्विधा (ದ್ವಿಧಾ)(सं) अ.–दोन प्रकारें; दोन्ही रीतीनें; चलबिचल होऊन.
द्विप (ದ್ವಿಪ) (सं) ना.–हत्ती; दोनदा पिणारा.
 —अरि (—ಅರಿ) (सं) ना.–सिंह; वाघ.
द्विपद (ದ್ವಿಪದ) (सं) ना.–दोन पायांचा प्राणी; दोन चरणांचे पद्य; मनुष्य; देवता; राक्षस; पक्षी.
द्विपदि (ದ್ವಿಪದಿ) (सं) ना.–दोन चरणांचें पद्य.
द्वि फलक विमान (ದ್ವಿಫಲಕ ವಿಮಾನ) (सं) ना.–जोडविमान.
द्विभाषि (ದ್ವಿಭಾಷಿ) (सं) ना. दुभाषी; दोन भाषा जाणणारा.
द्विमातृक (ದ್ವಿಮಾತೃಕ) (सं) ना.–दोन माता असलेला; गणपति; जरासंध.
द्विमुख (ದ್ವಿಮುಖ) (सं) ना.–दुतोंडें; भेरूंड; दोन मुखे असलेला सर्प.
द्विरद (ದ್ವಿರದ) (सं) ना.–दोन दात असलेला; हत्ती; रानडुक्कर.
द्विरुक्ति (ದ್ವಿರುಕ್ತಿ) (सं) ना.–एकाच गोष्टीचें दोनदां कथन; दोनदां उच्चारलेला शब्द.
द्विरूढा (ದ್ವಿರೂಢಾ) (सं) ना.–दोनदा विवाह झालेली; पुनर्विवाहिता.
द्विरेफ (ದ್ವಿರೇಫ) (सं) ना.–भ्रमर; मधमाशी; भुंगा.
द्विवचन (ದ್ವಿವಚನ) (सं) ना.–दोन गोष्टी; दोन संख्यादर्शक संस्कृत व्याकरणांतील द्विवचन.
द्विवेदि (ದ್ವಿವೇದಿ) (सं) ना.–दोन वेद जाणणारा.
द्विशफ (ದ್ವಿಶಫ) (सं) ना.–द्विभागलेला खुर; जनावरांच्या पावलाचें गेळ.
द्विशिर (ದ್ವಿಶಿರ) (सं) ना.–अग्नि; भेरुंडपक्षी.
द्विषत् (ದ್ವಿಷತ್) (सं) वि.–वैरी; शत्रु; दुष्ट.
द्विः, (द्विस्)(ದ್ವಿಃ ದ್ವಿಸ್) (सं) वि.–दोन; दोनदा.
द्विसप्ताह (ದ್ವಿಸಪ್ತಾಹ) (सं) वि.–पंधरवडा; पक्ष; दोन सप्ताहांचा काळ.
 —क पत्र (ಕ ಪತ್ರ) (सं) ना.–पाक्षिक; दोन आठवड्यांनी प्रकाशित होणारे वृत्तपत्र.
द्वि हृदय (ದ್ವಿಹೃದಯ) (सं) ना.–वंचक; फसव्या.
द्वि हृदये (ದ್ವಿಹೃದಯೆ) (सं) ना.–गर्भिणी; अंतर्वर्तिनि; दोन जीव असलेली; गरोदर.
द्वीप (ದ್ವೀಪ) (सं) ना.–बेट; पाण्यानें वेढलेला भूभाग.
 —कल्प (ಕಲ್ಪ) (सं) ना.–तीन बाजूंनी पाणी असलेला भूभाग.
द्वीपि (ದ್ವೀಪಿ) (सं) ना.–वाघ; बिबळ्या; चित्ता.
द्वेष (ದ್ವೇಷ) (सं) ना.–वैर; शत्रुत्व.
 —इसु (ಇಸು) (क) धा.–वैर करणें; द्वेष करणें.
द्वेषि (ದ್ವೇಷಿ) (सं) ना.–शत्रु; वैरी.
द्वैत (ದ್ವೈತ) (सं) ना.–जीवात्मा व परमात्मा हे भिन्न मानणारें सिद्धांत मत
 —वादि (ವಾದಿ) (सं) ना.–माध्वसांप्रदायी.
द्वैतवन (ದ್ವೈತವನ) (सं) ना.–सरस्वतीनदीतीरावरील प्रदेश.
द्वैध (ದ್ವೈಧ) (सं) वि.–दोन प्रकारें; दोन्ही बाजूंनी.
द्वैधीभाव (ದ್ವೈಧೀಭಾವ)(सं) ना.–मनाची द्विधावस्था; संमोह संशयी स्थिति; हें की तें अशी आंदोलित स्थिति.
द्वैपायन (ದ್ವೈಪಾಯನ) (सं) ना.–व्यास; बादरायण; वेदव्यास; द्वीपामध्यें राहणारा; द्वीपांत जन्मलेला.
द्वैमातुर (ದ್ವೈಮಾತುರ) (सं) ना.–गणपति; जरासंध.
द्वैमातृक (ದ್ವೈಮಾತೃಕ) (सं) ना.–'द्विमातृक' पहा.

## ध

ध (ಧ) (सं) ना.–त वर्गातील चौथें अक्षर; ठेवणारा या अर्थी एक संस्कृत प्रत्यय; ब्रह्म; सद्गुण; नीति; संपत्ति; पुंजी; मिळकत.
धक्का (ಧಕ್ಕಾ) (अ-दे) ना.–जखम; पीडा; तडाखा; ठोक; व्यथा; दुशी.
 —मुक्कि (ಮುಕ್ಕಿ) (अ-दे) ना.–ढकला ढकली; मारामारी.
धक्कु (ಧಕ್ಕು) (क) ना.–लोहाराची ऐरण; 'अद्गणि' पहा.
धक्के (का) (ಧಕ್ಕೆ) (ಕ್ಕಾ) (अ-दे) ना.–जहाजे थांबण्याचे ठिकाण.

**धग (गे)** (ಧಗ) (ಗೆ) (क) ना.–अग्नि; जाळ; धग; तहान.
**धगधगिसु** (ಧಗಧಗಿಸು) (क) धा.–धगधगणें; पेटणें; जळणें; प्रज्वलित करणें; पेटवणें.
**धट** (ಧಟ) (सं) ना.–वजनाचा मोठा काटा; मोठा तराजु; ज्योतिषशास्त्राची 'तूला' रास.
—**क** (ಕ) (सं) ना.–बेचाळीस गुंजा वजन.
**धटि** (ಧಟಿ) (सं) ना.–दुर्गंध; लंगोटी; नेसण्याचें वस्त्र; शिव.
**धटिनि (नी)** (ಧಟಿನಿ) (ನೀ) (सं) ना.–लहान पंचा; चड्डी; लंगोटी; तूळरास.
**धण्** (ಧಣ್) (क) ना.–'धण्' असा धातूंचा आवाज.
**धणि** (ಧಣಿ) (क) ना.–धनी; मालक; पैसेवाला; स्तुतीपर शब्द; गौरव शब्द.
**धणुधणु** (ಧಣುಧಣು) (क) ना.–धनधान्य, याचा पर्यायी शब्द.
**धत्तुर (रके)** (ಧತ್ತುರ) (ರಕೆ) } **धुत्तुर** (ಧುತ್ತುರ) } (सं) ना.–धोतरा; कांचनवृक्ष; रुईचें झाड.
**धन** (ಧನ) (सं) ना.–द्रव्य; संपत्ति; भाग्य; पैसा अडका;
—**आढ्य** (ಆಢ್ಯ) (सं) वि.–श्रीमंत; संपत्तिमान.
—**केलि** (ಕೇಳಿ) (सं) वि.–कुबेर; पैशाचे खेळ.
—**वंत** (ವಂತ) (सं) वि.–श्रीमान; सावकार; रंगारी.
**धनगाहि** (ಧನಗಾಹಿ) (क) ना.–सर्प; पुरलेल्या धनावरील नाग.
**धनजात** (ಧನಜಾತ) (सं) ना.–स्थिरचर संपत्ति; स्थावरजंगम मिळकत; संपत्ति संभव.
**धनंजय** (ಧನಂಜಯ) (सं) ना.–अर्जुन; पार्थ; अग्नि; कुबेर.
—**अनुज** (ಅನುಜ) (सं) ना–रावण;
—**अंबक** (ಅಂಬಕ) (सं) ना.–अग्निनेत्र; शिव.
**धनद** (ಧನದ) (सं) ना.–धन देणारा; कुबेर; धनाधिपति; अग्नि.
**धनदायि** (ಧನದಾಯಿ) (सं) ना.=अग्नि.
—**प,–पति,–पाल** (ಪ; ಪತಿ;–ಪಾಲ) (सं) ना.–कुबेर; खजीनदार; खजांची.
**धनधव** (ಧನಧವ) (सं) ना.–कुबेर; खजीनदार.
**धनपतिप्रिय** (ಧನಪತಿಪ್ರಿಯ) (सं) ना.–कुबेरमित्र; शिव.
**धनपिशाचि** (ಧನಪಿಶಾಚಿ) } **धनपिशाचक** (ಧನಪಿಶಾಚಕ) } (सं) ना.–अमर्याद; धनलोभी; दुराशी; आशाळभूत; धन राखणारा राक्षस.
**धनमद** (ಧನಮದ) (सं) ना.–संपत्तीनें येणारी मस्ती; पैशाचा ताठा.
**धनमूल** (ಧನಮೂಲ) (सं) ना.–मूळ भांडवल; ऐन धन; असल मुद्दल.

**धनहर** (ಧನಹರ) (सं) ना.–वारसदार; चोर; सुगंधी द्रव्य.
**धनासि** (ಧನಾಸಿ) (सं) ना.–धनाश्री; एक रागाचे नाव.
**धनि** (ಧನಿ) (सं) ना.–श्रीमंत; मालक; यजमान; व्याजबट्टा करणारा.
**धनिक** (ಧನಿಕ) (सं) वि.–श्रीमंत; पैसेवाला; धनी.
**धनिष्ठा (ष्ठे)** (ಧನಿಷ್ಠಾ [ಷ್ಠೆ]) (सं) ना.–एक नक्षत्र; दक्षकन्या; श्रीमंत स्त्री.
**धनी (निका)** (ಧನೀ [ನಿಕಾ]) (सं) ना.–वयांत आलेली स्त्री.
**धनु (नुष्य)** (ಧನು [ನುಷ್ಯ]) } **धनुस (स्सु)** (ಧನುಸ್ [ಸ್ಸು]) } (सं) ना.–धनुष्य; कारक.
—**गुण** (ಗುಣ) (सं) ना.–ज्या; मौर्वी.
—**द्रुम** (ದ್ರುಮ) (सं) ना.–वेळु; चिवा.
**धनुःकांड** (ಧನುಃಕಾಂಡ) (सं) ना.–धनुष्यबाण.
**धनुरागम** (ಧನುರಾಗಮ) (सं) ना.–शस्त्रविद्या; धनुर्वेद.
**धनुर्धर (र्धारी)** (ಧನುರ್ಧರ [ಧಾರಿ]) (सं) ना.–धनुष्य हातीं घेणारा; तिरंदाज.
**धनुर्बाण** (ಧನುರ್ಬಾಣ) (सं) ना.–धनुष्यासह बाण असणारा.
**धनुर्मार्ग** (ಧನುರ್ಮಾರ್ಗ) (सं) ना.–धनुष्याप्रमाणें काढलेली रेषा; कमानी कंस.
**धनुर्मास** (ಧನುರ್ಮಾಸ) (सं) ना.–सूर्य धनुराशीत येणारा महिना; मार्गशीर्ष; झुंझुरमास.
**धनुर्लते** (ಧನುರ್ಲತೆ) (सं) ना.–धनुष्याची वेल; वेळु.
**धनुर्वात** (ಧನುರ್ವಾತ) (सं) ना.–धनुष्याप्रमाणें अंग वांकडें होणारा रोग.
**धनुर्विद्या** (ಧನುರ್ವಿದ್ಯಾ) (सं) ना.–धनुर्वेद; शस्त्रविद्या.
**धनुर्वेद** (ಧನುರ್ವೇದ) (सं) ना.–धनुष्यासंबंधीचें शास्त्र.
**धनुवट्ट** (ಧನುವಟ್ಟು) (क) ना.–मल्लविद्येंतील एक डाव; पेच.
**धनुस (ष्)** (ಧನುಸ್ [ಷ್]) (सं) ना.–कोदंड; धनुकली.
**धनुष्कोटि** (ಧನುಷ್ಕೋಟಿ) (सं) ना.–धनुष्याचीं दोन टोकें; रामेश्वराजवळचें एक क्षेत्र.
**धन्य** (ಧನ್ಯ) (सं) वि.–कृतार्थ; कृतकृत्य; पुण्यवंत; भाग्यशाली; श्रीमंत; सुदैवी.
—**वाद** (ವಾದ) (सं) ना.–कृतार्थता; कृतकृत्यता; आभारप्रदर्शक शब्द.
**धन्व** (ಧನ್ವ) (सं) ना.–धनुष्य; नापीक जमीन; मरुभूमि; वालुका प्रदेश.
**धन्वन् (न्वा)** (ಧನ್ವನ್ [ನ್ವಾ]) (सं) ना.–धनुर्धारी; धनुर्विद्या-निपुण; वेट; प्रवहातील स्थिर भूमि.
**धन्वंतर** (ಧನ್ವಂತರ) (सं) ना.–वाव; चार हाताचें माप.
**धन्वंतरि** (ಧನ್ವಂತರಿ) (सं) ना.–देव वैद्य; आयुर्वेदाचा जनक.
**धन्विन् (न्वी)** (ಧನ್ವಿನ್ [ನ್ವೀ])(सं) ना.–तिरंदाज; धनुर्धर;

धमनि (नी) (ಧಮನಿ [ನೀ]) (सं) ना.—रक्तवाहिनी; नाडी; मान, सुगंधी द्रव्य.

धम्म (म्मि) ल } (ಧಮ್ಮ [ಮ್ಮಿ] ಲ) (सं) ना.—केस;
धम्मिल्ल } (ಧಮ್ಮಿಲ್ಲ) वेणी; बुचडा.

धर (ಧರ) (सं) वि.—धारण करणारा; पांघरूण घेणारा; दूषित; पकडलेला; स्वाधीन झालेला.

(सं) ना.—पर्वत; धसडी; कापसाचें गांठोडें; आठ वसूपैकी एक.

धरण (ಧರಣ) (सं) ना.—धारणा; गुंतणूक; योगसाधन; गुण; सूर्य; बंध; बंधारा; कड, किनारा.

धरणि (णी) (ಧರಣಿ [ಣೀ]) (सं) ना,—भूमि; माती; पृथ्वी.

—ईश (ಈಶ) (सं) ना.—राजा; भूपति.

—ज—जात (ಜ;—ಜಾತ (सं) ना.—द्रुम; झाड.

—जा,—जे (ಜಾ;—ಜೆ) (सं) ना.—सीता; जानकी.

—प,—पाल (ಪ;—ಪಾಲ) राजा; भूमिपति.

—सुता (ते) (ಸುತಾ [ತೆ]) (सं) ना.—सीतादेवी; जानकी.

—सुर (ಸುರ) (सं) ना.—ब्राह्मण; भूदेवता.

—धर—भृत् (ಧರ,—ಭೃತ್) (सं) ना.—विष्णु; पर्वत; आदिशेष; महाराज.

धरणिपुत्र (ಧರಣಿಪುತ್ರ) (सं) ना.—मंगळ; चंद्र; नरकासुर.

धरणी (ಧರಣೀ) (सं) ना.—धरा; भूमि.

—तल (ತಲ) (सं) ना.—भूतल; भूमंडळ,

—रुह (ರುಹ) (सं) ना.—वृक्ष; झाडे.

धरणीधरेंद्र (ಧರಣೀಧರೇಂದ್ರ) (सं) ना.—महाशेष; अनंत, मेरुपर्वत; कासव; महाराज.

धरधुर (ಧರಧುರ) (सं) ना.—आश्चर्य; अचंबा; आधिक्य; अती.

धरा (ಧರಾ) (सं) ना.—धरणी; पृथ्वी; भूमि; द्रोणवसूची पत्नि; शीर; नाडी; गर्भ; गर्भाशय; उन्हाळा.

धराधर (ಧರಾಧರ) (सं) ना.—पर्वत; विष्णु; सर्प.

धरामर (ಧರಾಮರ) (सं) ना.—ब्राह्मण; भूसुर; भूदेव.

धरारुह (ಧರಾರುಹ) (सं) ना.—झाड; वृक्ष.

धरित्रि (त्री) (ಧರಿತ್ರಿ [ತ್ರೀ]) (सं) ना.—धरणी; भूमि.

धरित्रीपाल (ಧರಿತ್ರೀಪಾಲ) (सं) ना.—राजा; भूपाळ.

धरिम (मा) (ಧರಿಮ [ಮಾ]) (सं) ना.—तागडी; तराजूची पारडी.

धरिसु (ಧರಿಸು) (क) धा.—धारण करणें; वापरणें; सहन करणें; वाहून नेणें; धरणें.

धरे (ಧರೆ) (सं) ना.—'धरा' पहा.

धत्तूर (ಧತ್ತೂರ) (सं) ना.—धत्तूर; धोत्रा.

धर्म (ಧರ್ಮ) (सं) ना.—जातीपंथांचा आचारविचार; नियम; रुढी; रीति; नैतिक योग्यता; सुशीलता; सत्कृत्य. सत्समागम कर्तव्य; न्याय; समता; निःपक्षपातीपणा; भक्ति; औचित्य; प्रकृति; स्वभाव; श्रुतिस्मृतीतील आचारविचार; यज्ञयागादि कर्म; दानधर्म; प्रथम पुरुषार्थ; युधिष्ठिर; यम.

धर्मकर्तृ (र्ता) (ಧರ್ಮಕರ್ತೃ [ರ್ತಾ]) (सं) ना.—धर्माचे नियम पालन करणारा; धर्मगुरु.

धर्मकार्य (ಧರ್ಮಕಾರ್ಯ) (सं) ना.—परहिताची कृति; परोपकार; धर्मार्थ संस्थेची स्थापना; अन्नछत्र; औषधालय.

धर्मकेतु (ಧರ್ಮಕೇತು) (सं) ना.—बुद्धदेव.

धर्मक्षेत्र (ಧರ್ಮಕ್ಷೇತ್ರ)(सं) ना.—पुण्यभूमि; कुरुक्षेत्र; दिल्लीजवळची युद्धभूमि; कौरवपांडवांचें युद्धांगण.

धर्मचारिणि (णी) (ಧರ್ಮಚಾರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—धर्मपत्नि; धर्मदारा.

धर्मज (नंदन) (ಧರ್ಮಜ [ನಂದನ]) (सं) ना.—युधिष्ठिर; धर्मराज; प्रथम पांडव.

धर्मज्ञ (ಧರ್ಮಜ್ಞ) (सं) ना—धर्माधर्म विवेक जाणणारा; न्यायवंत; सद्गुणी; न्यायमूर्ति.

धर्मद्रोह (ಧರ್ಮದ್ರೋಹ)(सं) ना.—धार्मिक आचाराचा विरोध.

धर्मनिष्ठा (ಧರ್ಮನಿಷ್ಠಾ) (सं) ना.—धर्माचारणासक्त; धर्मशील.

धर्मधारा (ಧರ್ಮಧಾರಾ) (सं) ना,—कन्यादान करण्याची एक विवाह पद्धति.

धर्मपत्नि (ಧರ್ಮಪತ್ನಿ) (सं) ना.—शास्त्रपूत विवाहित वधु; पत्नि.

धर्मराम (ಧರ್ಮರಾಜ) (सं) ना.—यम; युधिष्ठिर.

धर्मशाले (ಧರ್ಮಶಾಲೆ) (क) ना.—धार्मिक शिक्षण संस्था; पांथस्थासाठीं बांधलेलें घर.

धर्मशास्त्र (ಧರ್ಮಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना.—धार्मिक विधी सांगणारे शास्त्र.

धर्मसंकट (ಧರ್ಮಸಂಕಟ) (सं) ना.—उभय संकट; शृंगापत्ति; द्विधा मनस्थिति; अनिर्णीत अवस्था.

धर्मांग (त्म) (ಧರ್ಮಾಂಗ [ತ್ಮ]) (सं) ना.—धर्मिष्ठ.

धर्माधिकारि (ಧರ್ಮಾಧಿಕಾರಿ) (सं) ना.—मठ–देवालय यावरील अधिकारी किंवा व्यवस्थापक.

धर्मासन (ಧರ್ಮಾಸನ) (सं) ना.—न्यायपीठ; न्यायालय; न्यायासन.

धर्मि (ಧರ್ಮಿ) (सं) ना.—धर्ममूर्ति; 'धर्मज्ञ' पहा.

धर्ष (ಧರ್ಷ) (सं) ना.—धैर्य; औधत्य; मस्ती.

धर्षणि (णी) (ಧರ್ಷಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—अनीतिमान स्त्री; दुराचारिणी; विधवा; उद्धता.

धव (ಧವ) (सं) ना.—पति; नवरा; मालक; भर्ता; यजमान; त्राता; रक्षणकर्ता.

धवल (ಧವಲ) (सं) ना.—पांढरेपणा; शुद्धता; स्वच्छता; सौंदर्य; कापूर.

**धवलगिरि** (ಧವಲಗಿರಿ) (सं) ना.–हिमालय; हिमपर्वतशिखर.
**धवलपक्ष** (ಧವಲಪಕ್ಷ) (सं) ना.–शुक्लपक्ष; चंद्र असणारा पंधरवडा.
**धवलागार** (ಧವಲಾಗಾರ) (सं) ना.–सौध; राजप्रासाद; चंद्रकांत; चिरेबंदी घर; पांढऱ्या मर्मरी दगडांचें घर.
**धवलित** (ಧವಲಿತ) (सं) वि.–पांढरें; शुद्ध; सुंदर
**धवलिम (मे)** (ಧವಲಿಮ [ಮೆ])(सं) ना.–पांढरा रंग; उजेड; पांढरेपणा; प्रातःकाळ; फटफटीत प्रकाश.
**धवले** (ಧವಲೆ) (सं) ना.–ढवळी गाय.
**धवळ** (ಧವಳ) (सं) ना.–'धवल' पहा.
**धवळातपत्र** (ಧವಳಾತಪತ್ರ) (सं) ना.–धवळारें; श्वेतछत्र; चक्रवर्तीपदाची छत्री; अबदागीर.
**धवित्र** (ಧವಿತ್ರ) (सं) ना.–मृगाजिनाचा पंखा.
**धाटि (टी)** (ಧಾಟಿ [ಟೀ]) (सं) ना.–रीत सरणी; पद्धति; शैली; वेग; घाई; त्वरा.
**धात (तार)** (ಧಾತ [ತಾರ]) (क) ना.–ब्रह्मदेव; विधाता; सृष्टिकर्ता; संरक्षक.
**धातु** (ಧಾತು) (सं) ना.–मूलवस्तु; त्रिदोष; रक्त; मांस; अस्थि; वीर्य; वगैरे सप्त धातु. पंचमहाभूतें; लोहादि धातु रूपरसादि विषय; बल; शक्ति; क्रियापदाचें मूळरूप; एक संवत्सर; देव; आत्मा; ज्ञानाचे अवयव.
**—साम्य** (—ಸಾಮ್ಯ) (सं) ना.–आरोग्य.
**धातृ** (ಧಾತೃ) (सं) ना.–ब्रह्मा; सृष्टिकर्ता; विधाता; विष्णु; सप्तर्षि; आत्मा; उपपत्ति; विवाहितेचा उपपति.
**धात्र** (ಧಾತ್ರ) (सं) ना.–'धातृ' पहा; चतुर्मुख; ब्रह्मदेव. नियामक; सामान ठेवण्याचें भांडें.
**धात्रि (त्री)** (ಧಾತ್ರಿ [ತ್ರೀ]) (सं) ना.–दासी; भूमि; आजी; रक्षण करणारी आई; आवळा; उपमाता.
**धात्रिका (के)** (ಧಾತ್ರಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–'धात्री' पहा.
**धात्रीफल** (ಧಾತ್ರೀಫಲ) (सं) ना.–आवळा; आमलक.
**धान** (ಧಾನ) (सं) ना.–स्थापना; धारणा; संस्थापना
**धान्य** (ಧಾನ್ಯ) (सं) ना.–धनासंबंधीचें; ठेवण्यायोग्य; आदरणीय; दाणा; 'दवस' पहा.
**—राज** (—ರಾಜ) (सं) ना.–सातु; बार्ली
**—वीर** (—ವೀರ) (सं) ना.–लांबट धान्य; लांबट दाणा.
**धान्यक** (ಧಾನ್ಯಕ) (सं) ना.–धने; कोथिंबीर
**धानुष्क** (ಧಾನುಷ್ಕ) (सं) ना.–तिरंदाज; धनुर्विद्या जाणणारा.
**धानुष्य** (ಧಾನುಷ್ಯ) (सं) ना.–वेळु; वेत.
**धाम (मन)** (ಧಾಮ [ಮನ್]) (सं) ना.–घर; वास; शरीर; कांती; किरण; प्रकाशज्योति; मर्यादा; घट्टपणा; आधार; बल; जन्म.
**—केशि** (—ಕೇಶಿ) (सं) ना.–सूर्य.
**धामनिधि** (ಧಾಮನಿಧಿ) (सं) ना.–किरणाकर; सूर्य.
**धार** (ಧಾರ) (सं) वि.–धरणारा; धारण करणारा; वाहणारा. (सं) ना.–वृष्टि; धुकें; अनारोग्य; भय.
**धारक** (ಧಾರಕ) (सं) वि.–आधारभूत; अवधारित; स्तंभ; बुडबुडा; कारंजा.
**धारण** (ಧಾರಣ) (सं) ना.–धारणा; पत्कर; आदर; स्मरण; सहनशीलता; रक्षण; श्वासनिरोध; मनोनिग्रह.
**धारणे** (ಧಾರಣೆ) (सं) ना.–धारणा; आधार; किंमत; दर; भाव; व्रताचे उद्यापन; 'धारण' पहा.
**धारा** (ಧಾರಾ) (सं) ना.–प्रवाह; विवाहांतील मुख्य क्रिया; कन्यादान; शस्त्राची धार; घोड्याची चाल; दानाचें पाणी सोडणें.
**—मुहूर्त** (—ಮುಹೂರ್ತ) (सं) ना.–कन्यादानाचा मंगल समय.
**धारागृह** (ಧಾರಾಗೃಹ) (सं) ना.–स्नानगृहांतील फवारा; वृष्टि; जलवर्षाव.
**धाराग्र** (ಧಾರಾಗ್ರ) (सं) ना.–खड्गाची धार; बाणाचें तीक्ष्ण टोंक.
**धारातीर्थ** (ಧಾರಾತೀರ್ಥ) (सं) ना.–रणक्षेत्र; युद्धांतील रक्तपाताचें मरण.
**धारादत्त** (ಧಾರಾದತ್ತ) (सं) ना.–पाणी सोडून केलेले दान; शास्त्रोक्त देणगी.
**धाराधर** (ಧಾರಾಧರ) मेघ; जलद; जलधारण करणारा.
**धारासंपात** (ಧಾರಾಸಂಪಾತ) (सं) ना.–संततधार पाऊस; पावसाची झड; मुसळधार पाऊस; 'सोने' पहा.
**धाराळ** (ಧಾರಾಳ) (सं) वि.–सढळ हातानें देणारा; उदार हृदयी; विपुल; भरपूर.
**—तन** (—ತನ) (सं) ना.–औदार्य; दानशूरता.
**धाराळि** (ಧಾರಾಳಿ) (सं) वि.–उदार हृदयाचा; दानी; मुक्त हस्तानें देणारा.
**धारि** (ಧಾರಿ) (सं) ना.–धारण करणारा; आश्रयदाता; वाहक; धारक; धरणारा.
**धारिणि (णी)** (ಧಾರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–धरणारी; धारण करणारी; भूमि.
**धारुणि** (ಧಾರುಣಿ) (सं) ना.–धरणी; भूमि; धरा.
**धारे (रा)** (ಧಾರೆ [ರಾ]) (सं) ना.–पाण्याचा प्रवाह; पाण्याची धार; तरवारीच्या पात्याची धार; घोडचाल.
**धारेयेरे** (ಧಾರೆಯೆರೆ) (क) धा.–कन्यादान करणें; विवाहांतील मुख्य क्रिया विधीपूर्वक करणें.
**धार्तराष्ट्र** (ಧಾರ್ತರಾಷ್ಟ್ರ) (सं) ना.–कौरव; धृतराष्ट्रपुत्र; हंसविशेष.

**धार्मिक** (ಧಾರ್ಮಿಕ) (सं) वि.–धर्मशास्त्र संमत; धर्मसंबंधी.
**धार्ष्ट्य** (ಧಾರ್ಷ್ಟ್ಯ) (सं) ना.–धीटपणा; औद्धत्य; मस्ती; धैर्य; मर्यादातिक्रम.
**धावक** (ಧಾವಕ) (सं) वि.–वेगानें जाणारा.
(सं) ना.–कपडे धुणारा; परीट; रजक; एक संस्कृत नाटककार.
**धावति** (ಧಾವತಿ) (अ.दे) ना.–श्रम; कष्ट; थकवा; अंगमेहनत.
**धावन** (ಧಾವನ) (सं) ना. घर्षण; रंधणूक; रांधण; सफाई; स्वच्छता; शोध; दौड; धाव; विरोध.
**धावल्य** (ಧಾವಲ್ಯ) (सं) ना.–पांढरेपणा; सौंदर्य; निर्मलपणा.
**धा (ढा) ळ** (ಧಾ [ಢಾ] ಳ) (अ.दे) ना.–कळ; ओढा; उंच निशाण; कांती; शोभा.
**धा (दा) ळि** (ಧಾ [ದಾ] ಳಿ) (क) ना.–धाटी; चढाई; लूट; वेढा; लग्गा.
**धि** (ಧಿ) (सं) ना.–समूह; रास; आधार; धारणा.
**धिक्** (ಧಿಕ್) (सं) अ.–तिरस्कार सूचक शब्द; धिक्कारदर्शक अव्यय.
**धिक्करिसु** (ಧಿಕ್ಕರಿಸು) (क) धा.–धिक्कारणें; पाय घसरणें; तिरस्कारणें; त्याग करणें; नाकबूल करणें.
**धिक्कार** (ಧಿಕ್ಕಾರ) (सं) ना.–तिरस्कार; नाकबुली; असंमति; अधिक्षेप; दुर्लक्ष.
**धिक्कृत** (ಧಿಕ್ಕೃತ) (सं) वि.–तिरस्कृत; अलक्षित; अमान्य; नाकबूल.
**धिषण** (ಧಿಷಣ) (सं) ना.–बृहस्पति; सुरगुरू.
**धिषणे** (ಧಿಷಣೆ) (सं) ना.–बुद्धि; ज्ञान; समजूत; जाणतेपणा.
**धी** (ಧೀ) (सं) ना.–बुद्धि; ज्ञान; जाणीव; समज.
**धीमणि** (ಧೀಮಣಿ) (सं) ना.–श्रेष्ठबुद्धि.
**धीमत् (मंत)** (ಧೀಮತ್ [ಮಂತ]) (सं) वि.–विवेकी; बुद्धिमान; जाणता; समजदार.
**धीमति** (ಧೀಮತಿ) (सं) ना.–विवेकिनी; जाणती स्त्री.
**धीमन्** (ಧೀಮನ) (सं) ना.–'धीमत्' पहा. बुद्धिवंत.
**धीर** (ಧೀರ) (सं) ना.–शूर; बलशाली; धीर; दांडगा; पंडित; स्थिरबुद्धि; कलि.
**धीरोदात्त** (ಧೀರೋದಾತ್ತ) (सं) ना.–धीरगंभीर; कथानायक; महापुरुष.
**धीवर** (ಧೀವರ) (सं) ना.–विद्वान; पंडित; कोळी; नावाडी.
**धीवसि** (ಧೀವಸಿ) (सं) ना.–शत्रु; वैरी.
**धीश** (ಧೀಶ) (सं) ना.–बुद्धिस्वामी; विद्वान्; पंडित.
**धीसचिव** (ಧೀಸಚಿವ) (सं) ना.–सारासार विचार सांगणारा मंत्री; केवळ सल्लागार.
**धुत** (ಧುತ) (सं) वि.–थरथरणारा; कंपित; लटपटलेला. दयेनें पाघळलेला.
**धुनि** (ಧುನಿ) (सं) वि.–गर्जणारा; कंप पावणारा; ओरडणारा.
(सं) ना.–कंपन; थरकाप; नदी.
**धुमुकु** (ಧುಮುಕು) } (क) ना.–उत्साहानें आंत
**धुम्मिकु** (ಧುಮ್ಮಿಕ್ಕು) } शिरलेला; धुडुमदिशी उडी मारणें; मागचापुढचा विचार न करता ढकलणें.
**धुर् (र)** (ಧುರ್ [ರ]) (सं) ना.–पुढचा भाग; मुख्य भाग; जू; भारा; युद्ध; कापाकापी.
**धुरंधर** (ಧುರಂಧರ) (सं) ना.–धुरा वाहणारा; जोखम घेणारा; कर्तव्यभार संभाळणारा; मुखंड; पुढारी; गाडीला जोडलेला बैल.
**धुरीण** (ಧುರೀಣ) (सं) ना.–पुढारी; नायक; नेता; समर्थ; धुरंधर.
**–त्व,–ते,–तन** (ತ್ವ, – ತೆ; – ತನ) (सं) ना.–पुढारीपण; नायकत्व; नेतेपण.
**धुरे** (ಧುರೆ) (सं) ना.–ओझें; भार; धुरा; जूं; जोखम.
**धुर्य** (ಧುರ್ಯ) (सं) वि.–भार वाहण्यास योग्य; नेता बनलेला; पुढारी झालेला.
**धूत** (ಧೂತ) (सं) वि.–लंगोट घातलेला; गमावलेला; शुद्ध; हरवलेला; धुतलेला; सोवळा.
**धूतादेवि** (ಧೂತಾದೇವಿ) (सं) ना.–पतिव्रता; चारुदत्ताची पत्नि.
**धूप** (ಧೂಪ) (सं) ना.–सुगंध द्रव्य, सुगंधी धूर, चंदन; धुपाचे झाड.
**धूपवर्ति** (ಧೂಪವರ್ತಿ) (सं) ना.–उदबत्ती; उदकाडी; अगरबत्ती.
**धूपायित** (ಧೂಪಾಯಿತ) (सं) वि.–सुगंधित; धूप घातलेलें; जळणारें; वापरांत असलेले; इन्हळणारे.
**धूम** (ಧೂಮ) (सं) ना.–धूर; धूम्र.
**धूमल** (ಧೂಮಲ) (सं) ना.–धूसर; कुंदी रंग; राखी रंग.
**धूमकेतु** (ಧೂಮಕೇತು) (सं.) ना.–अग्नि; एक नक्षत्र; उत्पातचिन्ह; शेंडे नक्षत्र
**धूमयोनि** (ಧೂಮಯೋನಿ) (सं) ना.–आकाश; आभाळ.
**धूमशकट** (ಧೂಮಶಕಟ) (सं) ना.–अग्निरथ; रेलगाडी; आगगाडी.
**धूम्य (म्यें)** (ಧೂಮ್ಯ [ಮ್ಯೆ]) (सं) ना.–धुराचा लोट; धूमराशी.
**धूम्र** (ಧೂಮ್ರ) (सं) ना.–धूर; धूम; धूसर रंग; अंधार; अंधुकता; प्रोक्षण; शिंपडणी; फवारा.
**पत्र** (ಪತ್ರ) (सं) ना.–तमाखू
**धूम्रपायि** (ಧೂಮ್ರಪಾಯಿ) (सं) ना.–धूम्रपानाचें साधन; गुडगुडी; चिलीम.
**धूर्जटि (टिन्)** (ಧೂರ್ಜಟಿ [ಟಿನ್]) (सं) ना.–शंकर; धूसरजटा असणारा.

धूर्त (ಧೂರ್ತ) (सं) वि.—दूरदर्शी; वंचक; फसव्या; समर्थ; बलशाली; युक्तिबाज; शठ.
धूलि (ली) (ಧೂಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—धूळ; माती; मातीचा ढिगारा; रजःकण.
—(दु) धूसरित (ದು [ಧೂಸರಿತ]) (सं) वि.—धूळीनें भरलेले; मळलेलें; पूडपूड झालेले; धूळमय बनलेले.
धूलिध्वज (ಧೂಲಿಧ್ವಜ) (सं) ना.—वावटळ; झंझावात.
धूसर (ಧೂಸರ) (सं) ना.—कंदी; राखी; धुरकट रंग; उंट; गाढव.
धूळि (ಧೂಳಿ) (सं) ना.—'धूलि' पहा.
—त (ತ) (सं) ना.—मातीच माती; धूळमय; ओवळे.
—इसु (ಇಸು) | अंगभर धूळ माखणें; विध्वंस करणें;
—अेब्बिसु (ಎಬ್ಬಿಸು) | वाटेल तसा खर्च करणें.
धूळीपट (ಧೂಳೀಪಟ) (सं) ना.—पतंग; पताका; हवेवर तरणारा; दाणा; ऱ्हास; उध्वस्तपणा.
धूळीपटल (ಧೂಳೀಪಟಲ) (सं) ना.—वावटळ; 'धूलिध्वज' पहा.
धृत (ಧೃತ) (सं) वि.—धारण केलेले; स्वीकारलेले; पेटलेले; आदर केलेले.
धृतराष्ट्र (ಧೃತರಾಷ್ಟ್ರ) (सं) ना. कौरवांचा पिता; गांधारीचा पति; राष्ट्रपुढारी; हंस विशेष; एक गंधर्व.
धृति (ಧೃತಿ) (सं) ना.—दार्ढ्य; घट्टपणा; संतोष; निश्चलता; दान; धारणा; प्रसन्नता; यत्न; एक ताल.
—केडु (ಕೆಡು) (क) धा.—धीर खचणें; भिणें; चंचल होणें.
धृष्ट (ಧೃಷ್ಟ) (सं) वि.—समर्थ; निर्लज्ज; आत्मप्रौढी सांगणारा नायक; आपलेच स्तोम माजवणारा पुढारी.
धृष्टद्युम्न (ಧೃಷ್ಟದ್ಯುಮ್ನ) (सं) ना. द्रुपदपुत्र; द्रौपदीचा भाऊ.
धेनु (ಧೇನು) (सं) ना.—गाय; पुढवंट गाय; पहिल्या विताची गाय.
धेनुक (ಧೇನುಕ) (सं) ना.—बलरामाला मारण्यासाठी कंसानें पाठविलेला राक्षस.
धेय (ಧೇಯ) (सं) वि.—चढविला जाणारा; ठेवला जाणारा.
धैनुक (ಧೈನುಕ) (सं) ना.—गोवृंद; गाईचा कळप;
धैर्य (ಧೈರ್ಯ) (सं) ना.—धीटपणा; निर्भीकता; छातीठोकपणा; घट्टपणा; सहनशीलता.
—वंत,—स्थ (ವಂತ; — ಸ್ಥ) (सं) नां.—निर्भय; पठ्ठा; धैर्यशाली
धैवत (ಧೈವತ) (सं) ना.—संगीतातील सहावा स्वर; सहावा सूर.
धोप्पने (ಧೊಪ್ಪನೆ) (क) अ.—धप्पदिशी; धपकन्
धोका (के) (ಧೋಕಾ) (ಕೆ) (अ.दे) ना.—फसवणूक; धका; गंडांतर; वंचना; पीडा.
धोबि (ಧೋಬಿ) (अ-दे) ना.—परीट; रजक.
धोर (लु) (ಧೋರ [ಲು]) (अ-दे) ना.—नगारा; भेरी; दुंदुभी; डांगोरा.
धोरण (णे) (ಧೋರಣ [ಣೆ]) (सं) ना.—दीर्घ विचार; भावी विचार; रीत; क्रम; राजनीति; शासनपद्धति; वाहन; गाडी; रथ; घोड्याची चाल.
धोरणि (ಧೋರಣಿ) (सं) वि.—धोरण असलेला; दीर्घदृष्टि; ध्येयवादी; सत्प्रवृत्त; हत्तीवरून फिरणें; रथांतून फिरणें.
धोरणे (ಧೋರಣೆ) (सं) ना.—पुढील ध्येय; वर्तन; नीति; दीर्घ दृष्टि.
धौत (ಧೌತ) (सं) वि.—धूत; धुतलेले; स्वच्छ, पांढरें; निर्मळ; सफेत.
धौम्य (ಧೌಮ್ಯ) (सं) ना.—एक महाभारतीय ऋषि.
धौरेय (यक) ಧೌರೇಯ [ಯಕ]) (सं) वि.—ओझे वाहण्यास समर्थ; शक्तिशाली.
(सं) ना.—पुढारीः नेता; बैल; घोडा; नायक.
ध्मात (ಧ್ಮಾತ) (सं) वि.—ध्वनित; फुंकलेला; फुंकून वाजविलेला.
ध्यान (ಧ್ಯಾನ) (सं) ना.—चिंतना; गाढ विचार; योजना; तप; मनन; एकचित्तता.
—इसु (ಇಸು) (क) धा.—ध्यान करणें; चिंतन करणें.
—पर (ಪರ) (सं) वि.—ध्यानस्थ; चिंतनमग्न; एकाग्रचित्त.
ध्यानि (ಧ್ಯಾನಿ) (सं) ना.—ध्यान करणारा; तपस्वी; पुढील विचार करणारा.
ध्येय (ಧ್ಯೇಯ) (सं) वि.—ध्यान करण्यायोग्य; चिंतनीय; विचार करण्याजोगा.
(सं) ना.—ध्येय; गम्य; उद्देश्य; लक्ष्य; योग्याकांक्षा.
ध्रुव (ಧ್ರುವ) (सं) वि.—सिद्ध; अचंचल; घट्ट; स्थिर; शाश्वत; चिरंतन; आकाश; खुंटी; रहस्य; महादेव; विष्णु; ध्रुव नक्षत्र; भूगोलाचा उत्तर दक्षिण ध्रुवबिंदु; विजेच्या तारेची दोन टोकें
ध्रुवनक्षत्र (ಧ್ರುವನಕ್ಷತ್ರ) (सं) ना.—ध्रुवांचें राज्य शासन; उत्तर दिशा दाखविणारें ध्रुवनक्षत्र.
ध्रुवलोक (ಧ್ರುವಲೋಕ) (सं) ना.—ध्रुवप्रदेश; ध्रुवराजाचे राज्य.
ध्रुववृत्त (ಧ್ರುವವೃತ್ತ) (सं) ना.—भूगोलाच्या दक्षिणोत्तर ध्रुव प्रदेशातील २३॥ अंशातील वलयें.
ध्वंस (ಧ್ವಂಸ) (सं) ना.—नाश; हानि; अकल्याण.
ध्वंसि (ಧ್ವಂಸಿ) (सं) ना.—नाश करणारा; विध्वंसक; अकल्याण करणारा.
ध्वज (ಧ್ವಜ) (सं) ना.—बावटा; पताका; निशाण; निशाणाची काठी; खूण; संज्ञा; सेना; पथिकाश्रम; सद्गृहस्थ; व्यापारी खूण; गर्व; दुरभिमान.

**ध्वजपट** (ಧ್ವಜಪಟ) (सं) ना.—पताका; बावट्याचे कापड; निशाण

**ध्वजस्तंभ** (ಧ್ವಜಸ್ತಂಭ) (सं) ना.—निशाणाचा खांब.

**ध्वजारोपण** (ಧ್ವಜಾರೋಪಣ) (सं) ना.—ध्वज फडकवणें; निशाण रोवणें; पताकारोहण.

**ध्वजावरोहण** (ಧ್ವಜಾವರೋಹಣ) (सं) ना.—ध्वज उतरवणें; पताकावतरण; निशाण खाली काढणें.

**ध्वजिनि (नी)** (ಧ್ವಜಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—सैन्य; सेनाविभाग.

**ध्वनत्** (ಧ್ವನತ್) (सं) वि.—आवाज देत राहणारा; ललकारी देणारा.

**ध्वनि** (ಧ್ವನಿ) (सं) ना.—शब्द; नाद; आवाज; हाक. चाहूल; व्यंग्यार्थ; सूचितार्थ.

**ध्वनित** (ಧ್ವನಿತ) (सं) वि.—समजलेलें; कळलेलें; उच्चारित; तोंडातून बाहेर पडलेलें.

(सं) ना.—गर्भितार्थ; सूचितार्थ; ध्वनि; व्यंग्यार्थ; उच्चारलेले शब्द.

**ध्वस्त** (ಧ್ವಸ್ತ) (सं) वि.—नष्ट; नाश पावलेले; नाश केलेले.

**ध्वस्ति** (ಧ್ವಸ್ತಿ) (सं) ना.—नाश केलेली वस्तु; नष्ट जिन्नस.

**ध्वांक्ष** (ಧ್ವಾಂಕ್ಷ) (सं) ना.—कावळा; बगळा; भिक्षेकरी; भिक्षुक; अविवेक.

—**आराति** (ಆರಾತಿ) (सं) ना.—'घुबड'

—**पुष्ट** (ಪುಷ್ಟ) (सं) ना.—कोकीळ.

**ध्वांक्षध्वज** (ಧ್ವಾಂಕ್ಷಧ್ವಜ) (सं) ना.—कर्ण.

**ध्वान** (ಧ್ವಾನ) (सं) ना.—स्वर; ध्वनि; उच्चस्वर; पहाडी आवाज; खडाशब्द; चाहुल;

**ध्वांत** (ಧ್ವಾಂತ) (सं) वि.—आवरलेले; झाकलेले.

(सं) ना.—अंधार; काळोख; पांघरूण.

—**अरि,—शत्रु** (ಅರಿ, – ಶತ್ರು) (सं) ना.—सूर्य; चंद्र; नक्षत्र; पांढरा रंग.

## न

**न** (ನ) (सं) ना.—'त' वर्गाचें ५ वें व्यंजन; अनुनासिक; नकारार्थी उपसर्ग.

(सं) वि.—पातळ; मोकळें; त्याच खुणेचें; अविभाज्य.

(क) ना.—गणेश; संपत्ति; समूह; युद्ध; मोतीं.

(सं) अ.—नव्हे; नाहीं; नको.

**नक** (ನಕ) (क) ना.—नाच.

**नकलि** (ನಕಲಿ) (अ. दे) ना.—चेष्टा; पोरकटपणा; अनुकरण; नक्कल; कृत्रिमता; कुचेष्टा; हास्य.

**नकलु** (ನಕಲು) (अ. दे)—नकल; तर्जुमा; प्रत; अवतरण; उतारा.

**नकार** (ನಕಾರ) (क) ना.—नाकबुली; अमान्यता; तिरस्कार; निराकरण; 'न' अक्षर.

**नकाश (क्षे)** (ನಕಾಶ [ಕ್ಷೆ]) (अ. दे) ना.—नकाशा; स्थूल मानाची रूपरेषा; आराखडा; भूपट; आलेख; मानचित्र; शिल्प; नकशीकाम.

**नकुल** (ನಕುಲ) (सं) ना.—मुंगुस; पांडवातील चौथा पुरुष. शिव.

**नकु** (ನಕ್ಕು) (क) धा.—चाटणें; 'नगु' या कन्नड धातूचे भूतकृदंत; हसून.

**नक्त** (ನಕ್ತ) (सं) ना.—रात्र; अंधार; प्रदोषकालीन जेवण; रात्रीचा एकाहार; एकभुक्तव्रत.

**नक्तक** (ನಕ್ತಕ) (सं) ना.—घाण पोषाख; लक्तर; फाटकी वस्त्रें; धांदोटी; चिंधी.

**नक्तंचर** (ನಕ್ತಂಚರ) (सं) ना.—रात्रींचर; पिशाच; राक्षस; चोर; घुबड; मांजर; निशाचर.

**नक्तभोजन** (ನಕ್ತಭೋಜನ) (सं) ना.—दिवसभर उपोषण करून रात्री केलेले जेवण; एकभुक्तप्रदोष जेवण.

**नक्तमुखा (खे)** (ನಕ್ತಮುಖಾ [ಖೆ]) (सं) ना.—रात्रीचा प्रारंभ; शामवेळ; सायंकाळ; संध्या.

**नक्र** (ನಕ್ರ) (सं) ना.—मकर; मगर; सुसर; अंत; समारोप.

**नक्रध्वज** (ನಕ್ರಧ್ವಜ) (सं) ना.—मकरकेतु; सुसरीचें चिन्ह असलेली पताका; काम; प्रद्युम्न; मीनकेतन.

**नक्षत्र** (ನಕ್ಷತ್ರ) (सं) ना.—तारका; तारा.

—**ईश** (ಈಶ) (सं) ना.—चंद्र.

—**मंडल** (ಮಂಡಲ) (सं) ना.—नक्षत्र लोक;

—**माले** (ಮಾಲೆ) (सं) ना.—सत्तावीस नक्षत्रांचा पुंज; २७ मण्यांची माळ.

**नक्षत्रचिन्ह** (ನಕ್ಷತ್ರಚಿಹ್ನ) (सं) ना.—फुली; तारकांकन; ताऱ्याची खूण; शेवंतीचें फूल.

**नख (खर)** (ನಖ [ಖರ]) (सं) ना.—नख; कखाग्र.

**नखखनन** (ನಖಖನನ) (सं) ना.—खाज.

**नखपंजर** (ನಖಪಂಜರ) (सं) ना.—नखांची पकड; नखांचा पंजा.

**नखरा** (ನಖರಾ) (अ. दे) ना.—मुरका; कोरडी ऐट.

**नखरायुध** (ನಖರಾಯುಧ) (सं) ना.—हिंस्रपशु; नखच हत्यार असणारे सिंहादिक प्राणी; लढाऊ कोंबडा.

**नग** (ನಗ) (सं) ना.–पर्वत; वृक्ष; अलंकार; अगति.
**नगकुलिश** (ನಗಕುಲಿಶ) (सं) ना.–नगावर सत्ता गाजवणारा इंद्र.
**नगजाते (ता)** (ನಗಜಾತೆ [ತಾ]) (सं) ना.–पर्वतकन्या; पार्वती; गिरीनदी.
**नगण** (ನಗಣ) (सं) ना.–तीन लघु अक्षरांचा गण.
**नगदि (दु)** (ನಗದಿ [ದು]) (अ. दे) ना.–रोख; रोखड; रोखीचा व्यवहार.
**नगधर** (ನಗಧರ) (सं) ना.–गोवर्धनधारी; कृष्ण.
**नगपति** (ನಗಪತಿ) (सं) ना.–हिमालय; पर्वतांचा स्वामी; नगाधिराज.
**नगर (रि)** (ನಗರ [ರಿ]) (सं) ना.–शहर; पट्टण; अरण्या-जवळचें गांव.
**नगवैरि (हर)** (ನಗವೈರಿ [ಹರ]) (सं) ना.–पर्वतशत्रु; इंद्र.
**नगाधिप** (ನಗಾಧಿಪ) (सं) ना.–हिमालय; पर्वतराज.
**नगारखाना** (ನಗಾರಖಾನಾ) (अ. दे) ना.–देवालयातील वाद्यस्थान; नखारखाना.
**नगारि** (ನಗಾರಿ) (अ. दे) ना.–नगारा; भेरी; ढोल. चर्मवाद्य.
(सं) ना.–इंद्र.
**नगेगेडि** (ನಗೆಗೇಡಿ) (क) ना.–निर्लज्ज; निलाजरा.
**नगेगेडु** (ನಗೆಗೇಡು) (क) वि.–हास्यास्पद; अपहास्य कारक; हास्यबळी.
**नगौकस** (ನಗೌಕಸ) (सं) ना.–पर्वतच घर असणारा; श्वापद; रानटी मनुष्य.
**नग्गु (नेग्गु)** (ನಗ್ಗು [ನೆಗ್ಗು]) (क) धा.–ठेचून जाणें; चुरगळणें; चुरमडणें; मार खाणें.
**नग्न** (ನಗ್ನ) (सं) वि.–विवस्त्र; दिगंबर; सहजस्थितीतील (प्राणी).
(सं) ना.–संन्यासी; जैनमुनी; शिव.
**—खड्ग** (—ಖಡ್ಗ) (सं) ना.–म्यानातून काढलेली तरवार. पाजळलेली तरवार.
**नग्निका (के)** (ನಗ್ನಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–नग्नस्त्री; लहान मुलगी.
**नचिकेत** (ನಚಿಕೇತ) (सं) ना.–एक मुनी; अग्नि.
**नच्चण** (ನಚ್ಚಣ) (क) ना.–नर्तन; नृत्य.
**नच्चाणि** (ನಚ್ಚಾಣಿ) (क) ना.–नर्तकी; वेश्या; नाचणारी; नृत्यांतील पदविन्यास.
**नच्चिके** (ನಚ್ಚಿಕೆ) (क) ना.–विश्वास; श्रद्धा; 'नेच्चिके' पहा.
**नच्चु** (ನಚ್ಚು) (क) धा.–मान्यता देणें; कबुली देणें; विश्वास ठेवणें; अपेक्षिणें; आधारणें.
(क) ना.–मान्यता; कबुली. विश्वास.
**—इके** (—ಇಕೆ) (क) ना.–विश्वास; आधार; मान्यता.
**—इसु** (—ಇಸು) (क) धा.–विश्वासणें; मानणें; मान्यता देणें.
**नजराणा (णि)** (ನಜರಾಣಾ [ಣಿ]) (अ. दे.) ना.–बक्षीस; उपायन; पारितोषिक; बहुमान; उत्तेजन; जबरदस्तीनें लादलेला कर.
**नजर (रु)** (ನಜರ [ರು]) (अ.दे) ना.–दृष्टि; गौरवार्थ दिलेले बक्षीस; 'नजराणा' पहा.
**नजातशत्रु** (ನಜಾತಶತ್ರು) (सं) ना.–अजातशत्रु; युधिष्ठिर; रामचंद्र.
**नजुगु** (ನಜುಗು) (क) धा.–कुस्करणें; मुद्दा होणें; मार बसणें; पूड होणें; नायनाट होणें; अस्ताव्यस्त होणें.
**नज्जुगुज्जु** (ನಜ್ಜುಗುಜ್ಜು) (क) ना.–दुर्दशा; खरपूस मार; चक्काचूर; नायनाट.
**नंजिडि** (ನಂಜಿಡಿ) (क) धा.–विष कालवणें; विष भरणें.
**नंजु** (ನಂಜು) (क) धा.–कोमेजणें; उतरविणें.
(क) ना.–विषण्णता; कोमेजलेला पदार्थ; वाळलेली वस्तु; मेंदूचा वात; नंज.
**नंजुगोरल** (ನಂಜುಗೊರಲ) (क) ना.–विषकंठ; नीलकंठ; शिव.
**नंजुंडु** (ನಂಜುಂಡು) (क) ना.–विष पिणारा; शिव.
**नट** (ನಟ) (सं) ना.–अभिनयकार; सोंगाड्या; नर्तक; शिव; ढोंगी.
**नटन (ने)** (ನಟನ [ನೆ]) (सं) ना.–अभिनय; सोंग; ढोंग; नर्तन.
**नटराज** (ನಟರಾಜ) (सं) ना.–नटश्रेष्ठ; शिवाचा तांडव-नृत्यावतार; शिव.
**नटि (टी)** (ನಟಿ [ಟೀ]) (सं) ना.–अभिनेत्री; नर्तिका; नाटकांत काम करणारी; सूत्रधार पत्नि; सोंगाडी.
**नटिकेमुरि** (ನಟಿಕೆಮುರಿ) (क) धा.–बोटे मोडणें; शाप देणें; तिरस्कार करणें.
**नटिसु** (ನಟಿಸು) (क) धा.–अभिनय करणें; सोंगाची बतावणी करणें; ढोंग करणें.
**नट्ट** (ನಟ್ಟ) (क) ना.–नाट्य; नर्तन; नाच; विषप्रयोग.
(क) अ.–मध्येंच; मध्यंतरी.
**—नडु** (—ನಡು) (क) अ.–मधोमध; केंद्रस्थानीं; मध्यभागीं; मधूनमधून.
**नट्टगेडि** (ನಟ್ಟಗೇಡಿ) (क) ना.–निराश्रित; भिक्षुक; भटक्या.
**नट्टडवि** (ನಟ್ಟಡವಿ) (क) ना.–अरण्यमध्य; घोरवन; भयंकर कानन; जंगल.
**नट्टविग** (ನಟ್ಟವಿಗ) (क) ना.–नट; नर्तक; नृत्यशिक्षक.
**नट्टिरुळु** (ನಟ್ಟಿರುಳು) (क) ना.–मध्यरात्र; ऐनरात्र.

**नट्टु** (ನಟ್ಟು) (क) अ.—आंत शिरून; रुतून.
(क) ना.—मध्य; केंद्र; गवती मूळ; तडा; अडचण; तडा; संकट.

**नट्टुगार** } (ನಟ್ಟುಗಾರ) (क) ना.—कुंदा खणणारा; हरळी
**नट्टुव** } (ನಟ್ಟುವ) काढणारा; नृत्य शिकवणारा; नट; नर्तक.

**नट्टुगाति (विति)** (ನಟ್ಟುಗಾತಿ [ವಿತಿ]) (क) ना.—नटी; नर्तकी; अभिनेत्री.

**नडते** (ನಡತೆ) (क) ना.—आचरण; वर्तन; वागणूक; चर्या; चाल; शील.

**नडपाडु** (ನಡಪಾಡು) (क) धा.—फिरणें; हलणें; हदरणें.

**नडपु** (ನಡಪು) (क) धा.—चालविणें; फिरविणें; चालवूं देणें; यथासांग करणें; पुरे करणें; रक्षण करणें; जोपासणें.
(क) ना.—आचरण; वर्तन.

**नडवळि** (ನಡವಳಿ) (क) ना.—वर्तन; रीति; शील; चरित्र; मार्ग; पद्धति; नियम; शिरस्ता.

**नडवे** (ನಡವೆ) (क) ना.—राजमार्ग; रस्ता.

**नडसु** (ನಡಸು) (क) धा.—चालविणें; चालते करणें.

**नडावळि** (ನಡಾವಳಿ) (क) ना.—'नडवळि' पहा.

**नडिगे** (ನಡಿಗೆ) (क) ना.—गति; वेग; संचार; आचरण; चाल.

**नडु** (ನಡು) (क) धा.—आत घालणें; खुपसणें; रोवणें; रुजवणें; मातीत घालणें.
(क) ना.—कंबर; देहमध्य; कटि; मध्यमा.
**—इसु** (—ಇಸು) (क) धा.—लावणें.
**—कट्टु,—पट्टि** (—ಕಟ್ಟು–ಪಟ್ಟಿ) (क) ना.—कमरपट्टा; कडदोरा; कंबरबंध.

**नडुक** (ನಡುಕ) (क) ना.—थरकाप; भीति; हादरा.

**नडुगु** (ನಡುಗು) (क) धा.—कंप पावणें; हलणें; थरथरणें.

**नडुनीरल्लिकैबिडु** (ನಡುನೀರಲ್ಲಿಕೈಬಿಡು) (क) धा.—अर्धवट साह्य करून दूर होणें; अर्ध्यावर हात सोडणें; मध्येच आश्रय तोडणें.

**नडुवगल्** (ನಡುವಗಲ್) (क) ना.—मध्यान्ह; भरदिवस; भरदुपार.

**नडे** (ನಡೆ) (क) धा.—जाणें; चालविणें; पार होणें; पैलतीर गांठणें; सोडून जाणें; त्यागणें; निवारणें; होणें.
(क) ना.—शील; चालचलणूक.
(क) अ.—उत्तम रीतीनें; एवढेंच नव्हे तर.

**नडेगालु (ल)** (ನಡೆಗಾಲು [ಲ]) (क) ना.—पादचारी; पदयात्री; पायी जाणारा.

**नडेगेडु** (ನಡೆಗೆಡು) (क) धा.—थांबणें; विलंब लावणें; गतिभंग होणें.

**नडेगेडिसु** (ನಡೆಗೆಡಿಸು) (क) धा.—थांबविणें; गतिमंद करणें; गतिरोध करणें.

**नडेगोळिसु** (ನಡೆಗೊಳಿಸು) (क) धा.—चालेलसें करणें; चालू करणें.

**नडेगोंटे** (ನಡೆಗೋಂಟೆ) (क) ना.—सैन्याचा वेढा; वेढा घातलेले सैन्य.

**नडेगोलु** (ನಡೆಗೋಲು) (क) ना.—फिरतांना घेतलेली हातकांठी.

**नडेतरु** (ನಡೆತರು) (क) धा.—चालत येणें; परंपरेनें येणें.

**नडेबल्ल** (ನಡೆಬಲ್ಲ) (क) वि.—शास्त्रार्थ जाणणारा; शास्त्रज्ञ; विद्वान.

**नडेबावि** (ನಡೆಬಾವಿ) (क) ना.—वापी; विहीर; पायउताराची विहीर.

**नडेमाड** (ನಡೆಮಾಡ) (क) ना.—विमान, आकाशयान; देवरथ.

**नडेवक्कि** (ನಡೆವಕ್ಕಿ) (क) ना.—हंसपक्षी.

**नडेवळि** (ನಡೆವಳಿ) (क) ना.—वर्तन; रीति; नीति.

**नडेवेण** (ನಡೆವೆಣ) (क) वि.—दरिद्री; अत्यंत क्षीण झालेला; हीनशील.

**नंट (नेंट)** (ನಂಟ [ನೆಂಟ]) (क) ना.—संबंधिक; आप्त; बंधन; व्याही.

**नंटतन** } (ನಂಟತನ) (क) ना.—बांधव्य; आप्तत्व; नातें.
**नंटस्तिके** } (ನಂಟಸ್ತಿಕೆ)

**नंटस्ति** (ನಂಟಸ್ತಿ) (क) ना.—आप्तसंबंधी; नात्यांतील स्त्री, रक्तसंबंधी.

**नंटु** (ನಂಟು) (क) ना.—बांधव्य; नातें. मित्रत्व; परिचय; मनोहारिता; सौंदर्य; लालित्य; माधुर्य.
**—तन** (ತನ) (क) ना.—अप्तत्व; नातें; मैत्री.

**नण्पु** (ನಣ್ಪು) (क) ना.—मनोहारिता; शोभा; आप्तपण; प्रीति; अनुराग.

**नत** (ನತ) (सं) वि.—वाकलेला; पडलेला; नमस्कार घातलेला; चपटा.
**—दृष्ट** (ದೃಷ್ಟ) (सं) ना.—दुर्दैवी; दुर्भागी.

**नति** (ನತಿ) (सं) ना.—बाक; नमस्कार; वक्रता; ओणवेपणा; आदर.

**नत्तिंग** (ನತ್ತಿಂಗ) (क) ना.—शकुंतपक्षी; बगळा; 'उलिग' पहा.

**नत्तु** (ನತ್ತು) (क) धा.—बोबडे बोलणें; अस्पष्ट बोलणें;
(क) ना.—नथ; मोती.

**नत्व** (ನತ್ವ) (सं) ना.—'न' अक्षर; अनुमान; तिरस्कार; अभाव; अनिश्चय.

**पात्रते** (ಪಾತ್ರತೆ) (सं) ना.–योग्यता; जुळणूक; जोडगीर.

**पात्रे** (ಪಾತ್ರೆ) (क) ना.–पात्र; लोखंडाचे भांडे; मातीचे भांडें.

**पात्रेय** (ಪಾತ್ರೇಯ) (सं) वि.–पात्रासंबंधी; योग्य. (सं) ना–यज्ञ; द्रव्य.

**पाथस्** (थः) (ಪಾಥಸ್ [ಥಃ]) (सं) ना.–पाणी; जल.

**पाथेय** (ಪಾಥೇಯ) (सं) ना.–शिधोरी; प्रवासार्थ घेतलेली खर्ची.

**पाथोद** (ಪಾಥೋದ) (सं) ना.–वेष; पाणी देणें; आतिथ्य; आकाश; मेघ.

**पाथोनिधि** (ಪಾಥೋನಿಧಿ) (सं) ना.–समुद्र.

**पाथोरुह** (ಪಾಥೋರುಹ) (सं) ना.–कमल.

**पाद** (ಪಾದ) (सं) ना.–पद; पाय; पाऊल; क.व्यपंक्ति; चरण; मूळ.

—**कटक** (ಕಟಕ) (सं) ना.–पायदळ.

—**चारी** (ಚಾರಿ) (सं) ना.–वाटसरू; पायी जाणारा; निरोप्या; प्रेषित; जासूद.

—**तल** (ತಲ) (सं) ना.–पायाचा तळवा.

**पादत्राण** (ಪಾದತ್ರಾಣ) (सं) ना.–पादरक्षा; जोडा; पायतन; पायातील शक्ति.

**पादप** (ಪಾದಪ) (सं) ना.–झाड; वेली; पादुका; खडावा; घडवंची; शिडी.

**पादपद्म** (ಪಾದಪದ್ಮ) (सं) ना.–चरणकमल; कमलोपम पाऊल.

**पादपूजे** (ಪಾದಪೂಜೆ) (सं) ना.–गुरूंच्या पावलाची पूजा.

**पादपूरण** (णे) (ಪಾದಪೂರಣ [ಣೆ]) (सं) ना.–च वै तु हि सारखें पादपूरक शब्द; काव्यातील मात्रा जुळवण्यासाठीं योजलेले निरर्थक शब्द.

**पादमूल** (ಪಾದಮೂಲ) (सं) ना.–टाच; पायाचा घोटा; पायाचा मागील भाग.

**पादयुग्म** (ಪಾದಯುಗ್ಮ) (सं) ना.–दोन्ही पाय; जोड पाय.

**पादर** (ಪಾದರ) (क) ना.–व्यभिचार पात्र; ‘हादर’ पहा.

**पादरक्षे** (क्षा) ಪಾದರಕ್ಷೆ [ಕ್ಷಾ]) (सं) ना.–पादत्राण; पायतन.

**पादरि** (ಪಾದರಿ) (क) ना.–पाटल वृक्ष; जारिणी; व्यभिचारिणी.

**पादरिग** (ಪಾದರಿಗ) (क) ना.–जारिणीशी संबंध ठेवणारा; जार; ‘सितग’ पहा.

**पादरोहि** (ಪಾದರೋಹಿ) (सं) ना.–वड; वटवृक्ष.

**पादाक्रांत** (ಪಾದಾಕ್ರಾಂತ) (सं) वि.–पायदळीं घेतलेलें; हातीं आलेलें; आधीन झालेले; पराजित.

**पादातं** (ಪಾದಾತಂ) (सं) ना.–पायदळ; सैन्य.

**पादाति** (ಪಾದಾತಿ) (सं) ना.–निरोप्या; नोकर; पायदळ; सैन्य.

**पादावर्त** (ಪಾದಾವರ್ತ) (सं) ना–रहाटगाडगें; पायानें चालणारा रहाट; पायरहाट; पोहरा.

**पादि** (ಪಾದಿ) (सं) ना.–मार्ग; वाट; रस्ता; पांद.

**पादुका** (ಪಾದುಕಾ) (सं) ना.–खडावा; पावलाच्या आकाराचा टाक.

**पादोदक** (ಪಾದೋದಕ) (सं) ना.–तीर्थ; गुरुदेवांचे चरणतीर्थ; पाद प्रक्षालनाचें जल.

**पाद्य** (ಪಾದ್ಯ) (सं) ना.–पायाशीं संबंध असलेले; पादप्रक्षालन, चरण धुतलेले पाणी.

**पाद्रि** (ಪಾದ್ರಿ) (अ. दे) ना.–खिस्तधर्मी/गुरु; खिस्तमतोपदेशक; खित धर्माधिकारी.

**पान** (ಪಾನ) (सं) ना.–पाणी; पेय; मादकपदार्थसेवन.

**पानक** (ಪಾನಕ) (सं) ना.–पन्हें.

**पानगोष्ठि** (ಪಾನಗೋಷ್ಠಿ) (सं) ना.–दारुड्याचा पिठा; मादक पेय घेणाऱ्यांचा तांडा; दारुगुत्ता.

**पानपात्र** (ಪಾನಪಾತ್ರ) (सं) ना.–पेय घेण्याचें भांडें.

**पानसुपारि** (ಪಾನಸುಪಾರಿ) (अ. दे) ना.–तांबूल; विडा.

**पानीय** (ಪಾನೀಯ) (सं) वि.–पानक; पिण्यायोग्य; पेय; पाणी.

**पांथ** (ಪಾಂಥ) (सं) ना.–वाटसरू; मार्गस्थ; प्रवासी.

**पांथस्थ** (ಪಾಂಥಸ್ಥ) (सं) ना.–प्रयाणिक; प्रवासी; वाटसरू;

**पाप** (ಪಾಪ) (सं) ना.–दुष्कर्म; दुष्टकृत्य; अनीति; हिंसा; द्रोह; खुळेपणा; दुष्ट मनुष्य.

**पापग्रह** (ಪಾಪಗ್ರಹ) (सं) ना.–अकल्याण करणारा ग्रह.

**पापघ्न** (ಪಾಪಘ್ನ) (सं) ना.–पापहारक; दुष्कर्मीयांचा नाश करणारा; पापक्षालनी वस्तु; तीळ.

**पापात्म** (ಪಾಪಾತ್ಮ) (सं) ना.–पापी मनाचा; दुर्वर्तनी; दुष्ट; नीच.

**पापिष्ठ** (ಪಾಪಿಷ್ಠ) (सं) वि.–दुष्कर्मी; पाप करणारा; दुष्कृत्यें करणारा.

**पापे** (ಪಾಪೆ) (क) ना.–लाडका; कौतुकाची वस्तु; बाहुली; पुत्र; कूस; ‘हा हे’ पहा.

**पाम** (मा) (ಪಾಮ [ಮಾ]) (सं) ना.–खरूज; कोरडी खाज; कंडू.

**पामर** (ಪಾಮರ) (क) ना.–अज्ञ; असंस्कृत; अजाण; शेतकरी; ग्रामीण; किरात; मूर्ख.

**पामरि** (ಪಾಮರಿ) (क) ना.–ग्रामीण स्त्री; अशिक्षिता; शेतकरीण.

**पाय्** (यु) (ಪಾಯ್ [ಯು]) (क) धा.–ओलांडणें; बाजूनें जाणें; उडणें; दाटणें; दाटून जाणें; उडी मारणें; चोपणें; पुढें सरणें; स्पर्शणें; वासणें; मिठी मारणें.

**पाय** (ಪಾಯ) (अ. दे) ना.–पाद; पाया; रीत; पद्धति.

**पायक** (ಪಾಯಕ) (सं) ना.–नोकर; निरोप पोचवणारा; सैन्यातील वीर; वेषधारी.

**पायदळ** (ಪಾಯದಳ) (क) ना.–पदाति; पादचारी; सैनिक; पतिसेवा.

**पायवट्ट** (ಪಾಯವಟ್ಟು) (क) ना.–पायांतील तोडा; पायांतील धार्मिक कंकण.

**पायवधारू** (ಪಾಯವಧಾರು) (क) ना.–जागृति; जाग; स्पर्धा; शर्यत; पाण्याची ओढ; वेग.

**पायशुद्ध** (ಪಾಯಶುದ್ಧ) (सं) ना.–पायाशुद्ध; घर; स्थिर-पादभूमि.

**पायस** (ಪಾಯಸ) (सं) ना.–परमान्न; खीर; देवदार; धूप.

**पायजमा** (ಪಾಯಜಮಾ) }
**पायिजाम** (ಪಾಯಿಜಾಮು) } (अ.दे) ना.–विजार, चोळणा.

**पार्(रु)** (ಪಾರ್ [ರು]) (क) धा.–उडणें; निरीक्षणें; इच्छिणें; मागणें; समोर पाहणें; जाणणें.
(क) ना.–निसटण्याचें ठिकाण; उताराची जागा.

**पार** (ಪಾರ) (सं) ना.–परतीर; पैलतीर; भाग; अंत; कार्य-समाप्ति; सीमा; संरक्षण; संकटमुक्ति.
—**काणिसु** (ಕಾಣಿಸು) (क) धा.–तड लावणें; पार होणें; संपविणें; समारोप करणें.
—**काणु** (ಕಾಣು) (क) धा.–शेवट गाठणें; तडीला जाणें; तड लावणें; संपवणें.
—**ग (गत)** (ಗ [ಗತ]) (क) वि.–पार पडलेला; तड गाठलेला; संपवलेला.

**पारंगत** (ಪಾರಂಗತ) (सं) ना.–पैल गेलेला; शेवट पाहिलेला; प्रवीण; ज्ञानी; विद्वान्.

**पारज** (ಪಾರಜ) (अ.दे) ना.–पारा; रसायन.

**पारण(णे)** (ಪಾರಣ [ಣೆ]) (सं) ना.–उपोषणानंतरचा आहार; व्रतानंतरचें भोजन.

**पारणि** (ಪಾರಣಿ) (सं) ना.–आवळयाचें झाड; आवळा; आमलक.

**पारतंत्र्य** (ಪಾರತಂತ್ರ್ಯ) (सं) ना.–दुसऱ्याच्या सांगण्याप्रमाणें वागणें; अधीनता; परावलंबन; अस्वातंत्र्य.

**पारद** (ಪಾರದ) (सं) ना.–पारा; रसायन.

**पारदर** (ಪಾರದರ) (सं) ना.–परदारासक्ति; व्यभिचार; जारकर्म.

**पारदर्शक** (ಪಾರದರ್ಶಕ) (सं) ना.–पलीकडचे दाखवणारा; पलीकडचे पाहणारा; आरपार दाखवणारे.

**पारमार्थ(थिक)** (ಪಾರಮಾರ್ಥ [ಥಿಕ]) (सं). वि.–परमार्थासंबंधी; देवधर्मसाधनेसंबंधी; आध्यात्मिक; सत्य-ज्ञानात्मक; मोक्षकारण; वास्तविक.

**पारंपर्य** (ಪಾರಂಪರ್ಯ) (सं) वि.–परंपरेनें आलेलें; अनुवंशिक; पिढ्यानुपिढ्या चालणारे; एकाकडून दुसऱ्याकडे आलेलें.

**पारलौकिक** (ಪಾರಲೌಕಿಕ) (सं) वि.–परलोकसंबंधी; देवधर्माविषयी.

**पारवश्य** (ಪಾರವಶ್ಯ) (सं) ना.–परवशता; परतंत्रता; विस्मरण; स्वत्वाचा विसर; मूर्च्छा.

**पारशव** (ಪಾರಶವ) (सं) ना.–पोलाद; ब्राह्मण व शूद्र स्त्री यांची संतती; मिश्रजातीय संतती. मिश्रवर्णीय संतति.

**पारसि (सी) क** (ಪಾರಸಿ [ಸೀ] ಕ) (अ.दे) ना.–इराणी; पर्शियाचा रहिवासी; इराण देश; मिश्रवर्णीय संतति.

**पारागु** (ಪಾರಾಗು) (क) धा.–अडचण टाळणें; परतीर गाठणें; पार होणें; संरक्षित होणें; निभावणें; झेपणें.

**पारायण** (ಪಾರಾಯಣ) (सं) ना.–अभ्यास; पुनः पुन्हा पठण; आद्यंत वाचन; पठणसमाप्ति; परतीरगमन.

**पारावत** (ಪಾರಾವತ) (सं) ना.–पारवळ; पारवा; कबूतर.

**पारावार** (ಪಾರಾವಾರ) (सं) ना.–समुद्र; जलधी.

**पारिजात (तक)** (ಪಾರಜಾತ [ತಕ]) (सं) ना.–पारिजात वृक्ष; देवलोकीचा पुष्पवृक्ष.

**पारितोष (षक)** (ಪಾರಿತೋಷ [ಷಕ]) (सं) ना.–बक्षीस; बहुमान; इनाम; उपायन; संभावना; देणगी; मानाची वस्त्रे; औचित्य.

**पारत्रिक** (ಪಾರತ್ರಿಕ) (सं) वि.–परलोकासंबंधी; मोक्षाविषयी; सत्यज्ञानविषयक.

**पारिपंथिक** (ಪಾರಿಪಂಥಿಕ) (सं) ना.–वाटमाऱ्या; लुटारु; चांचेगिरी करणारा.

**पारिपार्श्वक** (ಪಾರಿಪಾರ್ಶ್ವಕ) (सं) ना.–नाटकांतील सूत्रधाराच्या आजूबाजूची पात्रें.

**पारिप्लव** (ಪಾರಿಪ್ಲವ) (सं) वि.–हलणारा; दडी मारणारा; लंबकाप्रमाणे झुलणारा; आंदोलणारा; लोंबकळणारा.

**पारिभद्र** (ಪಾರಿಭದ್ರ) (सं) ना.–कडुलिंबाचें झाड; निंब.

**पारिभाषिक** (ಪಾರಿಭಾಷಿಕ) (सं) वि.–परभाषेसंबंधीं; विशिष्ट शास्त्रार्थाचें; परिभाषा संकेतात्मक; शास्त्रीय.

**पारिव** (ಪಾರಿವ) (सं) ना.–पारवा; कबूतर. पारवळ.

**पारिवाण (ळ)** (ಪಾರಿವಾಣ [ಳ]) (क) ना.–कपोत; कवडा; पारवा.

**पारिषद** (ಪಾರಿಷದ) (सं) ना.–परिषदेत असणारा; सभासद; सभ्य; सभिक; राजाचा आप्त; राजसचीव.

**पारिषद्य** (ಪಾರಿಷದ್ಯ) (सं) ना.–श्रोता; प्रेक्षक; सभिक.

**पारिहार्य** (ಪಾರಿಹಾರ್ಯ) (सं) ना.–कंकण; काकण; धारणा; अधीनता; नुकसान भरपाई.

पारिहास्य (ಪಾರಿಹಾಸ್ಯ) (सं) ना.—विनोद; चेष्टा; हास्य.

पारि (री) (ಪಾರಿ [ರೀ]) (सं) ना.—हत्ती बांधण्याचा दोर; पाण्याची टाकी; जलपात्र; पाणी पिण्याचे भांडे; मोदकाची लाटी; पापडी.

पारीण (ಪಾರೀಣ) )सं) ना.—पारंगत; विद्वान; पंडित; कृतकृत्य.

पारींद्र (ಪಾರೀಂದ್ರ) (सं) ना.—सिंह; नाग; आदिशेष; हत्तीचा राजा; ऐरावत.

पारु (ಪಾರು) (क) धा. परीक्षणें; ज्ञान दृष्टीनें पाहणें; उडणें; उडी मारणें; पळणें; अपेक्षिणें; आशा करणें; आकांक्षिणें. (क) ना.—व्यभिचारी; होडी; नाव.

—व (ವ) (क) ना.—ज्ञानी; सूक्ष्म दृष्टीचा ब्राह्मण; उडणारा.

पारुवाण (वि) (ಪಾರುವಾಣ [ವಿ]) (अ. दे) ना.—पोषाख; आहेर; संभावना; व्यवहारी वर्तन; लोकाचार; हिशेबी वर्तन; विरहताप; मरण.

पारुंबळे (ಪಾರುಂಬಳೆ) (क) ना.—चक्र; सुदर्शन; उडती बांगडी; उडती तबकडी.

पारुबें (वें) टे (ಪಾರುಬೇ [ವೇಂ] ಟೆ) (क) ना.—शिकार; मृगया; वन्य पशूंची हत्त्या.

पारुबोज (जं)(ಪಾರುಬೋಜ [ಜಂ] ಗ) (क) वि. आसक्त; व्यभिचारी; उल्लु मशालजी; विटप; खलपुरुष.

पारुष्य (ಪಾರುಷ್ಯ) (सं) ना.—कठोरता; काठिण्य; असंस्कृतता; अकुलीनता; रानटीपणा.

पारुंबेकु (ಪಾರುಂಬೆಕ್ಕು) (क) ना.—पिंगळा; शकुंतपक्षी; किलबिला. 'आळिलु' पहा. खार.

पारे (ಪಾರೆ) (क) ना.—पहार; कणा; आस; पहारीसारखा बाण; खडप.

पारेंळु (ಪಾರೇಳು) (क) धा.—चिंबणें; अवमानित होणें; पळून जाणें; पळ काढणें.

पार्थ (ಪಾರ್ಥ) (सं) ना.—अर्जुन; पृथापुत्र.

—सारथि (ಸಾರಥಿ) (सं) ना.—कृष्ण.

पार्थि (ಪಾರ್ಥಿ) (सं) ना.—पार्थपुत्र; अभिमन्यु.

पार्थिव (ಪಾರ್ಥಿವ) (सं) वि.—पृथ्वीसंबंधी; कृत्रिम; राजासंबंधी सार्वभौम.

(क) ना.—भूमीचा शासनकर्ता; राजेशाही; शेतकरी; मातीचे भांडे.

—देह (ದೇಹ) (सं) ना.—पांचभौतिक शरीर; मृणमयशरीर.

पार्व (ಪಾರ್ವ) (क) ना.—उडगारा, वेदज्ञ ब्राह्मण.

पार्वण (ಪಾರ್ವಣ) (सं) ना.—पर्वकालिन विधि.

पार्वति (ಪಾರ್ವತಿ) (सं.) ना.—पर्वतकन्या; गिरिजा.

पार्विके (ಪಾರ್ವಿಕೆ) (क) ना.—ब्राह्मणी; ब्राह्मण वृत्ति; उड्डाण; ज्ञानदृष्टि.

पार्विति (ಪಾರ್ವಿತಿ) (क) ना.—ब्राह्मण स्त्री; ब्राह्मणी.

पार्श्व (ಪಾರ್ಶ್ವ) (सं) ना.—बाजू; सामीप्य; कुशीचा; शेजारी.

पार्श्वनाथ (ಪಾರ್ಶ್ವನಾಥ) (सं) ना.—एक जैन तीर्थंकर.

पार्श्ववायु (ಪಾರ್ಶ್ವವಾಯು) (सं) वि.—पक्षाघात; अर्धांगवायु; एक रोग.

पार्ष्णि (ಪಾರ್ಷ್ಣಿ) (सं) ना.—सैन्याची पिछाडी.

पाल(लक) (ಪಾಲ [ಲಕ]) (सं) ना.—रक्षक; यजमान; रक्षण कर्ता.

पालकडलु (ಪಾಲಕಡಲು) (सं) ना.—क्षीरसागर; दूधसागर.

पालकी (ಪಾಲಕಿ) (क) ना.—पालखी; मेणा.

पालन(ने) (ಪಾಲನ [ನೆ]) (सं) ना.—संरक्षण; पोषण; भरण-पोषण.

पालाश (ಪಾಲಾಶ) (सं) ना.—पळस; किंशुक; पंचरत्न तरु.

पालि (ಪಾಲಿ) (सं) ना.—कानाचा खालचा भाग; मनगट; बाणाचे टोक; ओळ; पंक्ती; मर्यादा; तीळ; अंगावरील चिन्ह सेतु; नाकाचा वरचा उंचवटा; नाकाची शीर; पाळी; बारी; बावटा; निशाण; पालीभाषा.

पालिके(का) (ಪಾಲಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना.—रक्षिका; यजमानीण; पालखी.

नगरपालिका (ನಗರಪಾಲಿಕಾ) (सं) ना.—नगरसभा; म्युनिसीपालिटी; पालिका.

पालिसु (ಪಾಲಿಸು) (क) धा.—संरक्षिणें; पाळणें; पोषण करणें; पाहणें; कार्यभाग उचलणें; नियम पाळणें.

पालु (ಪಾಲು) (क) ना.—वाटणी; भाग; अंश; दूध.

—गार (ಗಾರ) (क) ना.—भागीदार; वाटणीदार; सौंगडी; सहकारी.

—गारिके (ಗಾರಿಕೆ) (क) ना.—वाटा; व्यापारांतील भागिदारी. कारभारांतील हिस्सा.

पालुमारिके (ಪಾಲುಮಾರಿಕೆ) (क) ना.—आलस्य; अंगचोरपणा; विलंब.

पाले (ಪಾಲೆ) (क) ना.—कानाच्या पाळीतील भोक; कानटोचणी; एक पक्षी.

पावक (ಪಾವಕ) (सं) ना.—अग्नि; विद्युत्प्रकाश; चित्रक; बिब्याचे झाड; झाड; तीनचा संकेत; पाढा; षण्मुख; ऋषि; पवित्र पुस्तक; गावि; चिमटा.

—नेत्र,-नयन (ನೇತ್ರ-ನಯನ) (सं) ना.—त्रिनेत्र; शिव.

पावकि (ಪಾವಕಿ) (सं) ना.—अग्नीपासून जन्मलेला; षण्मुख; पावकी (एक पाव पाव वगैरे.)

पावटिके (गे)(ಪಾವಟಿಕೆ [ಗೆ]) (सं) ना.—सोपान; शिडी; पायरी.

पावड (डे) (ಪಾವಡ [ಡೆ]) (क) ना.—डोक्याचा रुमाल; पटका; फेटा; पांघरूण; झूल; पोषाख.

पावडिग (ಪಾವಡಿಗ) (क) ना.–गारुडी; सर्प खेळविणारा; साप धरणारा.

पावन (ಪಾವನ) (सं) वि.–पवित्र; शुद्ध; उत्तम; श्रेष्ठ; शुद्ध करणारा.

(सं) ना.–अग्नि; सिद्ध पुरुष; तप; गोमय; जातीय चिन्ह.

पावमानि (ಪಾವಮಾನಿ) (सं) ना.–पवमान; वायुपुत्र; हनुमान; भीम; विशिष्ट वैदिक ऋचा; वायुस्तोत्र.

पावसे (ಪಾವಸೆ) (क) ना.–अंतर्गंगा; शेवाळ. 'हावसे' पहा.

पावु (ಪಾವು) (क) ना.–सर्प; चिपटे; पावशेर माप; चतुर्थांश भाग.

पावुगे (ಪಾವುಗೆ) (क) ना.–खडावा; पादुका; लाकडाचे पादत्राण.

पावुड (ಪಾವುಡ) (क) ना.–देणगी; रुमाल; झूल; पोषाख. 'पावड' पहा.

पाश (ಪಾಶ) (सं) ना.–दोर; साखळी; पक्षी पकडण्याचें जाळें; गळफास; दुष्ट विद्यार्थी; संग्रह; सौंदर्य; आश्चर्य; समूह.

—क,–क्रीडे (ಕ,–ಕ್ರೀಡೆ) (सं) ना.–ईर्षा; स्पर्धा; शर्यत; जिद्द; द्यूत.

—धर,–पाणी (ಧರ, ಪಾಣಿ) (सं) ना.–वरुण; गणपती; यम;

पाशनं (ಪಾಶನಂ) (सं) ना.–जाळे; मृग पकडण्याचें साधन.

पाशि (ಪಾಶಿ) (सं) ना.–मरण; यम; फाशी; गळफास घालून मारणारा.

पाशव (ಪಾಶವ) (सं) वि.–पशुसंबंधी; गट; कळप; दड्डी; कोंडवाडा; समाज.

पाशवीवृत्ति (ಪಾಶವೀವೃತ್ತಿ) (सं) ना.–पशूसारखे आचरण; विवेकहीनता.

पाशुपत (ಪಾಶುಪತ) (सं) ना.–पशुपति महादेवासंबंधी; एक शैव मत.

—अस्त्र (ಅಸ್ತ್ರ) (सं) ना.–त्रिशूळ; पशुपतीचें हत्यार.

—व्रत (ವ್ರತ) (सं) ना.–शिवाच्या आराधनेचे एक व्रत.

पाश्चात्य (ಪಾಶ್ಚಾತ್ಯ) (सं) वि.–पश्चिम देशासंबंधी; यूरोपीय; नंतरचे.

पाषंड (ಪಾಷಂಡ) (सं) ना.–पाखंड; नास्तिक. चार्वाक मत; वेदविरोधी धर्ममत. साधुवेषाने लोकांना फसवणारा.

पाषाण (ಪಾಷಾಣ) (सं) ना.–दगड; विष.

पासगे (संगि) (ಪಾಸಗೆ [ಸಂಗಿ]) (क) ना.–मल्लयुद्धातील एक डाव; द्यूत खेळणारा; कवडावेची. 'हासंगी' पहा.

पासटि (ಪಾಸಟಿ) (क) ना.–समानता; सारखेपणा; साम्य; संबंध. 'एणे' पहा.

पासरे (ಪಾಸರೆ) (क) ना.–फरशी; सपाट दगड.

पासले (ಪಾಸಲೆ) (क) अ.–समीप; जवळ; आजुबाजूला; शेजारीचे.

पासंगि (ಪಾಸಂಗಿ) (क) ना.–कुस्तीतील एक पेच; द्यूत; जुगार.

पासाद (ಪಾಸಾದ) (क) ना.–प्रासाद; राजवाडा; देवालय; तळघर.

पासाले (ಪಾಸಾಲೆ) (क) ना.–रांजण; माठ. 'बानी' पहा.

पासु (ಪಾಸು) (क) धा.–पसरवणें; अंथरणें; बिछाना घालणें.

(क) ना.–बिछाना, अंथरूण; जमखाना; कांबळें; पांजण; पाश; कुत्र्याचा पट्टा.

पासुगे (ಪಾಸುಗೆ) (क) ना.–अंथरूण; बिस्तरा; शय्या; तल्प.

पासुवोक्कु (ಪಾಸುವೊಕ್ಕು) / पासुपोक्कुं (ಪಾಸುಂಪೊಕ್ಕುಂ) (क) वि.–ओतप्रोत भरलेलें; पूर्ण व्याप्त; आंतबाहेर एक झालेले; अन्योन्य संबंधी.

पाहि (ಪಾಹಿ) (सं) क्रि.–'पा' धातूचा आज्ञार्थ; संरक्षण कर.

पाळ् (ಪಾೞ್) (क) ना.–मैदान, ओसाड.

—आगु (ಆಗು) (क) धा.–नष्ट होणें; नाश पावणें.

—मसगु (ಮಸಗು) (क) धा.–विध्वंसणें; नाश करणें.

पाळ (ಪಾಳ) (क) ना.–भाल, कपाळ; निढळ.

पाळति (ಪಾಳತಿ) (अ. दे) ना.–पाळत; पाळीचा पहारा; पाळी; बारी.

पाळय (ळय) (ಪಾಳಯ [ಳ್ಯ]) (क) ना.–सैन्य; सेनाविभाग; शिबिर; ठाणें.

पाळि (ಪಾಳಿ) (क) ना.–बारी; ओळ; क्रम; ध्वज; बावटा; माताचा गादा; खाचर; कागद; समूह; सैन्य.

पाळिसु (ಪಾಳಿಸು) (क) धा.–तुकडे जोडणें; मेळ घालणें; घुसवणें; समावेशिणें.

पाळु (ಪಾೞು) (क) ना.–नाश; नष्टता; जीर्णत्व.

पाळे (ಪಾಳೆ) (क) ना.–कागद; माताचा गादा; वाफा; पातळ कागद; सुपारीच्या पेंदीवरील कोका; तुकडा; चूर.

पाळेय (ಪಾಳೆಯ) (क) ना–'पाळय' पहा.

—गार (ಗಾರ) (क) ना.–सेनाविभागाचा नायक; पाळेगार.

पाळनेल (ಪಾೞ್ನೆಲ) (क) ना.–पडजमीन; नापीक जमीन.

पिं (ಪಿಂ) (क) अ.–पूर्वी; पहिल्याप्रथम; प्राचीनकाळीं.

पिक (ಪಿಕ) (सं) ना.–कोकिळा,

—बंधु (ಬಂಧು) (सं) ना.–आम्रवृक्ष; कोकिळेचे आश्रयस्थान.

पिकासु (सि) (ಪಿಕಾಸು [ಸಿ]) (अ. दे) ना.–दुतोंडी कुदळ. पिकाव; पीकुंदर; पिकास.

पिक्कु (ಪಿಕ್ಕು) (क) धा.–विंचरणें; केस सोडवणें; गुंता उकलणें.

(क) ना.—जटा; गुंतवळ; केसाचा गुंता.

**पिंकुळि** (ಪಿಂಕುಳಿ) (क) धा.—हंगविणें; टोचून बोलणें; अवमानणें.

**पिंग** (ಪಿಂಗ) (क) ना. पिंगट वर्ण; कंदी रंग.

**पिंगचक्षु** (ಪಿಂಗಚಕ್ಷು) (सं) ना.—दुर्योधन; कौरव.

**पिंगल** (ಪಿಂಗಲ) (सं) ना.—हळद; पिवडी; एक संवत्सर; माकड; सरडा; मंगळग्रह; ऋषिनाम; एक राक्षस.

**पिंगलि** (ಪಿಂಗಲಿ) (सं) ना.—पिंगळा; किलबिला.

**पिंगाक्ष** (ಪಿಂಗಾಕ್ಷ) (सं) ना.—दुर्योधन; शिव; परटीण पक्षी.

**पिंगाणि** (ಪಿಂಗಾಣಿ) (क) ना.—काचेचें भांडें; चिनीमातीचें भांडें.

**पिंगु** (ಪಿಂಗು) (क) धा.—नाश होणें; नाहीसें होणें; मागें सरणें; कमी होणें; वाळणें; निभावणें; सोडणें; दूर जाणें; जिरणें; कोमेजणें; खच्चणें; परतणें.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—मागें ओढणें; निभावणें; वाळणें; वाळवणें; दूर करणें.

**पिंगोळ्** (**ळ**) (ಪಿಂಗೊಳ್ [ಳ]) (क) ना.—मागचा भाग; पश्चाद्भाग.

**पिचकारि** (ಪಿಚಕಾರಿ) (अ-दे) ना.—पिचनळी; द्रव पदार्थ आत घेऊन बाहेर सोडण्याची नळी, चिपनळी, चिळकांडी.

**पिचंडि** (ಪಿಚಂಡಿ) (क) ना.—मांडी; जंघा; ऊरू; मागें बांधलेले हात.

**पिचु** (ಪಿಚು) (सं) ना.—कापूस; रू; दोन तोळ्यांचें वजन.

**पिचुमंद** (ಪಿಚುಮಂದ) (सं) ना.—निंब, कडुलिंबाचें झाड.

**पिचुल** (ಪಿಚುಲ) (सं) ना.—कापूस; रू; पिसासारखीं पानें असणारें झाड; खेकडा; समुद्रकाक.

**पिच्छ** (ಪಿಚ್ಛ) (सं) ना.—पिसारा; मोरपीस; बाणाचे पीस.

**पिच्छल** (ಪಿಚ್ಛಲ) (सं) वि.—निसरणारे; निसरडा, बुळबुळीत; घसरडा.

**पिच्छिका** (ಪಿಚ್ಛಿಕಾ) (सं) ना.—मोरपिसाचा कुंचा; मोर्चेल.

**पिच्छिल** (ಪಿಚ್ಛಿಲ) (सं) वि.—घसरडा; बुळबुळीत; निसरता.

**पिच्छिले** (ಪಿಚ್ಛಿಲೆ) (सं) ना.—तांदळाची गंजी; कांजी; साईचें दही.

**पिच्छे** (ಪಿಚ್ಛೆ) (सं) ना.—भाताची कांजी; शाल्मली वृक्षाचा डिंक.

**पिंचु** (ಪಿಂಚು) (क) धा.—मागें होणें; मागें सरणें; मागेपुढें पाहणें.

**पिंछ** (ಪಿಂಛ) (क) ना.—मोरपिसारा.

**पिंज्** (ಪಿಂಜ್) (सं) धा.—रंगविणें; रंग देणें; मुजवणें; झाकणें; स्पर्श करणें; शृंगारणें; काढून देणें; प्रकाशणें; चकाकणें; दुखवणें; जखम करणें; बलवान होणें; राहणें.

**पिंज** (ಪಿಂಜ) (सं) ना.—चंद्र; कापूस; कापूर; दुःख; जखम; बळ; खून; हत्या.

**पिंजर** (ಪಿಂಜರ) (सं) ना.—तांबडा पिवळा रंग; पिंगट रंग; सोनेरी रंग; सोनें; चांदी; सापळा; अस्थिपंजर.

—**आद्रि** (ಅದ್ರಿ) (सं) ना.—मेरूपर्वत; चंद्रगिरी; रजतगिरी.

**पिंजरि** (ಪಿಂಜರಿ) (क) धा.—मागे हटणें; पीछेहाट करणें; भिणें; पळून जाणें; पाऊल मागें घेणें.

**पिंजु** (ಪಿಂಜು) (क) धा.—गाळणें; घाण काढणें; तुपांतील बेरी काढणें; पातळ करणें; विरळ करणें; अडचण दूर करणें.

(क) ना.—कोवळे फळ; तोर; मिडी.

**पिंजूष** (ಪಿಂಜೂಷ) (सं) ना.—कानातील मळ; केर; घाण; 'कूकणि' पहा.

**पिंजे** (ಪಿಂಜೆ) (सं) ना.—जखम; दुखणें; कापूस; रू.

**पिट** (ಪಿಟ) (सं) ना.—घर; माळी; माडी; बुट्टी; पेटारा; संदूक.

**पिटक** (ಪಿಟಕ) (सं) ना.—पुटकळी; पुरळ; फोड; बुट्टी; पेटारा; रांजण; धान्यसंग्रह; इंद्राच्या निशाणाचे आभरण.

**पिट्ट** (**ट्टु**) (ಪಿಟ್ಟ [ಟ್ಟು]) (क) ना.—पीठ; पूड.

**पिट्टर** (**रक**) (ಪಿಟ್ಟರ [ರಕ]) (सं) ना.—पात्र; मडके; रवि.

**पिडि** (ಪಿಡಿ) (क) धा.—धरणें; हातांत घेणें; पकडणें; पकडून आणणें.

(क) ना.—मूठ; मुष्टि; हत्तीण.

—**आळु** (ಆಳು) (क) वि.—मुठींत राहणारा; आधीन असणारा; हातांतला.

**पिडिकट्टु** (ಪಿಡಿಕಟ್ಟು) (क) ना.—आवळून बांधण्यासाठीं दोराच्या शेवटचा लाकडी बदाम. पिळकवणे.

**पिडुगु** (ಪಿಡುಗು) (क) धा.—थरथर कापणें. शिंपडणें; पसरणें.

(क) ना.—वीज; अडचण; हरकत; सांसर्गिक रोग.

**पिणिल्** (**लु**) (ಪಿಣಿಲ್ [ಲು]) (क) ना.—जटा; वेणी; वशिंड; ककुंद्. 'इणि' पहा.

**पिण्याक** (ಪಿಣ್ಯಾಕ) (सं) ना.—पेंड; तिळाची पेंड.

—**देव** (ದೇವ) (क) ना.—एक शिवशरण.

**पिंड** (ಪಿಂಡ) (सं) ना.—घास; कवळ; श्राद्धातील अन्नाचा गोळा; देह; शरीर; मनाची घडण.

**पिंडक** (ಪಿಂಡಕ) (सं) ना.—सुवासिक द्रव्य; हत्तीचें गंडस्थळ; लोह; लोखंड.

**पिंडच्छेद** (ಪಿಂಡಚ್ಛೇದ) (सं) ना.—पिंडदान थांबवणूक.

**पिंडज** (ಪಿಂಡಜ) (सं) वि.—आईच्या पोटातून उत्पन्न झालेले; देहज.

**पिंडप्रदान** (ಪಿಂಡಪ್ರದಾನ) (सं) ना.—मृतांना श्राद्धकाळी दिलेले दान. पिंडदान.

**पिंडांड** (ಪಿಂಡಾಂಡ) (सं) ना.—प्राण्याचा देह, शरीर.

**पिंडायस** (ಪಿಂಡಾಯಸ) (सं) ना.—लोखंडाचा तुकडा; लोहखंड.

**पिंडार** (ಪಿಂಡಾರ) (सं) ना.— बुद्ध संन्यासी; क्षपणक.

**पिंडारि** (ಪಿಂಡಾರಿ) (अ. दे.) ना.—चोरांची टोळी; ठकांचा तांडा; पेंढार.

**पिंडाशन** (ಪಿಂಡಾಶನ) (सं) ना.—भिक्षुक.

**पिंडि** (ಪಿಂಡಿ) (सं) ना.—शंकराचे लिंग; शाळुंका; देवमूर्ति; गाठोडें; भिक्षेकरी; पिंडान्न स्वीकारणारा. 'अंडिगे' पहा.

**पिंडिके** (ಪಿಂಡಿಕೆ) (सं) ना.—सूज; फुगारा; फूग.

**पिंडित (हिंडिद)** (ಪಿಂಡಿತ [ಹಿಂಡಿದ]) (सं) वि.—पिळून काढलेले; पिळलेले.
(सं) ना.—सार; अर्क; रस.
—**अर्थ** (ಅರ್ಥ) (सं) ना.—सारांश; गर्भितार्थ; रहस्य.

**पिंडिवाळ** (ಪಿಂಡಿವಾಳ) (क) ना.—शूरवीर; गर्भश्रीमंत.

**पिंडु** (ಪಿಂಡು) (क) धा.—पिळणें; रस काढणें; धारा काढणें; अर्क काढणें; वेढा देणें; पीळ भरणें.
(क) ना.—समूह; गट; कळप; थवा.

**पित (तृ)** (ಪಿತ [ತೃ]) (सं) ना.—वडील; तात; पिता; बाप.

**पितर** (ಪಿತರ) (सं) ना.—वडील; वाडवडील.

**पितामह** (ಪಿತಾಮಹ) (सं) ना.—आजा; वडीलांचे वडील; विष्णु; ब्रह्मदेव; दीर्घजीवी.

**पितृ** (ಪಿತೃ) (सं) ना.—पिता; रक्षक; पालक; मातापिता.
—**कानन-वन** (ಕಾನನ,-ವನ) (सं) ना.—स्मशान; मसण; दहनभूमी.

**पितृतीर्थ** (ಪಿತೃತೀರ್ಥ) (सं) ना.—पिंडदानाला योग्य तीर्थक्षेत्र; प्रयाग.

**पितृदिन** (ಪಿತೃದಿನ) (सं) ना.—श्राद्धतिथी; पितरांचा मृत्युदिवस; मयंती.

**पितृधन** (ಪಿತೃಧನ) (सं) ना.—वडीलार्जित संपत्ती.

**पितृपक्ष** (ಪಿತೃಪಕ್ಷ) (सं) ना.—पक्ष पंधरवडा; भाद्रपदातील कृष्णपक्ष; वडिलाची श्राद्धतिथी.

**पितृपति** (ಪಿತೃಪತಿ) (सं) ना.—यमधर्म.

**पितृभक्ति** (ಪಿತೃಭಕ್ತಿ) (सं) ना.—मातापित्यावरील श्रद्धा; वडिलाविषयीची पूज्यबुद्धि.

**पितृभोजन** (ಪಿತೃಭೋಜನ) (सं) ना.—श्राद्धाचें भोजन; उडीद.

**पितृयज्ञ** (ಪಿತೃಯಜ್ಞ) (सं) ना.—तिळांजली.

**पितृलोक** (ಪಿತೃಲೋಕ) (सं) ना. मृत पितरांचें निवासस्थान; चंद्रलोकावरील लोक; चंद्रलेकावरील वस्ती.

**पितृव्य** (ಪಿತೃವ್ಯ) (सं) ना.—चुलता; काका; वडिलांचा भाऊ.

**पितृशेष** (ಪಿತೃಶೇಷ) (सं) ना.—श्राद्धासाठी केलेल्या स्वयंपाकातील अवशेष.

**पित्त** (ಪಿತ್ತ) (सं) ना.—पित्ताशयांतील द्रव, त्रिदोषांतील एक.

**पित्तकामाले** (ಪಿತ್ತಕಾಮಾಲೆ) (सं) ना.—पांडुरोग; कावीळ.

**पित्तनेत्तिगेरु** (ಪಿತ್ತನೆತ್ತಿಗೇರು) (क) ना.—क्रोधाचा भडका; प्रकोप; अतिराग.

**पित्तभ्रमे** (ಪಿತ್ತಭ್ರಮೆ) (सं) ना.—पित्तानें होणारा भ्रम; वेरी; भोवळ; तिरमिर.

**पित्तिल्** (ಪಿತ್ತಿಲ್)
**पिंत्तिल** (ಪಿಂತಿಲ್) (क) ना.—परसु; घराचा मागील भाग.
**पि (पिं)त्तिल्ल** (ಪಿ [ಪಿಂ] ತ್ತಿಲ್ಲ)

**पिधान** (ಪಿಧಾನ) (सं) ना.—झांकण; आवरण; आच्छादन; बुरखा; पांघरूण.

**पिनद्ध** (ಪಿನದ್ಧ) (सं) वि.—बांधलेलें; आवळलेलें.

**पिनाक** (ಪಿನಾಕ) (सं) ना.—शिवधनु; रुद्राचें धनुष्य.
—**धर,-पाणि** (ಧರ,-ಪಾಣಿ) (सं) ना.—शिव.

**पिनाकि** (ಪಿನಾಕಿ) (सं) ना.—शंकर.

**पिंतु** (ಪಿಂತು) (क) अ.—पूर्वी, प्रथमतः; आरंभीं; मागील; पिछाडीकडील.

**पिंते** (ಪಿಂತೆ) (क) अ.—प्रथमतः; पूर्वी; मागें.

**पिन्नेणिके** (ಪಿನ್ನೆಣಿಕೆ) (क) ना.—सिंहावलोकन; गतकाळचा विचार; पूर्वावलोकन.

**पि (हि) न्नेले** (ಪಿ [ಹಿ] ನ್ನೆಲೆ) (क) ना.—मागचा भाग; पार्श्वभूमी; संदर्भ; भूतपूर्व विचार.

**पिन्नोयु** (ಪಿನ್ನೋಯು) (क) धा.—पश्चात्ताप होणें; अनुताप होणें.

**पिन्नोवु** (ಪಿನ್ನೋವು) (क) ना.—पश्चात्ताप; अनुताप.

**पिपासु** (ಪಿಪಾಸು) (सं) वि.—तहानलेला; पिण्याची इच्छा करणारा; तोंडाला कोरड पडलेला; मिळवू पाहणारा.

**पिपासे (सा)** (ಪಿಪಾಸೆ [ಸಾ]) (सं) ना.—पिण्याची इच्छा; तहान; कोरड; मिळवण्याची इच्छा.

**पिपीलिका (के)** (ಪಿಪೀಲಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—मुंगी; वाळवी. 'ओरळे' पहा.

**पिपीलिकाशनि** (ಪಿಪೀಲಿಕಾಶನಿ) (सं) ना.—मुंगी खाणारा प्राणी; वाळवीभक्षक.

**पिप्पल** (ಪಿಪ್ಪಲ) (सं) ना.—पिंपळ; अश्वत्थ; अंगरख्याची बाही; विनोद; पाणी.

**पि (हि) प्पलि** (ಪಿ [ಹಿ] ಪ್ಪಲಿ) (सं) ना.—पिंपळी; औषधी; लांबट मिरी.

**पिंबगल (लु)** (ಪಿಂಬಗಲ [ಲು]) (क) ना.—मागील दिवस; पूर्व काल; तिसरा प्रहर; अपराण्ह; 'बय्यु' पहा.

पिंबडु (बिडु) (ಪಿಂಬಡು [ಬಿಡು]) (क) अ.—पूर्वी; त्या आधी; प्राचीन काळीं.
पिम्मेय् (ಪಿಮ್ಮೆಯ್) (क) ना.—पूर्वजन्म; गतजन्म.
पिय (ಪಿಯ) (क) वि.—प्रिय; प्रीतीचे; आवडता; लाडका.
पिरंगि (ಪಿರಂಗಿ) (अ.दे) ना.—तोफ; बंदूक; शत्रुघ्नी; यूरोपीय.
पिर (रा) मिड् (ಪಿರ [ರಾ] ಮಿಡ್) (अ.दे) ना.—इजिप्त देशातील प्राचीन थडगी; त्रिकोणाकृति समाधि.
पिरि (ಪಿರಿ) (क) धा.—हिसकावणें; बाहेर काढणें.
(क) वि.—मोठा; श्रेष्ठ.
(क) ना.—मांस; मुर्दा; शव; म्हातारपण.
पिरितिनि (ಪಿರಿತಿನಿ) (क) ना.—राक्षस; पिशाच; खादाड; प्रेते खाणारा, लाव.
पिरतिनियाण्म (ಪಿರತಿನಿಯಾಣ್ಮ) (क) ना.—पिशाचांचा राजा; शिव.
पिरिदु (ಪಿರಿದು) (क) वि.—मोठा; श्रेष्ठ; विशाल.
पिरिदुं (ಪಿರಿದುಂ) (क) अ.—अधिक होऊन; अति झाल्यानें.
पिरिदुपाल् (ಪಿರಿದುಪಾಲ್) (क) अ.—सामान्यतया; प्रायशः.
(क) ना.—अमृत; विपुल दूध.
पिरिपिरि (ಪಿರಿಪಿರಿ) (क) अ.—मुकाट्यानें; व्यर्थ; एकसारखे.
पिर्गु (ಪಿರ್ಗು) (क) धा.—गर्वाने फुगणें; मोठे होणें; संकोच वाटणें.
पिल्लणिगे (ಪಿಲ್ಲಣಿಗೆ) (क) ना.—गदा; परिघ.
पिल्लि (ल्ले) (ಪಿಲ್ಲಿ [ಲ್ಲೆ]) (क) ना.—जोडवी; मासोळी.
पिशंग (ಪಿಶಂಗ) (सं) वि.—पांढऱ्या तांबड्या रंगाचें.
पिशाच (ಪಿಶಾಚ) (सं) ना.—भूत; प्रेत; राक्षस; दानव.
पिशाटिका (के) (ಪಿಶಾಟಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—खाजाळू वनस्पति; खाजकुलती; 'नसुगुण्णी' पहा.
पिशित (ಪಿಶಿತ) (सं) ना.—मांस
—अशन (ಅಶನ) (सं) ना.—मांसाहार; राक्षस; पिशाच.
पिशु (सु) न } (ಪಿಶು [ಸು] ನ) (सं) ना.—चहाडखोर;
हिसुण } (ಹಿಸುಣ) भांडण लावणारा; दुष्ट.
पिष्ट (ಪಿಷ್ಟ) (सं) ना.—पीठ; धान्याची पूड.
पिसि (ಪಿಸಿ) (क) धा.—वियोग करणें; संबंध तोडणें; फाडणें; पसरणें; पाय घसरून पडणें; कुस्करणें; दडपणें; ओढणें; रुंद करणें.
पिसुकु (सुंकु) (ಪಿಸುಕು [ಸುಂಕು]) (क) धा.—हिसकाहिसकी करणें; गळा दाबणें; दडपणें; घासणें.
पिसुण् (ಪಿಸುಣ್) (क) ना.—'पिशुन' पहा. अपवाद; चहाडी निंदा; अपमान
पिसुण (ಪಿಸುಣ) (क) ना.—पिशुन; चहाडखोर; निंदक; दुष्ट.
पिसुनुडि (ಪಿಸುನುಡಿ) (क) ना.—कानगोष्ट; कुजबूज; हितगूज.
पिस्तुल् (लु) (ಪಿಸ್ತೂಲ್ [ಲು]) (अ. दे) ना.—लहान बंदूक.
पिहित (ಪಿಹಿತ) (सं) वि.—झाकलेले; आवरलेले; आच्छादलेले; पडद्याआडचें.
पिळि (ಪಿಳಿ) (क) धा.—पिळून काढणें; रस काढणें; पिळणें; चोपणें; बडवणें; उकळणें; धीर सोडणें.
पिळिकिसु (ಪಿಳಿಕಿಸು) (क) धा.—भेदरणें; घाबरणें; भिवविणें.
पिळिगु (ಪಿಳಿಗು) (क) धा.—फोडणें; कठीण होणें; घट्ट होणें.
पिळिल् (ಪಿಳಿಲ್) (क) धा.—हिसकावून घेणें; फेकून देणें; गाठ सोडणें.
पिळुकु (ळकु) (ಪಿಳುಕು [ಳ್ಕು]) (क) ना.—बाणाचा खालचा भाग; तळभाग; पुंख; खोपट; खेडे.
पिळ्गु (ಪಿಳ್ಗು) (क) धा.—फुगणें; संतोषणें; तडा जाणें.
पिळ्ळंगोळवि } (ಪಿಳ್ಳಂಗೊಳವಿ) (क) ना.—मुरली; वेणु; पांवा;
पिळ्ळंगोवि } (ಪಿಳ್ಳಂಗೋವಿ) मुरलीधर; कृष्ण.
पिळ्ळारि (ಪಿಳ್ಳಾರಿ) (क) ना.—गणेश; गणपति.
पिळ्ळे (ಪಿಳ್ಳೆ) (क) ना.—बालक; पिलू; अर्भक; वासरू; रेडकू; शावक.
पी (ಪೀ) (सं) धा.—पिणे; पान करणें.
पीकदानि (ಪೀಕದಾನಿ) (अ. दे) ना.—पिकदाणी; थुंकण्याचें भांडें; तस्त.
पीकलाट (ಪೀಕಲಾಟ) (क) ना.—अडचण; हरकत; कष्ट; उपद्रव; पीडा. 'उपटळ' पहा.
पीकु (ಪೀಕು) (अ.दे) धा.—कष्ट करणें; साहस करणें; पीक काढणें.
(अ.दे) ना.—धान्याचें पीक; 'पैरु' पहा.
पीच (ಪೀಚ) (क) धा.—हनुवटी; दाढी.
पीचु (ಪೀಚು) (क) धा.—ओढणें; दुभंगणें; फुगणें; रुंद होणें.
(क) ना.—कोवळे फळ; तोर. 'हीचु' पहा.
पीठ (ಪೀಠ) (सं) ना.—आसन; गादी; पाट; कट्टा.
पीठपंक्ति (ಪೀಠಪಂಕ್ತಿ) (सं) ना.—प्रेक्षागृह; रंगभूमी पुढील प्रेक्षकस्थल; आखाडा; हौदा; व्यायाम शाळा.
पीठमर्दन (ಪೀಠಮರ್ದನ) (सं) ना.—राजाला सजवणारा; वाक्चतुर; उपनायक; श्रृंगारमंत्री.
पीठिका (के) (ಪೀಠಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—प्रारंभ; प्रस्तावना; प्रारंभिक चार शब्द; आसन; गादी; उपोद्घात.
पीडन (ಪೀಡನ) (सं) ना.—दडपण; मर्दन; घर्षण; हिसकाहिसकी; अपाय; दुखणें.
पीडा (डे) (ಪೀಡಾ [ಡೆ]) (क) ना.—उपद्रव; बाधा; अडचण; अनिष्ट; सांसर्गिक रोग; मरीआई, मसणी इ. पीडक देवता.
—कर (ಕರ) (सं) वि.—त्रासदायक; पीडक; बाधक.

**पीडित** (ಪೀಡಿತ) (सं) वि.–त्रस्त; अडचणीत आलेला; दुःखाविष्ट; दुःखित; दुर्दैवानें पोळलेला.

**पीडिसु** (ಪೀಡಿಸು) (क) धा.–त्रास देणें; दुःख देणें; दुखविणें; दुःखाला कारणीभूत होणें.

**पीत** (ಪೀತ) (सं) वि.–प्यालेला; मद्यपी; दारू प्यालेला. (सं) ना.–हळद; पिवळा रंग.

**पीतदारु** (ಪೀತದಾರು) (सं) ना.–देवदार; सुचीपर्णी.

**पीतधान्य** (ಪೀತಧಾನ್ಯ) (सं) ना.–पिवळा जोंधळा.

**पीतराग** (ಪೀತರಾಗ) (सं) ना.–पिवळा रंग; फिका पिवळा.

**पीतल** (ಪೀತಲ) (सं) ना.–पिवळा रंग; परात; पितळी.

**पीतवास** (ಪೀತವಾಸ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण; पीतांबर; पिवळे वस्त्र वापरणारा; पीतांबरधारी.

**पीतांबर** (ಪೀತಾಂಬರ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण; पीतवसन.

**पीति** (ಪೀತಿ) (सं) ना.–घोडा; अश्व; पान; हळद; छत्र; पाणपोई; हत्तीची सोंड.

**पीतु** (ಪೀತು) (सं) ना.–सूर्य; अग्नि; कपड्याला लावण्याची फीत; काठ; कळपांतील प्रमुख हत्ती.

**पीथ** (ಪೀಥ) (सं) ना.–सूर्य; अग्नि; समय; पेय; पाणी.

**पीन** (ಪೀನ) (सं) ना.–मस्त; पुष्ट; जाड; भरलेला; पूर्ण वाढलेला; लठ्ठ.

**पीनक** (ಪೀನಕ) (सं) अ.–योग्य रीतीनें; विपुलपणें; बहुधा; बाहुल्यानें; अधिककरून.

**पीनस** (ಪೀನಸ) (सं) ना.–पडसें; थंडी; सरदी; नाक गळणें.

**पीपायि** (ಪೀಪಾಯಿ) (क) ना.–पीप; बानी; रस साठवण्याचे लोहपात्र; काहील.

**पीयु** (ಪೀಯು) (सं) ना.–कावळा; घुबड; सूर्य; अग्नि; सोनें; समय; वेळ.

**पीयूष** (ಪೀಯೂಷ) (सं) ना.–अमृत; सुधा; दूध; चीक; कोवळे दूध.

—**रुचि** (ರುಚಿ) (सं) ना.–चंद्र; कापूर.

—**वर्ष** (ವರ್ಷ) (सं) ना.–अमृतधारा; कापूर, चंद्र.

**पीर्** (ಪೀರ್) (क) धा.–चाटणें; चोखणें; शोषणें; तोंडात ओढून घेणें; लुचणें; विखुरणें; फेकणें.

**पीलक** (ಪೀಲಕ) (सं) ना.–डोंगळा; मुंगळा; काळी मुंगी. 'गोद्द' पहा.

**पीलि** (ಪೀಲಿ) (क) ना.–मोरपिसारा; 'पिंछ' पहा.

**पीलु** (ಪೀಲು) (क) ना.–बाण; शर; पाणी; परमाणू; कृमीकीटक; हत्ती; गज; एक राग; फूल; वृक्षविशेष.

**पीवर** (ಪೀವರ) (सं) वि.–फुगलेला; मस्त; पुष्ट; स्थूल; पीन.
(सं) ना.–अश्वगंध.

—**स्तन** (ಸ್ತನ) (सं) ना.–पुष्टस्तनी; सुंदरी.

**पीळिगे** (ಪೀಳಿಗೆ) (क) ना.–पीठिका; संतती; वंशपरंपरा; पिढी.

**पुंस्** (ಪುಂಸ್) (सं) ना.–पुरुष; पुरुषप्राणी; पुल्लिंग; मानवजात; सेवक.

**पुंश्चली (लें)** (ಪುಂಶ್ಚಲೀ [ಲೆ]) (सं) ना. व्यभिचारिणी; जारिणी; पुरुषाला हुडकत जाणारी.

**पुंसवन** (ಪುಂಸವನ) (सं) ना.–गर्भिणीला पुत्रप्राप्तीसाठी केलेला एक संस्कार.

**पुंस्कोकिल** (ಪುಂಸ್ಕೋಕಿಲ) (सं) ना.–नर कोकीळ.

**पुंस्त्व** (ಪುಂಸ್ತ್ವ) (सं) ना.–पुरुषत्व.

**पुंलिंग** (ಪುಂಲಿಂಗ) (सं) ना. पुरुषत्वदर्शक शब्द.

**पुंनाग** (ಪುಂನಾಗ) (सं) ना.–पुरुषश्रेष्ठ; पांढरा हत्ती; पांढरा चांफा.

**पुक्क** (ಪುಕ್ಕ) (क) वि.–पक्ष्याचीं पिसें; नपुंसक; हिजडा; भित्रा.

**पुक्कटे** (ಪುಕ್ಕಟೆ) (क) अ.–फुकट; निःशुल्क; मोफत; धर्मार्थ; औचित्यपूर्ण.

**पुक्कलु** (ಪುಕ್ಕಲು) (क) ना.–अधीरत्व; भय; भीति; भेकडपणा; घाबरटपणा.

**पुक्कस** (ಪುಕ್ಕಸ) (क) ना.– नीच जातीचा; चांडाल; शूद्र.

**पुगल्** (ಪುಗಲ್) (क) क्रि.–जाऊ नको; आत येऊ नको.
(क) अ.–जाऊन; प्रवेश करून.
(क) ना.–कुहु ध्वनि; कूजन.

**पुगिल् (लु)** (ಪುಗಿಲ್ [ಲು]) (क) ना.–प्रवेशद्वार; दरवाजा; महाद्वार.

**पुगु** (ಪುಗು) (क) धा.–जाणें; आंत प्रवेशणें; घुसणें; शिरणें.

—**ते** (ತೆ) (क) ना.–प्रवेश; शिरकाव, गमन.

**पुगुळ् (ळु)** (ಪುಗುಳ್ [ಳು]) (क) ना.–फोड; पुटकळी; तोंडावरील मोडी; पडसें; छिद्र; समाधि.

**पुग्गु** (ಪುಗ್ಗು) (क) ना.–अहंकार; गर्व; सूज. 'कोब्बु' पहा.

**पुंख** (ಪುಂಖ) (सं) ना.–बाणाचा तळभाग. बाणाचें पंख. शिकारी; ससाणा.

**पुंखानुपुंख** (ಪುಂಖಾನುಪುಂಖ) (सं) ना.–शरवृष्टि; बाणवर्षाव; अनुस्यूतता; लंबण.

**पुंगव** (ಪುಂಗವ) (सं) ना.–श्रेष्ठ पुरुष; बुळी; बैल; वळू.

**पुंगि** (ಪುಂಗಿ) (क) ना.–गारूड्याचें वाद्य; भोपळ्याचे साह्यानें फुंकून वाजवण्याचे एक सुरेल वाद्य.

**पुच्च** (ಪುಚ್ಚ) (क) ना.–शेपूट; पक्ष्याचे पंख; पिसारा.

**पुच्चवण** (ಪುಚ್ಚವಣ) (क) ना.–परीक्षा; पौरुष; पुरुषत्व.

**पुच्चळि** (ಪುಚ್ಚಳಿ) (क) ना.–हानी; नाश; नष्टचर्य.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.–वितळणें; विरघळणें; नाश पावणें.

**पुच्छ** (ಪುಚ್ಛ) (सं) ना.–शेपूट; पिसारा; पक्षाची पिसें. मागील भाग; पृष्ठ.

पुंज (ಪುಂಜ) (सं) ना.—जाडपण. साठ धाग्यांचा मागावरील ताणा; कोंबा; कोंबडा; समूह; गट; रास.

पुंजि (ಪುಂಜಿ) (सं) ना.—रास; समूह; परिमाण.
(क) ना.—गोळा; गुंडी; अल्पधनसंग्रह; शिल्लक; संचित. गांठ; धनसंचय.
—पूजक (ಪೂಜಕ) (क) ना.—कृपण; चिक्कू; कंजूष.

पुट (ಪುಟ) (क) ना.—उड्डाण; उडी; पांघरूण; पुरस्कार; उत्तेजन.
(सं) ना.—झाकण; आवरण; पदर; पडदा; निरी; घडी; द्रोणाचा आंतील भाग; साल; करंडक. पुस्तकाचें पान; पाऊल; ओंजळ; अंजली.
—अंजलिपुट (ಅಂಜಲಿಪುಟ) (सं) ना.—ओंजळ; शीर; पसा.

पुटगोसि (ಪುಟಗೋಸಿ) (क) ना.—कापड; लंगोटी.

पुटनेगे (ಪುಟನೆಗೆ) (क) धा.—सारखे उडणें; टणटण उडी मारणें.

पुटपाक (ಪುಟಪಾಕ) (सं) ना.—औषध तयार करण्याची एक पद्धति.

पुटभेदन (ಪುಟಭೇದನ) (सं) ना.—पट्टण; शहर.

पुटविडु (ಪುಟವಿಡು) (क) धा.—पेटविणें; अग्नि लावणें; जाळणें; प्रज्वलित करणें. पुटाला घालणें.

पुटवेलु (ಪುಟವೇಳು) (क) धा.—उडणें; उडी मारणें; सावकाश उड्या मारीत धावणें.

पुटा (ट्टा) णि (ಪುಟಾ [ಟ್ಟಾ]ಣಿ) (क) ना.—डाळे; भाजलेले हरभरे; फुटाणे.

पुटि (ಪುಟಿ) (सं) ना.—थर; पदर;
(क) धा.—उडणें; उडी मारणें; खुपसणें; धुम्धडम् उडी मारणें; अविचाराने काम करणें; साहस करणें.
(क) ना.—कारंजा; फवारा; चेंडूची उशी; टप.
—त (ತ) (सं) ना.—नाचणे बागडणें; नर्तन; उड्डाण; उडी.
—इसु (ಇಸು) (क) धा.—उडणे; उडविणें; उशी घेणें; टप खाणें.

पुटिके (ಪುಟಿಕೆ)(सं) ना.—पानाचा द्रोण; वाटी; जोडलेले करपुट

पुट्ट (ಪುಟ್ಟ) (क) वि.—लहान; चिमुकले; खुजे; गिड्डु; कुबडा; बाळ.

पुट्टि (ಪುಟ್ಟಿ) (क) नाः—मोहोळ; मधाचें पोळें; बुट्टी.

पुट्टिगे (ಪುಟ್ಟಿಗೆ) (क) ना.—आभरण; अलंकार विशेष.

पुट्टिरुवु (ಪುಟ್ಟಿರುವು) (क) ना.—नैसर्गिक जाणीव; उपजत बुद्धि; सहजस्थिति.

पुट्टु (ಪುಟ್ಟು) (क) धा.—उत्पन्न करणें; जन्माला घालणें; जन्म कंठणें; मान डोलावणें.
(क) ना.—जन्म; उत्पत्ति; सृजन.

पुडि (ಪುಡಿ) (क) ना.—पूड; धूळ; कुटून बारीक केलेला पदार्थ; धान्यपीठ.

पुडिगड्डु (ಪುಡಿಗಡುಬು) (क) ना.—पूड झालेला कडबू; मातीची सूठ.

पुडिवडे (ಪುಡಿವಡೆ) (क) धा.—पूडपूड होणें; नाश होणें; नष्ट होणें.

पुडुकु (डुंकु) (ಪುಡುಕು [ಡುಂಕು]) (क) धा.—हुडकणें; शोधणें.

पुण् (ಪುಣ್) (क) ना.—व्रण; जखम; करट.
—कूतु (ಕೂತು) (क) अ.—जखम चिघळून; ठणका लागून.

पुणि (णिं) चे (ಪುಣಿ [ಣಿಂ] ಚೆ) (क) ना.—चिंचेचे झाड; चिंच; आंबट फळ; तिंतिणी.

पुणुकु (ಪುಣುಕು) (क) धा.—कापड घासून चोळून धुणें; चुबकून धुणें.

पुणु (नु) गु (ಪುಣು [ನು] ಗು) (क) ना.—रानमांजराची कस्तुरी;
पटकूर मांजराची कस्तुरी; उदापासून मिळणारा सुगंधी पदार्थ.

पुणुंब (ಪುಣುಂಬ) (क) वि.—रेमेडोक्या; मंद; हुंब; मोठ्या सोवळ्याचा.

पुणुंबि (ಪುಣುಂಬಿ) (क) वि. मूर्ख स्त्री; धड्ड स्त्री; अजाणती.

पुणुंबु (ಪುಣುಂಬು) (क) ना. बाण; शर.

पुंड (ಪುಂಡ) (सं) ना. परिचय; खूळ; चिन्ह.
(क) वि. दांडोबा; हुंब; मस्त; वांड; भंड; ठक; लुटारू; वाटमाऱ्या; निर्भीक.

पुंडरीक (ಪುಂಡರೀಕ) (सं) ना.—श्वेत कमल; वाघ; आग्नेय दिग्गज; कपाळावरील नाम; पुंड्र; पोपट; श्वेतछत्र; महाश्वेतेचा प्रियकर; राजछत्र.

पुंडरीकाक्ष (ಪುಂಡರೀಕಾಕ್ಷ) (सं) ना.—कमलनेत्र; विष्णु; कृष्ण.

पुंडाट (टिके) (ಪುಂಡಾಟ [ಟಿಕೆ]) (क) ना.—पुंडाई; गुंडगिरी; वांडपणा; लूटमार; दांडगेपणा.

पुंड्र (ಪುಂಡ್ರ) (सं) ना.—पांढरा रंग; पांढरा ऊस; गोपीचंदनाचा नाम; चित्र.

त्रिपुंड्र (ತ್ರಿಪುಂಡ್ರ) (सं) ना.—वैष्णवाच्या कपाळावरील तिरेघी नाम; उभे दुबोटी गंध.

पुण्णिमे (ಪುಣ್ಣಿಮೆ) (क) ना.—पूर्णिमा; पूर्णचंद्र तिथी; शुक्ल पक्षातील पंधरावी तिथी.

पुण्य (ಪುಣ್ಯ) (सं) वि.—पवित्र; पावन; शुद्ध; चांगलें; सद्गुणी; न्याय्य; सुदैवी; अनुकूल; संतोषकारक; उत्साही.

पुण्य (ಪುಣ್ಯ) (सं) ना.—सद्गुण; सत्त्वशीलता; यशःकृति; शुद्धता; शोधन.
—अहः(हन्) (ಅಹಃ [ಹನ್]) (सं) ना.—पुण्य दिवस; सण; उत्सवदिन.

—**अहवाचन** (ಅಹವಾಚನ) (सं) ना.–पुण्य दिवसाचा त्रिवार उच्चार; एक शुद्धतेचा धार्मिक संस्कार.

—**उदय** (ಉದಯ) (सं) ना.–भाग्यकाळाचा प्रारंभ; भरभराट; मागील पुण्याचे फळ; पुण्याची फलप्राप्ति.

—**काल** (ಕಾಲ) (सं) ना.–सुमुहूर्त; शुभघटी; पर्वणी.

—**क्षेत्र** (ಕ್ಷೇತ್ರ) (सं) ना.–देवतांचे पवित्र स्थळ; तीर्थस्थान; पावन ठिकाण.

—**गृह** (ಗೃಹ) (सं) ना.–दानगृह; देवालय.

—**जन** (ಜನ) (सं) ना.–सज्जन; राक्षस; भूत; यक्ष.

—**तीर्थ** (ತೀರ್ಥ) (सं) ना.–क्षेत्रातील पवित्र जलाशय; पावनजल.

—**भू,-भूमि** (ಭೂ,–ಭೂಮಿ) (सं) ना.–आर्यावर्त; पुण्य लोक; स्वर्ग.

—**श्लोक** (ಶ್ಲೋಕ) (सं) ना.–स्तुती करण्याजोगा पुण्यपुरुष; ज्याची स्तोत्रें गाण्यानें पुण्य लाभतें असा सद्गुणी पुरुष.

**पुत्** (ಪುತ್) (सं) ना.–नरक; निपुत्रिकाचा नरक; नरक विशेष.

**पुत्त (त्तु)** (ಪುತ್ತ [ತ್ತು]) (क) ना.–वारूळ; सापाचे वारूळ; वल्मिक; भूक; 'होदरू' पहा.

**पुत्त (त्य) ळि** (ಪುತ್ತ [ತ್ಯ] ಳಿ) (क) ना.–पुतळी; बाहुली; शुद्ध सोन्याचें एक जुनें नाणें.

**पुत्तिके (गे)** (ಪುತ್ತಿಕೆ [ಗೆ]) (क) ना.–नक्कल; अवतरण; बाहुली; वाळवी; कसर; गांधीलमाशी; उडपी स्वामीचा मठ.

**पुत्र** (ಪುತ್ರ) (सं) ना.–कुमार; मुलगा.

—**उत्सव** (ಉತ್ಸವ) (सं) ना.–पुत्रजन्माचा आनंदोत्सव.

—**काम** (ಕಾಮ) (सं) ना.–पुत्रजन्माची इच्छा; पुत्रकामेष्टी यज्ञ.

**पुत्रक** (ಪುತ್ರಕ) (सं) ना.–लहान मुलगा; बालक; बाहुली; शरम; दुष्ट; वंचक; कोळी; आठ पायाचा पक्षी. केस.

**पुत्रवति (ती)** (ಪುತ್ರವತಿ [ತೀ]) (सं) ना.–पुत्र असलेली स्त्री.

**पुत्र (त्रि) के** (ಪುತ್ರ [ತ್ರಿ] ಕೆ) (सं) ना.–कन्या; बाहुली; लहान वस्तु.

**पुत्रि** (ಪುತ್ರಿ) (सं) ना.–पुत्रवती; पुत्र असलेली स्त्री.

**पुत्री** (ಪುತ್ರೀ) (सं) ना.–कन्या; आत्मजा.

**पुत्रवधु** (ಪುತ್ರವಧು) (सं) ना.–स्नुषा; सून; मुलाची पत्नी.

**पुत्रहीन** (ಪುತ್ರಹೀನ) (सं) वि.–निपुत्रिक.

**पुदकळ** (ಪುದಕಳ) (क) ना.–गोंधळ; गडबड; उत्साभर.

**पुदि** (ಪುದಿ) (क) धा.–व्यापणें; भरणें; देणे; झांकणें; लपणें; गुप्त राहणें; मिळून राहणें.

(क) ना.–पक्ष; बाजू; शेजार; सामीप्य; द्वार.

**पुदु** (ಪುದು) (क) ना.–साम्य; सारखेपणा; जुळणूक; प्रवेश; परस्पर; अन्योन्य.

—**बाळ्, बाळु** (ಬಾಳ್, ಬಾಳು) (क) धा.–मिळून राहणें; जुळवून घेणें; भागवणें.

**पु (हो) दुकुळि** (ಪು [ಹೊ] ದುಕುಳಿ) (क) ना.–पांघरूण; आच्छादन; आवरण.

**पुदुगिसु** (ಪುದುಗಿಸು) (क) धा.–मिसळणें; आंत घालणें; मिश्र करणें; लपवणें; जुळवणें.

**पुदुगु** (ಪುದುಗು) (क) धा.–संकोच करणें; मागें हटणें; लपणें; दुमडणें; नेसणें. 'होदुगु' पहा.

**पुदुल** (ಪುದುಲ) (सं) वि.–सुंदर; शोभिवंत.

(सं) ना.–देव; आत्मा; शिवाचे नाव.

**पुदुवट्ट** (ಪುದುವಟ್ಟು) (क) ना.–अडचणीसाठीं राखून ठेवलेला पैसा; विशेष कामासाठी काढून ठेवलेला पैसा.

(क) अ.–वाटणीचा पैसा घेऊन; संकोचून.

**पुदुवाळु (ळ्वे)** (ಪುದುವಾಳು [ಳ್ವೆ]) (क) ना.–मिळून मिसळून राहणें; एक होणें; संबंध जोडणें.

**पुदुवु** (ಪುದುವು) (क) ना.–वाटणी; हिस्सा; भाग; प्रवेश; संबंध. 'होदुवु' पहा.

**पुदे** (ಪುದೆ) (क) ना.–झाकण; आवरण; कवच; काटा; मोड; छप्पर; भाता; घर; तळघर; कोनाडा.

**पुद्गल** (ಪುದ್ಗಲ) (सं) वि.–चांगले; सुंदर; मनोहर.

(सं) ना.–परमाणु; शरीर; पंचमहाभुतें, आत्मा; शिवाचा अवतार.

**पुनस् (र्)** (ಪುನಸ್ [ರ್]) (सं) अ.–पुनःपुनः; वारंवार; अरतून परतून.

**पुनरपि** (ಪುನರಪಿ) (सं) अ.–पुन्हा पुन्हा; आणखी आणखी; वारंवार.

**पुनरागमन** (ಪುನರಾಗಮನ) (सं) ना.–पुनः पूर्वस्थळी येणें; पुनः परतून येणें.

**पुनरावृत्ति** (ಪುನರಾವೃತ್ತಿ) (सं) ना.–पुनः पुनः तेच करणें; पुनः घडणें; अभ्यास.

**पुनरुक्ति** (ಪುನರುಕ್ತಿ) (सं) ना.–सांगितलेलेंच पुनः सांगणे; वारंवार तेंच सांगण्याचा साहित्य दोष.

**पुनर्जन्म** (ಪುನರ್ಜನ್ಮ) (सं) ना.–भावी जन्म.

**पुनर्दर्शन** (ಪುನರ್ದರ್ಶನ) (सं) ना.–पुनर्भेट, आणखी झालेली भेट.

**पुनर्नव** (ಪುನರ್ನವ) (सं) ना.– पुनः नव्यानें वाढणें; नख, केस, यांचे नवीन येणें.

—**आसव** (ಆಸವ) (सं) ना.–पुनर्नव्याचे आसव; पुनर्नवा वनस्पतीची दारू.

**पुनर्भव** (ಪುನರ್ಭವ) (सं) वि. – पुनः जन्मलेला; पुनर्जात.
(सं) ना. – नख, दात; पुनर्जन्म.

**पुनर्भू** (ಪುನರ್ಭೂ) (सं) ना. – पुनर्विवाहिता; पाटाची बायको.

**पुनर्वसु** (ಪುನರ್ವಸು) (सं) ना. – विष्णु; एक नक्षत्र.

**पुनर्विवाह** (ಪುನರ್ವಿವಾಹ) (सं) ना. – पुनर्लग्न; पाट.

**पुनश्चरणे** (ಪುನಶ್ಚರಣೆ) (सं) ना. – पठण; मुखोद्गतता; मंत्रोच्चार.

**पुनश्च (रपि)** (ಪುನಶ್ಚ [ರಪಿ]) (सं) ना. – वारंवार; फिरून फिरून; परत परत.

**पुन (र) स्कार** (ಪುನ [ರ] ಸ್ಕಾರ) (सं) ना. – पुनरावृत्ति; संभावना; अग्रमान.

**पुनीत** (ಪುನೀತ) (सं) वि. – पवित्र; परिशुद्ध; निर्मल; पुण्यकर; पावन; निष्पाप.

**पुनुगु** (ಪುನುಗು) (क) ना. – रानमांजराची कस्तुरी.

**पुन्नाग** (ಪುನ್ನಾಗ) (सं) ना. – श्रेष्ठ पुरुष; पांढरा हत्ती; राजहस्ती; गवा; प्रमुख; नायक; नागकेशर; सुरवृक्ष; सुरंगी.

**पुन्नामनरक** (ಪುನ್ನಾಮನರಕ) (सं) ना. – नरकविशेष. 'पुत' पहा.

**पुन्निके (का)** (ಪುನ್ನಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना. – कांचन; कांचनवृक्ष.

**पुब्बु** (ಪುಬ್ಬು) (क) ना. – भू; भुवई. 'पुर्बु' पहा.

**पुब्बे** (ಪುಬ್ಬೆ) (क) ना. – पूर्वा नक्षत्र.

**पुष्टि** (ಪುಷ್ಟಿ) (सं) ना. – पोषण; पुष्टता; माज; मांदा; लठ्ठपणा.

**पुमन् (पुं)** (ಪುಮನ್ [ಪುಂ]) (सं) ना. – नर; पुरुष.

**पुंभाव** (ಪುಂಭಾವ) (सं) ना. – पुरुषत्व; पुरुषपणा.

**पुय् (पोय्)** (ಪುಯ್ [ಪೊಯ್]) (क) धा. – मारणें; चोप देणें; बडवणें; खून करणें; पळवणें.

**पुय (य्य) ल्** (ಪುಯ [ಯ್ಯ] ಲ್) (क) ना. – क्रोष; हाक; आरडाओरड; गोंधळ; मारामारी; युद्ध; विनंती; कथन; प्रार्थना.
—चु (ಚು) (क) धा. – आक्रोषणें; ओरडणें; हाक मारणें; विरोधणें.

**पुरः (रस्)** (ಪುರಃ [ರಸ್]) (सं) अ. – पुढें; समक्ष; समोर.

**पुर** (ಪುರ) (सं) ना. – शहर; नगर; घर; शरीर; किल्ला; त्रिपुर; राक्षसाचे शहर.
(क) ना. – कालवा; लहान प्रवाह; ओढा; झरा; नदी.

**पुरतः** (ಪುರತಃ) (सं) अ. – समोर; पुढ्यांत; पुढें; आधीं.

**पुरद्वार** (ಪುರದ್ವಾರ) (सं) ना. – वेश; नगरद्वार; महाद्वार.

**पुरध्वंसि** (ಪುರಧ್ವಂಸಿ) (सं) ना. – त्रिपुरासुराची नगरे जाळणारा शिव.

**पुरंदर** (ಪುರಂದರ) (सं) ना. – शिव; इंद्र.

**पुरंदरदास** (ಪುರಂದರದಾಸ) (सं) ना. – एक कन्नड महाकवि; हरिभक्त; हरदास.

**पुरंध्रि (ध्री)** (ಪುರಂಧ್ರಿ [ಧ್ರೀ]) (सं) ना. – पतिव्रता स्त्री; मानिनी; वेरड स्त्री; गिरिजनयुवती. 'बेडिति' पहा.

**पुरभित्ति** (ಪುರಭಿತ್ತಿ) (सं) ना. – गावकोट; गावचा तट; प्राकार; किल्ला.

**पुरमर्दन** (ಪುರಮರ್ದನ) (सं) ना. – त्रिपुरविनाशक शिव.

**पुरश्चरण** (ಪುರಶ್ಚರಣ) (सं) ना. – जप; नामजप; मंत्रसिद्धी.

**पुरस्कार** (ಪುರಸ್ಕಾರ) (सं) ना. – मान; मान्यता; गौरव; आदर.

**पुरस्कृत** (ಪುರಸ್ಕೃತ) (सं) वि. – गौरवित; आदरित; मान्यता पावलेला.

**पुरस्तात** (ಪುರಸ್ತಾತ) (सं) अ. – पुढें; समोर; सन्मुख.

**पुरस्सरं** (ಪುರಸ್ಸರಂ) (सं) अ. – समोर ठेवून; पुढें सरकून; समोर बसवून.
(सं) वि. – पुढें जाणारे; प्रारंभिक; पूर्वी आलेले.

**पुरहर** (ಪುರಹರ) (सं) ना. – शिव

**पुरा** (ಪುರಾ) (सं) अ. – पूर्वी; प्रथम; प्राचीन; फार काळापूर्वी;

**पुराकृत** (ಪುರಾಕೃತ) (सं) वि. – पूर्वी केलेलें; पूर्वजन्मीचें.

**पुराण** (ಪುರಾಣ) (सं) वि. जुनें; जीर्ण; वृद्धापकाळचे.
(सं) ना. – हिंदुधर्मीय कथाग्रंथ; प्राचीन काव्यग्रंथ; पुराणें.

**पुराणपुरुष** (ಪುರಾಣಪುರುಷ) (सं) ना. – देव; विष्णु; परमेश्वर; कुलदैवत; कुलपुरुष.

**पुराणवैराग्य** (ಪುರಾಣವೈರಾಗ್ಯ) (सं) ना. – क्षणिक वैराग्य; वैताग; पुराण श्रवणपुरतीं आलेली विरक्ति.

**पुराणिक** (ಪುರಾಣಿಕ) (सं) ना. – पुराण सांगणारा; कथेकरी; प्रवचनकार.

**पुरातन** (ಪುರಾತನ) (सं) वि. – पूर्वकालीन; प्राचीन; सनातन.
(सं) ना. – पंडित; विद्वान. महानुभाव; पुराणपुरुष.

**पुरारि** (ಪುರಾರಿ) (सं) ना. – शिव.

**पुरावृत** (ಪುರಾವೃತ) (सं) ना. – इतिहास; पुराण; इतिवृत्त.

**पुरि (री)** (ಪುರಿ [ರೀ]) –(सं) ना. – पट्टण; शहर; किल्ला; जगन्नाथपुरी.
(क) धा. – भाजणें; गरम करणें;
(क) ना. – भाजलेला पदार्थ; भाजणी; पिळांची दोरी; हुरूप; उत्साह; बळ; तूप सोडलेली पोळी.

**पुरिनेंण्** (ಪುರಿನೇಣ್) (क) ना. – पीळ असलेला दोर; वळीव दोरी.

**पुरीष** (ಪುರೀಷ) (सं) ना. – प्राण्याचें मलमूत्र; शेण; लेंडी; विष्ठा. 'गंजळ' पहा. बुरशी; शेवाळ.

**पुरु** (ಪುರು) (सं) वि – अधिक; जास्तीचे.
(सं) ना. – सोनें; प्राचीन राजवंश.

**पुरुकुत्स** (ಪುರುಕುತ್ಸ) (सं) ना. – एक सूर्यवंशीय राजा.

**पुरुगुट्ट (डु)** (ಪುರುಗುಟ್ಟು [ಡು]) (क) धा. फुरफुरून जळणें; जळतांना फुरफुरणें; झटकन जळणें; थरथरणें; कापणें; लटपटणें.

**पुरुड्डु** (ಪುರುಡು) (क) ना.–सार; अर्क; प्रयोजन; सामर्थ्य; स्पर्धा; असूया; मत्सर; पोटदुखी. तिरस्कार.
—**इग** (ಇಗ) (क) वि.–स्पर्धक; विरोधक; मत्सरी; ईर्षाबाज.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.–स्पर्धा करणें. ईर्षा बांधणें; पोटदुखी करणें.
**पुरुले** (ಪುರುಲೆ) (क) ना.–कृमिकीटक; रानमैना; पक्षी.
**पुरुष** (ಪುರುಷ) (सं) ना.–नर; मनुष्य; आत्मा; ब्रह्म; शिव.
**पुरुषकार** (ಪುರುಷಕಾರ) (सं) ना.–मानव प्रयत्न; उद्योग; पौरुष; शक्तीचा उपयोग.
**पुरुषत्त्व** (ಪುರುಷತ್ತ್ವ) (सं) ना.–पौरुष; पुरुषपणा; शौर्य.
**पुरुषार्थ** (ಪುರುಷಾರ್ಥ) (सं) ना.–मानवी जीवनाचें साध्य. जीवितसार्थक; (धर्म; अर्थ; काम व मोक्ष हे) चार पुरुषार्थ.
**पुरुषोत्तम** (ಪುರುಷೋತ್ತಮ) (सं) ना.–श्रेष्ठ पुरुष; परमेश्वर; विष्णु.
**पुरुहूत** (ಪುರುಹೂತ) (सं) ना.–देवेश.
**पुरुळ्** (ಪುರುಳ್) (क) ना.–अर्थ; सार; रहस्य; मर्म; सामर्थ्य; बल; योग्यता; संपत्ति; द्रव्य.
**पुरुळि** (ಪುರುಳಿ) (क) ना.–पोपट; मैना; लहान राघू.
**पुरूरव (वस्)** (ಪುರೂರವ [ವಸ್]) (सं) ना.–बुध; इलादेवीचा पुत्र; उर्वशीचा प्रियकर; विक्रमोर्वशीय नाटकाचा नायक; पोरस.
**पुरोग** (ಪುರೋಗ) (सं) ना.–पुढें जाणारा; नायक; पुढारी; नेता.
**पुरोगति** (ಪುರೋಗತಿ) (सं) ना.–प्रस्तावना; अनुयायी; कुत्रा.
**पुरोगमन** (ಪುರೋಗಮನ) (सं) ना.–पुढें जाणें; प्रगति; विकास.
**पुरोगामि** (ಪುರೋಗಾಮಿ) (सं) ना.–पुढें जाणारा; नायक; नेता; विकासशील.
**पुरोडाश** (ಪುರೋಡಾಶ) (सं) ना.–यज्ञांतील आहुती; चरू.
**पुरोध (धस्)** (ಪುರೋಧ [ಧಸ್]) (सं) ना.–कुलपुरोहित; कुलगुरु; राजपुरोहित; राजगुरु.
**पुरोधिका** (ಪುರೋಧಿಕಾ) (सं) ना.–प्रिय पत्नी; भार्या.
**पुरोभाग** (ಪುರೋಭಾಗ) (सं) ना.–पुढचा भाग; मुख्य भाग; मत्सर; अविवेक; धृष्टता; दोषैक दृष्टि.
**पुरोभागि** (ಪುರೋಭಾಗಿ) (सं) वि.–अविश्वासी; अप्रामाणिक; धृष्ट; मत्सरी; साहसी; अविवेकी.
**पुरोहित** (ಪುರೋಹಿತ) (सं) ना.–मंगल कार्ये चालवणारा; धार्मिक दीक्षा देणारा.
**पुर्कु** (ಪುರ್ಕು) (क) वि.–भित्रा; नंपूसक; भेकट; भीतिग्रस्त; तिरस्कृत.
**पुर्चु** (ಪುರ್ಚು) (क) ना.–खुळेपणा; तोटा; नुकसान; अकल्याण; त्रास; ताप.
**पुर्बु** (ಪುರ್ಬು) (क) ना.–भुवई; भू.
—**इक्कु** (ಇಕ್ಕು) (क) धा.–कपाळीं आठ्या घालणें; भुवई चढवणें; भुवई चढवून भिववणें.
**पुल्** (ಪುಲ್) (क) ना.–गवत; करड.
(क) वि.–क्षुद्र; नीच; अप्रयोजक.
—**कर्चु** (ಕರ್ಚು) (क) धा.–दाती तृण धरणें; पराभव मान्य करणें.
**पुलक** (ಪುಲಕ) (सं) ना.–रोमांच; अंगावरील काटा.
**पुलकित** (ಪುಲಕಿತ) (सं) वि.–रोमांचित; आनंदानें बेभान.
**पुलस्त्य** (ಪುಲಸ್ತ್ಯ) (सं) ना.–ब्रह्म देवाचा मानसपुत्र; सप्तर्षीपैकी एक ऋषि; रावणाचा आजा.
**पुलाक** (ಪುಲಾಕ) (सं) ना.–पुलावा; खिचडी.
**पुलि** (ಪುಲಿ) (क) ना.–वाघ; व्याघ्र; एक तृणविशेष.
**पुलि (ळि) न** (ಪುಲಿ [ಳಿ] ನ) (सं) ना.–वाळु; वाळवंट; पुळणी; किनारा; नदीकाठ.
—**वति** (ವತಿ) (सं) ना.–तटिनी; नदी.
**पुलिंद (ळिंद)** (ಪುಲಿಂದ [ಳಿಂದ]) (सं) ना.–गिरिजन; शबर; बेरड; शबरवेषातील शंकर.
**पुलिं (ळिं) दी** (ಪುಲಿಂ [ಳಿಂ] ದಿ)) (सं) ना.–भिल्लीण; शबरी; बेरडीण; गिरिजन स्त्री.
**पुलु** (ಪುಲು) (क) ना.–गवत; तृण; घास.
(क) वि.–अल्प; क्षुल्लक; थोडकें.
—**मानिस** (ಮಾನಿಸ) (क) ना.–क्षुद्रजीव; नीच माणूस; बेकार.
**पुलुमनुज** (ಪುಲುಮನುಜ) (क) ना.–क्षुद्र मानव; क्षुद्र जात; अल्पात्मा.
**पुलोम** (ಪುಲೋಮ) (सं) ना.–इंद्राचा सासरा; शचीपिता.
—**जित** (ಜಿತ) (सं) ना.–पुलोमाला जिंकणारा; इंद्र.
—**जे, –जा** (ಜೆ–ಜಾ) (सं) ना.–इंद्राणी; शची; पुलोमकन्या.
**पुलगर्चु** (ಪುಲ್ಗರ್ಚು) (क) धा.–दाती तृण धरणें; पराभव मान्य करणें.
**पुलग (ल्क) डग** (ಪುಲ್ಗ [ಲ್ಕ] ಡಗ) (क) ना.–प्रतिज्ञाकंकण; पिंजराचा तोडा.
**पुलेबगे** (ಪುಲ್ಲೆಬಗೆ) (क) धा.–कस्पटासमान मानणें; क्षुद्र लेखणें.
**पुलमरुळ्** (ಪುಲ್ಮರುಳ್) (क) ना.–क्षुद्र पिशाच; लहान भूत.
**पुलमेवु** (ಪುಲ್ಮೇವು) (क) ना.–गवतकाडी; चारा; वैरण; कडबा; वनचर प्राणी.
**पुल्ल** (ಪುಲ್ಲ) (क) वि.–विकसित; फुललेले; उमललेलें.

**पुल्लडिगिन्ति** | (ಪುಲ್ಲಡಿಗಿತ್ತಿ) (क) ना.—फुलें विकणारी;
**पुल्लवडिगिन्ति** | (ಪುಲ್ಲವಡಿಗಿತ್ತಿ) फुलारीण; माळीण.

**पुल्लशर** (ಪುಲ್ಲಶರ) (क) ना.—पुष्पशर; मन्मथ; मदन; कामदेव.

**पुल्लिगे** (ಪುಲ್ಲಿಗೆ) (क) ना.—फुलका; पोळी; एक खाद्य.

**पुल्लिंग** (ಪುಲ್ಲಿಂಗ) (सं) ना.—पुरुषवाचक शब्द; पुरुषवाचक चिन्ह.

**पुल्ले** (ಪುಲ್ಲೆ) (क) ना.—हरीण; मृग; चितळ; अग्नि. 'एरले' पहा.

**पुल्लेग** (ಪುಲ್ಲೆಗ) (क) वि.—थापाड्या; बडबड्या; गप्पाबाज.

**पुष्कर** (ಪುಷ್ಕರ) (सं) ना.—सोंडेचें टोक; पाणी; कमळ; आकाश; नगाऱ्याचें चामडें; हंस; खड्ग; आयुध; मुख; एक द्वीप; पर्वताचे नांव; नळराजाचा धाकटा भाऊ.

**पुष्करि** (ಪುಷ್ಕರಿ) (सं) ना.—हत्तीचे नांव.

**पुष्करिणि (णी)** (ಪುಷ್ಕರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—सरोवर; पाण्याचा साठा; बाणा; बाण्याचें सूत; पायऱ्याची विहीर; हत्तीण; मूठ.

**पुष्कल** (ಪುಷ್ಕಲ) (सं) वि.—अधिक; विपुल; खूब; श्रेष्ठ.

**पुष्ट** (ಪುಷ್ಟ) (सं) वि.—माजलेला; लठ्ठ; संमृद्ध; संपन्न; भरलेला; पूर्ण वाढ झालेला.

**पुष्टि** (ಪುಷ್ಟಿ) (सं) ना.— शक्ति; सामर्थ्य; बळ; मस्ती; समृद्धि; पुष्टावयव; शरीरसौष्ठव; आश्रय; साहाय्य.

**पुष्टिगोळिसु** (ಪುಷ್ಟಿಗೊಳಿಸು) (क) धा.—वाढ होणें; अंग धरणें; अभिव्यक्त करणें; समर्थन करणें; पुष्ट होणें.

**पुष्टिकरिसु** (ಪುಷ್ಟೀಕರಿಸು) (क) धा.—बळ एकत्र करणें; आधार देणें; बळ आणणें.

**पुष्प** (ಪುಷ್ಪ) (सं) ना.—फूल; विकास; विटाळ.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.—विकसणें; फुलणें; उमलणें; विटाळ जाणें; अंगावर जाणें.
—**इत** (ಇತ) (सं) वि.—विकसित; फुललेले; ऋतुप्राप्त.
—**माले** (ಮಾಲೆ) (सं) वि.—फुलांची माळ; वेणी; गजरा.
—**रस** (ರಸ) (सं) ना.—मध; मकरंद; फुलांतील गोड रस.
—**वति (ती)** (ವತಿ [ತೀ]) (सं) ना.—ऋतुमती; विटाळशी
—**वंत** (ವಂತ) (सं) ना.—सूर्य; चंद्र.

**पुष्पक** (ಪುಷ್ಪಕ) (सं) ना.—देवलोकीचे विमान; कुबेराचे विमान; एक विमान नाम.

**पुष्पकेतन** (ಪುಷ್ಪಕೇತನ) (सं) ना.—काम; मन्मथ; मदन.

**पुष्पचाप** (ಪುಷ್ಪಚಾಪ) (सं) ना.—काम; मदन.

**पुष्पदंत** (ಪುಷ್ಪದಂತ) (सं) ना.—वायव्येचा दिग्गज; एक जैनतीर्थंकर.

**पुष्पदर्शन** (ಪುಷ್ಪದರ್ಶನ) (सं) ना.—रजोदर्शन; पदर येणें; ऋतुप्राप्ति.

**पुष्पधन्व (वन्)** (ಪುಷ್ಪಧನ್ವ [ವನ್]) (सं) ना.—पुष्पसायक; कुसुमशर; मदन.

**पुष्पबाण** (ಪುಷ್ಪಬಾಣ) (सं) ना—कुसुमायुध; सुमनसायक; कामदेव.

**पुष्पमास** (ಪುಷ್ಪಮಾಸ) (सं) ना.—वसंत मास; चैत्र महिना; मधुमास.

**पुष्पवाटिका** (ಪುಷ್ಪವಾಟಿಕಾ) (सं) ना.—फुलबाग; उद्यान; उपवन.

**पुष्पवृष्टि** (ಪುಷ್ಪವೃಷ್ಟಿ) (सं) ना.—फुलांचा पाऊस; कुसुमवर्षाव.

**पुष्पांजलि** (ಪುಷ್ಪಾಂಜಲಿ) (सं) ना.—फुलें वाहणें; भक्तिप्रदर्शन; नांदीतील पुष्पप्रदान; गौरव.

**पुष्पिणि** (ಪುಷ್ಪಿಣಿ) (सं) ना.—फुलें सुटलेली वेल, रजस्वला; ऋतुमति, विटाळशी.

**पुष्पित** (ಪುಷ್ಪಿತ) (सं) वि.—फुलें आलेली; फुललेली; ऋतुमती; रजस्वला.

**पुष्य** (ಪುಷ್ಯ) (सं) ना.—चांद्र मासाचें नाव; एक पर्जन्यनक्षत्र.

**पुष्यराग** (ಪುಷ್ಯರಾಗ) (सं.) ना.—एक रत्न; पुष्कराग

**पुसलायिसु** (ಪುಸಲಾಯಿಸು) (क) धा.—फुस लावणें; उत्तेजित करणें; प्रेरणा देणें; हुरूप भरणें; पीळ देणें.

**पुसलावणे** (ಪುಸಲಾವಣೆ) (अ. दे) ना.—फुसलावणी; लाड; सलगी; प्रेम; प्रीति; हुरूप; उत्तेजन.

**पुसि** (ಪುಸಿ) (क) धा.—खोटें बोलणें; चूक सांगणें: थापा देणें; गप्पा मारणें.
(क) ना.—असत्य; चूक; बढाई; थाप; गप्प, व्यर्थालाप;

**पुसिग** (ಪುಸಿಗ) (क) वि.—खोटे बोलणारा; बढाई मारणारा; थापेबाज; आत्मश्लाघी.

**पुसिनगु** (ಪುಸಿನಗು) (क) ना.—वरपांगी हसे; गालातल्यागालांत हसणें.

**पुसिलज्जे** (ಪುಸಿಲಜ್ಜೆ) (क) ना.—खोटी लाज; लाजेचा बहाणा; लज्जाभिनय; मुरका; ढोंगी लज्जा.

**पुसिव (प)** डे (ಪುಸಿವ [ಪ] ಡೆ) (क) ना.—माया; सैन्य; कृतक सैन्य.

**पुस्त** (ಪುಸ್ತ) (सं) ना.—लेपन; सारवण; माखणे; चिखलातील काम; पुस्तक; हस्तलिखित.

**पुस्तक** (ಪುಸ್ತಕ) (सं) ना.—ग्रंथ; पोथी.
—**कीट** (ಕೀಟ) (सं) ना.—पुस्तकांतील किडा; न समजतां वाचत राहणारा; पांघरूण.

**पुस्ति** (ಪುಸ್ತಿ) (अ.दे.) ना.—पुस्तक; आवरण; पांघरूण; किस्ता गिरवणी.

**पुस्तिका** (ಪುಸ್ತಿಕಾ) (सं) ना.—चोपडे; आवरण.

**पुळक** (ಪುಳಕ) (सं) ना.—पुलक; रोमांच; अंगावरील केस.

—अभिषेक (ಅಭಿಷೇಕ) (सं) ना.—पूजेतील देवस्नान.

—इसु (ಇಸು) (क) धा.—रोमांच उभे राहणें; अंगावर काटा येणें; पुलकित होणें.

**पुळि** (ಪುಳಿ) (क) ना.—आंबट पदार्थ; कडू चव; आम्ल.

**पुळिंचु** (ಪುಳಿಂಚು) (क) ना.—द्रवमर्दन; लेप; सारवण.

**पुलिन** (ಪುಳಿನ) (सं) ना.—वाळूची टेकडी; द्वीप; वाळूचा किनारा; वाळवंट.

**पुळिंद** (ಪುಳಿಂದ) (सं) ना.—किरात; शबर; वन्यजमात.

**पुळिंदि** (ಪುಳಿಂದಿ) (सं) ना.—शबरी; भिल्लीण; बेरडीण. 'बेडिति' पहा.

**पुळिल्** (ಪುಳಿಲ್) (क) ना.—झाडी; राई; वाळूची टेकडी; जमीन; चौक.

**पु (हु) ळु** (ಪು [ಹು] ಳು) (क) ना.—कृमि; कीटक; क्षुद्र जंतु; जीवाणु.

**पु (हु) ळुकु** (ಪು [ಹು] ಳುಕು) (क) ना.—अडीअडचण; नड; अडीनडी; दोष; लेप.

**पुळुवानिस** } (ಪುಳುವಾನಿಸ) (क) ना.—क्षुद्र मनुष्य;
**पुळुमानिस** } (ಪುಳುಮಾನಿಸ) कस्पटासारखा माणूस अल्पात्मा.

**पुळ्गि** (ಪುಳ್ಗಿ) (क) ना.—खीर; हुग्गी; पायस; गव्हाची खीर.

**पुळ्ळि** (ಪುಳ್ಳಿ) (क) ना.—काठी; काटकी; क्षुद्रत्व.

**पुळ्ळिवातु** (ಪುಳ್ಳಿವಾತು) (क) ना.—क्षुद्र गप्पा; व्यर्थ चर्चा; कोरड्या चकाट्या.

**पुळ्गु** (ಪುಳ್ಗು) (क) धा.—जळणें; खाक होणें; राख होणें.

**पू** (ಪೂ) (क) धा.—फूल येणें; फुलणें; विकसित होणें.
(क) ना.—फूल; तुरा; मंजिरी.

—कोल (ಕೋಲ) (क) ना.—मदन; काम.

—गुडि (ಗುಡಿ) (क) ना.—पुष्पगुच्छ; तुरा; मंजिरी; गोटा.

—तंदल् (ತಂದಲ್) (क) ना.—पुष्पवृष्टि; फुलांचा पाऊस.

—बलि;—वलि (ಬಲಿ–ವಳಿ) (क) ना.—फुलवेच; रांगोळी

—वडिग (ವಡಿಗ) (क) ना.—फुलारी; फुले विकणारा.

—वडिगित्ति (ವಡಿಗಿತ್ತಿ) (क) ना.—फुलारीण; माळीण; फुले विकणारी.

**पूग** (ಪೂಗ) (सं) ना.—सुपारीचें झाड; समूह; रास. 'कौंग' पहा.

**पूगणेय** (ಪೂಗಣೆಯು) (क) ना.—काम; पुष्पबाण; मदन.

**पूगीफल** (ಪೂಗೀಫಲ) (सं) ना.—सुपारी.

**पूजक** (ಪೂಜಕ) (सं) ना.—पुजारी; आराधक; अर्चक.

**पूजन** (ಪೂಜನ) (सं) ना.—पूजा; सेवा; अर्चना; आराधना.

**पूजनीय** (ಪೂಜನೀಯು) (सं) ना.—पूज्य; पूजार्ह; आदरणीय; मानदेण्यायोग्य.

**पूजारि** (ಪೂಜಾರಿ) (सं) ना.—पूजा करणारा; अर्चक; ईशसेवक; आराधना.

**पूजार्ह** (ಪೂಜಾರ್ಹ) (सं) वि.—पूज्य; पूजनीय; पूजा करण्या-योग्य.

**पूजि** (ಪೂಜಿ) (क) ना.—शून्य; पूज. चिन्ह;

**पूजित** (ಪೂಜಿತ) (सं) वि.—सन्मानित; आदरित.

**पूजिसु** (ಪೂಜಿಸು) (क) धा.—पूजा करणें; सेवा करणें; आराधना करणें.

**पूजे (जा)** (ಪೂಜೆ [ಜಾ]) (सं) ना.—देवतार्चन; देवसेवा; आराधना.

**पूज्य** (ಪೂಜ್ಯ) (सं) वि.—पूजनीय; पूजा करण्यायोग्य. खूण; (क) ना.—खूण; पूज.

**पूज्यपाद** (ಪೂಜ್ಯಪಾದ) (सं) वि. पुजनीय; चरणसेवा करण्यायोग्य.

**पूडु** (ಪೂಡು) (क) धा.—जोडणें; जू ठेवणें; धनुष्याला बाण लावणें, संधान लावणें.

**पूण्** (ಪೂಣ್) (क) धा.—प्रतिज्ञा करणें; स्पर्धा करणें; पैज मारणें; चढाओढ करणें; भांडणें; मत्सर करणें.
(क) ना.—मान्यता; कबुली; प्रतिज्ञा; शपथ; आणभाक.

**पूणके (णिके)** (ಪೂಣ್ಕೆ [ಣಿಕೆ]) (क) ना.—आण; शपथ; पण; प्रतिज्ञा.

**पूणिग** (ಪೂಣಿಗ) (क) ना.—धनुर्धारी; प्रतिज्ञा करणारा; पण करणारा.

**पूत** (ಪೂತ) (सं) वि.—पवित्र; परिशुद्ध; स्वच्छ; निर्मल; चोख.
(क) वि.—फुललेला; मोहोरलेला.

**पूतनि** (ಪೂತನಿ) (सं) ना.—पूतना राक्षसी.

**पूति** (ಪೂತಿ)(सं) ना.—दुर्गंधि; उकीरडा; कूज; शुद्धता; स्वच्छता; पवित्रता. 'पुनुगु' पहा.

**पूतु(तुरे)** (ಪೂತು [ತುರೆ]) (क) अ.—बाप रे! वाहवा! बहुत अच्छा!

**पूदेर** (ಪೂದೇರ) (क) ना.—पुष्परथ; मन्मथ; मदन.

**पूदेरु** (ಪೂದೇರು) (क) ना.—पुष्पक विमान; पुष्परथ.

**पूप** (ಪೂಪ) (क) ना.—अपूप; वडा; घारगा; अनरसा.

**पूय** (ಪೂಯು) (सं) ना.—दुर्गंध; कुजल्याची घाण.

—मेह (ಮೇಹ) (क) ना.—मधुमेह; पू गळणारा रोग.

**पूर** (ಪೂರ) (सं) वि.—पूर्ण; पूरा; भरलेला; सर्व; ओसंडणारा; भरपूर; महापूर.

**पूरक** (ಪೂರಕ) (सं) वि.—पूर्ण करणारा; भरून देणारा; (सं) ना.—तृप्ति; प्राणायामांतोल एक श्वसनक्रम.

**प्रतिरथ** (ಪ್ರತಿರಥ) (सं) ना.—वैरी; समायुद्ध शत्रू; तुल्यबल विरोधक.

—**अप्रतिरथ** (ಅಪ್ರತಿರಥ) (सं) ना.—महावीर अजात शत्रु.

**प्रतिरव** (ಪ್ರತಿರವ) (सं) ना.—प्रतिध्वनि; पडसाद. 'मार्दनि' पहा.

**प्रतिरूप (पु)** (ಪ್ರತಿರೂಪ [ಪು]) (सं) ना.—प्रतिबिंब; पडछाया.

**प्रतिरोध** (ಪ್ರತಿರೋಧ) (सं) ना.—विरोध; निग्रह; हरकत; संकट; वेढा.

**प्रतिलोम** (ಪ್ರತಿಲೋಮ) (सं) वि.—व्युत्क्रम; क्रमविरोध; उच्चवर्णी स्त्रीचा नीचवर्णी वराशीं विवाह; अदलाबदल.

—**विवाह** (ವಿವಾಹ) (सं) ना.—उच्चवर्ण स्त्रीनें अधमजातीय पुरुषाशीं केलेलें लग्न.

**प्रतिवचन** (ಪ್ರತಿವಚನ) (सं) ना.—प्रत्युत्तर; उलट जबाब; आक्षेप.

**प्रतिवातं** (ಪ್ರತಿವಾತಂ) (सं) अ.—विरुद्ध दिशेनें जाऊन; उलट्या वाऱ्यानें.

(सं) ना.—उलटा वारा.

**प्रतिवादि** (ಪ್ರತಿವಾದಿ) (सं) ना.—प्रतिपक्षी; विरोधी; युद्धाला उभा ठाकलेला; सामनेवाला; शत्रु.

—**भयंकर** (ಭಯಂಕರ) (सं) ना.—शत्रुंजय; विरोधकांना धूळ चारणारा.

**प्रतिवार्ते** (ಪ್ರತಿವಾರ್ತೆ) (सं) ना—प्रत्युत्तर; बातमी; समाचार.

**प्रतिश्रय** (ಪ್ರತಿಶ್ರಯ) (सं) ना. यज्ञशाळा; यागभूमि; आश्रय; आधार; सभा; अभयवचन; साह्य.

**प्रतिश्रव** (ಪ್ರತಿಶ್ರವ) (सं) ना.—प्रतिध्वनि; समेट; अभिवचन.

**प्रतिश्रुत** (ಪ್ರತಿಶ್ರುತ) (सं) वि.—प्रतिज्ञा; प्रतिज्ञित; अभिवचन दिलेला; अंगीकृत; स्वीकारलेला; कबूली दिलेला.

**प्रतिषिद्ध** (ಪ್ರತಿಷಿದ್ಧ) (सं) ना.—निषिद्ध; क्रमविरुद्ध; रीतिबाह्य.

**प्रतिषेध** (ಪ್ರತಿಷೇಧ) (सं) ना.—निषेध; विरोध; अमान्यता; नाकबुली.

**प्रतिष्ठा** (ಪ್ರತಿಷ್ಠಾ) (सं) ना.—मोठेपणा; गौरव; कीर्तिमानता; स्थापना; उद्यापन; घनता.

**प्रतिष्ठालु** (ಪ್ರತಿಷ್ಠಾಲು) (सं) वि.—प्रतिष्ठाप्रिय; गौरवपूर्ण; लौकिकवान.

**प्रतिसंहार** (ಪ್ರತಿಸಂಹಾರ) (सं) ना.—विमोचन; संक्षेप; बलसंपन्नता; ज्ञातता; आधीनता.

**प्रतिसंधान** (ಪ್ರತಿಸಂಧಾನ) (सं) ना.—जुळणी; संमिश्रण; संक्रांतसमय; आत्मनियमन; उद्देश; उपाय; स्तुति; ठोशास ठोसा; योजना.

**प्रतिसारण** (ಪ್ರತಿಸಾರಣ) (सं) ना.—दूरीकरण; सुटका; वियोग; जखमपट्टी.

**प्रतिसारित** (ಪ್ರತಿಸಾರಿತ) (सं) वि.—अलग केलेलें; दूर सारलेलें; मलमपट्टी केलेलें.

**प्रतिसृष्ट** (ಪ್ರತಿಸೃಷ್ಟ) (सं) वि.—बाहेर घातलेलें; हाकललेलें; तिरस्कृत; शृंगारित; उन्मत्त; परतून लावलेलें.

**प्रतिसृष्टि** (ಪ್ರತಿಸೃಷ್ಟಿ) (सं) ना.—विश्वामित्री सृष्टि.

**प्रतिस्वर (न)** (ಪ್ರತಿಸ್ವರ [ನ]) (सं) ना.—प्रतिध्वनि; पडसाद.

**प्रतिहत** (ಪ್ರತಿಹತ) (सं) वि.—विरोध केलेलें; हरकत घेतलेलें; दिलेलें; पराभूत; अपमानित.

**प्रति (ती) हार** (ಪ್ರತಿ [ತೀ] ಹಾರ) (सं) ना.—दरवाजा; प्रहरी; पहारेकरी; द्वारपाल.

**प्रतिहारिणि** (ಪ್ರತಿಹಾರಿಣಿ) (सं) ना.—'प्रतिहार' पहा. वेत्रवती, चौकीदारीण; पहारेकरीण.

**प्रतिहिंसे** (ಪ್ರತಿಹಿಂಸೆ) (सं) ना.—सूड; आकस; खुनशीपणा; जशास तसें.

**प्रतीक** (ಪ್ರತೀಕ) (सं) ना.—चिन्ह; खूण; प्रतिनिधि; अवयव; प्रतिमा.

**प्रतीकार** (ಪ್ರತೀಕಾರ) (सं) ना.—विरोध; प्रतिक्रिया; सूड; खुनशीपणा.

**प्रतीक्षा** (ಪ್ರತೀಕ್ಷಾ) (सं) ना.—निरीक्षण; वाट पाहणें; आशाळदृष्टि; इच्छा; आकांक्षा; भावी स्वप्न.

**प्रतीचीन** (ಪ್ರತೀಚೀನ) (सं) वि.—प्रातीच्य; पश्चिमेकडील; पाश्चात्य; पाश्चिमात्य.

**प्रतीति** (ಪ್ರತೀತಿ) (सं) ना.—अनुभव; प्रचीति; समजूत; रूढी; म्हणणें; ख्याति; विश्वास; सत्यज्ञान.

**प्रतीप** (ಪ್ರತೀಪ) (सं) ना.—उपमान व उपमेय यांची अदलाबदल; एक काव्यालंकार; प्रतिलोम; उलटापालट.

**प्रतीहार (रि)** (ಪ್ರತೀಹಾರ) [ರಿ]) (सं) ना.—द्वारपाल; चौकीदार; पहारेकरी.

**प्रत्न** (ಪ್ರತ್ನ) (सं) वि.—पुरातन; जुनेपुराणें.

**प्रत्यक् (च्)** (ಪ್ರತ್ಯಕ್ [ಚ್]) (सं) अ.—पूर्वकालीन; प्राचीन; पूर्वीचा; पश्चिमेकडील; पश्चिमेचा.

**प्रत्यक्षप्रमाण** (ಪ್ರತ್ಯಕ್ಷಪ್ರಮಾಣ) (सं) ना.—डोळ्याला दिसणारा आधार; स्वतःसिद्ध संगति.

**प्रत्यग्र** (ಪ್ರತ್ಯಗ್ರ) (सं) वि.—नवीन; नूतन; कोवळा; कोमल.

**प्रत्यंत** (ಪ್ರತ್ಯಂತ) (सं) ना.—शेजारी देश; जवळचें राष्ट्र.

**प्रत्यय** (ಪ್ರತ್ಯಯ) (सं) ना.—विश्वास; श्रद्धा; शपथ; निश्चय; कारण; अनुभव; अधीनता; रंध्र; छेद; आकार; तद्भव शब्द; कारक.

**प्रत्यर्थि** (ಪ್ರತ್ಯರ್ಥಿ) (सं) ना. – वैर; वैरी.

**प्रत्यवाय** (ಪ್ರತ್ಯವಾಯ) (सं) ना. – विरोध; हरकत; पाप; वियोग.

**प्रत्यह** (ಪ್ರತ್ಯಹ) (सं) अ. – नित्य; रोजरोज; केव्हाहि; सदोदित.

**प्रत्याख्यान** (ಪ್ರತ್ಯಾಖ್ಯಾನ) (सं) ना. – तिरस्कार; अवहेलना; निंदा; प्रत्यादेश; दूरीकरण.

**प्रत्यादिष्ट** (ಪ್ರತ್ಯಾದಿಷ್ಟ) (सं) वि. – तिरस्कृत; अपमानित; निंदित; वियुक्त.

**प्रत्याम्नाय** (ಪ್ರತ್ಯಾಮ್ನಾಯ) (सं) अ. – बद्दल; बदलून; ऐवजीं.
(सं) ना. – प्रतिनिधी म्हणून झालेली निवड.

**प्रत्याय** (ಪ್ರತ್ಯಾಯ) (सं) ना. – कर; सारा; फाळा; जकात.

**प्रत्यालीढ** (ಪ್ರತ್ಯಾಲೀಢ) (सं) ना. – शरसंधानाचा पवित्रा.

**प्रत्यायन** (ಪ್ರತ್ಯಾಯನ) (सं) ना. – सूर्यास्त; सुनेचा गृहप्रवेश. विवाह.

**प्रत्यावर्तन** (ಪ್ರತ್ಯಾವರ್ತನ) (सं) ना. – घरीं परतणें; पुनरागमन.

**प्रत्यासन्न** (ಪ್ರತ್ಯಾಸನ್ನ) (सं) वि. – लागूनचा; शेजारी; जवळचा.

**प्रत्युक्ति** (ಪ್ರತ್ಯುಕ್ತಿ) (सं) ना. – प्रत्युत्तर; उलट बोलणें; आक्षेप; तोंडाला तोंड.

**प्रत्युत्तर** (ಪ್ರತ್ಯುತ್ತರ) (सं) ना. – उलट जबाब; प्रतिवचन; उलट बोलणें; प्रत्युक्ति.

**प्रत्युत्थान** (ಪ್ರತ್ಯುತ್ಥಾನ) (सं) ना. – स्वागत; मानवंदना; आदरानें उभें राहणें.

**प्रत्युत्पन्नमति** (ಪ್ರತ್ಯುತ್ಪನ್ನಮತಿ) (सं) वि. – हजरजबाबी; प्रसंगोचित उत्तर देणारा; प्रसंगावधानी; चतुर; प्रतिभाशाली.

**प्रत्युपकार** (ಪ್ರತ್ಯುಪಕಾರ) (सं) ना. – उपकारानें केलेली फेड.

**प्रत्यूष** (ಪ್ರತ್ಯೂಷ) (सं) ना. – पहाट; प्रातःकाल; प्रभात; सकाळ; उजेडीसमय.

**प्रत्यूह** (ಪ್ರತ್ಯೂಹ) (सं) ना. – विघ्न; संकट; अडीअडचण; हरकत.

**प्रत्येक** (ಪ್ರತ್ಯೇಕ) (सं) अ. – एकेकशः; वेगळेपणें; पृथकतः.
(सं) वि. – एकेक; वेगवेगळे.

**प्रथन (थन)** (ಪ್ರಥನ [ಥ್ನ]) (सं) ना. – युद्ध; रणकंदन; सण; कीर्ति; आत्मस्तुति; बढाई; दंभ; विस्तार.

**प्रथम** (ಪ್ರಥಮ) (सं) वि. – प्रधान; मुख्य; पहिला; श्रेष्ठ; अग्रिम.

**प्रथा (थे)** (ಪ್ರಥಾ [ಥೆ]) (सं) ना. – रूढी; शृंगार; कीर्ति; घनता; पद्धति; वहिवाट.

**प्रथित** (ಪ್ರಥಿತ) (सं) वि. – प्रसिद्ध; प्रख्यात.

**प्रद** (ಪ್ರದ) (सं) वि. – देणारा; दाता, दायक.

**प्रदक्षिण (णा)** (ಪ್ರದಕ್ಷಿಣ [ಣಾ]) – (सं) ना. – देवस्थान, अश्वत्थवृक्ष, वगैरेभोवती घातलेली उजवी फेरी; वळण.

**प्रदर्शन** (ಪ್ರದರ್ಶನ) (सं) ना. – दाखवणी; सर्वांनादिसण्याजोगी वस्तूंची मांडणी; प्रेक्षणीय मांडणावळ; विवरण; सूचना.

**प्रदर्शिसु** (ಪ್ರದರ್ಶಿಸು) (क) धा. – दाखवणें; प्रदर्शन करणें; उघडें मांडून ठेवणें; विवरण करणें.

**प्रदान** (ಪ್ರದಾನ) (सं) ना. – दान; समर्पण; संभावना; बहुमान संतोष; मान्यता; घरपोंच; 'मेच्चुगे' पहा.

**प्रदायक** (ಪ್ರದಾಯಕ) (सं) वि. – देणारा; समर्पण करणारा.

**प्रदारित** (ಪ್ರದಾರಿತ) (सं) वि. – चिरलेले; फाटलेले; जीर्ण; टरकलेले; फाटके.

**प्रदीप्त** (ಪ್ರದೀಪ್ತ) (सं) वि. – पुष्कळ काळ चकाकणारा; कांतिमान; पेटलेला.

**प्रदेश** (ಪ್ರದೇಶ) (सं) ना. – स्थळ; आकाश; राज्य; राष्ट्र; भूविभाग; जमीन.

**प्रदोष** (ಪ್ರದೋಷ) (सं) ना. – तीन्हीसांज; सायंकाळ; प्रमाद; अपराध; अव्यवस्था; गडबड.
—**काल** (ಕಾಲ) (सं) ना. – रात्रीचा प्रारंभ; करकरीत संध्याकाळ.

**प्रदोह (हन)** (ಪ್ರದೋಹ [ಹನ]) (सं) ना. – दूध काढणें; दोहन; धारा पिळणें.

**प्रद्युम्न** (ಪ್ರದ್ಯುಮ್ನ) (सं) ना. – मदन; मन्मथ; कामदेव.

**प्रद्योतक** (ಪ್ರದ್ಯೋತಕ) (सं) ना. – सूर्य; प्रकाशणारा.
(सं) वि. – कांतिमान; चकाकणारा.

**प्रधन** (ಪ್ರಧನ) (सं) ना. – युद्ध; रण; नाश.

**प्रधान** (ಪ್ರಧಾನ) (सं) ना. – मंत्री; मुख्य; मालक; त्रिगुणात्मक प्रकृति.

**प्रपंच** (ಪ್ರಪಂಚ) (सं) ना. – अतिविस्तार; लोक; जगत्; संसार; विस्तार; नित्यबदल.

**प्रपंचिसु** (ಪ್ರಪಂಚಿಸು) (क) धा. – विस्तारणें; सोडविणें; खुले करणें.

**प्रपत्ति** (ಪ್ರಪತ್ತಿ) (सं) ना – आधार मागणें, आश्रययाचना; स्वागत; आधार प्राप्ति.

**प्रपद** (ಪ್ರಪದ) (सं) ना. – पायाचा शेवटचा भाग.

**प्रपन्न** (ಪ್ರಪನ್ನ) (सं) वि. – आश्रित; शरणागत; शरणार्थी.

**प्रपा** (ಪ್ರಪಾ) (सं) ना. – पाणपोई; सराई; जलशाळा.

**प्रपात** (ಪ್ರಪಾತ) (सं) ना. – जलपात; धबधबा; पर्वताचा कडा.

**प्रपितामह** (ಪ್ರಪಿತಾಮಹ) (सं) ना. – पणजोबा; आजोबाचे वडील. वडीलांचे आजोबा.

**प्रपौत्र** (ಪ್ರಪೌತ್ರ) (सं) ना.–पणतु; नातवाचा मुलगा; मुलाचा नातू.

**प्रफुल्ल** (ಪ್ರಫುಲ್ಲ) (सं) वि.–विकसित; विस्तृत; उमलेलें; रुंदावलेलें.

**प्रबंध** (ಪ್ರಬಂಧ) (सं.) ना.–रचना; बांधणी; सुसंबद्धता; विषयाची जुळणी.

**प्रबल** (ಪ್ರಬಲ) (सं) वि.–बलिष्ठ; समर्थ; शक्तिमान.

**प्रबाल** (ಪ್ರಬಾಲ) (सं.) वि.–अतिकोमल; कोवळा; अंकुरलेला. (सं) ना.–अंकुर; मोड; विद्यार्थी; राणी; प्रवाळ; तांबडा रंग. 'हवळ', पहा.

**प्रबुद्ध** (ಪ್ರಭುದ್ಧ) (सं) वि.–प्रौढ; ज्ञानी; बुद्धिमान; जागृत; विकसित; विस्तारित.

**प्रबोध (धन)** (ಪ್ರಬೋಧ [ಧನ]) (सं.) ना.–ज्ञान; जागृति; उत्तेजन; बुद्धिमत्ता; चहाडी; लावालावी.

**प्रभ (भा)** (ಪ್ರಭ [ಭಾ]) (सं.) ना.–समानता; सादृश्यता; सारखेपणा; उजेड; कांति; प्रभा.

**प्रभंजन** (ಪ್ರಭಂಜನ) (सं.) ना. मोडतोड; हवा; वावटळ; झंझावात

**प्रभव** (ಪ್ರಭವ) (सं.) ना.–एक संवत्सर; उत्पत्ति; पराक्रम; बल; उत्पत्तिस्थान; जन्म.

**प्रभा** (ಪ್ರಭಾ) (सं.) ना.–तेज; कांति; शोभा; प्रकाश; उजेड.
  **—आकर** (ಆಕರ) (सं) ना.–सूर्य.
  **—आवलि** (ಆವಳಿ) (सं) ना.–देवमूर्तींच्या मागील अलंकार; उजेड; तेजोवलय; सूर्यमंडल.
  **—मंडळ** (ಮಂಡಲ) (सं) ना.–ग्रह, नक्षत्राभोवतीचे खळें; सत्पुरुषाभोवतीचें तेजोवलय.

**प्रभात** (ಪ್ರಭಾತ) (सं) ना.–प्रातःकाल; सकाळ; उदयकाल.

**प्रभाव** (ಪ್ರಭಾವ) (सं) ना.–घनता; यश; वैभव; कीर्ति; सामर्थ्य; अधिकार; वर्चस्व; महिमा; तेज.

**प्रभावन** (ಪ್ರಭಾವನ) (सं) वि.–शक्तिमान्; बलिष्ठ; शासक.

**प्रभावना (ने)** (ಪ್ರಭಾವನಾ [ ನೆ]) (सं) ना.–प्रगटन; महत्त्व; घनता; अफवा.

**प्रभास** (ಪ್ರಭಾಸ) (सं) ना.–मनोहरता; कांति; सौंदर्य; द्वारके जवळील एक यात्रास्थळ; अष्टावसुपैकी एक.

**प्रभासनं** (ಪ್ರಭಾಸನಂ) (सं) ना.–उज्वलन; उजाळा; तेज संपादन; कांतिमानता.

**प्रभु** (ಪ್ರಭು) (सं) ना.–शक्तिमान; बलिष्ठ; सामर्थ्यवान; योग्यता; समानता; स्वामी; मालक; राजा; ब्रह्मा; विष्णु; महेश; यम.
  **—ता,–त्व** (ತಾ, –ತ್ವ) (सं) ना.–मालकी; राजेपणा; हक्क शासन.
  **—सत्ता** (ಸತ್ತಾ) (सं) ना.–राजाचा अधिकार; राजेशाही राजसरकार.

**प्रभूत** (ಪ್ರಭೂತ) (सं) वि.–पुष्कळ; अधिक; अगणित; पूर्ण; परिपक्व; उत्तम; श्रेष्ठ; लांब; उतू गेलेलें; आस्तित्वात नसलेले.
  **—वय** (ವಯಃ) (सं) ना.–प्रौढ; वृद्ध; वयस्कर; आधिक्य.
  **—वर्ष** (ವರ್ಷ) (सं) वि.–अतिप्राचीन; फारपूर्वीचे, भरतखंड.

**प्रभूति** (ಪ್ರಭೂತಿ) (सं) ना.–आधार; शक्ति; बळ; युक्ति; आरंभ; अंगत्त्व; प्रमुखता.

**प्रभृति** (ಪ್ರಭೃತಿ) (सं) अ. आदीकरून; वगैरे.
(सं) ना. श्रेष्ठ पुरुष.

**प्रभे (भा)** (ಪ್ರಭೆ [ಭಾ]) (सं) ना.–उजेड; कांति; तेज; प्रकाश; सौंदर्य.

**प्रभेद** (ಪ್ರಭೇದ) (सं) ना.–मोडतोड; चीर; सांध; व्यत्यास; वियोग; विभाग.

**प्रभ्रष्ट (ष्टे)** (ಪ್ರಭ್ರಷ್ಟ [ಷ್ಟೆ]) (सं) ना.–पतित; नीतिभ्रष्ट; डोक्यावरून खालीं लोंबणारी पुष्पमाला.

**प्रमत्त** (ಪ್ರಮತ್ತ) (सं) वि.–मस्त; माजलेला; झिंगलेला; फुगलेला; प्रमाद असलेले; चुकलेले.

**प्रमथ** (ಪ್ರಮಥ) (सं) ना.–शिवगण; शिवशरण; भक्त.

**प्रमथन** (ಪ್ರಮಥನ) (सं) ना.–चावा; खून; घाव; वध.

**प्रमथनाथ** (ಪ್ರಮಥನಾಥ) (सं) ना.–शिवशरणाचा स्वामी; गणपति; शिव.

**प्रमद** (ಪ್ರಮದ) (सं) ना.–प्यालेला; झिंगलेला; शुद्धीवर नसलेला; विकारवश; व्यग्रचित्त; अलक्षित.

**प्रम (भो) द्वन** (ಪ್ರಮ [ಮೋ] ದವನ)(सं) ना.–राजोद्यान; विलासाचे उपवन.

**प्रमदा (दे)** (ಪ್ರಮದಾ [ದೆ]) (सं) ना.–स्त्री; सुंदरी; कामिनी; मानिनी.

**प्रमा** (ಪ್ರಮಾ) (सं) ना.–शुद्धज्ञान; निश्चितज्ञान; विवेक; समज; तर्क.

**प्रमाण** (ಪ್ರಮಾಣ) (सं) ना.–माप; वजन; संख्या; गणना; सिद्धता; स्पष्टता; सत्यज्ञान; शास्त्र; कारण; कृतज्ञता; विश्वास; प्रतिज्ञा; मर्यादा; मिति.

**प्रमाणकोटि** (ಪ್ರಮಾಣಕೋಟಿ) (सं) ना.–कौरवांनी भीमाला जेथें बुडविले तो डोह; तत्त्वज्ञानाचा अन्य सिद्धांत.

**प्रमाणिक** (ಪ್ರಮಾಣಿಕ) (सं) ना.–अधिकृत; आधारयुक्त.

**प्रमातामह** (ಪ್ರಮಾತಾಮಹ) (सं) ना.–आईचे आजोबा; मातृकुलांतील पणजोबा.

**प्रमातामही** (ಪ್ರಮಾತಾಮಹೀ) (सं) ना.–आईची आजी.

**प्रमाथ** (ಪ್ರಮಾಥ) (सं) वि.–अतिदुःखी; त्रास देणारा; संकट देणारा; उत्तेजक; तोडणारा.
(सं) ना.–खून; वध; नाश; बलात्कार; गोंधळ; गडबड; कोलाहल.

**प्रमाथि** (ಪ್ರಮಾಥಿ) (सं) ना.–हत्या; काटछाट; नाश; संकटग्रस्तता; चीरफाड; ओढाताण; एक संवत्सर; पीडादायक.

**प्रमाद** (ಪ್ರಮಾದ) (सं) ना.–चूक; दोष; भ्रम; उन्माद; अजागृति; विस्मरण; बेशुद्धि; बेभानता.

**प्रमिति** (ಪ್ರಮಿತಿ) (सं) ना.–माप, परिमाण; निश्चित ज्ञान; प्रमाणोत्तर निर्णयबुद्धि.

**प्रमीति** (ಪ್ರಮೀತಿ) (सं) ना.–मृत्यु; मरण; नाश; नष्टचर्य.

**प्रमीला (ले)** (ಪ್ರಮೀಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–आळ; पेंग; झोपळुत्व; स्त्रीराज्याची राणी; अर्जुनपत्नि.

**प्रमुख** (ಪ್ರಮುಖ) (सं) वि.–मुख्य; प्रधान; महत्त्वाचा; श्रेष्ठ; प्रथमचा; समोरचा.
(सं) ना.–मुख्य; अखंड; नायक; मालक; रास; गट; समूह; लेखनारंभ.

**प्रमे (मा)** (ಪ್ರಮೆ [ಮಾ]) (सं) ना.–शुद्धज्ञान; विवेक; समज.

**प्रमेय** (ಪ್ರಮೇಯ) (सं) वि.–शासित; तुळित; अनुभूत.
(सं) ना.–विषय; पेचप्रसंग; समस्या; प्रश्न; सिद्ध करावयाची गोष्ट.

**प्रमेह** (ಪ್ರಮೇಹ) (सं) ना.–मूत्रपिंडातील रोग; मधुमेह.

**प्रमोद** (ಪ್ರಮೋದ) (सं) ना.–एक विलासोद्यान; संतोष; आनंद.

**प्रमोह** (ಪ್ರಮೋಹ) (सं) ना.–मुग्धता; भ्रांती; मूढता.
—**इत** (ಇತ) (सं) ना.–मूढ; भ्रांतिष्ट.

**प्रयत** (ಪ್ರಯತ) (सं) वि.–परिशुद्ध; आत्मसंयम असलेला; पवित्र; भक्तिपूर्ण; जितेंद्रिय; विनीत.

**प्रयत्न** (ಪ್ರಯತ್ನ) (सं) ना.–साधना; उद्योग; कष्ट; आदर; उद्यमशीलता.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.–कष्ट घेणें; उद्योग करणें; साधना करणें.

**प्रयण** (ಪ್ರಯಣ) (सं) ना.–प्रयाण; प्रवास; प्रगति; अभियोग; आरंभ; मृत्यु; मरण; परलोक प्रयाण; घोड्याची पाठ; प्राण्याचा पुढा; प्रवासातील विश्रांति.

**प्रयाग** (ಪ್ರಯಾಗ) (सं) ना.–इंद्र; घोडा; यज्ञ; गंगायमुना संगमाचे स्थान.

**प्रयाण** (ಪ್ರಯಾಣ) (सं) ना.–प्रस्थान; संचार; प्रवास; भ्रमण; अभिवृद्धि; उन्नति; अभियोग; वेढा. 'प्रयण' पहा.
—**इक** (ಇಕ) (सं) ना.–प्रवासी; संचारी.
—**क** (ಕ) (सं) ना.–प्रवास; चाल.

**प्रयास** (ಪ್ರಯಾಸ) (सं) ना.–आयास; कष्ट; थकवा; श्रम.

**प्रयुक्त** (ಪ್ರಯುಕ್ತ) (सं) अ.–कारण मूलक; कारणानें.
(सं) वि.–मिसळलेले; प्रविष्ट.

**प्रयुत** (ಪ್ರಯುತ) (सं) वि.–मिश्रित; दशलक्ष.

**प्रयुत्सु** (ಪ್ರಯುತ್ಸು) (सं) ना.–युयुत्सु; युद्धाकांक्षी लढवय्या; सैनिक; वारा; संन्यासी; इंद्र; बोकड.

**प्रयोग** (ಪ್ರಯೋಗ) (सं) ना.–वापर; परीक्षा; रूढी; प्रचीति; प्रत्यक्ष कृति; दृष्टांत; निदर्शन; अनुष्ठान; वशीकरण.

**प्रयोजक** (ಪ್ರಯೋಜಕ) (सं) वि.–उपयुक्त; प्रेरक.
(सं) वि.–कामाला लावणारा; नियोजक; नेमणूक करणारा.
—**कर्तृ** (ಕರ್ತೃ) (सं) वि.–कामात गुंतवणारा.

**प्रयोजन** (ಪ್ರಯೋಜನ) (सं) ना.–लाभ; उपयोग; अनुकूलता; उद्देश.

**प्रयोज्य** (ಪ್ರಯೋಜ್ಯ) (सं) ना.–प्रेरणा दिलेला; गुंतवलेला.
—**कर्तृ** (ಕರ್ತೃ) (सं) वि.–दुसऱ्याच्या प्रेरणेनें कार्यनिरत.

**प्ररूढ** (ಪ್ರರೂಢ) (सं) वि.–वाढलेला; मोठा झालेला; अंकुरलेला; वापरलेला.

**प्ररोह** (ಪ್ರರೋಹ) (सं) ना.–वाढ; अंकुर, उदय; उत्पत्ति.

**प्रलपन** (ಪ್ರಲಪನ) (सं) ना.–बडबड; बरळ; बकवा; रोदन; असंबद्ध वाक्सरणी.

**प्रलपिसु** (ಪ್ರಲಪಿಸು) (क) धा.–बडबडणें; प्रलापणें; रडणें; बरळणें; असंबद्ध बोलणें.

**प्रलंब** (ಪ್ರಲಂಬ) (सं) वि.–लोंबणारे; टांगते; नावाला कारण; मंद; दाट.
(सं) ना.–आधार; अवलंबन; गळ्यात लोंबणारी माळ; कंठाभरण; ऊर; सासरा; एक राक्षस.

**प्रलंबघ्न** (ಪ್ರಲಂಬಘ್ನ) (सं) ना.–प्रलंब राक्षसाला मारणारा; बलराम.

**प्रलंभ** (ಪ್ರಲಂಭ) (सं) ना.–लाभ; आदाय; वंचना; फसवणूक; कपट.

**प्रलय** (ಪ್ರಲಯ) (सं) ना.–जगद्विनाश; सर्वनाश; ब्रह्मदेवाचा एक दिवस; मरण; मूर्च्छा; भ्रम; मंत्र; रहस्य.

**प्रलाप** (ಪ್ರಲಾಪ) (सं) ना.–रोदन; रडें; दुःख; बरळ; बकवा; गोंधळ; हाक.

**प्रलोभ** (ಪ್ರಲೋಭ) (सं) ना.–अतिआशा; काम; दुराशा; भोगापेक्षा; आकर्षण.

**प्रवग** (ಪ್ರವಗ) (सं) ना.–माकड; कपि; बेडुक; प्लवंग.

**प्रवचन** (ಪ್ರವಚನ) (सं) ना.–अर्थविवरण; उत्तम भाषण; योग्य निरूपण; वेदार्थज्ञान; उत्तम उपासना.

**प्रवण** (ಪ್ರವಣ) (सं) वि.–वाकलेले; कललेले भक्तिपूर्ण; श्रेष्ठ;

मुख्य; विनम्र; आतुर; सिद्ध; वश; शेवटचा; झिजलेला; वापरलेला; मुक्त मनाचा.

(सं) ना. – चवाठा; चौक; हनुवटीच्या खालचा भाग.

**प्रवर** (ಪ್ರವರ) (सं) वि. – श्रेष्ठ; उन्नत; मुख्य.

(सं) ना. – गोत्र; वंश; संतती; कुलपूर्वज; वंशातील प्रमुखव्यक्ति.

**प्रवर्तक** (ಪ್ರವರ್ತಕ) (सं) ना. – प्रेरक; गुंतवणारा; प्रारंभ करणारा; चालना देणारा; मूळपुरुष.

**प्रवर्तन** (ಪ್ರವರ್ತನ) (सं) ना. – गुणधर्म; स्वभाव; प्रवाह; वार्ता; समाचार; पुढाकार; कार्यवाहन; कार्यस्वीकार.

**प्रवर्धन** (ಪ್ರವರ್ಧನ) (सं) ना. – वाढ; अभिवृद्धि; प्रगति.

**प्रवर्धमान** (ಪ್ರವರ್ಧಮಾನ) (सं) वि. – वाढते; वाढावू; प्रगतिशील; पुरोगामी.

**प्रवर्ष (र्षण)** (ಪ್ರವರ್ಷ [ರ್ಷಣ]) (सं) ना. – अतिवृष्टि; पावसाळ्याचा प्रारंभ; पावसाची झड.

**प्रवह** (ಪ್ರವಹ) (सं) ना. – प्रवाह; वायु; सप्त मरुतांपैकी एक.

**प्रवहण** (ಪ್ರವಹಣ) (सं) ना. – पडदा घातलेली पालखी; मेणा; रथ; गाडी; जहाज; वाहन.

**प्रवहिसु** (ಪ್ರವಹಿಸು) (क) धा. – वाहणें; पुढें चालू होणें.

**प्रवहि (ही)** (ಪ್ರವಹಿ [ಹೀ]) (सं) ना. – उखाणा; प्रहेलिका; कोडे; कूटप्रश्न; यक्षप्रश्न; गूढ; पेचप्रश्न.

**प्रवाणि (णी)** (ಪ್ರವಾಣಿ [ಣೀ]) (सं) ना. – विणकराच्या मागाचा आवाज.

**प्रवाद** (ಪ್ರವಾದ) (सं) ना. – उडत आलेली बातमी; बाजारगप्प; अफवा; ऐकीव बातमी; भविष्य कथन; संभाषण शब्द; ध्वनि; आव्हान.

**प्रवादि** (ಪ್ರವಾದಿ) (सं) ना. – भविष्यवादी; ज्योतिषी; देवऋषि.

**प्रवाल (ळ)** (ಪ್ರವಾಲ [ಳ]) (सं) ना. – पोवळे; विद्रुम.

**प्रवास** (ಪ್ರವಾಸ) (सं) ना. – संचार; दूरदेशी जाणें; पर्यटण; प्रयाण; परदेशगमन.

**प्रवासन** (ಪ್ರವಾಸನ) (सं) ना. – देशांतर; दूरदेशीं राहणें; देशत्याग; हिंसा; खून.

**प्रवासि** (ಪ್ರವಾಸಿ) (सं) ना. – प्रयाणिक; भटक्या; देशांतर संचारी; घुमक्कड.

**प्रवाह** (ಪ್ರವಾಹ) (सं) ना. – जलस्रोत; पाझर; जलप्रवहन.

**प्रवाहि** (ಪ್ರವಾಹಿ) (सं) वि. – पाझरणारा; वाहतां; वाहणारा

—**पदार्थ** (ಪದಾರ್ಥ) (सं) ना. – जल; द्रव; पातळ जिन्नस.

**प्रविष्ट** (ಪ್ರವಿಷ್ಟ) (सं) वि. – आंत घुसलेले; प्रवेश मिळालेले; शिरलेले.

—**क** (ಕ) (सं) ना. – रंगभूमीवरील आगमन; पात्रांचा प्रवेश.

**प्रवीण** (ಪ್ರವೀಣ) (सं) वि. – निपुण; कुशल; जाणता; मुरलेला; अनुभविक.

**प्रवीर** (ಪ್ರವೀರ) (सं) ना. – शूर; महावीर; योद्धा; नीलध्वजाचा पुत्र.

**प्रवृत** (ಪ್ರವೃತ) (सं) वि. – निवडलेला; निर्धारित; पसंत.

**प्रवृत्त** (ಪ್ರವೃತ್ತ) (सं) वि. – आरंभलेला; गुंतलेला; मिसळला जाणारा; सिद्ध; निर्विवाद; उद्देशित.

(सं) ना. – गोल आभरण; कंकणाकृति दागिना.

**प्रवृत्ति** (ಪ್ರವೃತ್ತಿ) (सं) ना. – पुरोगमन; कल; प्रगति; उन्नति; दर्शन; प्रारंभ; संबंध; वर्तन; आचार; नियोजन; शब्द संयोजन; सुस्पष्टता; चळवळ; चिन्ह; आसक्ति; कौशल्य; समाचार; शासन संपर्क; दैव; मदस्राव; उज्जयिनी.

—**ज्ञ** (ಜ್ಞ) (सं) ना. – गूढाचार.

**प्रवृत्तिमार्ग** (ಪ್ರವೃತ್ತಿಮಾರ್ಗ) (क) ना. – कर्ममार्ग; ऐहिक वस्तुसंपादनाचा उपाय.

**प्रवृद्ध** (ಪ್ರವೃದ್ಧ) (सं) वि. – पूर्ण वाढलेलें; विस्तृत; संपूर्ण; खोल; अविनीत; उद्धट; हिंसक.

**प्रवृद्धि** (ಪ್ರವೃದ್ಧಿ) (सं) ना. – अभिवृद्धि; अभ्युदय; उन्नति; वाढ; उद्धार; उच्चता; संभावना; बहुमान.

**प्रवेश** (ಪ್ರವೇಶ) (सं) ना. – शिरकाव; अंतर्गमन; रंगभूमीवरील आगमन; उत्पन्न; प्राप्ति; आदाय; संबंध.

—**इसु** (ಇಸು) (क) धा. – आत जाणें; प्रवेशणें.

**प्रवेशक** (ಪ್ರವೇಶಕ) (सं) ना. – उपकथेतील पात्रांचा संवाद; रंगसूचना; नांदी; पूर्वरंग.

**प्रव्रज्य** (ಪ್ರವ್ರಜ್ಯ) (सं) वि. – धर्मोपदेशार्थ संचार; देशयात्री; गावोगाव फिरणारा.

**प्रव्रजक** (ಪ್ರವ್ರಜಕ) (सं) ना. – परिव्राजक; संन्यासी; धर्मोपदेशक; धर्मप्रचारक; महंत.

**प्रशंसा (से)** (ಪ್ರಶಂಸಾ [ಸೆ]) (सं) ना. – वर्णन; वाखाणणी; स्तुति; तारीफ; नावाजी.

**प्रशंशिसु** (ಪ್ರಶಂಶಿಸು) (क) धा. – वाखाणणें; नांवाजणें; स्तवणें; वानणें.

**प्रशम (मन)** (ಪ್ರಶಮ [ಮನ]) (सं) ना. – शांति; समाधान; विराम; उतार; क्षीणता.

**प्रशस्त** (ಪ್ರಶಸ್ತ) (सं) वि. – वाखाणलेला; स्तुत्य; अनुकूल; उत्तम.

**प्रशांत** (ಪ್ರಶಾಂತ) (सं) वि. – अत्यंत शांत; स्तब्ध; नीरव; मृत; संयमित; समाप्त; शेवट गाठलेला.

**प्रश्न** (ಪ್ರಶ್ನ) (सं) ना. – विचारणा; चर्चा; वाटाघाट.

—**अर्थक** (ಅರ್ಥಕ) (सं) वि. – प्रश्नसंबंधी; विचारणा करणारा.

—उत्तर (ಉತ್ತರ) (सं) ना.—संवाद; संभाषण.
**प्रश्रय** (ಪ್ರಶ್ರಯ) (सं) ना.—औदार्य; विनय; आदर; प्रीति; घनता; शुद्धता; सूतक.
**प्रष्ठ** (ಪ್ರಷ್ಠ) (सं) वि.—उत्कृष्ट; उत्तम.
(सं) ना.—पुढारी; नेता.
**प्रसक्त** (ಪ್ರಸಕ್ತ) (सं) वि.—आरंभित; मान्य; प्रस्तुत; आसक्त; संदर्भ; योग्य; जुळवून घेतलेला; स्वीकृत.
**प्रसक्ति** (ಪ್ರಸಕ್ತಿ) (सं) ना.—विषयारंभ; प्रारंभ; संदर्भ; प्रसंग; आसक्ति; अनुमति.
**प्रसंग** (ಪ್ರಸಂಗ) (सं) ना.—संदर्भ; समय; विषय; संगति; विवेचन; आपत्ति; संभाषण.
—वश (ವಶ) (सं) वि.—प्रसंगानुरूप; वेळेला जुळणारे; कालयोग्य.
**प्रसन्न** (ಪ್ರಸನ್ನ) (सं) वि.—स्वच्छ; स्पष्ट; निर्मल; चोख; तृप्त; संतुष्ट; दयामय; प्रेमळ.
—चित्त (ಚಿತ್ತ) संतुष्ट; आनंदी; हर्षित.
—ता,—ते (ತಾ, ತೆ) (सं) ना.—करुणा; दया; तृप्ति; समाधान; निर्मळता; उजेड.
—मुख (ಮುಖ) (सं) वि.—हास्यमुख; आनंदी चेहरा असलेला; हसतवदन.
—सलिल (ಸಲಿಲ) (सं) ना.—झुळझुळणारे पाणी; शांत, लहरीदार, स्वछ, पाणी.
**प्रसभं** (ಪ್ರಸಭಂ) (सं) अ.—वेगानें; आवेशानें; झटकन.
(सं) ना.—तीव्रता; वेग; आवेश; बलात्कार.
**प्रसर** (ಪ್ರಸರ) (सं) ना.—दुकान; समूह; रास; विस्तार; रुंदी; वेग; प्रवाह; प्रीति.
**प्रसरण** (ಪ್ರಸರಣ) (सं) ना.—विस्तार; उद्भव; फैलाव; पसारा.
**प्रसरिणि (णी)** (ಪ್ರಸರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—शत्रूला घातलेला वेरा.
**प्रसरिसु** (ಪ್ರಸರಿಸು) (क) धा.—पसरणें; वाढणें; विस्तारणें.
**प्रसव (वन)** (ಪ್ರಸವ [ವನ]) (सं) ना.—बाळंतपण; उद्भवन; प्रजनन; सृजन; फूल; विकास; उमलन.
—वेदना (ने) (ವೇದನಾ [ನೆ]) (सं) ना.—वेणा; प्रसूतिवेदना; बाळंतपणाच्या कळा.
—सुखप्रसव (ಸುಖಪ್ರಸವ) (सं) ना.—सहज बाळंतपण; सुलभ प्रसूती.
**प्रसविसु** (ಪ್ರಸವಿಸು) (क) धा.—बाळंत होणें; जन्म घेणें.
**प्रसवित्री** (ಪ್ರಸವಿತ್ರೀ) (सं) ना.—जन्मदात्री; जननी; बाळंतीण; आई.
**प्रसह** (ಪ್ರಸಹ) (सं) ना.—सहनशीलता; वन्य पशुपक्षी; विरोध; निरोध.
**प्रसाद** (ಪ್ರಸಾದ) (सं) ना.—अनुग्रह; कृपा; थोरांचे उच्छिष्ट; प्रसाद म्हणून दिलेली देणगी; एक काव्यगुण.
**प्रसादने** (ಪ್ರಸಾದನೆ) (सं) ना.—गुरुजनांची सेवा; अनुसरण; पूजा; शुद्धीकरण; उपकृति; समाधान; तृप्ति; शांति.
**प्रसादिसु** (ಪ್ರಸಾದಿಸು) (क) धा.—अनुग्रह करणें; दया दाखवणें; प्रसाद देणें.
**प्रसाधन** (ಪ್ರಸಾಧನ) (सं) ना.—अलंकार; शृंगार; थाटमाट; नटवेपणा; नट्टापट्टा.
—विधि (ವಿಧಿ) (सं) ना.—साजशृंगार; अलंकारक्रिया.
**प्रसाधना (ने)** (ಪ್ರಸಾಧನಾ [ನೆ]) (सं) ना.—शृंगार; डामडौल; ऐट; अलंकार; अलंकरण; निर्मलता.
**प्रसाधित** (ಪ್ರಸಾಧಿತ) (सं) वि.—शुद्ध; निर्मल; अलंकृत; सुशोभित.
**प्रसार** (ಪ್ರಸಾರ) (सं) ना.—वाढ; प्रचार; पसारा.
**प्रसारण** (ಪ್ರಸಾರಣ) (सं) ना.—प्रदर्शन; पुरोगमन; चाचपड.
**प्रसिद्ध** (ಪ್ರಸಿದ್ಧ) (सं) वि.—कीर्तिशाली; विख्यात; विश्रुत; लौकिकवान्.
**प्रसिद्धि** (ಪ್ರಸಿದ್ಧಿ) (सं) ना.—प्रख्याति; कीर्ति; प्रगटन; साधना; अलंकृति; जय.
**प्रसूका (के)** (ಪ್ರಸೂಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—घोडी; अश्वी.
**प्रसूत** (ಪ್ರಸೂತ) (सं) वि.—जन्म दिलेली; बाळंत झालेली; जनित; हळजलेली.
**प्रसूति (तिका)** (ಪ್ರಸೂತಿ [ತಿಕಾ]) (सं) ना.—बाळंतपण; जनन; वीण; निर्मिती; संतान; वंश.
—गृह (ಗೃಹ) (सं) ना.—बाळंतघर.
—वैराग्य (ವೈರಾಗ್ಯ) (सं) ना.—क्षणिक वैराग्य; तात्पुरती निवृत्ति.
**प्रसूते (ता) तिके** (ಪ್ರಸೂತೆ [ತಾ] ತಿಕೆ) (सं) ना.—बाळंतीण; जननी; जन्मदात्री.
**प्रसून** (ಪ್ರಸೂನ) (सं) ना.—पालवी; कळी; फूल; फळ.
**प्रसृति** (ಪ್ರಸೃತಿ) (सं) ना.—अंजली; पसा; ओंजळ; पसरण.
**प्रसृमर** (ಪ್ರಸೃಮರ) (सं) वि.—झिरपणारे; ठिबकणारे; गळणारे; पाझरणारे.
**प्रस्तर** (ಪ್ರಸ್ತರ) (सं) ना.—दगड; अस्तर; थर; पदर; अंथरूण; शिखर; पाला; पुष्पशय्या; अमोल रत्न.
**प्रस्तरिसु** (ಪ್ರಸ್ತರಿಸು) (क) धा.—फेकणें; पसरणें.
**प्रस्तार** (ಪ್ರಸ್ತಾರ) (सं) ना.—संगीतातील लघुगुरु मात्रांचेभेद चिन्हित करणें; प्रसार; विस्तार; परिपाठी.
**प्रस्ताव (प)** (ಪ್ರಸ್ತಾವ [ಪ]) (सं) ना.—आरंभ; पुरोगमन संदर्भ; प्रसंग; विचार; चर्चा; बातमी; ठराव.

—इसु (ಇಸು) (क) धा.—चर्चेला प्रारंभ करणें; विषयारंभ करणें.

—ने (ना) (ನೆ [ನಾ]) (सं) ना.—उपोद्घात; पीठिका; पूर्वनिवेदन; मृदुबोल.

**प्रस्तुत** (ಪ್ರಸ್ತುತ) (सं) वि.—प्रारंभीचें; प्रासंगिक; चालू; आताचें; संदर्भानुसार; तात्कालिक.

—अंकुर (ಅಂಕುರ) (सं) ना.—एक काव्यालंकार.

**प्रस्थ** (ಪ್ರಸ್ಥ) (सं) ना.—मंगल कार्य; समाराधना; सार्वजनिक भोजनप्रसंग.

**प्रस्था** (ಪ್ರಸ್ಥಾ) (सं) ना.—पठार; पर्वतशिखरावरील सपाटी; शिखर; पाला; एक परिमाण; विस्तार; वजन.

**प्रस्थान** (ಪ್ರಸ್ಥಾನ) (सं) ना.—चाल; चालण्याची ढब; रीत; पद्धति; रूढी; लोटांगण; उच्चाटण; हल्ला; मृत्यु प्रयाणाचें सामान; क्षुद्र नाटक.

**प्रस्थापना (ने)** (ಪ್ರಸ್ಥಾಪನಾ [ನೆ]) (सं) ना.—सिद्धांत; पाया; ब्रीद; स्थापना.

**प्रस्थापिसु** (ಪ್ರಸ್ಥಾಪಿಸು) (क) धा.—सिद्ध करणें; पटवून देणें; निघणें; प्रतिष्ठापना करणें.

**प्रस्नुषा** (ಪ್ರಸ್ನುಷಾ) (सं) ना.—वडील मुलाची पत्नी; वडील सून.

**प्रस्फुट** (ಪ್ರಸ್ಫುಟ) (सं) वि.—अतिस्पष्ट; चोहीकडे पसरलेली; निश्चित.

**प्रस्रव (वण)** (ಪ್ರಸ್ರವ [ವಣ]) (सं) ना.—प्रसार; जलपात; धबधबा; प्रवाह; ओढा; लहान नदी.

**प्रस्वेद** (ಪ್ರಸ್ವೇದ) (सं) ना.—घाम; घर्म; श्रमबिंदु.

—जल (ಜಲ) (सं) ना.—घामाची धार.

**प्रहर** (ಪ್ರಹರ) (सं) ना.—तीन तासांचा अवधी; टोला; घाव; मार.

**प्रहरण** (ಪ್ರಹರಣ) (सं) ना.—घाव; टोला; आयुध शस्त्र;

**प्रहरि** (ಪ್ರಹರಿ) (सं) ना.—पहारेकरी; द्वारपाळ; देवडीवाला; पाळीचे पहारेकरी.

**प्रहर्ष** (ಪ್ರಹರ್ಷ) (सं) ना.—अतिसंतोष; लिंगोत्थापन; एक राक्षस.

**प्रहर्षण** (ಪ್ರಹರ್ಷಣ) (सं) ना.—आत्यंतिक तृप्ति; समाधान; आनंद.

**प्रहसन** (ಪ್ರಹಸನ) (सं) ना.—हास्यरसप्रधानरूपक; विनोदी नाटक; फार्स; हशा; प्रचंड विनोद.

**प्रहस्त** (ಪ್ರಹಸ್ತ) (सं) ना.—पसरलेला हात; रावणाचा सेनानी; मंत्री.

**प्रहार** (ಪ್ರಹಾರ) (सं) ना.—मार; घाव; पेट; फेक.

**प्रहास** (ಪ್ರಹಾಸ) (सं) ना.—अट्टाहास; कुचेष्टा; तिरस्कार; मर्माघात; नर्तक; नट; दर्शन उणीव; शिव; तीर्थ.

**प्रहित** (ಪ್ರಹಿತ) (सं) वि.—ठेवलेले; पाठवलेले; विस्तृत; योग्य; रचित; नियुक्त; जुळणारे.

**प्रहुत** (ಪ್ರಹುತ) (सं) वि.—बडवलेले; मारलेले; जखम केलेलें; आहुति दिलेलें.

(सं) ना.—दैनंदिन यज्ञ; वैश्वदेव.

**प्रहृष्ट** (ಪ್ರಹೃಷ್ಟ) (सं) ना.—अति संतुष्ट; संतुष्ट; संतृप्त.

**प्रहृष्टक** (ಪ್ರಹೃಷ್ಟಕ) (सं) ना.—काक; कावळा.

**प्रहेलिका** (ಪ್ರಹೇಲಿಕಾ) (सं) ना.—समस्या; उखाणा; कोडें; कूट प्रश्न.

**प्रऱ्हाद** (ಪ್ರಹ್ಲಾದ) (सं) ना.—प्रल्हाद; संतोष; आनंद; तृप्ति.

**प्रल्हाद** (ಪ್ರಹ್ಲಾದ) (सं) ना.—संतोष; हिरण्यकश्यपूचा पुत्र.

**प्रळय** (ಪ್ರಳಯ) (सं) ना.—प्रलय.

**प्रांशु** (ಪ್ರಾಂಶು) (सं) वि.—उन्नत; उंच; उंच मनुष्य.

**प्राक् (च्)** (ಪ್ರಾಕ್ [ಚ್]) (सं) वि;—पूर्वीचा; मागील; जुना; (सं) ना.—पूर्व प्रथम.

—कृत (ಕೃತ) (सं) ना.—पूर्वजन्मी केलेलें; प्राक्तन.

**प्राकाम्य** (ಪ್ರಾಕಾಮ್ಯ) (सं) ना.—अष्टसिद्धीपैकी एक; इष्टार्थ प्राप्ति; प्रकृष्टता.

**प्राकार** (ಪ್ರಾಕಾರ) (सं) ना.—आवार; तट; वई; पोवळीं; कुंपण; कंपाउंड.

**प्राकृत (ता)** (ಪ್ರಾಕೃತ [ತಾ]) (सं) वि.—मूळरूपी; स्वाभाविक; नीच; क्षुद्र; पामर; हलका; सामान्य; साधा; असंस्कृत; (सं) ना. प्राकृत भाषा; जनवाणी.

—अरि (ಅರಿ) (सं) ना.—जन्मशत्रु; शेजार; राष्ट्रावर सत्ता गाजवणारा.

—मित्र (ಮಿತ್ರ) (सं) ना.—स्वभावमित्र; सहजस्नेही.

**प्राकृतिक** (ಪ್ರಾಕೃತಿಕ) (सं) वि.—प्रकृतिसंबंधी; नैसर्गिक; स्वाभाविक.

**प्राक्तन** (ಪ್ರಾಕ್ತನ) (सं) वि.—पूर्वीचे; पूर्वकालीन; जुनें; मागचें; प्राचीन; गतजन्मीचे.

(सं) ना—विधि; अदृश्य दैव.

—विमर्श (ವಿಮರ್ಶೆ) (सं) ना.—पुराणग्रंथांचें संशोधन.

**प्रागल्भ्य** (ಪ್ರಾಗಲ್ಭ್ಯ) (सं) ना.—प्रगल्भता; प्रौढत्व; धीटपणा धैर्य; साहस; उत्साह; विश्वास; नैपुण्य; कौशल्य.

**प्रागेय** (ಪ್ರಾಗೇಯ) (सं) वि.—अति गौरवार्ह; स्तोत्रार्ह; स्तुतिपात्र.

**प्राग्जोतिष** (ಪ್ರಾಗ್ಜ್ಯೋತಿಷ) (सं) ना.—नरकासुराची राजधानी; आसाम.

**प्राग्भाग** (ಪ್ರಾಗ್ಭಾಗ) (सं) ना.—शरीराचा पुढचा भाग.

**प्राग्र** (ಪ್ರಾಗ್ರ) (सं) वि.—अत्युन्नत.

—सर (ಸರ) (सं) वि.—सर्वांत पुढचा; सर्वप्रथम.

—**हर** (ಹರ) (सं) ना.–मुख्य प्रधान.

**प्राघात** (ಪ್ರಾಘಾತ) (सं) ना.–युद्ध; रणांगण; रूढी; संबंध.

**प्राघुण (णि) क** (ಪ್ರಾಘುಣ [ಣಿ] ಕ) (सं) ना.–अतिथि; अभ्यागत; आगंतुक; पाहुणा.

**प्रांगण** (ಪ್ರಾಂಗಣ) (सं) ना.–अंगण; घराचा पुढील भाग; मैदान; एक वाद्य.

**प्रा (प्रां) च्** (ಪ್ರಾ [ಪ್ರಾಂ] ಚ್) (सं) वि.–दृष्टिसमोरचा; पुढचा; संमुख; पूर्वीचा; मागचा; जुना; प्राचीन व्याकरणकार

—**अग्र** (ಅಗ್ರ) (सं) ना.–पूर्वेकडे तोंड असलेला.

—**अभाव** (ಅಭಾವ) (सं) ना. पूर्वी नसलेला; नास्तिकता; अनास्तित्त्व.

—**अभिहित** (ಅಭಿಹಿತ) (सं) वि.–पूर्वकथित.

—**अवस्थे** (ಅವಸ್ಥೆ) (सं) ना.–पूर्वस्थिती.

—**कर्म** (ಕರ್ಮ) (सं) ना.–प्राचीन कर्म; पूर्वजन्मीचे पाप.

—**कालीन** (ಕಾಲೀನ) (सं) वि.–अतिप्राचीन; फार जुनें.

—**कृतं** (ಕೃತಂ) (सं) वि.–पूर्वजन्मी केलेलें.

—**चिरं** (ಚಿರಂ) (सं) अ.–योग्य वेळीं; कालमर्यादा संपण्यापूर्वी.

—**जन्म,–जाति** (ಜನ್ಮ ,–ಜಾತಿ) (सं) ना. पूर्वयोनी; पूर्वजन्म.

—**भव** (ಭವ) (सं) ना.–बृहस्पति; गुरुग्रह.

—**भार** (ಭಾರ) (सं) ना.–पर्वत-शिखर; पुढचा भाग; शेवट; प्रवाह; रास.

—**भाव** (ಭಾವ) (सं) वि.–श्रेष्ठ; उत्कृष्ट; पूर्वी असलेलें.

**प्राची** (ಪ್ರಾಚೀ) (सं) ना.–पूर्व दिशा.

—**पति** (ಪತಿ) (सं) ना. इंद्र.

**प्राचीन** (ಪ್ರಾಚೀನ) (सं) वि.–पूर्वकाळचा; पूर्वसंबंधी; संचितफळ; पूर्वकर्म; कुंपण; भिंत.

—**तिलक** (ತಿಲಕ) (सं) ना.–इंद्र; शशी.

—**पनस** (ಪನಸ) (सं) ना.–बिल्ववृक्ष; वेलाचें झाड.

**प्राचीर** (ಪ್ರಾಚೀರ) (सं) ना.–कुंपण; वई; आवार.

**प्राचुर्य** (ಪ್ರಾಚುರ್ಯ) (सं) ना.–वैपुल्य; अतिशयता; प्रचुरता.

**प्राचेतस** (ಪ್ರಾಚೇತಸ) (सं) ना.–वाल्मिकी; वरुण.

**प्राच्य** (ಪ್ರಾಚ್ಯ) (सं) वि.–पूर्वदिशेचा; पूर्वकाळचा; पूर्वीचा.

—**वस्तुसंशोधन** (ವಸ್ತುಸಂಶೋಧನ) (सं) ना.– प्राचीन वस्तूंचा शोध घेणें; पुरातन वस्तु, ग्रंथ यांचे संशोधन.

**प्राज्ञ** (ಪ್ರಾಜ್ಞ) (सं) वि.–अत्यंत बुद्धिमान; कुशलमति; जाणता; निपुण.

**प्राज्य** (ಪ್ರಾಜ್ಯ) (सं) वि.–पुष्कळ; पुरेसें; अधिक; विशेष.

**प्रांजल** (ಪ್ರಾಂಜಲ) (सं) वि.–निर्मल; स्पष्ट; स्वच्छ; पवित्र.

—**मनस्सु** (ಮನಸ್ಸು) (क) वि.–सरळ मनाचा; मोकळया अंतःकरणाचा.

**प्राण** (ಪ್ರಾಣ) (सं) ना. श्वासोच्छ्वास; जीव; प्राणवायु; प्रियवस्तु; ज्ञानेंद्रिय; प्रतिभा; कुरूप; जीर्णता; कालावधी.

—**अंत** (ಅಂತ) (सं) ना.–मृत्यु; मरण.

—**अंकित** (ಅಂಕಿತ) (सं) ना.–मरण; जीवाला अपायकारक खून.

—**अपाय** (ಅಪಾಯ) (सं) ना.–गडांतर; जीवावरील संकट.

—**ईश्वर** (ಈಶ್ವರ) (सं) ना.–जीवस्वामी; जिवलग; प्रियकर; पति.

—**ईश्वरी** (ಈಶ್ವರಿ) (सं) ना.–जीवितस्वामिनी; प्रिया; पत्नी.

—**उत्क्रमण** (ಉತ್ಕ್ರಮಣ) (सं) ना.–मृत्यु; मरण.

—**घातक** (ಘಾತಕ) (सं) ना–जीव घेणारा; खुनी; हत्यारी; जीवकंटक.

—**दान** (ದಾನ) (सं) ना.–जीवितरक्षण; जीव वाचवणें; संकटविमोचन.

—**धारण** (ಧಾರಣ) (सं) ना.–जीवन; जिवंत राहणें.

—**प्रिय** (ಪ್ರಿಯ) (सं) ना.–प्राणाइतका प्रिय; नातेवाईक; पति.

**प्राणक** (ಪ್ರಾಣಕ) (सं) ना.–जीवाणु; जिवंत प्राणी.

**प्राणकांत** (ಪ್ರಾಣಕಾಂತ) (सं) ना.–प्राणनाथ; प्रियपति; नातलग.

**प्राणत्याग** (ಪ್ರಾಣತ್ಯಾಗ) (सं) ना.–मरण; जीव देणें; जीवसमर्पण; प्राण सोडणें.

**प्राणनाथ** (ಪ್ರಾಣನಾಥ) (सं) ना.–पतिदेव.

**प्राणपदक** (ಪ್ರಾಣಪದಕ) (सं) ना.–अत्यंत प्रिय वस्तु; मूलबाळ; प्रिय स्त्री-पुरुष.

**प्राणयात्रे** (ಪ್ರಾಣಯಾತ್ರೆ) (सं) ना.–प्रपंच; संसार; जीवन; जीवित; जगणें.

**प्राणवायु** (ಪ್ರಾಣವಾಯು) (सं) ना.–जीवनावश्यक वायु; ऑक्सीजन.

**प्राणसंकट** (ಪ್ರಾಣಸಂಕಟ) (सं) ना.–गंडांतर; प्राणावरील प्रसंग; जीव घेणारी विपत्ति.

**प्राणहानि** (ಪ್ರಾಣಹಾನಿ) (सं) ना.–जीवितनाश; मरण.

**प्राणापहरण** (ಪ್ರಾಣಾಪಹರಣ) (सं) ना.–जीव घेणें; वध; खून.

**प्राणायाम** (ಪ್ರಾಣಾಯಾಮ) (सं) ना.–श्वासनिरोध; एक योगसाधन.

**प्राणाहुति** (ಪ್ರಾಣಾಹುತಿ) (सं) ना.–देहसमर्पण; जीवनाचा होम; आत्मबलिदान; भोजनारंभीच्या पंचप्राणाहुती.

**प्राणि** (ಪ್ರಾಣಿ) (सं) ना.–प्राण असलेला; कृमिकीटक; जीवजंतु.

**प्राणिकोटि** (ಪ್ರಾಣಿಕೋಟಿ) (सं) ना.–जीवसृष्टि; जगातील सर्व प्रकारचे जीवजंतु.

**प्रातः (र्)** (ಪ್ರಾತಃ [ರ್]) (सं) ना.–प्रातःकाळ; सकाळ; उजेड.

—**काल** (ಕಾಲ) (सं) ना.–पहाट; प्रभात; सकाळ.

**प्रातःस्नान** (ಪ್ರಾತಸ್ನಾನ) (सं) ना.–पहाटेची अंघोळ.

**प्रातःस्मरणीय** (ಪ್ರಾತಃಸ್ಮರಣೀಯ) (सं) वि.–प्रभातीं स्मरण करण्यायोग्य; पूज्य; पवित्र.

**प्रातिकूल्य** (ಪ್ರಾತಿಕೂಲ್ಯ) (सं) ना.–प्रतिकूलता; तडा; विरोध.

**प्रातिपदिक** (ಪ್ರಾತಿಪದಿಕ) (सं) ना.–नाम; विभक्ति प्रत्यय लागणारा मूळशब्द; प्रत्येक पदाविषयी; पदापदासंबंधी.

**प्राथमिक** (ಪ್ರಾಥಮಿಕ) (सं) वि.–प्रारंभीचे; प्रथम; मूल.

—**शाले** (ಶಾಲೆ) (सं) ना.–देशभाषेतील अक्षरज्ञान देणारी आरंभशाळा; पहिली शिक्षण देणारी संस्था.

**प्रादुर्भाव** (ಪ್ರಾದುರ್ಭಾವ) (सं) ना.–प्रकटीकरण; प्रदर्शन; उत्पत्ति; उदय; उन्नति.

**प्रादेशिक** (ಪ್ರಾದೇಶಿಕ) (सं) वि.–स्वप्रांत संबंधी; प्रांतिक; प्रदेशाविषयीं; तद्देशीय.

—**प्रांतभाषा(षे)** (ಪ್ರಾಂತಭಾಷಾ [ಷೆ]) (सं) ना.–प्रांतिक भाषा; तद्देशीय भाषा; प्रांताची व्यवहारभाषा.

**प्राधान्य** (ಪ್ರಾಧಾನ್ಯ) (सं) ना.–प्रधानता; श्रेष्ठता; प्रमुखता.

**प्रांत (त्य)** (ಪ್ರಾಂತ [ತ್ಯ]) (सं) ना.–देशविभाग; काठ; शेवट; अंतर.

**प्रांतर** (ಪ್ರಾಂತರ) (सं) ना.–छायाहीन अरण्य; वाळवंट; मरुभूमि; उष्ण प्रदेश; 'बेंगाड' पहा.

**प्रांतीय** (ಪ್ರಾಂತೀಯ) (सं) वि.–प्रादेशिक; प्रांताचे; देशविषयक.

**प्रापंचिक** (ಪ್ರಾಪಂಚಿಕ) (सं) वि.–प्रपंचासंबंधी; संसारविषयक; जीवनातील.

**प्रापणिक** (ಪ್ರಾಪಣಿಕ) (सं) ना.–वाणी; व्यापारी; वणिक.

**प्राप्त** (ಪ್ರಾಪ್ತ) (सं) वि.–लब्ध; मिळालेले; सांपडलेलें; अनुकूल; योग्य.

—**वयस्क** (ವಯಸ್ಕ) (सं) ना.–वयांत आलेला; तरुण; जवान; युवक.

**प्राप्ति** (ಪ್ರಾಪ್ತಿ) (सं) ना.–मिळकत; लाभ; अदृष्ट; दैव; पूर्वसुकृत; अष्टसिद्धीपैकी एक.

**प्राबल्य** (ಪ್ರಾಬಲ್ಯ) (सं) ना.–प्रबलता; शक्ति; उत्कर्ष; पुढारीपण; अधिकार.

**प्राभव** (ಪ್ರಾಭವ) (सं) ना.–श्रेष्ठता; पावित्र्य; प्रामुख्य; एक संवत्सर.

**प्राभृत** (ಪ್ರಾಭೃತ) (सं) ना.–देणगी; पोषाख; लाच; शिरस्त्राण; पागोटे; रुमाल; पटका.

**प्रामाणिक** (ಪ್ರಾಮಾಣಿಕ) (सं) वि.–रीतीनें वागणरा; शुद्धाचरणी; न्याय्यवर्तन करणारा; विश्वासु; सत्यवादी.

—**तन** (ತನ) (सं) ना.–बोले तैसा चाले अशी वृत्ति; सत्यनिष्ठा; विश्वासूकपणा.

**प्रायः (स्)** (ಪ್ರಾಯಃ [ಸ್]) (सं) अ.–सामान्यतः; बहुतकरून; पूरा, या अर्थी एक प्रत्यय.

(सं) ना.–वय; यौवन; प्रयाण; मरण; बहुमत; विपुलता; आधिक्य; महद्भाग्य; प्रायोपवेशन.

**प्रायण** (ಪ್ರಾಯಣ) (सं) ना.–प्रवेश; आरंभ; इच्छामरण; स्वयंप्रेरित मरण; आश्रय; प्राप्ति.

**प्रायेण (यशः)** (ಪ್ರಾಯೇಣ [ಯಶಃ]) (सं) अ.–बहुतकरून; सामान्यतः; बहुतेक.

**प्रायश्चित्त** (ಪ್ರಾಯಶ್ಚಿತ್ತ) (सं) ना.–कृतकर्मांचे पापक्षालन; परिमार्जन; देहदंड.

**प्रायस्थ** (ಪ್ರಾಯಸ್ಥ) (सं) ना.–वयात आलेला; तरुण; युवक.

**प्रायिक (की)** (ಪ್ರಾಯಿಕ [ಕೀ]) (सं) वि.–वापराचा; रूढ; व्यवहारातला.

**प्रायोगिक** (ಪ್ರಾಯೋಗಿಕ) (सं) वि.–प्रयोगासंबंधीं; प्रयोगावस्थेंतील; करून पाहण्याचे.

**प्रायोपगम** } (ಪ್ರಾಯೋಪಗಮ (सं) ना.–प्राणांतिक
**प्रायोपवेशन** } (ಪ್ರಾಯೋಪವೇಶನ) उपोषण; आमरण उपवास; बेमुदत आहारत्याग.

**प्रारब्ध** (ಪ್ರಾರಬ್ಧ) (सं) वि.–सुरु केलेले; आरंभिलेले; हातीं घेतलेलें.

(सं) ना.–दैव; नशीब; अदृष्ट; विधिलिखित.

**प्रारंभ** (ಪ್ರಾರಂಭ) (सं) ना.–सुरुवात; आरंभ; प्रथम; सैन्याचा अग्रभाग; आघाडी; 'चूणि' पहा.

**इसु** (ಇಸು) (क) धा.–हाती घेणें; सुरवात करणें; सुरू करणें; प्रारंभणें.

**प्रार्थना (ने)** (ಪ್ರಾರ್ಥನಾ [ನೆ]) (सं) ना.–मागणी; विज्ञापना; इच्छा; अपेक्षा; विनंती; व्यथा; बांधव्य; आप्तत्व.

**प्रार्थि** (ಪ್ರಾರ್ಥಿ) (सं) ना.–मागणारा; विनवणारा; इच्छा करणारा.

**प्रार्थित** (ಪ್ರಾರ್ಥಿತ) (सं) वि.–मागितलेलें; विज्ञापित; अपेक्षिलेले; दुखवलेलें; खून केलेला; टिकून राहणारा.

**प्रार्थिसु** (ಪ್ರಾರ್ಥಿಸು) (क) धा.–मागणी करणें; विनवणें; निवड करणें; याचना करणें.

**प्रालंभ** (ಪ್ರಾಲಂಭ) (सं) ना.–गळ्यातील हार; ऊर; स्त्रीची छाती.

**प्रालेय** (ಪ್ರಾಲೇಯ) (सं) ना.–हिम; धुकें; शीत; द्युति; कापूर.
  **—द्युति** (ದ್ಯುತಿ) (सं) ना.–चंद्र; सौम्यतेज असणारा.
**प्रावरण** (ಪ್ರಾವರಣ) (सं) ना.–पांघरण्याचें वस्त्र; आच्छादन; अंगाखांद्यावरील कापड; पांघरूण.
**प्रावृट्काल** (ಪ್ರಾವೃಟ್ಕಾಲ) (सं) ना.–वर्षाऋतु; पावसाळा.
**प्रावृत** (ಪ್ರಾವೃತ) (सं) ना.–शिरोवस्त्र; रुमाल; फेटा; कांबळें; आच्छादन; कातडें; उत्तरीय; अस्तर; आडवस्त्र. 'हच्चड' पहा.
**प्राशन** (ಪ್ರಾಶನ) (सं) ना.–खानपान; भोजन.
**प्राशस्त्य** (ಪ್ರಾಶಸ್ತ್ಯ) (सं) ना.–महत्त्व; अनुकूलता; आधिक्य; अभिवृद्धि; वाढ; अहंकार. 'हेच्चळ' पहा.
**प्रास** (ಪ್ರಾಸ) (सं) ना.–फेक; फेकीचे आयुध; यमक; पद्यातील अक्षर जुळणी.
**प्रासंगिक** (ಪ್ರಾಸಂಗಿಕ) (सं) वि.–प्रसंगानुसार; प्रसंगानुरूप; प्रसंगाला योग्य.
**प्रासाद** (ಪ್ರಾಸಾದ) (सं) ना.–राजवाडा; मोठें घर; माडीचें घर; देवालय.
**प्रास्ताविक** (ಪ್ರಾಸ್ತಾವಿಕ) (सं) वि.–प्रथमचा; आरंभीचा; प्रस्तावाचे चार शब्द; उपोद्घातासंबंधी.
**प्राण्ह** (ಪ್ರಾಹ್ಣ) (सं) ना.–पूर्वाण्ह; दिवसाचा पहिला भाग.
**प्रिय** (ಪ್ರಿಯ) (सं) वि.–लाडका; मनोहर; सुंदर.
  (सं) ना.–पति; नाथ; नातेवाईक.
  **—तम** (ತಮ) (सं) ना.–प्रियपुरुष; मनपसंत; प्राणसखा.
  **—तमा (मे)** (ತಮಾ [ಮೆ]) (सं) ना.–प्रिय स्त्री; प्राणसखी.
**प्रियदर्शन** (ಪ್ರಿಯದರ್ಶನ) (सं) वि.–देखणा; सुंदर; चांगला; पंचतंत्रातील सापाचे नाव.
**प्रियवंदे** (ಪ್ರಿಯವಂದೆ) (सं) ना.–प्रियवादिनी; मधुरभाषिणी; शकुंतलेची सखी.
**प्रिया (ये)** (ಪ್ರಿಯಾ [ಯೆ]) (सं) ना.–प्रीतिपात्र स्त्री; पत्नि.
**प्री** (ಪ್ರೀ) (सं) धा.–प्रेम करणें; संतोषणें; तृप्ति होणें.
**प्रीत** (ಪ್ರೀತ) (सं) वि.–संतोषित; तृप्त.
**प्रीति** (ಪ್ರೀತಿ) (सं) ना.–अनुराग; प्रेम; स्नेह; लाड; संतोष; तृप्ति.
  **—इसु** (ಇಸು) (क) धा.–प्रेमकरणें; संतोषणें; तृप्त होणें.
  **—पात्र** (ಪಾತ್ರ) (सं) वि.–प्रेम करण्यायोग्य; प्रेमसंपादित नातें.
**प्रीत्यर्थ** (ಪ್ರೀತ್ಯರ್ಥಂ) (सं) अ.–संतोषार्थ; तृप्तीसाठी; आनंदास्तव.
**प्रेक्षक** (ಪ್ರೇಕ್ಷಕ) (सं) ना.–पाहाणारा; साक्षी; निरीक्षक; टेहळ्या.
**प्रेक्षण** (ಪ್ರೇಕ್ಷಣ) (सं) ना.–प्रदर्शन; अवलोकन; निरीक्षण.
**प्रेक्षिसु** (ಪ್ರೇಕ್ಷಿಸು) (क) धा.–पाहणें; अवलोकणें; निरीक्षणें; प्रदर्शिणें; दाखवणें.
**प्रेक्षा (क्षे)** (ಪ್ರೇಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.–पाहणी; अवलोकन; दृश्य; समज; बुद्धि; बहिरंग दर्शन.
**प्रेंख (खण)** (ಪ್ರೇಂಖ [ಖಣ]) (सं) ना.–झोका; नर्तन; नृत्य; कंप.
**प्रेंखत्** (ಪ್ರೇಂಖತ್) (सं) वि.–लोंबणारे; लोंबकळते; टांगलेले.
**प्रेत** (ಪ್ರೇತ) (सं) ना.–शव; मुर्दा; पिशाच; नरकजीवी.
  **—कर्म** (ಕರ್ಮ) (सं) ना.–उत्तरक्रिया; मृताच्या सद्गतीसाठीं करावयाचा विधी.
  **—नदी** (ನದೀ) (सं) ना.–वैतरणी.
  **—वन** (ವನ) (सं) ना.–स्मशान; मसण; दहनभूमी.
  **—संस्कार** (ಸಂಸ್ಕಾರ) (सं) ना.–दहन किंवा पुरण्याची उत्तर क्रिया.
**प्रेप्सु** (ಪ್ರೇಪ್ಸು) (सं) वि.–प्राप्तीची इच्छा करणारा; लाभाकांक्षी; लाभेच्छु.
**प्रेम** (ಪ್ರೇಮ) (सं) ना.–अनुराग; प्रीति; भक्ति; संतोष; दया; स्नेह; नाते; लाड.
**प्रेमि** (ಪ್ರೇಮಿ) (सं) वि.–प्रेमळ; प्रेम करणारा; प्रियकर.
**प्रेयसि** (ಪ್ರೇಯಸಿ) (सं) ना.–अतिप्रिय स्त्री; प्रियतमा; दयिता.
**प्रेरक** (ಪ್ರೇರಕ) (सं) वि.–उत्तेजक; कामाला लावणारा; प्रचोदक.
  **—शक्ति** (ಶಕ್ತಿ) (सं) ना.–चेतना; प्रचोदन; उत्तेजक बल.
**प्रेरण (णा) (णे)** (ಪ್ರೇರಣ [ಣಾ] ಣೆ) (सं) ना.–उत्तेजन; हुरूप; उत्साह; स्फूर्तिदान; पुरस्सारण; प्रचोदना.
**प्रेरित** (ಪ್ರೇರಿತ) (सं) वि.–उत्तेजित; प्रचोदित; हुरूप भरलेला; उत्साहित.
**प्रेरिसु** (ಪ್ರೇರಿಸು) (क) ना.–उत्तेजन देणें; हुरूप देणें; कामाला लावणें.
**प्रेर्य** (ಪ್ರೇರ್ಯ) (सं) वि.–प्रेरणा देण्यास योग्य; हुरूपी; उत्साही.
**प्रेरेपणे** (ಪ್ರೇರೇಪಣೆ) (सं) ना.–उत्तेजन; हुरूप; स्फूर्ति.
**प्रेरेपिसु** (ಪ್ರೇರೇಪಿಸು) (क) धा.–उत्तेजिणें; प्रेरणा देणें; पुढें आणणें; हुरूप देणें.
**प्रेषण** (ಪ್ರೇಷಣ) (सं) ना.–पाठवणी; पुढे चालन.
**प्रेषित** (ಪ್ರೇಷಿತ) (सं) वि.–पाठवलेला; पुढें चाललेला.
**प्रेष्य** (ಪ್ರೇಷ್ಯ) (सं) वि.–पाठवणारा; नियोजित.
  (सं) ना.–सेवक; नोकर; अंगरक्षक.
  **—वधु** (ವಧು) (सं) ना.–नोकरपत्नी; मोलकरीण; दासी.
**प्रैष** (ಪ್ರೈಷ) (सं) ना.–पाठवणी; मार्गदर्शन; निरोप; सांगावा; आज्ञा; हुकूम; आमंत्रण; गंडांतर; वेड; दडपण; रेटा.

प्रोक्त (ಪ್ರೋಕ್ತ) (सं) वि.—सांगितलेलें; प्रगटकेलेलें; निर्धारित.
प्रोक्षण (ಪ್ರೋಕ್ಷಣ) (सं) ना.—शिंपण; सडा; फवारा; झड; मार्जन; यज्ञबली; सिंचन.
—इसु (ಇಸು) (क) धा.—शिंपडणें; सडा घालणें; फवारा देणें; सिंचन करणें.
प्रोत (ಪ್ರೋತ) (सं) वि.—भरलेले; शिवलेले; विणलेले; घट्ट आवळलेलें.
प्रोत्साह (ಪ್ರೋತ್ಸಾಹ) (सं) ना.—हुरूप; उत्तेजन; उल्हास; चैतन्य; प्रचोदन; दर्प; अहंकार.
प्रोद्दाम (ಪ್ರೋದ್ದಾಮ) (सं) वि.—अनिर्बंध; श्रेष्ठ; कल्पनातीत.
प्रोद्यत् (ಪ್ರೋದ್ಯತ್) (सं) वि.—उदयोन्मुख; उठून दिसणारा; फुगलेला.
प्रोषित (ಪ್ರೋಷಿತ) (सं) वि.—घर सोडून गेलेला; विदेशी गेलेला; दूर राहणारा.
प्रोषितभर्तृके (ಪ್ರೋಷಿತಭರ್ತೃಕೆ) (सं) ना.— विरहार्त शृंगारनायिका; वियोगिनी; विरहिणी नायिका.
प्रौढ (ಪ್ರೌಢ) (सं) वि.—परिणत वयाचा; तरुण; युवक; अंगापिंडानें भरलेला; अनुभवी; विवेकी; चतुर; बांधेसूद; भरीव; वळीव; निपुण.
—तन (ತನ) (सं) ना.—मोठेपणा; यौवन; घनता.
प्रौढि (ಪ್ರೌಢಿ) (सं) ना.—वाढ; अभिवृद्धि; परिपक्वता; चातुर्य; नैपुण्य; पौरुष.
—मे (ಮೆ) (सं) ना.—महिमा; मोठेपणा; घट्टपणा; गांभीर्य; गौरव.
प्रौढे (ढा) (ಪ್ರೌಢೆ [ಢಾ]) (सं) ना.—मध्यम वयाची स्त्री; (मुग्धा; मध्यमा; प्रौढा यांपैकी एक नायिका).
प्लक्ष (ಪ್ಲಕ್ಷ) (सं) ना.—एक प्राचीन द्वीप; अंजीराचें झाड.
प्लव (ಪ್ಲವ) (सं) वि.—तरंगणारे.
(सं) ना.—तरंगिणी; नौका; बेडूक; मंडूक; पाणकावळा; वल्हे.
प्लव (वं) ग (ಪ್ಲವ [ವಂ]ಗ) (सं) ना.—माकड; बेडूक. नावाडी; घोडा; एक संवत्सर.
प्लीह (ಪ್ಲೀಹ) (सं) ना.—अन्नकोषाजवळची एक ग्रंथी; पाणथरी.
प्लुत (ಪ್ಲುತ) (सं) ना.—दीर्घध्वनि; स्वरोच्चारणाचा एक प्रकार. (सं) वि.—उडालेला; उडी मारलेला; तरंगणारा; तरलेला.
प्लुति (ಪ್ಲುತಿ) (सं) ना.—उड्डाण; उडी; सामीप्य; घोड्याची दुडकी चाल.
—मंडूकप्लुति (ಮಂಡೂಕಪ್ಲುತಿ) (सं) ना.—बेडकाची उडी; व्याकरण सूत्रांतील अर्थ लावण्याचें विधान.
प्लुष्ट (ಪ್ಲುಷ್ಟ) (सं) वि.—जवळलेलें; घसरलेलें; भरलेलें; कच्चे; हिरवे; अपक्व.

## फ

फ (ಫ) (सं) ना.—पवर्गातील दुसरें अक्षर.
फकीर (ಫಕೀರ) (अ. दे) ना.—मुसलमान बैरागी; अकिंचन; दरिद्री.
फक्कने (ಫಕ್ಕನೆ) (क) अ.—लागलीच; अकस्मात; एकदम.
फक्त (ಫಕ್ತ) (अ. दे) अ.—केवळ; नुसते.
फजीति (ಫಜೀತಿ) (अ. दे) ना.—अपमान; अडचण; धांदल. 'पीकलाट' पहा.
फटा (टे) (ಫಟಾ [ಟೆ]) (क) ना.—सापाची फडा; फणी.
फडपोशि (ಫಡಪೋಶಿ) (अ. दे) ना.—जिथें तिथें ढवळाढवळ करणारा; अनिमंत्रित; आगंतुक.
फणा (णे) (ಫಣಾ [ಣೆ]) (सं) ना.—नागाची फडा.
फणारत्न (ಫಣಾರತ್ನ) (सं) ना.—नागाच्या फडीवरील मणी; नागमणि; फणिमणि.
फणि (ಫಣಿ) (सं) ना.—फड असलेला; साप नाग.
—इंद्र-ईश (ಇಂದ್ರ,-ಈಶ) (सं) ना.—शेष; आदिशेष.
—कटक,-कुंडल (ಕಟಕ, ಕುಂಡಲ) (सं) ना.—नागभूषणें वापरणारा शिव.
—तल्प (ತಲ್ಪ) (सं) ना.—शेषशाई; विष्णु.
—वेणि (ವೇಣಿ) (सं) ना.—नागवेणी घालणारी स्त्री; वेणीचा शेपटा सोडणारी तरुणी; सुंदरी.
फणींद्रालय (ಫಣೀಂದ್ರಾಲಯ) (सं) ना.—पाताळलोक; नागलोक; आदिशेषाचे वसतिस्थान.
फतवा (ಫತವಾ) (अ. दे) ना.—न्यायाधीशाचा निर्णय; बगलबंडी.
फरक (ಫರಕ) (अ. दे) वि.—कमी अधिक अंतर; अंतक; मृत्यु; तफावत.
फरारि (ಫರಾರಿ) (अ. दे) वि.—पळून गेलेला; पार झालेला; परागंदा.
फल (ಫಲ) (सं) ना.—प्रयोजन; लाभ; उपयोग; परिणाम; संभावना; कृति; ध्येय; उद्देश; ढाल; म्यान; बाणमुख.

—**अन्वेषि** (ಅನ್ವೇಷಿ) (सं) ना.—फलाकडे दृष्टि ठेवणारा.

—**अपेक्षि** (ಅಪೇಕ್ಷಿ) (सं) ना.—फलाकांक्षी; सकामकर्मी

—**आगम** (ಆಗಮ) (सं) ना.—फळ येणे; ध्येयसाधन; उद्देशपूर्ति.

—**आहार** (ಆಹಾರ) (सं) ना.—फराळ; फलभक्षण.

—**उदय** (ಉದಯ) (सं) ना.—आशाळभूतपणा.

—**पाक** (ಪಾಕ) (सं) ना.—फळात रस भरणें; सुपरिणाम.

—**योग** (ಯೋಗ) (सं) ना.—इष्टवस्तु; इष्टप्राप्ति.

—**राज, वर्तुळ** (ರಾಜ, ವರ್ತುಳ) (सं) ना.—कलिंगडे.

—**श्रेष्ठ** (ಶ್ರೇಷ್ಠ) (सं) ना.—आंबा; आम्रवृक्ष.

—**संवत् (द्)** (ಸಂವತ್ [ದ್]) (सं) ना.—फलभार; विजयप्राप्ति.

**फलहारि (री)** (ಫಲಹಾರಿ [ರೀ]) (सं) ना.—दुर्गा; कालिका.

**फलक (री)** (ಫಲಕ [ರೀ]) (सं) ना.—पाटी; फळा; बोर्ड; ढाल; कागद; तळहात; मांडी; ढुंगण; कमरेचा पृष्ठभाग.

**फलक विमान** (ಫಲಕವಿಮಾನ) (सं) ना.—लहान प्रवासी विमान

**फलतः** (ಫಲತಃ) (सं) अ.—परिणामतः; शेवटीं; अर्थात.

**फलवत्** (ಫಲವತ್) (सं) वि.—लाभदायक; फलद्रूप; फलपूर्वक; पिकानें भरलेले.

**फलश्रुति** (ಫಲಶ್ರುತಿ) (सं) ना.—परिणाम; मुक्तता; समारोप; अंत.

**फलाफल** (ಫಲಾಫಲ) (सं) ना.—लाभालाभ; प्रतिकूलता अनुकूलता;

**फलार्थि** (ಫಲಾರ್ಥಿ) (सं) ना.—फलाकांक्षी; यशाची इच्छा करणारा; अशा धरणारा.

**फलित** (ಫಲಿತ) (सं) वि.—पिकलेला; कार्य हातीं घेतलेला. (क) ना.—परिणाम; उत्तर; मोतीं.

**फलिसु** (ಫಲಿಸು) (क) धा.—पिकणें; लाभ होणें; यश पदरीं पडणें.

**फल्गु** (ಫಲ್ಗು) (सं) वि.—असार; निरुपयुक्त; अयोग्य; लहान; सूक्ष्म; दुर्बल; अशक्त; पीळ नसलेला; वसंतऋतु; गयेजवळील एक नदी; फाल्गुनमास.

—**उत्सव** (ಉತ್ಸವ) (सं) ना.—होळी; फाल्गुनी सण.

**फल्गुन** (ಫಲ್ಗುನ) (सं) ना.—अर्जुन; इंद्र; होलिकोत्सव.

**फल्य** (ಫಲ್ಯ) (सं) वि.—फळ येण्यास योग्य कारण; फूल; सुमन.

**फसलु** (ಫಸಲು) (अ. दे) ना.—पीक; धान्य; 'पैरु' पहा.

**फाल** (ಫಾಲ) (सं) ना.—भाल; कपाळ; डोक्यावरील ओझें; भारा; गाठोडें; 'नोसलु' पहा.

**फालाक्ष** (ಫಾಲಾಕ್ಷ) (सं) ना.—भालनेत्र; शिव.

**फाल्गुन** (ಫಾಲ್ಗುನ) (सं) ना.—फल्गूचा पुत्र अर्जुन; फाल्गुनी; फाल्गुन नक्षत्रावर जन्मलेला; फाल्गुन महिना; अर्जुनसादडा.

—**अनुज** (ಅನುಜ) (सं) ना.—चैत्रवसंत; नकुल सहदेव.

**फाल्गुनि (नी)** (ಫಾಲ್ಗುನಿ [ನೀ]) (सं) ना.—होळी पौर्णिमा.

—**भव** (ಭವ) (सं) ना.—गुरुग्रह.

**फिर् (रसे)** (ಫಿರ್ [ರಸೇ]) (अ. दे) अ.—आणखी एकदा, पुनश्च; आणखी पुनः; वन्समोर.

**फिरंग** (ಫಿರಂಗ) (सं) ना.—फिरंग्यांचा देश; युरोप.

**फिरंगी** (ಫಿರಂಗಿ) (सं) ना.—यूरोपीय; टोपीकर; तोफ; बंदुक.

**फीनिक्स** (ಫೀನಿಕ್ಸ) (अ. दे) ना.—अरबस्थानातील एक पुराण-पक्षी; स्वतःच्या चितेपासून उपजणारा पक्षी.

**फुक्** (ಫುಕ್) (सं) ना.—पक्षी.

**फुप्फुस** (ಫುಪ್ಫುಸ) (सं) ना.—श्वासकोश; फुफुस.

**फुल्ल** (ಫುಲ್ಲ) (सं) वि.—विकसित; उमललेले; फुललेले.

—**नयन** ([ನಯನ) (सं) ना.—उमललेल्या फुलाप्रमाणें डोळे असणारा; कमलनेत्र; विष्णु; हरिण.

—**शर** (ಶರ) (सं) ना.—काम; मदन; पुष्पबाण.

**फूत्कार** (ಫೂತ್ಕಾರ) (सं) ना.—सर्पाचा फुस्कारा; फुसफूस.

**फेन** (ಫೇನ) (सं) ना.—फेस; बुरबुरा; समुद्राच्या पाण्यावरील फेस; उष्टे; उच्छिष्ट.

**फेनिल** (ಫೇನಿಲ) (सं) वि.—फेसाळ; बुरबुरा आलेला.

**फेरफार** (ಫೇರಫಾರ) (अ-दे) ना.—बदल; उलटापालट; व्यत्यास.

**फेर (रु) (रंड) (रव)** (ಫೇರ [ರು] [ರಂಡ] ರವ) (सं) ना.—कोल्हा; वंचक; कपटी.

**फेरि** (ಫೇರಿ) (अ-दें) ना.—फेरा; प्रदक्षिणा; हेलपाटा; येरझार; फिरती; संचार.

**फैसलु** (ಫೈಸಲು) (अ-दे) ना.—निश्चय; निर्णय; निकाल.

**फौजु** (ಫೌಜು) (अ-दे) ना.—सैन्य; शिपाईदल; पोलीस तुकडी.

**फौती** (ಫೌತೀ) (अ-दे) ना.—मृत्यु; मृत; शव; प्रेत.

## ब

ब (ಬ) (सं) ना. – प वर्गातील तिसरें अक्षर.
बक (ಬಕ) (सं) ना. – बगळा; एक राक्षस; कपट; दुष्टपणा.
—अरि (ಅರಿ) (सं) ना. – भीम; कृष्ण.
—व्रत (ವ್ರತ) (सं) ना. – कपट संन्यास; गोमुखी व्याघ्रवृत्ति.
—व्रति (ವ್ರತಿ) (सं) ना. – कपट संन्यासी; स्वार्थसाधु.
बकबक (ಬಕಬಕ) (क) अ. – गपागपा; बकाबक; बकाणाभरून; घाईनें; गडबडीनें.
बकुति (ಬಕುತಿ) (क) ना. – भक्ति; विश्वास; गुरुजनावरील प्रेम; देवताविषयीचा पूज्य भाव.
बकुल (ळ) (ಬಕುಲ [ಳ]) (सं) ना. – बकुळीचें झाड; बकुळीचें फूल; ओवळीचे फूल; पुन्नाग; देवतरु.
बक्कबोरलु (ಬಕ್ಕಬೊರಲು) (क) अ. – उलटेंपलटें होऊन; पालथें पडून.
बकंबयल् (ಬಕ್ಕಂಬಯಲ್) (क) ना. – काटे नसलेले मैदान; शून्यस्थळ; विशाल मैदान.
बक्कट (ಬಕ್ಕಟ) (क) वि. – रिकामें; रितें; मोकळें; निःसार; नापीक.
बक्करे (ಬಕ್ಕರೆ) (क) ना. – जोंधळ्याची भाकरी; फुटलेले कौल; खापर.
बक्कुडे (ಬಕ್ಕುಡೆ) (क) ना. – विस्मय; भीति; आतुरता; गडबड; घाई.
बक्के (कें) वलसु (ಬಕ್ಕೆ [ಕೇ] ವಲಸು) (क) ना. – बरका फणस; रसाळ फणस.
बक्षि (ಬಕ್ಷಿ) (अ. दे) ना. – मुख्य नौकर; हुद्देदार; दरबारी.
—दर्बारबक्षि (ದರ್ಬಾರಬಕ್ಷಿ) (अ. दे) ना. – राजस्थानांतील मुख्य अधिकारी.
बक्षीसु (ಬಕ್ಷೀಸು) (अ. दे) ना. – संभावना; देणगी; इनाम; तृप्ति; संतोष; मान्यता.
बगरगे (ಬಗರಗೆ) (क) ना. – पाण्याचा बुडबुडा; रुंद तोंडाचें भांडें; प्रवाहातील बेट.
बगल् (लु) (ಬಗಲ್ [ಲು]) (क) ना. – काख; बाजू; कक्ष; बगल; शेजार.
बगसे (सिगे) (ಬಗಸೆ [ಸಿಗೆ]) (क) ना. – ओंजळ; अंजली.
बगि (ಬಗಿ) (क) धा. – धूर निघणें; जळणें; तडा जाणें; उडी मारणें; बाहेर जाणें; पुढें येणें; उकरणें; खाजवणें.
(अ. दे) ना. – धमणी; धमनी; सारवट; दोन माणसें बसण्याचें वाहन.
बगुळ् (ಬಗುಳ್) (क) धा. – भुंकणें; भकणें; तोंडाला येईल तसें बोलणें; तिरस्कार करणें.
बगे (ಬಗೆ) (क) धा. – समजणें; विचार करणें; आलोचणें; उकरणें; दुभंगणें.
(क) ना. – इष्टार्थ; मन; प्रीति; अभिप्राय; क्रम.
—काणु (ಕಾಣು) (क) धा. – उपाय सुचणें; तोड सापडणें; मार्ग निघणें.
—कुंदु,–केडु (ಕುಂದು–ಕೆಡು) (क) धा. – निराश होणें; असमाधान होणें; मन बिथरणें; अडचणींत येणें; दिङ्मूढ होणें
—हरि (ಹರಿ) (क) धा. – मनाला पटणें; समजणें; संपवणें; संपणें; भागवणें.
—हरिसु (ಹರಿಸು) (क) धा. – भागविणें; समारोप करणें.
बग्ग (ಬಗ್ಗ) (क) ना. – वाघ; कमळ.
बग्गड (ಬಗ್ಗಡ) (क) ना. – राड; चिखल; मातीची पेंड; गारा; बांगडा; एकजातीची मासळी; निरुपयोगी वस्तु.
बग्गडिग (ಬಗ್ಗಡಿಗ) (क) ना. – रटाळ बोलणारा; अस्पष्ट बोलणार; निरर्थक भाषण करणारा.
बग्गडे (ಬಗ್ಗಡೆ) (क) ना. – अस्पष्टवाणी; बोबडे बोल; तोतरें भाषण.
बग्गणे (ಬಗ್ಗಣೆ) (क) ना. – कोकीळकूजन; कुहुगीत.
बग्गदोवलुडेय (ಬಗ್ಗದೊವಲುಡೆಯ) (क) ना. – व्याघ्राजिन-धारी; वाघाचें कातडें पांघरणारा शिव.
बग्गरि (ಬಗ್ಗರಿ) (क)ना. – नरडें; ताल; मान; छातीचा सापळा.
बग्गिसु (ಬಗ್ಗಿಸು) (क) धा. – कोकिळेसारखा आवाज करणें; वाकविणें; नमविणें; गर्जणें; चिवचिवणें.
बग्गु (ಬಗ್ಗು) (क) ना. – वाघ; वाघरू; भाग्य; ऐश्वर्य; संपत्ति.
(क) धा. – वाकविणें; नमविणें; न्हाऊ घालणें; चिवचिवणें.
बग्गुबडि (ಬಗ್ಗುಬಡಿ) (क) धा. – बेदम मारणें; खरपूस चोप देणें.
बग्गे (गेगे) (ಬಗ್ಗೆ [ಗೆಗೆ]) (क) अ. – विचारपूर्वक; प्रीत्यर्थ; करिता; साठीं; कारणें; विषयीं.
बंक (ಬಂಕ) (क) वि. – वक्र; वाकलेले; मूळचे; कोपऱ्यांतील; (क) ना. घरापुढील चौकी; देवडी.
बंकु (ಬಂಕು) (क) धा. – वाकणें; नमणें; वाकडेतिकडे होणें.
(क) ना. – बांक; नम्रता; अकडी; धोटी.
बंके (ಬಂಕೆ) (क) ना. – डिंक; राळ; धूप.
बंगडे (ಬಂಗಡೆ) (क) ना. – मासा; बांगडा.
बंगार (ಬಂಗಾರ) (सं) ना. – सुवर्ण; सोनें.
बंगि (ಬಂಗಿ) (क) ना. – हावभाव; सादृश्य; सारखेपणा; पात्र; भूमिका; बिऱ्हाड; वसती; निवास.

**बच्च** (ಬಚ್ಚ) (क) वि.—पिळपिळित; फुसके; पीक नसलेलें; दाणा नसलेले; गाभा नसलेले; बोतरा; निरुपयोगी; पोकळ; वाईट.
(क) ना.—भीति; बागुल; बुजगावणें; वैश्य; व्यापारी.
**बच्चबरिय** (ಬಚ್ಚಬರಿಯು) (क) वि.—फुसका; निरुपयोगी; शून्य; नष्ट.
**बच्चर (ज्जर)** (ಬಚ್ಚರ [ಜ್ಜರ]) (क) ना.—वज्र; रत्न; मूल्यवान खडा.
**बच्चरणे** (ಬಚ್ಚರಣೆ) (क) ना.—कोंदण; रत्नजडण; रंगरंगोटी; खड्गाला धार लावणें.
**बच्चल् (लु)** (ಬಚ್ಚಲ್ [ಲು]) (क) ना.—स्नानगृह; न्हाणीवर; न्हाणी; मोरी; पायखाना (चरंडी)
**बच्चले** (ಬಚ್ಚಲೆ) (क) ना.—वत्सला; प्रियतमा; माता.
**बच्चु** (ಬಚ್ಚು) (क) धा.—लपविणें; आड होणें; गरीब होणें; क्षीण होणें; रोडणें; न दिसणें.
(क) ना.—भीति; विस्मय; ऊब.
—**इडु** (ಇಡು) (क) धा.—दिसेनासें करणें; आड करणें; लपवणें; गूढ राहणें; न सांगतां ठेवणें.
**बच्चेवोगु** (ಬಚ್ಚೆವೋಗು) (क) धा.—निष्फळ होणें; व्यर्थ होणें.
**बजंतरि** (ಬಜಂತರಿ) (क) ना.—वाजंत्री; वाजपी; वाद्य; सनई.
**बजायिसु** (ಬಜಾಯಿಸು) (क) धा.—निभावणें; आज्ञा देणें. वापरांत आणणें; वापरणें; बजावून सांगणें.
**बजार** (ಬಜಾರ) (अ. दे) ना.—पेठ; बाजार.
**बजे** (ಬಜೆ) (क) ना.—उग्रगंधा वनस्पति.
**बज्जर** (ಬಜ್ಜರ) (क) ना.—वज्र; रत्न; माणिक; वीज; इंद्रायुध.
**बंच** (ಬಂಚ) (क) ना.—वंश; कुळ; संतती.
(अ. दे) ना.—घोस; तुरा; गुच्छ.
**बंचने** (ಬಂಚನೆ) (क) ना.—वंचना; कपट; फसवणूक.
**बंचर** (ಬಂಚರ) (क) ना.—तंत्रीवाद्य; सतार; तंबोरा; वीणा.
**बंचिसु** (ಬಂಚಿಸು) (क) ना.—फसवणें; कपट करणें; वंचना करणें.
**बंजरु** (ಬಂಜರು) (क) वि.—नापीक; माळवट; ओसाड.
—**भूमि** (ಭೂಮಿ) (क) ना.—माळरान; नापीक जमीन; लोणा; खार जमीन; दलदल.
**बंजिसु** (ಬಂಜಿಸು) (क) धा.—उल्लंघणें; ओलांडणें; उडी मारणें; पार होणें; निसटणें; पिटाळून लावणें. मोडणें.
**बंजे** (ಬಂಜೆ) (क) ना.—वंध्या; वांझ; टोणगी.
**बंजेपडिसु** (ಬಂಜೆಪಡಿಸು) (क) धा.—निकामी करणें; खच्ची करणें; नाश करणें.
**बट** (ಬಟ) (क) ना.—भट; शूर सैनिक; योद्धा; लढवय्या.
**बटु** (ಬಟು) (सं) ना.—ब्रह्मचारी; बाळ; वामनमूर्त; खुजा; कुब्ज.
—**वामन** (ವಾಮನ) (सं) ना.—विष्णु.

**बट्ट** (ಬಟ್ಟ) (क) वि.—गोल; वर्तुळाकार; वलयांकित; नग्न; टक्कल पडलेला; बोडका; बिनशिंगी; मुंडा; नष्ट.
(क) ना.—भट्ट; आचार्य; स्वामी; विद्वान्; क्षत्रिय व ब्राह्मण यांची मिश्र संतती.
**बट्टगैदु** (ಬಟ್ಟಗೈದು) (क) अ.—गोलकरून, वर्तुळघालून, वेढून.
(क) ना.—सुदर्शनचक्र, बूमरँग; वर्तुळयुध, गोलाकारशस्त्र.
**बट्टनंबु** (ಬಟ್ಟನಂಬು) (क) ना.—चक्रायुद्ध, गोलशस्त्र.
**बट्टने** (ಬಟ್ಟನೆ) (क) अ.—लौकर, शीघ्र, लागलीच गोलकरून; मंडलाकार.
**बट्टनेय** (ಬಟ್ಟನೆಯ) (क) ना.—गोल; वर्तुळ; कंकणाकार.
**बट्टबयलु** (ಬಟ್ಟಬಯಲು) (क) ना.—झाड वगैरे नसलेले मैदान; मोकळा माळ.
**बट्टलु** (ಬಟ್ಟಲು) (क) ना.—वाटी; लहान भांडे; जलपात्र; पाणी पिण्याचे भांडे.
**बट्टितु (त्तु)** (ಬಟ್ಟಿತು [ತ್ತು])(क) ना.—गोलाई, वर्तुळाकृति, मंडलाकार.
**बट्टु** (ಬಟ್ಟು) (क) वि.—गोल; वर्तुळ; वाटोळें.
(क) ना.—बिंदु; थेंब; कुंभाराचें चाक. 'तिगरी' पहा.
**बट्टे** (ಬಟ್ಟೆ) (क) ना.—मार्ग; रस्ता; कापड; वस्त्र; कपडा.
—**बिडु, मीरु** (ಬಿಡು–ಮೀರು) (क) धा.—रीत सोडून जाणें; दुर्वर्तन करणें; आडमार्ग धरणें; नीती सोडणें.
—**हिडि** (ಹಿಡಿ) (क) ना.—सन्मार्गावर येणें; वाट सुधारणें; रस्त्याला लागणें.
**बट्टेग (य)** (ಬಟ್ಟೆಗ [ಯ]) (क) ना.—वाटसरू; पांथस्थ; मार्गानें जाणारा.
**बट्टेगेडु** (ಬಟ್ಟೆಗೆಡು) (क) धा.—वाटचुकणें; दुरवस्था होणें; आडमार्गानें जाणें; अनीतीनें वागणें.
**बड** (ಬಡ) (क) वि.—वाकलेला; रोडलेला; क्षीण; धनहीन; दरिद्री; नीच; खालच्या प्रतीचा.
—**बुद्धि** (ಬುದ್ಧಿ) (क) ना.—कृपणता; चिक्कूपणा; क्षुद्र विचार.
—**व** (ವ) (क) वि.—निर्धन; अकिंचन; दरिद्री; वित्तहीन.
**बडक (कलु)** (ಬಡಕ [ಕಲು]) (क) वि.—रोड; क्षीण; दुर्बल; मरतुकडा; 'पेंत' पहा.
**बडग (गलु) (गु)**, (ಬಡಗ) [ಗಲು] (ಗು) (क) ना.—उत्तरदिशा; उत्तर दिक्
**बडगि** (ಬಡಗಿ) (क) ना.—काठी; सुतार; लाकूडकाम करणारा.
**बडनुडि** (ಬಡನುಡಿ) (क) ना.—क्षुद्रवचन; दीनपणा; दीनपणाची मागणी; दुर्वचन; अभद्र भाषा.
**बडप** (ಬಡಪ) (क) ना.—प्रवाह; पाण्याची ओढ.

**बडपायि** (ಬಡಪಾಯಿ) (क) ना.—गरीब; निराधार प्राणी; असहाय जीव.

**बडबड** (ಬಡಬಡ) (क) अ—घाईनें; लौकर; शीघ्र; एकसारखे.

**बडबडि** (ಬಡಬಡಿ) (क) वि.—बडबडया; चकाट्या पिटणारा; भोंगळ बोलणारा.

**बडबडिसु** (ಬಡಬಡಿಸು) (क) धा.—बडबडणें; बरळणें; भ्रम होणे; निरर्थक बोलणें; आपल्याशींच पुटपुटणें.

**—इके** (ಇಕೆ) (क) ना.—बडबड; चकाट्या; कोरडी चर्चा.

**बडबाग्नि (नल)** (ಬಡಬಾಗ್ನಿ [ನಲ]) (क) ना.—वडवाग्नि; सागरातील आग; प्रलयाग्नि.

**बडवा (वे)** (ಬಡವಾ [ವೆ]) (क) ना.—घोडी, मजुरीवर जगणारी स्त्री; ब्राह्मणी; मोलकरीण; सैपाकीण.

**बडवानिस** (ಬಡವಾನಿಸ) (क) वि.—गरीब; रोडका; क्षुद्रबुद्धी.

**बडायि** (ಬಡಾಯಿ) (अ-दे) ना.—बढाई; दंभ; आत्मस्तुति; प्रौढी; गप्पा.

**बडि** (ಬಡಿ) (क) धा.—मारणें; टोला देणें; चालविणें. (क) ना.—टोला; मार; आघात; लाठी; काठी.

**बडिगल्लु** (ಬಡಿಗಲ್ಲು) (क) ना.—अडाणी; अडणा; तिकाटणी आडकाठी; धोंड; मार्गातील काटा.

**बडिक** (ಬಡಿಕ) (क) ना.—आशाळभूत गरीब.

**बडिदाडु** (ಬಡಿದಾಡು) (क) धा.—टांगणें; लोंबणें; झोला खाणें.

**बडिवार** (ಬಡಿವಾರ) (क) ना.—दंभ; बतावणी; अहंकार; सोंगाडेपणा; अट्टाहास.

**बडिश (लिश)** (ಬಡಿಶ [ಲಿಶ]) (सं) ना.—मासे धरण्याचा गळ. 'गाळ' पहा.

**बडिसु** (ಬಡಿಸು) (क) धा.—टांगणें; लोंबत ठेवणें; जीवन वाढणें.

**बड्डि** (ಬಡ್ಡಿ) (क) ना.—वृद्धि; व्याज; व्याजाचा पैसा.

**बड्डिगे** (ಬಡ್ಡಿಗೆ) (क) ना.—नाभी; बेंबी.

**बण** (ಬಣ) (क) ना.—पक्ष; उपपक्ष; गट; कुल; जात.

**—कार** (ಕಾರ) (क) ना.—पक्ष उभारणारा; रयत.

**—गार** (ಗಾರ) (क) ना.—रंगारी; रंगवणारा.

**बणगु** (ಬಣಗು) (क) वि.—अल्प; क्षुद्र; नीच; हिशेबात न घेण्यासारखा; नगण्य.

**—तन** (ತನ) (क) ना.—क्षुद्रपण; नीचता; अल्पात्मता.

**—नुडि** (ನುಡಿ) (क) ना.—अपशब्द; शिवी; वाईट भाषण.

**—मनुज** (ಮನುಜ) (क) ना.—निरुपयोगी मनुष्य; बेकार; क्षुद्र; निकामी.

**बणजि (णंजि) ग** (ಬಣಜಿ [ಣಂಜಿ]ಗ) (क) ना.—व्यापारी; वाणी; वर्तक.

**बणंजु** (ಬಣಂಜು) (क) ना.—व्यापार; व्यवहार; व्यवसाय; क्रयविक्रय.

**बणति** (ಬಣತಿ) (क) ना.—रंगरंगोटी; आदर्श; नमुना.

**बणबे (णंबे)** (ಬಣಬೆ [ಣಂಬೆ]) (क) ना.—गवताची गंजी; बणवी; गवताची रास.

**बणिति** (ಬಣಿತಿ) (क) ना.—भाषा; वाक्; कथा; निवेदन; म्हणणें. भणिति.

**बंट** (ಬಂಟ) (क) ना.—वीर; योद्धा; सैनिक;

**—उत्तर बंट** (ಉತ್ತರಬಂಟ) (क) ना.—दक्षिणेकडील एक जमात; दास; सेवक.

**बंड** (ಬಂಡ) (क) ना.—भांडें; पात्र; वस्तु; द्रव्य; (क) वि. निर्लज्ज; अविनीत; अपमानित.

**बंडण** (ಬಂಡಣ) (क) ना.—युद्ध; कलह; कंदन; भांडण.

**बंडवलु (वाळ)** (ಬಂಡವಲು [ವಾಳ]) (क) ना.—मूलधन; भांडवल; ऐनमुद्दल; संपत्ति.

**बंडाय** (ಬಂಡಾಯ) (क) ना.—बंड; दंगा; कोलाहल; क्रांति.

**बंडारिसु** (ಬಂಡಾರಿಸು) (क) धा.—निरुपयोगी होणें; निकामी होणें; अडगळीत पडणें; कोपऱ्यात बसणें.

**बंडिबोव** (ಬಂಡಿಬೋವ) (क) ना.—बैलगाडी चालवणारा; गाडीवान.

**बंडु** (ಬಂಡು) (क) ना.—मध; मकरंद; फुलातील रस; पराग; अपमान; दुर्वर्तन; उद्धटपणा; निलाजरेपणा.

**—अट्ट** (ಅಟ್ಟ) (क) ना.—ओरडाओरड; निर्लज्ज वर्तन.

**बंडुणि** (ಬಂಡುಣಿ) (क) ना.—मधुपान; मकरंद सेवन; भ्रमर; मधमाशी;

**बंडे** (ಬಂಡೆ) (क) ना.—फरशी; मोठा दगड ; अडणा; असंस्कृत मनुष्य; अडाणी; ढुंब.

**बण्ण** (ಬಣ್ಣ) (क) ना.—वर्ण; लाल रंग; रंग.

**बण्णगूळ्** (ಬಣ್ಣಗೂಳ್) (क) ना.—फोडिणीचा भात; पेज काढलेला भात.

**बण्णगार** (ಬಣ್ಣಗಾರ) (क) ना.—रंगारी; चित्रकार; कलाकार; वर्णन करणारा; कवि; कथाकार.

**बण्णने** (ಬಣ್ಣನೆ) (क) ना.—वर्णन; निरूपण; रंगवणूक.

**बण्णबळि** (ಬಣ್ಣಬಳಿ) (क) धा.—रंग देणें; तिखट मीठ लावून वर्णन करणें; रसाळ कथन करणें.

**बण्णवुर** (ಬಣ್ಣವುರ) (क) वि.—वर्णपूर. रंगीबेरंगी; चित्रविचित्र.

**बण्णाचार** (ಬಣ್ಣಾಚಾರ) (क) ना.—वेड लावणारी गोष्ट; अवास्तव स्तुति; बहारदार गोष्ट.

**बण्णिके** (ಬಣ್ಣಿಕೆ) (क) ना.—वर्णन; स्तुति; खुशामत; चित्रण; खुषमस्करी.

**बत** (ಬತ) (सं) अ.—अहो; अय्या; अबब; इ. आश्चर्योद्गार.

**बतेरि** (ಬತೇರಿ) (अ. दे) ना. – बातेरी; तोफखाना; किल्ल्यावर तोफ ठेवण्याची जागा. 'कोत्तल' पहा.

**बत्त** (ಬತ್ತ) (क) ना. – भात; पिकाऊ जमीन; गादा; गवताचें बी; शिजवलेला भात. 'कळवे' पहा.

**बत्तलु (ले)** (ಬತ್ತಲು [ಲೆ]) (क) वि. – नग्न; दिगंबर; वस्त्रहीन; विवस्त्र.

**बत्तळि (ळिके)** (ಬತ್ತಳಿ [ಳಿಕೆ]) (क) ना. – बाणाचा भाता.

**बत्ताय** (ಬತ್ತಾಯ) (क) ना. – भत्ता; प्रवास खर्च; पगाराशिवाय मिळणारा इतर पैसा.

**बत्ति** (ಬತ್ತಿ) (क) अ. – वाळवून; संकोच पावून; कोळपून. (क) ना. – दिवा; वात; सुरुंगाच्या दारूची बत्ती.

**बत्तीसु (स)** (ಬತ್ತೀಸು [ಸ]) (अ. दे.) वि. – तीसावर दोन; बत्तीस संख्या.

**बत्तु** (ಬತ್ತು) (क) धा. – वाळणें; रसहीन होणें; सुकणें; निवणें; कोमेजणें; संकुचित होणें.

**बद (दे) ग** (ಬದ [ದೆ] ಗ) (क) वि. – वंचक; नीच; फसव्या; जार; व्यभिचारी; उद्धट. 'सितग' पहा.

**बदगु** (ಬದಗು) (क) ना. – वंचना; फसवणूक; लुच्चेगिरी; कुटिलता.

**बदनामि** (ಬದನಾಮಿ) (अ. दे) ना. – दुर्लौकिक; अपकीर्ति; अपयश.

**बदनिके** (ಬದನಿಕೆ) (क) ना. – बंधनिका; बांडगुळ; ऋण; वनस्पति.

**बदरि (रिका)** (ಬದರಿ [ರಿಕಾ]) (सं) ना. – बोरीचे झाड.

**बदरिकाश्रम** (ಬದರಿಕಾಶ್ರಮ) (सं) ना. – एक प्राचीन ऋष्याश्रम.

**बदलु** (ಬದಲು) (अ. दे) ना. – बद्दल येणारा; एका जागीं दुसरा; व्यवस्था; विनिमय; बदल; क्रांति.

**बदसु** (ಬದಸು) (क) ना. – कुटिलता; वंचना; फसवणूक; लुच्चेगिरी.

**बदि** (ಬದಿ) (क) ना. – पक्ष; बाजू; शेजार; जवळीक; कूस; पदर.

**बद (दं) कु** (ಬದ [ದಂ] ಕು) (क) धा. – जिवंत राहणें; जीवन घालविणें; जगणें; उरणें; पार होणें; जीव धारण करणें.

**बदु (दुं) कु** (ಬದುಕ [ದುಂಕ] ಕು) (क) ना – जीवन; सांसारिक वस्तु; द्रव्य; उद्योग.

—**इसु** (ಇಸು) (क) धा. – जीव राखणें; वाचविणें; पार करणें.

**बदेग** (ಬದೆಗ) (क) ना. – वंचक; फसव्या; व्यभिचारी; जार; उद्धट.

**बद्द** (ಬದ್ದ) (क) वि. – बद्ध; बांधला गेलेला; भद्र; मंगल; घट्ट; गाढ; गाठून मारलेला; सत्य. 'नन्नि' पहा.

**बद्दण (वण)** (ಬದ್ದಣ [ವಣ]) (क) ना. – वर्धमान; एक चर्मवाद्य; मंगलवाद्य; मृदंग. 'मद्दल' पहा.

**बद्दि** (ಬದ್ದಿ) (क) ना. – वृद्धि; वैपुल्य; आधिक्य.

**बद्दिके** (ಬದ್ದಿಕೆ) (क) ना. – कस; कसोटी; विपुलतेचा पडताळा; अधिक झाले की काय पाहणें.

**बद्दिगे** (ಬದ್ದಿಗೆ) (क) ना. – वस्त्राचा शेवटचा भाग; दशा; कन्या; विणाईतील ताण्याची सुतें.

**बद्दिसु** (ಬದ್ದಿಸು) (क) धा. – जास्तीचा भाग ध्यानीं घेणें; कसोटी लावणें; कस पाहणें; जुळवून पाहणें.

**बद्दु (दुं)** (ಬದ್ದು [ದುಂ]) (क) ना. – प्रौढत्व; जाणीव; नैपुण्य; मृत्यु; जमिनीतील बीळ; भेग; फट.

**बद्दुगे** (ಬದ್ದುಗೆ) (क) ना. – विणाईतील सोडलेला शेवटचा भाग. 'बद्दिगे' पहा. कडदोरा; करदोटा; पट्टी.

**बद्दे** (ಬದ್ದೆ) (क) ना. – खरे बोलणारी; सत्यवती; प्रौढा; ओटीपोट.

**बद्देदल्लळ** (ಬದ್ದೆದಲ್ಲಳ) (क) ना. – वीराला वायाळ करणारा; वीराधिवीर.

**बद्ध** (ಬದ್ಧ) (सं) वि. – बांधला गेलेला; जखडलेला; तुरुंगात अडकलेला; बंधनांत पडलेला; सरळ; क्रमशुद्ध.

**बद्धकंकण** (ಬದ್ಧಕಂಕಣ) (सं) वि. – कंकण बांधून घेतलेला; कामाला सिद्ध झालेला; दृढनिश्चयी; प्रतिज्ञाबद्ध.

**बद्धमुष्टि** (ಬದ್ಧಮುಷ್ಟಿ) (सं) वि. – मूठ वळलेला; मारामारीला तयार झालेला; हात आवरणारा; लोभी; कृपण.

**बद्धवैर** (ಬದ್ಧವೈರ) (सं) ना. – हाडवैर; कटुवैर; कमी न होणारे शत्रुत्व.

**बद्धशिखि** (ಬದ್ಧಶಿಖಿ) (सं) वि. – शेंडीची गाठ घातलेला; शेंडी बांधलेला; अग्निस्तंभन जाणणारा.

**बद्धांजलि** (ಬದ್ಧಾಂಜಲಿ) (सं) ना. – हात जोडून उभा असलेला; नमस्कार.

**बधिर** (ಬಧಿರ) (क) ना. – किवंडा; बहिरा; ऐकू न येणारा.

**बन** (ಬನ) (क) ना. – वन, अरण्य; बाग; मळा.

**बंति** (ಬಂತಿ) (क) ना. – पंक्ति; ओळ; गट. 'हंति' पहा. दहा संख्येचा समूह.

—**तलेय** (ತಲೆಯ) (क) ना. – दशकंठ; दशशिर; ओळीने दहा डोकी असलेला.

—**तेर** (ತೇರ) (क) ना. – दशरथ.

**बंते (बोंते)** (ಬಂತೆ [ಬೊಂತೆ]) (क) ना. – जाड तक्क्या; लोड; जटा; पारंब्या.

**बंद्** (ಬಂದ್) (क) ना.—बंद; चौकट; नियम; ओझें; वृंद; समूह.
(क) वि.—आगत; जवळ आलेला; पिकलेला; पक्क; पिका. हाती आलेला.
**बंदगे** (ಬಂದಗೆ) (क) ना.—चौकट; निर्बंध; दास्य; सेवा.
**बंदळिके (णिके)** (ಬಂದಳಿಕೆ [ಣಿಕೆ]) (क) ना.—बांडगूळ; बंधनिका; ऋण (वनस्पति)
**बंदरू** (ಬಂದರು) (क) ना.—बंदर; जहाज थांबण्याचे ठिकाण. 'रेवु' पहा.
**बंदि** (ಬಂದಿ) (क) ना.—बाजुबंद; एक दागिना; कैदी; बंदी; स्तुतिपाठक; भाट; चारण.
**बंदिग** (ಬಂದಿಗ) (क) ना.—बांधलेला, कैदी, बंदी, स्तुतिपाठक.
**बंदिसु** (ಬಂದಿಸು) (क) धा.—बांधणें, बंधनांत टाकणें, कैद करणें, अटकवणें, स्तुतिकरणें, वंदणें.
**बंदुक** (ಬಂದುಕ) (क) ना.—स्तुतीवर जगणारा; भाट; खुषमस्कऱ्या.
**बंदुगे** (ಬಂದುಗೆ) (क) ना.—बंधुक, जास्वंद.
**बंदूकु** (ಬಂದೂಕು) (अ. दे.) ना.—बंदूक, तोड्याची बंदूक. 'कवि' पहा.
**बंध (धन)** (ಬಂಧ [ಧನ]) (सं) ना.—चौकट; नियम; आज्ञा; शासन; निर्बंध; रचना; जोडणी; तुरुंग; पाश; वश्यता.
**बंधक** (ಬಂಧಕ) (सं.) वि.—विलंब लावणारा; हरकत करणारा; वेळ गमावणारा.
(क) ना.—गहाण, तारण, ठेव, प्रतिज्ञा, जोडणी, रचना.
**बंधकि (की)** (ಬಂಧಕಿ [ಕೀ]) (सं.) ना.—दासी; व्यभिचारिणी; जारिणी.
**बंधनालय** (ಬಂಧನಾಲಯ) (सं.) ना.—कारागृह; बंदीखाना; तुरुंग; कैदखाना.
**बंधिसु** (ಬಂಧಿಸು) (क) धा. बांधून घालणें; घट्ट बांधणें; तुरुंगात टाकणें.
**बंधु** (ಬಂಧು) (सं.) ना.—भाऊ; आतेष्ट; नातेवाईक.
**बंधुकृत्य** (ಬಂಧುಕೃತ್ಯ) (सं) ना.—परोपकाराचे काम; सत्कार्य.
**बंधुत्व** (ಬಂಧುತ್ವ) (सं.) ना.—बांधव्य, भाऊपणा, नातें, आप्तत्व.
**बंधुर** (ಬಂಧುರ) (सं.) वि.—घट्ट; दृढ; आवळलेले; मनोहर; संतोषदायक; कल्याणकारी; भद्र.
(सं.) ना.—गोमेधिक; बदक; 'बातु' पहा.
**बंधूक** (ಬಂಧೂಕ) (सं.) ना.—जास्वंद; लाल जास्वंद; रक्तपुष्प.
**बन्न** (ಬನ್ನ) (क) वि.—भग्न; भंगलेले.
(क) ना.—नाश; कष्ट; विपत्ति; अडचण; पीडा.
—**पडिसु** (ಪಡಿಸು) (क) ना.—कष्ट सहन करणें; त्रास होणें; भंगणें.

**बन्नि** (ಬನ್ನಿ) (क) क्रि.—यावें; आलों.
(क) ना.—शमीवृक्ष.
**बप्प** (ಬಪ್ಪ) (क) वि—येणारा.
(क) ना.—बर्फ
**बफून** (ಬಫೂನ) (अ. दे) ना.—विदूषक.
**बबून** (ಬಬೂನ) (अ. दे) ना.—गोरीला जातीचें माकड;
**बब्बर** (ಬಬ್ಬರ) (अ. दे.) ना.—बर्बर देश; बब्बर-देशीय जन; मूर्ख; मंद; धड्डु; असंस्कृत.
**बब्बुर (लि)** (ಬಬ್ಬುರ [ಲಿ]) (क) ना.—बाभळ; काटे बाभळ; बरबुर वृक्ष.
**बभ्रु** (ಬಭ್ರು) (सं) ना.—मुंगुस; शिव; विष्णु; अग्नि; एक ऋषि; पिंगट रंग; भुरे केस; एक यादव; सोने; एक धातु.
—**धातु** (ಧಾತು)(सं)ना.—सुवर्ण; सोनें.
**बभ्रुवाहन** (ಬಭ್ರುವಾಹನ) (सं) ना.—मणीपुरचा राजा; अर्जुनाचा (चित्रांगदेला झालेला) पुत्र.
**बंबल्** (ಬಂಬಲ್) (क) ना.—समूह; रास; घोस; गुच्छ. 'तोंगल्' पहा.
**बंबळ** (ಬಂಬಳ) (क) ना.—आयास; श्रम; थकवा; संकट; विपत्ति; वापर.
**बंबु** (ಬಂಬು) (क) ना.—मोठी नळी; बांबू; पाणी काढण्याचें डबरें; रहाटगाडगे.
**बंभर** (ಬಂಭರ) (सं) ना.—भ्रमर; भुंगा.
**बंभरालि** (ಬಂಭರಾಲಿ) (सं) ना.—माशी; घुंगुरटें; मशक.
**बंभारव** (ಬಂಭಾರವ) (सं) ना.—भों ऽऽ आवाज; भोंगा; कोलाहल.
**बंभ्रमत्** (ಬಂಭ್ರಮತ್) (सं) वि.—सारखे फिरणारे; सतत फिरणारे.
**बम्मरि** (ಬಮ್ಮರಿ) (क) ना.—मूर्च्छा; आळोखापिळोखा.
**बय्** (ಬಯ್) (क) धा.—पुरणें; लपवून ठेवणें; झाकून ठेवणें; निक्षेपणें; अपशब्द वापरणें; शिवीगाळ करणें; घसरणें.
—**गळ्-गुळ्** (ಗಳ್,-ಗುಳ್) (क) ना.—अपशब्द; शाप; तिरस्कार, निंदा; शिवी.
—**चु** (ಚು) (क) धा.—झाकणें; लपवणें; डोळ्याआड करणें.
**बयके** (ಬಯಕೆ) (क) ना.—आशा; इच्छा; मनोरथ; डोहाळे.
**बयल्(लु)** (ಬಯಲ್ [ಲು]) (क) ना.—मैदान; बखळ; मोठी खुली जागा; शून्य; व्यर्थ; ऊन; प्रकाश.
—**आगु** (ಆಗು) (क) ना.—दिसेनासें होणें; हाताला न येणें; व्यर्थ होणें; बिंग फुटणें; रहस्यस्फोट होणें.
—**आडंबर** (ಆಡಂಬರ) (क) ना.—दंभ; कोरडा अहंकार; घमेंड; खोटी प्रतिष्ठा.

—ब्रह्म (ಬ್ರಹ್ಮ) (क) ना.—पायघोळ संत; कोरडें ब्रह्मज्ञान सांगणारा; ढोंगी साधु.
बयलुग (ಬಯಲುಗ) (क) ना.—संसारी; प्रापंचिक. 'भवी' पहा.
बयल्दोरे (ಬಯಲ್ದೊರೆ) (क) ना.—मृगजळ; तेजाकर; प्रकाश स्वामी; ऊन्हरूपी तेजी, उन्हाचा घोडा.
बयसु (ಬಯಸು) (क) धा.—आशा करणें; अपेक्षिणें; इच्छिणें; मनोरथ करणें; कामना करणें.
बय्के (ಬಯ್ಕೆ) (क) ना.—निक्षेप; आकांक्षा; शिवी, लपवून ठेवलेली गाठ.
बय्गु (ಬಯ್ಗು) (क) ना.—अपराण्ह; तीन्हीसांज; संध्या.
—म्पोळ्तु (ಂಪೊಳ್ತು) (क) ना.—सायंकाळ; सांज.
बय्गुळ्(ळु) (ಬಯ್ಗುಳ್ [ಳು]) (क) ना.—शाप; दुर्वचन; निंदा; छीः थू; तिरस्काराचे शब्द.
बय्तले (ಬಯ್ತಲೆ) (क) ना.—भांग; केस-विभागणी; केसछडी; डोक्यावरील केसात मधोमध पडलेली रेषा.
बय्तिडु(य्पिडु) (ಬಯ್ತಿಡು [ಯ್ಪಿಡು]) (क) धा.—झांकून ठेवणें; लपविणें.
बय्ते(य्के) (ಬಯ್ತೆ [ಯ್ಕೆ]) (क) ना.—मनात दडलेली इच्छा; मनोकामना; अंतर्वासना.
बय्ने (ಬಯ್ನೆ) (क) ना.—तालवृक्ष.
बर्(रु) (ಬರ್ [ರು]) (क) धा.—येणें; होणें; आगमन होणें; संभवणें.
बर (ಬರ) (क) ना.—वर; आशीर्वाद; अनुग्रह; पति.
—गाल (ಗಾಲ) (क) ना.—दुष्काळ; आपत्काल; दुर्भिक्षसमय.
बरं (रेग) (ಬರಂ [ರೆಗೆ]) (क) अ.—पर्यंत; पावेतों; वेरी.
बरक (ಬರಕ) (क) ना.—निःसत्त्व; निरुपयोगिता; अवकाश; दोरा; भूमि; इळानाडी; पोतें; जाळें.
बरगु (ಬರಗು) (क) धा.—ओढणें; विंचरणें; एकत्रित करणें.
(क) ना.—एक धान्य; बरगें
बरटे (ಬರಟೆ) (क) ना.—बाठ; आंब्याची कोय.
बरडु (ಬರಡು) (क) वि.—निःसत्त्व; निरुपयोगी; निष्प्रयोजक; खोटी भूक.
बरणि (ಬರಣಿ) (क) ना.—भरणी नक्षत्र; एक उभट भांडें; बरणी.
बरत (ಬರತ) (क) वि.—वाळलेलें; असार; नीरस; निर्जन.
बरति (ಬರತಿ) (क) ना.—भरती; भरण; सैन्यभरती; समुद्रभरती.
बरपण्ण (ಬರಪಣ್ಣ) (क) ना.—पोषण; लेखनपंडित; लेखणी-बहाद्दर; शाळाशिक्षक; उपाध्याय.
बर (रे) वणिगे (ಬರ[ರೆ]ವಣಿಗೆ) (क) ना.—हस्ताक्षर; लिखाण; हस्तलिखित.
बरवु (ಬರವು) (क) ना.—आगमन; येणें; वर; अनुग्रह; परिणाम; आशीर्वाद.
बरवसे (ಬರವಸೆ) (क) ना.—भरंवसा; विश्वास.
बरविग (ಬರವಿಗ) (क) ना.—आगंतुक; अतिथी; अभ्यागत; पाहुणा; येणारा.
बरसिडिलु (ಬರಸಿಡಿಲು) (क) ना.—पडणारी वीज; उत्पात; दुष्काळ सूचक उन्हाळा; अवर्षण.
बरसु (ಬರಸು) (क) वि.—ओबडधोबड; सारहीन; कठिण; उद्धट; खडबडीत.
बरसेळे (ಬರಸೆಳೆ) (क) धा.—जोरानें ओढून घेणें; आतुरतेनें आलिंगन देणें.
बर(रे)ह(प) (ಬರ[ರೆ]ಹ[ಪ]) (क) ना.—लेख; लिखाण; अक्षर; लिपी.
बरिदु (य) (ಬರಿದು[ಯ]) (क) वि.—उघडा; व्यर्थ; निरर्थक.
बरि (ಬರಿ) (क) वि.—निरर्थक; उघडा.
बरिकै (ಬರಿಕೈ) (क) धा.—मोकळे करणें; खोलणें; रिते करणें.
(क) ना.—रिक्त हस्त; मोकळा हात; गरिबी; निष्फळ कार्य.
बरिगंटु (ಬರಿಗಂಟು) (क) ना.—व्यर्थ आशा; लाभ नसलेले काम.
बरिगुल्लु (ಬರಿಗುಲ್ಲು) (क) ना.—व्यर्थ प्रयत्न; निरर्थक धडपड; उगीच घेतलेला त्रास.
बरिदे (ಬರಿದೆ) (क) अ.—व्यर्थ; निष्फळ; अलाभ; अकारण.
बरिदोरे (ಬರಿದೊರೆ) } (क) ना.—सुकलेला ओढा; राज्य
बरुदोरे (ಬರುದೊರೆ) }
गमावलेला राजा; निष्कांचन नृप; पायउताराची नदी.
बरिबेट (ಬರಿಬೇಟ) (क) ना.—व्यर्थ प्रेम; निष्कारण कामुकवृत्ति; निष्फळ कामवासना;
बरिस (ಬರಿಸ) (क) ना.—वर्ष; बारा महिन्यांचा काळ.
बरिसु (ಬರಿಸು) (क) धा.—बोलावून घेणें; आदरपूर्वक स्वागत करणें, येईलसे करणें.
बरु (ಬರು) (क) धा.—येणें; आगमन होणें.
(क) वि.—मोकळे; रिते; व्यर्थ; निस्सार.
बरु (रुं) बं (ಬರು [ರುಂ] ಬಂ) (क) वि.—अकिंचन; गरीब; रिता झालेला.
बरुव (ಬರುವ) (क) वि.—साह्यशून्य; निराश्रित; निर्वासित; परदेशी; अनाथ; पोरका.
बरे (ಬರೆ) (क) धा.—खूण करणें; संकेत दाखवणें; वाळणें; निवणें.
(क) धा.—डाग देणें; भाजणें.
(क) ना.—चट्टा; तप्त लोहानें दिलेला डाग; खूण; ढाणें; पालापाचोळा; डोंगर झरा.

—प (ಪ) (क) ना.—लिखाण; लेखन; लिपी.

—पअण्ण (—ಪಅಣ್ಣ) (क) ना.—लेखनकामाठी; कर्णिक; कारकून; कर्मचारी.

—व (ವ) (क) ना.—हिशेबनीस; कारकून; लेखक.

**बर्क (कंजिके)** (ಬರ್ಕ [ಕಂಜಿಕೆ]) (क) ना.—एक जातीचा ससा.

**बर्चणे** (ಬರ್ಚಣೆ) (क) ना.—रंग; वर्ण; राड.

**बर्चि** (ಬರ್ಚಿ) (क) ना.—भोसकण्याचे टोकदार आयुध; ईट.

**बार्चिसु** (ಬರ್ಚಿಸು) (क) धा.—चित्र काढणें; रंग भरणें; मनरंजन करणें.

**बर्दर्** (ಬರ್ದರ್) (क) वि.—जोपासलेला; भाग्यवंत; प्रौढ.

**बर्दिल** (ಬರ್ದಿಲ) (क) ना.—स्वर्ग; देवलोक; अमरलोक.

**बर्दु** (ಬರ್ದು) (क) धा.—मरणें; मृत्यु येणें.
(क) ना.—प्रौढत्व; नैपुण्य; मरण; स्वर्ग; आधिक्य.

**बर्दु (दुं) कु** (ಬರ್ದು [ದುಂ]ಕು) (क) धा.—जीवन कंठणें; जिवंत राहणें; जीव संभाळून राहणें.

**बर्दुग** (ಬರ್ದುಗ) (क) वि.—पंडित; विद्वान; ज्ञानी; जाणता.

**बर्दुगे** (ಬರ್ದುಗೆ) (क) ना.—मरण; मृत्यु.

**बर्दे** (ಬರ್ದೆ) (क) ना.—प्रौढ स्त्री; चतुर स्त्री; निपुण स्त्री.

**बर्प (ह)** (ಬರ್ಪ [ಹ]) (क) वि.—आगामी; भविष्यकालीन; आगमन सुचवणारा.

**बर्पुदुं** (ಬರ್ಪುದುಂ) (क) अ.—येताक्षणींच; आल्याबरोबर.

**बर्फ** (ಬರ್ಫ) (अ.दे.) ना.—गारा; धुक्याचा थर; बर्फ.

**बर्बर** (ಬರ್ಬರ) (सं) ना.—अनागरिक; अडाणी; रानटी; बर्बरदेशीय; बर्बरदेश.

**बर्बूर** (ಬರ್ಬೂರ) (क) ना.—बाभूळ.

**बर्ह** (ಬರ್ಹ) (सं) ना.—पक्ष्याचे पर; मोरपीस.

**बर्हि** (ಬರ್ಹಿ) (सं) ना.—मोर; दर्भ; कुशागवत; जाळ; अग्नि.

—वाहन (ವಾಹನ) (सं) ना.—कार्तिकेय; षण्मुखस्वामी; मोरावर बसलेला.

**बल्** (ಬಲ್) (क) धा.—मोठे होणें; समर्थ होणें; बल संपादन करणें.
(सं) धा.—श्वासोच्छ्वास करणें; जिवंत राहणें; दळणें; बोलणें; दुखवणें; खून करणें; पाहणें; पोसणें; ओळखणें; साह्य करणें.

**बल** (ಬಲ) (सं) ना.—शक्ति; सामर्थ्य; सैन्य; पथक; साह्य; इंद्रशत्रु; एक राक्षस; बलात्कार; लठ्ठपणा; देह-रेत; डिंक; कावळा; बलराम.
(क) ना.—उजवी बाजू; दक्षिण बाजू.

—कोळ्ळु (—ಕೊಳ್ಳು) (क) धा.—प्रदक्षिणा घालणें; शक्ति संपादणें; बळवान होणें.

—बरु (ಬರು) (क) धा.—उजवें घालणें; प्रदक्षिणा घालणें; समर्थ होणें.

**बलक्षोभ** (ಬಲಕ್ಷೋಭ) (सं) ना.—सैन्यांतील दंगा; बंड; क्रांती

**बलज** (ಬಲಜ) (सं) ना.—शहराचे महाद्वार; वेस; क्षेत्र; धान्याची रास; युद्ध.

**बलद** (ಬಲದ) (सं) ना.—बैल; खोंड; पाडा; बलिवर्द.

**बलदेव** (ಬಲದೇವ) (सं) ना.—बलराम; बळभद्र; बिज्जळ राजाचा मंत्री; वायु; समर्थ.

**बलद्विष,** (ಬಲದ್ವಿಷ) (सं) ना.—बलराक्षसाला मारणारा; देवेंद्र.

**बलभद्र** (ಬಲಭದ್ರ) (सं) ना.—शक्तिमान; बैल; बळराम; लोध्र.

**बलभिद्** (ಬಲಭಿದ) (सं) ना.—बलराक्षसाला मारणारा; देवेंद्र; बलनिषूदन.

**बलमुरि** (ಬಲಮುರಿ) (क) धा.—दुबळे करणें; शक्तिहीन होणें; बळ खर्ची करणें; सामर्थ्य ठेचणें.

**बलराम** (ಬಲರಾಮ) (सं) ना.—कृष्णाचा भाऊ.

**बलल** (ಬಲಲ) (सं) ना.—इंद्र

**बलवंत (तिके)** (ಬಲವಂತ[ತಿಕೆ]) (क) ना. बलात्कार; दडपण.

**बलविन्यास** (ಬಲವಿನ್ಯಾಸ) (सं) ना.—व्यूह; सैन्यरचना. सेनेची फळी उभारणें.

**बलविरोधि** (ಬಲವಿರೋಧಿ) (सं) ना.—देवेंद्र.

**बलहरि** (ಬಲಹರಿ) (क) ना—महाकाली; इंद्र; अजगर; दुर्गा; महामारी; मरीआई; पीडा; उपद्रव.

**बला** (ಬಲಾ) (सं) ना.—विश्वामित्रानें रामाला दिलेली अस्त्रविद्या; आपत्ति; संकट.

**बलाक (का)** (ಬಲಾಕ [ಕಾ]) (सं) ना.—बगळा; करकोचा.

**बलाग्र** (ಬಲಾಗ್ರ) (सं) ना.—आघाडी; सैन्याचा पुढील भाग.

**बलाढ्य** (ಬಲಾಢ್ಯ) (सं) वि.—शक्तिशाली; सामर्थ्यवान.

**बलात्** (ಬಲಾತ್) (सं) अ.—बळजोरीनें; जबरदस्तीनें; जोरावरी.

**बलात्करिसु** (ಬಲಾತ್ಕರಿಸು) (क) धा.—दडपण आणणें; बलात्कार करणें. समर्थ करणें.

**बलात्कार** (ಬಲಾತ್ಕಾರ) (सं) ना.—दडपण; वर्जन; जबरदस्ती.

**बलान्वित** (ಬಲಾನ್ವಿತ) (सं) वि.—बलवान; सामर्थ्यवान; शक्तिशाली.

**बलाबल** (ಬಲಾಬಲ) (सं) ना.—तारतम्य; दोन सैन्यांची तफावत; न्यूनाधिक शक्ति सामर्थ्य तुलना.

—इके (ಇಕೆ) (क) ना.—शक्तीतील मोजमाप; सामर्थ्याचें तारतम्य.

**बलाह** (ಬಲಾಹ) (सं) ना.—जल; पाणी.

**बलि** (ಬಲಿ) (सं) ना.—आहुति; भोजनापूर्वी ठेवलेला काकबली; बळवंत; बलिराजा; प्रल्हादाचा नातु; उंट; खोंड; सैनिक; पूजा;

आराधनाः कर; देणगी; कोपरा; चवरीची मूठ; डुक्कर; एक जातीची मोगरी; बलराम; विनोद.
(क) धा.—वाढणें; जाड होणें; वयांत येणें; मोठे होणें; घट्ट होणें; दृढावणें.

**बलाहक** (ಬಲಾಹಕ) (सं) ना.—आनंद; मेघ; पर्वत; गिरी; बक; विष्णूचा घोडा.

**बलिकल्लु** (ಬಲಿಕಲ್ಲು) (क) ना.—काकबळी ठेवण्याचा दगड; बलिपीठ; रोजचा काकबळी ठेवण्याची जागा.

**बलिके** (ಬಲಿಕೆ) (क) ना.—वाढ; वृद्धि.

**बलिकोडु** (ಬಲಿಕೊಡು) (क) धा.—बळी देणें; आहुति देणें; ठार करणें; काकबळी ठेवणें.

**बलित** (ಬಲಿತ) (क) वि.—माजलेला; वाढलेला; मस्तीला आलेला.

**बलिदान** (ಬಲಿದಾನ) (सं) ना.—आत्माहुति; देहसमर्पण; प्राणार्पण; बली देणें.

**बलिपाड्य (मि)** (ಬಲಿಪಾಡ್ಯ [ಮಿ]) (सं) ना.—बलिप्रतिपदा; कार्तिकमासांतील प्रथम तिथी.

**बलिपीठ** (ಬಲಿಪೀಠ) (सं) ना.—'बलिकल्लु;' पहा. पूजेचें पवित्र स्थान.

**बलिपुष्ट** (ಬಲಿಪುಷ್ಟ) (सं) ना.—कावळा; बलिभुक्; बळी खाऊन जगणारा.

**बलिभुक् (ज्)** (ಬಲಿಭುಕ್ [ಜ್] (सं) ना.—कावळा; चिमणी; बकपक्षी.

**बलिभोजन (क)** (ಬಲಿಭೋಜನ [ಕ] (सं) ना.—कावळा.

**बलि (ली) वर्द** (ಬಲಿ [ಲೀ] ವರ್ದ) (सं) ना.—बैल; खोंड.

**बलिष्ठ** (ಬಲಿಷ್ಠ) (सं) ना.—बलवंत; सामर्थ्यवान.

**बलिष्णु** (ಬಲಿಷ್ಣು) (सं) वि.—तिरस्कृत; अपमानित; अवनत; नीचतेला पोचलेला.

**बलिसु** (ಬಲಿಸು) (क) धा.—घट्ट करणें; वाढविणें; पोषण करणें.

**बलिह** (ಬಲಿಹ) (क) ना.—पक्कड; आवळणी; मगरमिठी; बल-संपादन.

**बलिहरण** (ಬಲಿಹರಣ) (सं) ना.—बळी खाणें; बळीदान. काकबळी ठेवणें.

**ब (व) ली मुख** (ಬ[ವ]ಲೀಮುಖ) (सं) ना.—वानर; हुप्या; कपिनायक; माकड.

**बलीयस्** (ಬಲೀಯಸ್) (सं) वि.—सामर्थ्यवान; शक्तिमान; दांडगा; गोट्या.

**बलीयसी** (ಬಲೀಯಸೀ) (सं) ना.—शक्तिशाली; बळवान.

**बलु** (ಬಲು) (क) वि.—पुष्कळ; मोठा; श्रेष्ठ; महत्त्वाचा.
—**करिसु** (ಕರಿಸು) (क) धा.—बलात्कार करणें; दडपण आणणें; रेटणें.

**बलुपु (ल्पु)** (ಬಲುಪು [ಲ್ಪು]) (क) ना.—सामर्थ्य; शक्ति; बळ; ताकद.

**बलुमे** (ಬಲುಮೆ) (क) ना.—शक्ति; सामर्थ्य; दडपण; नैपुण्य; चातुर्य.

**बलुहु** (ಬಲುಹು) (क) ना.—प्रतिष्ठा; गौरव; प्रमुखता; सामर्थ्य; बळजोरी.

**बले** (ಬಲೆ) (क) ना.—जाळे; पशू पकडण्याचा पिंजरा; फसवणूक; वंचना; अडचण; स्तुतीचा शब्द.
—**गार** (ಗಾರ) (क) ना.—जाळें टाकणारा; कोळी; पारधी.
—**बीसु** (ಬೀಸು) (क) ना.—जाळें टाकणें; जाळें विणणें; कारस्थान रचणें; फसवणें; कह्यांत ठेवणें.

**बलोद्बंध** (ಬಲೋದ್ಬಂಧ) (सं) ना.—सामर्थ्य; बलात्कारानें घेतलेला ताबा; अत्याचार.

**बलौघ** (ಬಲೌಘ) (सं) ना.—मोठे सैन्य; सेनासागर; सैन्याची रीघ.

**बल्कणे (ल्गणे)** (ಬಲ್ಕಣೆ [ಲ್ಗಣೆ]) (क) ना.—बलवान बाण; तीक्ष्ण बाण; आपत्ति; महासंकट.

**बल्के** (ಬಲ್ಕೆ) (क) ना.—दडपण; काठिण्य; समज; ज्ञान; समजूत; समजदारपणा.

**बल्गण्णि** (ಬಲ್ಗಣ್ಣಿ) (क) ना.—फास; मोठें जाळें; मोठी तलवार.

**बल्गारिके** (ಬಲ್ಗಾರಿಕೆ) (क) ना.—जाणतेपणा; श्रेष्ठ कर्तृत्व; नैपुण्य.

**बल्गेय्** (ಬಲ್ಗೆಯ್) (क) ना.—दंडांतील सामर्थ्य; शूर; पराक्रमी; आजानुबाहु.

**बल्दोरे** (ಬಲ್ದೊರೆ) (क) ना.—मोठा ओढा.

**बल्पु** (ಬಲ್ಪು) (क) ना.—सामर्थ्य; जबरदस्ती.

**बल्मु (ल्मे)** (ಬಲ್ಮು [ಲ್ಮೆ]) (क) ना.—शक्ति; सामर्थ्य.

**बल्मोळगु** (ಬಲ್ಮೊಳಗು) (क) ना.—गोंगाट; गोंधळ; कोलाहल; नगारा; दुंदुभि; मेघगर्जना; गडगडाट; विजेचा कडकडाट.

**बल्ल (ल्लं)** (ಬಲ್ಲ [ಲ್ಲಂ]) (क) ना.—जाणता; ज्ञानी; अनुभविक; बलवंत; शक्ति; त्राण.

**बल्लणि** (ಬಲ್ಲಣಿ) (क) ना.—पायदळ; पदाति.

**बल्लतन** (ಬಲ್ಲತನ) (क) ना.—जाणतेपणा; पांडित्य; कौशल्य; शक्तिमानता.

**बल्लंद** (ಬಲ್ಲಂದ) (क) ना.—समंजसता; विवेकशीलता; विवेक.

**बल्लरिके** (ಬಲ್ಲರಿಕೆ) (क) ना.—जोराची मागणी; मुक्तकंठ प्रार्थना; निःसंकोच विनंति.

**बल्लव** (ಬಲ್ಲವ) (क) ना.—ज्ञानी; विद्वान; पंडित; जाणता.
(सं) ना.—आचारी; रांधपी; स्वयंपाकी.

बल्लविके (ಬಲ್ಲವಿಕೆ) (क) ना.–समज; ज्ञान; शक्तिमानता; समर्थपणा; स्वयंपाक; रांधण.

बल्लह (ಬಲ್ಲಹ) (क) ना.–समर्थ; जाणता; हुंब; दांडगा; वल्लभ; स्वामी; पति.

बल्लाळ् (ळु) (ಬಲ್ಲಾಳ್) [ಳು] (क) ना.–वीर; धीर; धीट; ग्रामप्रमुख; पुढारी; पंच.

बल्लाळ (ಬಲ್ಲಾಳ) (क) ना.–बल्लाळवंशीय राजा; निकटचा नोकर; अगाधपणा.

बल्लितु (त्तु) (ಬಲ್ಲಿತು [ತ್ತು]) (क) वि.–वाढलेला; श्रेष्ठ; मोठा; बलवंत.

बल्लिद (ಬಲ್ಲಿದ) (क) ना.–सामर्थ्यवान; श्रेष्ठ; जाणता; दांडगा; निरोगी; श्रीमंत; योग्य.

बल्लुलि (ಬಲ್ಲುಲಿ) (क) ना.–मोठा आवाज; महाशब्द; हाक; प्रतिष्ठा.

बल्ले (ಬಲ್ಲೆ) (क) ना.–झाडांतील ढोली; झाडी.
(क) क्रि.–मला माहीत आहे.

बल्लेय (ह) (ಬಲ್ಲೆಯ[ಹ]) (क) ना.–भाला; भोसकण्याचें हत्यार; ईट.

बल्वरिके (ಬಲ್ವರಿಕೆ) (क) ना.–जोराची रेटारेटी; बळाची ओढाताण.

बल्वल (ಬಲ್ವಲ) (क) वि.–पुष्कळ; अधिक.
(क) ना.–बलाढ्यता; सामर्थ्य; शक्ति.

बल्सरि (ಬಲ್ಸರಿ) (क) ना.–अतिवृष्टि; चिकार पाऊस; सतत वर्षाव; मुसळधार पाऊस.

व (ಬವ) (क) ना.–भव; संसार; प्रपंच; जन्म.

वण (ಬವಣ) (क) ना.–भ्रमण; संचार; भ्रमंती; फिरती.

बवणि (णे) (ಬವಣಿ [ಣೆ]) (क) ना.–अडचण; कष्ट; आपत्ति; कळकळ; भ्रमण; फिरती.

बवर (ಬವರ]) (क) ना.–युद्ध; संग्राम; लढाई.

बवरि (ಬವರಿ) (क) ना.–भ्रमरी; भुंग्याची मादी; वेढा; डाळी; भोवरा; अंबूर; सामता; भोक पाडण्याचें साधन.
—गड्डु (ಗಡ್ಡು) (क) ना.–बारीक कापलेली दाढी; पीळ भरलेली दाढी; पातळ दाढी;
—गे (ಗೆ) (क) ना.–सामता; भोक पाडण्याचें यंत्र.

बवरिग (ಬವರಿಗ) (क) ना.–सैनिक; योद्धा;

बवसु (से) (ಬವಸು [ಸೆ]) (क) ना.–व्यवसाय; उद्योगधंदा; योगक्षेम; प्रयत्न.

बवसे (ಬವಸೆ) (क) ना.–आकांक्षा; इच्छा; अपेक्षा.

बवळि (ಬವಳಿ) (क) ना.–भ्रमण; डोकें बांधणें; मूर्च्छा; बेशुद्धि; बेभानता.

बवळिवरि (ಬವಳಿವರಿ) (क) धा.–गिरगिर फिरणें; गिरकी घेणें; स्वतःभोवती फिरणें; काळ्यामाळ्या करणें.

बवि (ಬವಿ) (क) ना.–संसारी; भवी; गृहस्थाश्रमी; लिंगधारी नसलेला.

बस (ಬಸ) (क) ना.–आधीनता; गुलामींत राहणारा; बळ; शक्ति; त्राण.

बसति (दि) (ಬಸತಿ [ದಿ]) (क) ना.–वसतीस्थान; गृह; जैनमंदीर.

बस (सि) दु (ಬಸ [ಸಿ] ದು) (क) वि.–धार लावलेला; पाजळलेला; तीक्ष्ण; 'बसि'धातूचे भूतकृदंत.

बसन (ಬಸನ) (क) ना.–वसन; वस्त्र; पोषाख; प्रावरण.

बसंत (ಬಸಂತ) (क) ना.–वसंतऋतु; सुगीचा समय; हंगाम; संगीतांतील एक राग; मदनमित्र.

बसव (ಬಸವ) (क) ना.–पशुपति; वृषभ; नंदीश्वर; वायु; शिव; वीरशैव मत प्रचारक; बसवेश्वर.

बसवळि (ಬಸವಳಿ) (क) धा. आधीनता टाळणें; गुलामगिरी नाहींशी होणें; अशक्त होणें; नित्राण होणें; थकणें; दमणें.

बसवि (ಬಸವಿ) (क) ना.–देवाची गाय; देवदासी; मुरळी.
—बीदिबसवी (ಬಿದಿಬಸವಿ) (क) ना.–वेश्या; बाजारबसवी.

बसि (ಬಸಿ) (क) धा.–ओतणें; पाणी उतरवणें; चाळणें; गाळणें; ठिबकणें;
—कलु (ಕಲು) (क) वि.–पिळलेलें; पाणी काढलेलें; झिरपून गेलेले.

बसिदु (ಬಸಿದು) (क) वि.–तीक्ष्ण; धारदार; टोकदार.

बसिर् (रु) (ಬಸಿರ್ [ರು]) (क) ना.–पोट; गर्भ; कूस.

बसि (सु) रि (ಬಸಿ [ಸು] ರಿ) (क) ना.–गर्भवती; गाभण; जन्म देणारी.

बसुगुत्त (ಬಸುಗುತ್ತು) (क) ना.–पोटदुखी; अतिसार; आमांश.

बसुर् (रु) (ಬಸುರ್ [ರು]) (क) ना.–गर्भ; कूस; पोट.

बसुर्कुत्त (ಬಸುರ್ಕುತ್ತು) (क) ना.–अतिसार; अमांश; पोटदुखी; पोटशूळ.

बसे (ಬಸೆ) (क) ना.–स्त्री; पत्नि; कन्या; नणंद; गाय; वांझोटी; हत्तीण.

बसे (ಬಸೆ) (क) ना.–मज्जा; मेंदु; चरबी; स्निग्ध पदार्थ.
(क) धा. प्रसन्न होणें; हरखणें; वश होणें.

बस्ति (ಬಸ್ತಿ) (क) ना.–वसती; गांव; जैनमंदिर; निवास.

बह (ಬಹ) (क) वि.–बर्फ; येणारा.

बहळ (ಬಹಳ) (क) वि.–बहुल; विपुल; अधिक; अतिशय.

बहळित (ಬಹಳಿತ) (क) वि.–अधिकचे; आधीन; मर्यादातीत.

बहिः (हिस्) (र्) (ಬಹಿಃ [ಹಿಸ್] [ರ್]) (सं) अ.–बाहेर; बाहेरील; बाहेरचा.
—करण (ಕರಣ) (सं) ना.–बाह्य पंचेंद्रियें.

बहि:प्राण (ಬಹಿಃಪ್ರಾಣ) (सं) ना.—बाहेर दिसणारा प्राण; दांभिक ममता; धन; द्रव्य.
बहित्र (ಬಹಿತ್ರ) (सं) ना.—चूक; प्रमाद; जहाज; नाव; होडी; वाहन.
बहिरंग (ಬಹಿರಂಗ) (सं) ना.—बाहेरचा भाग; बाहेरची बाजू; बाह्यांग; जगजाहीर प्रगटन.
बहिर्दि (र्दे) शे (ಬಹಿರ್ದಿ [ರ್ದೆ] ಶೆ) (सं) ना.—गांवाबाहेरील गमन; मलविसर्जन; मैदानाला जाणें.
बहिर्देश (ಬಹಿರ್ದೇಶ) (सं) ना.—गांवाबाहेरील मैदान; विसर्जन; उत्सर्जन; माळरान.
बहिर्द्वार (ಬಹಿರ್ದ್ವಾರ) (सं) ना.—बाहेरचा दरवाजा; वेशीचें दार; महाद्वार.
बहिर्भूमि (ಬಹಿರ್ಭೂಮಿ) (सं) ना.—बहिर्देश; मैदान; माळरान.
बहिर्मुख (ಬಹಿರ್ಮುಖ) (सं) वि. तोंड फिरलेला; बाहेरतोंडाचा; अनासक्त; विरागी; भौतिकवादी; प्रपंचदृष्टि असलेला.
बहिर्यामि (ಬಹಿರ್ಯಾಮಿ) (सं) ना.—प्रतिभावंत; तेजस्वी.
बहिर्लापि (ಬಹಿರ್ಲಾಪಿ) (सं) ना.—कूटप्रश्न व त्याचे उत्तर एकाच पद्यात असणारी रचना.
बहिष्करिसु (ಬಹಿಷ್ಕರಿಸು) (क) धा.—बाहेर घालणें; काढून टाकणें; वाळींत टाकणें; निषेध करणें.
बहिष्कार (ष्करण) (ಬಹಿಷ್ಕಾರ [ಷ್ಕರಣ]) (सं) ना.—समाजांतून उठवण; लोकबाह्यता; सामाजिक संबंधतोड; समाजनिषेध.
बहिष्टे (ष्ठा) (ಬಹಿಷ್ಟೆ [ಷ್ಠಾ]) (सं) ना.—विटाळशी; रजस्वला; बाहेर बसलेली.
बहिस्सरण (ಬಹಿಸ್ಸರಣ) (सं) ना.—वियोग; विरह; दूर प्रयाण; बहिर्गमन; दूर जाणें.
बहु (ಬಹು) (सं) वि.—पुष्कळ; विपुल; अधिक.
—तर (ತರ) (सं) वि.—जास्तीचे; अधिकचे; बहुतकरून वेळोवेळी; प्रायः
बहुधा (ಬಹುಧಾ) (सं) अ.—बहुतकरून; अनेकरीतीनें; विविधतेनें.
बहुधान्य (ಬಹುಧಾನ್ಯ) (सं) ना.—संवत्सराचें नांव; विपुलधान्य.
बहुनायकत्व (ಬಹುನಾಯಕತ್ವ) (सं) ना.—बारभाईपणा; अव्यवस्थित शासन; अतिनायकी; अनागोंदी.
बहुपद (दि) (ಬಹುಪದ [ದಿ]) (सं) ना.—पुष्कळ पाय असलेली; गोम; घोण.
बहुभाषि (ಬಹುಭಾಷಿ) (सं) ना.—अति बोलका; अनेक भाषापंडित.
बहुमान (ಬಹುಮಾನ) (सं) ना.—संभावना; इनाम; पारितोषिक; गौरव.
बहुरूप (ಬಹುರೂಪ) (सं) ना.—अतिरूपें असलेला; शिव; विष्णु; राक्षस; मायावी.
बहुरूपि (ಬಹುರೂಪಿ) (सं) ना.—सोंगाड्या; बहुवेषधारी; नट; नकल्या; कामरूप; राक्षस; पिशाच.
बहुल (ಬಹುಲ) (सं) वि.—पुष्कळ; अतिशय; अनेक; विपुल; कृष्णपक्ष; काळारंग; उदाहरणानुरूप नियम.
बहुले (ಬಹುಲೆ) (सं) ना.—गाय; गोधन.
बहुवच (ಬಹುವಚ) (सं) वि.—बहुभाषी; फार बडबडणारा; गप्पिष्ट; वाचाळ.
बहुवचन (ಬಹುವಚನ) (सं) ना.—अनेकवचन; अनेकसंख्य; मान्यतेची भाषा; सम्योद्गार.
बहुविध (ಬಹುವಿಧ) (सं) वि.—तऱ्हेतऱ्हेचे; नानाविध; पुष्कळ प्रकारचे.
बहुव्रीहि (ಬಹುವ್ರೀಹಿ) (सं) ना.—भाताची रास; तांदुळाची रास; गव्हाचा ढीग; एक समासविशेष.
बहुशः (ಬಹುಶಃ) (सं) अ.—फारकरून; सामान्यतः; प्रायः
बहुश्रुत (ಬಹುಶ್ರುತ) (सं) वि.—पुष्कळ ज्ञान असलेला, अतिवाचन श्रवण असलेला; ज्ञानी; पंडित.
बहुसूतिनि (ಬಹುಸೂತಿನಿ) (सं) वि.—बहुप्रसु; पुष्कळ मुलें असलेली; अनेक पिलांना जन्म देणारी.
बह्वाशी (ಬಹ್ವಾಶೀ) (सं) वि.—खादाड; आधाशी; खाखा करणारा.
ब (ಬಳ್) (क) धा.—जिवंत राहणें; जीवन कंठणें; प्रपंच चालविणें; संसार करणें.
बळकु (ಬಳುಕು) (क) धा.—झुकांडणें; हलणें; वाकणें.
बळ (ळु) कु (ಬಳ [ಳು] ಕು) (क) धा.—झुकांडी खाणें; लोंबणें; लंबकाप्रमाणें हलणें; झोके घेणें.
बळके (ಬಳಕೆ) (क) ना.—उपयोग; रूढी; रीत; समाधान; परिचय; सहनशीलता; साम्य; जुळणूक.
बळग (ಬಳಗ) (क) ना.—कुटुंब; आप्तेष्ट; नातेवाईक; परिवार; सैन्य; गट; संघ.
बळंकु (ಬಳಂಕು) (क) धा.—'बळकु' पहा. झोके घेणें; झुकांडी खाणें; लंबकाप्रमाणें हलणें; ओळंबणें.
बळचु (ಬಳಚು) (क) धा.—तुडविणें; लेपणें; उकरून काढणें; कमी होणें; शेवट गाठणें; तडीला पोचणें; सांपडणें; कातरणें; अंगावरून हात फिरवणें; गुळगुळीत करणें.
ब(प)ळत (ಬ [ಪ] ಳತ) (क) ना.—खाण; पेव; कोठार; धान्य ठेवण्याची जागा.
बळ(ळि)दु (ಬಳ [ಳಿ] ದು) (क) ना.—उतार; उतरती; उतरण.

**बळप** (ಬಳಪ) (क) ना.—बळू; पाटीवर लिहिण्याची पेन्सिल; खडू.

**बळ(ळं)बे** (ಬಳ [ಳಂ] ಬೆ) (क) ना.—बणवी; गवताची गंजी; हुडा.

**बळल् (लु)** (ಬಳಲ್ [ಲು]) (क) धा.—दमणे; थकणें; श्रमणें; कष्टणें; आयास घेणें; लोंबळणें; बेभान होणें.

—**इके** (ಇಕೆ) (क) ना.—आयास; श्रम; दमन.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—कष्टविणें; दमविणें; लोंबवणें; अडचण आणणें.

**बळ(ळव)ळं** (ಬಳ [ಳ್ವ] ಳಂ) (क) अ.—जास्तीचे; विशेषेंकरून अतिशयेंकरून.

**बळवि** (ಬಳವಿ) (क) ना.—वाढ; अभिवृद्धि; मोठे होणें; वैपुल्य; आधिक्य.

**बळसल्(लु)** (ಬಳಸಲ್ [ಲು]) (क) धा.—अवतींभवतीं राहणें; गोंडा घोळणें; भोवतीभोवती लुडबुडणें.

**बळसु** (ಬಳಸು) (क) धा.—गुंडाळणें; प्रदक्षिणा घालणें; वेटाळणें; उपयोजिणें; भोवंडणें.

(क) ना.—गुंडाळी; वेटोळें; प्रदक्षिणा; उपयोग.

**बळसिके** (ಬಳಸಿಕೆ) (क) ना.—उपयोग; व्यय; खर्च; दूरान्वयाचें भाषण; घोळ; फेरा.

**बळह** (ಬಳಹ) (क) ना.—बळू; पेणसल; दगडीपेन; खडू.

**बळहरि(ळारि)** (ಬಳಹರಿ [ಳಾರಿ]) (क) ना.—बलिभुक्; कावळा; महासर्प; शेष; अजगर.

**बळि** (ಬಳಿ) (क) धा.—लेपणें; गुंतणे; रास घालणें; एकत्रित करणें; स्वच्छ करणें; निवडणें; घासून काढणें.

(क) ना.—सामीप्य; बाजू; शेजार; रस्ता; वस्त्रालंकार; हाक; दूत; कुळ; वंश; बहुमान.

(क) अ.—नंतर; उचितपणें; तदुपरि.

**बळिक (के)** (ಬಳಿಕ [ಕೆ]) (क) अ.—त्यानंतर; पुनः; नंतर.

**बळिकोळ्ळु** (ಬಳಿಕೊಳ್ಳು) (क) धा.—जवळ जाणें; जवळ राहणें; तयार ठेवणें; सिद्ध करणें; शपथ घेववणें.

**बळिदोत्तु** (ಬಳಿದೊತ್ತು) (क) ना.—कुटुंबात बरीच वर्षे असलेली मोलकरीण; अंतरंगदासी.

**बळिदोय्यु** (ಬಳಿದೊಯ್ಯು) (क) धा.—चालून जाणें; कांहीं न उरेसें करणें; वाटून खाणें.

**बळिनीरु** (ಬಳಿನೀರು) (क) ना.—क्रम; संप्रदाय; काकस्नान; मुसळस्नान.

**बळियं (यिम्)** (ಬಳಿಯಂ [ಯಿಂ]) (क) अ.—नंतर; पुनः; त्यानंतर.

**बळियट्टु** (ಬಳಿಯಟ್ಟು) (क) धा.—दूत पाठवणें; बोलावणें; आमंत्रिणें; बोलावून घेणें.

**बळि (ळु) वळि** (ಬಳಿ [ಳು] ವಳಿ) (क) ना.—वधुवरांना आईबापांनीं दिलेला आहेर; घरची देणगी; निकटता.

**बळिविडि** (ಬಳಿವಿಡಿ) (क) धा.—क्रम अनुसरणें; पद्धत स्वीकारणें; ओळींत उभे राहणें; सहचर होणें; मार्गावरून न ढळणें; चिकटून राहणें.

**बळिविडु** (ಬಳಿವಿಡು) (क) धा.—संगत सोडणें; दूर होणें; मार्ग सोडणें.

**बळिसल् (लु)** (ಬಳಿಸಲ್ [ಲು]) (क) धा.—जवळ जाणें; अनुसरणें; सहकारी होणे.

**बळिसंदु** (ಬಳಿಸಂದು) (क) अ.—अनुसरून; जवळ येऊन; सहचारी बनून; योग्य होऊन.

**बळिसलु** (ಬಳಿಸಲು) (क) धा. अनुसरणें; सहचारी होणें; जवळ जाणें. (क) ना.—अनुयायित्व; सामीप्य; आश्रय.

—**ह** (ಹ) (सं) ना.—सहकार; सहजीवन; आश्रय.

**बळु(ळुं)कु** (ಬಳು [ಳುಂ] ಕು) (क) धा.—झोके खाणें; हलणें; वाकणें.

**बळुवु** (ಬಳುವು) (क) ना.—भार; वजन; भारा; ओझें; वापर; निर्मूलन.

**बळवे** (ಬಳುವೆ)(क) ना. बणबी; गंजी; गवताचा हुडा.

**बळे (बेळे)** (ಬಳೆ [ಬೆಳೆ]) (क) धा.—अधिक होणें; अभिवृद्धि होणें; मोठे होणें; ओरडणें; शंख करणें; हाकारणें.

(क) ना.—कंकण; मंडल; वर्तुळ.

**बळ्कुगेडे** (ಬಳ್ಕುಗೆಡೆ) (क) धा.—स्तुती करणें; शोभवणें; गर्जणें.

**बळ्कुडि** (ಬಳ್ಕುಡಿ) (क) ना.—भीति; भय; घाबरेपणा.

**बळ्दुंकु** (ಬಳ್ದುಂಕು) (क) धा.—जगणें; जीवन घालवणें; उरणें; पार होणें; 'बदुकु' पहा.

**बळ्वळ** (ಬಳ್ವಳ) (क) अ.—अधिक होऊन; वाढून.

**बळ्वळिके** (ಬಳ್ವಳಿಕೆ) (क) ना.—वाढ; आधिक्य.

**बळ्ळ** (ಬಳ್ಳ) (क) ना.—एक मण; धान्य मोजण्याचे माप; पल्ला; कोल्हा.

**बळ्ळवळ्ळि** (ಬಳ್ಳವಳ್ಳಿ) (क) ना.—विस्तार, वाढ, रुंदी.

**बळ्ळिगुरुड** (ಬಳ್ಳಿಗುರುಡ) (क) ना.—अविचारी अनुकरण; गतानुगतिकता.

**बळ्ळिगुरुळ्** (ಬಳ್ಳಿಗುರುಳ್) (क) ना.—कुरूळे; कुरळे केस.

**बळ्ळिमाड** (ಬಳ್ಳಿಮಾಡ) (क) ना.—खोपट; कुंज; लतागृह; गुंफा.

**बळ्ळिवरि** (ಬಳ್ಳಿವರಿ) (क) धा.—वाढणें; पुढें चालणें; वेली सारखी वाढ होणें.

**बळ्ळिवळ्ळि** (ಬಳ್ಳಿವಳ್ಳಿ) (क) ना.—वधुवराना आईबापांनी दिलेला आहेर; घरची देणगी; वर; दान; निकटता.

बळ्ळु (ಬಳ್ಳು) (क) ना.–कोल्हा; कुत्रा.
बळ्ळुगेडे (ಬಳ್ಳುಗೆಡೆ) (क) धा.–हूल उठणें; किंचाळणें; शंख करणें.
बा (ಬಾ) (क) कि.–ये. 'बरू' धातूचा आज्ञार्थ.
(क) धा.–फुकणें; संतोषणें; हर्षित होणें; फुगणें; स्थूल होणें.
बाकि (ಬಾಕಿ) (क) ना.–शिल्लक; उरवणी; ओळ; इतरेजन.
बाकु (ಬಾಕು) (अ.दे) ना.–चाकू; सुरी; लांबट आसन. बाकडे; बाक.
बाकुड (ಬಾಕುಡ) (क) ना.–पति; नवरा; प्रियकर.
बाकुळ (ಬಾಕುಳ) (क) वि.–अति आशा करणारा; आशाळभूत; व्याकुळ.
बाकुळि (ळितन) (ಬಾಕುಳಿ [ಳಿತನ]) (क) ना.–अत्याशा; महत्त्वाकांक्षा.
बाग (ಬಾಗ) (अ. दे) ना.–मळा; उद्यान.
बागरणि (ಬಾಗರಣಿ) (क) ना.–वैयाकरिणी; व्याकरणज्ञ; भाषाकोविद.
बागवान (ಬಾಗವಾನ) (अ.दे) ना.–भाजीपाला विकणारा; मळेकरी; फूलफळ विकणारा.
बागयत (ति) (ಬಾಗಾಯತ [ತಿ]) (अ. दे) ना.–मळा; मळ्यांतील पाण्याचा पुरवठा.
बागि (ಬಾಗಿ) (क) ना.–एक झाड.
बागिन (नण) (ಬಾಗಿನ [ನಣ]) (क) ना.–वायन; वाण; देणगी; पोषाख; देवतांना दिलेली देणगी.
बागु (ಬಾಗು) (क) धा.–वाकडे होणें; वाकणें; बाक पडणें. नमस्कार करणें.
बागुह (ಬಾಗುಹ) (क) ना.–बाक; वक्रता; वाकडेपणा.
बागुळ् (ಬಾಗುಳ್) (क) ना.–व्याकुळता; चिंता; दुःख; व्यथा; करकर.
बाचण (ಬಾಚಣ) (क) ना.–विंचरणी; वेणी; अलिंगन; मिठी.
—इके (ಇಕೆ) (क) ना.–कंगवा; फणी; विंचरण्याचे साधन.
बाचि (ಬಾಚಿ) (क) ना.–वाकस; तासणी.
बाचु (ಬಾಚು) (क) धा.–वाकणें; घट्ट धरणें; सोलणें; तासणें.
—इ (ಇ) (क) अ.–तासून; विंचरून; अलिंगून.
(क) ना.–कवच; खण; चोळी.
बाज (ಬಾಜ) (अ. दे) ना.–करणारा.
बाजने (ಬಾಜನೆ) (क) ना.–वादन; वाज; वाजवणें.
बाजार (ಬಾಜಾರ) (अ. दे) ना.–पेठ; दुकान; दुकानांची ओळ; गुजरी.
बजिग (ಬಾಜಿಗ) (क) ना.–वाद्य वाजवणारा; संगीतज्ञ; वाजंत्री
बाजु (ಬಾಜು) (अ. दे) ना.–पक्ष; कूस; शेजार; 'केल' पहा.
बाजुबंद (ಬಾಜುಬಂದ) (अ. दे) ना.–दंडावरील दागिना; बेंदी; वाकी.
बाड (ಬಾಡ) (क) ना.–खेडे; ग्राम; चाळ; अग्रहार; वाडी.
बाडं (ಬಾಡಂ) (क) अ.–अतिशय; पुष्कळ.
बाडब (ಬಾಡಬ) (क) ना.–वडवानल; वणवा; ब्राह्मण; घोडा.
बाडबानल (ಬಾಡಬಾನಲ) (क) ना.–वडवानल; वणवा.
बडिगे (ಬಾಡಿಗೆ) (क) ना.–भाडें; कूली; मजूरी; जकातकर; सारा; फाळा; खंडणी.
बाडु (ಬಾಡು) (क) धा.–दडपणें; धुकें येणें; वाळणें; सुकणें; संकोचणें; निस्तेज होणें; कळाहीन होणें.
(क) ना.–मांस; शाकभाजी; लौकर नासणारा पदार्थ.
बाडुगे (ಬಾಡುಗೆ) (क) ना.–निस्तेजता; दुःख; व्यथा; दडपण.
बाडुह (ಬಾಡುಹ) (क) ना.–वाळवण; कळाहीनता; जखम; ताप; त्रास.
बाढं (ಬಾಢಂ) (क) अ.–अतिशय; पुष्कळ.
बाण (ಬಾಣ) (सं) ना.–शर; लोखंडी सळी; शलाका; 'कादंबरी' ग्रंथकर्ता; बाणासुर; पाचांचा संकेत.
बाणधि (ಬಾಣಧಿ) (सं) ना.–भाता; तूणीर.
बाणस (ಬಾಣಸ) (क) ना.–सैपाकघर; स्वयंपाक; महानस; पाकगृह.
बाणसिग (ಬಾಣಸಿಗ) (क) ना.–स्वयंपाकी; आचारी; बल्लव; रांधपी.
बाणासन (ಬಾಣಾಸನ) (सं) ना.–बाणाला आधार देणारे; धनुष्य; धनुष्याची दोरी; शराधार.
बाणि (ಬಾಣಿ) (क) ना.–बाणी; भाषा; गोष्ट; सरस्वती देवी.
बातमी (ಬಾತಮಿ) (अ-दे) ना.–वार्ता; हकीगत; खबर; वर्तमान.
—दार (ದಾರ) (अ-दे) ना.–वार्ताहर; बातमी आणणारा; निरोप्या; जासूद.
बातु (बातकोळि) (ಬಾತು [ಬಾತುಕೋಳಿ]) (अ-दे) ना.–बदक; पाणकोंबडी.
बांते (ಬಾತೆ) (क) ना.–प्रयोजन; उपजीवन; संसार; प्रपंच; 'बाळते' पहा.
बादण (ಬಾದಣ) (क) ना.–वातायन; खिडकी; सार्णे; झरोका; उसासा; गवाक्ष; 'कंडि' पहा; खिड.
बादर (ಬಾದರ) (सं) ना.–बोराचें झाड; बदरासंबंधीं; बोरविषयक.
बादरायण (ಬಾದರಾಯಣ) (सं) ना.–बदरिकाश्रमी; व्यासमुनी;
—संबंध (ಸಂಬಂಧ) (सं) ना.–संबंध नसलेला नातेवाईक; नाते नसलेला संबंधी.

बादशाह (शहा) (ಬಾದಶಾಹ [ಶಹಾ]) (अ-दे) ना. – पातशाहा; मुसलमान राजा; दिल्लीश्वर.

बादुम (म्बे) (ಬಾದುಮು [ದುಂಬೆ]) (क) ना. – बाहुली; प्रतिमा.

बाध (ಬಾಧ) (सं) ना. – जखम; दुःख; हरकत; अडचण; विरोध; वैर; शत्रुत्व.

बाधक (ಬಾಧಕ) (सं) वि. – हानीकारक; अडचणीचे; पीडक; हरकत घेणारा.

(सं) ना. – अडचण; पीडा; जखम; विरोध.

बाधे (धा) (ಬಾಧೆ [ಧಾ]) (सं) ना. – अडचण; हरकत; विरोध; दुःख; जखम; कष्ट.

बाधिसु (ಬಾಧಿಸು) (क) ना. – हरकत घेणें; अडचण उत्पन्न करणें; त्रास देणें; विरोधणें; हानी करणें;

बाध्य (ಬಾಧ್ಯ) (सं) वि. – त्रासदायक; वांधा उत्पन्न करणारा; घोंड आणणारा; वडीलकी असणारा.

बाध्यस्थ (ಬಾಧ್ಯಸ್ಥ) (सं) ना. – हक्कदार; जबाबदार; नातलग; आप्त.

बान् (नु) (ಬಾನ್ [ನು]) (क) ना. – आकाश; अवकाश; आभाळ.

—पोळे (ಪೊಳೆ) (क) ना. – आकाशगंगा.

—बट्टे (ಬಟ್ಟೆ) (क) ना. – आकाशमार्ग; गगनपथ.

—पावु (ಪಾವು) (क) ना. – राहू; आकाश सर्प; दुष्ट प्राणी.

बानल्(लु) (ಬಾನಲ್ [ಲು]) (क) ना. – मुस्कट; आच्छादन; बुरखा; अभ्राच्छादन.

बानवर् (ಬಾನವರ್) (क) ना. – देवता.

बानाडि (ಬಾನಾಡಿ) (क) ना. – विहग; खग; पक्षी; विमान; टिट्टिभ; टिटवी.

बानुलि (ಬಾನುಲಿ) (क) ना. – आकाशवाणी; नभोवाणी; अशरीरिणी; रेडियो.

बांदळ (ಬಾಂದಳ) (क) ना. – आकाश; आभाळ; बादल.

बांदोरे (ಬಾಂದೊರೆ) (क) ना. – आकाशगंगा; स्वर्धुनि.

बांधव (ಬಾಂಧವ) (सं) ना. – भाऊभाऊ; आप्त; नातेवाईक.

बांधव्य (ಬಾಂಧವ್ಯ) (सं) ना. – आप्तपणा; नातें; संबंध.

बान्नविर (ಬಾನ್ನವಿರ) (क) ना. – शिव; लोम; केश.

बान्नुडि (ಬಾನ್ನುಡಿ) (क) ना. – 'बानुली' पहा.

बान्मणि (ಬಾನ್ಮಣಿ) (क) ना. – सूर्य; दिनमणि.

बापु (ಬಾಪು) (क) अ. – भले! वाहवा! बापरे बाप!

(क) ना. – फुंकर; सूज; वाखाणणी; स्तुति.

बापुरि (ಬಾಪುರಿ) (क) ना. – वाकी; बाजुबंद; बंदी.

बाम (ಬಾಮು) (क) ना. – वाम; डावी बाजू. अशुभ; विनय; सौंदर्य; शोभा.

बांबोच (ಬಾಂಬೊಚ್ಚು) (क) ना. – आकाशगंगा; स्वर्धुनि; स्वर्गंगा.

बांबोचदलेय (ಬಾಂಬೊಚ್ಚುದಲೆಯು) (क) ना. – गंगाधर; शिव; मस्तकीं गंगा ठेवणारा.

बांबोल (ಬಾಂಬೊಲ) (क) ना. – आकाश; अवकाश; आभाळ.

बांबोळलु (ಬಾಬೊಳಲು) (क) ना. – त्रिपुर; आकाशपट्टण; नभोग्राम.

बांबोळलुरिक (ಬಾಂಬೊಳಲುರಿಕ) (क) ना. – त्रिपुरदहन; त्रिपुरारी; शिव.

बांबोळेदलेय (ಬಾಂಬೊಳೆದಲೆಯು) (क) ना. – स्वर्गंगाधर; शिव.

बाम्मणि (ಬಾಮ್ಮಣಿ) (क) ना. – ब्राह्मणी; सूर्य.

बाय (ಬಾಯ್) (क) धा. – फुंकणें; वारा भरणें; फुगणें; अहंकारानें ताठणें; बडबडणें.

(क) ना. – तोंड; मुख; काठ; धारी; दरवाजा.

—बडि (ಬಡಿ) (क) धा. – बोलणें उडवून लावणें; तोंडावर फेकणें; तोंड गप करणें; बोलण्यात बोलणें नसणें.

—बिडु (ಬಿಡು) (क) ना. – तोंड फोडणें; उच्चारणें; बातमी उठवणें; गौप्यस्फोट करणें; बकवा करणें; कुढणें; दीनवाणी गळ घालणें.

—माडु (ಮಾಡು) (क) धा. – तोंड करणें; खेकसणें; उद्धटपणें ओरडणें; मस्तीनें बोलणें; तोंड वाजवणें.

बायलि बेरळिडु } (ಬಾಯಲ್ಲಿ ಬೆರಳಿಡು) (क) धा. –
बायलि बेरळु कच्चु } (ಬಾಯಲ್ಲಿ ಬೆರಳು ಕಚ್ಚು) बोट चावणें; तोंडांत बोट घालणें; आश्चर्यचकित होणें.

बायळि (ಬಾಯಳಿ) (क) धा. – वाचा कुंठणें; शंख करणें; ओरडणें; आक्रोश करणें.

बायि (ಬಾಯಿ) (क) ना. – मुख; तोंड.

—आरु (ಆರು) (क) धा. – तोंडाला कोरड पडणें; तहान लागणें; तहानेजणें; उचकी लागणें; भान हरपणें.

—काणिसु (ಕಾಣಿಸು) (क) धा. – आगाऊ सूचना देणें; तोंडावरूनच कळणें; मुद्रेवर दिसणें; प्रथमच समजणें; निर्धार करणें.

—केळिसु (ಕೇಳಿಸು) (क) धा. – आज्ञा मानणें; हुकूम पाळणें; बोलणें ऐकणें; सांगण्याप्रमाणें वागणें.

—तेरे (ತೆರೆ) (क) धा. – तोंड उघडणें; बोलणें.

(क) ना. – ओठ; अधर.

—बडक (ಬಡಕ) (क) वि. – बोलण्यांत बोलणें नसणारा. या बोटावरची थुंकी त्या बोटावर करणारा.

—बीग (ಬೀಗ) (क) ना. – मौन; तोंडखिळी; दातखीळ बसणें; अळीमिळी; कुलुप.

—गेबी गबडि (ಗೆಬೀಗಬಡಿ) (क) धा.—गप्प बसणें; तोंड मिटणें; मौन धारण करणें.

—माडु (ಮಾಡು) (क) धा.—भिवविणें; गर्जणें; शंख करणें; किंचाळणें; प्रतिज्ञा करणें.

**बायिगेबरु** (ಬಾಯಿಗೆಬರು) (क) धा.—तोंडाला येईल तसे बोलणें; भकणें; थापा मारणें; संकटमुक्त होणें; असह्य ताप होणें.

**बायिन** (ಬಾಯಿನ) (क) ना.—वायन; वाण; 'बागिन' पहा.

**बायोडक** (ಬಾಯೊಡಕ) (क) वि.—रहस्यस्फोट करणारा; फाटक्या तोंडाचा; बढाईखोर; थापाड्या.

**बार्** (ಬಾರ್) (क) धा.—वाहून दूर नेणें; ओतणें; कातडे फाडणें; सोडविणें; गाळणें; शोधणें.

(क) ना.—चामड्याची वादी; कातड्याचा तुकडा; चाबुक; कोरडा; कुंपण; मर्यादा.

**बार** (ಬಾರ) (क) ना.—दार; द्वार; दरवाजा.

**बारं** (ಬಾರಂ) (क) क्रि.—'बरू' धातूचे तृ. पु. ए. व. निषेधात्मक रूप; येत नाहीं; येणार नाहीं.

**बारदान** (ಬಾರದಾನ) (अ-दे) ना.—वजन सारखें राखण्याकरतां वापरलेली वस्तु; भार; तरट.

**बारनेत्तु** (ಬಾರನೆತ್ತು) (क) धा.—वळ उठण्यासारखें मारणें.

**बारवणे** (ಬಾರವಣೆ) (क) ना.—भार; ओझें; भारा; प्रामुख्य; गौरव; वैपुल्य; आधिक्य.

**बारविसु** (ಬಾರವಿಸು) (क) धा.—ओझे होणें; कंटाळा येणें; नकोसे होणें.

**बारस** (ಬಾರಸ) (क) ना.—बारसें; द्वादश दिन; बारा.

**बारसे** (ಬಾರಸೆ) (क) ना.—द्वादशी; बारावी तिथी.

**बाराबलूति** (ಬಾರಾಬಲೂತಿ) (अ-दे) ना.—खेड्यांतील बारा हक्कदार; बारा बलूते.

**बारि** (ಬಾರಿ) (क) ना.—क्रम; पाळी; ओळ; साखळी; क्यू; आहुती; चामड्याचा तुकडा; मोटेचा उतार.

**बारिसु** (ಬಾರಿಸು) (क) धा.—वाजविणें; वाद्य वाजवणें; जखम करणें; मारणें; बुकलणें; निवारणें; गमावणें; विलंब करणें; वेळ काढणें; भार होणें.

**बारु** (ಬಾರು) (क) धा.—कंप पावणें; कापणें; झोला घेणें; झुकांडणें.

(क) ना.—चामड्याचा तुकडा; लक्ष्मणरेषा; मर्यादा; वादी.

—कोलु (ಕೋಲು) (क) ना.—चाबूक; चमाटा; कोरडा; चामड्याचा पट्टा; वादी.

**बार्चु** (ಬಾರ್ಚು) (क) धा.—गोळा करणें; रास घालणें; विंचरणें.

**बार्ते** (ಬಾರ್ತೆ) (क) ना.—वार्ता; बातमी; वृत्तांत, जीवन.

—गेय् (ಗೆಯ್) (क) धा.—समाचार विचारणें; बातमी सांगणें; लक्ष देणें.

**बार्पु** (ಬಾರ್ಪು) (क) ना.—कांतीहीनता; निस्तेजता.

**बाल** (ಬಾಲ) (सं) ना.—मूल; बालक; अर्भक; शेपूट; केस; प्रवेश; नुकतेच जन्मलेले मूल; मुग्ध; अज्ञ; वाळा; सुगंधी द्रव्य.

—अग्र (ಅಗ್ರ) (सं) ना.—केसांची टोकें; केसांची गांठ.

—अरुण (ಅರುಣ) सकाळचा अरुण; तांबडें फुटणें.

—अर्क (ಅರ್ಕ) (सं) ना.—बालसूर्य; सूर्याचें बिंब.

—इंदु (ಇಂದು) (सं) ना.—प्रतिपदेचा चंद्र.

—कदली (ळी) (ಕದಲೀ [ಳೀ]) (सं) ना.—केळीचा कोंब; मोना; केळीचा रोप.

—क्रीडनं (ಕ್ರೀಡನಂ) (सं) ना.—मुलाचा खेळ; भातुकली.

—ग्रह (ಗ್ರಹ) (सं) ना.—आकडी; फेपरें.

—चमू (ಚಮೂ) (सं) ना.—बालसेना; स्वयंसेवक पथक.

**बालक** (ಬಾಲಕ) (सं) ना.—मुलगा; कोवळा पोर; नवकुमार.

**बालकेतु** (ಬಾಲಕೇತು)(सं) ना.—चांदणी; लहान नक्षत्र; धूमकेतु.

**बालकेळि** (ಬಾಲಕೇಳಿ) (सं) ना.—लहान मुलाचा खेळ; बाळक्रीडा.

**बालगोपाल** (ಬಾಲಗೋಪಾಲ) (सं) ना.—नंद गोकुळांतील कृष्ण; बाळकृष्ण.

**बालधि** (ಬಾಲಧಿ) (सं) ना.—केशसंभार; मृगपुच्छ.

**बालब्रह्मचारि** (ಬಾಲಬ್ರಹ್ಮಚಾರಿ) (सं) ना.—लहानपणापासून ब्रह्मचर्य पालन करणारा.

**बालभाव** (ಬಾಲಭಾವ) (सं) ना.—बालपण; मूढता; चापल्य.

**बालभाषित** (ಬಾಲಭಾಷಿತ) (सं) ना.—बोबडी भाषा; मुलांची वाणी.

**बालव्यजन** (ಬಾಲವ್ಯಜನ) (सं) ना.—चवरी; केसांचा पंखा.

**बालरक्षे(क्षा)** (ಬಾಲರಕ್ಷೆ [ಕ್ಷಾ]) (सं) ना.—रुजूमणी; ताईत; दृष्टीचा गंडा; मंत्रदोरा.

**बालविधवा** (ಬಾಲವಿಧವಾ)(सं) ना.—बालपणी पति निवर्तलेली स्त्री; ऋतु प्राप्त होण्यापूर्वीच विधवा झालेली स्त्री.

**बालवीर** (ಬಾಲವೀರ) (सं) ना.—स्वयंसेवक.

**बालशय्ये** (ಬಾಲಶಯ್ಯೆ) (सं) ना.—पाळणा; झोळी; अंगाई.

**बालसंन्यासि** (ಬಾಲಸನ್ಯಾಸಿ) (सं) ना.—लहानपणींच संन्यास घेतलेला; ब्रह्मचर्यांतच संन्यासी असलेला.

**बालहस्त** (ಬಾಲಹಸ್ತ) (सं) ना.—विपुल केस असलेली शेपूट; चवरी; चवरीमृग.

**बाला** (ಬಾಲಾ) (सं) ना.—बालिका; मुग्धा; मूळा; कुमारी.

**बालिश** (ಬಾಲಿಶ) (सं) वि.—पोरकट; भोळसर; मूर्ख; केसाळ; नाजुक, सुकुमार.

**बालेय** (ಬಾಲೇಯ) (सं) वि.—कोमल; अजाण; बालार्ह.

**बाल्य** (ಬಾಲ್ಯ) (सं) ना.—लहानपण; पोरकटपणा; पोरखेळ.

बाव (वु) ट (ಬಾವ [ವು] ಟ) (क) ना. – निशाण; ध्वज; गुढी.
बावन्न (ಬಾವನ್ನ) (सं) ना. – चंदन; श्रीगंध.
बावन्नदिगुड्ड (ಬಾವನ್ನದಿಗುಡ್ಡು) (क) ना. – चंदनाचें खोड.
बावलि (ಬಾವಲಿ)(क) ना. – बाळी; कर्णभूषण; वाघुळ; पाकोळी.
बावळिसु (ಬಾವಳಿಸು) (क) धा. – व्याकूळ होणें; त्रस्त होणें; चिंता करणें.
बावि (ಬಾವಿ) (क) ना. – विहीर; वापी; पाण्याचें भांडें.
बावु (ಬಾವು) (क) ना. – सूज; फूगे; फुगारा.
बावुग (ಬಾವುಗ) (क) ना. – बोका; गुंड; फटिंग.
बावुट (ಬಾವುಟ) (क) ना. – निशाण; गुढी; ध्वज.
बावुल (लि) (ಬಾವುಲ [ಲಿ]) (क) ना. – बाळी; वाधुळ,पाकोळी.
बाष्प (ಬಾಷ್ಪ) (सं) ना. – वाफ; अश्रु; धूर; उष्णता.
बास (ಬಾಸ) (क) ना. – वास; गंध.
बासंगुळिगे (ಬಾಸಂಗುಳಿಗೆ) (क) ना. – एक प्रकारची चाल.
बासण (ಬಾಸಣ) (क) ना. – भाषण; प्रवचन; उपन्यास.
बासणि (णिगे) (ಬಾಸಣಿ [ಣಿಗೆ]) (क) ना. – झाकण; आच्छादन; पांघरूण; आवरण.
बासणिसु (ಬಾಸಣಿಸು) (क) धा. – झाकणें; लपवणें; पांघरूण घालणें.
बासर (ಬಾಸರ) (क) ना. – वासर; वार; दिवस; अनाहतध्वनि.
बासळु (ಬಾಸಳು) (क) ना. – चाबकाचे वळ; वण.
बासि (सिं) ग (ಬಾಸಿ [ಸಿಂ] ಗ) (क) ना. – विवाहचिन्ह; मुंडावळी; मंडोळी; पुष्पमाला; गप्पिष्ट; विदूषक; गोष्टी.
बासुगि (ಬಾಸುಗಿ) (क) ना. – वासुकी; सर्पराज; महाशेष.
बासुळ् (ळु) (ಬಾಸುಳ್ [ಳು]) (क) ना. – आघाताचे वळ; वण.
बासुंडे (ಬಾಸುಂಡೆ) (क) ना. – मार; माराचे वळ.
बासे (ಬಾಸೆ) (क) ना. – भाषा; गोष्ट; बोलणे; प्रतिज्ञा; शपथ. स्त्रीच्या पोटावरील केस; छातीवरील केस.
बासेग (ಬಾಸೆಗ) (क) वि. – बोलवेवडा; बाताड्या; थापेबाज; वाग्वीर.
बासेगळ्ळ (गडुक) (ಬಾಸೆಗಳ್ಳ [ಗಡುಕ]) (क) वि. – वचन मोडणारा; प्रतिज्ञा भंगणारा; शब्दाला न जागणारा.
बाह (ಬಾಹ) (सं) ना. – हात; हातोपा; घोडा.
बाहत्तरनियोगिगळु (ಬಾಹತ್ತರನಿಯೋಗಿಗಳು) (अ. दे.) ना. – बहात्तर अधिकारी.
बाहप्पळिके (ಬಾಹಪ್ಪಳಿಕೆ) (क) ना. – शड्डू मारणें; आव्हान.
बाहा (ಬಾಹಾ) (सं) ना. – बाहु; भुज; दंड.
—बाहवी (ಬಾಹವೀ) (सं) ना. – द्वंद्वयुद्ध; हातघाईची लढाई; झटापट.
बाहास्फालन (ಬಾಹಾಸ್ಫಾಲನ) (सं) ना. – दंड थोपटणी; शड्डू मारणें; आव्हान.

बाहिर (ಬಾಹಿರ) (सं) वि. बाहेरचा; बहिष्कृत; बाह्य.
बाहीक (ಬಾಹೀಕ) (सं) ना. – पंजाबदेश; बैल; पंजाबी.
बाहु (ಬಾಹು) (सं) ना. – भुज; बाही; दंड.
बाहुक (ಬಾಹುಕ) (सं) ना. – माकड; करकोटक; नळराजा.
बाहुज (ಬಾಹುಜ) (सं) ना. – हस्तकौशल्य; कृत्रिम; हस्तलाघव.
बाहुदंड (ಬಾಹುದಂಡ) (सं) ना. – समर्थ हात; शक्तिमान भुज; बुक्की; वज्रमूठ; मुष्टियुद्ध.
बाहुपाश (ಬಾಹುಪಾಶ) (सं) बगल; बगली; कुस्तीतील एक डाव.
बाहुपोर (ಬಾಹುಪೊರ) (सं) बाजूबंद; वाकी; बंदी.
बाहुप्रहरण (ಬಾಹುಪ್ರಹರಣ) (सं) ना. – कुस्ती; मल्लयुद्ध.
बाहुमूल (ಬಾಹುಮೂಲ) (सं) ना. – खांदा; छाती; स्तन.
बाहुयुद्ध (ಬಾಹುಯುದ್ಧ) )सं) ना. – द्वंद्वयुद्ध; मुष्टियुद्ध.
बाहुर (ಬಾಹುರ) (क) ना. – वाकी; बाजूबंद.
बाहुरक्के (ಬಾಹುರಕ್ಕೆ) (क) ना. – बाहुरक्षा; भुजत्राण; दंडावरील कवच.
बाहुरिके (ಬಾಹುರಿಕೆ) (क) ना. – भुजत्राण.
बाहुल (ಬಾಹುಲ) (सं) ना. – अग्नि; कार्तिकमास; गुणाकार; वैपुल्य; बाहुकवच.
—ग्रीव (ಗ್ರೀವ) (सं) ना. – मोर; मयूर.
बाहुलेय (ಬಾಹುಲೇಯ) (सं) षण्मुख; कार्तिकेय; कृत्तिकेचा पुत्र.
बाहुल्य (ಬಾಹುಲ್ಯ) (सं) ना. – अतिशयता; वैपुल्य; आधिक्य; रास; समूह.
बाहूद्यम्य (ಬಾಹೂದ್ಯಮ್ಯ) (सं) अ. – दोन्ही हात वर करून; घंटाघोष करून.
बाहे (ಬಾಹೆ) (क) वि. – बाहेरचा; बाह्य; परका; बाहेरील भागाचा.
बाह्य (ಬಾಹ್ಯ) (सं) वि. – बाहेरचा; बाहेरील; विदेशी; अपरिचित; अतीत; बहिष्कृत; (समाजबाह्य; = समाजानें टाकलेले.)
—मति (ಮತಿ) (सं) ना. – जड वस्तूची पहाणी करणारा; बाह्यदृष्टी.
बाल्हक (ल्हिक) (ಬಾಲ್ಹಕ [ಲ್ಹಿಕ]) (सं) ना. – पंजाबजवळील एक देश; एक चंद्रवंशीय राजा; पंजाबी घोडा; हिंग; इंगुदि.
बाळ् (ಬಾಳ್) (क) धा. – जगणें; जीवन घालविणें.
बाळ् (ಬಾಳ್) (क) ना. – जीवन; जीवित्व; प्रपंच; खड्ग; तलवार.
—मोदल (ಮೊದಲ) (क) ना. – प्रपंचाचा आरंभ; संसाराचा श्रीगणेशा; खड्गाची मूठ; जन्म.
—वे (ವೆ) (क) ना. – संसार; प्रपंच; जीवन; जीवित.

**बाळ** (ಬಾಳ) (क) ना.—बाळ; कुमार; मुलगा; कपाळ; भाल; शेपूट; मृगपुच्छ; केस; बुचडा; किरीट; वाळा.
**बाळक** (ಬಾಳಕ) (क) ना.—कुमार; बालक; वाळवलेला; भाजीपाला.
**बाळगोलेय** (ಬಾಳಗೊಲೆಯ) (क) ना.—मुलें मारणारा; कंस.
**बाळधारे** (ಬಾಳಧಾರೆ) (क) धा.—खड्गाची धार; पातें.
**बाळवट्टे** (ಬಾಳಬಟ್ಟೆ) [क) ना.—जीवित विद्या; जीवनांतील रीतभात; जीवनमार्ग.
**बालबंद** (ಬಾಳಬಂದ) (क) ना.—बाळलेणें; लहान मुलांच्या कपाळावरील दागिना; बिंदी; बिजवरा.
**बाळागम** (ಬಾಳಾಗಮ) (सं) ना.—शस्त्रविद्या; क्षात्रविद्या.
**बाळि (ळ्) के** (ಬಾಳಿ [ಳ್] ಕೆ) (क) ना.—संसार; प्रपंच; जीवन.
**बाळु** (ಬಾಳು) (क) धा.—जीवन चालविणें; उपजीवन करणें; जिवंत राहणें.
　**—वे** (ವೆ) (क) ना.—जीवन; संसार; जीवित.
　**—ह** (ಹ) (क) ना.—जीवन; जीवित.
**बाळुक** (ಬಾಳುಕ) (क) ना.—बालक; कुमार; वाळवलेला भाजीपाला.
**बाळुरि** (ಬಾಳುರಿ) (क) ना.—जीवनज्योत; संसारशकट.
**बाळुवेण** (ಬಾಳುವೆಣ) (क) अ.—जीवन घालवण्यासाठीं; जगण्याकरतां; जिवंत राहण्याकरतां.
　(क) ना.—मृतवत् जीवन जगणारा; दैन्य जीवन.
**बाळे** (ಬಾಳೆ) (क) ना.—केळें; एक मासा.
**बाळ्तन (ळ्ते)** (ಬಾಳ್ತನ [ತೆ]) (क) ना.—उपजीवन; संसार; प्रपंच जीवित; प्रयोजन ;काम.
**बाळ्तेगेय्** (ಬಾಳ್ತೆಗೆಯ್) (क) धा.—उपजीवन करणें; संसार चालवणें; लक्ष देणें.
**बाळ्दले** (ಬಾಳ್ದಲೆ) (क) ना.—जीवंतिका; तरवारीचें पातें.
　**—पिडि** (ಪಿಡಿ) (क) धा.—जीवंत धरणें; जीविताला धोका न आणतां पकडणें.
**बाळ्वासे** (ಬಾಳ್ವಾಸೆ) (क) ना.—द्वंद्व; खड्ग; युद्ध.
**बिकरि** (ಬಿಕರಿ) (अ. दे) ना.—विक्री; विकणें; जाहीर लिलाव; वेचन.
**बिकारि** (ಬಿಕಾರಿ) (क) ना.—भिकारी; भिक्षेकरी; याचक; भीकमाग्या.
**बिक्कट्टु** (ಬಿಕ್ಕಟ್ಟು) (क) ना.—अडचण; संकट; पेच; कष्ट; शृंगापत्ति; खोडा; कचाटा.
**बिक्क (क) नासि** (ಬಿಕ್ಕ [ಕ] ನಾಸಿ) (क) ना.—भटक्या; भिक्षेकरी; अनाथ.
**बिक्कलु (ळिके)** (ಬಿಕ್ಕಲು [ಳಿಕೆ]) (क) ना.—धाप; उचकी; धपापा; श्वास निरोध; चाचरेपणा; बोबडी भाषा; बोलतांना लागणें.
**बिक्कु** (ಬಿಕ್ಕು) (क) धा.—बोलतांना लागणें; अडखळत बोलणें; धापा टाकणें; बोबडे बोलणें.
**बिक्कुळि** (ಬಿಕ್ಕುಳಿ) (क) ना.—वांती; उचकी; ओकारी.
**बिगड** (ಬಿಗಡ) (क) वि.—बिकट; विचित्र; बिघडलेलें; नासलेलें
　(क) ना.—विभक्तता; वियोग; पृथक्करण; वेगळीक.
**बिगडिसु** (ಬಿಗಡಿಸು) (क) धा.—विचित्र होणें; बिघडणें; हातचे सुटणें; दूर होणें; बिघडवणें; वाईट होणें.
**बिगि** (ಬಿಗಿ) (क) धा.—जोरानें बांधणें; बंधन करणें; चोपणें; आवळून धरणें.
　(क) वि.—कठिण; जटिल; अडचणीचें; संकटग्रस्त.
　(क) ना.—धट्टपणा; अहंकार; गांभीर्य.
**बिगित** (ಬಿಗಿತ) (क) ना.—बंधन; चौकट; पकड; निर्बंधन; टोला; नियमन.
**बिगु (गुवु)** (ಬಿಗು [ಗುವು]) (क) ना.—अहंकार; गांभीर्य; ताठरपणा; ऐट.
**बिगुर्** (ಬಿಗುರ್) (क) धा.—भिणें; कंप पावणें; भयभीत होणें; आश्चर्य करणें.
　(क) ना.—भीति; भय; आश्चर्य; विस्मय.
**बिगुर्परिज** (ಬಿಗುರ್ಪರಿಜ) (क) ना.—भयंकर आकाराचा; भैरव; यम.
**बिघा, बिघे** (ಬಿಘಾ, ಬಿಘೆ) (अ. दे) ना.—जमीनमोजणीचें परिमाण; विग्रह.
**बिंक** (ಬಿಂಕ) (क) ना.—कोरडा अहंकार; खोटी प्रतिष्ठा; गर्व; जंभ.
　**—गार** (ಗಾರ) (क) ना.—अहंकारी; ढोंगी; दंभाचारी.
　**—गाति** (ಗಾತಿ) (क) ना.—सोंगलाडी; ढोंगी स्त्री.
**बिंकण (णि) (णे)** (ಬಿಂಕಣ [ಣಿ] ಣೆ) (क) ना.—पंखा; व्यजन; सूप.
**बिंकणगिविय** (ಬಿಂಕಣಗಿವಿಯ) (क) ना.—सुपासारखे कान असलेला; गणपति.
**बिंकु** (ಬಿಂಕು) (क) ना.—गर्भ; दंभ; कपट; फसवणूक; कुटिलता; वक्रता; दुष्टपणा; अप्रामाणिकत्व.
**बिंग** (ಬಿಂಗ) (क) ना.—भृंगार; भुंगा; भ्रमर.
**बिंगार** (ಬಿಂಗಾರ) भृंगार; सुवर्णपात्र; कांचेचें भांडें.
**बिंगारि** (ಬಿಂಗಾರಿ) (अ. दे) ना.—भिंगरी; गिरगिरणारी वस्तु; भोंवरा; पाणफेर; पाणचक्र.
**बिंगु** (ಬಿಂಗು) (अ. दे) ना.—भिंग; चमकणारी वस्तु.
**बिच्च** (ಬಿಚ್ಚು) (क) ना.—भिक्षा; मागणी; याचना; 'तिरूपे' पहा.

**बिच्चटे** (ಬಿಚ್ಚುಟೆ) (क) ना. – भिक्षाटन; भिक्षुकी; भिकेसाठीं प्रवास; भीक.

**बिच्चत** (ಬಿಚ್ಚುತ) (क) वि. – विस्तृत; विशाल; रुंद; वाढलेले.

**बिच्चतं** (ಬಿಚ್ಚುತಂ) (क) अ. – बहुतेक; बहुत करून; उत्तम रीतीनें.

**बिच्चणिसु** (ಬಿಚ್ಚುಣಿಸು) (क) धा. – विस्तारणें; रुंद करणें; पोषण करणें.

**बिच्चने** (ಬಿಚ್ಚುನೆ) (क) अ. – बट्टपणें; वेगेवेगें; आवेशेंकरून; अभिनिवेशपूर्वक.

**बिच्चरि (लि) के** (ಬಿಚ್ಚುರಿ [ಳಿ] ಕೆ) (क) ना. – विस्तार; आधिक्य; वाढ; वैपुल्य.

**बिच्चरिसु** (ಬಿಚ್ಚುರಿಸು) (क) धा. – विस्तारणें; विवरण करणें; उघड करणें; फोडून सांगणें.

**बिच्चलिसु** (ಬಿಚ್ಚುಳಿಸು) (क) धा. – विस्तार करणें; पोषण करणें; विवरण करणें; रुंद करणें.

**बिच्चलिके** (ಬಿಚ್ಚುಳಿಕೆ) (क) ना. – विस्तार; वाढ; वैपुल्य. आधिक्य.

**बिच्चु** (ಬಿಚ್ಚು) (क) धा. – काढून टाकणें; सोडणें; निसरून पडणें; सोलणें; सोडविणें; झडणें; सैल करणें; रुंद करणें; विरळ करणें.

(क) ना. – भिक्षु; बौद्ध संन्यासी.

(अ-दे) ना. – विंचु; वृश्चिक.

**बिच्चुक (ग) त्ति** (ಬಿಚ್ಚುಕ [ಗ] ತ್ತಿ) (क) ना. – उपसलेली तलवार; म्यानांतून बाहेर काढलेली तलवार.

**बिच्चे** (ಬಿಚ್ಚೆ) (क) ना. – भिक्षा; भीक; याचना; वांझ; वंध्या.

**बिच्चोले** (ಬಿಚ್ಚೋಲೆ) (क) ना. – उघडलेलें पत्र; एक अलंकार.

**बिज** (ಬಿಜ) (क) ना. – समूह; गट; रास; गोकुळ; व्रज.

**बिजय** (ಬಿಜಯ) (क) ना. – विजय; यश; आकांक्षापूर्ति.

**बिजमाडु** (ಬಿಜಮಾಡು) (क) धा. – दया करविणें; येणें; आगमन होणें; येण्याची कृपा करणें.

**बिजयंगेय्** (ಬಿಜಯಂಗೆಯ್) (क) धा. – चित्त देणें; लक्ष देणें; कृपा करून येणें; नम्रतेनें मागणें.

**बिजयंगेरसु** (ಬಿಜಯಂಗೆಯ್ಸು) (क) धा. – कृपा करून येणें; लक्ष देणें; नम्रतेनें बोलावून आणणें.

**बिजण (णिके)** (ಬಿಜ್ಜಣ [ಣಿಕೆ]) (क) ना. – व्यंजन; पंखा; वारा घालणारा.

**बिजमहादेवि** (ಬಿಜ್ಜಮಹಾದೇವಿ) (क) ना. – एक शिवशरणा

**बिजल (लु)** (ಬಿಜ್ಜಲ [ಲು]) (क) ना. – बाण; शरसंधान; गौरव; मोठेपणा; गणितज्ञ; भास्कराचार्यांचें जन्मस्थान.

**बिज्जु** (ಬಿಜ್ಜು) (क) ना. – खादाड पक्षी; सत्यानाश; नाश.

**बिज्जे** (ಬಿಜ್ಜೆ) (क) ना. – विद्या; वाचन; अभ्यास; चिंतन.

**बिज्जेवल (ळ)** (ಬಿಜ್ಜೆವಲ [ಳ]) (क) ना. – विद्वान; पंडित; गणपति; विनायक.

**बिज्जोदर** (ಬಿಜ್ಜೋದರ) (क) ना. – विद्याधर; देववर्ग; किन्नर; गणपति.

**बिज्जोदरि** (ಬಿಜ್ಜೋದರಿ) (क) ना. – विद्याधरी; अप्सरा; किन्नरी.

**बिंज** (ಬಿಂಜ) (क) ना. – विंध्य; विंध्याचल.

**बिट्ठल** (ಬಿಟ್ಟಳ) (क) वि. – मोठा; अधिक.

**बिट्टि** (ಬಿಟ್ಟಿ) (क) ना. – वृष्टि; व्यक्ति; वेठ; एक; बिगार; विष्टी; निःशुल्क मजूर; जबरीनें करवलेलें काम.

**बिट्टिकु** (ಬಿಟ್ಟಿಕು) (क) धा. – ठेचून मारणें; बुकलणें.

**बिट्टिर्** (ಬಿಟ್ಟಿರ್) (क) धा. – पथारी पसरणें; वसती करणें; बिऱ्हाड टाकणें.

**बिट्टीरु** (ಬಿಟ್ಟೀರು) (क) ना. – बर्ची; भाला; भोसकण्यांचें हत्यार; ईट.

**बिडदि** (ಬಿಡದಿ) (क) ना. – अंथरूण; पथारी; बिऱ्हाड; तात्पुरतें वसतिस्थान.

**बिडय** (ಬಿಡಯ) (क) ना. – समूह; ढीग; भीड; दाक्षिण्य; विनय; क्रोध; स्पर्धा; कलह.

**बिडहु** (ಬಿಡಹು) (क) ना. – विश्रांति; मध्यंतर; सुट्टी.

**बिडा** (ಬಿಡಾ) (अ. दे.) ना. – पानपट्टी; विडा; तांबूल.

**बिडार** (ಬಿಡಾರ) (क) ना. – तात्पुरती वस्ती; क्षणिक वास्तव्य; बिऱ्हाड; बसेरा.

**बिडाल** (ಬಿಡಾಲ) (क) ना. – मांजर; मार्जार; कामी.

**बिडि(डु)** (ಬಿಡಿ [ಡು]) (क) वि. – एकटा; एकेक; प्रत्येक; वेगळाला.

**बिडिकु** (ಬಿಡಿಕು) (क) ना. – वेगळे होणें; वियोग; त्याग; रंध्र; फट; चीर.

**बिडिके** (ಬಿಡಿಕೆ) (क) ना. – सोडवणूक; उलगडा; विराम; विश्रांति; वेगळेपणा.

— **गंडबिडिके** (ಗಂಡಬಿಡಿಕೆ) (क) ना. – नवरा सोडणारी; त्यक्तभर्तृका. पतित्यागिनी.

**बिडिय** (ಬಿಡಿಯ) (क) ना. – दाक्षिण्य; संकोच; भीड; लाजाळूपणा.

**बिडिसु** (ಬಿಡಿಸು) (क) धा. – सोडविणें; सोडेलसें करणें; विस्तार करणें; चित्र रेखणें.

**बिडु** (ಬಿಡು) त्यागणें; टाकणें; दूर होणें; कमी करणें; हिशोबांत न घेणें; वसती करणें; बिऱ्हाड थाटणें.

(क) ना. – विराम; विश्रांति; मध्यंतर; सवलत; बिऱ्हाड.

**बिडुगडे** (ಬಿಡುಗಡೆ) (क) ना. – सुटका; विमोचन; विमुक्ति; मोक्ष.

# भ

भ (ಭ) (सं) ना.–प वर्गातील चौथें अक्षर; नक्षत्र; तारका; मेषादि बारा राशी.

—गण (ಗಣ) (सं) ना.–नक्षत्रसमूह; छंदःशास्त्रांतील भ गण.

भकुति (ಭಕುತಿ) (क) ना.–भक्ति; प्रीति; अनुराग.

भक्करे (ಭಕ್ಕರೆ) (क) ना.–जोंधळ्याची भाकरी; भाकर.

भक्त (ಭಕ್ತ) (सं) ना.–गुरु व देव याची भावयुक्त सेवा करणारा; भाविक; श्रद्धाळु; विश्वासु; पुजारी; भजक.

भक्तवत्सल (ಭಕ್ತವತ್ಸಲ) (सं) ना.–भक्तावर प्रेम करणारा; भक्ताला आपला मुलगा समजून माया करणारा.

भक्ति (ಭಕ್ತಿ) (सं) ना.–सेवा; आराधना; अनुराग; श्रद्धा; विश्वास; आदर; पूजनीयाविषयीचें प्रेम; पूजा; भजन.

—भाव (ಭಾವ) (सं) ना.–श्रद्धा; विश्वास; भाविकता.

—मार्ग (ಮಾರ್ಗ) (सं) ना.–सेवा; उपचार; ईश्वरप्राप्तीची वाट.

—योग (ಯೋಗ) (सं) ना.–ईश्वरप्राप्तीची भक्तरीति.

भक्ष (ಭಕ್ಷ) (सं) ना.–खाद्य; खाणारा; भरणपोषण; सेवन.

भक्षक (ಭಕ್ಷಕ) (सं) ना.–खाणारा; सेवा करणारा; संहारक; भोजक; सेवक.

भक्षण (ಭಕ್ಷಣ) (सं) ना.–खाणें; गिळंकृति; भरणपोषण; जेवण; भोजन.

भक्षि (ಭಕ್ಷಿ) (सं) ना.–खाणारा; भोगी; भोजक;

भक्षीसु (ಭಕ್ಷೀಸು) (अ. दे) ना.–बक्षीस; इनाम; संभावना; पुरस्कार.

भक्ष्य (ಭಕ್ಷ್ಯ) (सं) वि.–खाद्य; खाण्यासारखें; भोज्य. (सं) ना.–फराळाचे पदार्थ; आहारवस्तु.

—भोज्य (ಭೋಜ್ಯ) (सं) ना.–खाण्याचे पदार्थ;

भग (ಭಗ) (सं) ना.–ऐश्वर्य; संपत्ति; श्रीमंती; कांती; सूर्य; चंद्र; नक्षत्र; शक्ति; प्रीति; ज्ञान; कीर्ति; दैव; वैराग्य; देव; धर्म नियम; स्त्रीचें गुह्यांग; जननेंद्रिय; निरण.

भगंदर (ಭಗಂದರ) (सं) ना.–राजव्रण; आसनव्रण; लाल; माणिक.

भगवत् (ಭಗವತ್) (सं) ना.–परमेश्वर; ऐश्वर्यसंपन्न; देव.

भगवति (ती) (ಭಗವತಿ [ತೀ]) (सं) ना.–दुर्गा; पार्वती; ऐश्वर्य संपन्न स्त्री.

भगवद्गीते (ಭಗವದ್ಗೀತೆ) (सं) ना.–गीताग्रंथ; भगवान श्रीकृष्णानें अर्जुनाला सांगितलेली गीता.

भगवंत (ಭಗವಂತ) (सं) ना.–परमेश्वर; देव; ऐश्वर्य संपन्न.

भगवान (ಭಗವಾನ) (सं) ना. भगवंत. ईश्वर.

भगिनि (नी) (ಭಗಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–बहीण; सोदरी.

भगीरथ (ಭಗೀರಥ) (सं) ना.–इक्ष्वाकु वंशातील एक राजा; यानें स्वर्गांतून पृथ्वीवर गंगा आणली.

—प्रयत्न (ಪ್ರಯತ್ನ) (सं) ना.–अतिकष्ट; अतिश्रम.

भग्न (ಭಗ್ನ) (सं) वि.–फुटलेले; मोडलेले; नष्ट झालेले.

—मनोरथ (ಮನೋರಥ) (सं) वि.–निराश; असफल आकांक्षा.

—मानस (ಮಾನಸ) (सं) ना.–निरुत्साह; निराश मन.

भंग (ಭಂಗ) (सं) ना.–नाश; हानी; मोडतोड; कार्यहानी; निराशा; फूट; अधःपात; पराजय; हीनावस्था; असत्य; वंचना; तरंग; लाट.

भंगि (गी) (ಭಂಗಿ [ಗೀ]) (सं) ना.–हावभाव; अभिनय; नटनाट्य; क्रम; विधान; वापर; लाट; तरंग; छेद; झाडूवाला.

भंगित (ಭಂಗಿತ) (सं) वि.–मोडलेला; भग्न; नष्ट; तुकडे पडलेला.

—मुखभंगित (ಮುಖಭಂಗಿತ) (सं) वि.–अपमानित; अवमानित; थोबाड फोडलेला.

भंगिसु (ಭಂಗಿಸು) (क) धा.–मोडणें; नाश करणें; निरुत्साही करणें.

भंगुर (ಭಂಗುರ) (सं) वि.–अशाश्वत; नाश पावणारें; चंचल; अस्थिर.

—क्षणभंगुर (ಕ್ಷಣಭಂಗುರ) (सं) वि.–अस्थिर; चंचल; क्षणिक; वक्र; वाकलेलें.

—ते (ತೆ) (सं) ना.–नाश; चंचलपणा; अस्थिरता; अशाश्वती; भग्नता; संस्कार; सुधारणा; सिद्धता.

भजक (ಭಜಕ) (सं) ना.–भक्त; पूजारी; सेवक.

—दयालु (ದಯಾಳು) (सं) ना.–भक्तवत्सल; परमात्मा; भक्तावर प्रेम करणारा.

भजन (ने) (ಭಜನ [ನೆ]) (सं) ना.–स्तुति; पूजा; सेवा; नामघोष; स्तोत्र; गुणकीर्तन.

—विभजन (ವಿಭಜನ) (सं) ना.–वाटणी; वेगळेपणा; पृथक्त्व.

भजिसु (ಭಜಿಸು) (क) धा.–पूजा करणें; स्तुति करणें; आराधना करणें.

भंजक (ಭಂಜಕ) (सं) ना.–मोडणारा; नाश करणारा; पीडक.

—मूर्तिभंजक (ಮೂರ್ತಿಭಂಜಕ) (सं) ना.–मूर्ति फोडणारा.

भंजन (ಭಂಜನ) (सं) ना.–नाश; विध्वंसन.

—दुःखभंजन (ದುಃಖಭಂಜನ) (सं) ना.—दुःख निवारक देव; विघ्नहर्ता.
भट (ಭಟ) (सं) ना.—वीर; शूर सैनिक; लढवय्या; धीट पुरुष. 'वेंठ' पहा.
भट्ट (ಭಟ್ಟ) (सं) ना.—विद्वान; पंडित; कवि; मालक; भर्ता.
भट्टाचार्य (ಭಟ್ಟಾಚಾರ್ಯ) (सं) ना.—श्रेष्ठ; विद्वान; प्रकांड पंडित.
भट्टारक (ಭಟ್ಟಾರಕ) (सं) ना.—पूज्य; माननीय; सूर्य; स्तुतिपाठक; खुषमस्कऱ्या.
भट्टिनि(नी) (ಭಟ್ಟಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—स्वामिनी; मालकीण; यजमानीण; राजस्त्रिया.
भणितं (ಭಣಿತಂ) (सं) ना.—कथन केलेली गोष्ट. कथा; कथन.
भणिति (ಭಣಿತಿ) (सं) ना.—गोष्ट; कथन; वचन; सांगणें.
भंड (ಭಂಡ) (अ-दे) ना.—निर्लज्ज; निलाजरा; बडबड्या; विदूषक; विनोद करणारा; गोड्डी.
(क) ना.—पात्र; भांडे; भांडवल; व्यापारांतील मूलधन; युद्ध.
भंडन (ಭಂಡನ) (सं) ना.—रण; युद्ध; भांडण; संग्राम.
भं (बं) डार (ಭಂ [ಬಂ] ಡಾರ) (क) ना.—भांडार; कोश; खजिना; भंडागार; कोठार; कोठी; ओंजळ.
भंडिल (ಭಂಡಿಲ) (सं) वि.—दैवानें मिळालेले; दैवशाली; भाग्यवान; (सं) ना. अभिवृद्धि; उन्नति; वार्ताहर; बातमीदार; कलाकुशल.
भद्र (ಭದ್ರ) (सं) वि.—मंगलकर; शुभ; चांगले; सुरक्षित; घट्ट; बलिष्ठ; मनोहर; सुंदर; श्रेष्ठ; उत्तम; निरुपद्रवी.
—क (ಕ) (सं) ना.—घट्ट करण्याचे साधन; अडणा; खिटि.
भद्रकालि (ली) (ಭದ್ರಕಾಳಿ [ಳೀ]) (सं) ना.—पार्वती; महादेवी; दुर्गा.
भद्रगज (ಭದ್ರಗಜ) (सं) ना.—मंगलकर हत्ती; राजगज; राजाचा हत्ती.
भद्रमंटप (ಭದ್ರಮಂಟಪ) (सं) ना.—मंगल कार्यासाठीं घातलेला मांडव; विवाहमांडव.
भद्रश्री (ಭದ್ರಶ್ರೀ) (सं) ना.—चंदन; श्रीगंधाचे झाड; चंदनवृक्ष.
भद्रावति (ಭದ್ರಾವತಿ) (सं) ना.—यौवनाश्व राजाची राजधानी; म्हैसूर राज्यातील लोखंड कारखान्याचा गांव.
भद्रासन (ಭದ್ರಾಸನ) (सं) ना.—मंगलपीठ; सिंहासन; राजगादी.
भद्रा (द्रे) (ಭದ್ರಾ [ದ್ರೆ]) (सं) ना.—मंगला; एक नदी; सुंदरा.
भद्रेभ (ಭದ್ರೇಭ) (सं) ना.—राजहत्ती. मंगलकर हत्ती.
भय (ಭಯ) (सं) ना.—भय; भीति; घाबरेपणा; चावटपणा.
—ग्रस्त (ಗ್ರಸ್ತ) (सं) वि.—भीरु; भ्याड; भ्यालेला. भयानक; भीतीनें पछाडलेला.
भयंकर (ಭಯಂಕರ) (सं) वि.—भीतिदायक; भीकर; भीतिकारक.
भयभक्ति (ಭಯಭಕ್ತಿ) (सं) वि.—क्रूर देवतेची भक्ति; चंडिकापूजन; कालिकाराधन; विनीत अनुराग.
भयत्रस्त (ಭಯತ್ರಸ್ತ) (सं) वि.—भयकंपित; भयानें पीडलेला. भीत.
भयद्रुत (ಭಯದ್ರುತ) (सं) वि.—भीतीनें पळणारा; पळपुटा; शेपुट घालून पळणारा.
भयभ्रांत (ಭಯಭ್ರಾಂತ) (सं) वि.—भीतीनें गांगरलेला. भयानें भ्रमिष्ट; गोंधळलेला.
भयस्थ (ಭಯಸ್ಥ) (सं) वि.—भयभीत; भ्यालेला.
भयानक (ಭಯಾನಕ) (सं) वि.—भयंकर; भीति उत्पन्न करणारा. (सं) ना.—राहू; वाघ.
भयार्त (ಭಯಾರ್ತ) (सं) वि.—भयपीडित; भीतीनें घेरलेला.
भयावह (ಭಯಾವಹ) (सं) वि.—भिवविणारा; भीतिदायक.
भर (ಭರ) (सं) ना.—वेग; आवेग; तीव्रता; आधिक्य; भरपूरपणा; परिपूर्णता वाहक; धारक; त्राता; आशादायक; रक्षक; धारण करणारा.
भरण (ಭರಣ) (सं) ना.—पुरवठा; पोषण; रक्षण; निर्वाह; पगार; वेतन; भरपूरता.
भरण्य (ಭರಣ್ಯ) (सं) ना.—भरण्याला योग्य; मजूरी; निर्वाहक; पोष्य; भाडें; वेतन; पगार.
भरत (ಭರತ) (सं) ना.—नाट्यशास्त्राचा लेखक; जडभरत; दुष्यंतपुत्र; रामचंद्रबंधु.
भरतखंड (ಭರತಖಂಡ) (सं) ना.—भारतवर्ष; हिंदुस्थान; भारत; भरतभूमी; मातृभूमी.
भरतवर्ष (ಭರತವರ್ಷ) (सं) ना.—भारत देश; हिंदुस्थान.
भरतशास्त्र (ಭರತಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना.—नाट्यशास्त्र; अभिनय शास्त्र.
भरद्वाज (ಭರದ್ವಾಜ) (सं) ना.—एक ऋषि; द्रोणपिता; भारद्वाजपक्षी; नारायणपक्षी.
भरवस (से) (ಭರವಸ [ಸೆ]) (अ. दे) ना.—विश्वास; मान्यता; पाठिंबा; श्रद्धा.
भरिकै (ಭರಿಕೈ) (सं) ना.—शुंडा; सोंड.
भरित (ಭರಿತ) (सं) वि.—भरलेले; तुडुंब; पोसलेलें; वाढलेलें.
भर्ग (ಭರ್ಗ) (सं) ना.—शिव; प्रकाश; ज्योति; प्रकाशमय वस्तु.
भर्त (र्तार) (ಭರ್ತ [ಭರ್ತಾರ]) (सं) ना.—पोषक; पोशिंदा; पति; यजमान; संरक्षक.
भर्ति (रति) (ಭರ್ತಿ [ರತಿ]) (सं) ना.—समुद्राची भरती; भरण्याची क्रिया.

**भर्तृ** (ಭರ್ತೃ) (सं) ना. —पोसणारा; पति; भर्ता.

**भर्तृणी** (ಭರ್ತೃಣೀ) (सं) ना. —स्वामिनी; संरक्षिका; यजमानीण; मालकीण.

**भर्त्सन (ने)** (ಭರ್ತ್ಸನ [ನೆ]) (सं) ना. — निंदा; मानखंडना; हंगवणूक; दचका; घसरगुंडी.

**भर्म** (ಭರ್ಮ) (सं) ना. —सोनें

**भल (ला)** (ಭಲ [ಲಾ]) (क) अ. —गौरवोद्गार; वाहवा; छान; भले; चांगभला.

**भल्ल** (ಭಲ್ಲ) (सं) ना. —भाला; बरची; वीट; दान.

—**क (ल्लूक)** (ಕ [ಲ್ಲೂಕ]) (सं) ना. —अस्वल; जांबुवंत; रीस.

**भल्लातक** (ಭಲ್ಲಾತಕ) (सं) ना. —बिबा; बिब्याचें झाड.

**भल्ले (ल्लेय)** (ಭಲ್ಲೆ [ಲ್ಲೆಯ]) (क) ना. —भाली; बरची; वीट.

**भव** (ಭವ) (सं) ना. —संसार; प्रपंच; भूलोक; उत्पत्ति; स्थिति; जन्ममृत्यु; जन्मांतर; शिव; घर.

**भवक्षय** (ಭವಕ್ಷಯ) (सं) ना. —संसारनाश; जगप्रलय; जन्ममरणाचा फेरा चुकवणारा; ईश्वर; मोक्ष मिळवणारा.

**भवत्** (ಭವತ್) (सं) वि. —होणारा; असणारा; जन्मणारा. (सं) ना. —आपण; पूज्यपाद.

**भवति** (ಭವತಿ) (सं) क्रि. —होते; असते; राहते. (सं) ना. —आपण; पूज्यस्त्री; बाईसाहेब.

**भवदीय** (ಭವದೀಯ) (सं) वि. —आपले; तुमचे; आपल्यासंबंधी; तुमच्याविषयीं.

**भवदूर** (ಭವದೂರ) (सं) ना. —संसारापासून दूर ठेवणारा; देव; जननमरण चुकवणारा.

**भवन** (ಭವನ) (सं) ना. —जनन; जन्म; घर; निवास; आलय.

**भवभूति** (ಭವಭೂತಿ) (सं) ना. —एक संस्कृत नाटककार. उत्तररामचरित, मालतीमाधव, वगैरे नाटकांचा कर्ता; लौकिक; संपत्ति; भौतिक ऐश्वर्य.

**भवरोग** (ಭವರೋಗ) (सं) ना. —जन्ममृत्यूचा रोग; जननमरणाची व्याधी.

—**निवारक** (ನಿವಾರಕ) (सं) ना. —ईश्वर.

**भवरोगवैद्य** (ಭವರೋಗವೈದ್ಯ) (सं) ना. —ईश्वर; जन्ममरण चुकवणारा.

**भवानि** (ಭವಾನಿ) (सं) ना. —पार्वती; दुर्गा.

**भवि** (ಭವಿ) (सं) वि. —सांसारिक; प्रापंचिक; जीवी; लिंगधारण न केलेला.

**भवितव्य** (ಭವಿತವ್ಯ) (सं) ना. —दैव; पुढें होणारे; नशीब; भविष्य.

—**ता(ते)** (ತಾ [ತೆ]) (सं) ना. —भावी गोष्ट; भविष्यता.

**भविष्य** (ಭವಿಷ್ಯ) (सं) ना. —होणारे; पुढचे; भावी घटना; नशीब; अदृष्ट; दैव.

**भविष्यत्** (ಭವಿಷ್ಯತ್) (सं) वि. —भावी काळचे; पुढें होणारे.

**भविसु** (ಭವಿಸು) (क) धा. —होणें; उत्पन्न होणें; अस्तित्वांत येणें.

**भव्य** (ಭವ್ಯ) (सं) वि. —होणारे; भविष्य; योग्य; सुंदर; शुभकर; मंगलकर; अव्यक्त; जैनधर्म.

**भव्येतर** (ಭವ್ಯೇತರ) (सं) वि. —अनागरिक; असंस्कृत; जैनेतर.

**भषक** (ಭಷಕ) (सं) ना. —कुत्रें; ग्रामसिंह; सारमेय.

**भषण** (ಭಷಣ) (सं) ना. —कुत्र्याचें भुंकणें.

**भसित** (ಭಸಿತ) (सं) ना. —विभूति; राख; रक्षा.

—**अंग** (ಅಂಗ) (सं) ना. —भस्मधारी; बैरागी; शिव.

**भस्त्रा (स्त्रे)** (ಭಸ್ತ್ರಾ [ಸ್ತ್ರೆ]) (सं) ना. —भाता; फुंकर; वायुरोधक योगपद्धति; परसाकडचा उपद्रव. 'तिदि' पहा.

**भस्म** (ಭಸ್ಮ) (सं) ना. —राख; विभूति; भस्मासुर.

—**अंग** (ಅಂಗ) (सं) ना. —संन्यासी; शिवर.

—**लेपन** (ಲೇಪನ) (सं) ना. —विभूतिलेपन; भस्मचर्चन; उध्दूलन.

**भस्मसात्** (ಭಸ್ಮಸಾತ್) (सं) अ. —जळून राख झालेलें; खाक.

**भस्मासुर** (ಭಸ್ಮಾಸುರ) (सं) ना. —एक लोककंटक राक्षस.

**भळिरे** (ಭಳಿರೆ) (क) अ. —वाहवा; भले रे भले.

**भा** (ಭಾ) (सं) ना. —प्रकाश; कांति; तेज.

**भाग** (ಭಾಗ) (सं) ना. —अंश; तुकडा; पुण्य; अदृष्ट; भाग्य; स्थळ; प्रासाद; राजगृह.

**भागधेय** (ಭಾಗಧೇಯ) (सं) ना. —पुण्य; दैव; नशीबी आलेले.

**भागवत** (ಭಾಗವತ) (सं) ना. —भक्त; विष्णुपूजक; भगवत्संबंधी.

**भागवंदिग** (ಭಾಗವಂದಿಗ) (क) ना. —भागकारकून; भागाधिकारी; वाटेकरी; जोडीदार; संवगडी.

**भागाकार** (ಭಾಗಾಕಾರ) (सं) ना. —विभाजन; वाटणी; भागपाडणी; भागकरण.

**भागादि** (ಭಾಗಾದಿ) (सं) ना. —वारस; दायाद; सोदर.

**भागि** (ಭಾಗಿ) (सं) ना. —वाटेकरी; दायाद; भागेली; पातीदार; पात्र.

—**पुरोभागि** (ಪುರೋಭಾಗಿ) (सं) ना. —दोषैक दृष्टि.

**भागिनेय** (ಭಾಗಿನೇಯ) (सं) ना. —भाचा; बहिणीचा मुलगा.

**भागिसु** (ಭಾಗಿಸು) (क) धा. —वाटणें; भाग करणें; विभागणें; तुकडे करणें.

**भागीरथि (थी)** (ಭಾಗೀರಥಿ [ಥೀ]) (सं) ना. —भगीरथ प्रयत्नानें भूलोकी अवतरलेली गंगा नदी. गंगा

**भाग्य** (ಭಾಗ್ಯ) (सं) ना. —संपत्ति; धन; ऐश्वर्य; दैव; अदृष्ट; पुण्य.

**भाजक** (ಭಾಜಕ) (सं) ना. —विभागणारे; भागद्यावयाची संख्या.

**द्विभाजक** (ದ್ವಿಭಾಜಕ) (सं) ना.—दोन सारखे भाग पाडणारे उपकरण.

**भाजन** (ಭಾಜನ) (सं) ना.—भाग पाडण्याची क्रिया; योग्य; पात्र; भांडें; आश्रय; आधार.

**भाज्य** (ಭಾಜ್ಯ) (सं) ना.—भाग पाडावयाची संख्या; विभागण्यास योग्य.

**भाट (टक)** (ಭಾಟ [ಟಕ]) (सं) ना.—भाडें; मजूरी; वेतन; पगार; राजस्थानी प्रजा; राजवंश वर्णन करणारा.

**भाण** (ಭಾಣ) (सं) ना.—एकपात्री नाटक; रूपक प्रकार.

**भांड** (ಭಾಂಡ) (सं) ना.—पात्र; घागर; वस्तु; सामान; गृहोपयोगी वस्तु.

**भात** (ಭಾತ) (सं) ना.—चकचकीत; प्रकाशित; चकाकलेले; समजलेले; माहीत झालेले; अन्न; भात.

**भाति** (ಭಾತಿ) (सं) ना.—प्रकाश; चकाकी; जाणीव; समज.

**भान** (ಭಾನ) (सं) ना.—झळक; प्रकाश; जाणीव; जागृति.

**भानु** (ಭಾನು) (सं) ना.—सूर्य; उजेड; मालक; स्वामी; राजा; वृक्षविशेष.

**—ज** (ಜ) (सं) ना.—यम; सुग्रीव; कर्ण.

**—वार** (ವಾರ) (सं) ना.—रविवार; आदितवार.

**भापु** (ಭಾಪು) (क) अ.—भले; वाहवा; शाबास; धन्य.

**भाम** (ಭಾಮು) (सं) ना.—क्रोध; कांति; सूर्य; भावोजी; साडू.

**भामा (मे)** (ಭಾಮಾ [ಮೆ]) (सं) ना.—स्त्री; पत्नी; सत्यभामा.

**भामिनि** (ಭಾಮಿನಿ) (सं) ना.—स्त्री; सुंदरी; मानिनी; 'भामिनी' षट्पदी छंद (१४ व २३ मात्रांची चरणावली)

**भार** (ಭಾರ) (सं) ना.—ओझे; भारा; नको असलेले; अधिकचे वजन; परिणाम; खूण; सूभार; निरुपयोगी वस्तु.

**भारक** (ಭಾರಕ) (सं) ना.—ओझेकरी; भारवाहक; हमाल; ओझे; भार.

**भारणे** (ಭಾರಣೆ) (सं) ना.—गौरव; आधिक्य; मुबलकता; ओझे; गुरुत्व.

**भारत** (ಭಾರತ) (सं) ना.—भारतासंबंधी; अभिनयशास्त्रज्ञ; नट; हिंदू देश; भारत; महाभारत.

**भारति (ती)** (ಭಾರತಿ [ತೀ]) (सं) ना.—विद्यावती; सरस्वती; विद्वान; पंडित.

**भारतीय** (ಭಾರತೀಯ) (सं) ना.—भारताचा रहिवासी; हिंदु. हिंदुदेशवासी.

**भारद्वाज** (ಭಾರದ್ವಾಜ) (सं) ना.—द्रोणाचार्यांचे वडील; एक पक्षी.

**भारवि** (ಭಾರವಿ) (सं) ना.—एक संस्कृत महाकवि; 'किरातार्जुनीय' महाकाव्यकर्ता.

**भारि** (ಭಾರಿ) (सं) वि.—मोठा; जास्तीचा; गौरवान्वित. (सं) ना.—वजनदार; लोहमंजूषा; तिजोरी; पेढी.

**भारोद्धर** (ಭಾರೋದ್ಧರ) (सं) ना.—ओझे उचण्याची पुली; कप्पी; क्रेन; यारी.

**भारोद्धारक** (ಭಾರೋದ್ಧಾರಕ) (सं) ना.—कलथा; उलथाने; ओझे उचलण्याची तरफ; यारी; क्रेन.

**भार्गव** (ಭಾರ್ಗವ) (सं) ना.—भृगुवंशातील पुरुष; परशुराम; शिव; शुक्रग्रहसंबंधी.

**भार्गवि (वी)** (ಭಾರ್ಗವಿ [ವೀ]) (सं) ना.—पार्वती; लक्ष्मी; दूर्वा; हरळी; मूर्खकपि; भृगुप्रमाणें अविवेकी कृती करणारा.

**भार्या** (ಭಾರ್ಯಾ) (सं) ना.—पत्नी; बायको.

**भाल** (ಭಾಲ) (सं) ना.—कपाळ; निढळ; निटिल. 'नोसलु' पहा.

**—अंबक** (ಅಂಬಕ) (सं) ना.—शिव; कपाळावर डोळा असणारा.

**भाले** (ಭಾಲೆ) (सं) ना.—भाला; बरची; वीट; भोसकण्याचे आयुध.

**भाव** (ಭಾವ) (सं) ना.—अभिप्राय; इंगित; रहस्य; हावभाव; मौन; नट्टापट्टा; तर्कवितर्क; संकल्प; उद्देश; क्रिया; राहणी; सोंग; रसपोषक सामर्थ्य; भाट; चित्तवृत्ति.

**—आवेश** (ಆವೇಶ) (सं) ना.—भावनावशता; मग्नता; तंद्री; बेभानता.

**भाव (वु) क** (ಭಾವ [ವು]ಕ) (सं) वि.—सुंदर; इंगितज्ञ; रसज्ञ; पंडित; भक्त; भावनावश.

**भावकि** (ಭಾವಕಿ) (सं) ना.—रसज्ञा; भक्ति; सुंदरी; भाविनी.

**भावज** (ಭಾವಜ) (सं) ना.—कामविकार; मदन; मन्मथ.

**—अंतक** (ಅಂತಕ) (सं) ना.—शिव; कामसंहारक; कामाचे दमन करणारा.

**भावज्ञ** (ಭಾವಜ್ಞ) (सं) ना.—भाव जाणणारा; इंगित ओळखणारा; रसानुभवी.

**भावना** (ಭಾವನಾ) (सं) ना.—आलोचना; मनोधर्म; संकल्प; ध्यान.

**—वशते** (ವಶತೆ) (सं) ना.—भावोत्कटता; भावनेनें भारून जाणें; बेभानता.

**भाववित्** (ಭಾವವಿತ್) (सं) ना.—परेंगित जाणणारा; रहस्यज्ञ; रसज्ञ.

**भावशुद्धि** (ಭಾವಶುದ್ಧಿ) (सं) ना.—चित्तशुद्धि; मनाचा निर्मळपणा; स्पष्टाभिप्राय.

**भावांतर** (ಭಾವಾಂತರ) (सं) ना—वेगळे भाव; अन्य आलोचना; दुसरी भावना.

**—इसु** (ಇಸು) (क) धा.—मन बदलणें; भाव पालटणें; विपर्यांतर होणें.

**भावि** (ಭಾವಿ) (सं) वि भविष्यकालीन; पुढचा; होणारा.
—**काल** (ಕಾಲ) (सं) ना.—भविष्यकाळ.

**भाविक** (ಭಾವಿಕ) (सं) वि.—भावनावश; कोमल हृदयाचा; अंधभक्त; विश्वास ठेवणारा; श्रद्धाळु.

**भावित** (ಭಾವಿತ) (सं) वि.—समजून घेतलेला; मोजलेला; अनुमानित; गण्य; चांगला; जाणीवेचा.

**भावुक** (ಭಾವುಕ) (सं) वि.—कल्याणकर; शुभ; मंगल; आस्तिक; श्रद्धाळु; विश्वासुक; मृदु अंतःकरणाचा.

**भाषण** (ಭಾಷಣ) (सं) ना.—गोष्ट; भाषा; गप्पा; वक्तृत्व; वक्तव्य; उपन्यास.

**भाषांतर** (ಭಾಷಾಂತರ) (सं) ना.—तर्जुमा; अनुवाद; भाषा परिवर्तन; एका भाषेतून दुसऱ्या भाषेत आशय आणणें.

**भाषांतरिसु** (ಭಾಷಾಂತರಿಸು) (क) धा.—अनुवाद करणें; तर्जुमा करणें; भाषांतर करणें.

**भाषि** (ಭಾಷಿ) (सं) ना.—वक्ता; भाषण करणारा; उपन्यासक.

**भाषे (षा)** (ಭಾಷೆ [ಷಾ]) (सं) ना.—भाषण; बोलणें; शपथ; प्रतिज्ञा; विश्वासाचे बोल; वचन.

**भाष्य** (ಭಾಷ್ಯ) (सं) ना.—व्याख्यान; टीका; टिपण; कुलंकष विवरण.
—**कार** (ಕಾರ) (सं) ना.—मूळ ग्रंथाचा टीकाकार; विमर्शक; आलोचक.
—**महाभाष्य** (ಮಹಾಭಾಷ್ಯ) (सं) ना.—पाणिनीच्या सूत्रावरील पंतजलीचें विवरण.

**भाः** (ಭಾಃ) (सं) ना.—प्रकाश; कांति; चकाकी; दीप.

**भास** (ಭಾಸ) (सं) ना.—उजेड; प्रकाश; किरण; दीप्ति; एक संस्कृत नाटककार; एकांकिका लेखक.

**भासमान** (ಭಾಸಮಾನ) (सं) वि.—दिसणारे; प्रकाशणारे; मनाला उमगणारे; भावणारे.

**भासुर** (ಭಾಸುರ) (सं) वि.—चकाकणारे; प्रकाशणारे; भेसुर; भयंकर.
(सं) ना. भास्वरता; सौंदर्य; शोभा; शौर्य; कांति.
—**तर** (ತರ) (सं) वि.—अधिक कांतिमान्.
—**तम** (ತಮ) (सं) वि.—असाधारण तेजस्वी; श्रेष्ठ कांतीचे; अप्रतिम सौंदर्यशाली.

**भास्कर** (ಭಾಸ್ಕರ) (सं) ना.—सूर्य; अग्नि; गणिताचार्य; भास्कराचार्य.

**भास्वत्** (ಭಾಸ್ವತ್) (सं) वि.—चकाकणारे; प्रकाशणारे.

**भास्वान्** (ಭಾಸ್ವಾನ್) (सं) ना.—सूर्य; भास्कर.

**भाळ** (ಭಾಳ) (सं) ना.—भाल; कपाळ; निढळ.
—**अंबक,-नेत्र** (ಅಂಬಕ,-ನೇತ್ರ) (सं) ना.—शिव.

**भिकारि** (ಭಿಕಾರಿ) (सं) ना.—भिक्षुक; फिरस्ता; भटक्या.

**भिक्कु** (ಭಿಕ್ಕು) (क) ना.—भिक्षु; बौद्ध सन्यासी.

**भिक्ष (क्षा) (क्षे)** (ಭಿಕ್ಷ [ಕ್ಷಾ] [ಕ್ಷೆ]) (सं) ना.—भीक; गयावळ; भिक्षेकरी; याचक; भिक्षा.

**भिक्षाटनलीले** (ಭಿಕ್ಷಾಟನಲೀಲೆ) (सं) ना.—भिक्षेसाठी फिरती; शिवभिक्षेवरील काव्य.

**भिक्षु** (ಭಿಕ್ಷು) (सं) ना.—भीक मागणारा; संन्यासी; विरक्त.

**भिंडिवा (पा) ळ** (ಭಿಂಡಿವಾ [ಪಾ]ಳ) (सं) ना.—एक आयुध.

**भित्ति** (ಭಿತ್ತಿ) (सं) ना.—भिंत; चूर; तुकडा; भेदन.

**भिद** (ಭಿದ) (सं) ना.—फूट; चीर; फट.

**भिद्य** (ಭಿದ್ಯ) (सं) वि.—फुटण्यायोग्य; भेद होण्यासारखे; चीरफाड होण्यायोग्य.

**भिंदपाळ** (ಭಿಂದಪಾಳ) (सं) ना.—एक फेकून मारण्याचें आयुध;

**भिंदमाल** (ಭಿಂದಮಾಲ) (क) ना.—एक फेकून मारण्याचें शस्त्र.

**भिन्न** (ಭಿನ್ನ) (सं) वि.—अलग; विरळ; फुटलेले; तुकडे झालेले; उमललेले; मदस्राव झालेला.

**भिन्नभिन्न** (ಭಿನ್ನಭಿನ್ನ) (सं) वि.—वेगवेगळे; विविध; विभिन्न; तऱ्हेतऱ्हेचे.

**भिन्नभेद** (ಭಿನ್ನಭೇದ) (सं) ना.—भिन्नत्वाची जाणीव.

**भिन्नोदर** (ಭಿನ್ನೋದರ) (सं) ना.—सावत्र भाऊ.

**भिल्ल** (ಭಿಲ್ಲ) (सं) ना.—शबर; शिकारी; किरात; बेरड; वनचर.

**भिषक्** (ಭಿಷಕ್) (सं) ना.—वैद्य; आसव देणारा; डॉक्टर.

**भी** (ಭೀ) (सं) ना.—भीति; भय.

**भीकर** (ಭೀಕರ) (सं) वि.—भयंकर; भीतिदायक.
—**ता (ते)** (ತಾ [ತೆ]) (सं) वि.—भयप्रदता.

**भीत** (ಭೀತ) (सं) वि.—घाबरलेलें; भ्यालेलें; भित्रा; भ्याड; भीरू.

**भीति** (ಭೀತಿ) (सं) ना.—भय; घाबरगुंडी.

**भीते (ता)** (ಭೀತೆ [ತಾ]) (सं) ना.—भ्याड स्त्री; भीरु; भित्री.

**भीम** (ಭೀಮ) (सं) वि.—भयप्रद आकाराचा; बलशाली; कुंतीपुत्र; दमयंतीपिता भीमक; शिव.

**भीमकाय** (ಭೀಮಕಾಯ) (सं) वि.—बळकट देह असलेला; वज्रदेही.

**भीरु** (ಭೀರು) (सं) ना.—भित्रा; नपूंसक; तृतीय प्रकृती; अबला; भयभीत.

**भीषण** (ಭೀಷಣ) (सं) वि.—भयोत्पादक; भयंकर.

**भीष्म** (ಭೀಷ್ಮ) (सं) वि.—भयंकर; घोर.
(सं) ना.—शंतनुपुत्र; देवव्रत; भीष्माचार्य.
—**प्रतिज्ञे** (ಪ್ರತಿಜ್ಞೆ) (सं) ना.—घोर प्रतिज्ञा; अटळपण.

**भुक् (ज्)** (ಭುಕ್ [ಜ್]) (सं) वि.—खाणारा; भोजन करणारा.

भुक्त (ಭುಕ್ತ) (सं) वि.–खाल्लेले; अनुभवलेले; भोगलेले. (सं) ना.–आहार; अन्न.

—उज्झित (ಉಜ್ಝಿತ)(सं) वि.–उच्छिष्ट; खाऊन उरलेले.

भुक्ति (ಭುಕ್ತಿ) (सं) ना.–आहार; खाणेंपिणें; खाद्यपदार्थ; अंघोळ; ज्योतिषातील गणित.

भुग्न (ಭುಗ್ನ) (सं) वि.–वाकलेला; कलकेला; भग्न; तुटलेला; तिरवा.

भुज (ಭುಜ) (सं) ना.–हात; बाहु; खांदा; हातोपा.

—बल (ಬಲ) (सं) ना.–बाहुशक्ति; दंडातील सामर्थ्य; रट्ट्यांतील रग.

भुजकिरीट (ಭುಜಕಿರೀಟ) (सं) ना.–भुजालंकार.

भुजकीर्ति (ಭುಜಕೀರ್ತಿ) (सं) ना.–दंडत्राण; दंडावरील दागिना.

भुजबलि (ಭುಜಬಲಿ) (सं) ना.–जैन तीर्थंकराचें नांव; बाहुबली.

भुज (जं) ग (ಭುಜ [ಜಂ] ಗ) (सं) ना.–सर्प; नाग; विट; कामुक.

—भूषण (ಭೂಷಣ) (सं) ना.–नागभूषण; सर्पाभरण; शिव.

—वलय (ವಲಯ) (सं) ना.–तोळवंदी; गुजरिया; वांकी. 'वंकी' पहा; शिव.

—वैरि (ವೈರಿ) (सं) ना.–गरुड; मोर.

—शयन (ಶಯನ) (सं) ना.–विष्णु.

भुजंगम (ಭುಜಂಗಮ) (सं) ना.–राहू; साप; भुजग.

भुजादंड (ಭುಜಾದಂಡ) (सं) ना.–सोट्यासारखे दणकट बाहु.

भुजास्फालन (ಭುಜಾಸ್ಫಾಲನ) (सं) ना.–दंड थोपटणें; शड्डू; छड्डू.

भु (भुं) जिसु (ಭು [ಭುಂ] ಜಿಸು) (क) धा.–जेवणें; खाणें; सेवन करणें.

भुलवणि (ಭುಲ್ಲವಣಿ) (सं) ना.–संभ्रम; मोह; फुशारकी; फुंज.

भुलविसु (ಭುಲ್ಲವಿಸು) (क) धा.–भुलविणें; भुरळ घालणें; मोह पाडणें; फुगवणें.

भुवन (ಭುವನ) (सं) ना.–घर; सदन; लोक; जगत्; जनता; आकाश; पाणी; समुद्र; अरण्य.

—त्रिभुवन (ತ್ರಿಭುವನ) (सं) ना.–तीन लोक; त्रैलोक्य; (स्वर्ग; मृत्यु व पाताळ)

—मोहिनी (ಮೋಹಿನೀ) (सं) वि.–जगाला मोहविणारी; विश्वाला भुरळ पाडणारी; त्रिलोकसुंदरा; मोहिनी (विष्णुस्वरूपी).

भुवनकुक्षि (ಭುವನಕುಕ್ಷಿ) (सं) ना.–पोटात त्रिभुवन सामावणारा; कृष्ण; विष्णु.

भुवननयन (ಭುವನನಯನ) (सं) ना.–लोकचक्षु; सूर्य.

भुवनाभिराम (ಭುವನಾಭಿರಾಮ) (सं) ना.–त्रिलोकसुंदर; कामदेव; मदन.

भुवर् (स्) (ಭುವರ್ [ಸ್]) (सं) ना.–चौदा भुवनांपैकी एक; सप्तलोकांपैकी एक.

भू (ಭೂ) (सं) ना.–जमीन; पृथ्वी; भूलोक.

—मंडळ (ಮಂಡಲ) (सं) ना.–गोलाकार पृथ्वी.

भूकंप (ಭೂಕಂಪ) (सं) ना.–भूमिकंपन; जमिनीचा हादरा.

—दर्शक (ದರ್ಶಕ) (सं) ना.–जमिनीला हादरा

—लेखक (ಲೇಖಕ) बसल्याची व्याप्ति (स्थान व स्थिति) दाखवणारें यंत्र.

भूगत (ಭೂಗತ) (सं) वि.–भूमिगत; गुप्त; जमिनीत पुरून ठेवलेले; गाडलेले; (धन).

—शत्रु (ಶತ್ರು) (सं) ना.–गुप्तशत्रु; हितशत्रु.

भूगोल, (चक्र) (ಭೂಗೋಲ [ಚಕ್ರ]) (सं) ना.–भूमंडळ; भूमिवलय; पृथ्वीचा गोल.

भूचर (ಭೂಚರ) (सं) ना.–जमिनीवर राहणारे.

—प्राणि (ಪ್ರಾಣಿ) (सं) ना. भूमीवर जगणारे प्राणी; जीव.

भूज (ಭೂಜ) (सं) ना.–भूमीत जन्मणारे झाड, गवत वगैरे; मंगळ ग्रह.

भूजाता (ते) (ಭೂಜಾತಾ [ತೆ]) (सं) ना.–भूमिकन्या; सीता.

भूत (ಭೂತ) (सं) वि.–होऊन गेलेले; झालेले. (सं) ना.–पंच महाभूतें (पृथ्वी; जल; तेज; वायु आणि आकाश); पिशाच; प्राणी.

—काल (ಕಾಲ) (सं) ना.–गतकाळ.

—दया (ದಯಾ) (सं) ना.–प्राणिमात्रावरील प्रेम; जीवदया.

भूतधात्रि (ಭೂತಧಾತ್ರಿ) (सं) ना.–भूलोक; पृथ्वी.

भूतनाथ (पति) (ಭೂತನಾಥ [ಪತಿ]) (सं) ना.–पार्थिव वस्तूंचा मालक; शिव; परमेश्वर.

भूतपूर्व (ಭೂತಪೂರ್ವ) (सं) वि.–पूर्वी झालेले; मागें घडलेलें.

भूतबलि (ಭೂತಬಲಿ) (सं) ना.–प्राण्यांना घालण्याचें अन्न; प्राण्यांना दिलेला बळी.

भूतयज्ञ (ಭೂತಯಜ್ಞ) (सं) ना.–प्राण्यांना दैनिक बलिसमर्पण क्रिया (वैश्वदेव; काकबळी वगैरे).

भूतल (ळ) (ಭೂತಲ [ಳ]) (सं) ना.–भूमि; भूमंडल; पाताळ.

भूताटिके (ಭೂತಾಟಿಕೆ) (क) ना.–भूतचेष्टा; लबाडी; वंचना; फसवणूक.

भूतात्म (ಭೂತಾತ್ಮ) (सं) ना.–परब्रह्म; परमात्मा.

भूति (ಭೂತಿ) (सं) ना.–ऐश्वर्य; संपत्ति; अभ्युदय; कीर्ति; यश; भस्म; विभूति; अष्टसिद्धि; जन्म; उत्पत्ति; राहणी; अधिकार; गौरव.

भूदार (ಭೂದಾರ) (सं) ना.–जमीन फाटणें; भेग; दुर्भंगभूमी. रानडुक्कर; नांगर.
भूदेव (ಭೂದೇವ) (सं) ना.–ब्राह्मण.
भूदेवि (ಭೂದೇವಿ) (सं) ना.–भूमिदेवता; लक्ष्मी; विष्णुपत्नी.
भूधर (ध्र) (ಭೂಧರ [ಧ್ರ]) (सं) ना.–पर्वत; गिरी; राजा; आदिशेष.
भूप (पति) (ಭೂಪ [ಪತಿ]) (सं) ना.–राजा; भूमीचा मालक.
भूप्रदक्षिणे (ಭೂಪ್ರದಕ್ಷಿಣೆ) (सं) ना.–पृथ्वी प्रदक्षिणा; सुदूर पर्यटन; पृथ्वीपर्यटन.
भूभर (ಭೂಭರ) (सं) ना.–भूमिरक्षण; राज्यपरिपालन.
भूभार (ಭೂಭಾರ) (सं) ना.–भूमीला ओझें होऊन राहणें; पापाचें ओझें; खुशालचेंडू; खाऊनपिऊन भटकणारा.
भूभुज (ಭೂಭುಜ) (सं) ना.–भूमीचा उपयोग घेणारा; राजा.
भूभृत् (ಭೂಭೃತ್) (सं) ना.–भूमीचे पोषण करणारा; राजा; पर्वत; विष्णु.
—वैरि (ವೈರಿ) (सं) ना.–इंद्र.
भूम (मि) (ಭೂಮ [ಮಿ]) (सं) ना.–पृथ्वी; निमित्त; सबब; मिष; आव.
भूमध्यरेखे (ಭೂಮಧ್ಯರೇಖೆ) (सं) ना.–भूमध्यातून जाणारी काल्पनिक रेषा; विषुववृत्त; भूमीचा अक्ष.
भूमिके (ಭೂಮಿಕೆ) (सं) ना.–पाया; पात्र; वेष; प्रस्तावना; अंतस्थ; जमीन; कथावस्तु.
भूमिज (ಭೂಮಿಜ) (सं) ना.–मंगळग्रह; नरकासुर; झाडवेली.
भूमिजाते (जे) (ಭೂಮಿಜಾತೆ [ಜೆ]) (सं) ना.–भूमिजा; सीतादेवी.
भूयः (ಭೂಯಃ) (सं) अ.–पुनः; आणखी; फिरून.
भूयिष्ट (ಭೂಯಿಷ್ಠ) (सं) वि.–पुष्कळ; अतिशय; अधिक.
भूयिष्टं (ಭೂಯಿಷ್ಠಂ) (सं) अ.–अत्यंत.
भूरमे (मा) (ಭೂರಮೆ [ಮಾ]) (सं) ना.–वसुंधरा; भूलक्ष्मी; भूदेवी.
भूरि (ಭೂರಿ) (सं) वि.–पुष्कळ; अधिक; मोठा.
(सं) ना.–सोनें; शिव; चंद्र; विष्णु; ब्रह्मदेव; श्राद्धाचें जेवण.
भूरिमाय (ಭೂರಿಮಾಯ) (सं) ना.–राक्षस; कपटी; कोल्हा; मायावी.
भूरुह (ಭೂರುಹ) (सं) ना.–वृक्ष, गवत, वगैरे (भूमींत वाढणारे.)
भूलोल (ಭೂಲೋಲ)(सं) ना.–राजा; भूमीला आनंद देणारा.
भूषण (ಭೂಷಣ) (सं) ना.–अलंकार; दागिना; अंगाखांद्यावरील वस्तु; गृहभूषण; पुत्र; मूलबाळ.
भूषित (ಭೂಷಿತ) (सं) वि.–शृंगारित; अलंकृत.
भूषिसु (ಭೂಷಿಸು) (क) धा.–शृंगारणें; अलंकारणें; सजवणें; भूषविणें; शोभिवंत करणें.
भूषे (षा) (ಭೂಷೆ [ಷಾ]) (सं) ना.–आभरण; अलंकार; अंगाखांद्यावरील जडभारी.
भूसुत (ಭೂಸುತ) (सं) ना.–मंगळग्रह; नरकासुर.
भूसुते (ಭೂಸುತೆ) (सं) ना.–भूमिकन्या; सीता.
भूसुर (ಭೂಸುರ) (सं) ना.–ब्राह्मण; भूदेव.
भृ (ಭೃ) (सं) धा.–रक्षण करणें; भरणें; धारण करणें.
भृकुटि (टी) (ಭೃಕುಟಿ [ಟೀ]) (सं) ना.–भुवई; भ्रूभंगी; भुवई चढवणारा; भुवई वाकडी करणारा.
भृगु (ಭೃಗು) (सं) ना.–एक ऋषि; गुरुग्रह; जलप्रपात.
भृंग (ಭೃಂಗ) (ಅ) (क) ना.–भ्रमर; भुंगा; मधमाशी; डास; कलिंग पक्षी; जार; कामुक; एक वृक्ष.
भृंगार (ಭೃಂಗಾರ) (क) ना.–सोनें; सुवर्णकलश; गिंडी.
भृंगि (ಭೃಂಗಿ) (सं) ना.–भृंगी; शिवाचा द्वारपाल; शिवगणांपैकी एक.
भृत (ಭೃತ) (सं) वि.–भरलेलें; पुष्ट; आवरलेले.
भृत्य (ಭೃತ್ಯ) (सं) ना.–सेवक; चाकर; नोकर; दास; अंतेवासी; पालन करण्यास योग्य.
भृशं (ಭೃಶಂ) (सं) अ.–जास्ती; अधिक; तीव्रतेने; घाईनें.
भेक (ಭೇಕ) (सं) ना.–बेडूक; दुबळा; भित्रा.
भेकि (ಭೇಕಿ) (सं) ना.–बेडकी; दर्दुर.
भेद (ಭೇದ) (सं) ना.–फूट; वियोग; भाग; भिन्नता; तफावत; अंतर; फरक.
—बुद्धि (ಬುದ್ಧಿ) (सं) ना.–भेदभाव; वेगळेपणाची जाणीव; फूट; माझेतुझेपणा.
भेदक (ಭೇದಕ) (सं) वि.–भेद करणारा; व्यत्यास करणारा; फूट पाडणारा; टोंचणारा; अंगावर येणारा.
—मर्मभेदक (ಮರ್ಮಭೇದಕ) (सं) ना.–मर्मभेदणारे; अंतःकरणाला भिडणारे; काळजाला झोंबणारे; जखम करणारे.
भेदिसु (ಭೇದಿಸು) (क) धा.–भेदणें; फोडणें; वेगळे करणें; विभागणें; फाडणें; नाश करणें; उघडणें.
भेदि (ಭೇದಿ) (सं) ना.–फोडणारा; फूटपाड्या; वंचक; रेचक.
भेद्य (ಭೇದ್ಯ) (सं) वि.–फोडण्यास योग्य; चिरण्याजोगें; फूट पाडण्यासारखें; वेगळे करण्याजोगें.
भेरि (री) (ಭೇರಿ [ರೀ]) (सं) ना.–नगारा; ढोल; चर्मवाद्य.
भेरुंड (ಭೇರುಂಡ) (सं) ना.–दोन डोक्याचा पक्षी.
भेषज (ಭೇಷಜ) (सं) ना.–औषध; आसव; दारू; चिकित्सा.
भैरव (ಭೈರವ) (सं) ना.–शिवाचा संहारक अवतार; संगीतातील एक राग; भयंकर.

**भैषज्य** (ಭೈಷಜ್ಯ) (सं) ना.—दारू; आसव; औषध; चिकित्सा.

**भोक्त (क्तृ)** (ಭೋಕ್ತ [ಕ್ತೃ]) (सं) वि.—उपभोगणारा; चव घेणारा; फळ चाखणारा.

**भोक्तव्य** (ಭೋಕ್ತವ್ಯ) (सं) वि.—खाद्य; अनुभव घेण्यायोग्य; भोगलेच पाहिजे असे; प्रारब्ध.

**भोग** (ಭೋಗ) (सं) ना.—अनुभव; सेवन; सुखानुभूति; शरीर सौख्य; स्त्रीसंग; सेवा; सुश्रूषा; सर्पाची फडा

—**आसक्ति** (ಆಸಕ್ತಿ) (सं) ना.—सुखलोलुपता; ऐहिक सुखाची आवड; शरीरसुखमग्नता.

**भोगरति** (ಭೋಗರತಿ) (सं) ना.—नागलोक; पाताळ; पाताळगंगा; भोगप्रीति; स्त्रीसुखासक्ति; मैथुन.

**भोगलालसे** (ಭೋಗಲಾಲಸೆ) (सं) ना.—भोगासक्ति; सुखलोलुपता.

**भोगि** (ಭೋಗಿ) (सं) ना.—फणा असलेला सर्प; सुखी; अनुभविक; भोगणारा.

**भोगिकटक** (ಭೋಗಿಕಟಕ) (सं) ना.—नागभूषण; शिव; सर्पाभरण

**भोगिनि** (ಭೋಗಿನಿ) (सं) ना.—सर्पिणी; भोगलेली स्त्री; संग घडलेली स्त्री.

**भोगिप** (ಭೋಗಿಪ) (सं) ना.—आदिशेष; महासर्प.
(क) वि.—भोग घेणारा; उपभोगणारा; अनुभवी.

**भोगिभूषण** (ಭೋಗಿಭೂಷಣ) (सं) ना.—सर्पाकृति भूषणें वापरणारा; शिव.

**भोगिशयन** (ಭೋಗಿಶಯನ) (सं) ना.—शेषशायिन्; विष्णु.

**भोज** (ಭೋಜ) (सं) ना.—धारा नगरीचा एक राजा.

**भोजन** (ಭೋಜನ) (सं) ना.—खाना; जेवण; अन्नसेवन.

**भोज्य,** (ಭೋಜ್ಯ) (सं) वि.—खाण्यायोग्य; खाद्य; सेवनीय; (सं) ना.—आहार; सेवन.

**भोंगरे** (ಭೋಂಗರೆ) (क) धा.—भोंऽकाडपरसणें; भोंकार काढणें; बुभुक्कारणें
(क) ना.—भोंऽ भोंऽ ध्वनि.

**भौत (तिक)** (ಭೌತ [ತಿಕ]) (सं) वि.—पंच महाभूतासंबंधी; लौकिक; सृष्ट वस्तुसंबंधी.

—**शास्त्र** (ಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना.—सृष्ट वस्तुशास्त्र; प्रकृति शास्त्र.

**भौम** (ಭೌಮ) (सं) वि.—भूसंबंधी.
(सं) ना.—मंगळग्रह; भौमासुर.

**भ्रंश** (ಭ್ರಂಶ) (सं) ना.—प्राणच्युति; पतन; नाश; नष्टता; अधोगति; अवरोध; परागति; बडतर्फी.

**भ्रम (मे)** (ಭ್ರಮ [ಮೆ]) (सं) ना.—भ्रवंती गुंगळी; भोंगळपणा; भ्रांती; वेड; गैरसमज; विरुद्धविचार.

**भ्रमण** (ಭ್ರಮಣ) (सं) ना.—फिरती; हेलपाटा; फेरा; डोके-फिरूपणा; भ्रांती; उन्माद; उन्मत्तता.

**भ्रमर** (ಭ್ರಮರ) (सं) ना.—भृंगा; भवरा; चिलट; घुंगुरटें; मधमाशी; 'आरडि' पहा.

**भ्रमरारि** (ಭ್ರಮರಾರಿ) (सं) ना—चाफ्याचे फूल; चाफा; (चाफ्याचे वासानें भ्रमर मरतात.)

**भ्रमिसु** (ಭ್ರಮಿಸು) (क) धा.—भ्रमण करणें; खुळा होणें.

**भ्रष्ट** (ಭ್ರಷ್ಟ) (सं) वि.—पतित; अनीतिमान; पदच्युत; दुर्वर्तनी दुष्ट; समाजबहिष्कृत.

**भ्राज** (ಭ್ರಾಜ) (सं) ना.—चकाकी; कांती; शोभा; प्रकाश.

**भ्राजत्** (ಭ್ರಾಜತ್) (सं) वि.—चकाकणारा; प्रकाशमान; डोळे दिपवणारा.

**भ्राजित** (ಭ್ರಾಜಿತ) (सं) वि.—प्रकाशित; चकचकित; झळझळीत; दीप्त.

**भ्राजिष्ट** (ಭ್ರಾಜಿಷ್ಟ) (सं) ना.—कांतिमान्; नेत्रदीपक; अति प्रकाशमान.

**भ्रातृ** (ಭ್ರಾತೃ) (सं) ना.—भाऊ; सोदर; सहोदर.

**भ्रांत** (ಭ್ರಾಂತ) (सं) वि.—फिरलेला; प्रवास केलेला; भ्रमक; भोळसट; बावळट; वैलाड.
(सं) वि.—खुळा; मूढ; घाबरलेला; गांगरलेला.

**भ्रांति** (ಭ್ರಾಂತಿ) (सं) ना.—उन्माद; भोवळ; डोकेफिरूपणा; मतिविकार.

**भ्रामक** (ಭ್ರಾಮಕ) (सं) वि.—भ्रमोत्पादक; गैरसमज उत्पन्न करणारे; बुद्धीला चळ लावणारे; वेडगळ.
(सं) ना.—लोहकांत; चुंबक.

**भ्रुकुटि** (ಭ್ರುಕುಟಿ) (सं) ना.—भुवई; 'भ्रुकुटि' पहा.

**भ्रू (भ्रूकुटि)** (ಭ್ರೂ [ಭ್ರೂಕುಟಿ]) (सं) ना.—भुवई; भ्रुकुटी.

**भ्रूण** (ಭ್ರೂಣ) (सं) ना.—अर्भक; शिशु; बाल; गर्भस्थ मूल; गर्भपिंड.

—**हत्ये** (ಹತ್ಯೆ) (सं) ना.—गर्भपात; गर्भस्राव; शिशुहनन; मूल मारणें; गर्भपिंड पाडणें.

**भ्रूभंग** (ಭ್ರೂಭಂಗ) (सं) ना.—भुवई चढवणें; भ्रूवक्रता; भुवईनें खुणवणें; भुवईनें रागानुराग दर्शन.

**भ्रूलता (ते)** (ಭ್ರೂಲತಾ [ತೆ]) (सं) ना.—रेखीव भुवई; लतेसारखी दिसणारी भुवई.

# म

**म** (ಮ) (सं) ना.—प वर्गाचें पांचवें व्यंजन; शिव; विष्णु; ब्रह्मदेव; यम; चंद्र; पाणी; विष; कल्याण; सुख; समय; वेळ.

(सं) वि.—संख्यावाचकाला क्रमवाचक करण्याचा प्रत्यय.

**मकर** (ಮಕರ) (सं) ना.—मगर; सुसर; नक्र; एक प्रकारचा मासा; कुबेराचे एक भांडार; दहावा सौरमास; मकरराशि.

**—आकर (लय)** (ಆಕರ [ಲಯ]) (सं) ना.—समुद्र; मत्स्यालय.

**—कुंडल** (ಕುಂಡಲ) (सं) ना.—कानांतील एक दागिना.

**—केतन, (केतु)** (ಕೇತನ [ಕೇತು]) (सं) ना.—मदन; मन्मथ; काम.

**—तोरण** (ತೋರಣ) (सं) ना.—जाऊं तेथें नेतायेण्यासारखें तोरण.

**मकरंद** (ಮಕರಂದ) (सं) ना.—मध; पुष्परस; पराग; कोकिळा; मधमाशी; मोगरी; एक फूल.

**मकरपत्र** (ಮಕರಪತ್ರ) (सं) ना.—छाती; मान; हातावर गोंदलेलें रंगीत चित्र.

**मकरवृत्त** (ಮಕರವೃತ್ತ) (सं) ना.—भूगोलावरील सूर्य दक्षिणेकडे कलल्ल्याचें दाखवणारें वृत्त.

**मकरसंक्रमण** (ಮಕರಸಂಕ್ರಮಣ) (सं) ना.—सूर्यगति दक्षिणेकडून कर्कवृत्ताकडे झुकण्याच्या वेळचा सण; संक्रांत.

**मकराश्व** (ಮಕರಾಶ್ವ) (सं) ना.—वरुण; मकरवाहन.

**मकरि (रिके)** (ಮಕರಿ [ರಿಕೆ]) (सं) ना.—प्राचीन काळी स्त्रीची छाती, मान वगैरेवर काढलेलें चित्र; मगरी.

**मकुट (मुकुट)**, (ಮಕುಟ [ಮುಕುಟ) (सं) ना.—शिरोभूषण; किरीट.

**—वर्धन** (ವರ್ಧನ) (सं) ना.—राजा; सम्राट.

**म (मं) कुर,** (ಮ [ಮಂ] ಕುರ,) (सं) ना.—आरसा; दर्पण; कळी; बकुलवृक्ष; अरेबियन मोगरा; कुंभाराचे चाक फिरवण्याची काठी.

**मक्कड** (ಮಕ್ಕಡ) (क) ना.—मर्कट; माकड; वानर; कपि.

**मक्करि** (ಮಕ್ಕರಿ) (क) ना.—बांबूच्या बेळाची बुट्टी. फडा.

**मक्का** (ಮಕ್ಕಾ) (अ-दे) ना.—मुसलमानाचे पवित्र यात्रास्थळ.

**मक्क** (ಮಕ್ಕು) (क) ना.—दिव्याचा कोळी; जळकी वात; वातीची काजळी.

**मक्षि (क्षी) का** (ಮಕ್ಷಿ [ಕ್ಷೀ]ಕಾ) (सं) ना.—माशी; मधमाशी.

**—मल** (ಮಲ) (सं) ना.—मेण.

**मख** (ಮಖ) (सं) ना.—यज्ञ; याग; क्रतु.

**—अरि,-वैरि** (ಅರಿ-ವೈರಿ) (सं) ना.—राक्षस; दक्षयज्ञाचा नाश करणारा शिव; वीरभद्र.

**मगध** (सं) ना.—बिहारच्या दक्षिण भागाचे प्राचीन नांव; पिंपळी.

**मगमगिसु** (ಮಗಮಗಿಸು) (क) ना.—घमघमणें; सुगंध दरवळणें; सुगंधणें; सुवास सुटणें.

**मगुड** (ಮಗುಡ) (क) ना.—मुकुट; किरीट.

**मगुळ्** (ಮಗುಳ್) (क) धा.—मागे सरणें; हटणें; मागें फिरणें; अंगावर शेकणें.

**मगुळे** (ಮಗುಳೆ) (क) अ.—आणखी पुनः; आणखी एकदा; मागें फिरून.

**मगुळ्चु** (ಮಗುಳ್ಚು) (क) धा.—पसरवणें; पुढें रेटणें; वळवणें; डोके खालीं करणें; पालथे घालणें.

**मगुळ्दुं** (ಮಗುಳ್ದುಂ) (क) अ.—आणखी पुनः फिरून.

**मगे** (ಮಗೆ) (क) ना.—मघा नक्षत्र; एक पावसाळी नक्षत्र.

**मग्ग** (ಮಗ್ಗ) (क) ना.—माग; विणण्याचें यंत्र; विणण्याचें साधन.

**मग्गिसु** (ಮಗ್ಗಿಸು) (क) धा.—पीडा देणें; त्रास देणें; लपविणें; दृष्टि आड करणें; गमावणें; घालवणें; शमविणें

**मग्गु (ळ्गु)** (ಮಗ್ಗು [ಳ್ಗು]) (क) धा.—थकणें; वापरणें; झिजणें; निस्तेज होणें; कोमेजणें; क्षीण होणें; नाश करणें; पूड करणें; ठार मारणें; वाकवणें.

**मग्गुलु (ग्गलु)** (ಮಗ್ಗುಲು [ಗ್ಗಲು]) (क) ना.—बाजू; पक्ष; पार्श्व; शेजार.

**—आगु** (ಆಗು) (क) धा.—फिरणें; बाजूला होणें; वाट सोडणें; जाऊं देणें.

**मग्न** (ಮಗ್ನ) (सं) वि.—बुजलेला; बुडलेला; निरत; लीन.

**मघव (वन्)** (ಮಘವ [ವನ್] (सं) ना.—इंद्र; देवेंद्र; घुबड; व्यासमुनी.

**मघात्रयोदशि** (ಮಘಾತ್ರಯೋದಶಿ) (सं) ना.—भाद्रपद कृ. १३

**—भव** (ಭವ) (सं) ना.—शुक्र.

**मंक** (ಮಂಕ) (क) ना.—गैरसमज; खुळेपणा; (क) वि. भ्रमिष्ट; बेशुद्ध.

**मंकु** (ಮಂಕು) (क) ना.—खुळेपणा; बेअकलीपणा; वेडा; भ्रमिष्ट; मूढता; जाड्य; भ्रांति; कांतिहीनता.

**मंग** (ಮಂಗ) (क) ना.—माकड; कपि; हुप्या; नावेचे टोक; अभीप्सित.

**मंगमुष्टि** (ಮಂಗಮುಷ್ಟಿ) (क) ना.—कपिमुष्टि; घट्ट धरणें.

**मंगल (ळ)** (ಮಂಗಲ [ಳ]) (सं) वि.—शुभंकर; कल्याणकारक सुंदर; चांगले; मनोहर; सुलक्षणी; प्रगतिशील.

(क) ना.–मंगल नक्षत्र; अदृष्ट; सुदैव; कल्याण; आनंद; शुभसूचना; काव्यनाटकांच्या आदीचें वा अंतीचें पद.

**मंगलकार्य** (ಮಂಗಲಕಾರ್ಯ) (सं) ना.–शुभ कार्य; (लग्न मुंज सारखे).

**मंगलगौरि** (ಮಂಗಲಗೌರಿ) (सं) ना.–पार्वती; शुभंकरी; मंगळागौर.

**मंगलाच्छाये** (ಮಂಗಲಾಚ್ಛಾಯೆ) (सं) ना.–अतिशीतल छाया; थंड सावली.

**मंगलपाठक** (ಮಂಗಲಪಾಠಕ) (सं) ना.–स्तुतिपाठक; राजांना स्वस्तिवाचन गाणारा; पुराणिक.

**मंगलस्नान** (ಮಂಗಲಸ್ನಾನ) (सं) ना.–शुभकार्यारंभीचें स्नान.

**मंगलसूत्र** (ಮಂಗಲಸೂತ್ರ) (सं) ना.–पतीच्या नावानें विवाहांत बांधलेले मंगलसूत्र. विवाहमांगल्य.

**मंगला (ले)** (ಮಂಗಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–धर्मपत्नी; पतिव्रता; विनयवती स्त्री.

**मंगलाक्षते** (ಮಂಗಲಾಕ್ಷತೆ) (सं) ना.–शुभकार्यातील रंगीत मंत्राक्षता; कुंकुममिश्रित मंगलाक्षता.

**मंगलाचरण** (ಮಂಗಲಾಚರಣ) (सं) ना.–काव्य नाटकांतील नांदीश्लोक.

**मंगलारति** (ಮಂಗಲಾರತಿ) (सं) ना.–शुभसूचक आरति; शुभप्रसंगी लावलेली दीपज्योत; नीरांजन.

**मंगलाष्टक** (ಮಂಗಲಾಷ್ಟಕ) (सं) ना.–लग्नामुंजींत म्हणावयाची आठ मंगलपद्यें; वधूवराच्या मांगल्यचिंतनाचीं पद्यें.

**मचर्चिका** (ಮಚರ್ಚಿಕಾ) (सं) प्रत्यय–तमभाव दर्शक अंत्य प्रत्यय.

**मच्च (च्चे)** (ಮಚ್ಚ [ಚ್ಚೆ]) (क) ना.–अंगावरील मत्स्य; तीळ; खूण; लासे; कस लावण्यासाठी उपयोगांत आणावयाचे सोन्या चांदीचें तुकडे.

**मच्चर** (ಮಚ್ಚರ) (क) ना.–मत्सर; पोटदुखी; असुया; पीडा.
—**इग** (ಇಗ) (क) वि.–द्वेष करणारा; मत्सरी.

**मच्चु, मेच्चु** (ಮಚ್ಚು, ಮೆಚ್ಚು) (क) धा.–मनाला येणें; मान्यता देणें; वाहवा मिळवणें.
(क) ना.–संभावना; मान्यता; पारितोषिक; झाडें तोडण्याची कुऱ्हाड; फरशी; प्रीति; आस्था; जोडणी.

**मच्चु को (गो) डु** (ಮಚ್ಚುಕೊ [ಗೊ] ಡು) (क) धा.–पोषाख देणें; इनाम देणें; संभावना करणें.

**मच्चुगत्ति** (ಮಚ್ಚುಗತ್ತಿ) (क) ना.–चिवे तोडण्याची लांबट फरशी.

**मच्चुगार** (ಮಚ್ಚುಗಾರ) (क) ना.–लोकाचे मन वळवणारा; लोकांना रमवणारा; ऐट करणारा; ओळखणारा.

**मच्चुगाति** (ಮಚ್ಚುಗಾತಿ) (क) ना.–दुसऱ्याचे मन आकर्षिणारी स्त्री. मायाविनी; नट्टापट्टा करणारी स्त्री.

**मच्छ** (ಮಚ್ಛ) (सं) ना.–मत्स्य; मीन.

**मच्छयंत्र** (ಮಚ್ಛಯಂತ್ರ) / **मच्चयंत्र** (ಮಚ್ಚಯಂತ್ರ) (सं) ना.–होकायंत्र; दिक्चक्र; द्रौपदी स्वयंवरातील फिरता मत्स्य.

**मजड** (ಮಜಡ) (क) वि.–मद्दड; बत्थड; मूर्ख; अज्ञानी.

**मजभापु** (ಮಜಭಾಪು) (क) अ.–भले; शाबास; वाहवा.

**मजकूरु** (ಮಜಕೂರು) (अ.दे) ना.–बातमी; खबर; वार्ता; विषय.

**मजा** (ಮಜಾ) (अ.दे) ना.–मौज; विनोद; विलास; चेष्टा.

**मजूरि** (ಮಜೂರಿ) (अ.दे) ना.–कूलि; भांडे; पगार; रोजंदारी; रोजमुरा.

**मज्ज (ज्जा) (ज्जे)** (ಮಜ್ಜ [ಜ್ಜಾ] ಜ್ಜೆ) (सं) ना.–मेधस; मज्जा; हाडांतील सत्त्व.

**मज्जन** (ಮಜ್ಜನ) (सं) ना.–मार्जन; स्नान; आंघोळ; झाडलोट; स्वच्छता; निर्मळपणा.

**मज्जासार** (ಮಜ್ಜಾಸಾರ) (सं) ना.–वीर्य; माज; मेद; मेंदु; हाडातील रस; फोपसेपणा; वात.

**मझ (भापु)** (ಮಝ [ಭಾಪು]) (क) ना.–वाहवा; छान; भले; प्रशंसोद्गार.

**मंचक** (ಮಂಚಕ) (सं) ना.–पलंग; खाट; बाज; उंचीवरील निद्रासन.

**मंचिका (के) (गे)** (ಮಂಚಿಕಾ [ಕೆ] ಗೆ) (सं) ना.–माचा; पीक राखण्यासाठीं बांधलेली माची; दागिना.

**मंजर** (ಮಂಜರ) (सं) ना.–फुलांचा तुरा; मोती; तिळवण; तिळाचे झाड; मांजर; कामी.

**मंजरि (री)** (ಮಂಜರಿ [ರೀ]) (सं) ना.–घोस; गुच्छ; तुरा; कळी; मोहोर; मोती; ओळ; वेल; तुळस.

**मंजरित** (ಮಂಜರಿತ) (सं) वि.–घोस असलेलें; पालवी असलेलें; शाखा फुटलेले.

**मंजा** (ಮಂಜಾ) (सं) ना.–शेळी; बकरी; अजा; पुष्पगुच्छ; वेल.

**मंजि (जी)** (ಮಂಜಿ [ಜೀ]) (सं) ना.–स्तबक; ताटवा; पुष्पगुच्छ; केळीचें झाड; वेल.

**मंजिका** (ಮಂಜಿಕಾ) (सं) ना.–रांड; वेश्या; राजनर्तकी.

**मंजिम** (ಮಂಜಿಮ) (सं) ना.–सौंदर्य; लालित्य.

**मंजीर** (ಮಂಜೀರ) (सं) ना.–पायातील साखळी; पैंजण; घागऱ्या; घुसळ खांब; मंथा.

**मंजील** (ಮಂಜೀಲ) (सं) ना.–परीटाचे गांव.

**मंजु** (ಮಂಜು) (क) ना.–हिम; धुके; बर्फ; शीत; कुंदपण; कांति हीनता; अंधार; तीन्हीसांज.

—गड्डे (ಗಡ್ಡೆ) (क) ना.—बर्फ; हिम.
मंजु (ಮಂಜು) (सं) वि.—मनोहर; आल्हादक; रुचकर; चांगले; गोड; शीतल.
—केशि (ಕೇಶಿ) (सं) ना.—कृष्ण.
—गमन (ಗಮನ) (सं) ना.—हंस.
—गर्त (ಗರ್ತ) (सं) ना.—नेपाळ.
— घोष (ಘೋಷ) (सं) ना.—गोड आवाज; गोड भाषा.
—नाशी (ನಾಶೀ) (सं) ना.—सुंदरा; दुर्गा; इंद्राणी.
—पाठक (ಪಾಠಕ) (सं) ना.—पोपट; राघु.
—प्राण (ಪ್ರಾಣ) (सं) ना.—ब्रह्म.
—भाषि,—वाक् (ಭಾಷಿ-ವಾಕ್) (सं) वि.—गोड बोल्या; मंजुळवाची; मधुरभाषी.
—स्वर (न) (ಸ್ವರ [ನ]) (सं) ना.—मधुरध्वनि; कोकिला.
मंजुल (ळ) (ಮಂಜುಲ [ಳ]) (सं) वि.—मधुर; सुंदर.
(सं) ना.—लतागृह; कुंज-मंडप; बुडबुडा; फुगा; कारंजा; विहीर.
मंजूष (ಮಂಜೂಷ) (सं) ना.—पेटी; संदूक; कपाट; करंडक; दगड; पाषाण.
मट (आटमट) (ಮಟ [ಆಟಮಟ] (क) ना.—फसवणूक; वंचना; ठकाई; गडबड; घाई.
मट्ट (ಮಟ್ಟ) (क) ना.—प्रमाण; माप; सरळपण; समानता; समभावना; माडी; स्थळ; मान.
मट्टस (ಮಟ್ಟಸ) (क) अ.—प्रमाणशीर; मापाला धरून.
मट्टि (ಮಟ್ಟಿ) (क) ना.—मृत्तिका; माती; गोपीचंदन; टेकडी; चढाव; 'इळ्ळण' पहा.
मट्टिगे (ಮಟ್ಟಿಗೆ) (क) अ.—पर्यंत; तोंवर; मात्र.
मट्टु (ಮಟ್ಟು) (क) ना.—माप; मर्यादा; योग्यता; परिमाण; शक्ति; संगीतातील एक धाटी.
मठ (ಮಠ) (सं) ना.—भव्य मंदिर; देवस्थान; संन्यासी निवास; अभ्यासगृह; पाठशाळा; बैलगाडी.
मठपति (ಮಠಪತಿ) (सं) ना.—मठाचा स्वामी; महंत; धर्माधिकारी; शवसंस्कार करणारा; जंगम.
मठर (ಮಠರ) (सं) वि.—निशा; कैफ; अमल.
मठिका (ಮಠಿಕಾ) (क) ना.—दुकान; पेठ; दुकानांची जागा; झोपडी; लहान घर. 'मळिगे' पहा.
मड (ಮಡ) (क) ना.—टाच; पायाचा मागचा भाग; थर; पुट; पाण्याचा पाट; मठ; टाकलेलें अन्न.
मडके (ಮಡಕೆ) (क) ना.—मडके; मातीचें भांडें; मटकी; एक धान्य.
मड (डं) गु (ಮಡ [ಡಂ] ಗು) (क) धा.—लपविणें; झाकून ठेवणें.
मडगूळ् (ळु) (ಮಡಗೂಳ್ [ಳು]) (क) ना.—उष्टें; उच्छिष्ट; आहार.
मडचु (सु) (ಮಡಚು [ಸು]) (क) धा.—घाण होणें; चुरगळणें; कंटाळणें; दुर्वासना धरणें.
मडदि (ಮಡದಿ) (क) ना.—स्त्री; पत्नी; बायको.
मडमुरि (ಮಡಮುರಿ) (क) धा.—पाऊल मागें घेणें; पाठ फिरवणें; मागे हटणें.
मडल् (लु) (ಮಡಲ್ [ಲು]) (क) धा.—विस्तार पावणें; फोफावणें; अधिक होणें; दाट होणें; फाटणें; फट पडणें.
(क) ना.—काथ्याची हतरी; चटई; काथ्या; झाडी.
मडलिडु (ಮಡಲಿಡು) (क) धा.—अधिक होणें; उल्लंघणें; विपुल होणें; जिंकणें; पोटानें सरपटणें; सावकाश चालणें; वृद्ध होणें; त्रस्त होणें.
मडहु (ಮಡಹು) (क) ना.—टाच; पायाचा घोटा; मठ; थर; पुट. 'मड' पहा.
मडि (ಮಡಿ) (क) धा.—मरणें; मृत्यु पावणें; घडी पडणें; वाकणें.
(क) वि.—धूत; शुद्ध; पवित्र.
(क) ना.—धूतवस्त्र; घडी; सोवळे; नेसण; गादा; जमीन; मळी; मळई; वाफा; आळें; काटा.
मडिके (ಮಡಿಕೆ) (क) ना.—'मडके' पहा; मातीची घागर; कुंभ.
मडिते (ಮಡಿತೆ) (क) ना.—निरी; घडी.
मडिपु (ಮಡಿಪು) (क) धा.—ठार करणें; खुनाला कारण होणें.
मडिबक्के (ಮಡಿಬಕ್ಕೆ) (क) ना.—मोडी; यौवनपीटिका; पुटकुळी.
मडिल् (लु) (ಮಡಿಲ್ [ಲು]) (क) ना.—पोट; ओचा; ओटी; ओग.
मडिवळ (ಮಡಿವಳ) (क) ना.—परीट; धोबी.
मडिवळिति (ಮಡಿವಳಿತಿ) (क) ना.—धोबीण; कपडे धुणारी.
मडिवु (वुह) (ಮಡಿವು [ವುಹ]) (क) ना.—मृत्यु; मरण.
मडिसु (चु) (ಮಡಿಸು [ಚು]) (क) धा.—मरेलसे करणें; ठार मारणें; घडी घालणें; निरी करणें.
मडु (डुवु) (ಮಡು [ಡುವು]) (क) ना.—पाण्याचा स्रोत; डोह.
(क) धा.—फुलांची माळ गुंफणें; हार करणें.
मडुह (ಮಡುಹ) (क) ना.—खून; वध; घात; आवड; जुळणी.
मडुहु (ಮಡುಹು) (क) धा.—ठार करणें; मारणें. 'मडिपु' पहा.
मडे (ಮಡೆ) (क) ना.—लहान बांध; बंधारा; धरण; उष्टें.

मडेय (ಮಡೆಯ) (क) वि.—मूर्ख; खुळा; अजाण; आडमुठा; असंस्कृत; कच्चा.
मड्ड (ಮಡ್ಡ) (क) वि.—माठ्या; मठ्ठ; मूर्ख; गावडा; खेडवळ; अडाणी; माठ; धड्ड.
मड्डु (ಮಡ್ಡು) (क) ना.—धड्डपणा; मूर्खता; अनागरिकता; राड; गाळ; चिखल; पुरणाचा गोळा; मूर्ख स्त्री; सुगंधी द्रव्य.
मणक (ಮಣಕ) (क) ना.—पहिल्या वीताची गाय–म्हैस; वासरू; रेडकू.
मणिल् (लु) (ಮಣಲ್ [ಲು]) (क) ना.—वाळू; फूल; वालुका प्रदेश.
मणि (ಮಣಿ) (क) धा.—वाकणें; नमस्कार करणें; लवणें; वाकवणें; पराजित होणें; भिणे; वश होणें; मागे होणें. 'एरगु' पहा.
(क) ना.—पाट; आसन; वेदिका.
(सं) ना.—रत्न; माणिक; खडा; भूषण; अलंकार; श्रेष्ठता; मनगट; जलपात्र.
—खचित (ಖಚಿತ) (सं) वि.—रत्नजडित; पैलू पाडलेले. (रत्न)
मणिकट्टु (ಮಣಿಕಟ್ಟು) (क) ना.—मणिबंध; मनगट.
मणिकार (ಮಣಿಕಾರ) (सं) ना.—रत्नपारखी; सराफ; जव्हेरी; रत्नाचा व्यापारी; पैलू पाडणारा.
मणिचौकट्टु (ಮಣಿಚೌಕಟ್ಟು) (क) ना.—शाळेतील मण्याची चौकट; मुलानां अंक शिकविण्याकरतां केलेली मण्यांची चौकट.
मणितारक (ಮಣಿತಾರಕ) (सं) ना.—सारस; बकपक्षी.
मणिपुर (ಮಣಿಪುರ) (सं) ना.—बभ्रुवाहनाची राजधानी.
मणिबंध (ಮಣಿಬಂಧ) (सं) ना.—मनगटावरील दागिना; पोची; मनगट्या; बिंदल्या; मनगट.
मणिमंच (ಮಣಿಮಂಚ) (सं) ना.—रत्नखचित पलंग; राजशय्या.
मणिय (ह) (ಮಣಿಯ [ಹ]) (क) ना.—शासन; नोकरी; पदवी.
मणियगार (ಮಣಿಯಗಾರ) (क) ना.—ग्राम, देवस्थान वगैरेचा पंच; महाजन.
मणिशिले (ಮಣಿಶಿಲೆ) (सं) ना.—फरशी; रत्न; हिरा; खडा.
मणिह (ಮಣಿಹ) (क) ना.—वांक; नमस्कार; शरणागति; आधीनता; सेवा.
मणिहार (ಮಣಿಹಾರ) (सं) ना.—रत्नमाला; कंठा; कंठी.
(क) ना.—राजवाड्यांतील व्यवस्थापक; राजगृहाधिकारी.
मणे (णि) (ಮಣೆ [ಣಿ]) (क) ना.—आसन; गादी; पीठ.
मणेगार (ಮಣೇಗಾರ) (क) ना.—महाजन; गावपंच; ग्रामशासक
मंटप (ಮಂಟಪ) (क) ना.—मंडप; छप्पर; मांडव; गुंफा; पर्णकुटी; कुंज; विश्रांतिस्थान.
मंटिके (ಮಂಟಿಕೆ) (क) ना.—अंगठी; काचेची अंगठी.
मंड (ಮಂಡ) (सं) ना.—साय; स्निग्ध पदार्थ; राड; चिखल; श्रृंगार; अलंकार; बेडूक; एरंड; शिरीष वृक्ष.
मं , (मंडिगे) (ಮಂಡಕ;[ಮಂಡಿಗೆ]) (सं) ना.—मांडा; अतिपातळ साखरपोळी.
मंडन (ಮಂಡನ) (सं) ना.—अलंकार; विषयनिरूपण; समर्थन; विचारविन्यास; विवेचन.
मंडनायोग (ಮಂಡನಾಯೋಗ) )सं) ना.—हत्तीची झूल.
मंडप (ಮಂಡಪ) (क) ना.—मांडव; छप्पर; मंटप.
मंडल (ಮಂಡಲ) (सं) ना.—वर्तुळ; वलय; खळे; संघ; गट; राष्ट्रक; छोटा देश; वेटोळें घातलेला साप.
मंडलाग्र (ಮಂಡಲಾಗ್ರ) (सं) ना.—औषधीसेवन सप्ताह; भुताटकी काढण्याचें आवार; ऋग्वेद भाग; सुदर्शन; सुगंध.
मंडलाधिपति (ಮಂಡಲಾಧಿಪತಿ) (सं) ना.—मंडलेश्वर; मंडलेश; राष्ट्रकाचा अधिपति; प्रांताधिकारी.
मंडलि (ली) (ಮಂಡಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—समूह; गट; संघ; एक सर्पजाति; मांजर; कुत्रें; झाडू; देशाधिकारी.
मंडविगे (ಮಂಡವಿಗೆ) (क) ना.—मंडपी; लहान मांडव; छपरी; झोपडी.
मंडळ (ಮಂಡಳ) (सं) ना.—चक्रव्यूह; वर्तुळ; चक्रवाक; चक्र.
मंडळिसु (ಮಂಡಳಿಸು) (क) धा.—गुंडाळणें; गुडाळी करणें; सुरळी करणें; एकत्रित करणें.
मंडि (ಮಂಡಿ) (क) ना.—वातरोग; गुडघीरोग; दुकान; पेठ; मंडई; 'मळिगे' पहा.
मंडिगे (ಮಂಡಿಗೆ) (क) ना.—मांडा; पातळ साखरपोळी.
मंडित (ಮಂಡಿತ) (सं) वि.—मांडलेले; श्रृंगारलेलें; अलंकृत; समर्थन केलेलें.
मंडिसु (ಮಂಡಿಸು) (क) धा.—मांडणें; मांडणी करणें; प्रस्थापणें; श्रृंगारणें; दृष्टिकोण बदलणें.
मंडूक (ಮಂಡೂಕ) (सं) ना.—बेडूक.
—प्लुति (ಪ್ಲುತಿ) (सं) ना.—बेडकाची उडी. उड्या मारीत पळणें.
मंडूर (ಮಂಡೂರ) (सं) ना.—लोहभस्म; लोखंडाचें कीट; जंग; एक रसायन. 'तुक्कु' पहा; एक रत्न.
मंडे (ಮಂಡೆ) (क) ना.—डोके; मुंड; रुंड; शिर.
मंडोदरि (ಮಂಡೋದರಿ) (सं) ना.—रावणपत्नि; सुंदरी; कामिनी.
मण्णाळु (ಮಣ್ಣಾಳು) (क) ना.—सेवक; मजूर; पगारी नोकर; शेतकरी.
मण्णिन मग (ಮಣ್ಣಿನ ಮಗ) (क) ना.—शेतकरी; रयत; भूमिपुत्र.
मण्णुग (ಮಣ್ಣುಗ) (क) मा.—भौतिकवादी; विज्ञानी.

**मणुहुळ** (ಮಣ್ಣುಹುಳ) (क) ना.–काडू; गांडूळ; आमिष.
**मत्** (ಮತ್) (सं) ना.–माझे
**मत** (ಮತ) (सं) वि.–सुचलेलें; स्फुरलेलें.
(सं) ना.–अभिप्राय; आशय; पंथ; जाति; कबुली; अनुमती; आलोचना; मत; उपदेश.
—**अंतर** (ಅಂತರ) (सं) ना.–पहिलें मत सोडून घेतलेलें दुसरें मात. अन्यपंथस्वीकार. अभिप्रायबदल.
—**आचार** (ಆಚಾರ) (सं) ना.–सांप्रदायांतील रीतभात. नियम.
—**दान** (ದಾನ) (सं) ना.–मत देणें; मतानें केलेली निवड.
—**स्थ** (ಸ್ಥ) (सं) ना.–विशिष्ट पंथस्वीकार; विशिष्ट पक्ष घेणें.
**मतंग** (ಮತಂಗ) (सं) ना.–हत्ती; मेघ; एक ऋषि.
**मतंगज** (ಮತಂಗಜ) (सं) ना.–हत्ती.
**मति** (ಮತಿ) (सं) ना.–बुद्धि; समजूत; ज्ञान; निर्णय; मन; विचार; आलोचना; मान्यता; उद्देश; अभिप्राय; कल्पना; परिणाम; दृष्टि; युक्ति; निर्धार; निश्चय; आशा आकांक्षा; स्मरण; आठवण.
—**पूर्व** (ಪೂರ್ವ) (सं) अ.–बुध्द्या; बुद्धिपूर्वक; उद्देशानें.
—**प्रकर्ष** (ಪ್ರಕರ್ಷ) (सं) ना.–बौद्धिक वाद; नैपुण्य.
—**भ्रम,–विभ्रम** (ಭ್ರಮ–ವಿಭ್ರಮ) (सं) ना.–बुद्धिभ्रंश; गैरसमज; गोंधळ.
—**वंत** (ವಂತ) (सं) वि.–जाणता; बुद्धिवान; ज्ञानी.
—**हीन** (ಹೀನ) (सं) वि.–अजाण; मठ्ठ.
**मतिविकळ** (ಮತಿವಿಕಳ) (सं) वि.–निर्बुद्ध; अजाण.
**मतीय** (ಮತೀಯ) (सं) वि.–मतासंबंधीं; विशिष्ट मत आचरणारा.
**मत्कुण** (ಮತ್ಕುಣ) (सं) ना.–ढेकूण; चिलट; डास; लहान हत्ती; रेडा; सुळे न आलेला हत्ती.
**मत्त** (ಮತ್ತ) (सं) वि.–माजलेला; फुगलेला; झिंगलेला; अमल चढलेला; भ्रमिष्ट; चळ लागलेला; गर्विष्ठ.
(सं) ना.–माजलेला हत्ती; रेडा; मोर; धोतरा; धत्तुरा.
—**आलंब** (ಆಲಂಬ) (सं) ना.–आवाराचें कुंपण.
—**इभ** (ಇಭ) (सं) ना.–मस्त हत्ती.
—**काशिनि (नी)** (ಕಾಶಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–सुंदरी.
—**नाग, वारण** (ನಾಗ–ವಾರಣ) (सं) ना.–माजलेला हत्ती.
**मत्तं** (ಮತ್ತಂ) (क) अ.–आणखी पुनः.
**मत्ति** (ಮತ್ತಿ) (क) ना.–अर्जुनवृक्ष; तीळ; लासे; अंगावरील चिन्ह; तारा.
**मत्तिन** (ಮತ್ತಿನ) (क) वि.–दुसरे; बाकी; आणखी एक.
**मत्तु** (ಮತ್ತು) (क) ना.–उन्माद; भ्रम; बेभानता; कैफ; अहंकार.
(क) अ.–आणखी; आणि; तसेच; समुच्चयवाचक अव्यय.
**मत्ते (त्ता)** (ಮತ್ತೆ [ತ್ತಾ]) (सं) वि.–झिंगलेली; अमल चढलेली; कैफी; मस्त; माजलेली.
(क) अ.–त्यानंतर; फिरून; पुनः; नंतर.
**मत्तेभविक्रीडित** (ಮತ್ತೇಭವಿಕ್ರೀಡಿತ) (सं) ना.–मस्त हत्तीचा विलास; एक एकाक्षरी छंद.
**मत्य** (ಮತ್ಯ) (सं) वि.–ज्ञान; साधन; ज्ञानार्जनाचा उपाय.
**मत्यतीत** (ಮತ್ಯತೀತ) (सं) वि.–बुद्धीच्या आटोक्याबाहेरचें; केवळ ज्ञानानें साध्य न होणारे.
(सं) ना.–ईश्वर; परमात्मा.
**मत्सर** (ಮತ್ಸರ) (सं) ना.–पोटदुखी; असूया; सूड; लोभ.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.–द्वेष करणें; पोटदुखी करणें.
**मत्स्य** (ಮತ್ಸ್ಯ) (सं) ना.–मासा; एक प्राचीन देश. विष्णूचा पहिला अवतार.
—**केतन** (ಕೇತನ) (सं) ना.–मन्मथ; मदन; काम.
—**गंधी (धे)** (ಗಂಧೀ [ಧೆ]) (सं) ना.–शंतनूची द्वितीय पत्नी.
—**बंध (धी)** (ಬಂಧ [ಧೀ]) (सं) ना.–कोळी; धीवर; मासे धरणारे.
—**यंत्र** (ಯಂತ್ರ) (सं) ना.–द्रौपदीस्वयंवरांतील मीनचक्र.
**मत्स्यकन्ये** (ಮತ್ಸ್ಯಕನ್ಯೆ) (सं) ना.–मनुष्यदेवधारी मीनकन्या.
**मत्स्योदर** (ಮತ್ಸ್ಯೋದರ) (सं) ना.–विराट राजा.
**मत्स्योदरी** (ಮತ್ಸ್ಯೋದರೀ) (सं) ना.–सत्यवती.
**मत्स्योदरीय** (ಮತ್ಸ್ಯೋದರೀಯ) (सं) ना.–व्यास.
**मथन** (ಮಥನ) (सं) ना.–तुकडा; खांडोळी; खून; नाश; मिश्रण; विषयमंथन; खोल विचार; जखम; घर्षण; घोटणी.
**मथनाग** (ಮಥನಾಗ) (सं) ना.–मेरूपर्वत.
**मथित** (ಮಥಿತ) (सं) वि.–तोडलेला; खोल विचारपूर्वक अभ्यासलेला; ठार मारलेला.
(सं) ना.–रहस्य; तात्पर्य; सारांश.
**मथितार्थ** (ಮಥಿತಾರ್ಥ) (सं) ना.–विचारपूर्वक घेतलेला निर्णय; सार; महत्त्वाची गोष्ट; शेवट; परिणाम; 'तीर्पु' पहा.
**मथिसु** (ಮಥಿಸು) (क) धा.–तोडणें; चर्चिणें; खोल विचार करणें; खून करणें.
**मद** (ಮದ) (सं) ना.–माज; गर्व; अहंकार; कैफ; विसर; कस्तुरी; मध; वीर्य; रेत; गंडस्थळांतील रस; इंद्रिय विकार; भ्रम; उन्माद.

—**अंध** (ಅಂಧ) (क) वि.—मस्तीनें अंधळा झालेला; कोणालाहि न जुमानणारा.

—**अंधते** (ಅಂಧತೆ) (सं) ना.—बेफिकिरी; बेगुमानी.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—मस्ती करणें; अहंकार धरणें.

—**गज** (ಗಜ) (सं) ना.—माजलेला हत्ती.

—**गजगमने** (ಗಜಗಮನೆ) (सं) ना.—मस्त हत्तीप्रमाणें डुलत जाणारी; गजगामिनी.

**मदग** (ಮದಗ) (क) ना.—जलाशय; मोठें तळें; सरोवर.

**मदजल** (ಮದಜಲ) (सं) ना.—मदस्राव; गंडस्थळांतून स्रवणारा रस.

**मदड** (ಮದಡ) (क) वि.—मठ्ठ; मूर्ख; भोंगळ; खुळा; अजाण.

**मदडु** (ಮದಡು) (क) ना.—धड्डपणा; मूर्खता; आलस्य; चेंगटपणा.

**मदन** (ಮದನ) (सं) ना.—काम; मन्मथ; व्यामोह; इंद्रियप्रेम; धोतरा; मादक पदार्थ; मधमाशीचें मेण.

—**अरि, वैरि** (ಅರಿ;–ವೈರಿ) (सं) ना.—शिव.

—**ध्वंसि–हर** (ಧ್ವಂಸಿ–ಹರ) (सं) ना.—शिव.

—**तात–पित** (ತಾತ–ಪಿತ) (सं) ना.—विष्णु.

—**मित्र** (ಮಿತ್ರ) (सं) ना.—संपत्ति; धन.

**मदनलेख** (ಮದನಲೇಖ) (सं) ना.—प्रणयपत्र; प्रेमपत्र.

**मदनि** (ಮದನಿ) (सं) ना.—बटमोगरी; मोगरी.

**मदपु** (ಮದಪು) (क) ना.—अव्यवस्था; विद्रूपता; चीर; एक प्रकारचें स्त्रियाचें वस्त्र.

**मदप्लव** (ಮದಪ್ಲವ) (सं) ना.—हत्तीचें मदोदक; मदस्राव.

**मदमुख** (ಮದಮುಖ) (सं) ना.—दुष्ट मनुष्य; दुर्भाषी; गर्विष्ठ.

**मदर** (ಮದರ) (क) ना.—संतोष; हर्ष.

**मदराग** (ಮದರಾಗ) (क) ना.—मद्यपी; काम; कोंबडा.

**मदरंग (गि)** (ಮದರಂಗ [ಗಿ]) (क) ना.—मेंदी; मेंदीचें झाड.

**मदलिग (लिंग)** (ಮದಲಿಗ [ಲಿಂಗ]) (क) ना.—वधु.

**मदवळि (णि) ग** (ಮದವಳಿ [ಣಿ]ಗ) (क) ना.—वर; लग्नाचा मुलगा; उपवधु पुत्र.

**मदवळि (णि) गिति** (ಮದವಳಿ [ಣಿ]ಗಿತಿ) (क) ना.—वधु; लग्नाची मुलगी; उपवर कन्या.

**मदालसा** (ಮದಾಲಸಾ) (सं) ना.—सुंदरी; मदानें सावकाश चालणारी; ठुमकणारी.

**मदिरा (रे)** (ಮದಿರಾ [ರೆ]) (सं) ना.—मद्य; आसव; दारू; शिंदी; शराब; होडगा; अमली पेय.

**मदिल् (लु)** (ಮದಿಲ್ [ಲು]) (क) ना.—प्राकार; तट; भिंत.

**मदिसु** (ಮದಿಸು) (क) धा.—माजणें; मस्तीला येणें; धुंदी चढणें; निशा येणें.

**मदीय** (ಮದೀಯ) (सं) वि.—माझें; माझ्याशी संबंध असलेले.

**मदु** (ಮದು) (क) ना.—मध; मधु; मकरंद.

**मदुमग** (ಮದುಮಗ) (क) ना.—लग्नाचा मुलगा; वर; नवरदेव.

**मदुमगळु** (ಮದುಮಗಳು) (क) ना.—लग्नाची मुलगी; वधु; नवरी.

**मदुवक्कॅळ्** (ಮದುವಕ್ಕಳ್) (क) ना.—लग्नाचे वधुवर.

**मदुवे** (ಮದುವೆ) (क) ना.—लग्न; विवाह; परिणय.

**मदेभ** (ಮದೇಭ) (सं) ना.—मत्तगज; माजलेला हत्ती; मस्तवारण

**मदोत्कट** (ಮದೋತ್ಕಟ) (सं) वि.—अतिमत्त; मदांध.

**मदोद्धत** (ಮದೋದ್ಧತ) (सं) वि.—माजलेला; धुंज चढलेला; उन्माद झालेला.

**मदोन्मत्त** (ಮದೋನ್ಮತ್ತ) (सं) वि.—मदोद्धत; उन्मत्त; मदमस्त.

**मद्गु (ळगु)** (ಮದ್ಗು [ಳ್ಗು]) (क) ना.—एक पक्षी; पाणकावळा.

**मद्दतु (त्तु)** (ಮದ್ದತು [ತ್ತು]) (अ.दे) ना.—साहाय्य; मदत; हातभार.

**म(मु) द्दले (ळे)** (ಮ [ಮು]ದ್ದಲೆ [ಳೆ]) (क) ना.—मृदंग; ढोलकें; दोन्ही बाजूनें वाजवावयाचें चर्मवाद्य.

**मद्दु** (ಮದ್ದು) (क) ना.—औषध; रोगनिवारक साधन; दारू; बंदुकीची दारू.

**म (मो) द्दु** (ಮ [ಮೊ]ದ್ದು) (क) ना.—धड्डु; मठ्ठ; मूर्ख; धुकें; मूर्खत्व; मूढपणा.

**मद्दुगुणिके** (ಮದ್ದುಗುಣಿಕೆ) (क) ना.—धोतऱ्याचें झाड; धत्तुरबीज. धोतऱ्याचें बी; पिवळा धोतरा.

**मद्य** (ಮದ್ಯ) (सं) ना.—मदिरा; सुरा; दारु; आसव.

—**गोष्टि (ष्ठि)** (ಗೊಷ್ಟಿ [ಷ್ಠಿ]) (सं) ना.—दारुड्यांचा तांडा; दारुगुत्ता; दारूचा पिठा; अड्डा.

—**पान** (ಪಾನ) (सं) ना.—दारू पिणें; सुरापान.

—**पायि,–पी** (ಪಾಯಿ–ಪೀ) (सं) ना.—दारुडा; पियक्कड; निशाबाज.

**मद्यवाचि** (ಮದ್ಯವಾಚಿ) (सं) ना.—उत्साहध्वनि; कोकिलरव; कोमल शब्द.

**मधु** (ಮಧು) (क) वि.—गोड; रुचकर;

(सं) ना.—मध; मकरंद; पुष्परस; ज्येष्ठमध; अमृत; पाणी; अशोकवृक्ष; वसंतमास; आसव; रावणाचा मेहुणा; एक राक्षस; उद्देश.

**मधुकर** (ಮಧುಕರ) (सं) ना.—मधुव्रत; मधमाशी; भ्रमर; मधुप.

**मधुकरि** (ಮಧುಕರಿ) (सं) ना.—मधमाशी; मक्षिका.

**मधुकेश्वर** (ಮಧುಕೇಶ್ವರ) (सं) ना.—शिव; वनवासा येथील कदंबांचे देवालय.

मधुदूति (ಮಧುದೂತಿ) (सं) ना.—मधुमालती; कोकिळ.
मधुप (ಮಧುಪ) (सं) ना.—भ्रमर; भुंगा; मद्यपी; दारुड्या.
मधुपर्क (ಮಧುಪರ್ಕ) (सं) ना.—वधुगृहीं स्वागतार्थ वराला दिलेले मधुमिश्रित पेय; थोरांचें आतिथ्य.
मधुपान (ಮಧುಪಾನ) (सं) ना.—मद्यपान; दारू पिणें.
—गोष्टि (ಗೋಷ್ಟಿ) (सं) ना.—दारूबाजांचा तांडा.
मधुप्राशन (ಮಧುಪ್ರಾಶನ) (सं) ना.—मद्यपान; दारू पिणें.
मधुप्रिय (ಮಧುಪ್ರಿಯ) (सं) ना.—भ्रमर; मधमाशी; मधुप.
मधुभूभुज | मधुभूमीश (ಮಧುಭೂಭುಜ) (सं) ना.—वसंतराजा. (ಮಧುಭೂಮೀಶ) वसंतऋतु; ऋतुराज.
मधुमक्षिका (ಮಧುಮಕ್ಷಿಕಾ) (सं) ना.—मधमाशी; मधुकर.
मधुमंदिर (ಮಧುಮಂದಿರ) (सं) ना.—मोहोळ; मधमाशांचें पोळें; मधुसंग्रह.
मधुमहीश (ಮಧುಮಹೀಶ) (सं) ना.—वसंतकाळ.
मधुमाधवि (ಮಧುಮಾಧವಿ) (सं) ना.—वसंतऋतूत बहरणारी माधवी लता.
मधुमास (ಮಧುಮಾಸ) (सं) ना.—वसंतमास; चैत्र महिना.
मधुमित्र (ಮಧುಮಿತ್ರ) (सं) ना.—भ्रमर; भुंगा; मधमाशी; वसंत; शिव; बलभद्र.
मधुमेह (ಮಧುಮೇಹ) (सं) ना.—मूत्रांतून अधिक साखर जाणारा एक रोग; मूत्ररोग.
मधुर (ಮಧುರ) (सं) वि.—गोड; रुचकर; स्वारस्यपूर्ण; मनोहर; प्रिय; आनंददायी; थंड
(सं) ना.—गोड पदार्थ; एक कन्नड कवि.
मधुरस (ಮಧುರಸ) (सं) ना.—मध; ऊस; उसाचा रस.
मधुराशन (ಮಧುರಾಶನ) (सं) ना.—मिष्टान्न; पक्वान्न.
मधुरिपु (वैरी) (ಮಧುರಿಪು [ವೈರಿ]) (सं) ना.—मधुराक्षसाला मारणारा; कृष्ण; विष्णु.
मधुरे (रा) (ಮಧುರೆ [ರಾ]) (सं) ना.—मदुरा; दक्षिण भारतांतील एक प्रसिद्ध शहर.
मधुरिमे (ಮಧುರಿಮೆ) (सं) ना.—माधुर्य; मधुरता; रुचि; रुचकरपणा.
मधुवन (ಮಧುವನ) (सं) ना.—मधुराक्षसाचें निवासस्थान, मदुरेजवळचें एक वन; वसंतोद्यान.
मधुव्रत (ಮಧುವ್ರತ) (सं) ना.—मधुप; मधुकर; भ्रमर.
मधुसूदन (ಮಧುಸೂದನ) (सं) ना.—कृष्ण; विष्णु.
मधूच्छिष्ट (ಮಧೂಚ್ಛಿಷ್ಟ) (सं) ना.—पोळयाचें मेण.
मध्य (ಮಧ್ಯ) (सं) ना.—केंद्र; मधोमधची जागा; कमर.
—गेह–मंदिर (ಗೇಹ–ಮಂದಿರ) (सं) ना.—गाभारा; गर्भागार; मध्वाचार्यांचें जन्मस्थान.
—म (ಮ) (सं) वि.—मधला; केंद्रांत असणारा.
(सं) ना.—अर्जुन; संगीतांतील चौथा स्वर.
—रेखा (खे) (ರೇಖಾ [ಖೆ]) (सं) ना.—विषुववृत्त; डोकीवरील भांग.
—वर्ति –स्थ (ವರ್ತಿ–ಸ್ಥ) (सं) वि.—मध्यावरचा; केंद्रीय.
(सं) ना.—पंच; निर्णय देणारा; निवाडा करणारा.
मध्यमा (ಮಧ್ಯಮಾ) (सं) ना.—प्रौढा; मध्यम वयाची नायिका; प्रौढ स्त्री.
मध्या (ध्ये) (ಮಧ್ಯಾ [ಧ್ಯೆ]) (सं) ना.—मध्यमा नायिका.
मध्यान्ह (ಮಧ್ಯಾಹ್ನ) (सं) ना.—दोन प्रहर; सूर्य डोक्यावर राहण्याचा काळ.
मध्यें (ಮಧ್ಯೇ) (सं) अ.—मधोमध; मध्यें, केंद्रस्थानीं.
मध्व (ಮಧ್ವ) (सं) ना.—मध्व; द्वैतमतप्रस्थापक मध्वाचार्य.
—नवमी (ನವಮಿ) (सं) ना.—मध्वाचार्यांची जन्मतिथी; मध्वजयंती.
मनः (नस्सु) (ಮನಃ [ನಸ್ಸು]) (सं) ना.—चित्त; लक्ष; ज्ञान; अंतःकरण; चैतन्य.
—क्लेश (ಕ್ಲೇಶ) (सं) ना.—मानसिक त्रास; वैमनस्य; कष्ट.
मनकत (ಮನಕತ) (क) ना.—मनःक्षत; मनःक्षोभ; हृदयांतील कालवाकालव; व्यसन; संकट; दुःख; कोप; राग.
मनका (गा) णु (ಮನಕಾ [ಗಾ] ಣು) (क) धा.—मान्य करणें; विश्वासणें; मनांत ठेवणें.
मनकुं (गुं) दु (ಮನಕುಂ [ಗುಂ] ದು) (क) धा.—निराश होणें; हताश होणें; धैर्य गळणें; हटणें; मागे पाय ओढणें.
मनःकषाय (ಮನಃಕಷಾಯ) (क) ना.—मनांतील काळेबेरें; कटुता, कलुषित मन, असमाधान; असंतोष.
मनःकूट (ಮನಃಕೂಟ) (सं) ना.—चित्तवृत्ति; कबुली; मान्यता; समाधान; संतोष.
मनःपूर्वक (ಮನಃಪೂರ್ವಕ) (सं) अ.—मुद्दाम; उद्देश पूर्वक; हेतुतः; बुध्द्या; आवर्जून; एकचित्तानें; लक्ष लावून.
मनःप्रसाद (ಮನಃಪ್ರಸಾದ) (सं) ना.—मनाचें समाधान; आनंद; संतोष.
मनःशैत्य (ಮನಃಶೈತ್ಯ) (सं) ना.—मनाची शांतता; तृप्ति; शांति.
मनःसाक्षी (ಮನಃಸಾಕ್ಷೀ) (सं) अ.—समजून उमजून; विचारपूर्वक; निश्चयानें; अंतःकरणाला स्मरून.
मनःस्थिति (ಮನಃಸ್ಥಿತಿ) (सं) ना.—चित्तवृत्ति; मानसिक अवस्था.
मन (नं) गोळ्ळु (ಮನ [ನಂ] ಗೊಳ್ಳು) (क) धा.—मन ताब्यांत ठेवणें; चांगल्या रीतीनें वागणें; मन रंजविणें.
मनदन्न (ಮನದನ್ನ) (क) ना.—मनाला रुचणारा; आवडणारा; प्रियकर; पति; प्रिय.

राजवदने (ರಾಜವದನೆ) (सं) ना.–चंद्र मुखी; सुंदरी.

राजशासन (ರಾಜಶಾಸನ) (सं) ना.–राजाची आज्ञा; सरकारी संदेश.

राजशेखर (ರಾಜಶೇಖರ) (सं) ना.–शिव; नृपश्रेष्ठ.

राजस (ರಾಜಸ) (सं) वि.–रजोगुणोत्पन्न; रजोगुणासंबंधीं; धूळमिश्रित, मातीमय.

राजसूयि (ರಾಜಸೂಯಿ) (सं) ना.–चक्रवर्तित्वासाठीं केलेला यज्ञ; राजसूय यज्ञ.

राजहंस (ರಾಜಹಂಸ) (सं) ना.–कलहंस; हंसांतील श्रेष्ठ जाती; मराळ; श्रेष्ठ राजा.

राजांग (ರಾಜಾಂಗ) (सं) ना.–राजमार्ग; महाद्वार.

राजाज्ञे (ರಾಜಾಜ್ಞೆ) (सं) ना.–राजशासन; राजाचा हुकूम.

राजार्क (ರಾಜಾರ್ಕ) (सं) ना.–चंद्र; सूर्य; राजा.

राजावर्त (ರಾಜಾವರ್ತ) (सं) ना.–नीलरत्न; नीलमणि.

राजि (ರಾಜಿ) (सं) ना.–समूह; पुंज; ओळ; श्रेणी.
(अ. दे.) ना.–कबुली; संमती; एकी; संधान.

राजित (ರಾಜಿತ) (सं) वि.–शोभणारा; रंजन करणारा; मिरवणारा.

राजिसु (ರಾಜಿಸು) (क) धा.–प्रकाशणें; चकाकणें; उजाडणें; शोभणें; मनोहर होणें.

राजीनामे (ರಾಜೀನಾಮೆ) (अ. दे)–त्यागपत्र; राजीनामा.

राजीव (ರಾಜೀವ) (सं) ना.–संस्कृत; वसंतकाळ; नीळ कमळ; पाणी; मास; हरिणविशेष, कळप; टोळी.
—नेत्र–नयन (ನೇತ್ರ–ನಯನ) (सं) ना.–कमलनयन; पद्मनेत्र.
—मित्र–सखा (ಮಿತ್ರ–ಸಖಾ) (सं) ना.–सूर्य.

राजेंद्र (ರಾಜೇಂದ್ರ) (सं) ना.–महाराज.

राजेश्वरी (ರಾಜೇಶ್ವರಿ) (सं) ना.–सम्राज्ञी; दुर्गादेवी.

राज्ञि (ज्ञी) (ರಾಜ್ಞಿ [ಜ್ಞೀ]) (सं) ना.–राणी; महाराणी.

राज्यभार (ರಾಜ್ಯಭಾರ) (सं) ना.–राज्यकारभार; राज्यशासन; कारभार.

राज्यतंत्र (ರಾಜ್ಯತಂತ್ರ) (सं) ना.–राजकार्य; राज्यकारभार; राजशासन; अधिकार.

राज्यश्री (ರಾಜ್ಯಶ್ರೀ) (सं) ना.–राज्यसंपदा; राज्यलक्ष्मी.

राज्यांग (ರಾಜ್ಯಾಂಗ) (सं) ना.–राजाचा अधिकार; शासनाचा अधिकार विभाग; अर्थ विभाग; संरक्षणविभाग.

राट् (ರಾಟ್) (सं) ना.–राजा; धनी.

राटण (टाळ) (ರಾಟಣ [ಟಾಳ]) (क) ना.–फिरणारा रहाट; फिरते चक्र; पाणरहाट; सुताराचें चाक.

राटि (ರಾಟೆ) (क) ना.–चाक; चक्र; चरखा; सूत कातण्याचा रहाट.

राणा (ರಾಣಾ) (अ. दे) ना.–राजा; रजपूत; राजाचें ब्रीद.

राणि (ರಾಣಿ) (अ. दे) ना.–राज्ञी; स्वामिनी.

राणुवे (ರಾಣುವೆ) (क) ना.–सैन्य; सैनिक; शिपाई; पदाति.

रात्रि (त्रिं) चर (ರಾತ್ರಿ [ತ್ರಿಂ]ಚರ) (सं) ना.–रात्री फिरणारा; पिशाच; राक्षस; चोर; पहारेकरी; घुबड.

राद्धांत (ರಾದ್ಧಾಂತ) (सं) ना.–सिद्धांत; वादनिर्णय; परिणाम; समारोप.

राध (ರಾಧ) (सं) ना.–हाक; आवाहन; दया; कृपा; कीर्ति; यश; वैशाखमास; वसंतऋतु.

राधा (ರಾಧಾ) (सं) ना.–कर्णाची संरक्षकमाता; दूधमाता; दायी; अधिरथ राजाची पत्नी; श्रीकृष्णाची शृंगारनायिका; ऐश्वर्य; विजय; विशाखा नक्षत्र.

राधेय (ರಾಧೇಯ) (सं) ना.–कर्ण.

राम (ರಾಮ) (सं) वि.–मनोहर; सुंदर; काळारंग; बलराम; परशुराम.
(सं) ना.–राम; सीतापति; जनकपुत्र.
—दूत (ದೂತ) (सं) ना.–आंजनेय; हनुमान.

रामठ (ರಾಮಠ) (सं) ना.–हिंग.

रामणीयक (ರಾಮಣೀಯಕ) (सं) वि.–सुंदर; मनोहर.

रामबाण (ರಾಮಬಾಣ) (सं) ना.–रामाचा अचूक बाण; अमोघ परिणामकारक बाण.

रामवाक्य (ರಾಮವಾಕ್ಯ) (सं) वि.–निर्विवाद वचन; सत्यभाषण; एकच बोल; सत्यवाणी.

रामा (मे) (ರಾಮಾ [ಮೆ]) (सं) ना.–पत्नि; भार्या; सुंदरी; कामिनी.

रामानुज (ರಾಮಾನುಜ) (सं) ना.–रामाचे लहान भाऊ; विशिष्टाद्वैत मतप्रचारक आचार्य.

रामायण (ರಾಮಾಯಣ) (सं) ना.–रामचरित्रकाव्य; न संपणारी गोष्ट.

राय (ರಾಯ) (क) ना.–राजन्; स्वामी; मालक; राजा; कर्नाटकांतील आदरार्थी शब्द.

रायस (ರಾಯಸ) (क) ना.–राजशासन; सरकारी संदेश.

रायसिग (ರಾಯಸಿಗ) (क) ना.–सरकारी आज्ञा लिहिणारा व पोचविणारा अधिकारी.

रायभारि (ರಾಯಭಾರಿ) (सं) ना.–राजप्रतिनिधी.

राराजिसु (ರಾರಾಜಿಸು) (क) धा.–सुशोभित होणें; चकाकणें.

राव (ರಾವ) (सं) ना.–हाक; आवाहन; ध्वनि; शब्द; ओरड; बहुमानाचा शब्द.

रावण (ರಾವಣ) (सं) ना.–जीवन; विश्वावसूचा पुत्र; लंकेचा राजा.

रावणसंन्यासि (ರಾವಣಸನ್ಯಾಸಿ) (सं) ना.—कपटवेषांतील रावण; छद्मीसाधु; राखुडींतील रामोशी; ठक; वंचक.

रावणि (ರಾವಣಿ) (सं) ना.—रावणपुत्र इंद्रजित.

रावु (पु) (ರಾವು [ಪು]) (क) ना.—आवेश; उद्रेक; भूतसंचार; विकारवशता; भीती; राहू.

रावु (हु) त (ರಾವು [ಹು] ತ) (अ.दे) ना.—घोडेस्वार; घोडदळांतील सैनिक; घोडदळ.

राशि (ರಾಶಿ) (सं) ना.—समूह; संग्रह; कळप; मेषादि बारा राशी; अतिशयता; आधिक्य.

राष्ट्र (ರಾಷ್ಟ್ರ) (सं) ना.—राज्य; विशाल देश; भूप्रदेश.

—पति (ಪತಿ) (सं) ना.—गणराजाचा अध्यक्ष.

राष्ट्रिक (ರಾಷ್ಟ್ರಿಕ) (सं) ना.—एका राजाची प्रजा; राज्यपाल.

राष्ट्रि (ष्ट्री) य (ರಾಷ್ಟ್ರಿ [ಷ್ಟ್ರೀ] ಯ) (सं) वि.—राष्ट्रसंबंधी; नाटकांतील राजाचा मेहुणा; देशीय.

रास (ರಾಸ) (सं) ना.—शब्द; गोंगाट; गोंधळ; एक नृत्यप्रकार.

रासक (ರಾಸಕ) (सं. ना.—एक लघुनाटक; नाटिका.

रासक्रीडा (डे) (ರಾಸಕ್ರೀಡಾ [ಡೆ]) (सं) ना.—गोपीकृष्णाचा विनोद खेळ.

रासभ (ರಾಸಭ) (सं) ना.—गाढव; गर्धभ.

राहित्य (ರಾಹಿತ್ಯ) (सं) ना.—अभाव; उणीव; न्यून; अनुपस्थिति; रहितता.

रासि (ರಾಸಿ) (क) ना.—रास; राशि; समूह; संग्रह; कळप.

राहु (ರಾಹು) (सं) ना.—एक राक्षस; चंद्रसूर्यांचा ग्रास घेणारा राहू; भीतिमूल; विष; एक ग्रह.

राहुग्रस्त (ರಾಹುಗ್ರಸ್ತ) (सं) ना.—राहूनें पछाडलेला, गिळलेला; ग्रहण लागलेला; दुर्दैवी; दैवहत.

राहुटि (ರಾಹುಟಿ) (अ.दे.) ना.—बिऱ्हाड; डेरा; तंबू; गुडार.

राहुत (ರಾಹುತ) (अ. दे.) ना.—राऊत; घोडेस्वार; घोडदळ सैनिक.

राहुल (ರಾಹುಲ) (सं) ना.—बुद्धदेवाचा पुत्र; गंडांतर; संकट.

राळ (ರಾಳ) (क) धा.—धूप; धूपार्चन; सुगंधी द्रव्य; सुवास; एका झाडाचा डिंक.

रिकापु (बु) (ರಿಕಾಪು [ಬು]) (अ.दे) ना.—रिकीब.

रिक्कट (ರಿಕ್ಕಟ) (क) अ.—गुपचिप; मुकाट्याने; न बोलतां. (क) ना.—मौन; नीरवता; अबोलपणा.

रिक्त (ರಿಕ್ತ) (सं) वि.—मोकळे; सुटे; खाली; व्यर्थ; पोकळ; विभक्त; वियुक्त; रिकामें.

(सं) ना.—मरुभूमि; अरण्य.

—हस्त (ಹಸ್ತ) (सं) वि.—रिकाम्या हाताचा; गरीब; दरिद्री.

रिक्थ (ರಿಕ್ಥ) (सं) ना.—मरणकाळीं सोडून दिलेलें धन; पित्रार्जित सुवर्ण.

रिक्षा (ರಿಕ್ಷಾ) (अ.दे) ना.—नरवाहन; रिक्षा; मनुष्याने ओढण्याचे दुचाकी वाहन.

रिंगण (ರಿಂಗಣ) (क) ना.—नाच; रांगणें; घसरगुंडी.

रिण (ರಿಣ) (क) ना.—ऋण; कर्ज; उपकार; ओझें.

रिपु (ರಿಪು) (सं) ना.—शत्रु; वैर; अमित्र. 'हगे' पहा.

रियायति (ರಿಯಾಯತಿ) (अ-दे) ना.—सौलत; सहूलत; सवलत; सूट; अनुकूलता.

रिवाजु (ರಿವಾಜು) (अ.दे) ना.—रुढी; वापर; पद्धति; क्रम.

रिष्ट (ರಿಷ್ಟ) (सं) वि.—जखमी; दुखावलेला; दुर्दैवी. (सं) ना.—अडचण; संकट; ठणका; हानि; पाप; दुर्दैव; नाश; सुदैव; अभ्युदय.

रिसि (ರಿಸಿ) (क) ना.—ऋषि; मुनि; यति; योगी.

रीति (ರೀತಿ) (सं) ना.—वर्तनक्रम; पद्धति; रूढी; साहित्यशैली; ('गौडी; वैदर्भी) मार्ग; संप्रदाय; पितळ; कंच; पितळी; जंग; गंज; पतन; वेग; ओढा; प्रवाह; सीमा; मर्यादा.

—केडु (ಕೆಡು) { (क) धा.—मार्ग चुकणें. (क) धा.—कुमार्ग धरणें; अनीतीनें वागणें. }

रीतिके (ರೀತಿಕೆ) (सं) ना.—पितळी; कंच; गंज.

रुक्कु (ರುಕ್ಕು) (सं) ना.—वेदांतील ऋचा. 'रुजे' पहा.

रुक्म (ರುಕ್ಮ) (सं) वि.—चकाकणारे; चमचमणारे; लकाकणारे (सं) ना.—सोनें; सुवर्ण.

रुक्मिणि (णी) (ರುಕ್ಮಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—कृष्णपत्नी.

रुक्ष (ರುಕ್ಷ) (सं) वि.—वाळलेले; कोरडें; सुकलेले; नीरस; उद्धट; असभ्य; अनागर.

(क) ना.—अस्वल; मृगनक्षत्र.

—कुलपति (ಕುಲಪತಿ) (क) ना.—जांबुवंत.

रुग्ण (ರುಗ್ಣ) (सं) वि.—रोगी; मोडलेले.

रुग्णयान (ರುಗ್ಣಯಾನ) (सं) ना.—आजाऱ्याला नेण्याचें साधन; हातडोली; जखमी लोक नेण्याची गाडी; ॲम्ब्युलन्स.

रुग्णालय (ರುಗ್ಣಾಲಯ) (सं) ना.—रुग्णासाठीं दवाखाना.

रुचक (ರುಚಕ) (सं) वि.—रुचकर; गोड; मधुर; सुखदायक; (सं) ना.—अमृत; मंगलद्रव्य; दात; डोंगर; मान; महाळुंग.

रुचि (ರುಚಿ) (सं) ना.—कांति किरण; प्रकाश; उजेड; शोभा; गोडवा; शृंगार; लालित्य; लावण्य; इच्छा; वांच्छित; अपेक्षा; अभिलाषा; रंग; भूक.

—कर (ಕರ) (सं) वि.—गोड; चवदार; मधुर; मनोहर; लज्जतदार.

—कार (ಕಾರ) (सं) वि.—रुचि जाणणारा; चाख्या; रसज्ञ.

रुचिर (ರುಚಿರ) (सं) वि.—सुंदर; मनोहर; रुचकर.

रुचिसु (ರುಚಿಸು) (क) धा.—गोड लागणें; आवडणें; मान्य होणें; मनाला येणें.

**रुज (जन)** (ರುಜ [ಜನ]) (सं) ना.—रोग; आजार; अस्वस्थता; काहिली; तल्खली.

**रुजु** (ರುಜು) (सं) वि.—सरळ; सत्य; स्पष्ट.

—**मातु–वातु** (ಮಾತು–ವಾತು) (सं) ना.— स्पष्टीकरण; खुलासा.

**रुजवात** (ರುಜವಾತ) (अ.दे.) ना.—सही; साक्षरी; मुद्रा; कबुली; दस्तगत; हस्ताक्षर.

**रुजे (जा)** (ರುಜೆ [ಜಾ]) (सं) ना.—आजार; अस्वस्थता; रोग; काहिली; श्रम; दुखणें; आघात.

**रुंड** (ರುಂಡ) (सं) ना.—मुंडके; उत्तमांग; मानेच्या वरचा भाग.

**रुंडमाल (ला)** (ರುಂಡಮಾಲ [ಲಾ]) (सं) ना.—मुंडक्याची माळ;

—**धर** (ಧರ) (सं) ना.—शिव; कालिदेवी.

**रुत (ति)** (ರುತ [ತಿ]) (सं) ना.—शब्द; ध्वनि; आवाज; चाहुल; गीत; गान.

**रुतु** (ರುತು) (सं) ना.—ऋतु; वसंतादि कालभेद; विटाळ; स्त्रियांची मासिक पाळी.

**रुदन** (ರುದನ) (सं) ना.—रड; आक्रोश; आक्रंदन

**रुदित** (ರುದಿತ) (सं) वि.—दुःखित; प्रलपित; अडचणीत आलेले.

(सं) ना.—दुःख; आक्रंदन; दुखणें.

**रुद्ध** (ರುದ್ಧ) (सं) वि.—निरोधित; विलंबित; आडकाठी; असलेला; दाबलेला; आवळलेला.

—**कंठ** (ಕಂಠ) (सं) ना.—दाटलेला आवाज; गहिंवर.

**रुद्र** (ರುದ್ರ) (सं) वि.—भयंकर; भयानक; आरडा ओरड करणारा

(सं) ना.—शिव; परमेश्वर; भयानक; देवमूर्ति;

**रुद्रनाटक** (ರುದ್ರನಾಟಕ) (सं) ना.—शोकांतिका; दुःखपर्यवसायी नाटक; आविद्ध नाटक; ट्रॅजेडी.

**रुद्रभूमि** (ರುದ್ರಭೂಮಿ) (सं) ना.—स्मशान; मसण; मसोटी; दहनभूमि.

**रुद्रवीणे** (ರುದ್ರವೀಣೆ) (सं) ना.—श्रेष्ठ वीणावाद्य.

**रुद्रवीर्य** (ರುದ್ರವೀರ್ಯ) (सं) ना.—पारा.

**रुद्राक्ष (क्षि)** (ರುದ್ರಾಕ್ಷ [ಕ್ಷಿ]) (सं) ना.— रुद्राच्या नेत्राप्रमाणें असणारे. रुद्राक्ष फळ.

**रुद्राणि (णी)** (ರುದ್ರಾಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—रुद्रपत्नी; पार्वती. दुर्गा.

**रुद्रावतार** (ರುದ್ರಾವತಾರ) (सं) ना.—भयानक रूप; शिवाचा अवतार.

**रुधिर** (ರುಧಿರ) (सं) ना.— रक्त; मंगळ ग्रह.

—**आशान** (ಅಶಾನ) (सं) ना.—राक्षस; पिशाच; हिंस्र पशु.

**रुधिरपुष्प** (ರುಧಿರಪುಷ್ಪ) (सं) ना.—लाल जास्वंद; तांबडी कण्हेर.

**रुधिराक्ष (क्षि)** (ರುದ್ರಾಕ್ಷ [ಕ್ಷಿ]) (सं) ना.—लाल नेत्र; रागावलेली दृष्टि; एक राक्षस.

**रुब्बु** (ರುಬ್ಬು) (क) धा.—खलणें; दळणें; घासणें; ठेचणें; रंधा मारणें; सांपडणें; समजणें.

**रुमाल (लु)** (ರುಮಾಲ [ಲು]) (अ. दे) ना.—फेटा; पटका; पागोटें; हातरुमाल.

**रुरु** (ರುರು) (सं) ना.—एक हरीण.

**रुषा (ष)** (ರುಷಾ [ಷ]) (सं) ना.—जखम; खून; क्रोध; आवेश; रोष.

**रुषित** (ರುಷಿತ) (सं) वि.—क्रुद्ध; क्रोधित.

**रुष्ट** (ರುಷ್ಟ) (सं) वि.—रागावलेले; कोपलेले.

**रुह** (ರುಹ) (सं) वि.—उत्पन्न झालेले; वाढलेले; वर आलेले.

—**भूरुह** (ಭೂರುಹ) (सं) वि.—झाड, वेल, वगैरे भूमींत रुजणारे.

**रुळि** (ರುಳಿ) (क) ना.—पायातील सांखळी; पैंजण.

**रूक्ष** (ರೂಕ್ಷ) (सं) वि.—वाळलेले; मृदु नसलेले; कठोर; नीरस; कोरडे.

**रूक्षण** (ರೂಕ್ಷಣ) (सं) ना.—द्रवीकरण; वातहारकता; पातळपणा; देहाचें रोडपण; स्थूलत्व कमी करणे; लठ्ठपण घालवणें.

**रूढ** (ರೂಢ) (सं) वि.—वापरात असलेले; सांप्रदायिक; चालत आलेलें; ओळखीचा; निश्चित; ज्ञात; वाढलेला.

—**नाम** (ನಾಮ) (सं) ना.—वापरात असलेले नाव; विशेषनाम.

—**मूल** (ಮೂಲ) (सं) ना.—खोल गेलेले मूळ; मूळ धरलेलें; बद्धमूळ; दीर्घकालीन.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—रूढ होणें; वापरात येणें; वाढणें; उदय होणें; फळ येणें.

**रूढि** (ರೂಢಿ) (सं) ना.—वापर; संप्रदाय; पद्धति; क्रम; प्रसिद्धि; ख्याति; जन्म; प्रगति; जमीन; मूळ.

**रूढिपति** (ರೂಢಿಪತಿ) (सं) ना.—जमिनीचा मालक; प्रख्यात स्वामी; राजा.

**रूप** (ರೂಪ) (सं) ना.—प्रत्यक्ष पदार्थ; रीतभात; बिंबप्रतिबिंब; साम्य; आदर्श; पूर्णांक; नाटक; रुपक; पशु; सोंग; विर्णय; साधना; नेमणूक; ध्वनि; आकार; मूर्तित्व; सौंदर्य; देखावा; सूक्ष्म निरीक्षण; आलोचन.

—**इसु** (ಇಸು) (क) धा.—रूपाला आणणें; मूर्ती बनवणें; आकार देणें.

—**करे** (ಕರೆ) (क) धा.—वेषांतर करणें.

—**तोरु** (ತೋರು) (क) धा.—प्रत्यक्ष होणें; दाखवणें.

**रूपक** (ರೂಪಕ) (सं) ना.—एक अलंकार; सहा मात्रांचा हिंदुस्थानी दादरा, एक ठेका, नाटकादि दशरूपातील काव्य, अभिनयपूर्ण काव्यप्रसंग; प्रातिनिधिक चिन्ह; लक्षण; वजन; रुपाया.

**रूपजीवा (विनी)** (ರೂಪಜೀವಾ [ವಿನಿ]) (सं) ना.—रूपावर जगणारी; वेश्या; देवदासी.

**रूपण** (ರೂಪಣ) (सं) ना.—विनंती; मागणी; प्रार्थना; नटवेपणा वशिला; सांगणी.

**रूपता (ते)** (ರೂಪತಾ [ತೆ]) (सं) ना.—सौंदर्य; सुषमा; स्वरूपता.

**रूपरेंषे** (ರೂಪರೇಷೆ) (सं) ना.—आराखडा; विषयाची थोडक्यात ओळख.

**रूपार** (ರೂಪಾರ) (सं) ना.—सुंदर आकार; सौंदर्य; चेहरापट्टी.

**रूपांतर** (ರೂಪಾಂತರ) (सं) ना.—सोंग; अन्यरूप, दुसरें रूप. शृंगार; संस्कार.

**रूपाश्रय** (ರೂಪಾಶ್ರಯ) (सं) ना.—अतिसुंदर पुरुष; मदनाचा पुतळा.

**रूपित** (ರೂಪಿತ) (सं) वि.—आकाराला आलेलेले, मूर्त.

**रूपु** (ರೂಪು) (क) ना.—आकार; सौंदर्य; मूर्तित्व.

**रूपोच्चय** (ರೂಪೋಚ್ಚಯ) (सं) ना.—सुंदर आकाराचे संमिश्रण; अति सौंदर्य.

**रूप्य (प्यक)** (ರೂಪ್ಯ [ಪ್ಯಕ]) (सं) वि.—मनोहर; आकर्षक; सुंदर.
(सं) ना.—चांदी; चांदीचें नाणें.

**रूवु** (ರೂವು) (क) ना.—रूप; सौंदर्य; आकार.

**रूहु** (ರೂಹು) (क) ना.—सुबक आकृति; सुंदर मूर्ति; सौंदर्य.

**रेक्केबरू** (ರೆಕ್ಕೆಬರು) (क) धा.—पंखात शक्ति येणें; उत्साहित होणें; आपल्या पायांवर उभे राहणें; माजणें.

**रेंके** (ರೆಂಕೆ) (क) ना.—डुरकी; डरकाळी; खोंडाची डरकाळी.

**रेंचे** (ರೆಂಚೆ) (क) ना.—रत्नगंधा; रत्नगंधीचे फूल; एक वनस्पति.

**रेंचेय** (ರೆಂಚೆಯ) (क) ना.—झूल; खोगीर

**रेंटे** (ರೆಂಟೆ) (क) ना.—नांगर;
—होडे (ಹೊಡೆ) (क) धा.—नांगरणें; नांगर चालविणें.

**रेप्पु** (ರೆಪ್ಪು) (क) धा.—मारणें; चोपणें; बडवणें.

**रेंबे** (ರೆಂಬೆ) (क) ना.—झाडाची फांदी; शाखा; विजय.

**रेंकु** (ರೇಕು) (क) ना.—फुलाची पाकळी; कुसुमदल; पातळपत्रा; सोन्याचे पाणी; झिलई.

**रेंके** (ರೇಕೆ) (क) ना.—रेखा; ओळ; आकार; व्यवस्था; आराखडा; पहारा; कपट; फसवणूक.

**रेखा (खे)** (ರೇಖಾ [ಖೆ]) (सं) ना.—रेघ; रेषा; आकार; पहारा; कपट; फसवणूक; ओष्ठ; श्रेणी; आकृति; पूर्णता; तृप्ति.

**रेखांश** (ರೇಖಾಂಶ) (सं) ना.—दोन ध्रुवांमधून जाणारी अंशाअंशांची वर्तुळें.

**रेखागणित** (ರೇಖಾಗಣಿತ) (सं) ना.—भूमिति; महत्त्व-मापन.

**रेखावृत्त** (ರೇಖಾವೃತ್ತ) (सं) ना.—दोन ध्रुवांमधून जाणारी वर्तुळें.

**रेंगिसु** (ರೇಗಿಸು) (क) धा.—क्रोध येणें; रागावणें; रागाला आणणें.

**रेंगु** (ರೇಗು) (क) धा.—रागेजणें; राग येणें; कोपणें.
(क) ना.—राग; क्रोध; कोप.

**रेंचक (न) ने** (ರೇಚಕ [ನ] ನೆ) (सं) ना.—झाडा; पोट झाडणें; भेदक औषध; सारक; उच्छ्वास; बहिष्कार.

**रेंणु** (ರೇಣು) (सं) ना.—धूळ; पराग; भुकटी.

**रेंणुके** (ರೇಣುಕೆ) (क) ना.—जमदग्नि पत्नी; परशुराममाता; यल्लम्मा.

**रेंत (तस्)** (ರೇತ [ತಸ್]) (सं) ना.—पुरुषाचे वीर्य; शुक्र; पारा.

**रेंवु** (ರೇವು) (क) ना.—बोटीचा धक्का; बंदर.

**रेंवे** (ರೇವೆ) (क) ना.—रेव; गाळ; वाळु; रेती; बंदर; रेवानदी.

**रेंशिमे (श्मे)** (ರೇಶಿಮೆ [ಶ್ಮೆ]) (क) ना.—रेशीम; किड्याचा कोषांतून येणारा धागा.

**रेंषण** (ರೇಷಣ) (सं) ना.—गर्जना; हरळी; साद.

**रै** (ರೈ) (सं) ना.—संपत्ति; सोनं; कांति; प्रभा; शोभा.

**रैवत** (ರೈವತ) (सं) ना.—संपन्न; श्रीमंत; मालक; स्वामी; द्वारकेजवळील एक पर्वत.

**रोक्क** (ರೊಕ್ಕ) (क) ना.—रोख पैसा; रोकड; नगद.

**रोच्चिगेळु** (ರೊಚ್ಚಿಗೇಳು) (क) धा.—अती रागेजणें; रागाचा पारा चढणें; मत्सर करणें; उद्रेक होणें; संतापणें; चिडणें.

**रोच्चु (ज्जु)** (ರೊಚ್ಚು [ಜ್ಜು]) (क) ना.—डंख; सूड; मत्सर; त्वेष; खुनशीपणा. 'कुनसु' पहा.

**रोच्चे (च्चेड)** (ರೊಚ್ಚೆ [ಚ್ಚೆಡ]) (क) ना.—राड; चिखल; घाण; पाप.

**रोड्डु** (ರೊಡ್ಡು) (क) वि.—डावखुरा; डावखोर.

**रोणकु** (ರೊಣಕು) (क) धा.—उडणें; उडी मारणें; बागडणें.

**रोंडे** (ರೊಂಡೆ) (क) ना.—चिखल; राड; पंक; नितंबभाग.

**रोप्प** (ರೊಪ್ಪ) (क) ना.—कोंडवाडा; गावकुसु; पिंजरा.

**रोप्पु** (ರೊಪ್ಪು) (क) धा.—गर्जणें; हाक मारणें; हरळी देणें; भिवविणें; ओरडणें; घासणें; शंख करणें.

**रोंक** (ರೋಕ) (सं) ना.—प्रकाश; किरण; रंध्र; भोक; खड्डा.

**रोंगनिदान** (ರೋಗನಿದಾನ) (सं) ना.—रोग परीक्षा; रोग चिकित्सा; आजाराची छाननी.

**रोंगिष्ठ** (ರೋಗಿಷ್ಠ) (सं) ना.—रोगी; अस्वस्थ मनुष्य.

**रोचक** (ರೋಚಕ) (सं) वि.—रुचकर; गोड; स्वादिष्ठ; पक्व; कांतिमान्; तेजस्वी; सुंदर; मनोहर.
(सं) ना.—भूक; क्षुधा.
**रोचन** (ರೋಚನ) (सं) ना.—रुचि; आवड; पक्वता; कांति; उत्तेजन; भूक.
**रोचि (चिस्)** (ರೋಚಿ [ಚಿಸ್]) (सं) ना.—प्रकाश; कांति किरण; प्रभा.
**रोडाडु** (ರೋಡಾಡು) (क) धा.—उपहासणें; तिरस्कारणें; पाण-उतार करणें; हिणवणें; हुंगवणें; अंगविक्षेपानें उपहास करणें.
**रोडिग** (ರೋಡಿಗ) (क) वि.—निंदक; टोचून बोलणारा; विदूषक; उपहासक; विडंबक.
**रोडिसु** (ರೋಡಿಸು) (क) धा.—निंदणें; वेडावणें; तिरस्कारणें; घसरविणें.
**रोते** (ರೋತೆ) (क) ना.—चिखल; भित्रेपणा; उकीरडा; घाणेरी; गाईर.
**रोदन** (ರೋದನ) (सं) ना.—रडारड; आक्रंदन; हाक.
**रोद (दस्) (दसी)** (ರೋದ [ದಸ್] [ದಸೀ]) (सं) ना.—आकाश; स्वर्ग.
**रोदोविवर** (ರೋದೋವಿವರ) (सं) ना.—भूमि आणि आकाश यामधील पोकळी.
**रोध** (ರೋಧ) (सं) ना.—विलंब; गंडांतर; अडचण; विघ्न; प्रतिज्ञा; वचनबद्धता.
**रोधस्** (ರೋಧಸ್) (सं) ना.—काठ; तीर.
**रोपण** (ರೋಪಣ) (सं) ना.—पेरणी; लागवड; लावणी; रोप खोचणी.
—**आरोपण** (ಆರೋಪಣ) (सं) ना.—ध्वज रोवणें; निशाण लावणें.
**रोपित** (ರೋಪಿತ) (सं) वि.—लावलेले; उभे केलेलें; चढविलेले; उडवलेलें.
**रोम** (ರೋಮ) (सं) ना.—केस; लोकर.
—**कूप** (ಕೂಪ) (सं) ना.—केशरंध्र; केसाचे छिद्र.
—**रंध्र** (ರಂಧ್ರ) (सं) ना.—केसाचे छिद्र.
—**राजि** (ರಾಜಿ) (सं) ना.—स्त्रीच्या ओटीवरील केशरेषा.
**रोमश** (ರೋಮಶ) (सं) ना.—अंगभर केस असलेला; अस्वल; केसाळ मनुष्य.
**रोमहर्ष** (ರೋಮಹರ್ಷ) (सं) ना.—रोमांच; आनंदपुलक.
**रोमंथ** (ರೋಮಂಥ) (सं) ना.—रवंथ; चर्वितचर्वण.
**रोमांच (चन)** (ರೋಮಾಂಚ [ಚನ]) (सं) ना.—देहावर काटा येणें; शरीरावरील केस ताठ होणें.
**रोलंब** (ರೋಲಂಬ) (सं) ना.—माशी; भ्रमर; मधमाशी; चिलट; डास; घुंगुरटें.
**रोष (षण)** (ರೋಷ [ಷಣ]) (सं) ना.—क्रोध; चीड; राग; कोप; त्वेष; खेकसणी.
**रोषावेश** (ರೋಷಾವೇಶ) (सं) ना.—अति कोप; संताप; असह्य राग.
**रोसु** (ರೋಸು) (क) धा.—कंटाळणें; असह्य होणें; नकोसे वाटणें; नाकीं नऊ येणें.
**रोहण** (ರೋಹಣ) (सं) ना.—आरोहण; उन्नति; बढती; वाढ.
**रोहंत** (ರೋಹಂತ) (सं) ना.—झाड; वृक्ष.
—**ती** (ತೀ) (सं) ना.—वेली; लता.
**रोहिणी** (ರೋಹಿಣೀ) (सं) ना.—नाडी; तांबडी गाय; रोहिणी नक्षत्र; गोधन; चंद्राची प्रिया; बलरामाची आई ;९।१० वर्षें वयाची कन्या; वीज.
—**पति, प्रिय** (ಪತಿ ಪ್ರಿಯ) (सं) ना.—चंद्र; वळु; धुळी; पोळ.
**रोहित (ता)** (ರೋಹಿತ [ತಾ]) (सं) वि.—चढलेला; उन्नत; वर गेलेला.
(सं) ना.—एक मासा; लाल कोल्हा; हरीण; रक्त.
—**अश्व** (ಅಶ್ವ) (सं) ना.—अग्नि.
**रौद्र** (ರೌದ್ರ) (सं) वि.—भयंकर; भीतिप्रद.
(सं) ना.—कोप; राग; रुद्रभक्त; एक रस; उग्रता; उष्णता; क्रौर्य.
**रौप्य** (ರೌಪ್ಯ) (सं) वि.- चांदीचे; रुप्याचे.
(सं) ना.—चांदी.
—**महोत्सव** (ಮಹೋತ್ಸವ) (सं) ना.—रजतोत्सव; पंचविसावा वाढदिवस.
**रौरव** (ರೌರವ) (सं) ना.—एक भयाण नर्क; रुरु हरिणीचे चामडे; मृगाजिन.
**रौहिणेय** (ರೌಹಿಣೇಯ) (सं) ना.—रोहिणीपुत्र; बलराम; वासरू; बुधग्रह; वज्र.
**रौहिष** (ರೌಹಿಷ) (सं) ना.—हरिण; काशगवत.

## ल

**ल** (ಲ) (सं) ना.—अवर्गीय व्यंजनापैकी तिसरे व्यंजन, इंद्र; छंदशास्त्रांतील लघु अक्षराची संज्ञा.
**लक** (ಲಕ) (सं) ना.—कपाळ; भाल; अरण्य; भाताची लोंबी.
**लक लक (पक)** (ಲಕಲಕ [ಪಕ]) (क) ना.—चकचकीतपणा; झकपक; नेत्रदीपकता; दैदीप्यकता; झगझगाट.
**लकुड** (ಲಕುಡ) (क) ना.—लाकूड; काठी; सोटा; लगुड;

लकुमि (ಲಕುಮಿ) (क) ना.—लक्ष्मी; लक्ष्मी देवी.

लकोटे (ಲಕೋಟೆ)
लक्कोटे (ಲಕ್ಕೋಟೆ) (अ. दे.) ना.—लखोटा; कागदाची पिशवी; पुडा; कागदी पाकीट.

लक्कण (ಲಕ್ಕಣ) (क) ना.—लक्षण; कळा; चांगुलपण; सौंदर्य; कांति; चिन्ह; आठवण; साहित्यपद्धति; लक्षणा; लक्ष्मण.

लक्कि (ಲಕ್ಕಿ) (क) ना.—लक्ष्मी; एक वृक्ष.

लक्तक (ಲಕ್ತಕ) (सं) ना.—लाख; तांबडा रंग; वृक्ष विशेष; मेंदी.

लक्ष (ಲಕ್ಷ) (सं) ना.—चित्त; शतसहस्र; उद्देश; ठकपणा; समजूत; जाग्रत ज्ञान; एक लाख संख्या

—इरिसु-कोडु (ಇರಿಸು-ಕೊಡು) (सं) धा.—मन लावणें; ध्यान देणे.

लक्षण (ಲಕ್ಷಣ) (सं) ना.—स्वभाव; वैशिष्ट्य; विवरण; खूण; चिन्ह; साधना; ध्येय; योग्यता; शोभा; सौंदर्य; उद्देश; रोगलक्षण; व्याख्या; सारस पक्षी; देहावरील भाग्य चिन्ह; वेषांतर; ढोंग सोंग; बकपक्षी.

—अन्वित (ಅನ್ವಿತ) (सं) वि.—चिन्हें असलेला.

—वंत (ವಂತ) (सं) वि.—दैववान्; भाग्यशाली.

लक्षणे (णा) (ಲಕ್ಷಣೆ [ಣಾ]) (सं) ना.—सांकेतिक अर्थ; कविसंकेत; तेजस्विनी; रूपवती; स्फुरद्रूपिणी.

लक्षाधीश (ಲಕ್ಷಾಧೀಶ) (सं) वि.—लाखोपति.

लक्षावधि (ಲಕ್ಷಾವಧಿ) (सं) वि.—लाखो; लाखानी मोजण्यासारखे; अमाप.

लक्षिसु (ಲಕ್ಷಿಸು) (क) धा.—लक्ष देणें, ध्यानांत घेणें; लक्षांत ठेवणें; गौरवणें; आठवणें.

लक्ष्म (ಲಕ್ಷ್ಮ) (सं) ना.—ओळख; परिचय; चिन्ह; सूचना; उद्देश; अभिप्राय.

लक्ष्मण (ಲಕ್ಷ್ಮಣ) (सं) ना.—श्रीमंत; धनिक; रामाचा भाऊ; सौमित्र; बकपक्षी.

लक्ष्मि (क्ष्मी) (ಲಕ್ಷ್ಮಿ [ಕ್ಷ್ಮೀ]) (सं) ना.— विष्णुपत्नि; धनाची अधिदेवता; शोभा; कांति, सौंदर्य; लक्षण.

—कान्त, रमण (ಕಾಂತ-ರಮಣ) लक्ष्मीपति, विष्णु.

लक्ष्मीश (ಲಕ್ಷ್ಮೀಶ) (सं) ना.—विष्णु; लक्ष्मीकांत; कन्नड भारत लिहिणारा एक कवि.

लक्ष्मीधर (ಲಕ್ಷ್ಮೀಧರ) (सं) ना—विष्णु; लक्ष्मण.

लक्ष्य (ಲಕ್ಷ್ಯ) (सं) ना.—ध्येय; उद्देश; एक चित्त; ध्यान; दृष्टांत; उदाहरण; समजून घेण्यासारखें; गणनीय.

—साधन (ಸಾಧನ) (सं) ना.—ध्येयपूर्तीचा प्रयत्न; ध्येयमार्ग.

—सिद्धि (ಸಿದ್ಧಿ) (सं) ना.—ध्येयपूर्ति; दृष्टांताची अनुभूति; दृढीकरण.

लक्ष्यार्थ (ಲಕ್ಷ್ಯಾರ್ಥ) (सं) ना.—लक्षणेनें घेतलेला अर्थ.

लगळि (ಲಗಳಿ) (सं) ना.—पखाल; माकण.

लगामु (ಲಗಾಮು) (अ. दे) ना.—लगाम. वेस 'कडिवाण' पहा.

लगु (ಲಗು) (क) वि—लौकर; हलके; लघु.

लगुड (ಲಗುಡ) (क) ना.—सोटा; बडगा; लठ्ठ काठी.

लगुबगे (ಲಗುಬಗೆ) (क) अ.—घाईघाईनें; त्वरया; सत्वर; लौकर.

लगुलगु (ಲಗುಲಗು) (क) अ.—घाईनें; ताबडतोब; सत्वर.

लग्गे (ಲಗ್ಗೆ) (क) ना.—हल्ला; वेढा; चढाई; विविध वाद्यमेळ; लगोरीचा खेळ.

—चेंडु (ಚೆಂಡು) (क) ना.—चेंडू लगोरी;

—परे (ಪರೆ) (क) ना.—लगोरी; वाद्य संमेलन; रणवाद्य.

लग्न (ಲಗ್ನ) (सं) वि.—चिकटलेले; समाविष्ट; संबंधित. (सं) ना.—मेषादि राशीचा उदय; विवाह; शुभमुहूर्त.

—काल (ಕಾಲ) (सं) ना.—शुभ घटिका; शुभ मुहूर्त.

लग्नाह (ಲಗ್ನಾಹ) (सं) ना.—शुभ मुहूर्त,

लघिम (मे) (मा) (ಲಘಿಮ [ಮೆ]ಮಾ) (सं) ना.—अष्ट सिद्धींपैकी एक. हलकेपणा; भारहीनता; अल्पता; क्षुद्रपणा; नीचपणा.

लघु (ಲಘು) (सं) वि.—तीव्र; त्वरित; दुर्बल; भित्रा; अल्प; तुच्छ; हलका; लहान; कोवळा; सुलभ; लघुमात्रा.

—तर-तम (ತರ-ತಮ) (सं) वि.—अति हलका; लहान.

—त्व (ತ್ವ) (सं) ना.—तीव्रता; दुर्बलता; लहानपण.

लघुशंके (ಲಘುಶಂಕೆ) (सं) ना.—लघवी; मूत्र; मूत.

लघुहस्त (ಲಘುಹಸ್ತ) (सं) ना.—हातचलाखी; चोरी; हलका हात.

लंकिणि (ಲಂಕಿಣಿ) (सं) ना.—लंकेची द्वारपालिका; राक्षसी.

लंग (ಲಂಗ) (अ-दे) ना.—लेहंगा; स्त्रियांचा परकर; अंतर्वस्त्र.

लंगर (रु) (ಲಂಗರ [ರು]) (अ-दे) ना.—जहाजाचा नांगर; साखळदंड.

लंगोटि (ಲಂಗೋಟಿ) (अ-दे) ना.—कौपीन; लंगोट; लंगोटी.

लंघन (ಲಂಘನ) (सं) ना.—उडी; उड्डाण; हास्य; उपवास.

लंघिसु (ಲಂಘಿಸು) (क) धा.—उडणें; उडी मारणें; पार होणें; अवज्ञा करणें.

लचुमण (ಲಚುಮಣ) (क) ना.—लक्ष्मण; सौमित्री; रामाचा भाऊ.

लच्चण (ಲಚ್ಚಣ) (क) ना.—लक्षण; चिन्ह; खूण; स्वभावनिरूपण; ध्येय; योग्यता; नांव; कला; मत्स्य; कलंक.

लच्चि (ಲಚ್ಚಿ) (क) ना.—लक्ष्मी देवी; गृहलक्ष्मी; स्त्री.

लज्जा (ज्जे) (ಲಜ್ಜಾ [ಜ್ಜೆ]) (सं) ना.—लाज; मनःसंकोच; अभिमान; गौरव; दाक्षिण्य; स्त्रीपुरुष गुप्तांगें; भीड; विनय.

**लज्जालु** (ಲಜ್ಜಾಲು) (सं) वि. – लाजरा; लाजाळू; दाक्षिण्य असलेला; संकोची.

**लज्जित** (ಲಜ್ಜಿತ) (सं) वि. – लाजलेला; विनीत; मर्यादशील.

**लज्जिसु** (ಲಜ್ಜಿಸು) (क) धा. – लाजविणें; अपमान करणें; श्रेष्ठ गुण दाखविणें.

**लंच** (ಲಂಚ) (क) ना. – लाच; 'कैय्यासे' पहा.

**लंचं (च) गुळि** (ಲಂಚಂ [ಚ]ಗುಳಿ) (क) वि. – लाचखाऊ.

**लंजे (जा)** (ಲಂಜೆ [ಜಾ]) (सं) ना. – व्यभिचारिणी; दुर्वर्तनी; प्रवाह; लक्ष्मी; निद्रा.

**लट (टक)** (ಲಟ [ಟಕ]) (सं) ना. – मूर्ख; अविवेकी; दुरात्मा; फसवणूक; चोरी; दुष्टता.

**लटकटिसु** (ಲಟಕಟಿಸು) (क) धा. – गोंधळणें; गांगरणें; गडबडणें; भान सुटणें; भिणें; भिवविणें; आतुर होणें; आसावणें; उ साह दाखविणें.

**लटकुसुरि** (ಲಟಕುಸುರಿ) (क) धा. – बोटें मोडणें; अशुभसूचन करणें; शाप देणें; निंदणें.

**लटक्कने** (ಲಟಕ್ಕನೆ) (क) अ. – झटकन; लौकर; अचानक.

**लटपट** (ಲಟಪಟ) (क) अ. – चंचल होऊन; घाईघाईनें; झुकांडी खात खात; किरकिरत; संशयग्रस्त होऊन.

**लटापटि** (ಲಟಾಪಟಿ (क) ना. – किरकोळ भांडण; झटापट; वादावादी; शब्दाला शब्द वाढणें;

**लट्टणिगे** (ಲಟ್ಟಣಿಗೆ) (क) नां. – लाटणें.

**लट्ट** (ಲಟ್ಟ) (क) वि. – लठ्ठ; जाड; स्थूल.
(क) वि. – दुष्ट; दुरात्मा; अविवेकी.

**लट्टिसु** (ಲಟ್ಟಿಸು) (क) धा. – लाटणें; छाट मारणें; उपटणें; गिळंकृत करणें.

**लट्टु** (ಲಟ್ಟು) (क) वि. – जाड; स्थूल; लठ्ठ.
(क) ना. – सोटा; काठी; दंडा.

**लट्टे (ट्टा)** (ಲಟ್ಟೆ[ಟ್ಟಾ]) (क) ना. – निलाजरी; निर्लज्ज स्त्री.

**लट्व** (ಲಟ್ವ) (सं) ना. – संगीत; सामग्री; खेळ; लालफूल; दुराचारिणी; नाचापोऱ्या; घोडा; चिमणी.

**लड्डु (ड्डुक)** (ಲಡ್ಡು [ಡ್ಡುಕ]) (क) ना. – लाडू; गोडखाद्य.

**लंड (ड्ड)** (ಲಂಡ [ಡ್ಡ]) (क) वि. – नीच; क्षुद्र; भांडखोर; मोंड.

**लंडेवेण्** (ಲಂಡೆವೆಣ್) (क) ना. – भांडखोर स्त्री; भांडकुदळ स्त्री; कलहवादिनी; नीच स्त्री.

**लता (ते)** (ಲತಾ [ತೆ]) (सं) ना. – वेल; वेली.
—**कुंज** (ಕುಂಜ) (सं) ना. – वेलीचा मांडव.
—**गृह** (ಗೃಹ) (सं) ना. – कुंज; वेली वाढून झालेली खोली.

**लतांगि** (ಲತಾಂಗಿ) (सं) ना. – सडपातळ स्त्री; सुंदरी.

**लतांत** (ಲತಾಂತ) (सं) ना. – लतापुष्प; वेलीचे फूल.

**लतिका (के)** (ಲತಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना. – लहान वेल. 'हंबु' पहा.

**लत्ता (त्ते)** (ಲತ್ತಾ [ತ್ತೆ]) (सं) ना. – मार; ठोक; रट्टा; लाथ.

**लत्ताप्रहार** (ಲತ್ತಾಪ್ರಹಾರ) (सं) ना. – लाथ; दुगाणी; मार; तिंबणी. पदाघात.

**लपन** (ಲಪನ) (सं) ना. – तोंड; चेहरा; मुख; भाषा; भाषण;

**लपटायिसु** (ಲಪಟಾಯಿಸು) (क) धा. – गुंडाळणें; लपेटणें; गडबडगुंडाकरणें; बंडलमारणें; सुरळी करणें.

**लपेट** (ಲಪೇಟ) (अ. दे) ना. – फेरा; वेढा; घेरा; लपेटा.

**लब्ध** (ಲಬ್ಧ) (सं) वि. – मिळालेले; सापडलेले. प्राप्त.
(सं) ना. – उदाहरणाचें उत्तर; लाभ; प्रारब्ध.
—**परिकर** (ಪರಿಕರ) (सं) वि. – साधनसंपन्न; सामग्रीसह; साहित्ययुक्त.

**लब्धकाम** (ಲಬ್ಧಕಾಮ) (सं) वि. – इच्छापूर्ति झालेला; तृप्त; आशा सफळ झालेला.

**लब्धवर्ण** (ಲಬ್ಧವರ್ಣ) (सं) वि. – विद्वान; पंडित.

**लब्धि** (ಲಬ್ಧಿ) (सं) ना. – प्राप्ति; उत्तर; परिणाम; प्रारब्ध; ललाटरेषा.

**लभिसु** (ಲಭಿಸು) (क) धा. – प्राप्त होणें; मिळणें; सांपडणें; अस्तित्वांत येणें.

**लभ्य** (ಲಭ್ಯ) (सं) वि. – प्राप्तव्य; मिळण्यासारखे; पुण्यकर.
(सं) ना. – पुण्य; प्राप्ति; मिळकत; योग्यता; लायकी.

**लंपट** (ಲಂಪಟ) (सं) वि. – आसक्त; लोलुप; मग्न; कामुक; दुष्ट; विषयासक्त.

**लंपळिके** (ಲಂಪಳಿಕೆ) (क) ना. – आसक्ति; लोलुपता; लंपटता.

**लंपु** (ಲಂಪು) (क) ना. – ढोंग; सोंग; वैभव; विलास; सौंदर्य.

**लंब (बक)** (ಲಂಬ [ಬಕ]) (सं) ना. – लांब; लोंबणारा; सरळ रेषेस काटकोन करणारी रेषा; घड्याळ्याचा लंब; ओलंबा.

**लंबकर्ण** (ಲಂಬಕರ್ಣ) (सं) ना. – एक राक्षस; लांब कानाचा; गाढव.

**लंबण (न) (ळ)** (ಲಂಬಣ [ನ][ಳ]) (सं) ना. – लोंबणारा; लंबक; ओळंबा. लोंबता गोंडा; गळ्यातील हार; उपरणें; उत्तरीय अंगोछा.

**लंबि** (ಲಂಬಿ) (सं) वि. – आश्रय मिळवलेला; आधार सांपडलेला. टांगलेला; लोंबणारा.

**लंबिसु** (ಲಂಬಿಸು) (क) धा. – लांब करणें; लोंबकळत ठेवणें; टांगणें; रुंद करणें; विलंब लावणें; घोळणें.

**लंबोदर** (ಲಂಬೋದರ) (सं) ना. – ढेरपोट्या; गणपति.

**लंभ** (ಲಂಭ) (सं) ना. – प्राप्ति; आश्रय.

लय (ಲಯ) (सं) ना. – नाश; तंद्री; निद्रा; ऐक्य; गुंतवणूक; संगीतातील ताल; लीनता; विरघळा.
ललन (ಲಲನ) (सं) ना. – खेळ; क्रीडा; ळळळळती जीभ.
ललना (ने) (ಲಲನಾ [ನೆ]) (सं) ना. – स्त्री; विलासिनी; जिव्हा; जीभ.
ललंतिके (ಲಲಂತಿಕೆ) (सं) ना. – बेंबीपर्यंत बोळणारा हार.
ललाट (ಲಲಾಟ) (सं) ना. – कपाळ; भाल; निढळ.
—नेत्र (ನೇತ್ರ) (सं) ना. – भाललोचन; कपाळावर डोळा असलेला; शिव.
ललाटरेखे (ಲಲಾಟರೇಖೆ) (सं) ना. – भाग्यरेषा; विधिलिखित.
ललाम (ಲಲಾಮ) (सं) वि. – श्रेष्ठ, सुंदर; भूषणभूत; तिलकप्राय.
(सं) ना. – खूण, ओळख, भूषण, ध्वजा, घोडा.
ललित (ಲಲಿತ) (सं) वि. – सुंदर; कोमल; मृदु; मनोहर; निसर्गरमणीय, सरळ.
(क) ना. – श्रेष्ठ क्रिया; खेळ.
—कले (ಕಲೆ) (सं) ना. – मनोरंजक साहित्य; शिल्प, संगीत, चित्र इत्यादि कला.
ललिता (ಲಲಿತಾ) (सं) ना. – स्त्री; विलासिनी; दुर्गादेवी; एक अलंकार.
ललितांग (ಲಲಿತಾಂಗ) (सं) ना. – सुंदर बांध्याची स्त्री. रेखीव स्त्री; प्रमाणबद्ध देह असणारी स्त्री.
लल्ले (ಲಲ್ಲೆ) (क) ना. – प्रेमळ वर्तन; चुंबन; प्रीति.
—गेय् (ಗೆಯ್) (क) धा. – पापा घेऊन बोलणें, गोंजारून बोलणें; रमविणें.
—मातु (ಮಾತು) (क) ना. – गोडबोल; मिष्ठास भाषण; प्रेमालाप; मोहवाणी; लाडाचे बोलणें.
लल्लैसु (ಲಲ್ಲೈಸು) / लल्लेयिसु (ಲಲ್ಲೆಯಿಸು) (क) धा. – प्रेम दाखवणें; मोहविणें; प्रेमानें बोलणें.
लव (ಲವ) (सं) वि. – स्वल्प; लहान; किंचित्.
(सं) ना – कात्रण; कातरणी; चिंधी; लक्तर; सीतापुत्र; रोम; केस; लोकर; नाश.
लवण (ಲವಣ) (सं) ना. – एक राक्षस; मीठ; क्षार; ओढा.
लवणा (ಲವಣಾ) (सं) ना. – कांति; सौंदर्य.
लवणांतक (ಲವಣಾಂತಕ) (सं) ना. – लवणासुराला मारणारा; शत्रुघ्न.
लवणासुर (ಲವಣಾಸುರ) (सं) ना. – मधूक राक्षसाचा पुत्र.
लवणि(णे) (ಲವಣಿ [ಣೆ]) (सं) ना. – कांति; शोभा; सौंदर्य; अंगविन्यास; शृंगार; एक विशेष भावभंग; चकाकी; चमत्कार.
—कार (ಕಾರ) (क) वि. – वीर; बिलासी; शृंगारी; साज शृंगार करणारा.
लवणोदधि (ಲವಣೋದಧಿ) (सं) ना. – समुद्र; क्षीरसागर.
लवन (ಲವನ) (सं) ना. – कातरण; कापणी; कोयता; कुऱ्हाड.
लवलविके (ಲವಲವಿಕೆ) (क) ना. – हुरूप; उत्साह; गडबड; औत्सुक्य; आकांक्षा; चळवळ; व्यापार; आतुरता.
लवलविसु (ಲವಲವಿಸು) (क) धा. – आकांक्षिणें; हुरूप येणें; आतुरणें; चडफडणें.
लवित्र (ಲವಿತ್ರ) (सं) ना. – विळा; कोयता; कोयती; कुऱ्हाड; परशु.
लवुड(डि) (ಲವುಡ [ಡಿ]) (क) ना. – लाकूड; पोलादी द्रोण; मूस; छोटी काहील.
लशुन (ಲಶುನ) (सं) ना. – लसुण.
लष्करु (र) (ಲಷ್ಕರು [ರ]) (अ. दे.) ना – सेना; दळ; सैन्य.
लसत् (ಲಸತ್) (सं) वि. – झळकणारे; योग्य; शोभिवंत; प्रकाशणारे; डोळ्यात भरणारे; चमत्कारिक; चतुर; चलाख; उल्लसित; विनोदी.
लसित (ಲಸಿತ) (सं) वि. – चकाकणारा; शोभणारा; कांतिमान; प्रकाशणारा; मिरवणारा; जाणता.
लहणि (ಲಹಣಿ) (अ.दे.) ना. – आलाप; गायनातील आरोहावरोह; तान; लकेर; लहर; लाट; अडचण; पीडा; लचांड; भानगड; हुंडीचा एक प्रकार; वायफळ बोल; गप्पा; बाता.
लहरि (री) (ಲಹರಿ [ರೀ]) (सं) वि. – कांतिमान; चकाकणारा.
(सं) ना. – मनाचा ओघ; प्रवाह; लाट; तरंग; सौंदर्य; विलास.
लळि (ಲಳಿ) (क) ना. – हुरूप; उत्साह; कौशल्य; जाणतेपणा; सामर्थ्य; लाट; आश्चर्य; चमत्कार; क्रोध; उत्साह.
लळिगे (ಲಳಿಗೆ) (क) ना. – नळी; फुंकणी.
लाकुट (ಲಾಕುಟ) (सं) ना. – लाकूड; द्रोण; काठी; दंडा; योगदंड; गदाधारी; पहारेकरी; संरक्षक.
लाकुड (ळ) (ಲಾಕುಡ [ಳ]) (क) ना. – 'लाकुट' पहा.
लाक्ष (क्षा) (क्षे) (ಲಾಕ್ಷ [ಕ್ಷಾ] [ಕ್ಷೆ]) (सं) ना. – लाख.
लाक्षणिक (ಲಾಕ್ಷಣಿಕ) (सं) वि. – सांकेतिक अर्थ सांगणारा; लक्षणेने कळणारे.
(सं) वि. – लक्षण जाणणारा; शास्त्रज्ञ.
लाक्षागृह (ಲಾಕ್ಷಾಗೃಹ) (सं) ना. – लाखेचे घर; पांडवांचा नायनाट करण्यासाठी कौरवांनी बांधलेले घर.
लाख (ಲಾಖ) (अ-दे) ना. – शतसहस्र; शंभरहजार.
लाग (ಲಾಗ) (क) ना. – गलाटी; कोलांटी; हातचलाखी; झोला; वजन; लगाटी.

**लागहाकु** (ಲಾಗಹಾಕು) (क) धा.–विश्व प्रयत्न करणें; कोलांटी मारणें; उडी घेणें; लगाटी घेणें; पराजित होणें; वचन मोडणें.

**लागिसु** (ಲಾಗಿಸು) (क) धा.–उडणें; उडी मारणें; कोलांटी मारणें.

**लागु** (ಲಾಗು) (क) ना.–चापल्य; चलाखी; कौशल्य; वेग; तीव्रता; उड्डाण; वैपुल्य; विस्तार; सरळपणा; ध्येय.

**लागुमोग** (ಲಾಗುಮೋಗ) (क) ना.–हस्तचापल्य; त्वरा; गडबड.

**लागुळ** (ಲಾಗುಳ) (क) ना.–लाकूड; द्रोण; काठी; दंडा 'लाकुट' पहा.

**लाघव** (ಲಾಘವ) (सं) ना.–हलकेपणा; लघुत्व; सुलभता; उल्हास; कौशल्य; त्वरितता; पटुत्व; क्षुद्रता.

**लांगल** (ಲಾಂಗಲ) (सं) ना.–नांगर; औत.

**लांगूल** (ಲಾಂಗೂಲ) (सं) ना.–शेपूट; पुच्छ; पिसारा.

**—चालन** (ಚಾಲನ) (सं) ना.–गोंडाघोळी; होयबावृत्ति; हांजीखोरपणा.

**लाज** (ಲಾಜ) (सं) ना.–लाह्या; कळी; फूल. 'अरळ्' पहा. (अ-दे) ना.–लज्जा; अपमान; विनय.

**लाजा (जे)** (ಲಾಜಾ [ಜೆ]) (सं) ना.–भाताच्या लाह्या; साळीच्या लाह्या.

**लाजाहोम** (ಲಾಜಾಹೋಮ) (सं) ना.–विवाहातील एक हवनविधि.

**लांछन** (ಲಾಂಛನ) (सं) ना.–खूण; चिन्ह; अंगावरील तीळ; गालबोट; कलंक; अपमान; दुष्कीर्ति; लाज; लज्जास्पदता.

**लांच्छनास्पद** (ಲಾಂಛನಾಸ್ಪದ) (सं) वि.–लज्जा वाटण्यासारखी; काळोखी फासणारी; डाग लागणारी.

**लांछित** (ಲಾಂಛಿತ) (सं) वि.–अंकित; चिन्हित; अपमानित; लज्जित.

**लाट** (ಲಾಟ) (सं) ना.–दक्षिण गुजरात; दक्षिणी गुर्जर.

**लाभालाभ** (ಲಾಭಾಲಾಭ) (सं) ना.–नफातोटा; हिताहित; फायदाहानी; नफानुकसान.

**लामंच** (ಲಾಮಂಚ) (सं) ना.–वाळा; उशीर.

**लांबि** (ಲಾಂಬಿ) (अ.दे) ना.–लांबी; लुकण; उभे माप.

**लावंच** (ಲಾವಂಚ) (क) ना.–वाळा; उशीर. 'लामंच' पहा.

**लाय** (ಲಾಯ) (क) ना.–तबेला; पागा.

**लायर् (लैर्)** (ಲಾಯರ್ [ಲೈರ್]) (अ.दे) ना.–वीणा; एक आंग्लवाद्य.

**लालकि** (ಲಾಲಕಿ) (क) ना.–लहान पालखी.

**लालन (ने)** (ಲಾಲನ [ನೆ]) (सं) ना.–पोषण; संरक्षण; लाड; प्रेम; पापा; अंगाईगीत.

**लालस** (ಲಾಲಸ) (सं) वि.–अत्याशा करणारा; प्रेमळ; आसक्त.

**लालसा (से)** (ಲಾಲಸಾ [ಸೆ]) (सं) ना.–आसक्ति; उत्कट इच्छा; अति आशा.

**लाला** (ಲಾಲಾ) (सं) ना.–लाळ; मुखरस.

**लालि** (ಲಾಲಿ) (क) ना.–अंगाईगीत; पाळणागीत; दोलागाणें.

**लालित्य** (ಲಾಲಿತ್ಯ) (सं) ना.–मनोहारित्व; सौंदर्य; कोमलता; सरलत्व; शोभा; सुंदरपणा; मार्दव.

**लालिसु** (ಲಾಲಿಸು) (क) धा.–ऐकणें; कान देणें; प्रेम करणें; कौतुकानें खेळवणें; प्रशंसणे; गुण गाणें.

**लाव** (ಲಾವ) (सं) ना.–कापणी; कातरणी.

**लावक** (ಲಾವಕ) (सं) वि.–कापणारा; कातरणारा; नाश करणारा; लावी पक्षी; नागाचा खेळ करणारा; चहाडखोर.

**लावक्कि** (ಲಾವಕ್ಕಿ) (क) ना.–लावी पक्षी; लावग पक्षी.

**लावणि** (ಲಾವಣಿ) (क) ना.–लागवड; जमिनीची लावणी; खंड; फाळा; जानपदगीत पद्धति; लावणी; रास; संग्रह.

**—कार–दार** (ಕಾರ–ದಾರ) (क) ना.–लावणी म्हणणारा; लागणीनें शेत करणारा; शेतकरी; करद्या.

**लावण्य** (ಲಾವಣ್ಯ) (सं) ना.–रमणीयता; लालित्य; सौंदर्य; शोभा; खारटपणा, क्षारत्व.

**लावा (व्हा)** (ಲಾವಾ [ವ್ಹಾ] (अ.दे) ना.–ज्वालामुखी; अग्निरस.

**लाविगे (वुगे)** (ಲಾವಿಗೆ [ವುಗೆ]) (क) ना.–एक पक्षी; लावी.

**लावुक** (ಲಾವುಕ) (क) ना.–हानीकारक; गारुडी; नाग खेळवणारा; लावी पक्षी; लावालावी करणारा.

**लास** (ಲಾಸ) नाच; नर्तन; हुरळ; उड्डाण; विलास; नर्तकी; साथीसह संगीत नृत्य; संगीत नाट्य.

**लासिके (का)** (ಲಾಸಿಕೆ [ಕಾ]) (सं) ना.–अभिनयपूर्ण नृत्य; हावभावयुक्त नर्तन.

**लास्य** (ಲಾಸ್ಯ) (सं) ना.–नर्तन; नृत्य; नाचणें; नटणें.

**लाळ** (ಲಾಳ) (सं) ना.–नाळ; नळी; देठ; ओळ; म्यान.

**लाळविंडिगे** (ಲಾಳವಿಂಡಿಗೆ) (क) ना.–जाड अडणा; बंद दार उघडू नये म्हणून दाराला घातलेला आडवा दांडा.

**लाळि** (ಲಾಳಿ) (क) ना.–चोटा; चिमटा; पक्कड; सांडस. 'तंडस' पहा.

**लिकिलिकि** (ಲಿಕಿಲಿಕಿ) (क) वि.–सैल; जीर्ण; खिळखिळे; जुनें.

**लिखित** (ಲಿಖಿತ) (सं) वि.–लिहिलेले; चितारलेले; (सं.) ना. चित्र; ललाटरेषा; कागदपत्र; प्राचीन ऋषि.

**लिंग** (ಲಿಂಗ) (सं) ना.–खूण; चिन्ह; शिवाचा मूर्तिविशेष; वीरशैव धर्माचे चिन्ह.

**लिंगत्रय** (ಲಿಂಗತ್ರಯ) (सं) ना.–पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग ही व्याकरणांतील तीन लिंगें; इष्ट-गुरु-प्राण ही शैवांची तीन लिंगें.

**लिंगदेह** (ಲಿಂಗದೇಹ) (सं) ना.—जीवात्म्याचा सूक्ष्म देह.

**लिंगधारि** (ಲಿಂಗಧಾರಿ) (सं) ना.—वीर शैव धर्मांचा अनुयायी; लिंग धारण करणारा.

**लिंगवृत्ति** (ಲಿಂಗವೃತ್ತಿ) (सं) ना.—ढोंगी सन्यास; वृथा सन्यास.

**लिंगवंत** (ಲಿಂಗವಂತ) (सं) ना.—लिंग धारण करणारा; लिंगायत; वीर शैव.

**लिंगवेत्तिगे** (ಲಿಂಗವೆತ್ತಿಗೆ) (क) ना.—उंबरा; डोईपट्टी.

**लिंगशरीर** (ಲಿಂಗಶರೀರ) (सं) ना.—आत्म्यानें धारण केलेला सूक्ष्मदेह.

**लिंगायत** (ಲಿಂಗಾಯತ) (सं) ना.—लिंगधारी; वीर शैव; लिंगवंत.

**लिंगि** (ಲಿಂಗಿ) (सं) वि.—लिंग धारण करणारा.

**लिंगैक्य** (ಲಿಂಗೈಕ್ಯ) (सं) वि.—मुक्त; निर्वाणाला गेलेला; मृत.

**लिपि** (ಲಿಪಿ) (सं) ना.—अक्षर; लेखन; चित्रण; रंगभरणी; शिलालेख.

**लिपिकार** (ಲಿಪಿಕಾರ) (सं) वि.—लेखक; नकलणारा; खर्डेघाशा; कर्णिक.

**लिप्त** (ಲಿಪ್ತ) (सं) वि.—वापरलेले; लावलेले; लेपलेले; माखलेले.

**लिप्तपाद** (ಲಿಪ್ತಪಾದ) (सं) ना.—जाळीसारखे चर्मावरण असलेला पाय; जाल पाय.

**लिप्से** (ಲಿಪ್ಸೆ) (सं) ना.—आशा; मिळवण्याची इच्छा; प्राप्तीची आकांक्षा.

**लीढ** (ಲೀಢ) (सं) वि.—चाटलेलें; चाखलेलें.

**लीन** (ಲೀನ) (सं) वि.—ऐक्य झालेले; समाविष्ट; मिसळलेलें; मग्न; वितळलेलें; नम्र; प्रविष्ट.

**लीला** (ಲೀಲಾ) (सं) ना.—क्रीडा; खेळ; विलास; लहर.

**लीलायित** (ಲೀಲಾಯಿತ) (सं) वि.—सहज़ झालेलें; सुलभ; लाडाचे; प्रेमाचे; लीलेनें आचरलेलें.

**लीलावतार** (ಲೀಲಾವತಾರ) (सं) ना.—विशिष्ट कार्यासाठीं घेतलेला अवतार; विनोदार्थ घेतलेला जन्म.

**लुंगि** (ಲುಂಗಿ) (अ.दे) ना.—पंचा; कमरेचें वस्त्र.

**लुंचित** (ಲುಂಚಿತ) (सं) वि.—फाडलेलें; सोडलेलें; उपटलेलें.

**लुठन** (ಲುಠನ) (सं) ना.—लोटांगण; लोळण.

**लुंटाक** (ಲುಂಟಾಕ) (सं) ना.—लुटणारा; लुटारू; दरवडेखोर; घरफोड्या; डाकू.

**लुंठन** (ಲುಂಠನ) (सं) ना.—अपहार; नाडणूक; नागवणूक; सोलवण.

**लुप्त** (ಲುಪ್ತ) (सं) वि.—नाश पावलेले; अदृश्य झालेलें; जखम भरून आलेले; गमावलेले; तुकडे केलेले; फोडलेले; चूर केलेले; अपहृत.

**—मति** (ಮತಿ) (सं) वि.—बुद्धिहीन; निर्बुद्ध.

**लुब्ध** (ब्धक) ಲುಬ್ಧ [ಬ್ಧಕ]) (सं) वि.—मोहित; आशा केलेले; मागितलेले.

(सं) ना.—लोभी; कृपण; चिक्कू; व्याध; व्याधाचा तारा.

**लुलाप (य)** (ಲುಲಾಪ [ಯ]) (सं) ना.—म्हैस. महिषी.

**लुलि (ळि) त** (ಲುಲಿ [ಳಿ]ತ) (सं) वि.—उकरलेले; उखणलेले विखुरलेले; अस्ताव्यस्त केलेले, लोंबणारे, थकलेले, व्याप्त.

**लुळि** (ಲುಳಿ) (क) ना.—हातचलाखी; वेग; त्वरा; चकाकी; कळकळ; निबिडता; दाटपणा; झळक; चमक.

**लूटि (ट)** (ಲೂಟಿ [ಟ]) (अ. दे.) ना.—घरफोडी; लूटमार; दरवडा.

**लून** (ಲೂನ) (सं) वि.—कापलेले; कातरलेले; चिमटलेले; निवडलेले; शोधलेले; हुडकलेले.

**लूम** (ಲೂಮ) (सं) ना.—शेपूट; पुच्छ.

**लूलुक** (ಲೂಲುಕ) (सं) ना.—बेडूक; मंडूक.

**लेक्क** (ಲೆಕ್ಕ) (क) ना.—हिशोब; मोजणी; गणित; संस्था; निवडणूक; गौरव; स्थानमान.

**लेक्कणि (णिके)** (ಲೆಕ್ಕಣಿ [ಣಿಕೆ]) (क) ना.—लेखणी; लिहिण्याचे साधन. कलम; पेन; टाक.

**लेक्काचार** (ಲೆಕ್ಕಾಚಾರ) (क) ना.—व्यवहाराला धरून वर्तन; देणे घेणे; हिशोब.

**लेक्किग** (ಲೆಕ್ಕಿಗ) (क) ना.—कर्णीक; लिहिणारा; कुळकर्णी; कारकून; गणिततज्ञ; ज्योतिषी.

**लेक्किसु** (ಲೆಕ್ಕಿಸು) (क) धा.—हिशोबांत धरणें; मोजणें; लेखणें; गणना करणें; लक्ष देणें; जोडणें.

**लेंक** (ಲೆಂಕ) (क) वि.—भक्तसेवक; तर्र; मग्न; झिंगलेला.

**लेंकिग** (ಲೆಂಕಿಗ) (क) ना.—पगारी नोकर.

**लेंकिति** (ಲೆಂಕಿತಿ) (क) ना.—सेविका; दासी; स्त्रीनोकर.

**लेत्त** (ಲೆತ್ತ) (क) ना.—सोंगट्याचा खेळ; द्यूत; जुगार.

**लेप्प** (ಲೆಪ್ಪ) (क) ना.—लेप; लेपन; सारवण; सावडणी; गिलावा; झिलई; ओप; ठसा; छाप.

**ले. क. नि.** (ಲೇ.ಕ.ನಿ.) (क) वि.—लेखक; कवि; निबंधकार. (लेखन यांचे संक्षित रूप; क=कवि; नि=निबंधकार)

**लेख** (ಲೇಖ) (सं) ना.—लेखण; लिखाण; लिपी; शासन; करार. कागदपत्र; चित्र; शारदा.

**लेखक** (ಲೇಖಕ) (सं) वि.—लिहिणारा; साहित्यिक; प्रबंधकार.

**लेखन** (ಲೇಖನ) (सं) ना.—लिखाण. 'लेख' पहा.

**लेखनि (नी)** (ಲೇಖನಿ [ನೀ]) (सं) ना.—लेखणी; टाक; कलम.

**लेखिसु** (ಲೇಖಿಸು) (क) धा.—लिहिणें; अक्षर उठवणें; चित्र काढणें.

**लेखे (खा)** (ಲೇಖೆ [ಖಾ]) (सं) ना. – रेखा; रेषा; रेघ; ओळ.
**लेख्य** (ಲೇಖ್ಯ) (सं) वि. – लिहिण्यास योग्य; लिहिले जाण्यासारखें.
**लेप** (ಲೇಪ) (सं) ना. – चमक; झळक; कल्हई वापरण्याची वस्तु; लेप देण्याची वस्तु; मग्नता.
**लेपन** (ಲೇಪನ) (सं) ना. – गिलावा; सारवण; झिलई.
**लेपिसु** (ಲೇಪಿಸು) (क) धा. – लावणें; चोपडणें; लेपणें; घासणें; वापरणें.
**लेलिहान** (ಲೇಲಿಹಾನ) (सं) ना. – जिभल्या चाटणारा साप.
**लेवडि** (ಲೇವಡಿ) (अ. दे) ना. – अपहास; उपहास; परिहास.
**लेवादेवि** (ಲೇವಾದೇವಿ) (अ. दे.) ना. – देणेघेणें; विनिमय.
**लेश** (ಲೇಶ) (सं) वि. – थोडें स्वल्प.
(सं) ना. – अणु; अंश; विभाग; तुकडा.
**लेशमात्र** (ಲೇಶಮಾತ್ರಂ) (सं) अ. – थोडेदेखील; अत्यल्पहि.
**लेसिग** (ಲೇಸಿಗ) (क) वि. – कल्याणकर; हितकारी; पराक्रमी; शूर.
**लेसु** (ಲೇಸು) (क) अ. – हितकारी; योग्यप्रकारें; चांगले; उत्कृष्टपणें.
(क) ना. – अभिवृद्धि; उन्नति; वाढ.
**लेह (ह्य)** (ಲೇಹ [ಹ್ಯ]) (सं) ना. – चाटण; चाटण्याची वस्तु.
**लैंग्य** (ಲೈಂಗ್ಯ) (सं) वि. – लिंगासंबंधी; स्त्रीपुरुषाच्या गुप्तेंद्रियासंबंधी.
**लैंगिक** (ಲೈಂಗಿಕ) (सं) – वि. लिंगविषयक.
**लोचगुट्टु** (ಲೋಚಗುಟ್ಟು) (क) धा. मिटक्या मारणें; लुचणें; मचमचणें; चुकचुकणें.
**लोटकुमुरि** (ಲೋಟಕುಮುರಿ) (क) धा. – बोटे मोडणें; शाप देणें; अशुभ चिंतणें.
**लोल्लोट्टे** (ಲೊಲ್ಲೊಟ್ಟೆ) / **लोळलोट्टे** (ಲೊಳಲೊಟ್ಟೆ) (क) वि. – मोकळे; रिकामें; पोकळ; फोल; खोटें.
**लोक** (ಲೋಕ) (सं) ना. – जगत्; प्रपंच; जनांग; जनसामान्यता; आकाश; आभाळ; गौरव; प्राणी; दृष्टि.
—त्रय (ತ್ರಯ) (सं) ना. – स्वर्ग–मृत्यु–पाताळ यांचे त्रिकुट.
—बंधु – (ಬಂಧು) (सं) ना – सूर्य.
—माता (ಮಾತಾ) (सं) ना. – पार्वती देवी; नदी.
**लोकचक्षु** (ಲೋಕಚಕ್ಷು) (सं) ना. – सूर्य; सर्व साक्षी.
**लोकतंत्र** (ಲೋಕತಂತ್ರ) (सं) ना. – जगाचे व्यवहारज्ञान.
**लोकन** (ಲೋಕನ) (सं) ना. – पाहाणी; परिशीलन; दृष्टि.
**लोकनायक** (ಲೋಕನಾಯಕ) (सं) ना. – राष्ट्रनेता, पुढारी.
**लोकनेत्र** (ಲೋಕನೇತ್ರ) (सं) ना. – जगच्चक्षु.
**लोकबांधव** (ಲೋಕಬಾಂಧವ) (सं) ना. – सूर्य.
**लोकमातृ** (ಲೋಕಮಾತೃ) (सं) ना. – जगन्माता; लक्ष्मी; पार्वती.
**लोकमान्य** (ಲೋಕಮಾನ್ಯ) (सं) ना. – लोकादरास पात्र असलेला; श्रेष्ठ मनुष्य; टिळकांना जनतेनें दिलेले गौरवपर नांव.
**लोकमित्र** (ಲೋಕಮಿತ್ರ) (सं) ना. – सूर्य.
**लोकरूढि** (ಲೋಕರೂಢಿ) (सं) ना. – परंपरेनें आलेली रीति; चालत आलेली पद्धति.
**लोकवाद** (ಲೋಕವಾದ) (सं) ना. – लोकांत पसरलेली अफवा; वार्ता; लोकवार्ता; अंधविश्वास; बाजार गप्प.
**लोकवार्ता** (ಲೋಕವಾರ್ತಾ) (सं) ना. – लोकात पसरलेली बातमी.
**लोकसाक्षि** (ಲೋಕಸಾಕ್ಷಿ) (सं) ना. – परब्रह्म; वस्तु; देव; ईश्वर; सूर्य.
**लोकायत** (ಲೋಕಾಯತ) (सं) ना. – नास्तिक; पाखंडमत; निरीश्वरवाद. चार्वाकमत; नास्तिकता.
**लोकालोक** (ಲೋಕಾಲೋಕ) (सं) ना. – पुराणांतरी प्रसिद्ध असा दिव्य लोक.
**लोकोक्ति** (ಲೋಕೋಕ್ತಿ) (सं) ना. – म्हण; वाक्प्रचार; सुभाषित.
**लोकोत्तर** (ಲೋಕೋತ್ತರ) (सं) वि. – असामान्य; असाधारण; जगांत क्वचित आढळणारा; अत्यंत श्रेष्ठ.
**लोग** (ಲೋಗ) (क) ना. – लोक; सामान्यजन; जगत्; जनांग; मानव.
**लोगर्** (ಲೋಗರ್) (क) ना. – जनसामान्य; अज्ञ जनता; साधारण बुद्धीचा मनुष्य; विदेशीय; परका पुरुष.
**लोचक** (ಲೋಚಕ) (सं) ना. – मोंड; कनीनिका; बुबूळ; डोळ्यांतील बाहुली.
**लोचगुंडिगे** (ಲೋಚಗುಂಡಿಗೆ) (क) ना. – कमंडलु; यतीचे जलपात्र.
**लोचन** (ಲೋಚನ) (सं) ना. – डोळा; दृष्टि; दृष्टिक्षेप; कांति. दोन वाचक शब्द.
**लोचु** (ಲೋಚು) (क) ना. – केशलोचन; जैन धर्मरूढीप्रमाणें केस उपटण्याची पद्धति.
**लोटा** (ಲೋಟಾ) (अ.दे) ना. – थाली; वाटी; मोगा; तांब्या; पाणी पिण्याचें भांडें.
**लोड्डु** (ಲೊಡ್ಡು) (अ.दे) ना. – उशी; तक्या; लोड; रेलण्याचे साधन; व्यायामाचे एक उपकरण; करेला; मुद्गल.
**लोप** (ಲೋಪ) (सं) ना. – नाश; अदृश्यता; अभाव; उणीव; कमतरता; विध्वंस.
**लोपामुद्रा (द्रे)** (ಲೋಪಾಮುದ್ರಾ [ದ್ರೆ]) (सं) ना. – अगस्ती ऋषीची पत्नी.

**लोपिसु** (ಲೋಪಿಸು) (क) धा. – काढून टाकणें; सोडणें; त्यागणें; नाहींसे होणें.

**लोभ** (ಲೋಭ) (सं) ना. – आशा; इच्छा; आकांक्षा; प्रेम; प्रीति; कृपणता; कंजूषपणा; काम न करतां दाम मिळवण्याची वेडी आशा.

**लोभान** (ಲೋಭಾನ) (क) ना. – धूप; धूपार्चन; सुगंधी द्रव्य; गुग्गुळ.

**लोभि** (ಲೋಭಿ) (सं) वि. – लोभ असलेला; दुसऱ्याची वस्तु इच्छिणारा; ऐतखाऊ; कृपण; कंजूष.

**लोम** (ಲೋಮ) (सं) ना. – रोम; रोमांच; अंगावरील केस.

**लामश** (ಲೋಮಶ) (सं) ना. – अंगभर केस असलेला; केसाळ; अस्वल; मेंढरू; कोल्हा; वानर.

**लोह्मर्ष** (ಲೋಮಹರ್ಷ) (सं) ना. – आनंदाचे रोमांच; आनंदाने अंगावरील केस उभे राहणें; प्रमोदपुलक.

**लोल** (ಲೋಲ) (सं) वि. – दोलायमान; चंचल; अस्थिर; हलता; झुलता; महत्त्वाकांक्षी; मोठपणाची इच्छा करणारा.
(सं) ना. – विलासी; कामुक; आसक्त; विनोदात काम करणारा. जीवन व्यर्थ घालवणारा.

**लोलक** (ಲೋಲಕ) (सं) ना. – किरणाचे पृथक्करण करणारी पैलूदार काच; कर्णभूषण; झूल; डमरू.

**लोलन** (ಲೋಲನ) (सं) ना. – डोलन; चांचल्य; विलासप्रियता; खुशालचेंडूपणा. 'अलेत' पहा.

**लोलुप (भ)** (ಲೋಲುಪ [ಭ]) (सं) वि. – अति आशा करणारा; अत्यासक्त; लोभी; महत्त्वाकांक्षी.
**—ता (ते)** (ತಾ [ತೆ]) (सं) ना. – आतुरता; आसक्ति.

**लोलुप्ति** (ಲೋಲುಪ್ತಿ) (सं) ना. – दुराशा; दुराकांक्षा; दुरिच्छा.

**लोला** (ಲೋಲಾ) (सं) ना. – चंचला; चपला; सुंदरी; कामिनी; भोगेच्छा असणारी.

**लोवे** (ಲೋವೆ) (क) ना. – छपराचे पाखें; छपराचा उतार; पडछप्पर.

**लोष्ट (ष्टु) (ष्टक)** (ಲೋಷ್ಟ [ಷ್ಟು][ಷ್ಟಕ]) (क) ना. – मातीचा ढिकळा; ढेपसा; मातीची वीट.

**लोह** (ಲೋಹ) (सं) ना. – लोखंड; तांबें; एक तांबडी धातु; तांबडा रंग; रक्त; खड्ग; एक धातु.
**—मंजूषा** (ಮಂಜೂಷಾ) (सं) ना. – लोखंडी पेटी; खजिना; तिजोरी; लोखंडी कपाट.

**लोहकार** (ಲೋಹಕಾರ) (सं) ना. – लोहार; घिसाडी; लोखंडाचें काम करणारा.

**लोहकांत** (ಲೋಹಕಾಂತ) (सं) ना. – लोहचुंबक; आयसकांत; स्पर्शमणि.

**लोहचुंबक** (ಲೋಹಚುಂಬಕ) (सं) ना. – लोखंडाचें आकर्षण करणारी धातु; लोहकांत.

**लोहपट्टिका** (ಲೋಹಪಟ್ಟಿಕಾ) (सं) ना. – गज; लोखंडी कटांजन.

**लोहवक्करे** (ಲೋಹವಕ್ಕರೆ) (क) ना. - रिकीब; घोडेस्वाराची पाय ठेवण्याची लोखंडी पायराखी; 'पकरके' पहा.

**लोहवर** (ಲೋಹವರ) (सं) ना. – धातुश्रेष्ठ; सोनें.

**लोहित** (ಲೋಹಿತ) (सं) ना. – रक्त; तांबे; तांबडा रंग; क्रोध; राग; कुऱ्हाड; आयुध.

**लोहिताक्ष** (ಲೋಹಿತಾಕ್ಷ) (सं) ना. – कोकीळ; तांबड्या डोळ्याचा पक्षी; विष्णु.

**लोहितांग** (ಲೋಹಿತಾಂಗ) (सं) ना. – रक्तांग; मंगळ; संधिकालीन सूर्य.

**लोहिताश्व** (ಲೋಹಿತಾಶ್ವ) (सं) ना. – अग्नि; हरिश्चंद्रपुत्र.

**लोळे (ळि)** (ಲೋಳೆ [ಳಿ]) (क) ना. – लाळ; थुंकी; मुखरस; लालाजल. अंड्यातील बलक.

**लौकायतिक** (ಲೌಕಾಯತಿಕ) (सं) वि. – चार्वाक मताचा मनुष्य; नास्तिकवादी.

**लौकिक** (ಲೌಕಿಕ) (सं) वि. – लोकसंबंधी; जनाविषयीं; रूढ; ग्राम्य; प्रापंचिक; ऐहिक; ज्ञान संगत; तर्कशुद्ध; भौतिक.
**—वाद** (ವಾದ) (सं) ना. – पांचभौतिक विज्ञान.

**लौल्य** (ಲೌಲ್ಯ) (सं) ना. – लोलुपता; अस्थिरता; चांचल्य; अत्यासक्ति; औत्सुक्य; आतुरता.

## व

**व** (ವ) (सं) ना. – अवर्गीय मालेंतील चौथें व्यंजन; भविष्य कृदंत करतांना धातूला लागणारा प्रत्यय; वायु; वरुण; भुज; संबोधन; शुभ; क्षेम; महासागर; वस्त्र; राहु; वास.

**वं** (ವಂ) (सं) वि. – भविष्यकृदंताचा प्रत्यय.

**वंश** (ವಂಶ) (सं) ना. – कुल; कुटुंब; संतती; घराणें; वेळु; काकण; गट; ढीग; समूह; मेळा; मुरली, पावा; पाणी; शाल; सावरवृक्ष; ऊस; दहा हात लांबीचें माप.
**—ज** (ಜ) (सं) ना. – वंशात जन्मलेला; आप्त; बांधव; बांबूपासून उत्पन्न झालेला.
**—धर** (ಧರ) (सं) ना. – पर्वत; वेळूचें बेट.
**—नर्ति** (ನರ್ತಿ) (सं) ना. – विदूषक; हास्यकार.

—वृक्ष, वल्लि (ವೃಕ್ಷ–ವಲ್ಲಿ) (सं) ना.–वंशविस्तार; वाढती संतती; कुलपरंपरा; वंशावळ; पिढी.

—स्थ (ಸ್ಥ) (सं) ना.–कुटुंबीय; पिढीचा; बांधव.

**वंशक** (ವಂಶಕ) (सं) ना.–ऊस; बांबू; एक मासा.

**वंशि** (ವಂಶಿ) (सं) ना.–वेणु; पावा; मुरली; बासरी.

**वंशि (शी) क** (ವಂಶಿ [ಶೀ] ಕ) (सं) ना.–वंशविषयक; वेणु; पावा.

**वकालतु** (ವಕಾಲತು) (अ.दे) ना.–वकिली; वकिलाचा व्यवसाय; पक्षकाराच्या वतीनें बोलण्याचें काम.

**वकील** (ವಕೀಲ) (अ.दे) ना.–कायदापंडित; विधिज्ञ; रायभरी; शासनांतील नियमाला धरून पक्षकारातर्फे भांडणारा.

**वकुल (ळ)** (ವಕುಲ [ಳ]) (क) ना.–नागकेशर; बकुल; करंजाचें झाड.

**वक्कणिसु** (ವಕ್ಕಣಿಸು) (क) धा.–विवरणें; खुलासा करणें; स्पष्ट करणें; व्याख्यान देणें; सांगणें.

**वक्कणे** (ವಕ್ಕಣೆ) (क) ना.–व्याख्यान; विवरण; समजूत; सांगणें; खुलासा; स्पष्टीकरण; टिप्पण; शैली; सरणी.

**वक्काणिसु** (ವಕ್ಕಾಣಿಸು) (क) धा.–व्याख्यान देणें; टीका करणें; वाखाणणें; खुलासा करणें; समजून सांगणें.

**वक्तव्य** (ವಕ್ತವ್ಯ) (सं) वि.–सांगण्यास योग्य; समजूत देण्यासारखें; वक्तृत्व; बोलकेपणा; वाचाळता; उपदेश; उपन्यास; निंदा.

**वक्तार (तृ)** (ವಕ್ತಾರ [ತೃ]) (सं) ना.–वाचिवीर; वाक्पंडित; बोधक; उपन्यास करणारा; वाक्चतुर.

**वक्तृत्व** (ವಕ್ತೃತ್ವ) (सं) ना.–भाषणचातुर्य; बोलण्याची कला.

**वक्त्र** (ವಕ್ತ್ರ) (सं) ना.–मुख; तोंड; चर्या; चेहरा.

**वक्र** (ವಕ್ರ) (सं) वि.–वाकडे; तिरळे; वाकलेले; चिंबलेलें; गुंडाळलेलें; वळलेलें.
(सं) ना.–वक्रता; बाक; कुटिलता; अप्रामाणिकता; वंचना; मंगळग्रह; शनिग्रह.

**वक्रग्रीव** (ವಕ್ರಗ್ರೀವ) (सं) ना.–वाकडमान्या; उंट.

**वक्रतुंड** (ವಕ್ರತುಂಡ) (सं) ना.–गणपति; पोपट; वाकडें तोंड असलेला.

**वक्रदृष्टि** (ವಕ್ರದೃಷ್ಟಿ) (सं) ना.–वाकडी नजर; टरकें; सूडबुद्धि; अनादर; मत्सर; पोटदुखी.

**वक्रांग** (ವಕ್ರಾಂಗ) (सं) ना.–हंसपक्षी.

**वक्रि** (ವಕ್ರಿ) (सं) ना.–वाकडी वस्तु; वाकलेली वस्तु; पीळ घातलेली वस्तु; कपटी; फसव्या.

**वक्रोक्ति** (ವಕ್ರೋಕ್ತಿ) (सं) ना.–व्यंगोक्ति; व्यंग्य; टोचून बोलणें; बोचक भाषण; वाकडे बोल; एक काव्यालंकार.

**वक्रीभवन** (ವಕ್ರೀಭವನ) (सं) ना.–वक्रता; वाकडेपणा.

—**किरणवक्रीभवन** (ಕಿರಣವಕ್ರೀಭವನ) (सं) ना.–प्रकाश घनपदार्थावरून जातांना होणारी किरणांची वाकडी गति; किरणाची दिशापालट.

**वक्ष (क्षस्)** (ವಕ್ಷ [ಕ್ಷಸ್]) (सं) ना.–छाती; ऊर; छाताड.

**वक्षस्थळ** (ವಕ್ಷಸ್ಥಳ) (सं) ना.–छाती; छातीचा भाग.

**वक्षोज** (ವಕ್ಷೋಜ) (सं) ना.–स्तन; थान; छातीवर उपजलेले; उरोज.

**वखार** (ವಖಾರ) (अ-दे) ना.–पदार्थसंग्रहस्थळ; कोठी; कोठार; 'उग्राण' पहा.

**वंक** (ವಂಕ) (क) वि.–वक्र; वाकडे; बाकदार.

**वंकर** (ವಂಕರ) (क) वि.–कुरूप; वक्र; कुटिल; अप्रामाणिक.

**वंकि** (ವಂಕಿ) (क) ना.–वाकी; मुसळ.

**वंग** (ವಂಗ) (सं) ना.–बंगालदेश; बंगाली; शिसें; जस्त.

**वंगड** (ವಂಗಡ) (क) ना.–पक्ष; पंथ; कुटुंबीय व्यक्ति; 'पंगड' पहा.

**वंगार** (ವಂಗಾರ) (क) ना.–सोनें; भंगार; कांचन.

**वंगीय** (ವಂಗೀಯ) (सं) वि.–बंगालदेशीय; बंगालीबाबू.

**वच (चस्) (चस्सु)** (ವಚ [ಚಸ್] [ಚಸ್ಸು]) (सं) ना.–भाषा; गोष्ट; पोपट; सूर्य;

**वचन** (ವಚನ) (सं) ना.–उक्ति; गोष्ट; वाक्य; संख्या; दिलेलें वचन; प्रतिज्ञा; नियम; सूत्र; सुभाषित; शिवशरणोपदेश.

—**त्रय** (ತ್ರಯ) (सं) ना.–एक–द्वि–बहु अशी व्याकरणांतील तीन वचनें.

—**स्थ** (ಸ್ಥ) (सं) वि.–प्रतिज्ञा करणारा; बोलण्याला जागणारा; विश्वासु.

**वचनीय** (ವಚನೀಯ) (सं) वि.–सांगण्यास योग्य. निंद्य; तिरस्करणीय. (उपरोधिक भाषेंत)

**वचनीयता (ते)** (ವಚನೀಯತಾ [ತೆ]) (सं) ना.–निंदा; तिरस्कार; आगादन; अपवाद; चहाडी

**वचसांपति** (ವಚಸಾಂಪತಿ) (सं) ना.–बृहस्पति; उत्तम वक्ता; बोलका.

**वचस्वि** (ವಚಸ್ವಿ) (सं) ना.–चांगलें भाषण करणारा; वाचाळ; बोलका.

**वचा (चे)** (ವಚಾ [ಚೆ]) (सं) ना.–वेखंड; तिखट मूळ; सुंठ; 'बजे' पहा.

**वचोलहरि** (ವಚೋಲಹರಿ) (सं) ना.–भाषणाचा ओघ; वाक्प्रवाह; ओघवती भाषा.

**वजा** (ವಜಾ) (अ.दे.) ना.–वर्ज; उणे; वजाबाकी; त्याग; कमती; वगळणी; कमी.

**वजीर** (ವಜೀರ) (अ. दे.) ना.—मुख्य मंत्री; प्रधान.
**वज्र** (ವಜ್ರ) (सं) ना.—हिरा; माणीक; देवेंद्राचें आयुध; वीज; क्रूरता; कृष्णाचा नातू; चिकटपदार्थ; सरस; डिंक.
**वज्रकवच** (ವಜ್ರಕವಚ) (सं) ना.—चिलखत; अंगत्राण; सक्त पाहरा.
**वज्रकाय** (ವಜ್ರಕಾಯ) (सं) ना.—वज्राप्रमाणें कठीण देह असलेला; भीम; हनुमंत.
**वज्रदंत (ति)** (ವಜ್ರದಂತ [ತಿ]) (सं) ना—रानडुक्कर; उंदीर; कठिण दातांचा प्राणी; कोरांटी.
**वज्रदेहि** (ವಜ್ರದೇಹಿ) (सं) ना.—हनुमंत; भीम; वज्रकाय.
**वज्रनिर्घोष** (ವಜ್ರನಿರ್ಘೋಷ) (सं) ना.—विजेचा कडकडाट.
**वज्रपाणि** (ವಜ್ರಪಾಣಿ) (सं) ना.—वज्रधारी; इंद्र.
**वज्रमुष्टि** (ವಜ್ರಮುಷ್ಟಿ) (सं) ना.—कठीण मुठीचा; टणक मूठ; एक वनस्पति; एक आयुध.
**वज्रशुंठ** (ವಜ್ರಶುಂಠ) (सं) ना.—अति मूर्ख; अतिमंद; ठोंब्या.
**वज्रांग** (ವಜ್ರಾಂಗ) (सं) ना.—वज्रदेही; तारकासुराचा बाप.
**वज्रि** (ವಜ್ರಿ) (सं) ना.—वज्रायुध वापरणारा; देवेंद्र.
**वंचक** (ವಂಚಕ) (सं) वि.—फसव्या; कपटी; धूर्त.
**वंचने** (ವಂಚನೆ) (सं) ना.—फसवणूक; कापट्य; धूर्तता; माया.
**वंचिसु** (ವಂಚಿಸು) (क) धा.—फसविणें; ठकविणें; जादू करणें; वचन देऊन फसवणें; विश्वासघात करणें.
**वट** (ವಟ) (सं) ना.—वटवृक्ष; अश्वत्थ; घोळीची भाजी; गोळी; वटिका; वडी; धारगा; दोरा; बट; चिन्ह.
—**पत्र** (ಪತ್ರ) (सं) ना.—वडाचे पान.
—**वासी** (ವಾಸಿ) (सं) ना.—यक्ष; भूत.
**वटक (वट)** (ವಟಕ [ವಟ]) (क) ना.—वडा; गोड पातळ वस्तु; बिल्ला.
**वटवट** (ವಟವಟ) (क) ना.—गुणगुण; बडबड; निरर्थक बोलणें.
**वटा (ठा) र** (ವಟಾ [ಠಾ]ರ) (अ.दे) ना.—प्रशस्त जागा; घराभोवतीचें आवार; बखळ; बखळींतील घरें; वाडी.
**वटि (टी) टिक** (ವಟಿ [ಟೀ]ಟಿಕ) (सं) ना.—गोळी; मात्रा; वडी; बिल्ला.
**वटु** (ವಟು) (सं) ना.—बटु; ब्रह्मचारी; मुंजा मुलगा; विद्यार्थी.
**वट्ट** (ವಟ್ಟು) (अ.दे) ना.—दलाली; कमिशन; अडत; वटाव; बट्टा; (वटावणीचा पैसा.)
**वड** (ವಡ) (क) ना.—उपवन; उद्यान; मळा.
**वडवा (बा) ग्नि** (ವಡವಾ [ಬಾ]ಗ್ನಿ) (सं) ना.—वणवा; वडवानल; समुद्राग्नि; घोडी.
**वडवास्त्र** (ವಡವಾಸ್ತ್ರ) (सं) ना.—अग्न्यस्त्र; प्रलयकारी शस्त्र.
**वडवे** (ವಡವೆ) (सं) ना.—वडवाग्नि; घोडी; विधवा; दासी; शेतकरीण; अश्विनीदेवता.
**वडा** (ವಡಾ) (सं) ना.—खाण्याचा पदार्थ; गोड अगर तिखट वडा.
**वडि** (ವಡಿ) (क) ना.—झळ; ऊब; उष्णता; गर्म्य.
**वडिश** (ವಡಿಶ) (सं) ना.—घाणा; चरक; गळ.
**वडे** (ವಡೆ) (क) ना.—'वट' पाहा; वड; वडी; वडा.
**वड्डंति** (ವಡ್ಡಂತಿ) (क) ना.—वर्धंती; जयंती; वाढदिवस; जन्मदिनोत्सव; जन्मदिन.
**वणिक (ज)** (ವಣಿಕ್ [ಜ]) (सं) ना.—व्यापारी; वर्तक; वाणी.
**वणिग्वाट** (ವಣಿಗ್ವಾಟ) (सं) ना.—पेठ; दुकानांची ओळ; बाजार; मंडई.
**वंट (ठ) (ड)** (ವಂಟ [ಠ]ಡ) (सं) ना.—भाग; ब्रह्मचारी; एकलकोंडा; क्षुद्र; कुऱ्हाडीचा दांडा; विळ्याची मूठ; सेवक; व्यभिचारिणी; कुब्ज.
**वंटिसु** (ವಂಟಿಸು) (क) धा.—उपटणें; उपडणें: उखडणें; उसपणें.
**वत्** (ವತ್) (सं) प्र.—सदृश; असे या अर्थी येणारा प्रत्यय; वान्
**वतन** (ವತನ) (अ. दे) ना.—पूर्वार्जित जिंदगी; संपत्ति; इनाम जमीन; वंशपरंपरा चालणारी देणगी; ओझें; भार.
**वति (ती)** (ವತಿ [ತೀ]) (सं) प्र.—असणारी या अर्थी प्रत्यय.
**वतंस** (ವತಂಸ) (सं) वि.—अवतंस; श्रेष्ठ; अधिकचा; बरेण्य. (सं) ना.—शिखर; भूषण.
**वत्स** (ವತ್ಸ) (सं) ना.—वासरू; मुलगा; पुत्र; पोर.
**वत्सक** (ವತ್ಸಕ) (सं) ना.—लहान लेकरूं; लहान वासरूं; वत्स असलेली गाय.
**वत्सनाभि** (ವತ್ಸನಾಭಿ) (सं) ना.—बचनाग; एक विषारी वनस्पति.
**वत्सर** (ವತ್ಸರ) (सं) ना.—बर्ष; संवत्सर; बारा महिन्यांचा अवधि.
**वत्सल** (ವತ್ಸಲ) (सं) वि.—प्रिय; लाडका; प्रेमळ; आसक्त; दयाळु; कारुणिक; मायाळु; कृपाळू.
**वत्से** (ವತ್ಸೆ) (सं) ना.—कन्या; मुलगी; दुहिता; कुमारी.
**वद (दत्)** (ವದ [ದತ್]) (सं) वि.—बोलका; बोलणारा.
**वदन** (ವದನ) (सं) ना.—चेहरा; तोंड.
**वदान्य** (ವದಾನ್ಯ) (सं) वि.—उदार; दाता; सढळ हातानें देणारा; दानशूर.
**वद्य** (ವದ್ಯ) (सं) वि.—सांगण्यास योग्य; कृष्णपक्ष; काळोखी पंधरवडा.
**वध (धे)** (ವಧ [ಧೆ]) (सं) ना.—खून; हत्त्या; हिंसा.
**वधक** (ವಧಕ) (सं) वि.—वध करणारा; खुनी; हिंसक; ठार मारणारा.
**वधिसु** (ವಧಿಸು) (क) ना.—ठार मारणें; खून करणें.

वधु (धू) (ವಧು [ಧೂ] (सं) ना. – उपवर कन्या; लग्नाची मुलगी; सून; नवपरिणीता स्त्री; पत्नि.
वधूटि (टी) (ವಧೂಟಿ [ಟೀ]) (सं) ना. – वयात आलेली; युवति; तरुणी; स्त्रीसमूह.
वधुवर (ವಧುವರ) (सं) ना. – लग्नाऊ पतिपत्नि; विवाहेच्छु युवयुवति; पतिपत्नि.
वध्य (ವಧ್ಯ) (सं) वि. – ठार मारण्यास योग्य; हत्त्या करण्यायोग्य.
वन (ವನ) (सं) ना. – बन; मळा; जंगल; अरण्य; पाणी.
वन (नें) चर (ವನ [ನೇ] ಚರ) (सं) वि. – जंगलांत फिरणारा रानटी; पारधी; शिकारी; पहाडी; जंगली; वन्य.
वन (नें) ज (ವನ [ನೇ]ಜ) (सं) ना. – कमळ; नीरज.
—मुखी (ಮುಖಿ) (सं) ना. – सुंदरी.
वनजसंभव (ವನಜಸಂಭವ) (सं) ना. – कमलोद्भव; ब्रह्मदेव.
वनजाक्ष (ವನಜಾಕ್ಷ) (सं) ना. – कमलनेत्र; विष्णु; कृष्ण.
वनदेवते (ವನದೇವತೆ) (सं) ना. – अप्सरा; देवी; वनांतील देवी.
वनधि (निधी) (ವನಧಿ [ನಿಧೀ]) (सं) ना. – समुद्र; अब्धि.
वन (न्य) पशु (ವನ [ನ್ಯ] ಪಶು) (सं) ना. – श्वापद; मृग; जंगलांत निपजणारे पशु.
वनप्रिय (ವನಪ್ರಿಯ) (सं) ना. – कोकीळ.
वनभृत् (ವನಭೃತ್) (सं) ना. – मेघ; ढग; पाण्यानें भरलेले.
वनभोजन (ವನಭೋಜನ) (सं) ना. – मळ्यांत केलेलें जेवण; सहलींतील सहभोजन.
वनमहिष (ವನಮಹಿಷ) (सं) ना. – रानरेडा; गवा.
वनमालि (ವನಮಾಲಿ) (सं) ना. – विष्णु; कृष्ण; कुंजांत राहणारा.
वनराजि (ವನರಾಜಿ) (सं) ना. – झाडी; अरण्य; वृक्षराजी.
वनरुह (ವನರುಹ) (सं) ना. – कमल; जलज; पाण्यांत रुजणारें.
वनवास (ವನವಾಸ) (सं) ना. – अरण्यात राहणें; रानांतील जीवन; संकटकाल; आपत्काल; दुर्दिन.
वनवासि (ವನವಾಸಿ) (सं) ना. – वनांत राहणारा; योगी; मुनी; रानटी जन.
वनस्पति (ವನಸ್ಪತಿ) (सं) ना. – औषधी; तरुवेली; झाडझाडोरा.
वनालिका (ವನಾಲಿಕಾ) (सं) ना. – सूर्यफूल.
वनि (ವನಿ) (सं) ना. – इच्छा; अपेक्षा.
वनिता (ते) (ವನಿತಾ [ತೆ]) (सं) ना. – बाई; स्त्री; पत्नि; प्रिया; मादी.
—विलास (ವಿಲಾಸ) (सं) वि. – स्त्रियांचा श्रृंगार; विनोद.
वनीय (प) क (ವನೀಯ [ಪ]ಕ) (सं) वि. – याचक; भिक्षेकरी; मागणारा; भिक्षुक.
वनौकस् (स) (ವನೌಕಸ್ [ಸ]) (सं) ना. – वनवासी; माकड; मुनी; ऋषि; योगी; जंगली.
वंतिगे (ವಂತಿಗೆ) (क) ना. – वर्गणी; पट्टी; कर; हप्ता;
वंदन (ने) (ವಂದನ [ನೆ]) (सं) ना. – नमस्कार; स्तुती; प्रशंसा.
वंदनमाले } (ವಂದನಮಾಲೆ) (सं) ना. – तोरण;
वंदनमालिका } ವಂದನಮಾಲಿಕಾ) चौकटीवर बांधलेली धान्यलोबी व आंब्याचीं पानें यांची माळ; मंगलमाळ.
वंदनीय (ವಂದನೀಯ) (सं) वि. – वंद्य; नमस्कार करण्यायोग्य; पूज्य.
वंदारु (ವಂದಾರು) (सं) वि. – भक्त; वर्णन करणारा; भाट; स्तुतिपाठक.
वंदि (ವಂದಿ) (सं) वि. – बंदी; भाट; स्तुतीपाठक; चारण; छपन्नपट्टी.
वंदिसु (ವಂದಿಸು) (क) धा. – नमस्कार करणें; प्रशंसणें; पूजणें; स्तवणें.
वंद्य (ವಂದ್ಯ) (सं) वि. – पूज्य; वंदनीय; स्तवनीय.
वंध्या (ध्ये) (ವಂಧ್ಯಾ [ಧೆ್ಯ]) (सं) ना. – वांझ; निपुत्रिक; निष्फळ कार्य;
वन्य (ವನ್ಯ) (सं) वि. – वनासंबंधीं; जंगली; हिंस्र; क्रूर
वपन (ವಪನ) (सं) ना. – क्षौर; हजामत; मुंडन; पेरणी; लावणी;
वपु (पुस्) (ವಪು [ಪುಸ್]) (सं) ना. – देह; शरीर; काया; आकृति.
वपे (ವಪೆ) (सं) ना. – रक्तस्राव; खळगा; श्वासपटल (Diaphragm) 'कुणी' पहा.
वप्तृ (ವಪ್ತೃ) (सं) ना. – क्षौरिक; हजाम; न्हावी; नापित.
वप्र (ವಪ್ರ) (सं) ना. – टेकडी; उताराबरील पायवाट; डोंगर-उतार; कालवा; तीर; खंदक; बुरुज; नांगरलेली जमीन; अवयवहीनता; शिसें; पाप; पेरणी; आवार.
—क्रीडा (ಕ್ರೀಡಾ) (सं) ना. – वाळूंतील खेळ; वाळवंटीचे खेळ.
वमन (ವಮನ) (सं) ना. – वांती; ओकारी; उलटी.
वय (यस्) (यस्सु) (ವಯ [ಯಸ್] [ಯಸ್ಸು]) (सं) ना. – आयुर्मान; आयुष्य; जीवित; जीवनकाल.
— स्क (ಸ್ಕ) (सं) वि. – वयांत आलेला; तरुण; वृद्ध; वय झालेला
वयन (ವಯನ) (क) ना. – अनुकूलता; साधुत्व; हित; कल्याण.
वयल् (ವಯಲ್) (क) ना. – मैदान; खुली विस्तृत जागा.
वयस्य (ವಯಸ್ಯ) (स) ना. – बरोबरीचा; सखा; मित्र; समरयस्क; वारगीचा.
वयिन (ವಯಿನ) (क) ना. – सुलभ उपाय; हित; कल्याण; साधुत्व.

**वयोधर्म** (ವಯೋಧರ್ಮ) (सं) ना.—वयोमानाप्रमाणें होणारी स्थितिगति.

**वयोवृद्ध** (ವಯೋವೃದ್ಧ) (सं) ना.—वय झालेला; म्हातारा; वृद्ध.

**वय्यार** (ವಯ್ಯಾರ) (क) ना.—संकोच; मुरका, विलास; सोंग; बतावणी; ढोंग.

**वय्यारि** (ವಯ್ಯಾರಿ) (क) ना.—मुरकणारी; मुरका मारणारी; विलासिनी; लज्जावती; अभिनेत्री; विलासवती.

**वय्याळि** (ವಯ್ಯಾಳಿ) (क) ना.—घोड्याची रपेट; घोडस्वारी.

**वय्याळिग** (ವಯ್ಯಾಳಿಗ) (क) ना.—घोडेस्वार; घोड्यावरून रपेट करणारा.

**वर** (ವರ) (सं) वि.—श्रेष्ठ; उत्तम; चांगला; अभीष्ट.
(सं) ना.—इच्छा; आशिर्वाद; अनुग्रह; संभावना; दानधर्म; प्रियकर; पति; लग्नाऊ तरुण. पावली, एक नाणें.
—**द** (ದ) (सं) ना.—वर देणारा; अनुग्रह करणारा.
—**दा** (**दे**) (ದಾ [ದೆ]) (सं) ना.—वर देणारी; अनुग्रह करणारी; एक नदी.
—**स्वयंवर** (ಸ್ವಯಂವರ) (सं) ना.—स्वतःच वर पसंत करणें; आपणच आपल्या पतीची निवड करणें.

**वरक** (**कु**) (ವರಕ [ಕು]) (क) ना.—वर्ख; धातूचा अति पातळ पत्रा; झिलई; गिलीट.

**वरकवि** (ವರಕವಿ) (सं) ना.—जन्मजात कवि; उपजत कवि; अनुभवी कवि; प्रतिभावान् कवि.

**वरट** (ವರಟು) (क) वि.—खडबडीत; विरूप; तुरट; काळजिरे; कडूजिरे.

**वरण** (ವರಣ) (सं) ना.—लेप; निवड; सेतु; एक झाड; आवार; उंट; वाङ्निश्चय; आच्छादन; वेरा; वारणानदी.
—**माले** (ಮಾಲೆ) (सं) ना.—लग्नांत वधुवरांनीं परस्परांना घालावयाची माळ.

**वरदक्षिणे** (ವರದಕ್ಷಿಣೆ) (सं) ना.—वधुपित्यानें वराला दिलेला पैका; हुंडा.

**वरदि** (ವರದಿ) (क) ना.—वार्ता; बातमी; इतिवृत्त; वर्दी; समाचार.

**वरपूजे** (ವರಪೂಜೆ) (सं) ना.—कन्यादानाचे वेळी केलेला वराचा सन्मान; सीमांतपूजन.

**वरोपचार** (ವರೋಪಚಾರ) (सं) ना.—वराला द्यावयाचा पोषाख.

**वरयित** (**तृ**) (ವರಯಿತ [ತೃ]) (सं) ना.—वर; कन्यार्थी; लग्नाचा मुलगा.

**वरवर्णिनि** (**नी**) (ವರವರ್ಣಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—गौरवर्णी; उत्तम रंगाची स्त्री.

**वरसे** (ವರಸೆ) (क) ना.—शस्त्र पेलण्याची एक रीति; पवित्रा; ओळ; पंक्ति; आवृत्ति; खेप; वेळ; वंश; घराणें; लय; नृत्य-लय; संगती; लहर.

**वरह** (ವರಹ) (सं) ना.—वराह; रानडुक्कर; सोन्याचें एक नाणें; चार रुपये किमतीचें नाणें.

**वराक** (ವರಾಕ) (सं) वि.—दुःखद; हीन; नीच; क्षुद्र; लहान; गरीब.

**वराकी** (ವರಾಕೀ) (सं) ना.—दुर्दैवी स्त्री; दुःखिता.

**वरांग** (ವರಾಂಗ) (सं) ना.—डोकें; श्रेष्ठ अवयव; हत्ती; मन्मथ; कामदेव.

**वराट** (**टक**) (ವರಾಟ [ಟಕ]) (सं) ना.—दोर; कवडी.

**वराड** (ವರಾಡ) (अ.दे) ना.—कर; वर्गणी; पट्टी. 'वंतिगे' पहा.

**वरात** (ವರಾತ) (अ.दे) ना.—मिरवणूक; लग्नांतील वधुवराची मिरवणूक; आग्रहाची मागणी; जबरदस्ती.

**वरारोहा** (**हे**) (ವರಾರೋಹಾ [ಹೆ]) (सं) ना.—सुंदरी; कामिनी.

**वराल** (**ळ**) (ವರಾಲ [ಳ]) (क) ना.—हंस; मराळ.

**वराह** (ವರಾಹ) (सं) ना.—रानडुक्कर.
—**अवतार** (ಅವತಾರ) (सं) ना.—हिरण्याक्षाच्या वधासाठीं विष्णूनें घेतलेला श्वापदस्वरूपी अवतार; डुकराच्या केसाचा कुंचला.
—**मुद्रे** (ಮುದ್ರೆ) (सं) ना.—विजयनगरराजाची दान पत्रावरील मुद्रा; शिक्का.

**वरि** (ವರಿ) (अ.दे) ना.—कर; जकात; सारा; फाळा; खंडणी.

**वरिवसित** (ವರಿವಸಿತ) (सं) वि.—पूजित; सन्मानित; सेवा केलेला.

**वरिवस्ये** (ವರಿವಸ್ಯೆ) (सं) ना.—सेवा; पूजा; भक्ति; दास्य.

**वरिष्ठ** (ವರಿಷ್ಠ) (सं) वि.—श्रेष्ठ; उच्च; उत्तम; वरच्या श्रेणीचा; विस्तृत; ताम्र.
—**अधिकारि** (ಅಧಿಕಾರಿ) (सं) ना.—वरचा अधिकारी.

**वरिसु** (ವರಿಸು) (क) धा.—लग्न होणें; विवाह करणें; वरणें; अपेक्षिणें; इच्छिणें; स्वीकारणें; निवडणें; पसंत करणें.

**वरुण** (ವರುಣ) (सं) ना.—वैदिक समुद्रदेवता; सूर्य; पाणी.

**वरुणानि** (**नी**) (ವರುಣಾನಿ [ನೀ]) (सं) ना.—वरुणपत्नि.

**वरुष** (ವರುಷ) (क) ना.—वर्ष; संवत्सर; बारा महिन्यांचा अवधी, वर्षाकाल; पावसाळा.

**वरूढ** (ವರೂಢ) (सं) ना.—रथ; गाडी; वाहन; ढाल; सैन्य; चिलखत.

**वरूथिनि** (**नी**) (ವರೂಥಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—सैन्यसमूह.

**वरे** (**रेगं**) (**रेगे**) (ವರೆ [ರೆಗಂ] [ರೆಗೆ]) (सं) अ.—वेरी; पर्यंत; पावेतों.

**वरे (रा)** (ವರೆ [ರಾ]) (सं) ना.–स्वयंवर करणारी; उत्तम स्त्री; सुंदरी.
**वरेकु** (ವರೇಕು) (सं) ना.–तंतुवाद्यांतील सूक्ष्म मिंड.
**वरेण्य** (ವರೇಣ್ಯ) (सं) वि.–वरण्यास योग्य; श्रेष्ठ; मुख्य.
(सं) ना.–कुंकुम; कुंकु.
—**गुरुवरेण्य** (ಗುರುವರೇಣ್ಯ) (सं) ना.–मुख्याध्यापक; श्रेष्ठ गुरु.
**वर्ग** (ವರ್ಗ) (सं) ना.–वस्तुजाति; समान वस्तूंचा गट; पटगुणन; अध्याय श्रेणि; स्थानमान; परिच्छेद; बदली; सीमा; क्षेत्र; स्थान; कुल; घराणें; पंथ; समाज; व्यंजन; विभाग.
**वर्गणि** (ವರ್ಗಣಿ) (अ. दे.) ना.–कर; पट्टी, 'वंतिगे' पहा.
**वर्गमूल** (ವರ್ಗಮೂಲ) (सं) ना.–वर्गसंख्येचे मूल घटक; ज्याचा वर्ग झाला ती संख्या शोधणें.
**वर्गीण (य)** (ವರ್ಗೀಣ [ಯ]) (सं) वि.–वर्गाचा; वर्गासंबंधी, श्रेणीचा; जातीय; संघांत सामील असलेला.
**वर्गोत्तम** (ವರ್ಗೋತ್ತಮ) (सं) ना.–अनुनासिकाक्षरें.
**वर्चस् (स्सु)** (ವರ್ಚಸ್ [ಸ್ಸು]) (सं) ना.–चकाकी; कांती; प्रकाश; लक्षण; रूप; प्रभाव; वेग, आवेश; उत्साह; शक्ति; प्रसार.
**वर्चस्व** (ವರ್ಚಸ್ವ) (सं) ना.–कांति; प्रभा; शक्ति.
**वर्चस्वि** (ವರ್ಚಸ್ವಿ) (सं) वि.–शक्तिमान; तेजस्वी; प्रभावशाली; बुद्धिमान.
**वर्जन (वर्ज)** (ವರ್ಜನ [ವರ್ಜ]) (सं) ना.–त्याग; सुटका; सोडवणूक; अपाय; हानि.
**वर्जनीय** (ವರ್ಜನೀಯ) (सं) वि.–त्याज्य; सोडण्यासारखा.
**वर्जित** (ವರ್ಜಿತ) (सं) वि.–टाकलेले; त्यागलेले, सोडलेले.
**वर्जिसु** (ವರ್ಜಿಸು) (क) धा.–त्यागणें; सोडणें; टाकणें.
**वर्ज्य** (ವರ್ಜ್ಯ) (सं) वि.–त्यागण्यास योग्य; त्याज्य; टाकण्यासारखे; टाकाऊ.
**वर्ण** (ವರ್ಣ) (सं) ना.–रंग; चकाकी; शोभा; अलंकार; कुल; घराणें, पक्ष; पंथ; वर्ण; अक्षर; स्तुति; कीर्तिरूपी सुवर्ण; वेषभूषागीत; कन्नड संगीतप्रकार.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.–खुलासा घेणें; खुलासा करणें; वाढवून सांगणें.
—**क** (ಕ) (सं) वि.–वर्ण्य; वर्णनीय काव्य; मुखवटा; रसमय.
**वर्णधर्म** (ವರ್ಣಧರ್ಮ) (सं) ना.–भिन्न जातीय कर्तव्य, वर्णाश्रमाची आज्ञा.
**वर्णन (ने), (ना)** (ವರ್ಣನ [ನೆ][ನಾ]) (क) ना.–वर्णन; प्रशंसा; खुलासा; स्पष्टीकरण, रंगरंगोटी.
**वर्णसंकर** (ವರ್ಣಸಂಕರ) (सं) ना.–वर्णांची भेसळ; वर्णांच्या भेसळीनें झालेल्या भिन्न जाती.
**वर्णि** (ವರ್ಣಿ) (सं) ना.–चित्रकार; रंगारी; ब्रह्मचारी; विद्वान; पंडित.
**वर्णिक** (ವರ್ಣಿಕ) (सं) ना.–नट; नर्तक; रंगरंगोटी; वेषभूषा. श्रृंगारसाज; रंग कौशल्य.
**वर्णिसु** (ವರ್ಣಿಸು) (क) धा.–वर्णन करणें; विवरण करणें; रंग भरणें.
**वर्ण्य** (ವರ್ಣ್ಯ) (सं) वि.–वर्णन करण्यास योग्य. रंग भरण्यालायक; उपमेय; वर्णांचा गट.
**वर्तक** (ವರ್ತಕ) (सं) ना.–व्यापारी; भटक्या; फिरस्ता; अनुयायी; सहचारी; माप.
**वर्तन (ने)** (ವರ್ತನ [ನೆ]) (सं) ना.–वर्तणूक; वागणूक; चाल; रूढी; रीतिरिवाज; पगार; मजुरी; उद्योग; व्यापार; नौकरी; सेवा; फिरती; भ्रमण; स्थिरता.
**वर्तमान** (ವರ್ತಮಾನ) (सं) वि.–चालू; आजचा; आताचा; उपस्थित.
(सं) ना.–बातमी; समाचार; वार्ता. चालू काळ.
**वर्ति (र्ती)** (ವರ್ತಿ [ತೀ]) (सं) वि.–अस्तित्वात असलेला; चालू; जवळचा; संनिध असलेला.
(सं) ना.–दिव्याची वात.
**वर्तिका (के)** (ವರ್ತಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–दिव्याची वात; चित्रकाराचा कुंचला. कलम.
**वर्तिसु** (ವರ್ತಿಸು) (क) धा.–चालणें; आचरणें; संभवणें; फिरणें; अनुयायी होणें; उद्योगांत गढणें; गुंतणें.
**वर्तुल** (ವರ್ತುಲ) (सं) वि.–वाटोळे; गोलाकार.
(सं) ना.–मंडल; गोल; वृत्त.
**वर्त्म** (ವರ್ತ್ಮ) (सं) ना.–रस्ता; मार्ग; पायवाट. 'अवे' पहा.
**वर्धक (कि)** (ವರ್ಧಕ [ಕಿ]) (सं) ना.–कांठी; सुतार.
(सं) वि.–वाढविणारा; अधिक करणारा.
—**ध्वनिवर्धक** (ಧ್ವನಿವರ್ಧಕ) (सं) ना.–लाऊड स्पीकर; कर्णांतील आवाज.
**वर्ध (ने)** (ವರ್ಧ [ನೆ]) (सं) ना.–आधिक्य; वाढ; विस्तार; उन्नति; विजय; अभिवृद्धि; कात्रण; तुकडेतोड.
**वर्धंति** (ವರ್ಧಂತಿ) (सं) ना.–वाढदिवस; जन्मदिनोत्सव; जयंति.
**वर्धमान** (ವರ್ಧಮಾನ) (सं) वि.–वाढता; अभिवृद्धि पावणारा; उन्नत
(सं) ना.–महावीर; वाढ; अभिवृद्धि; जैन मुनी; राजवाडा; एरंड; समस्या; विष्णु; आजचा बरद्वान जिल्हा.
—**पुर** (ಪುರ) (सं) ना.–बरद्वान शहर.
**वरित** (ವರಿತ) (सं) वि.–वाढलेला; अभिवृद्ध.
**वर्धिष्णु** (ವರ್ಧಿಷ್ಣು) (सं) ना.–भरभराटीची इच्छा करणारा; अभिवृद्धि पावणारा.

वर्धिसु (ವರ್ಧಿಸು) (क) धा.—वाढणें; अभिवृद्धि पावणें; भरभराटणें.
वर्म (ವರ್ಮ) (सं) ना.—कवच; चिलखत; अंगत्राण; देहरक्षणाचें साधन; वैर; उपकार बुद्धि; क्षत्रियत्व—सूचक असा प्रत्यय.
वर्महर (ವರ್ಮಹರ) (सं) वि.—कवच वापरणारा; वयात आलेला.
वरिय (वर्य) (ವರಿಯ [ವರ್ಯ]) (सं) ना.—श्रेष्ठ; उत्तम; वरेण्य; निवडण्यास योग्य.
वर्ष (ವರ್ಷ) (सं) ना.—बारा महिन्यांचा अवधी;संवत्सर; वर्षाऋतु; पावसाळा; (कुरु; हिरण्मय; रम्यक; इलावृत्त; हरि; केतुमूल; भद्राच; किन्नर; भारत) ही नव खंड पृथ्वी; मेघ; ढग;
—प्रिय(ಪ್ರಿಯ) (सं) ना.—भारतवर्ष; भारत.
वर्षगंदि (ವರ್ಷಗಂದಿ) (क) ना.—वर्षवणी जनावर; वर्षाला विणारे जनावर.
वर्षण (ವರ್ಷಣ) (सं) ना.—वर्षा; पाऊस; वृष्टी.
वर्षधर (ವರ್ಷಧರ) (सं) ना.—मेघ; ढग; कंचुकी; राणीवसा.
वर्षधर्ष (वर) (ವರ್ಷಧರ್ಷ [ವರ]) (सं) ना.—अंत:पुररक्षक; कंचुकी.
वर्षा (ವರ್ಷಾ) (सं) ना.—पावसाळा; पाऊस; जखम.
—काल (ಕಾಲ) (सं) ना.—पावसाळा.
वर्षाभु (ವರ್ಷಾಭು) (सं) ना.—बेडूक; गांडूळ; काडू; जानवें; इंद्रगोप; काजवा.
वर्षामद (ವರ್ಷಾಮದ) (सं) ना.—मोर; मयूर.
वर्षासन(शन) (ವರ್ಷಾಸನ [ಶನ]) (सं) ना.—वार्षिक नेमणूक; उदर भरण्यासाठीं प्रतिवर्षी मिळणारे धन; वार्षिक तनखा.
वर्षित (ವರ್ಷಿತ) (सं) वि.—पाऊस झालेली जमीन;भिजलेली धरणी.
(सं) ना.—पावसाची झड; वृष्टि; सर; पाऊस.
वर्षिष्ट (ವರ್ಷಿಷ್ಟ) (सं) वि.—म्हातारा; वय झालेला; बलशाली; श्रेष्ठ.
वर्षीय (ವರ್ಷೀಯ) (सं) वि.—जुनाट; वयोवृद्ध; म्हातारा.
वलं (ವಲಂ) (क) अ.—निश्चयपूर्वक; निर्भयपणें.
वल (ವಲ) (क) ना.—शक्ति; सामर्थ्य; बळ.
वलक्ष (ವಲಕ್ಷ) (सं) वि.—श्वेत; पांढरे.
वलभि (भी) (ವಲಭಿ[ಭೀ]) (सं) ना.—माळा; घराची माडी; गची; कोनाडा; सौराष्ट्रातील एक शहर.
वलय (ವಲಯ) (सं) ना.—कांकण; कडें; वर्तुळ; गोल; पांघरूण; आवरण; भूभाग; पट्टी; दाब; दडपण.
वलल (ವಲಲ) (सं) ना.—बल्लव; भीम; विराटाचा आचारी.

वलवर (ವಲವರ) (क) ना.—प्रीति; प्रेम; आनंद.
वलसे (ವಲಸೆ) (क) ना.—शेती; स्थानांतर; 'गुळे' पहा.
—होगु (ಹೋಗು) (क) धा.—स्थानांतर करणें; प्रवासास निघणें.
वलि (ली) (ವಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—पडदा; लाट; उर्मी; अडचण; भानगड; तोंडावरील सुरकुती; कातडीवरील चुरम्या.
वलित (ವಲಿತ) (सं) ना.—गुंडाळलेले; वाकलेले; आठ्या पडलेलें; सुरकुतलेलें; चुरमडलेलें.
वलियु (ವಲಿಯು) (क) धा.—वाकणें; उतार होणें; चकाकणें.
वलिर (ವಲಿರ) (सं) वि.—तिरवा; टरका; काणा; चकणा.
वलीमुख (ವಲೀಮುಖ) (क) ना.—सुरकुतलेल्या तोंडाचा; माकड; वानर; हुप्या.
वल्क (ल्कल) (ವಲ್ಕ [ಲ್ಕಲ]) (सं) ना.—झाडाची साल; वाकाचें कापड; तागी लुगडें; मीनचर्म; माशाचे कवच.
वल्कवंत (ವಲ್ಕವಂತ) (सं) ना.—कवच असलेला घुशीच्या जातीचा प्राणी.
वल्गन (ना) (ವಲ್ಗನ [ನಾ]) (सं) ना.—उडी; भरारी; फुशारकी; आत्मश्लाघा; घोडदौड.
वल्गफल (ವಲ್ಗಫಲ) (सं) ना.—डाळिंब.
वल्गा (ल्गे) (ವಲ್ಗಾ [ಲ್ಗೆ]) (सं) ना.—लगाम; वेसण.
वल्मीक (ವಲ್ಮೀಕ) (सं) ना.—वारूळ; ढोली; खबदाड.
वल्लकि (ವಲ್ಲಕಿ) (सं) ना.—मेणा; पालखी; दोन ताराचें एक तंतुवाद्य.
वल्लभ (ವಲ್ಲಭ) (सं) ना.—स्वामी; यजमान; नायक; प्रियकर; पति; आप्त.
वल्लभा (भे) (ವಲ್ಲಭಾ [ಭೆ]) (सं) ना.—प्रिया; पत्नि; मालकीण; गृहिणी; प्रेयसी.
वल्लयिसु (ವಲ್ಲಯಿಸು) (क) धा.—पळणें; पाय मागें घेणें; हटणें; निसटणें; पाय काढणें.
वल्लरि (री) (ವಲ್ಲರಿ [ರೀ]) (सं) ना.—वेली; मंजरी; घोस; तुरा; घड.
वल्लव (ವಲ್ಲವ) (सं) ना.—बल्लव; आचारी; 'बाणसिग' पहा.
वल्लि (ल्ली) (ವಲ್ಲಿ [ಲ್ಲೀ]) (सं) ना.—वेली; लता; जमीन; भूमी.
वश (ವಶ) (सं) वि.—साधु झालेला; सुधारलेला; उन्नत.
(सं) ना.—स्वाधीन; आधीन; आज्ञा; शक्ति; अधिकार; स्वामित्व.
—कोळिसु (ಕೊಳಿಸು) (क) धा.—स्वाधीन होणें; आटोक्यांत आणणें; सुधारणें.
वशवर्ति (ವಶವರ್ತಿ) (सं) वि.—आज्ञाधारक; स्वाधीन; अंकित; कह्यांत आलेला.

**वशंवद** (ವಶಂವದ) (सं) वि.—सांगितल्याप्रमाणें वागणारा; आज्ञाधारक; नम्र सेवक.

**वशा (शे)** (ವಶಾ [ಶೆ]) (सं) ना.—स्त्री; पत्नी; कन्या; नणंद; वसु; गाय; वांझोटी; हरीण.

**वशित्व** (ವಶಿತ್ವ) (सं) ना.—अष्टसिद्धीपैकीं एक; ताबा; आधीनता.

**वशि (शिन्)** (ವಶಿ [ಶಿನ್]) (सं) वि.—बलिष्ठ; संयमित; स्वाधीन झालेला; आत्मसंयमी.

**वशीभूत** (ವಶೀಭೂತ) (सं) वि—कह्यांत आलेला; ताब्यांत गेलेला; आधीन झालेला.

**वश्य** (ವಶ್ಯ) (सं) वि.—कह्यांत राहणारा; ताबेदार; ताबीन; आटोक्यातला.

**वषट्कार** (ವಷಟ್ಕಾರ) (सं) ना.—आहुती देण्यासाठीं म्हणावयाचा मंत्र.

**वस (बस)** (ವಸ [ಬಸ]) (सं) ना;—वश; ताबा; अंकितता; स्वाधीनता.

**वसति** (ವಸತಿ) (सं) ना.—घर; निवास; राहणी; ठिकाण; वस्ती; बस्ती.

**वसथ** (ವಸಥ) (सं) ना.—वसतिस्थान; गृह; निवास.

**वसन** (ವಸನ) (सं) ना.—वस्त्र; कापड; पांघरूण; राहणी; निवास.

**वसंत** (ವಸಂತ) (सं) ना.—पालवी फुटण्याचा काळ; काममित्र; उत्तरेकडील एक संगीतांतील राग; परस्परावरचा रंग.

—**दूत** (ದೂತ) (सं) ना.—कोकीळ.

—**दूतिके** (ದೂತಿಕೆ) (सं) ना.—मुक्तिलता; मारुती; मोगरी.

**वसंतोत्सव** (ವಸಂತೋತ್ಸವ) (सं) ना.—वसंतकाळीं करावयाचा उत्सव; राजांचा श्रृंगारोत्सव.

**वसर (हसर)** (ವಸರ [ಹಸರ]) (क) ना.—प्रसार; दुकान; विक्रीस्थान.

**वसारे** (ವಸಾರೆ) (क) ना.—सोपा; घराचा पुढचा भाग; ओसरी; देवडी; सुगंध.

**वसि** (ವಸಿ) (क) वि.—थोडें; स्वल्प; (क.) ना.—निवासी; रहिवासी; वस्त्रप्रावरण.

**वसित** (ವಸಿತ) (सं) वि.—धारण केलेलें; एकत्रित केलेलें; वसति केलेले.

**वसिष्ठ** (ವಸಿಷ್ಠ) (सं) ना.—एक स्मृतिकार; ऋषि.

**वसिसु** (ವಸಿಸು) (क) धा.—राहणें; वसती करणें.

**वसीलि** (ವಸೀಲಿ) (अ.दे) ना.—थोरांचा आश्रय; प्रभावी लोकांचे साह्य; वशीला.

**वसु** (ವಸು) (सं) ना.—कुबेर; शिव; अग्नि; झाड; संपत्ति; धन; रत्न; सोनें; किरण; प्रकाश; आठाचा संकेत; देवताचा एक पोटभेद; धनिष्ठा नक्षत्र; (पाणी; ध्रुव; सोम; धरा; अनल; अनिल; प्रत्यूष; प्रभास) या आठ वसु.

**वसुदेव** (ವಸುದೇವ) (सं) ना.—कृष्णपिता; देवकीपती; कुबेर.

**वसुधा (धे)** (ವಸುಧಾ [ಧೆ]) (सं) ना.—भूमी; जमीन.

**वसुंधरा (रे)** (ವಸುಂಧರಾ [ರೆ]) (सं)—ना. पृथ्वी; संपत्ति धारण करणारी भूमि.

**वसुमति** (ವಸುಮತಿ) (सं) ना.—भूदेवता; भूमाता श्रीमती.

**वसुषेण** (ವಸುಷೇಣ) (सं) ना.—कर्णाचें ठेवलेलें नाव.

**वसूरा (रे)** (ವಸೂರಾ [ರೆ]) (सं) ना.—रासनर्तकी; वेश्या.

**वसे (सा)** (ವಸೆ [ಸಾ]) (क) ना.—चरबी; मेंदू; दाट रक्त. 'नेण' पहा.

**वस्तु** (ವಸ್ತು) (सं) ना.—पदार्थ; वस्तुस्थिती; सहजता; कथा नाटक वगैरेचा मूल विषय.

**वस्तुक** (ವಸ್ತುಕ) (सं) ना.—चंपूकाव्य; सहजता; वास्तवता.

**वस्तुवृद्धिदर्शक** (ವಸ್ತುವೃದ್ಧಿದರ್ಶಕ) (सं) ना.—सूक्ष्म दर्शक यंत्र.

**वस्त्र** (ವಸ್ತ್ರ) (सं) ना.—कापड; वसन; पोषाख; कपडा.

**वह** (ವಹ) (सं) वि.—पांघरण्याचें, वेऊन जाण्याचे, वापरण्याचें, चालू ठेवण्याचें; धारण कारणारा या अर्थी एक प्रत्यय.

(सं) ना.—बैलाची मान; वाहन; घोडा; वायुमार्ग; नद.

**वहणि** (ವಹಣಿ) (क) ना.—दंभ; वैभवाचा डौल; विलास; अवडंबर; मोठेपणा; शोभा; उत्सव; लाटा; प्रवाह.

**वहन** (ವಹನ) (सं) ना.—भार वाहणें; चालू ठेवण्याचें साधन; धारण; सांगड; नांव; मार्ग; प्रवाह; ओघ.

**वहि** (ವಹಿ) (अ. दे) ना.—हिशेबाचें पुस्तक; वही; नोटबुक; भार वाहणारा.

**वहित्र** (ವಹಿತ್ರ) (सं) ना.—जहाज; नाव; सांगड; नदी तरून जाण्याचें साधन.

**वहिल** (ವಹಿಲ) (सं) ना.—आवेश; तीव्रता; त्वरा; रोग; चपलपणा; चमत्कार; चमक; सळक.

**वहिसु** (ವಹಿಸು) (क) धा.—सिद्ध होणें; स्वीकारणें; चालू ठेवणें; डोक्यावर घेणें; भार वाहणें; वेऊन जाणें; वाटणें.

**वन्हि** (ವಹ್ನಿ) (सं) ना.—विस्तव; अग्नि; निखारा; जाळ.

—**सख** (ಸಖ) (सं) ना.—अग्निमित्र; वायु.

**वळ** (ವಳ) (क) प्र.—त्यांतच व्यवहार करणारा या अर्थी एक प्रत्यय. (उदा. मडिवाळ)

**वळक्ष** (ವಳಕ್ಷ) (सं) वि.—धीर; शूर; वीर.

**वळन (लन)** (ವಳನ [ಲನ]) (सं) ना.—गुंडाळी; चालना; चालू ठेवणें.

**वळय (लय)** (ವಳಯ [ಲಯ]) (सं) ना.—कडें; गोल; कांकण.

**वळावळि** (ವಳಾವಳಿ) (क) ना.—आतुरता; गडबड; तळमळ; कळवळ; चिंता; व्यथा.

**वळि** (ವಳಿ) (क) ना.—निरी; घडी; लाट; ओळ; अडचण; लिहिण्याची पद्धति; एक कृदंत प्रत्यय.

**वळित** (ವಳಿತ) (सं) वि.—गुंडाळलेलें; फिरलेलें; वाकलेलें.

**वा** (ವಾ) (सं) अ.—अथवा; किंवा; नाहींतर; अगर.

**वाह्कण** (ವಾಙ್ಕಣ) (सं) ना.—पाण्याचा थेंब; जलबिंदु.

**वाक् (कु)** (ವಾಕ್ [ಕ್ಕು]) (सं) ना.—गोष्ट; वाचा.

**वाक्कलह** (ವಾಕ್ಕಲಹ) (सं) ना.—बोलाचाली; भांडण; तोंडातोंडी; वाग्युद्ध.

**वाक्चातुर्य** (ವಾಕ್ಚಾತುರ್ಯ) (सं) ना.—शहाणपणाचें बोलणें; बोलण्यांतील कौशल्य.

**वाक्चापल्य** (ವಾಕ್ಚಾಪಲ್ಯ) (सं) ना.—बोलण्यांतील शहाणपण; अस्खलित भाषण.

**वाक्पति** (ವಾಕ್ಪತಿ) (सं) ना.—वाग्वीर; वक्ता; बृहस्पति.

**वाक्य** (ವಾಕ್ಯ) (सं) ना.—पूर्ण अर्थ देणारी शब्दरचना; गद्यवचन; सूक्ति; सुभाषित.

**वाक्यार्थ** (ವಾಕ್ಯಾರ್ಥ) (सं) ना.—वाक्याचा सरळ अर्थ; चर्चा; वाद; सारांश; तात्पर्य.

**वागाडंबर** (ವಾಗಾಡಂಬರ) (सं) ना.—डौलाची भाषा; गर्वाची भाषा; तोंडपाटीलकी; आत्मश्लाघा; निरर्थक बडबड.

**वागीश** (ವಾಗೀಶ) (सं) ना.—वाचस्पति; बृहस्पती; वाक्पटु; बोलण्यात चतुर.

**वागीश्वरि (री)**(ವಾಗೀಶ್ವರಿ [ರೀ]) (सं) ना.—शारदा; सरस्वती; वाग्देवता; वाणीदेवी.

**वागु** (ವಾಗು) (क) ना.—मोठा मासा; प्रचंड मासा.

**वागुरि (रिके)** (ವಾಗುರಿ [ರಿಕೆ]) (क) ना.—जाळें; जाळी; पाश.

**वागुरिक** (ವಾಗುರಿಕ) (क) ना.—कोळी; शिकारी; पारधी.

**वागे** (ವಾಗೆ) (क) ना.—लगाम; वेसण; वाफ. 'कडिवाण' पहा.

**वाग्जाल** (ವಾಗ್ಜಾಲ) (सं) ना.—भाषापाश; भाषापांडित्य; बोलण्यांतील पेच; वाचामोहनी.

**वाग्दत्त** (ವಾಗ್ದತ್ತ) (सं) ना.—वाचादत्त; वचनबद्धता; वाचादत्तवधु; वाङ्निश्चयानें दिलेली कन्या.

**वाग्दान** (ವಾಗ್ದಾನ) (सं) ना.—वचन; कथन.

**वाग्देवि (वी)** (ವಾಗ್ದೇವಿ [ವೀ]) (सं) ना.—वागीश्वरी; सरस्वती.

**वाग्मि (ग्मिन्)** (ವಾಗ್ಮಿ [ಗ್ಮಿನ್]) (सं) ना.—वाक्पटु; बृहस्पति; भाषा मल्ल; वाचिवीर.

**वाग्वाद** (ವಾಗ್ವಾದ) (सं) ना.—भाषेची चर्चा; वादविवाद; प्रासंगिक वाग्युद्ध.

**वाग्युद्ध** (ವಾಗ್ಯುದ್ಧ) (सं) ना.—भाषेचें भांडण; बोलभांडपणा; वादावादी.

**वाग्विभव** (ವಾಗ್ವಿಭವ) (सं) ना.—भाषासौंदर्य; शब्दावडंबर; भाषा पेलण्याचें सामर्थ्य.

**वाघे** (ವಾಘೆ) (सं) ना.—लगाम; मुखाडकी; 'वागे' पहा.

**वाङ्निश्चय** (ವಾಙ್ನಿಶ್ಚಯ) (सं) ना.—वचनबद्धता; कन्यादानाची निश्चित भाषा.

**वाङ्मय** (ವಾಙ್ಮಯ) (सं) ना.—भाषामय; वचनसाहित्य; शास्त्रसंपत्ति.

**वाङ्मात्र** (ವಾಙ್ಮಾತ್ರ) (सं) ना.—केवळ बोलणें; कृतिशून्य भाषा; सहानुभूतीची भाषा.

**वाङ्मुख** (ವಾಙ್ಮುಖ) (सं) ना.—भाषेचा आरंभ; भाषेचा प्रस्ताव.

**वाङ्मूल** (ವಾಙ್ಮೂಲ) (सं) ना.—लांब जीभ काढून केलेलें भाषण; जबाब; अभिप्राय; करारपत्र.

**वाच् (क्)** (ವಾಚ್ [ಕ್]) (सं) ना.—गोष्ट; भाषा; बोलणें.

**वाचक** (ವಾಚಕ) (सं) वि.—सांगणारा; समजावून देणारा. (क) ना.—भाषापांडित्य; विशिष्ट शब्द; संदेशवाहक.

**वाचन** (ವಾಚನ) (सं) ना.—पठण; भाषण; मंत्राचा पाठण —घोष; स्वस्तिवाचन.

**वाचस्पति** (ವಾಚಸ್ಪತಿ) (सं) ना.—भाषास्वामी; बृहस्पति.

**वाचामगोचर** (ವಾಚಾಮಗೋಚರ) (सं) वि.—अवर्णनीय; अकथनीय; भाषेच्या टप्प्यापलीकडील.
(सं) ना.—परमेश्वर; ज्याचें वर्णन करतां येत नाहीं असा; वागिंद्रियापलीकडील.

**वाचाल (ळ)** (ವಾಚಾಲ [ಳ]) (सं) वि.—बडबड्या; अति बोलणारा; निरर्थक बडबडणारा.
**—ता—ते** (ತಾ—ತೆ) (सं) ना.—भाषेची लांबण; फोल बोलणें; वेताल बडबड.

**वाचिक** (ವಾಚಿಕ) (सं) वि.—भाषेसंबंधीं; बोलाविषयीं; (सं) ना.—बातमी; संदेश; नाटककार; संभाषण.

**वाचिसु** (ವಾಚಿಸು) (क) धा.—वाचणें; सांगणें; पठण करणें.

**वाच्य** (ವಾಚ್ಯ) (सं) वि.—कथ्य; बोलण्यासारखें; सांगण्यासारखें पठनीय; निंद्य;
**—वज्र** (ವಜ್ರ) (सं) ना.—कठोर भाषा; रांगडे बोलणें; खडबडित शैली.

**वाच्यार्थ** (ವಾಚ್ಯಾರ್ಥ) (सं) ना.—शब्दाचा सरळ अर्थ; रूढार्थ; शक्यतार्थ.

**वाज** (ವಾಜ) (सं) ना.—शक्ति; सामर्थ्य; उत्साह; हुरूप; अन्न; पाणी; तूप; यज्ञ; मंत्र; बाणपक्ष; पीस; पुच्छ; युद्ध; ध्वनि. श्राद्धपिंड; लोणी; नवनीत.

**वाजि** (ವಾಜಿ) (सं) ना.—बन; वेगवान घोडा; पक्षी; बाण, शत्रु.

**वाजीकर (रण)** (ವಾಜೀಕರ [ರಣ]) (सं) ना.–संमोहन; कामुकता वाढविणें; युक्तीनें केलेली कामवाढ.

**वांछा (छे)** (ವಾಂಛಾ [ಛೆ]) (सं) ना–आकांक्षा; अपेक्षा; अभीष्ट.

**वांछित** (ವಾಂಛಿತ) (सं) वि.–इच्छिलेले; मागितलेलें, अपेक्षित.

**वांछिसु** (ವಾಂಛಿಸು) (क) धा.–मागणें; इच्छिणें; अपेक्षा ठेवणें.

**वाट** (ವಾಟ) (सं) ना.–मार्ग; स्थळ; कर्मशाळा; सेवाक्षेत्र; घर; आवार; मौली; पाण्याची वाट; कुंपण; परसु; आवरण; मळा; अंगण; गल्ली.

**वाटिके** (ವಾಟಿಕೆ) (सं) ना.–फुलबाग; मळा; निवासस्थळ.

**वाड** (ವಾಡ) (क) ना.–उपवन; मळा; उद्यान.

**वाडब (व)** (ವಾಡಬ [ವ]) (सं) ना.–वडवाग्नि; सागरांतील अग्नि; दावानल.

**वाडवास्त्र** (ವಾಡವಾಸ್ತ್ರ) (सं) ना.–अग्न्यस्त्र; आग ओकणारें शस्त्र; तोफ.

**वाडव्य** (ವಾಡವ್ಯ) (सं) ना.–ब्राह्मण समूह.

**वाडि (डा)** (ವಾಡಿ [ಡಾ]) (सं) ना.–आवा; प्रासाद; लहान गाव; मोठे आवार असलेली इमारत.

**वाडिके** (ವಾಡಿಕೆ) (क) ना.–रूढी; प्रथा; पद्धति; संप्रदाय; लोकाचार.

**वाढ** (ವಾಢ) (सं) वि.–घट्ट; कर्कश; ओबडधोबड; अतिशय. (सं) ना.–बाण; शर.

**वाणि (बाणि)** (ವಾಣಿ [ಬಾಣಿ]) (सं) ना.–सरस्वति; शारदा; भाषा; गोष्ट; पाणी; तेली.

**वाणिज्य** (ವಾಣಿಜ್ಯ) (सं) ना.–व्यापार; किराणा व्यापार.

**वाणिय (ज)** (ವಾಣಿಯ [ಜ]) (सं) ना.–वाणी; व्यापारी; क्रयविक्रय करणारा; विनिमय; व्यापर.

**वात** (ವಾತ) (सं) ना.–वायु; वारा; हवा; झुळुक. (सं) वि.–वाहता; झुळझुळणारा.

**वातपूर्ण** (ವಾತಪೂರ್ಣ) (सं) ना.–वारा भरणें; हवा भरणें; शीड; बावटा.

**वातापि** (ವಾತಾಪಿ) (सं) ना.–एक राक्षस; बदामी शहर.

**वातायन** (ವಾತಾಯನ) (सं) ना.–खिडकी; झरोका; गवाक्ष.
—**उइंडो-वातायनो**–खिडकी-गवाक्षो-भोक भिंतिचे.

**वातायु** (ವಾತಾಯು) (सं) ना.–हरिण; काळवीट.

**वाताशन** (ವಾತಾಶನ) }
**वाताहारि** (ವಾತಾಹಾರಿ) } (सं) ना.–हवेवर जगणारा; साप; सर्प; खिडकी; झरोका.

**वात्या** (ವಾತ್ಯಾ) (सं) ना.–वावटळ; जोराचा वारा; झंझावात.

**वात्सल्य** (ವಾತ್ಸಲ್ಯ) (सं) ना.–मुलावरील प्रेम; ममता; आपलेपणा; खरे मित्रत्व; आत्मीयता.

**वात्स्यायन** (ವಾತ್ಸ್ಯಾಯನ) (सं) ना.–कामशास्त्रलेखक; कामसूत्रकार.

**वाद** (ವಾದ) (सं) ना.–गप्पा; चर्चा; मतप्रदर्शन; सिद्धांत; संभाषण
—**प्रतिवाद** (ಪ್ರತಿವಾದ) (सं) ना.–वादावादी; तोंडाला तोंड लागणें; वादविवाद; सवालजबाब; पूर्वपक्ष-उत्तरपक्ष.

**वादन** (ವಾದನ) (सं) ना.–वाद्य; वाजप; वाद्य वाजवणे.

**वादि** (ವಾದಿ) (सं) ना.–वाद खेळणारा; भांडण; संगीतातील रागाचा जीव स्वर–समर्थक; विद्वान्; पंडित

**वादित्र** (ವಾದಿತ್ರ) (सं) ना.–साथीचें तंतुवाद्य; चर्मवाद्य. संगीत आवाज काढण्याचे उपकरण.

**वाद्य** (ವಾದ್ಯ) (सं) ना.–वाजवण्याचें साधन; आवाज काढण्याचें साधन; चर्मवाद्य; तंतुवाद्य.
—**शंख वाद्य** (ಶಂಖವಾದ್ಯ) (सं) ना.–शंख फुंकणें; बोंब.

**वान** (ವಾನ) (सं) वि.–वन संबंधीं; वाळलेले; थंड झालेले फुगलेले. (सं) ना.–सुके फळ; निवणें; फूग; अस्तित्व. सुगंध; सुवासिक द्रव्य; काव्याची रास; विणाई; चटई.

**वानप्रस्थ** (ವಾನಪ್ರಸ್ಥ) (सं) ना.–तिसरा आश्रम; वनांत राहून ईश्वरचिंतनातील काळक्रमण.

**वानर** (ವಾನರ) (सं) ना.–माणसासारखा दिसणारा पाणी; कपि; किन्नर; माकड.

**वानरध्वज** (ವಾನರಧ್ವಜ) (सं) ना. अर्जुन; ज्याच्या निशाणावर वानर आहे असा वीर; कपिध्वज.

**वांति** (ವಾಂತಿ) (सं) ना.–ओकारी; उलटी; वमन.

**वाप** (ವಾಪ) (सं) ना.–पेरणी; लावणी.

**वापि (पी)** (ವಾಪಿ [ಪೀ]) (सं) ना.–विहीर; आड; जलाशय; कोरण्याचें यंत्र; कापण्याचे उपकरण.

**वापित** (ವಾಪಿತ) (सं) वि.–कापलेलें; कोरलेलें; कातरलेलें; भादरलेलें.

**वाम** (ವಾಮ) (सं) वि.–विपरीत; विरुद्ध; प्रतिकूल; वाकडे; वक्र; कुटिल; नीच; वंचक; कुब्ज; खुजा; सुंदर; मनोहर.
—**मार्ग** (ಮಾರ್ಗ) (सं) ना.–डावा मार्ग; तांत्रिकाचा अवैदिक मार्ग.

**वामदेव** (ವಾಮದೇವ) (सं) ना.–शिव; शिवाचें मुख; एक ऋषि.

**वामन** (ವಾಮನ) (सं) ना.–गिड्डा; खुजा; कुबडा; दक्षिण दिग्गज; बळीवधासाठीं घेतलेला विष्णूचा अवतार.

**वामलोचना (ने)** (ವಾಮಲೋಚನಾ [ನೆ]) (सं) ना.–सुंदर नेत्र असलेली; सुंदरी; सुनेत्रा.

**वामांग** (ವಾಮಾಂಗ) (सं) ना.–देहाचा डावा भाग; तांत्रिकाचा वेदविरुद्ध आचार; पत्नि.

**वामांगि (गिनी)** (ವಾಮಾಂಗಿ [ಗಿನೀ]) (सं) ना.—सुंदर देह असणारी; बांधेसूद देह असलेली; सुंदरा.
**वामा (मे)** (ವಾಮಾ [ಮೆ]) (सं) ना.—सुंदरा; रूपवती; पार्वती.
**वाय** (ವಾಯ) (क) ना.—व्याज; निमित्त; असत्य; फसवणूक.
**वायन** (ವಾಯನ) (क) ना.—व्रत वैकल्य किंवा समारंभ प्रसंगी द्यावयाचें दान; उपायन; 'बागिन' पहा.
**वायव (व्य)** (ವಾಯವ [ವ್ಯ]) (सं) वि.—वायुसंबंधीं; वायव्य दिशेचें; वारा देणारा. (पंखा.)
**वायवीय** (ವಾಯವೀಯ) (सं) वि.—वायुसंबंधी; वायव्य दिशेचें.
**वायस** (ವಾಯಸ) (सं) ना.—कावळा; काक.
**वायिदा (दे)** (ವಾಯಿದಾ [ದೆ]) (अ.दे) ना.—मुदत; कालावधि; नियतकाल; मितिकरार; 'गडु' पहा.
**वायु** (ವಾಯು) (सं) ना.—वारा; एक दिग्देवता; एक वैदिक ऋषि.
—**नंदन-सुत** (ನಂದನ-ಸುತ) (सं) ना.—हनुमंत; भीम; मध्वाचार्य.
—**पंचक** (ಪಂಚಕ) (सं) ना.—(प्राण; व्यान; उदान; अपान; समान हे) पांच वायु; पंचप्राण.
—**पथ** (ಪಥ) (सं) ना.—वायुमार्ग; आकाश; वातावरणाचा भाग; गगन.
—**भक्षक** (ಭಕ್ಷಕ) (सं) ना.—सर्प; यति; ऋषि.
—**वास** (ವಾಸ) (सं) ना.—वाऱ्यावरचा सुगंध; गुगुळ; धूप.
—**वेग** (ವೇಗ) (सं) ना—वाऱ्याप्रमाणें धावणारा; शीघ्र गति.
—**सख** (ಸಖ) (सं) ना.—वायूचा मित्र, अग्नि.
**वायुगतिमापक** (ವಾಯುಗತಿಮಾಪಕ) (सं) ना.—वाऱ्याची गति दाखवणारें यंत्र.
**वायुभारमापक** (ವಾಯುಭಾರಮಾಪಕ) (सं) ना.—वाऱ्याचे दाब किंवा वजन दाखवणारें यंत्र, बॅरोमीटर.
**वार्** (ವಾರ್) (सं) ना.—पाणी, वारि.
**वार** (ವಾರ) (सं) ना.—समूह; सर; खेप; पाळी; समय; संदर्भ; प्रसंग; दिवस; सप्ताह; हत्या; विघ्न; पडदा; विलंब; काठ; वाटणी; उतार; आवरण; तीन फूट माप.
(क) ना.—उत्पन्न; भागेलीचे उत्पन्न; वाटणीनें येणारे वारसा उत्पन्न.
**वारंवारं** (ವಾರಂವಾರಂ) (सं) अ.—वेळोवेळीं; पुनःपुनः; वरचेवर; नेहमीं.
**वारक** (ವಾರಕ) (सं) ना.—विलंब लावणारा; गमावणारा; एक घोडचाल; संभावना; देणगी; वधुवरांना त्यांच्या आईबापांनीं केलेला आहेर; 'बळुवळी' पहा.
**वारकरि** (ವಾರಕರಿ) (सं) ना.— कुलदेवतेला प्रतिवर्षी जाणारा उपासक; पंढरीचा यात्री; प्रत्येक एकादशीला विठ्ठलाचें दर्शन घेणारा भक्त.
**वारगित्ति** (ವಾರಗಿತ್ತಿ) (क) ना.—दीराची पत्नि; जाऊ; आपल्या वयाची; समवयस्क स्त्री; वारगीची; जोडीदारीण.
**वारण** (ವಾರಣ) (सं) ना.—विलंब; विघ्न; निवारण; विरोध; हरकत; हत्ती; मेघ; सरोवराचा घाट; आकाश.
**वारनारि (री)** (ವಾರನಾರಿ [ರೀ]) (सं) ना.—वारयोषा; वेश्या; रांड; ठेवलेली बाई; रखेली.
**वाराणावत** (ವಾರಣಾವತ) (सं) ना.—हस्तिनापूर; पांडवांची राजधानी.
**वाराणासि** (ವಾರಣಾಸಿ) (सं) ना.—वरणा व आशी या नद्यांचें संगमस्थान; काशी.
**वारवनिते** (ವಾರವನಿತೆ) (सं) ना.—वेश्या; रांड; रखेली.
**वारवाण** (ವಾರವಾಣ) (सं) ना.—युद्धकवच; चिलखत; चोळी; कंचुकी.
**वारसति** (ವಾರಸತಿ) (सं) ना.—वेश्या; ठेवलेली बाई; पात्र; वेळेपुरती बायको.
**वारांगने (ना)** (ವಾರಾಂಗನೆ [ನಾ]) (सं) ना.—'वार नारि' पहा.
**वाराशि** (ವಾರಾಶಿ) (सं) ना.—समुद्र.
**वाराह** (ವಾರಾಹ) (सं) वि.—वराहासंबंधीं.
**वाराहि** (ವಾರಾಹಿ) (सं) ना.—रानडुकर; शिवशक्ति; सप्तमातृकांपैकी एक.
**वारि** (ವಾರಿ) (सं) ना.—पाणी; सरस्वती.
(क) ना.—क्रम; रीत; पद्धति; हत्ती बांधण्याचा दोर; हत्तीखाना; हत्ती पकडणें.
**वारिज** (ವಾರಿಜ) (सं) ना.—कमळ.
**वारिजभव** (ವಾರಿಜಭವ) (सं) ना.—ब्रह्मदेव; कमलोद्भव.
**वरिजरिपु** (ವಾರಿಜರಿಪು) (सं) नां.—चंद्र.
**वारिजाक्ष** (ವಾರಿಜಾಕ್ಷ) (सं) ना.—कमलनयन; विष्णु; कृष्ण.
**वारिजासन** (ವಾರಿಜಾಸನ) (सं) ना.—ब्रह्मदेव; कमलासन.
**वारिजोद्भव** (ವಾರಿಜೋದ್ಭವ) कमलोद्भव; ब्रह्मदेव.
**वारित** (ವಾರಿತ) (सं) वि.—निवारण केलेले; विलंब लागलेलें; गमावलेलें.
**वारिद (धर)** (ವಾರಿದ [ಧರ]) (सं) ना.—जलधर; जलद; पाणी देणारे; मेघ; ढग.
**वारिधि** (ವಾರಿಧಿ) (सं) ना.—समुद्र; जलसंचय; पाण्याचा साठा.
**वारिरुह** (ವಾರಿರುಹ) (सं) ना.—जलांत वाढणारे; पाण्यांत रुजणारें कमल.

**वारिवाह** (ವಾರಿವಾಹ) (सं) ना.—मेघ; ढग; पाणी वाहणारे; आकाश.

**वारिसु** (ವಾರಿಸು) (क) धा.—काढून टाकणें; निवारण करणें; थांबवणें; विरोधणें; गमावणें.

**वारुण** (ವಾರುಣ) (सं) वि.—वरुणासंबंधीं.

**वारुणि** (ವಾರುಣಿ) (सं) ना.—वरुणपत्नि; पश्चिमा; पश्चिमदिगंगना; मद्य; आसव; दारू.

**वारुव** (ವಾರುವ) (सं) ना.—घोडा; अश्व; वारु.

**वार्तावह** (ವಾರ್ತಾವಹ) (सं) ना.—वृत्तपत्र; बातमीपत्र; निरोप्या; हेजीब; जासूद; टपालाची-ने आण करणारा; पोस्टमन; डाकवाला.

**वार्ते (र्ता)** (ವಾರ್ತೆ [ರ್ತಾ]) (सं) ना.—वर्तमान; समाचार; बातमी; वृत्त; वृत्ति; उद्योग.

**वार्धक** (ವಾರ್ಧಕ) (सं) ना.—अभिवृद्धि; वाढ; आधिक्य; म्हातारपण; वृद्धांचा संघ; एक षट्पदी छंद.

**वार्धक्य** (ವಾರ್ಧಕ್ಯ) (सं) ना.—म्हातारपण; वृद्धत्व; जुनाटपणा.

**वार्धि** (ವಾರ್ಧಿ) (सं) वि.—समुद्र; वारिधि.

**वार्मानुषि** (ವಾರ್ಮಾನುಷಿ) (सं) ना.—जलकन्या; पाण्यात उत्पन्न झालेली; पाताळकन्या.

**वार्य** (ವಾರ್ಯ) (सं) ना.—निवारण्यास योग्य; विलंब करण्यासारखें

**वार्षिक** (ವಾರ್ಷಿಕ) (सं) वि.—वर्षासंबंधीं; प्रतिवर्षी येणारें; पावसाविषयीचें; श्राद्ध; वर्षश्राद्ध.

**वाल** (ವಾಲ) (क) ना.—मुक्तकेश; झिंजा; झिपरी; मोकळे केस; काळे लांब केस.

**वालक** (ವಾಲಕ) (क) ना.—काकण; अंगठी; केस.

**वालधि** (ವಾಲಧಿ) (सं) ना.—केसाची झुंथी; झुचडा; खोपा.

**वालु** (ವಾಲು) (क) धा.—वाकणें; उतार होणें; चकाकणें.

**वालुका (के)** (ವಾಲುಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—वाळू; रेव; रेती; पुलिक.

**वाले** (ವಾಲೆ) (क) ना.—पिसारा; ताळेपत्र; ताडपत्र; ताडपत्री. लेख.

**वाल्मीकि** (ವಾಲ್ಮೀಕಿ) (सं) ना.—वारुळात जन्मलेला; वाल्मिकी कवि.

**वावदूक** (ವಾವದೂಕ) (सं) ना.—जल्पक; बडबड्या; गप्पीदास; वाद खेळणारा; वितंडवादी. वढाईखोर.

**वावि (वे)** (ವಾವಿ [ವೆ]) (क) ना.—नाते; प्रेम; सोयरीक; संबंध; बांधव्य; साम्य; सारखेपणा.

**वांसकार** (ವಾಂಸಕಾರ) (सं) ना.—वेणु वाजवणारा; मुरली वाजवणारा; वंशीधर.

**वास** (ವಾಸ) (सं) ना.—राहण्याचें ठिकाण; घर; वस्त्रप्रावरण; सुगंध; वसतिस्थान.

**वासक** (ವಾಸಕ) (सं) ना.—सुगंध देणारा; वास पसरवणारा; घर; कापड; बिछाना; अंथरूण.

**वासकसज्जिका** (ವಾಸಕಸಜ್ಜಿಕಾ) (सं) ना.—अष्टविध नायिकांपैकी एक; शय्याश्रृंगारून प्रियकराची वाट पाहणारी युवती.

**वासगार** (ವಾಸಗಾರ) (क) ना.—रहिवासी; गृहस्थ; पावा वाजवणारा; मुरली वाजवणारा.

**वासना** (ವಾಸನಾ) (सं) ना.—सुवास; सुगंध; परिमळ; पूर्व जन्मीची अपूर्ण इच्छा; कर्मफल; संस्कार

**वासनाफल** (ವಾಸನಾಫಲ) (सं) ना.—कर्मफल; इच्छेचे फळ.

**वासंति** (ವಾಸಂತಿ) (सं) ना.—एक जातीचा मोगरा; वसंतलता; एक प्रकारची मुक्तिवेल.

**वासर** (ವಾಸರ) (सं) ना.—दिवस; दिन; वार.

—**मणि** (ಮಣಿ) (सं) ना.—दिनमणि; सूर्य.

**वासव** (ವಾಸವ) (सं) ना.—ऐश्वर्यवान इंद्र;

**वासस्थ** (ವಾಸಸ್ಥ) (सं) वि.—ठाण मांडून बसलेला; वसतीकर; गृहस्थ; घरकरून राहणारा.

**वासस्थल** (ವಾಸಸ್ಥಲ) (सं) ना.—ठिकाण; निवास; वसति; घर; राहण्याची जागा.

**वासि** (ವಾಸಿ) (सं) ना.—गृहस्थ; रहिवासी; घर करून राहणारा.

—**नी** (ನೀ) (सं) ना.—रहिवासिनी; गृहस्थिती; गृहवासिनी.

(क) ना.—क्षेम; गुण; कपट; प्रतिज्ञा; हट्ट; अंशभाग; कीर्ति; स्थिति;

**वासिग** (ವಾಸಿಗ) (क) ना.—सेवक; नोकर; अंतेवासी.

**वासित** (ವಾಸಿತ) (सं) वि.—राहिलेला; सुवासिक; सुगंधी.

**वासिवट्ट** (ವಾಸಿವಟ್ಟು) (क) ना.—गौरव; घनता; मान्यता; मर्यादा; हट्ट; जिद्द.

**वासिसु** (ವಾಸಿಸು) (क) धा.—राहणें; घर करणें; सुवास दरवळणें; सुगंधणें.

**वासुकि** (ವಾಸುಕಿ) (सं) ना.—सर्पराज; आदिशेष.

—**शयन** (ಶಯನ) (सं) ना.—शेषशायी; विष्णु; अनंतशयन.

**वासुदेव** (ವಾಸುದೇವ) (सं) ना.—वसुदेवाचा मुलगा; कृष्ण; विष्णु.

**वास्तव (विक)** (ವಾಸ್ತವ [ವಿಕ]) (सं) वि.—खरें; सत्य; यथार्थ; सहज; स्वाभाविक.

**वास्तु** (ವಾಸ್ತು) (सं) ना.—घर; मंदिर; पाया.

**वास्तुविद्ये** (ವಾಸ್ತುವಿದ್ಯೆ) (सं) ना.—घरबांधणीतील कौशल्य; गृहरचनाशास्त्र; स्थापत्य.

**वास्तुशिल्प** (ವಾಸ್ತುಶಿಲ್ಪ) (सं) ना.–इमारती बांधण्याची कला; स्थापत्यकौशल्य.

**वाह** (ವಾಹ) (सं) वि.–वाहणारा; पुढें चालवणारा; घेऊन जाणारा वाहक.
(सं) ना.–वाहन; घोडागाडी; घेऊन जाण्याचें साधन.

**वाहक** (ವಾಹಕ) (सं) वि.–जबाबदार; उत्तरदायी; ओझें वाहणारा; मजूर; सारथी; स्वार; निरोप्या; जासूद.

**वाहन** (ವಾಹನ) (सं) ना.–प्रवाससाधन; स्थलांतराचे साधन.

**वाहस** (ವಾಹಸ) (सं) ना.–अजगर; महासर्प.

**वाहळितन** (ವಾಹಳಿತನ) (क) ना.–अश्वारोहण; घोडस्वारी.

**वाहिक** (ವಾಹಿಕ) (सं) ना.–नगारा; भेरी; बैलगाडी; भारवाहक.

**वाहित** (ವಾಹಿತ) (सं) ना.–अतिभार; प्रचंड ओझें.

**वाहिणि (णी)** (ವಾಹಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–नदी; सैन्य; सेनाविभाग; प्रवाह; द्रवपदार्थांचें वाहणें.

**वाहिनीपति** (ವಾಹಿನೀಪತಿ) (सं) ना.–समुद्र; नदीपति; सेनापति.

**वाहुक** (ವಾಹುಕ) (सं) ना.–बाहुक; सारथी; नळ राजाचे नांव.

**वाह्य** (ವಾಹ್ಯ) (सं) वि.–वाहण्यासारखें; अंगावर ओझें घेण्यायोग्य; पुढें चालू ठेवण्यासारखें.

**वाह्याळि** (ವಾಹ್ಯಾಳಿ) (सं) ना.–आश्वारोहण; घोड्यावर स्वारी; राऊतपणा. 'वहळितन' पहा.

**वाळ (ल)** (ವಾಳ [ಲ]) (सं) ना.–आवाळु.

**वाळि** (ವಾಳಿ) (क) ना.–घोड्यावर स्वार होणें; तिरस्कार; नकोसा झालेला; अविवेक.

**वाळ्ते** (ವಾಳ್ತೆ) (सं) ना.–जीवन; प्रपंच; संसार; जगणें; उपजीवन.

**वि** (ವಿ) (सं) अ.–विशेष, विरुद्ध वैगरे अर्थानें शब्दाला जुळणारा उपसर्ग; पक्षी.

**विंशति** (ವಿಂಶತಿ) (सं) वि.–वीस; दोनदशक.

**विकच** (ವಿಕಚ) (सं) वि.–विकसित; उमललेले; विस्तार पावलेले; उघडलेले; केस गळलेले; टक्कलयुक्त.

**विकट** (ವಿಕಟ) (सं) वि.–कुरूप; विद्रूप; अस्ताव्यस्त; वक्र; वाकडेतिकडे; भयंकर; अक्राळविक्राळ.
—**कवि** (ಕವಿ) (सं) ना.–विडंबक कवि; हास्यकर कवि.
—**हास्य** (ಹಾಸ್ಯ) (सं) ना.–उपहास; हंसें; अपहास.

**विकत्थन** (ವಿಕತ್ಥನ) (सं) ना.–आत्मश्लाघा; आत्मस्तुति; फुशारकी; घमेंड; बढाई.

**विकरण** (ವಿಕರಣ) (सं) ना.–विद्रूपता; विकृति.

**विकराल (ळ)** (ವಿಕರಾಲ [ಳ]) (सं) वि.–अति क्रूर; भयंकर; अतिभयप्रद.

**विकर्ण** (ವಿಕರ್ಣ) (सं) ना.–बाण; शर; धृतराष्ट्रपुत्र.

**विकरिसु** (ವಿಕರಿಸು) (क) धा.–विद्रूप करणें; उलटापालट करणें; बदलणें; विरूपिणें.

**विकर्तन** (ವಿಕರ್ತನ) (सं) ना.–सूर्य.

**विकर्म** (ವಿಕರ್ಮ) (सं) ना.–अयोग्य काम; नीतिबाह्य वर्तन; करू नये ते काम.

**विकल (ळ)** (ವಿಕಲ [ಳ]) (सं) वि.–घाबरट; बेशुद्ध; कोमेजलेले; घडी पडलेले; अपूर्ण; उणीव असलेले. नष्ट.

**विकल्प** (ವಿಕಲ್ಪ) (सं) ना.–अनुमान; संदेह; अनिश्चितता; संदिग्धपणा; कुकल्पना; दुर्विचार; इष्टापत्ति; ऐच्छिक; व्याकरणांतील विकल्प.

**विकल्पिसु** (ವಿಕಲ್ಪಿಸು) (क) धा.–गैरसमज करून घेणें; भलतेच समजणें; अन्यथा कल्पिणें.

**विकसन** (ವಿಕಸನ) (क) ना.–विस्तार; वाढ; विकास; प्रगटता; चकाकी.

**विकसिसु** (ವಿಕಸಿಸು) (क) ना.–उमलणें; फुलणें; विकसणें; पसरणें; कोंब येणें; प्रगटणें.

**विकार** (ವಿಕಾರ) (सं) ना.–रूप बिघडवणें; उलटापालट; बदलावणी; अस्वाभाविक रूपांतर; विकृति; गोंधळ; इंद्रियचांचल्य.

**विकारि** (ವಿಕಾರಿ) (सं) वि.–इंद्रिये चाळवलेला; विरूप झालेला; विकृत मनाचा; एका संवत्सराचे नाव.

**विकास** (ವಿಕಾಸ) (सं) ना.–उमलण; उघडणूक; स्पष्टता; प्रगटन; परिस्फोट; विशालता.

**विकासवाद** (ವಿಕಾಸವಾದ) (सं) ना.–परिणामवाद; उत्क्रांतिवाद.

**विकासि** (ವಿಕಾಸಿ) (सं) वि.–प्रगटणारें; स्फुरणारें; उमलणारें; पसरणारें; स्पष्ट होणारें.

**विकासिसु** (ವಿಕಾಸಿಸು) (क) धा.–विकास होणें; प्रगट होणें; वाढविणें; उमलवणें.

**विकिरण** (ವಿಕಿರಣ) (सं) ना.–चौफेर विस्तार; फिस्करण; विखरण; जिकडेतिकडे प्रसार.
—**किरण विकिरण** (ಕಿರಣವಿಕಿರಣ) (सं) ना.–किरणविस्तार.

**विकिरंत्** (ವಿಕಿರಂತ್) (सं) वि.–विखुरणारे; पसरणारे; वाढते; विस्तृत.

**विकीर्ण** (ವಿಕೀರ್ಣ) (सं) वि.–फैलावलेले; प्रसृत; रुंदावलेले; विस्फळित झालेले; फुटलेले; भरलेले; पर्याप्त.

**विकुर्वाण** (ವಿಕುರ್ವಾಣ) (सं) ना.–अयोग्य काम करणारा; दुष्कृत्य करणारा; विकर्मी.

**विकृत** (ವಿಕೃತ) (सं) वि.–विद्रूप; कुरूप; विकारी; रूपांतरित.

**विकृति** (ವಿಕೃತಿ) (सं) ना.–विकार; कुरूपता; दुष्कर्म; बदल; दुखणें; आजार; एक संवत्सर.

**विकृष्ट** (ವಿಕೃಷ್ಟ) (सं) वि.–चिरलेलें; ओढलेले; वाहात गेलेले; भयंकर; भीतिदायक; क्रूर.

**विक्रम** (ವಿಕ್ರಮ) (सं) ना.–सामर्थ्य; शक्ति; बल; पराक्रम; शौर्य; पाऊल; पाय; सर्वोपरि सामर्थ्य; सीमोल्लंघन; एका संवत्सराचें नाव.

**विक्रमशतक** (ವಿಕ್ರಮಶತಕ) (सं) ना.–विक्रमशक; चालुक्य राजांची कालगणना.

**विक्रमादित्य** (ವಿಕ್ರಮಾದಿತ್ಯ) (सं) ना.–प्राचीन उज्जयिनीचा सार्वभौम राजा.

**विक्रमि** (ವಿಕ್ರಮಿ) (सं) वि.–शूर; शक्तिशाली; पराक्रमी.

**विक्रय** (ವಿಕ್ರಯ) (सं) ना.–विक्री; विकणें; विनिमय; देवघेव.

**विक्रयिसु** (ವಿಕ್ರಯಿಸು) (क) धा.–विकणें; किंमतीनें देणें; मोबदला घेणें; पैशानें किंमत करणें.

**विक्रांत** (ವಿಕ್ರಾಂತ) (सं) वि.–सीमा ओलांडलेला. अतिक्रमित; उल्लंघित.
(सं) ना.–पराक्रमी वीर; जयशाली; पराक्रम; शौर्य; पाऊल.

**विक्रिया** (ವಿಕ್ರಿಯಾ) (सं) ना.–सुधारणा; प्रतिक्रिया; मंत्रतंत्रानें घडवलेला बदल.

**विक्लव** (ವಿಕ್ಲವ) (सं) वि.–कंप पावणारा; हलणारा; भ्यालेला; बेभान.

**विक्षिप्त** (ವಿಕ್ಷಿಪ್ತ) (सं) वि.–फेकलेला; भिरकाटलेला; त्यक्त; गोंधळलेला; मनावरील ताबा सुटलेलें; विमनस्क; तिरसट.

**विक्षेप** (ವಿಕ್ಷೇಪ) (सं) ना.–चालढकल; फेक; त्याग; सुटका; बेभानता; बेशुद्धि; बावरेपणा.
—**कटाक्ष विक्षेप** (ಕಟಾಕ್ಷ ವಿಕ್ಷೇಪ) (सं) ना.–डोळेमोड; दृष्टिक्षेप; नजरफेक.

**विक्षेपण** (ವಿಕ್ಷೇಪಣ) (सं) ना.–त्याग; हालचाल; वारा वाहणें.

**विख्यात** (ವಿಖ್ಯಾತ) (सं) ना.–प्रसिद्ध; नावाजलेला; कीर्तिमंत.

**विख्याति** (ವಿಖ್ಯಾತಿ) (सं) ना.–प्रसिद्धी; ख्याति; कीर्ति; मोठेपणा.

**विगड** (ವಿಗಡ) (क) वि.–विकट; क्रूर; भयानक; श्रेष्ठ; बिघडवणारा; दुष्ट; शबर; बेरड.

**विगडिसु** (ವಿಗಡಿಸು) (क) धा.–बिघडवणें; विघटणें; मनःपूर्वक विरोधणें; भिववणें; वाकडे करणें; क्रूर होणें; दूर करणें.

**विगत** (ವಿಗತ) (सं) वि.–होऊन गेलेले; गमावलेले; विलंबित; त्यागलेलें; संपलेलें; विस्मृत; वगळलेलें; विहंग दृष्टीचें.

**विगळत्** (ವಿಗಳತ್) (सं) वि.–गळत असलेले; झिरपणारे; बसरणारे; ओतले जाणारे.

**विगलित** (ವಿಗಲಿತ) (सं) वि.–शिथिल; सैल; गमावलेलें; त्यागिलेले; निस्तृत; घसरलेले; वितळलेले; पाणी झालेले; ओतलेलें; गळलेलें.

**विगर्हण (णे)** (ವಿಗರ್ಹಣ [ಣೆ]) (सं) ना.–निंदा; चहाडी; शिवी; टीका; दुर्लौकिक.

**विगर्हित** (ವಿಗರ್ಹಿತ) (सं) वि.–घसरलेले; तिरस्कृत; विरोधित; दुष्ट; निरुपयुक्त; हीन.

**विगुर्बणे** (ವಿಗುರ್ಬಣೆ) (सं) ना.–भयप्रद कृति; चमत्कारिक वेष.

**विगुर्बिसु** (ವಿಗುರ್ಬಿಸು) }<br>**विगुर्विसु** (ವಿಗುರ್ವಿಸು) } (क) धा.–भीति दाखवणें; घाबरवणें; वेषांतर करणें; बिनतोड कृति करणें.

**विग्रह** (ವಿಗ್ರಹ) (सं) ना.–सामासिक पदविच्छेद; रूप; आकृति; विस्तार; प्रतिमा; देह; मूर्ति; सोडवणूक; भाग; अंश; युद्ध; प्रणयकलह; विराम चिन्ह; खास जाणीव.
—**आराधने** (ಆರಾಧನೆ) (सं) ना.–मूर्तिपूजा; देवपूजन; सगुण देवतार्चन.

**विग्रहिसु** (ವಿಗ್ರಹಿಸು) (क) धा.–समासाची फोड करणें; सामासिक पदें वेगळी करून सांगणें; विरोधणें; त्रास देणें; भांडणें.

**विघट (टक)** (ವಿಘಟ [ಟಕ]) (सं) वि.–वेगळे करणारा; फोडणारा; मोडणारा.
(सं) ना.–भेद; विरुद्ध जातीय घटक; भेदी; भंजक.

**विघटन (ना)** (ವಿಘಟನ [ನಾ]) (सं) ना.–वेगळेपणा; अलगता; वियोग; भेद; फूट; नाश.

**विघटित** (ವಿಘಟಿತ) (सं) ना.–भग्न; भेदलेलें; विग्रहित; वेगळे झालेले; बिघडलेले.

**विघटिसु** (ವಿಘಟಿಸು) (क) धा.–वेगवेगळे करणें; पृथक्करण करणें; दूर करणें; भीति उत्पन्न करणें.

**विघन** (ವಿಘನ) (सं) ना.–उष्टें; उच्छिष्ट; खाऊन उरलेलें.

**विघाति (त)** (ವಿಘಾತಿ [ತ]) (सं) ना.–टोला; थप्पड; दणका; विरोध; हरकत; नाश; खून; वध.

**विघाति (तक)** (ವಿಘಾತಿ [ತಕ]) (सं) वि.–खुनी; नाश करणारा; विघ्न आणणारा; दुखवणारा; मारणारा; संहारक.

**विघूर्णित** (ವಿಘೂರ್ಣಿತ) (सं) वि.–वाखाणलेले; नांवाजलेले; विकसित; विनम्र; गाजवलेलें.

**विघूर्णिसु** (ವಿಘೂರ್ಣಿಸು) (क) धा.–गदगदा हलणें; कापणें; कंप पावणें; टांगणें; आश्चर्यचकित होणें.

**विघ्न** (ವಿಘ್ನ) (सं) ना.–संकट; बाधा; अडचण; हरकत; विरोध; विग्रह.
—**ईश्वर** (ಈಶ್ವರ) (सं) ना.–गणपति; दुरित हरण.

—**विनाश (शन)** (ವಿನಾಶ [ಶನ]) (सं) ना.—गणपति; संकट निवारणारा.

**विंगड** (ವಿಂಗಡ) (क) ना.—विभक्तपणा; पृथक्त्व; अलगता.

**विंगडिसु** (ವಿಂಗಡಿಸು) (क) धा.—वेगवेगळे करणें; विवेचन करणें; तारतम्य समजणें.

**विचकिल** (ವಿಚಕಿಲ) (सं) ना.—जाई; जुई.

**विचक्षण** (ವಿಚಕ್ಷಣ) (सं) वि.—खोलवर पाहणारा; चतुर; प्रखर बुद्धीचा; तारतम्य ज्ञानी; विद्वान; अनुभवी.

**विचक्षणे** (ವಿಚಕ್ಷಣೆ) (सं) ना.—कार्यकुशल स्त्री; चतुरमती; जाणती स्त्री; चातुर्य.

**विचय** (ವಿಚಯ) (सं) ना.—शोध; पूसतपास; समेट; पोरकटपणा.

**विचल** (ವಿಚಲ) (सं) वि.—हलणारा; अस्थिर; चंचल; कंपित.

**विचार** (ವಿಚಾರ) (सं) ना.—योजना; आलोचना; परीक्षण; तर्कसंगती; विमर्श; चिंतन; निर्णय; पृथक्करण.

**विचारक** (ವಿಚಾರಕ) (सं) वि.—विचार करणारा; निरीक्षक; आलोचक; विमर्शक.

**विचारणे** (ವಿಚಾರಣೆ) (सं) ना.—परीक्षा; समजून घेणें; ज्ञान; इच्छा.

**विचारपर** (ವಿಚಾರಪರ) (सं) वि.—चिंतनशील; विमर्शात्मक; आलोचनापूर्ण.

**विचारमूढ** (ವಿಚಾರಮೂಢ) (सं) वि.—अजाण; विचारांत गडबडलेला; गोंधळलेला; दिङ्मूढ.

**विचारशील** (ವಿಚಾರಶೀಲ) (सं) वि.—पूर्ण विचार करणारा; समजून घेणारा; स्थिरबुद्धि; मन शांत ठेवणारा.

**विचारस्थ** (ವಿಚಾರಸ್ಥ) (सं) वि.—ज्ञानी; अनुभवी; विचारवंत; जाणीव असलेला.

**विचारि** (ವಿಚಾರಿ) (सं) ना.—तारतम्यबुद्धि असलेला; विमर्शक;

**विचित्त** (ವಿಚಿತ್ತ) (सं) वि.—मन ताब्यांत नसलेला; भ्रमिष्ट; भलतीकडे मन गेलेला.

**विचित्र** (ವಿಚಿತ್ರ) (सं) वि.—आश्चर्यकारक; गोंधळवणारा; रंगीबेरंगी; सुंदर; चित्ररहित.

—**तर-तम** (ತರ-ತಮ) (सं) वि.—अधिक विस्मयकर; अति सुंदर.

**विच्छित्ति** (ವಿಚ್ಛಿತ್ತಿ) (सं) ना.—कातरकाम; तोडप; फाडाफाड; विभाजन; विलंब; नष्टत्त्व; नाश; सीमा; मर्यादा; यति; अव्यवस्था; शोभा; सौंदर्य; रंगवणी.

—**विशेष** (ವಿಶೇಷ) (सं) ना.—विशिष्ट शोभा.

**विच्छिदुर** (ವಿಚ್ಛಿದುರ) (सं) वि.—फोडणारा; चिरणारा; सोडवणारा.

**विच्छिन्न** (ವಿಚ್ಛಿನ್ನ) (सं) वि.—फाटलेला; मोडलेला; तुकडे पाडलेला; विलंबित; नष्ट; समाप्त; रंगवलेला; लपवलेला.

**छिन्नविच्छिन्न** (ಛಿನ್ನವಿಚ್ಛಿನ್ನ) (सं) वि.—तुकडे तुकडे झालेला; फाटकेतुटके; मोडतोड झालेलें.

**विच्छुरित** (ವಿಚ್ಛುರಿತ) (सं) वि.—आच्छादलेला; लेप लावलेला; विच्छिन्न; अलगविलगलेला; फुटलेला.

**विच्छेद (दन)** (ವಿಚ್ಛೇದ [ದನ]) (सं) ना.—हरकत; अंत; शेवट; अंश; विभाग.

—**विवाहविच्छेद** (ವಿವಾಹವಿಚ್ಛೇದ) (सं) ना.—घटस्फोट; काडीमोड; सोडचिठी; लग्नभंग.

**विजन** (ವಿಜನ) (सं) वि.—निर्जन; एकान्त; अलोक.

**विजय** (ವಿಜಯ) (सं) ना.—यश; जय; अर्जुन; वैकुंठीचा द्वारपाल; आवळ्याचें झाड.

—**दशमि (शमी)** (ದಶಮಿ [ಶಮೀ]) (सं) ना.—नवरात्रातील शेवटचा दिवस; दसरा.

**विजयश्री** (ವಿಜಯಶ್ರೀ) (सं) ना.—विजयलक्ष्मी.

**विजयि** (ವಿಜಯಿ) (सं.) वि.—जयशाली; यशस्वी.

**वियर्योत्सव** (ವಿಜಯೋತ್ಸವ) (सं) ना.—यशाच्या आनंदानें केलेला उत्सव.

**विजात** (ವಿಜಾತ) (सं) वि.—भिन्नजाति संकराने जन्मलेला.

**विजाति** (ವಿಜಾತಿ) (सं) ना.—मिश्रणाची जात; हीनजात; पक्षाची जाति.

**विजातीय** (ವಿಜಾತೀಯ) (सं) ना.—वेगळ्या जातीचा; संकरज; भिन्न गुणधर्म असलेला.

**विजिगीषु** (ವಿಜಿಗೀಷು) (सं) वि.—विजयाची इच्छा करणारा; जयाकांक्षी; जयिष्णु.

**विजित** (ವಿಜಿತ) (सं) वि.—जिंकलेला; पराभूत; पराजित.

**विजृंभ (भण)** (ವಿಜೃಂಭ [ಭಣ]) (सं) ना.—विकसन; जांभई; तोंडउघड; हूल उठावण; देखावा; प्रदर्शन; संभ्रम; शृंगार.

**विजृंभिसु** (ವಿಜೃಂಭಿಸು) (क) धा.—उमलणें; विकसणें; विस्तरणें; उकलणें; स्फुरणें; शोभणें; अधिक होणें.

**विजेत (ता) (तृ)** (ವಿಜೇತ [ತಾ] [ತೃ]) (सं) ना.—जिंकणारा; जयशाली.

**विजेय (य्य)** (ವಿಜೇಯ [ಯ್ಯ]) (सं) वि.—जिंकण्यायोग्य; जय मिळवण्याजोगें.

**विज्ञप्ति** (ವಿಜ್ಞಪ್ತಿ) (सं) ना.—विनंती; मागणी; इच्छा.

**विज्ञात** (ವಿಜ್ಞಾತ) (सं) वि.—प्रसिद्ध; सर्वश्रुत; भौतिक शास्त्रासंबंधीं.

**विज्ञान** (ವಿಜ್ಞಾನ) (सं) ना.—विशिष्ट ज्ञान; विज्ञानाचें शास्त्र; शुद्ध जाणीव; परमात्मबुद्धि.

**विज्ञानि** (ವಿಜ್ಞಾನಿ) (सं) वि.—विशिष्ट ज्ञान असलेला; भौतिक-शास्त्र विशारद.

**विज्ञापने (न)** (ವಿಜ್ಞಾಪನೆ [ನ]) (सं) ना.—आकांक्षा; विनंति; प्रार्थना; अर्जी.

**विज्ञापिसु** (ವಿಜ್ಞಾಪಿಸು) (क) धा.—विनंति करणें; अर्ज करणें; विनम्र निवेदणें.

**विज्ञेय**(ವಿಜ್ಞೇಯ) (सं) ना. कळण्यायोग्य; समजण्यासारखें.

**विट** (ವಿಟ) (सं) ना.—नायक नायिकाच्या रंजनार्थ उपयोजिलेलें नाटकांतील संगीतादि कलावंत पात्र; मोसंबें; साखरलिंबू; विदूषकाचा सहकारी; कामुक; जार; कलहंस; विलासी; उंदीर; खैरवृक्ष.

**विटंक** (ವಿಟಂಕ) (सं) ना.—कबूतराचें घरटें; खुराडें; शिखर; कळस.

**विटप** (ವಿಟಪ) (सं) ना.—वृक्ष; झाड; उंबराचें झाड; औदुंबर.

**विटाळ** (ವಿಟಾಳ) (अ.दे) ना.—मालिन्य; शिवाशिव; अस्पर्श; रजोदर्शन; सूतक; अशौच; कलंक; अडचण.

**विठ्ठल** (ವಿಠ್ಠಲ) (सं) ना.—पंढरपूरची प्रमुख देवता.

**विडंग** (ವಿಡಂಗ) (सं) ना.—वावडिंग; कृमिघ्न वनस्पति.

**विडंब (बन)** (ವಿಡಂಬ [ಬನ]) (सं) ना.—हास्य; चेष्टा; अपवित्रीकरण; वेषांतर; घाबरेपणा; निराशा; बेभानता; फसवणूक.

**विडंबिसु** (ವಿಡಂಬಿಸು) (क) धा.—अनुकारिणें; चेष्टा करणें; विडंबणें; परिहास करणें; हंसें करणें.

**विडाय (यि)** (ವಿಡಾಯ [ಯಿ]) (सं) ना.—अवडंबर; मोठेपणा; सामर्थ्य; आश्चर्य; जांभई; अचंबा; ओळ; समूह; निळाचें झाड; उत्सव.

**विडायिगेडु** (ವಿಡಾಯಿಗೆಡು) (क) धा.—शक्ति क्षीण होणें; कळा जाणें; निस्तेजणें.

**विडारक** (ವಿಡಾರಕ) (सं) ना.—मांजर; बिडालक; मार्जार.

**विड्डूर** (ವಿಡ್ಡೂರ) (क) ना.—भांडखोरपणा; हिंसा; मुस्कटदाबी; पीडा; अडचण; हरकत.

**विडूरज** (ವಿಡೂರಜ) (सं) ना.—वैदूर्य रत्न.

**विडौजस** (ವಿಡೌಜಸ್) (सं) ना.—इंद्र; 'बिडौज'; पहा.

**वितंड** (ವಿತಂಡ) (सं) वि.—व्यर्थ; आडणा; अर्गला; हत्ती.

—**वाद** (ವಾದ) (सं) ना.—हट्ट; पोकळ चर्चा; तर्कदुष्ट विवरण; तर्काला सोडून केलेला वाद.

**वितत** (ವಿತತ) (सं) वि.—विस्तृत; रुंद; पूर्ण पसरलेले; एक तंतुवाद्य.

**वितति** (ವಿತತಿ) (सं) ना.—रास; घोस; घड; विशालता.

**वितथ** (ವಿತಥ) (सं) वि.—व्यर्थ; पोकळ; असत्य; निरुपयुक्त.

**वितंतु** (ವಿತಂತು) (सं) ना.—विधवा; जिची जिविताशा संपलेली आहे अशी स्त्री; उत्तम जातीचा घोडा.

**वितरण (णे)** (ವಿತರಣ [ಣೆ]) (सं) ना.—वाटप; उचित दान; तरून जाणें; परतीरगमन; अर्पण.

**वितर्क** (ವಿತರ್ಕ) (सं) ना.—कल्पना; इच्छा; संदेह; संशय; विरोधविचार; अनुमान.

**वितान** (ವಿತಾನ) (सं) ना.—मांडव; छप्पर; समूह; विस्तार; विशालता; अंश; ओळ; यज्ञ; शून्य.

**विताळ** (ವಿತಾಳ) (सं) ना.—विस्तार; प्रसार; आधिक्य; अभिवृद्धि; उपाय; गर्व.

**वित्त** (ವಿತ್ತ) (सं) वि.—समजलेले; प्रसिद्ध.
(सं) ना.—पैसा; द्रव्य; वैभव; संपत्ति; लाभ; प्रयोजन.

**वित्ताधिप (धीश)** (ವಿತ್ತಾಧಿಪ [ಧೀಶ]) (सं) ना.—कुबेर; धनस्वामी.

**वित्ति** (ವಿತ್ತಿ) (सं) ना.—ज्ञान; लाभ; विचार; संपत्ति.

**वित्तैषण** (ವಿತ್ತೈಷಣ) (सं) ना.—संपत्तीची अभिलाषा; लाभाची इच्छा.

**विद** (ವಿದ) (सं) वि.—जाणता; ज्ञानी; विद्वान; पंडित; निष्णात.

**विदग्ध** (ವಿದಗ್ಧ) (सं) वि.—जळून गेलेला; कष्टांत असलेला; कष्ट सहन केलेला.
(सं) ना.—पंडित; विद्वान; निपुण; कुशल.

**विदग्धा (ग्धे)** (ವಿದಗ್ಧಾ [ಗ್ಧೆ]) (सं) वि.—चतुर स्त्री; विदुषी; पंडिता.

**विदर्भ** (ವಿದರ್ಭ) (सं) ना.—वऱ्हाड प्रांत.

—**कन्या-जा** (ಕನ್ಯಾ-ಜಾ) (सं) ना.—रुक्मिणी; दमयंती.

**विदर्भरीति** (ವಿದರ್ಭರೀತಿ) (सं) ना.—एक काव्यशैली; वैदर्भी रीति.

**विदल** (ವಿದಲ) (सं) वि.—उघडलेले; उमललेलें; विकसित; दळ नसलेलें; अखंड.
—(सं) ना.—तुकडा; भाग; चूर.

**विदलित** (ವಿದಲಿತ) (सं) वि.—फुटलेलें; विकसित; उघडें; तुडवलेलें.

**विदळिसु** (ವಿದಳಿಸು) (क) धा.—तुकडे करणें; भाग पाडणें; फाडणें; फोडणें.

**विदारक** (ವಿದಾರಕ) (सं) वि.—फोडणारा; फाडणारा.
(सं) ना.—विधुर; पत्नि मृत झालेला.

**विदारण (णे)** (ವಿದಾರಣ[ಣೆ]) (सं) ना.—फाडाफाड; चीरफाड; मोडतोड; युद्ध; रण; भांडण; खून; शिरच्छेद; कंदन.

**विदारि** (ವಿದಾರಿ) (सं) वि.—फोडणारा; तुकडे पाडणारा; वेगळे करणारा.

**विदारित** (ವಿದಾರಿತ) (सं) वि.—फाटकेतुटकें; चिरलेलें; ठार मारलेलें; प्राणघातक.

**विदारिसु** (ವಿದಾರಿಸು) (क) धा.—चिरणें; चूर करणें; लुटणें; उपटणें; फोडणें.

**विदित** (ವಿದಿತ) (सं) वि.—माहीत झालेलें; अनुभव घेतलेलें; निवडलेलें; सुप्रसिद्ध.
(सं) ना.—समजूत; बुद्धि; भान; विचार; आलोचना.

**विदीर्ण** (ವಿದೀರ್ಣ) (सं) वि.—सोललेले; फाडलेले; चिरलेले.

**विदु** (ವಿದು) (सं) ना.—गंडस्थळामधील सखल भाग; जाणता.
(क) ना.—महिना; चंद्र; विष्णु; विश्रांति; बिऱ्हाड.

**विदुर** (ವಿದುರ) (सं) ना.—विचित्रवीर्याचा पुत्र; धृतराष्ट्राचा लहान भाऊ.

**विदुष** (ವಿದುಷ) (सं) ना.—विद्वान; पंडित; ज्ञानी.

**विदुषि (षी)** (ವಿದುಷಿ [ಷೀ]) (सं) ना.—विद्यावती; पंडिता; विदग्धा.

**विदूर** (ವಿದೂರ) (सं) वि.—फार दूर राहणारा; दूरस्थ; वगळलेला.

**विदूरज** (ವಿದೂರಜ) (सं) ना.—वैडूर्य रत्न.

**विदूषक** (ವಿದೂಷಕ) (सं) वि.—चेष्टेखोर; विनोदी पात्र; नकल्या; हास्यकार; गोड्डी; वाक्यांगवेषविकारांनीं हसवणारा.

**विदूषित**(ವಿದೂಷಿತ)(सं) वि.—मलीन; अपवित्र; दोष असलेला.

**विदेश** (ವಿದೇಶ) (सं) ना.—अन्यदेश; परदेश; परकें राष्ट्र.

**विदेह** (ವಿದೇಹ) (सं) ना.—एक देशनाम; जनकाचें राज्य; देह नसलेला; काम; जनकराजा.
—**जा**—**सुता** (ಜಾ—ಸುತಾ) (सं) ना.—सीतादेवी; जानकी.

**विद्ध** (ವಿದ್ಧ) (सं) वि.—घायाळ; जखमी; कोरलेले; भोंक पाडलेलें; प्रविष्ट; विरुद्ध; फेकलेलें; मारलेलें.
(सं) ना.—जखम; घाय; व्रण.

**विद्यमान** (ವಿದ್ಯಮಾನ) (सं) वि.—ज्ञात; समजणारे; चालू असलेलें; प्रचलित; हयात.
(सं) ना.—वर्तमान; बातमी; समाचार; स्थितिगति; संगती.

**विद्या (द्ये)** (ವಿದ್ಯಾ [ದ್ಯೆ]) (सं) ना.—सत्यज्ञान; शिक्षण; संस्कृति; समजूत; लेखनवाचन.
—**अधीश** (ಅಧೀಶ) (सं) ना.—गणपति.
—**अभ्यास** (ಅಭ್ಯಾಸ) (सं) ना.—शिक्षण; वाचन; मनन.
—**अर्थि** (ಅರ್ಥಿ) (सं) वि.—शिकणारा; अभ्यासू; शिक्षण घेणारा.
—**वंत** (ವಂತ) वि.—ज्ञानी; विद्वान; पंडित.

**विद्याधर** (ವಿದ್ಯಾಧರ) (सं) ना.—विद्वान; एक देवजाति; पंडित.

**विद्याधरि (री)** (ವಿದ್ಯಾಧರಿ [ರೀ]) (सं) ना.—विद्याधर जातीय स्त्री; गंधर्वकन्या; अप्सरा.

**विद्यानाथ** (ವಿದ್ಯಾನಾಥ) (सं) ना.—गणपति; 'प्रतापरुद्रीय' या काव्याचा कर्ता; विद्यापति.

**विद्याविनोद** (ವಿದ್ಯಾವಿನೋದ) (सं) ना.—कलाकौशल्य क्रीडा; रसिकांचा कालक्षेप.

**विद्युत् (त्तु)** (ವಿದ್ಯುತ್ [ತ್ತು]) (सं) ना.—वीज; प्रकाशशक्ती; विजेचा प्रकाश.

**विद्युत्कवच** (ವಿದ್ಯುತ್ಕವಚ) (सं) ना.—विद्युतसंरक्षक साधन. विजेचे आवरण.

**विद्युत् व्यजन** (ವಿದ್ಯುತ್‌ವ್ಯಜನ) (सं) ना.—विजेचा पंखा;

**विद्युल्लते** (ವಿದ್ಯುಲ್ಲತೆ) (सं) ना.—वीज; विजेची वेल.

**विद्योत (तन)** (ವಿದ್ಯೋತ [ತನ]) (सं) ना.—धडाडती ज्वाला; प्रकाशमान.

**विद्रव (वण)** (ವಿದ್ರವ [ವಣ]) (सं) ना.—वितळणी; प्रवाह; तळमळ; चिंता; पलायन.

**विद्रविसु** (ವಿದ್ರವಿಸು) वितळणे; वितळून वाहणें; पळणें.

**विद्राव (वण)** (ವಿದ್ರಾವ [ವಣ]) (सं) ना.—वितळण; प्रवहन पलायन; पाठलाग.

**विद्रुत** (ವಿದ್ರುತ) (सं) वि.—पळालेला; पाय काढलेला; तळमळ असलेला; चिंता करणारा; दिसेनासा झालेला.

**विद्रुम** (ವಿದ್ರುಮ) (सं) ना.—प्रवाळ; पोवळे; पालवी; अंकुर.

**विद्वत्** (ವಿದ್ವತ್) (सं) ना.—विद्वान्; पंडित; ज्ञानी.

**विद्वत्ता (त्ते)** (ವಿದ್ವತ್ತಾ [ತ್ತೆ]) (सं) ना. पांडित्य; ज्ञान; बुद्धिमानता.

**विद्वत्त्व** (ವಿದ್ವತ್ತ್ವ) (सं) ना.—शहाणपण; ज्ञान; पांडित्य.

**विद्वस् (द्वांस)** (ವಿದ್ವಸ್ [ದ್ವಾಂಸ]) (सं) वि.—पंडित; ज्ञानी; विद्यावंत.

**विद्वान** (ವಿದ್ವಾನ) (सं) वि.—पंडित; जाणता.

**विद्विष** (ವಿದ್ವಿಷ) (सं) ना.—वैरी; शत्रु; विरोधी.

**विद्विष्ट** (ವಿದ್ವಿಷ್ಟ) (सं) वि.—शत्रुत्व केला गेलेला; विरोधलेला; द्वेष केला गेलेला.
(सं) ना.—शत्रु; वैरी; विरोधक.

**विद्वेष** (ವಿದ್ವೇಷ) (सं) ना.—विशेष भांडण; शत्रुत्व; बद्धकटाक्ष; हाडवैर; भांडण.

**विद्वेषि** (ವಿದ್ವೇಷಿ)(सं) ना.—प्रबल वैरी; खडतर शत्रु; कटु भांडण.

**विद्वेषित** (ವಿದ್ವೇಷಿತ) (सं) वि.—वैरपात्र; शत्रुत्व पत्करलेला.

**विध** (ವಿಧ) (सं) ना.—प्रकार, पद्धति; रीति; तऱ्हा; क्रम; रूप.
(सं) वि.—अनेक रीतीचा.

**विधर्मि (र्मिन्)** (ವಿಧರ್ಮಿ [ರ್ಮಿನ್]) (सं) वि.—अन्य धर्मांचा; वेगळ्या मतपंथाचा; दुसऱ्या संप्रदायाचा; अन्यजातीय.

**विधर्मीय** (ವಿಧರ್ಮೀಯ) (सं) वि. – भिन्न सांप्रदायी. अन्य पंथाचा.

**विधवते** (ವಿಧವತೆ) (सं) ना. – रांडावपण; वैधव्य; पतिनिधोत्तर स्थिति.

**विधवा (वे)** (ವಿಧವಾ [ವೆ]) (सं) ना. – मृतपति; रांड; विगतपति.

**विधा** (ವಿಧಾ) (सं) ना. – आकार; रीति; प्रकार; पद्धति; आवृत्ति; हत्ती घोडा यांचा आहार; प्रवेश; पगार; मजुरी.

**विधात (ता) तृ** (ವಿಧಾತ [ತಾ][ತೃ]) (सं) ना. – विधी; ब्रह्मदेव; दानी; दाता; दैव; विश्वकर्मा; कामदेव; मदिरा.

**विधान** (ವಿಧಾನ) (सं) ना. – क्रम; पद्धति; व्यवस्था; नियम; रीत. निबंधन; चौकट; साधन; रचना; निर्माण; शैली.

**—सौध** (ಸೌಧ) (सं) ना. – म्हैसूर राज्याचे शासनसभा-भुवन.

**विधायक** (ವಿಧಾಯಕ) (सं) वि. – सरळ जुळणारे; रचनात्मक; शासन करणारे; नियामक; व्यवस्थापक; नियम करणारा.
(सं) ना. – नायक; पुढारी; अध्यक्ष.

**—कार्यक्रम** (ಕಾರ್ಯಕ್ರಮ) (सं) ना. – रचनात्मक कामकाज.

**विधावंत** (ವಿಧಾವಂತ) (सं) ना. – पगारदार; वेतन घेणारा; वेतनाधिकारी.

**विधि** (ವಿಧಿ) (सं) ना. – ब्रह्मा; दैव; अदृष्ट; आज्ञा; शासन; नियम; क्रम; बंध; निर्बंध; भाग्य; वर्तन; कर्म; स्थिति; करार; सृष्टि; निर्मिती; गजाहार; विज्ञानी; वेळ; विष्णु.

**विधिज्ञ** (ವಿಧಿಜ್ಞ) (सं) ना. – कर्मठ; ब्राह्मण; दैव जाणणारा; भूतभविष्यज्ञानी; दैवज्ञ; ज्योतिषी.

**विधिप्रयोग** (ವಿಧಿಪ್ರಯೋಗ) (सं) ना. – नियमपालन; नियमानुचरण; शासनानुकरण.

**विधिबिंदु** (ವಿಧಿಬಿಂದು) (सं) वि. – शासनसंमत; शासनानुबंध. (Point of order)

**विधिवत् (पूर्वक)** (ವಿಧಿವತ್ [ಪೂರ್ವಕ]) (सं) अ. – नियमानुसार; यथाक्रम.

**विधिलिखित** (ವಿಧಿಲಿಖಿತ) (सं) ना. – नशीब; दैव; कर्मफल; कपाळी लिहिलेलें; ललाटीं रेखलेलें.

**विधिसु** (ವಿಧಿಸು) (क) धा. – आज्ञा करणें; परवानगी देणें; निश्चय करणें.

**विधु** (ವಿಧು) (सं) ना. – चंद्र; महिना; विष्णु.

**विधुत** (ವಿಧುತ) (सं) वि. – हलतें; झुलतें; लोंबतें; उपटलेलें; टाकलेलें.

**विधुधर** (ವಿಧುಧರ) (सं) ना. – शशिधर; चंद्रमौली; शंकर.

**विधुंतुद** (ವಿಧುಂತುದ) (सं) ना. – चंद्राला त्रास देणारे; राहुकेतू.

**विधुमौळी** (ವಿಧುಮೌಳಿ) (सं) ना. – चंद्रशेखर; शिव.

**विधुर** (ವಿಧುರ) (सं) वि. – दूर केलेला; अलग केलेला; वेगळा झालेला; भार नसलेला; स्वतंत्र; पीडित.
(सं) ना. – विगतपत्नी; पत्नी मेलेला.

**विधुरे** (ವಿಧುರೆ) (सं) ना. – वियोगिनी; विरहिणी; विधवा; अडचणींत अडकलेली; कष्टासाठींच जगलेली.

**विधुवन** (ವಿಧುವನ) (सं) ना. – कंपन; हालचाल; आंदोलन.

**विधुहास** (ವಿಧುಹಾಸ) (सं) ना. – चंद्रहास; एक वैष्णवभक्त.

**विधूत** (ವಿಧೂತ) (सं) वि. – हलविलेला; आंदोलित; लोंबत ठेवलेला; त्यक्त; टाकलेला.

**विधृत** (ವಿಧೃತ) (सं) वि. – अलग केलेला; दूरीकृत; वियोजित; उद्धार केलेला; उचलून घेतलेला; धरलेला.

**विधेय** (ವಿಧೇಯ) (सं) वि. – नम्र; अंकित; आज्ञाधारक; आधीन.

**—ता–ते** (ತಾ,–ತೆ) (सं) ना. – आधीनता; नम्रता; आज्ञाधारकत्व.

**विध्यर्थ** (ವಿಧ್ಯರ್ಥ) (सं) ना. – इच्छा; आकांक्षा; परवानगी इत्यादि सूचित करणारे क्रियापद; विधीचा अर्थ; प्रयोजन; कार्याचा हेतु.

**विध्युक्त** (ವಿಧ್ಯುಕ್ತ) (सं) वि. – वेदशास्त्रप्रणित; शासनादि नियमांत सांगितलेलें; विधिविधानसंमत; कायद्याला धरून असलेले.

**विध्वंस** (ವಿಧ್ವಂಸ) (सं) ना. – संपूर्ण हानी; विनाश; बद्धवैर; सर्वनाश.

**विनत** (ವಿನತ) (सं) वि. – वाकवलेलें; वाकलेलें; नम्र; नमस्कृत; अंकित; विनयपूर्ण; आधीन.

**विनता** (ವಿನತಾ) (सं) ना. – गरुडाची माता.

**—आत्मज, सुत** (ಆತ್ಮಜ–ಸುತ) (सं) ना. – गरूड; वैनतेय.

**विनति** (ವಿನತಿ) (सं) ना. – विनय; नम्रभाव; बांक; मऊपणा; सद्वतन; सौजन्य; निरहंकार; नमन; नमस्कार.

**विन (ना) द** (ವಿನ [ನಾ] ದ) (सं) ना. – शब्द; आवाज; ध्वनि; विनोद; संतोष; विलास.

**विनमित** (ವಿನಮಿತ) (सं) ना. – अति नम्र; अति वाकलेला; लवून नमस्कार केलेला; विनम्र.

**विनय** (ವಿನಯ) (सं) ना. – नम्रता; सद्वर्तन; सौजन्य; नम्र वर्तन; अनुनय; नमस्कार; प्रणाम; आज्ञापालन; बौद्ध पीटकांतील विनयपीटक.

**विनयन** (ವಿನಯನ) (सं) ना. – निभावणी; संगतीनें नेणें; शिस्त; व्यवस्था; शिक्षण; अंधत्व; आंधळेपण.

**विनष्ट** (ವಿನಷ್ಟ) (सं) वि. – नाश पावलेलें; अदृश्य; न दिसणारें; विकृत.

**विना** (ವಿನಾ) (सं) अ.—शिवाय; खेरीज; वांचून; सोडून; नसतांना.

**विनायक** (ವಿನಾಯಕ) (सं) ना.—गणपति; पक्षिश्रेष्ठ; गरूड; बुद्धदेव.

**विनाश** (ವಿನಾಶ) (सं) ना.—विपरीत हानी; विध्वंस; सर्वनाश.

**विनिपात** (ವಿನಿಪಾತ) (सं) ना.— अधःपात; घसरण; सर्वनाश; नर्कप्राप्ति; दुर्गति; अशुभ; नाश; अवसान; प्राप्ति; जखम; आघात; अमर्यादा.

**विनिमय** (ವಿನಿಮಯ) (सं) ना.—देवघेव; आदानप्रदान; अदलाबदल; पुरवठा; दडपण.

**विनियम (मन)** (ವಿನಿಯಮ [ಮನ]) (सं) ना.—स्वाधीनता; अंकितता; निग्रह; निरीक्षण; वेतन; नियम; वेतनश्रेणी.

**विनियोग** (ವಿನಿಯೋಗ) (सं) ना.—खर्चवेंच; व्यय; उपयोग; सेवा; वांटणी; विभाजन; नियमन; व्यवस्था; निर्वासन; त्याग; हरकत; विघ्न; कामांत गुंतलेल्या लोकांचा गट.

**विनियोगिसु** (ವಿನಿಯೋಗಿಸು) (क) धा.—खर्चिणें; गुंतणें; व्यवस्था लावणें; दूर करणें; अलग करणें.

**विनिर्मित** (ವಿನಿರ್ಮಿತ) (सं) वि.—निर्मिलेलें; सृजन केलेलें; कारणीभूत.

**विनिवृत्त** (ವಿನಿವೃತ್ತ) (सं) वि.—फिरविलेलें; फिरलेलें; परत गेलेलें; थांबलेलें; कामांतून मुक्त झालेलें.

**विनीत** (ವಿನೀತ) (सं) वि.—नम्र; विनयशील; सुसंस्कृत; सभ्य वर्तनाचे; सुशिक्षित; सुंदर; निभावलेलें; मार्गदर्शन केलेला; व्यवस्था लागलेला; बोलावून नेलेला; आत्मसंयमी; सरळ; साधासीधा; पाळीव घोडा; व्यापारी.

**विनुत** (ವಿನುತ) (सं) वि.—स्तविलेला; स्तुति केलेला; वर्णित; कीर्तित; प्रसिद्ध; भरीव.

**विनुति** (ವಿನುತಿ) (सं) ना.—कीर्ति; प्रशस्ती; स्तुती; वर्णन.

**विनूतन (त्न)** (ವಿನೂತನ [ತ್ನ]) (सं) वि.—नवीन; नूतन; नवपद्धतीचें.

**विनेतृ (ता)** (ವಿನೇತೃ [ತಾ]) (सं) ना.—मार्गदर्शक; नेता; पुढारी; शासक; राजा.

**विनेय** (ವಿನೇಯ) (सं) वि.—नेतां येण्यासारखें; निभावण्यायोग्य सुंदर; नम्र.

**विनोद** (ವಿನೋದ) (क) ना.—आनंद; उत्साह; परिहास; हास्य; कुचेष्टा; कालक्षेप; विलाससंभ्रम; खेळ.

**विनोदवाहनचक्र** (ವಿನೋದವಾಹನಚಕ್ರ) (सं) ना.—आल्हाद-चक्र; फिरत्या झोपाळ्याचें चक्र merry-go-round.

**विनोदि** (ವಿನೋದಿ) (सं) वि.—हसविणारा; विदूषक; गोड्डी;

**विनोदिनि** (ವಿನೋದಿನಿ) (सं) ना.—हास्यप्रिया; विलासिनी; संतोषिणी; हास्यविनोदांत काल कंठणारी.

**विनोदिसु** (ವಿನೋದಿಸು) (क) धा.—संतोषणें; आनंदणें; विलास करणें.

**विंध्य** (ವಿಂಧ್ಯ) (सं) ना.—मध्यभारतीय पर्वत; शिकारी.

**वि (बि) न्नते** (ವಿ [ಬಿ]ನ್ನತೆ) (क) ना.—व्याकुलता; बेभानता.

**वि (बि) न्नाण** (ವಿ [ಬಿ]ನ್ನಾಣ) (क) ना.—विशेष ज्ञान; पांडित्य; मुरका; विलास; संकोच; हावभाव.

**विन्यस्त** (ವಿನ್ಯಸ್ತ) (सं) वि.—ठेवलेलें; रचलेलें; खचित; दिलेलें; स्वाधीन केलेलें.

**विन्यास** (ವಿನ್ಯಾಸ) (सं) ना.—ठेवण; रचना; जोडणी; संग्रह; संकलन; दृश्य; क्रम; अभिनय; हावभाव; आधार; आश्रय वस्तु.

**विपक्ष** (ವಿಪಕ್ಷ) (सं) ना. शत्रुपक्ष; विरोधी दल; हेतुरहितता.

**विपंचि (ची)** (ವಿಪಂಚಿ [ಚೀ]) (सं) ना.—वीणा; खेळ; पडदा.

**विपण (णन)** (ವಿಪಣ [ಣನ]) (सं) ना.—विक्री; विक्रय; विनिमय; दे-घे; देवघेव; व्यापार; व्यवसाय.

**विपणि** (ವಿಪಣಿ) (सं) ना.—दुकानाची ओळ; पेठ; बाजार; मंडई; व्यापार कट्टा.

**विपत्ति** (ವಿಪತ್ತಿ) (सं) ना.—संकट; दुर्दैव; पीडा; कष्ट; दुर्दशा; आपत्ति; अडचण; हरकत.

**विपत्तु (दा)** (ವಿಪತ್ತು [ದಾ]) (सं) ना.—गंडांतर; संकट; पीडा; कष्ट; विपत्ति.

**विपद्** (ವಿಪದ್) (सं) ना.—विपदा; संकट; आपत्ति.

**विपन्न** (ವಿಪನ್ನ) (सं) वि.—दुर्दैवी; कष्टी; पीडित; आपत्तींत सापडलेली.

**विपरीत** (ವಿಪರೀತ) (सं) वि.—पूर्ण विरोधी; अपमानित; अतिरिक्त; अतिशय; मनाला न रुचणारें; उलट; पूर्ण गुंडाळलेलें; मन मानेल तसें.

**विपर्यय (र्याय)** (ವಿಪರ್ಯಯ [ರ್ಯಾಯ]) }
**विपर्यास** (ವಿಪರ್ಯಾಸ) } (सं) ना.—
विपरीत स्थिति; असंगति; विरोध; चूकभूल; अदलाबदल; संकट.

**विपश्चित्** (ವಿಪಶ್ಚಿತ್) (सं) वि.—विद्वान; पंडित; बुद्धिमान.

**विपाक** (ವಿಪಾಕ) (सं) ना.—कर्मफल; परिणामः फल; परिपाक; अडचण; पीडा; दुखणें.

**विपाटन** (ವಿಪಾಟನ) (सं) ना.—भेदन; चीरफाड; मोडतोड.

**विपिन** (ವಿಪಿನ) (सं) ना.—वन; अरण्य; जंगल.

**विपुल** (ವಿಪುಲ) (सं) वि.—अतिशय; पुष्कळ; विशाल; विस्तृत; अगाध; खोल; घन.

**विपुला (ले)** (ವಿಪುಲಾ [ಲೆ]) (सं) ना.—पृथ्वी; भूमी.

**विप्र** (ವಿಪ್ರ) (सं) ना.—ब्राह्मण; भूदेव; पंडित; ज्ञानी; किरण; गवत.

**विप्रकृत** (ವಿಪ್ರಕೃತ) (सं) वि.—अप्रस्तुत; प्रकृत नसलेलें; अडचणीचे; पीडित; अनमानित.

**विप्रकृष्ट** (ವಿಪ್ರಕೃಷ್ಟ) (सं) वि.—फोडलेलें; हिरावून घेतलेलें; हिसकून घेतलेले; ओढून नेलेलें; रुंद; विस्तृत.

**विप्रतिपत्ति** (ವಿಪ್ರತಿಪತ್ತಿ) (सं) ना.—गैरसमज; भ्रम; विरुद्धज्ञान; आक्षेप; विरोध; स्पर्धा; कळवळा; तळमळ; चिंता; भीति.

**विप्रतिषिद्ध** (ವಿಪ್ರತಿಷಿದ್ಧ) (सं) वि.—निषिद्ध; विलंब लावलेली; अतिरिक्त.

**विप्रयुक्त** (ವಿಪ್ರಯುಕ್ತ) (सं) वि.—विरहित; दूर केलेलें; वियोग पावलेलें.

**विप्रयोग** (ವಿಪ್ರಯೋಗ) (सं) ना.—वियोग; विरह; दूरांतरता.

**विप्रलंभ** (ವಿಪ್ರಲಂಭ) (सं) ना.—विरह; वियोग; प्रिय माणसाचें दूर जाणें; प्रियकरांचा विरही शृंगार; भांडण; कपट; ठकवणा.

**विप्रलब्ध** (ವಿಪ್ರಲಬ್ಧ) (सं) वि.—वियुक्त; विरहित; निराश; वंचित; फसविलेले; दुखविलेलें.

**विप्रलाप** (ವಿಪ್ರಲಾಪ) (सं) ना.—व्यर्थ चकाट्या; विफल चर्चा; गप्पा; वांझवार्ता; अतिदुःख.

**विप्लव** (ವಿಪ್ಲವ) (सं) ना.—क्रांती; बदल; प्रलय; नाश; युद्ध; रण; भांडण; स्पर्धा; अहमहमिका; पीडा; उपद्रव; नाव; सांगड; होडी; तरी.

**विफल** (ವಿಫಲ) (सं) वि.—निष्फळ; फलरहित; पोकळ; व्यर्थ; निरुपयुक्त.

**विबुध** (ವಿಬುಧ) (सं) ना.—पंडित; विद्वान्; ज्ञानी; जाणकार; ब्राह्मण; देवता.

**विबोध** (ವಿಬೋಧ) (सं) ना.—ज्ञान; जाणीव; समज; बुद्धि मानता; ज्ञानहीनता; प्रज्ञाहीनता; जाणीवशून्यता.

**विभक्त** (ವಿಭಕ್ತ) (सं) वि.—वाटून दिलेला; वेगवेगळा; फुटीर; वाटणी झालेला.

**विभक्ति** (ವಿಭಕ್ತಿ) (सं) ना.—विभाग; वांटणी; भागाकार; वांटप; नामाचें अन्यशब्दाशीं संबंध दर्शन.

**विभंग** (ವಿಭಂಗ) (सं) ना.—विस्मरण; नाश; विरोध; विघ्न; अभिनय; हावभाव. भावदर्शन.

**विभजन (ना) (ने)** (ವಿಭಜನ [ನಾ] ನೆ) (सं) ना.—पृथक्करण; वाटणी.

**—इसु** (ಇಸು) (क) धा.—पृथक् पृथक् करणें; वेगळें करणें; वांटणी करणें; फोडणें.

**विभव** (ವಿಭವ) (सं) ना.—धनता; श्रेष्ठता; शोभा; शृंगार. वैभव; श्रीमंती; गौरव; एक संवत्सर. द्रव्य; उत्साह.

**विभाकर** (ವಿಭಾಕರ) (सं) ना.—सूर्य; रवि.

**विभाग** (ವಿಭಾಗ) (सं) ना.—अंश; भाग; तुकडा; चूर; वाटणी.

**विभाजक** (ವಿಭಾಜಕ) (सं) वि.—भागणारा; पृथक्करण करणारा; वाटणी करणारा; भूमीतीचें एक उपकरण.

**विभाड** (ವಿಭಾಡ) (सं) वि.—पळविणारा; पराजय करणारा. (सं) ना.—विजय; यश.

**विभात** (ವಿಭಾತ) (सं) ना. प्रभात; पहाट; सकाळ.

**विभाव** (ವಿಭಾವ) (सं) ना.—रसोत्पत्तीचीं आलंबन–उद्दीपनादि कारणें; विरुद्ध भाव; विरोध; पृथक्करण; मित्रविवेक; निर्णय.

**विभावने (न)** (ವಿಭಾವನೆ [ನ]) (सं) ना.—निश्चय; ज्ञान; विवेक; कल्पना.

**विभावरि (री)** (ವಿಭಾವರಿ [ರೀ]) (सं) ना.—रात्र.

**विभावसु** (ವಿಭಾವಸು) (सं) ना.—सूर्य; अग्नि; चंद्र.

**विभास** (ವಿಭಾಸ) (सं) वि.—चकाकणारें; प्रकाशणारें; उगवणारे.

**विभासा (से)** (ವಿಭಾಸಾ [ಸೆ]) (सं) ना.—प्रकाश; शोभा; कांति; उजेड.

**विभिन्न** (ವಿಭಿನ್ನ) (सं) ना.—फुटलेले; चिरलेले; विविध; अनेक तुकडे झालेलें.

**विभीषण** (ವಿಭೀಷಣ) (सं) ना.—फार भयंकर; रावणाचा लहान भाऊ.

**विभु** (ವಿಭು) (क) ना.—स्वामी; यजमान; प्रभु; ब्रह्मा; विष्णु; महेश; राजा.

**विभूति** (ವಿಭೂತಿ) (सं) ना.—भस्म; राख; अतुल ऐश्वर्य; आणिमादि अष्टसिद्धि; अतिमानवशक्ति; महापुरुष पराक्रम; महिमा; गौरव; कल्याण.

**विभूषण** (ವಿಭೂಷಣ) (सं) ना.—अलंकार; आभरण; दागिना; शृंगार.

**विभेद** (ವಿಭೇದ) (सं) ना.—व्यत्यास; पृथक्करण; न्यूनाधिक; दूर करणें.

**विभेदिसु** (ವಿಭೇದಿಸು) (क) ना.—आंत शिरून पाहणें; डोकावणें; समजून घेणें; विलग करणें; तारतम्य दाखविणें.

**विभ्रम** (ವಿಭ್ರಮ) (सं) ना.—भ्रांति; गैरसमज; घाबरेपणा; गोंधळ; भ्रमण; शोभा; आरास; प्रेमचेष्टा; शृंगाराविष्कार.

**विभ्रमण** (ವಿಭ್ರಮಣ) (सं) ना.—भ्रमंति; फिरती; हालचाल; भ्रम; खूळ.

**विभ्रमे** (ವಿಭ್ರಮೆ) (सं) ना.—अत्यासक्ति; खुळेपणा; भ्रांति.

**विभ्राजिसु** (ವಿಭ್ರಾಜಿಸು)(क) धा.—प्रकाशणें; चकाकणें; शोभणें; लकाकणें.

**विभ्रांत** (ವಿಭ್ರಾಂತ) (सं) वि.—गोंधळलेला; भ्रमिष्ट; विस्मित; उत्तेजित; कळवळा उत्पन्न झालेला.

**विभ्रांति** (ವಿಭ್ರಾಂತಿ) (सं) ना.—अतिभ्रांति; बेभानता; 'तल्लण' पहा.

**विमग्न** (ವಿಮಗ್ನ) (सं) वि. – गुंग; तल्लीन; आसक्त; बुडालेला; मग्न.

**विमंडित** (ವಿಮಂಡಿತ) (सं) वि. – उत्तम; अलंकृत; शृंगारित; सजविलेला.

**विमत** (ವಿಮತ) (सं) ना. – अन्यमत; विरोधी अभिप्राय; अन्यजाति.

**विमनस्क** (ವಿಮನಸ್ಕ) (सं) वि. – उद्विग्न; उत्साहहीन; घाबरलेला; भ्रमिष्ट.

**विमनस्सु** (ವಿಮನಸ್ಸು) (सं) वि. – चित्तस्वास्थ्य नसलेलें; मन उडलेला; चळलेला; कळवळा.

**विमर्दन** (ವಿಮರ್ದನ) (सं) ना. – पीडा; घर्षण; गळा दाबणें; मारामारी; भांडण; कलह.

**विमर्श (र्शे)** (ವಿಮರ್ಶ [ರ್ಶೆ]) (सं) ना. – गुणदोष; कसोटी; तौलनिक परीक्षण; पर्यालोचन; परिशीलन; परीक्षा.

**विमर्शक** (ವಿಮರ್ಶಕ) (सं) वि. – परीक्षक; टीकाकार; तुलना करणारा; पर्यालोचक.

**विमल** (ವಿಮಲ) (सं) वि. – स्वच्छ; स्पष्ट; पवित्र; शुद्ध; निर्दोष; निष्कलंक; निर्मल.

**विमातृ** (ವಿಮಾತೃ [ತೆ]) (ते) (सं) ना. – सावत्र आई; दुसरी आई.

**विमान** (ವಿಮಾನ) (सं) ना. – राजगृह; गोपुर; राजवाडा; आकाशयान; अंतराळयान; लिंगायताची प्रेतवाहक तिरडी; अपमान; तिरस्कार.

**विमुक्त** (ವಿಮುಕ್ತ) (सं) ना. मोकळें; सुटलेलें; हिसकावून घेतलेलें.

(सं) ना. – संन्यासी; विरक्त.

**विमुक्ति** (ವಿಮುಕ್ತಿ) (सं) ना. – स्वातंत्र्य; जननमरणांतून सुटका; मोक्ष; विमोचन.

**विमुख** (ವಿಮುಖ) (सं) वि. – तोंड फिरवलेला; दुसरीकडें वळलेला. विरुद्ध; प्रतिकूल; उदासीन.

**विमोचन (ने)** (ವಿಮೋಚನ [ನೆ]) (सं) ना. – सुटका; मोकळीक; संकटमुक्ती; विखरण; हिसकावणी; भिरकटणी.

**वियत्** (ವಿಯತ್) (सं) ना. – आकाश; आभाळ; भानु.

—**चर** (ಚರ) (सं) ना. – पक्षी; आकाशांतून संचरणारे देव; गंधर्व वगैरे.

—**गंगा** (ಗಂಗಾ) (सं) ना. – देवगंगा; आकाशगंगा.

—**मणि** (ಮಣಿ) (सं) ना. – सूर्य; सूर्यकांत मणी.

**वियुक्त** (ವಿಯುಕ್ತ) (सं) वि. – दूर झालेलें; पृथक्करण केलेलें, वेगळे झालेलें.

**वियोग** (ವಿಯೋಗ) (सं) ना. – विरह; अलगता; हानी; मरण.

**वियोगिनि (नी)** (ವಿಯೋಗಿನಿ [ನೀ]) (सं) ना. – नवऱ्यापासून दूर झालेली; विरह पावलेली; विरहिणी.

**विरक्त** (ವಿರಕ್ತ) (सं) वि. – अनासक्त; सुखदुःख समान मानणारा; अतृप्त; उदासीन; संसारावर आसक्ति नसलेला.

(सं) ना. – बैरागी; संन्यासी; यती.

**विरक्ति** (ವಿರಕ್ತಿ) (सं) ना. – वैराग्य; सुखदुःखसमदृष्टि; संसाराविषयीं उदासीनता; अनासक्ति; भाविकता; दैविक चिंतनाची आवड; निरिच्छता.

—**मार्ग** (ಮಾರ್ಗ) (सं) ना. – अध्यात्ममार्ग.

**विरचना (ने)** (ವಿರಚನಾ [ನೆ]) (सं) ना. – मांडणी; आरास; व्यवस्था; थाटमाट; सिद्धता; निर्मिति.

**विरचिसु** (ವಿರಚಿಸು) (क) धा. – चांगली रचना करणें; उत्पन्न करणें; सृजिणें; निर्मिणें.

**विरज** (ವಿರಜ) (सं) वि. – घाण नसलेलें; धूळ नसलेलें; निर्धूल; शुद्ध, ऋतुमती नसलेली; कामादि विकारांत न सांपडलेली.

**विरंच (चि)** (ವಿರಂಚ [ಚಿ]) (सं) ना. – ब्रह्मदेव; प्रजापति.

**विरड** (ವಿರಡ) (सं) वि. – विराट; लोकोत्तर; असाधारण; फार मोठा.

(सं) ना. – शरीर; देह, आकृति.

**विरत** (ವಿರತ) (सं) वि. – शेवटचा; अंत्य; संपलेला; थांबलेला; विलंबित; विश्रांत.

**विरति** (ವಿರತಿ) (सं) ना. – शेवट; अंत; समारोप; तिरस्कार; औदासीन्य; उपेक्षा; निष्काम; हरकत; विश्रांति; वैराग्य; निरिच्छता.

**विरथ** (ವಿರಥ) (सं) ना. – रथहीन; रथ काढून घेतलेला.

**विरल** (ವಿರಲ) (सं) वि. – विरळ; पातळ; फट पडलेलें; दुष्प्राप्य; दुर्लभ; अत्यल्प; थोडका.

**विरस** (ವಿರಸ) (सं) वि. – रूक्ष; नीरस; रस नसलेला; वाळलेला; शुष्क; अर्थहीन; निष्प्रेम; निरुत्साह.

**विरह** (ವಿರಹ) (सं) ना. – वियोग; प्रियजनांचें दूर होणें; मनांतील कालवालव.

—**अग्नि–ताप** (ಅಗ್ನಿ–ತಾಪ) (सं) ना. – प्रियजनवियोगानें होणारी तळमळ.

**विरहि** (ವಿರಹಿ) (सं) वि. – वियोग पावलेले; दूर झालेले; वियुक्त

**विरहिणि (णी)** (ವಿರಹಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना. – प्रियकरापासून दूर झालेली; प्रियकरानें टाकलेली; ताटातूट झालेली; नियोगिनी; परित्यक्ता.

**विरळ** (ವಿರಳ) (सं) वि. – दूरदूर; दुर्लभ; क्वचित मिळणारे; पातळ.

**विराग** (ವಿರಾಗ) (सं) ना. – विरक्ति; वैराग्य; औदासीन्य.

**विरागि** (ವಿರಾಗಿ) (सं) ना. – बैरागी; संन्यासी; उदासी; ऋषी; संसाराविषयीं अनासक्त.

**विराजमान** (ವಿರಾಜಮಾನ) (सं) वि. – प्रकाशणारा; चकाकणारा; क्रांतिमान; शोभिवंत; ब्रह्मदेवाचा एक पुत्र.

**विराजिसु** (ವಿರಾಜಿಸು) (क) धा. – प्रकाशणें; उजेड पडणें; शोभणें सुंदर दिसणें; चकाकणें.

**विराट्** (ವಿರಾಟ್) (सं) वि- – लोकोत्तर; असाधारण; विश्वव्यापी; फार मोठा.

—**पुरुष,–रूप** (ಪುರುಷ,–ರೂಪ) (सं) ना. – परमात्मा.

**विराट** (ವಿರಾಟ) (सं) ना. – मत्स्यदेशाचा राजा.

**विराध** (ವಿರಾಧ) (सं) ना. – रामानें मारलेला एक राक्षस.

**विराम** (ವಿರಾಮ) (सं) ना. – शेवट; अंत; विश्रांती; सुटका; मार्ग; अवकाश; 'तेरपु' पहा.

**विराव** (ವಿರಾವ) (सं) ना. – मोठा आवाज; महाध्वनि; हाकारे; आरोळी; केका; पक्ष्यांचा आवाज.

**विरिंच (चि)** (ವಿರಿಂಚ [ಚಿ]) (सं) ना. – ब्रह्मदेव; कमलासन.

**विरुत** (ವಿರುತ) (सं) वि. – किंकाळी; फोडलेला; ओरडलेला"

**विरुति** (ವಿರುತಿ) (सं) ना. – आक्रोश; आरोळी; आराव; किंकाळी; कलरव; झंकार.

**विरुद्ध** (ವಿರುದ್ಧ) (सं) वि. – विरोधी; प्रतिपक्षीय; प्रतिकूल; विसुख, अवश; स्वाधीन न होणारा.

**विरूप** (ವಿರೂಪ) (सं) वि. – कुरुप; विकृतरूप; अन्यरूप घेतलेला; आकारहीन.

—**अक्ष** (ಅಕ್ಷ (सं) ना. – त्रिनेत्र शिव.

**विरूपि** (ವಿರೂಪಿ) (सं) वि. – कुरूप; विद्रूप; आकारदुष्ट.

**विरेचन** (ವಿರೇಚನ)(सं) ना. – मलविसर्जन; मलशुद्धिकर; सारक.

**विरोचन** (ವಿರೋಚನ) (सं) वि. – चकाकणारा.

(सं) ना. – सूर्य; चंद्र; अग्नि; बळीचा बाप.

**विरोध** (ವಿರೋಧ) (सं) ना. – वैर; भांडण; प्रतिकूलता; नापसंती; खंडन; विघ्न; हरकत.

**विरोधाभास** (ವಿರೋಧಾಭಾಸ) (सं) ना. – विरोध आहे असा भ्रम; श्लेषालंकाराची एक पद्धति.

**विरोधि (धी)** (ವಿರೋಧಿ [ಧೀ]) (सं) ना. – शत्रु; वैरी; भांडणारा; अडकाठी.

**विरोधिसु** (ವಿರೋಧಿಸು) (क) धा. – भांडण करणें; भांडणें; विरोधणें; प्रतिकूल राहणें; विरुद्ध जाणें; हरकत घेणें.

**विर्धु (र्दु)** (ವಿಧುರ್ [ದುರ್]) (क) ना. – ब्रीद; आमंत्रण; बोलवणें; हाक.

**विल** (ವಿಲ) (सं) ना. – बीळ; गुहा; भोक; ढोली.

**विलक्ष** (ವಿಲಕ್ಷ)( (सं) वि. – आश्चर्यकारक; विलक्षण; नवपद्धतीचे; असामान्य; लोकोत्तर; लक्षण नसलेलें.

**विलग** (ವಿಲಗ) (सं) वि. – अपवाद; अपकीर्ती; कष्ट; पीडा; अडचण; गंडांतर; विसंगती; अजोड.

**विलग्न** (ವಿಲಗ್ನ) (सं) वि. – संबंधित; जुळलेलें; जुळविलेलें; बद्ध; बंदिस्त.

**विलंघन** (ವಿಲಂಘನ) (सं) ना. – अतिक्रमण; बहिष्कार; उल्लंघन.

**विलंघिसु** (ವಿಲಂಘಿಸು) (क) ना. – पार होणें; अतिक्रमण करणें; उडून जाणें; 'नेगे' पहा.

**विलंब (बन)** (ವಿಲಂಬ [ಬನ]) (सं) ना. – कालक्षेप; दिरंगाई; धिमेपणा; लांबणीवर पडणें.

**विलंबिसु** (ವಿಲಂಬಿಸು) (क) धा. – सावकाशीनें करणें; काळ काढणें; वाढविणें; त्याग करणें.

**विलय (यन)** (ವಿಲಯ [ಯನ]) (सं) ना. – प्रलय; जगाचा नाश; वितळणी.

**विलस (सन)** (ವಿಲಸ [ಸನ]) (सं) ना. – कांति; शोभा; आरास; मिरवणूक.

**विलसत्** (ವಿಲಸತ್) (सं) वि. – शोभणारें; चकाकणारें; प्रकाशणारें; सुंदर; मनोहर.

**विलसित** (ವಿಲಸಿತ) (सं) वि. – चकाकणारें; लकाकणारें; सुंदर; विचित्र.

(सं) ना. – कांति. विनोद; विलास; क्रीडा; 'चेल्लाट' पहा.

**विलाप** (ವಿಲಾಪ) (सं) ना. – रुदन; एक सुरांत रडणें; एकसुरी रड; मोठ्यानें दिलेली हाक.

**विलास** (ವಿಲಾಸ) (सं) ना. – विनोद; उल्हास; खेळ; क्रीडा; शोभा; आरास; लावण्य; लकाकी; हावभाव; विज्ञान.

**विलासवति** (ವಿಲಾಸವತಿ) (सं) वि. – मुरका मारणारी; अभिनेत्री; मुरडणारी; लाजाळू.

**विलासिनी** (ವಿಲಾಸಿನಿ) (सं) वि. – चैन करणारी; विषय-लोलुप; गुलहौशी.

**विलिप्त** (ವಿಲಿಪ್ತ) (सं) वि. – आसक्त; लेप दिलेलें; झिलई केलेलें; पाणी दिलेलें.

**विलीन** (ವಿಲೀನ) (सं) वि. – एकरूप झालेलें; मिश्रित; समाविष्ट; बुडलेलें; अदृश्य; वितळलेलें.

**विलुप्त** (ವಿಲುಪ್ತ) (सं) वि. – लोपलेलें; दृष्टिआड झालेलें; नाश झालेलें.

**विलुलि (ळि) त** (ವಿಲುಲಿ [ಳಿ]ತ) (सं) वि. – अव्यवस्थित; लोंबत ठेवलेलें; हेलकावे खाणारें; गडगडलेलें; अस्ताव्यस्त.

**विलून** (ವಿಲೂನ) (सं) वि. – कातरलेले; छिनलेले; तुकडे केलेले; कापलेले.

**विलेपन** (ವಿಲೇಪನ) (सं) ना. – लेप; माखणें; थर देणें; उटी; सुगंधी द्रव्य; उटणें; वापर.

**विलेपित** (ವಿಲೇಪಿತ) (सं) वि.–वापरलेलें; गुंतलेलें; लेपलेलें.

**विलोकन** (ವಿಲೋಕನ) (सं) ना.–पाहणी; दृष्टि.

**विलोचन** (ವಿಲೋಚನ) (सं) ना.–डोळा; नेत्र; सूर्य; आकाशनेत्र.

**विलोभन** (ವಿಲೋಭನ) (सं) ना.–आशा; मोहन; फसवणूक; सोंग.

**विलोम** (ವಿಲೋಮ) (सं) वि.–अपमानित; विरुद्ध; विपरीत; प्रतिकूल; टक्कल पडलेला; खल्वाट.
—**संतति** (ಸಂತತಿ) (सं) ना.–उच्चवर्णी स्त्री व हीनयाती पुरुष यांची संतती.

**विलोल** (ವಿಲೋಲ) (सं) वि.–चंचल; हलणारा;हुरळलेला; अत्यानंद झालेला.

**विलोलुप** (ವಿಲೋಲುಪ) (सं) वि.–अत्याशा करणारा; अतिलोभी; अत्यासक्त.

**विवक्षा (क्षे)** (ವಿವಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.–सांगण्याची इच्छा; बोलण्याची इच्छा; उद्देश; भाव; तात्पर्य.

**विवक्षित** (ವಿವಕ್ಷಿತ) (सं) वि.–माहीत असलेला; सांगण्याची अपेक्षा करणारा.

**विवध** (ವಿವಧ) (सं) ना.–पायवाट; पाऊलवाट.

**विवर** (ವಿವರ) (सं) ना.–स्पष्ट कथन; स्पष्टीकरण; फोड; उलगडा; खुलासा; रंध्र; भोक; बीळ; ढोली; दोष; छिद्र; गुहा.

**विवरण (णे)** (ವಿವರಣ [ಣೆ]) (सं) ना.–पेरणी; निरूपण; व्याख्यान.

**विवरिसु** (ವಿವರಿಸು) (क) धा.–विवरण करणें; विवेचिणें; कष्ट करणें; सोडविणें; विशद करणें, फोड करणें.

**विवर्जिसु** (ವಿವರ್ಜಿಸು) (क) धा.–सोडणें; दूर करणें; परित्याग करणें; काढून टाकणें.

**विवर्ण** (ವಿವರ್ಣ) (सं) वि.–विटलेलें; रंग गेलेलें, कळाहीन; तेजरहित; खालच्या वर्णांशी संबंधित.

**विवर्त** (ವಿವರ್ತ) (सं) ना.–परिवर्तन; बदल; नृत्य; माया; पद्धति.

**विवश** (ವಿವಶ) (सं) वि.–परवश; भान हरपलेले, बेभान; पराधीन.

**विवस्वत् (स्वंत)** (ವಿವಸ್ವತ್ [ಸ್ವಂತ]) (सं) ना.–सूर्य; भास्कर; अरुण; अर्काचें झाड; एक कालगणना; एक मनु.

**विवाद** (ವಿವಾದ) (सं) ना.–भांडण; तंटा; शब्दाशब्दी; तर्क; चर्चा.

**विवाल** (ವಿವಾಲ) (सं) ना.–बिडाल; मांजर.

**विवाह** (ವಿವಾಹ) (सं) ना.–लग्न; कल्याण.

**विविक्त** (ವಿವಿಕ್ತ) (सं) वि.–अलग; निर्जन; गुप्त; एका जातीचे.

**विविध** (ವಿವಿಧ) (सं) वि.–अनेक प्रकारचे; कित्येक जातीचे; हरतऱ्हेचे.

**विवेक** (ವಿವೇಕ) (सं) ना.–तोलून पाहण्याची बुद्धि; तारतम्य; गुणदोषपरीक्षणशक्ति; विमर्श; विचार.

**विवेचन (ना) (ने)** (ವಿವೇಚನ [ನಾ] ನೆ) (सं) ना.–गुणदोषविवेक; बऱ्यावाईटाची निवड.

**विशंका (के)** (ವಿಶಂಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–संशय; संदेह; भय; भीति.

**विशद** (ವಿಶದ) (सं) वि.–स्पष्ट; विस्तृत; शुद्ध; स्वच्छ; निर्मल; पांढरें.

**विशल्य** (ವಿಶಲ್ಯ) (सं) वि.–निष्कंटक; अडचण नसलेला.

**विशसन** (ವಿಶಸನ) (सं) ना.–घात; खून; खड्ग; तलवार.

**विशाप** (ವಿಶಾಪ) (सं) ना.–उश्शाप; शापमोचन; त्रासांतून सुटका.

**विशारद** (ವಿಶಾರದ) (सं) वि.–कुशल; चतुर; निपुण; विद्वान; पंडित.

**विशाल** (ವಿಶಾಲ) (सं) वि.–विस्तृत; मोठें; रुंद;

**विशिख** (ವಿಶಿಖ) (सं) ना.–शर; बाण; खल्वाट; शिखा नसलेला.

**विशिष्ट** (ವಿಶಿಷ್ಟ) (सं) वि.–असाधारण; असामान्य; नवीन पद्धतीचा.

**विशिष्टाद्वैत** (ವಿಶಿಷ್ಟಾದ್ವೈತ) (सं) ना.–वैष्णव मत; रामानुज स्थापित मतपंथ.

**विशीर्ण** (ವಿಶೀರ್ಣ) (सं) वि.–वाळलेला; रोड; फुटका; जखमी; नष्ट; खालावलेला; चूर झालेला.

**विशुद्ध** (ವಿಶುದ್ಧ) (सं) वि.–निर्मल; पवित्र; चोख; निष्कलंक.

**विश्रृंखल** (ವಿಶೃಂಖಲ) (सं) वि.–स्वैर; मनाला येईल तसें वागणारा; अनियमित; नियमबद्ध नसलेला.

**विशेष्य** (ವಿಶೇಷ್ಯ) (सं) ना.–आधिक्य; वैपुल्य; वरचढ; स्पर्धा; अहमहमिका; विशेषणाकडून वर्णिलेलें नाम; भेद्य.

**विशेषण** (ವಿಶೇಷಣ) (सं) ना.–नामाचे गुणवर्णन करणारा शब्द; भेदक; अनेकांतून एकाचेंच वर्णन करणारा शब्द.

**विशेषिसु** (ವಿಶೇಷಿಸು) (क) धा.–वैशिष्ट्य दाखवणें; वाढवणें; वर्णन करणें.

**विश्र(श्रा)म** (ವಿಶ್ರ [ಶ್ರಾ] ಮ) (सं) ना.–विश्रांति; विराम; समारोप; अंत; शेवट.

**विश्रांति** (ವಿಶ್ರಾಂತಿ) (सं) ना.–विराम; श्रमपरिहार; सेवानिवृत्ति.

**विश्रुत** (ವಿಶ್ರುತ) (सं) वि.–प्रसिद्ध; नामांकित; कीर्तिमान.

**विश्लथ** (ವಿಶ್ಲಥ) (सं) वि.–सैल; ढिलें; अनिर्बद्ध; सुटलेलें.

**विश्लेषक** (ವಿಶ್ಲೇಷಕ) (सं) ना.–विद्युत्प्रवाही तारेला आधारभूत मातीचें उपकरण.

**विश्लेषण** (ವಿಶ್ಲೇಷಣ) (सं) ना.–पृथक्करण; वियोग; विघटन.

**विश्व** (ವಿಶ್ವ) (सं) ना.–सर्व, सगळें जगत्; संसार; विष्णु.
**विश्वकर्त** (ವಿಶ್ವಕರ್ತ) (सं) ना.–ब्रह्मा; परमेश्वर.
**विश्वकर्म** (ವಿಶ್ವಕರ್ಮ) (सं) ना.–देवशिल्पी; सृष्टिकर्ता; ब्रह्मदेव.
**विश्वकेतु** (ವಿಶ್ವಕೇತು) (सं) ना.–अनिरुद्ध.
**विश्वतः** (ವಿಶ್ವತಃ) (सं) अ.–कोठेंहि; सर्वत्र; दशदिशीं.
**विश्वदेव (नाथ)** (ವಿಶ್ವದೇವ [ನಾಥ]) (सं) ना.–परमात्मा; शिव; विश्वाचा स्वामी.
**विश्वंभर** (ವಿಶ್ವಂಭರ) (सं) ना.–विश्वपालक; विश्वाचा रक्षणकर्ता; विष्णु सर्वसंग्राहक; hold all. प्रवासी बिछाना.
**विश्वंभरा** (ವಿಶ್ವಂಭರಾ) (सं) ना.–जगाचा भार वाहणारी; भूमाता.
**विश्वरूप** (ವಿಶ್ವರೂಪ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण;ईश्वराचें विराट स्वरूप.
**विश्वलोचन** (ವಿಶ್ವಲೋಚನ) (सं) ना.–जगाचा डोळा; सूर्य.
**विश्वसन** (ವಿಶ್ವಸನ) (सं) ना.–विश्वास; श्रद्धा; प्रतिज्ञा; वचन.
**विश्वसनीय** (ವಿಶ್ವಸನೀಯ) (सं) वि.–विश्वास ठेवण्यायोग्य; विश्वसार्ह.
**विश्वसृज** (ವಿಶ್ವಸೃಜ) (सं) ना.–ब्रह्मदेव; विश्व उत्पन्न करणारा; स्रष्टा.
**विश्वस्त** (ವಿಶ್ವಸ್ತ) (सं) वि.–विश्वासु; विश्वास आहे असा; धैर्यशाली; विश्वास ठेवण्यायोग्य.
**विश्वस्ते** (ವಿಶ್ವಸ್ತೆ) (सं) ना.–विधवा; रांडमुंड.
**विश्वानर** (ವಿಶ್ವಾನರ) (सं) ना.–अग्नि; सूर्य.
**विश्वामित्र** (ವಿಶ್ವಾಮಿತ್ರ) (सं) ना.–एक क्षत्रिय मुनी.
**विश्वावसु** (ವಿಶ್ವಾವಸು) (सं) ना.–एक गंधर्व; एक संवत्सर.
**विश्वास** (ವಿಶ್ವಾಸ) (सं) ना.–भरंवसा; श्रद्धा; अभिवचन.
**विश्वेश्वर** (ವಿಶ್ವೇಶ್ವರ) (सं) ना.–जगाचा मालक; परमात्मा; शिव; काशींतील शिवलिंग.
**विष** (ವಿಷ) (सं) ना.–पाणी; गरळ; नंज; कडूपणा; कठोर भाषण; टोचून बोललेला शब्द; टोमणा.
–**कंठ-कंधर** (ಕಂಠ,–ಕಂಧರ) (सं) ना.–शिव; विषप्राशन केलेला.
—**कन्निके** (ಕನ್ನಿಕೆ) (सं) ना.–स्पर्शानें मरण आणणारी स्त्री; चाणक्यानें पर्वतराजाला पाठवलेली कन्या.
**विषण्ण** (ವಿಷಣ್ಣ) (सं) वि.–म्लान; उदासीन; खिन्न; दुःखी.
**विषधर** (ವಿಷಧರ) शिव; सर्प; मेघ.
–**अरि,–अहित** (ಅರಿ,–ಅಹಿತ) (सं) ना.–मोर; गरुड; चंद्र.
**विषपुच्छ** (ವಿಷಪುಚ್ಛ) (सं) ना.–नांगीमधें विषअसलेला; विंचू
**विषभृत** (ವಿಷಭೃತ್) (सं) ना.–मेघ; ढग; सर्प; असभ्य; अरण्य; शिव.
**विषम** (ವಿಷಮ) (सं) वि.–असम; समान नसलेला; त्रासदायक; क्रूर; अक्रमिक; नीतिबाह्य; विरूप.
—**सायक-शर** (ಸಾಯಕ,–ಶರ) (सं) ना.–कामदेव मन्मथ; मदन.
**विषमाक्ष** (ವಿಷಮಾಕ್ಷ) (सं) ना.–शिव; त्रिनेत्र.
**विषय** (ವಿಷಯ) (सं) ना.–विचार; अभिप्राय; वस्तु; गाव; विचाराला कारणीभूत प्रसंग; काम; इंद्रियसुख.
**विषसर्प** (ವಿಷಸರ್ಪ) (सं) ना.–भयंकर विषारी नाग; कालिया.
**विषाण** (ವಿಷಾಣ) (सं) ना.–शिंग; हत्तीचा दांत; डुकराचा सुळा; कोंब.
**विषाद** (ವಿಷಾದ) (सं) ना.–दुःख; निरुत्साह; परिताप; भीति; औदासीन्य; विषप्राशन करणारा; शिव.
**विषूचि (चिका)** (ವಿಷೂಚಿ [ಚಿಕಾ]) (सं) ना.–महामारी; पटकी; कॉलरा.
**विष्कंभ** (ವಿಷ್ಕಂಭ) (सं) ना.–नाटकांतील दोन अंक जोडणारा प्रवेश; अडणा; विघ्न.
**विष्टप** (ವಿಷ್ಟಪ) (सं) ना.–विश्व; लोक; जगत्; संसार; प्रपंच.
**विष्टर** (ವಿಷ್ಟರ) (सं) ना.–गादी; आसन; सिंहासन.
**विष्टरश्रव (वस्)** (ವಿಷ್ಟರಶ್ರವ [ವಸ್]) विष्णु; कृष्ण.
**विष्टे (ष्ठा)** (ವಿಷ್ಟೆ [ಷ್ಠಾ]) (सं) ना.–मल; मैला; शेण; लेंडी.
**विष्णु** (ವಿಷ್ಣು) (सं) ना.–त्रिमूर्तिपैकी एक; सर्वगामी; सर्वसंचारी.
**विष्णुगुप्त** (ವಿಷ್ಣುಗುಪ್ತ) (सं) ना.–चाणक्य; कौटिल्य.
**विष्णुपद** (ವಿಷ್ಣುಪದ) (सं) ना.–आकाश; आभाळ; अंतरिक्ष.
**विष्णुपदी** (ವಿಷ್ಣುಪದೀ) (सं) ना.–विष्णूच्या पायापासून जन्मलेली; गंगा.
**विष्णुवर्धन** (ವಿಷ್ಣುವರ್ಧನ) (सं) ना.–एक सुप्रसिद्ध होयसळ राजा.
**विष्णुश्रवण** (ವಿಷ್ಣುಶ್ರವಣ) (सं) ना.–नक्षत्र; तारका.
**विष्वक्** (ವಿಷ್ವಕ್) (सं) अ.–सर्वत्र; कोठेंहि; पहावें तिकडे; सर्वस्थळीं; दशदिशा; चोहीकडे.
**विष्वक्सेन** (ವಿಷ್ವಕ್ಸೇನ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण;
**वि (बि) स** (ವಿ [ಬಿ] ಸ) (सं) ना.–पाणी; नंज; गरळ.
**विसंचिसु** (ವಿಸಂಚಿಸು) (क) धा.–पूड होणें; निर्बल होणें; अशक्त होणें.
**विसटंबरि** (ವಿಸಟಂಬರಿ) (क) धा.–वाट फुटेल तिकडे पळणें; चौफेर पसरणें; चहूंकडे वाढणें.
**विसंधि** (ವಿಸಂಧಿ) (सं) ना.–विग्रह; विस्कळितपणा; विभक्तता.
**विसप्रसून** (ವಿಸಪ್ರಸೂನ) (सं) ना.–कमल; पाण्यातील फूल; जलपुष्प.

**विसंवाद** (ವಿಸಂವಾದ) (सं) ना.—विसंगत विधान; विग्रह; अमान्यता; चुकीचें बोलणें.

**विसर** (ವಿಸರ) (सं) ना.—रास; गट; समूह; प्रसार; वाढ; रुंदी.

**विसर्ग** (ವಿಸರ್ಗ) (सं) ना.—दान; त्याग; मोक्ष; प्रलय; नाश. विसर्ग संज्ञा (:); संस्कृत स्वरमालेतील अंत्यस्वर.

**विसर्ज (र्जन)** (ವಿಸರ್ಜ [ರ್ಜನ]) (सं) ना.—त्याग; ढकल; बहिष्कार; पाठवणी; उत्सव,-समारंभ; सांगता; दान; देणगी; वर.

**विसर्जिसु** (ವಿಸರ್ಜಿಸು) (क) धा.—त्याग करणें; सोडणें; व्रताची सांगता करणें; दूर करणें; समाराधना घालणें; उद्यापन करणें.

**विसर्प** (ವಿಸರ್ಪ) (सं) ना.—वाढ; प्रसार; पुरोगति.

**विसृत** (ವಿಸೃತ) (सं) वि.—वाढलेले; पुढें आलेले; पसरलेले; रुंदावलेलें.

**विसृति** (ವಿಸೃತಿ) (सं) ना.—वाढ; प्रसार; पुरोगमन.

**विसृमर** (ವಿಸೃಮರ) (सं) वि.—उतू येणारे; उधाणाला आलेले; फेकणारा; झिरपणारा.

**विसृष्ट** (ವಿಸೃಷ್ಟ) (सं) वि.—टाकलेला; प्रेरणा लाभलेला; निर्मिलेला.

**विस्त (स्ता) र** (ವಿಸ್ತ [ಸ್ತಾ] ರ) (सं) ना.—प्रसार; प्रचार; वाढ; विवेचन; अहंकार; विशालता; रुंदी.

**विस्तरण** (ವಿಸ್ತರಣ) (सं) ना.—विस्तार; विवरण; वाढावा; व्याप्ति; वाढीव भाग.

**विस्तीर्ण** (ವಿಸ್ತೀರ್ಣ) (सं) वि.—विशाल; रुंद; वाढविलेला; अघळपघळ; लांबरुंद.

**विस्तृत** (ವಿಸ್ತೃತ) (सं) वि.—पसरलेलें; विस्तरलेलें.

**विस्फार** (ವಿಸ್ಫಾರ) (सं) वि.—स्फुरण पावणारा; कंप पावणारा; फुरफुरणारा; चळणारा; झंकार; धनुष्टंकार.

**विस्फारित** (ವಿಸ್ಫಾರಿತ) (सं) वि.—रुंद; पसरलेलें; वाढलेलें; उघडलेलें.

—**नेत्र** (ನೇತ್ರ) (सं) ना.—उघडा डोळा; शिवनयनाप्रमाणें न मिटणारा.

**विस्फुलिंग** (ವಿಸ್ಫುಲಿಂಗ) (सं) ना.—ठिणगी; एकप्रकारचें विष.

**विस्फोट** (ವಿಸ್ಫೋಟ) (सं) ना.—स्फोट; दारूकाम; फोड; करट; पुळी.

**विस्मय** (ವಿಸ್ಮಯ) (सं) ना.—आश्चर्य; चमत्कार; अचंबा.

**विस्मरण** (ವಿಸ್ಮರಣ) (सं) ना.—विसर; विस्मृति; आठवण जाणें.

**विस्मित** (ವಿಸ್ಮಿತ) (सं) वि.—आश्चर्यचकित; चमत्कारिक; नवलाचे.

**विस्मृति** (ವಿಸ್ಮೃತಿ) (सं) ना.—विस्मरण; विसर.

**विश्रब्ध** (ವಿಶ್ರಬ್ಧ) (सं) वि.—विश्वासाचें; निर्भीक; गुप्त; रहस्यपूर्ण; स्तब्ध; शांत; विनम्र; अवनत; प्रणयकलहाचें.

**विश्रंभ** (ವಿಶ್ರಂಭ) (सं) वि.—विश्वासपूर्ण; गुप्त; शांत; अमर्याद; खोल; प्रणयकलह; विनम्र; स्तब्ध.

**विस्रब्धं** (ವಿಸ್ರಬ್ಧಂ) (सं) अ.—निर्भयपणें; आत्मविश्वासानें.

**विस्रस्त** (ವಿಸ್ರಸ್ತ) (सं) वि.—ढिलें; खालीं घसरलेलें; झडलेले; दुबळें.
(सं) ना.—मित्रा; नपुंसक.

**विह** (ವಿಹ) (सं) ना.—आभाळ; आकाश; सूर्य; वायु; वारा.

**विहग (हंगम)** (ವಿಹಗ [ಹಂಗಮ]) (सं) ना.—आकाशसंचारी; पक्षी; देव; बाण; गंधर्व.

**विहगेंद्र** (ವಿಹಗೇಂದ್ರ) (सं) ना.—गरुड; पक्षिराज;

—**वाहन** (ವಾಹನ) (सं) ना.—विष्णु.

**विहरिसु** (ವಿಹರಿಸು) (क) धा.—विहार करणें; खेळणें; मनोरंजन करणें; भ्रमणें; फिरणें; विनोद करणें; उडणें.

**विहति** (ವಿಹತಿ) (सं) ना.—मार; टोला; पेट; वेग; तीव्रता; विरोध.

**विहाय** (ವಿಹಾಯ) (सं) अ.—सोडून; त्याग करून.

**विहायस (स्)** (ವಿಹಾಯಸ [ಸ್]) (सं) ना.—आकाश आभाळ; पक्षी; सूर्य; वायु.

**विहार** (ವಿಹಾರ) (सं) ना.—संतोष; संचार; खेळ विनोद; उद्यान; उपवन; राजवाडा; बौद्धमठ.

**विहित** (ವಿಹಿತ) (सं) वि.—हितकर; योग्य; सांगितलेले; नेमून; दिलेले; क्रम घातलेला; समजावलेला.

**विहीन** (ವಿಹೀನ) (सं) वि.—पूर्ण नाहीसे झालेले; परित्यक्त; गमावलेला; शिवाय; खेरीज; विना.

**विहृत** (ವಿಹೃತ) (सं) वि.—गमावलेला; काढून टाकलेला.
(सं) ना.—शृंगाराची एक रीत; शृंगारपद्धति.

**विव्हल** (ವಿಹ್ವಲ) (सं) वि.—बेशुद्ध झालेला; दुःखित; घायाळ; अडचणीत पडलेला.

**विव्हले** (ವಿಹ್ವಲೆ) (सं) ना.—बेभान झालेली; दुखिता; व्याकुला.

**विळं (लं) ब** (ವಿಳಂ [ಲಂ] ಬ) (सं) ना.—सावकाशता; उशीर वेळ; निभाव.

**विळय (यन)** (ವಿಳಯ [ಯನ]) (सं) ना.—विलय; वितळणी; मिश्रण; एकरूपता.

**विळास** (ವಿಳಾಸ) (सं) ना.—विलास; चेष्टा; विनोद; शोभा; आरास; पत्ता; सरनामा.

**वीक्षण** (ವೀಕ್ಷಣ) (सं) ना.—दृष्टि; पाहणी; टक; निश्चल दृष्टि.

**वीक्षिसु** (ವೀಕ್ಷಿಸು) (क) धा.—पाहणें; टक लावणें; न्याहाळणें.

**वीचि (ची)** (ವೀಚಿ [ಚೀ]) (सं) ना.—तरंग; लाट; किरण.

**वीचु** (ವೀಚು) (क) धा.—मागें सरणें; मागें पाय घेणें; अदृश्य होणें.

**वीजन** (ವೀಜನ) (सं) ना.—पंखा; व्यजन; वाऱ्याचा झोत.

**वीटि (टी) (टिका)** (ವೀಟಿ [ಟೀ] [ಟಿಕಾ]) (सं) ना.–विडा; तांबूल.

**वीणा (णे)** (ವೀಣಾ[ಣೆ] सं. ना.–एक तंतुवाद्य; रुद्रवीणा.

**वीणापाणि** (ವೀಣಾಪಾಣಿ) (सं) ना.–शारदा; सरस्वती; वीणावती.

**वींटु** (ವೀಂಟು) (क) धा.–फेकणें; भिरकाटणें; उधळणें; हिसकावणें.

**वीत** (ವೀತ) (सं) वि.–त्यक्त; त्यागलेले; सोडलेले; सौजन्यपूर्ण; विनीत; मऊ मनाचा; हळवा; मनपसंत.

**वीतराग** (ವೀತರಾಗ) (सं) ना.–रागद्वेष गेलेला; जिनयोगी.

**वीतिहोत्र** (ವೀತಿಹೋತ್ರ) (सं) ना.–अग्नि.

**वीतिहोत्रि** (ವೀತಿಹೋತ್ರಿ) (सं) ना.–यज्ञीय; अग्निरक्षक.

**वीथि (थी)** (ವೀಥಿ [ಥೀ]) (सं) ना.–गल्ली; बोळ; मार्ग; रस्ता; ओळ; आळी.

**वीप्सा (प्से)** (ವೀಪ್ಸಾ [ಪ್ಸೆ]) (सं) वि.–प्रत्येक; एकेक; संस्था; पाठ.

**वीर** (ವೀರ) (सं) ना.–शौर्य गाजवणारा; पराक्रमी; वीर्यशाली; शूर; नवरसांपैकी एक रस; नट; अग्नि; पुत्र; मिरची; वाळा; यज्ञाग्नि; पति; अश्वत्थ; औदुंबर; विष्णु; वेलु; चिवा.

**—आसन** (ಆಸನ) (सं) ना.–वीराची बैठक; रणरंग; किल्ल्याची चौकी.

**—कंकण** (ಕಂಕಣ) (सं) ना.–शौर्यचिन्ह; पराक्रमाचें कडे.

**वीरण** (ವೀರಣ) (सं) ना.–वाळा; लामंच; उशीर.

**वीरंधर** (ವೀರಂಧರ) (सं) ना.–मोर; पशूशी झुंज.

**वीरश्री** (ವೀರಶ್ರೀ) (सं) ना.–शौर्यलक्ष्मी.

**वीरस्वर्ग** (ವೀರಸ್ವರ್ಗ) (सं) ना.–युद्धमृतांचा स्वर्ग.

**वीरा** (ವೀರಾ) (सं) ना.–वीरपत्नी; वीरमाता; एक सुगंधी द्रव्य; कडक दारू; केळीचें झाड.

**वीरुध (धा)** (ವೀರುಧ[ಧಾ]) (सं) ना.–वाढणारी वेल; शाखा; फांदी; कोंब; झाडाची ढोल.

**वीर्य** (ವೀರ್ಯ) (सं) ना.–शक्ति; पराक्रम; बल; सामर्थ्य; पौरुष; उत्साह; सत्त्व; पीळ; प्रकाश; कांति; परिणाम; रेत; पदवी.

**वीवध** (ವೀವಧ) (सं) ना.–भार; कावड; धान्यसंग्रह; मार्ग; रस्ता.

**वीवधिक** (ವೀವಧಿಕ) (सं) ना.–भारवाही; मजूर; कूली; हेलकरी.

**वीळ (ळे) य** (ವೀಳ[ಳೆ]ಯ) (क) ना.–विडा; तांबूल; पानपट्टी.

**वृक** (ವೃಕ) (सं) ना.–लांडगा; कोल्हा; कावळा.

**वृकोदर** (ವೃಕೋದರ) (सं) ना.–ढेरपोट्या; खादाड; भीम.

**वृक्ष** (ವೃಕ್ಷ) (सं) ना.–झाड; तरु.

**वृक्षवाटिके** (ವೃಕ್ಷವಾಟಿಕೆ) (सं) ना.–झाडी; तरुराजी; वन; मळा; उपवन.

**वृजिन** (ವೃಜಿನ) (सं) ना.–पाप; पापकर्म; दुष्टता; वक्रता; वाकडेपणा; कुरळे; शेंडी; शिखा.

**वृत** (ವೃತ) (सं) ना.–गोल; वेटोळे; गुंडाळी; आवर्त; निवड; आवर.

**वृति** (ವೃತಿ) (सं) ना.–कुंपण; भिंत; आवरण.

**वृत्त** (ವೃತ್ತ) (सं) वि.–गोलाकार; वर्तुळाकार; गोल; होऊन गेलेलें; अचर; स्थिर.
(सं) ना.–समाचार; बातमी; वर्तन; रूढी; संप्रदाय; कार्य; काम; छांदस पदरचना; अन्वयार्थ.

**—रेखक** (ರೇಖಕ) (सं) ना.–वर्तुळ काढण्याचे साधन; कंपास.

**वृत्तांत** (ವೃತ್ತಾಂತ) (सं) ना.–वर्दी; हकीगत; विषय; समाचार; बातमी.

**वृत्ति** (ವೃತ್ತಿ) (सं) ना.–उद्योग; काम; उपजीवनाचा व्यवसाय; पोटाचा धंदा; उपजीवन; वर्तन; रीतभात; व्याख्यान; टिपण; एक काव्य लक्षण; वेतन; पगार; विवरण; रूढी.

**वृत्र** (ವೃತ್ರ) (सं) ना.–देवशत्रु; एक राक्षस.

**—अरि-रिपु** (ಅರಿ–ರಿಪು) (सं) ना.–देवेंद्र.

**वृथा** (ವೃಥಾ) (सं) अ.–व्यर्थ; फुकट; निष्फळ; बेकार

**वृद्ध** (ವೃದ್ಧ) (सं) वि.–वाढलेला; म्हातारा; जुना; अधिक.

**वृद्धश्रव (वस्)** (ವೃದ್ಧಶ್ರವ [ವಸ್]) (सं) ना.–इंद्र; सुरेंद्र.

**वृद्धाप्य** (ವೃದ್ಧಾಪ್ಯ) (सं) ना.–म्हातारपण; जुनेपण; वृद्धावस्था.

**वृद्धि** (ವೃದ್ಧಿ) (सं) ना.–वाढ; वाढावा; आधिक्य; उन्नति; वरचढ; लाभ; प्राप्ति; व्याज; प्रस्तावना; कीर्ति; ऐश्वर्य; कातरण; सुहेर; मोडतोड; ऋद्धि; एकसंधि.

**वृंत** (ವೃಂತ) (सं) ना.–देठ; धाट; बोंड.

**वृंताक** (ವೃಂತಾಕ) (सं) ना.–वांगें; काटे असलेले फळ.

**वृंद** (ವೃಂದ) (सं) ना.–समूह; रास; ढीग; एकूण.

**वृंदारक** (ವೃಂದಾರಕ) (सं) ना.–देवता; मेघ; ढग; झाड; वृक्ष; गज; हत्ती; अभिवृद्धि; प्रगति; अधिकता.

**वृंदा** (ವೃಂದಾ) (सं) ना.–तुळस; एक गोपस्त्री; गोपी.

**वृंदावन** (ವೃಂದಾವನ) (सं) ना.–मथुरेजवळील एक क्षेत्र; तुळशीबाग; सन्याशाचे समाधिस्थळ.

**वृंदे** (ವೃಂದೆ) (सं) ना.–तुळस; जलंधराची पत्नी.

**वृश्चिक** (ವೃಶ್ಚಿಕ) (सं) ना.–विंचु; कृत्तिका नक्षत्र; एक सौरमास. एक राशी.

**वृष** (ವೃಷ) (सं) ना.–वळु; बैल; पाडा; नंदी; धर्मराज; देवेंद्र.

**वृषकेतु** (ವೃಷಕೇತು) (सं) ना.—कर्णाचा मुलगा; शिव. ज्याचे ध्वजावर बैल आहे असा.

**वृषभ** (ವೃಷಭ) (सं) ना.—पाडा; नंदी; वळू; बैल; पहिला तीर्थंकर; वृषभदेव; ज्ञानी; श्रेष्ठ; एक सौरमास; एका राशीचे नांव.

—**ध्वज-वाहन** (ಧ್ವಜ-ವಾಹನ) (सं) ना.—शंकर; नंदीवर बसणारा.

**वृषल** (ವೃಷಲ) (सं) ना.—शूद्र; सेवाजीवी; नोकर.

**वृषली** (ವೃಷಲಿ) (सं) ना.—शूद्रस्त्री.

**वृषाकपि** (ವೃಷಾಕಪಿ) (सं) ना.—सूर्य; अग्नि; विष्णु; परमेश्वर; तलवार.

**वृषांक** (ವೃಷಾಂಕ) (सं) ना.—वृषध्वज; शिव; परमेश्वर.

**वृष्टि** (ವೃಷ್ಟಿ) (सं) ना.—वर्षाव; पाऊसधार.

**वृष्णि** (ವೃಷ್ಣಿ) (सं) ना.—यदुवंशीय राजा; किरण; पत्ता.

**वे (बे) कस** (ವೆ [ಬೆ] ಕ್ಕಸ) (क) ना.—उत्साह; असंतोष; अतृप्ति.

(क) वि.—कठीण; क्रूर; ओबडधोबड; अतिशय.

—**बेरगागु** (ಬೆರಗಾಗು) (क) धा.—स्तिमित होणें; चकित होणें; आश्चर्य वाटणें.

**वेग्गळ** (ವೆಗ್ಗಳ) (क) ना.—अभिवृद्धि; वाद; आधिक्य; श्रेष्ठता; प्रमुखता; भावोद्दीपन; मोठेपणा.

**वेग्गळिसु** (ವೆಗ್ಗಳಿಸು) (क) धा.—उल्लंघणें; अतिक्रमणें; पुरेसें होणें; प्रबल होणें, वाढणें.

**वेच्च** (ವೆಚ್ಚ) (क) ना.—खर्च; व्यय.

**वेच्चिसु** (ವೆಚ್ಚಿಸು) (क) ना.—व्यय करणें; भाग करून देणें; वाटा देणें.

**वेज्ज** (ವೆಜ್ಜ) (क) ना.—भोक; वेध; वेज; रंध्र.

**वेट्ट** (ವೆಟ್ಟ) (क) ना.—पर्वत; वन; रान; अरण्य.

**वेट्टे** (ವೆಟ್ಟೆ) (क) ना.—उष्णता; ऊब; ऊन्ह; खडबडीतपणा.

**वेड्डयिसु** (ವೆಡ್ಡಯಿಸು) (क) धा.—गुंडाळणें; वेढा देणें; घेरणें; हल्ला करणें; ठार करणें.

**वेंटणिसु** (ವೆಂಟಣಿಸು) (क) धा.—गुंडाळणें; आवरणें; घेरणें; वेढणें; वाढणें.

**वेरं** (ವೆರಂ) (क) अ.—खरोखर; नीटपणें; स्पष्टपणें; निश्चयपूर्वक.

**वे (बे) सन** (ವೆ [ಬೆ] ಸನ) (क) ना.—व्यसन; व्याकुलता; दुःख; आसक्ति; खोड; वाईट संवय; आज्ञा; परवानगी.

**वेग** (ವೇಗ) (सं) ना.—त्वरा; गडबड; आवेश; दडपण; जबरदस्ती; शीघ्रता.

**वेगायिल** (ವೇಗಾಯಿಲ) (क) वि.—अतिवेगवान; शीघ्रगतिक.

**वेगाळु** (ವೇಗಾಳು) (क) ना.—पादचारी; पायिक; जासूद.

**वेडयिसु** (ವೇಡಯಿಸು) (क) ना.—आवरणें; वेढा देणें; घेरा देणें; जुळवून घेणें.

**वेडिके** (ವೇಡಿಕೆ) (क) ना.—मनोरंजन; विनोद; मागणी; हावभाव; शोभा; विलास; खेळ; क्रीडा. 'बिन्नाण' पहा.

**वेडे (डेय) (ढेय)** (ವೇಡೆ [ಡೆಯ] ಢೆಯ) (क) ना.—आवरण; वेष्टण; गुंडाळी; वेढा; घेरा. आवार; कुंपण; वर्तुळांत उभे केलेले घोडे.

—**कोळु** (ಕೊಳು) (क) धा.—गुंडाळणें; वेढणें; आवरणें.

**वेणि (णी)** (ವೇಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—डोक्याचे केस; जटा; केशपाश; बुचडा; प्रवाह; नदी; वेणी.

**वेणीसंहार** (ವೇಣೀಸಂಹಾರ) (सं) ना.—वेणीबंधन; एक संस्कृत नाटक.

**वेणु** (ವೇಣು) (सं) ना.—वेळू; चिवा; मुरली; पावा.

**वेणुगोपाल** (ವೇಣುಗೋಪಾಲ) (सं) ना.—कृष्ण.

**वेतंड** (ವೇತಂಡ) (सं) ना.—गज; हत्ती. मतंग.

**वेतन** (ವೇತನ) (सं) ना.—पगार; मजुरी. साह्यधन.

**वेतस** (ವೇತಸ) (सं) ना.—वेत; वेळु; चिवा.

**वेतार (ळ)** (ವೇತಾರ [ಳ]) (सं) ना.—महाभूत; पिशाच; द्वारपालक.

**वेत्त (त्ता) (तृ)** (ವೇತ್ತ [ತ್ತಾ] [ತೃ]) (सं) ना.—ज्ञानी, विद्वान; जाणता.

**वेत्र** (ವೇತ್ರ) (सं) ना.—वेत; चिवा; सोटा; बडगा; दंड.

**वेत्रधर (—पाणि)** (ವೇತ್ರಧರ [ಪಾಣಿ]) (सं) ना.—पहारेकरी; द्वारपालक; दंडधर.

**वेत्रवति** (ವೇತ್ರವತಿ) (सं) ना.—स्त्री पहारेकरी; राणीवशांतील पहारेकरी; दासी.

**वेत्रासन** (ವೇತ್ರಾಸನ) (सं) ना.—खुर्ची; वेताची खुर्ची.

**वेद** (ವೇದ) (सं) ना.—ज्ञान; ज्ञान रहस्य; ऋक्; यजु; साम; अथर्व हे चार वेद.

**वेदगर्भ** (ವೇದಗರ್ಭ) (सं) ना.—ब्रह्मदेव.

**वेदना (ने)** (ವೇದನಾ [ನೆ]) (सं) ना.—ज्ञान; समज; जाणीव; दुखणें; चिंता; संकट; पीडा.

**वेदबाहिर** (ವೇದಬಾಹಿರ) (सं) ना.—वेदमार्गाला सोडून असलेला पंथ; (जैन; बौद्ध; चार्वाक; इ.)

**वेदव्यास** (ವೇದವ್ಯಾಸ) (सं) ना.—पराशर मुनीचा पुत्र; १८ पुराणांचा लेखक.

**वेदांग** (ವೇದಾಂಗ) (सं) ना.—वेदसाहाय्यक शास्त्र; (शिक्षा; कल्प; निरुक्त; व्याकरण; जोतिष; छंद) ही षट्शास्त्रें.

**वेदांत** (ವೇದಾಂತ) (सं) ना.—वेदवाङ्मयाचा शेवटचा भाग; वेदांचा अंत्यभाग.

**वेदि (दिके)** (ವೇದಿ [ದಿಕೆ]) (सं) वि. – जाणता; समजदार. (सं) ना. – जाणकार; ज्ञानी; गुरु; स्वामी; सभास्थानातील उच्चासन; चावडी.

**वेदिसु** (ವೇದಿಸು) (क) धा. – निवेदन करणें; माहितीदेणें; विनंति करणें; समजावून सांगणें.

**वेदी** (ವೇದೀ) (सं) ना. – सभास्थानातील उच्चासन; पशूना बळी देण्याचे उंच ठिकाण; उंबरठा; घरापुढील चावडी.

**वेदिसु** (ವೇದಿಸು) (क) धा. – निवेदन करणें; विनंति करणें; सजवून सांगणें.

**वेदे** (ವೇದೆ) (क) ना. – टोचल्याचें दुःख; चिंताविषय; एकाच विषयाकडे लागलेला लय; मग्नता.

**वेद्य** (ವೇದ್ಯ) (सं) वि. – समजण्यास योग्य; समजलेले; समजण्यांत येणारे; अनुभवाला आलेले.

**वेध** (ವೇಧ) (सं) ना. – भोक; रंध्र; टोचणी; ध्यानाचे आकर्षण; ग्रहणाचा वेध; पूर्वीचा समय.

**—गृह** (ಗೃಹ) (सं) ना. – ग्रहांचा वेध घेण्याचे घर; वेधशाळा.

**वेधस्** (ವೇಧಸ್) (सं) ना. – ब्रह्मा; प्रजापति.

**वेधि** (ವೇಧಿ) (सं) वि. – टोचणारे; जखम करणारे; अचूक बाण मारणारा; विंधणारा; तिरंदाज; नेमबाज.

**वेपथु** (ವೇಪಥು) (सं) ना. – कंपन; थरथर; कंप; आंदोलन.

**वेम** (ವೇಮ) (सं) ना. – माग; एक आंध्र कवि.

**वेमारु** (ವೇಮಾರು) (सं) ना. – विस्मरण; विस्मृति; विसराळुपणा; वंचना.

**वेला (ले)** (ವೇಲಾ [ಲೆ]) (सं) ना. – वेळ; काळ; समय; प्रहर; संदर्भ; भरती-ओहोटीची सीमा; समुद्राची मर्यादा; सागरतीर.

**वेल्लित** (ವೇಲ್ಲಿತ) (सं) वि. – गुंडाळलेले; वक्र; वाकडे; वाकलेले; कंपित; थरथरणारे.

**वेश** (ವೇಶ) (सं) ना. – प्रवेश; गमन; वासस्थळ; बदललेले रूप; वेष; सोंग; पोषाख; वस्त्रप्रावरण; दरवाजा; द्वार. 'बीडु' पहा.

**वेश्म** (ವೇಶ್ಮ) (सं) ना. – वसति; निवास; घर; राहण्याचे ठिकाण.

**वेष** (ವೇಷ) (सं) ना. – पोषाख; सोंग; अलंकार; ठक; वंचना बहाणा.

**वेष्ट(ष्ट)न** (ವೇಷ್ಟ [ಷ್ಟನ]) (सं) ना. – आवरण; पांघरूण; मुस्कट; आड; लेप; रुमाल; बासन.

**वेष्टित** (ವೇಷ್ಟಿತ) (सं) वि. – वेष्टिलेले; आवरलेले; पांघरूण घातलेले; झाकलेले; कपडे घातलेले.

**वेष्टिसु** (ವೇಷ್ಟಿಸು) (क) धा. – आभरण गुंडाळणें; गराडा घालणें; वेढा देणें.

**वेसर** (ವೇಸರ) (सं) ना. – खेचर; मिश्रजातीय गाढव.

**वेळे** (ವೇಳೆ) (सं) ना. – समय; काळ; वेळ; संदर्भ; सागरतीर.

**वेळ्कुं** (ವೇಳ್ಕುಂ) (क) अ. – 'योग्य' या अर्थी अव्यय. (क) क्रि. – पाहिजे.

**वैकर्तन** (ವೈಕರ್ತನ) (सं) ना. – विकर्तनाचा पुत्र; सूर्याचा मुलगा; कर्ण.

**वैकल्पिक** (ವೈಕಲ್ಪಿಕ) (सं) वि. – संशयवादी; विकल्पवादी; अनुमानाला जागा देणारें. ऐच्छिक; इच्छाधीन.

**वैकल्य** (ವೈಕಲ್ಯ) (सं) ना. – विफलता; अडीअडचण; न्यूनता; कलंक. दोष; कळवळा; चिंता; तळमळ.

**वैकुंठ** (ವೈಕುಂಠ) (सं) ना. – विष्णुलोक.

**—यात्रे** (ಯಾತ್ರೆ) (सं) ना. – मरण; मृत्यु; वैकुंठीगमन.

**वैखरि** (ವೈಖರಿ) (सं) ना. – शोभा; आरास; चांगुलपणा; वक्तृत्व; अर्थानुसार शब्दयोजना.

**वैखानस** (ವೈಖಾನಸ) (सं) ना. – कंदमुळावर उपजीवन करणें; वानप्रस्थाश्रम; एक ऋषि; तपस्वी; एक वैष्णव पंथ.

**वैचक्षण्य** (ವೈಚಕ್ಷಣ್ಯ) (सं) ना. – जाणतेपणा; श्रेष्ठबुद्धि; समयसूचकता; सूचणूक; सूक्ष्मदृष्टि; निपुणता.

**वैचित्य** (ವೈಚಿತ್ಯ) (सं) ना. – चलबिचल; गोंधळ; गडबड.

**वैचित्र्य** (ವೈಚಿತ್ರ್ಯ) (सं) ना. – विस्मय; आश्चर्य; हरतऱ्हा; परोपरी; अनेक रीति; विविधता.

**वैजयंत** (ವೈಜಯಂತ) (सं) ना. – इंद्राचा राजवाडा; ध्वज; निशाण; बावटा; इंद्राचा ध्वज; अंबोली रंगाची फुलमाळ.

**वैजयंति** (ವೈಜಯಂತಿ) (सं) ना. – तुळशीमाळ; विष्णुकंठांतील माला; गेरूच्या रंगाची फुलमाळ.

**वैज्ञानिक** (ವೈಜ್ಞಾನಿಕ) (सं) ना. – भौतिक शास्त्रज्ञ; विज्ञानी; विज्ञानपंडित.

**वैडूर्य** (ವೈಡೂರ್ಯ) (सं) ना. – एक रत्न.

**वैणविक** (ವೈಣವಿಕ) (सं) ना. – वीणावादक.

**वैणिक** (ವೈಣಿಕ) (सं) ना. – वीणा वाजवणारा.

**वैतरणि (णी)** (ವೈತರಣಿ [ಣೀ] (सं) ना. – यमलोकीची एक नदी.

**वैतालिक** (ವೈತಾಲಿಕ) (सं) ना. – भाट; स्तुतिपाठक; 'भट्टंगी' पहा.

**वैदग्ध्य** (ವೈದಗ್ಧ್ಯ) (सं) ना. – विदग्धपणा; पांडित्य; जाणतेपणा; विद्वत्ता.

**वैदर्भि (र्भी)** (ವೈದರ್ಭಿ [ರ್ಭೀ]) (सं) ना. – विदर्भराजाची मुलगी दमयंती; रुक्मिणी; एक काव्यशैली.

**वैदिक** (ವೈದಿಕ) (सं) ना. – वेद जाणणारा; पुरोहित; कर्मकांड-निपुण.

**वैदुष्य** (ವೈದುಷ್ಯ) (सं) ना. – बुद्धिमानता; विद्वत्स्थिति.

**वैदेशिक** (ವೈದೇಶಿಕ) (सं) वि.–विदेशाचा; परदेशी.

**वैदेहि (ही)** (ವೈದೇಹಿ [ಹೀ]) (सं) ना.–विदेहराजकन्या; जानकी; सीता.

**वैद्य** (ವೈದ್ಯ) (सं) ना.–रोगचिकित्सा करणारा; नाडीपरीक्षक; 'वेज्ज' पहा.

**वैद्युत** (ವೈದ್ಯುತ) (सं) वि–विजेसंबंधी.

**वैधव्य** (ವೈಧವ್ಯ) (सं) ना.–विधवेचें जीवन; रांडपण.

**वैनतेय** (ವೈನತೇಯ) (सं) ना.–विनतादेवीचा पुत्र; गरूड.

**वैपरीत्य** (ವೈಪರೀತ್ಯ) (सं) ना.–प्रतिकूलता; विरोध; विरुद्धपणा; उलटपलट; विपरीतपणा.

**वैभव** (ವೈಭವ) (सं) ना.–शोभा; आरास; घनता; मोठेपणा; ऐश्वर्य.

**वैमनस्य** (ವೈಮನಸ್ಯ) (सं) ना.–विरोधी भाव; वैर; मनस्ताप; चिंता; दुःख.

**वैमानिक** (ವೈಮಾನಿಕ) (सं) ना.–विमान चालविणारा.

**वैयाकरणि** (ವೈಯಾಕರಣಿ) (सं) ना.–व्याकरणशास्त्रज्ञ.

**वैयात्य** (ವೈಯಾತ್ಯ)(सं) ना.–दांडगाई; आडदांडपणा; हुंबपणा.

**वैयालि** (ವೈಯಾಳಿ) (सं) ना.–घोड्यावरून रपेट; घोडेस्वार; डौल; शोभा; ऐट; विजृंभण.

**वैर** (ವೈರ) (सं) ना.–शत्रुत्व; भांडखोरपणा; सूड; मात्सर्य.

**वैरस्य** (ವೈರಸ್ಯ) (सं) ना.–विरसता; नीरसपणा; रसहीनत्त्व; निष्प्रेम; संकट; दुखणें.

**वैराग्य** (ವೈರಾಗ್ಯ) (सं) ना.–सुख विलासाचा कंटाळा; संसारविषयी अनासक्ति; संन्यासवृत्ति; लौकिक गोष्टीसंबंधीं अप्रीति.

**वैराण** (ವೈರಾಣ) (सं) ना.–वाळवंट; निर्जन प्रदेश; मरुभूमि.

**वैरि** (ವೈರಿ) (सं) ना.–शत्रु; विरोधक; भांडखोर.

**वैरोचन** (ವೈರೋಚನ)(सं) ना.–विरोचनाचा मुलगा; बळीराजा

**वैलक्षण्य** (ವೈಲಕ್ಷಣ್ಯ) (सं) ना.–विलक्षणपणा; विचित्रता; नवपद्धति.

**वैवर्ण्य** (ವೈವರ್ಣ್ಯ) (सं) ना.–रंग जाणें; विवर्णता; विटणें; फिकेपणा; जातिबिघाड; सुरत प्रतिक्रिया; सात्त्विकता.

**वैवस्वत** (ವೈವಸ್ವತ) (सं) ना.–एक मनु; युगपुरुष; शनिग्रह; यम.

**वैवाहिक** (ವೈವಾಹಿಕ) (सं) वि.–विवाहासंबंधीं.

**वैशंपायन** (ವೈಶಂಪಾಯನ) (सं) ना.–कृष्णयजुर्वेदलेखक; पुंडलीक; मित्र.

**वैशाख** (ವೈಶಾಖ) (सं) ना.–उन्हाळा; उकाडा; उन्हाळ्याचे दिवस; एक चांद्रमास.

**वैशिष्ट्य** (ವೈಶಿಷ್ಟ್ಯ) (सं) ना.–विलक्षणपणा; विशेषता; आधिक्य.

**वैश्य** (ವೈಶ್ಯ) (सं) ना.–तृतीयवर्णी; व्यापारी.

**वैश्रवसु** (ವೈಶ್ರವಸು) (सं) ना.–विश्रवसूचा मुलगा; कुबेर; रावण.

**वैश्वानर** (ವೈಶ್ವಾನರ) (सं) ना.–अग्नि; आग; निखारा.

**वैषम्य** (ವೈಷಮ್ಯ) (सं) ना.–कमीअधिक; अपमान; अप्रीती; संकट; अन्याय; असाम्य.

**वैष्णव** (ವೈಷ್ಣವ) (सं) वि.–विष्णुभक्त; विष्णूसंबंधी.

**वैशिक** (ವೈಶಿಕ) (सं) ना.–ठक; फसवणूक; वंचना; लबाडी.

**वैहासिक** (ವೈಹಾಸಿಕ) (सं) ना.–विदूषक; गुड्डी; हास्यनट; थट्टेखोर; टोचून बोलणारा.

**वैहालि** (ವೈಹಾಳಿ) (सं) ना.–घोडेस्वार; घोड्यांची ओळ.

**वोल् (वॊल)** (ವೊಲ್ [ವೊಲು]) (क) अ.–असेंच म्हणून; जोडणी किंवा जुळणी याअर्थी अव्यय; जोडून; जुळवून.

**व्यक्त** (ವ್ಯಕ್ತ) (सं) वि.–निश्चल; प्रगट; ज्ञात; दिसणारे.

**व्यक्ति** (ವ್ಯಕ್ತಿ) (सं) ना.–समाजाचा घटक; मनुष्य; सूचना; स्पष्ट दर्शन; उठून दिसणें.

**व्यक्तित्व** (ವ್ಯಕ್ತಿತ್ವ) (सं) ना.–मनुष्यत्त्व; माणुसकी; मानवता; स्वतःचा गुण; विशेषत्व.

**व्यग्र** (ವ್ಯಗ್ರ) (सं) वि.–खिन्न, दुःखित, चित्तस्वास्थ्य नसलेला गोंधळलेला; कळवळा आलेला; उद्विग्न; असक्त.

**व्यंग** (ವ್ಯಂಗ) (सं.) वि. अवयव हीन. अडी अडचणीचा; विद्रूप; कुरूप.

**व्यंग्य** (ವ್ಯಂಗ್ಯ) (सं) ना.–वाच्यार्थापेक्षा वेगळा अर्थ; वक्रोक्ति; परिहास; विडंबन; दुरुत्तर; वाकडे बोलणें; टोमणा.

**व्यंग्यचित्र** (ವ್ಯಂಗಚಿತ್ರ) (सं) ना. विडंबक चित्र; हास्यचित्र; उपहास प्रतिमा.

**व्यजन** (ವ್ಯಜನ) (सं) ना.–पंखा; वारा घेण्याचे साधन. 'वीजन' पहा.

**व्यंजक** (ವ್ಯಂಜಕ) (सं) वि.–भावसूचक; खोचक अर्थ सांगणारा; व्यक्तविणारा.

**व्यंजन** (ವ್ಯಂಜನ) (सं) ना.–अपूर्णोच्चारी अक्षर; तोंडी लावणें; चटणी लोणचे वगैरे सारखे तिखट पदार्थ; स्पष्टीकरण.

**व्यंजित** (ವ್ಯಂಜಿತ) (सं) वि.–स्पष्ट; व्यक्त; डोळ्याला दिसणारे.

**व्यति** (ವ್ಯತಿ) (सं) वि.–अन्य; दुसरें; दूरचे.

**व्यतिकर** (ವ್ಯತಿಕರ) (सं) ना.–समूह; गट; मिश्रण; प्रसंग; संदर्भ; संबंध; विघ्न; विरोध; संकट; विपत्ति.

**व्यतिक्रम** (ವ್ಯತಿಕ್ರಮ) ( सं) ना.–उल्लंघन; तिरस्कार; दुर्लक्ष; गंडांतर; आपत्ति; संकट; पालट.

**व्यतिरिक्त** (ವ್ಯತಿರಿಕ್ತ) (सं) वि.–बाहेर; शिवाय; विरुद्ध; वेगळे; विलंबित; मर्यादातीत.

**व्यतिरेक** (ವ್ಯತಿರೇಕ) (सं) ना. – एक अलंकार; मर्यादातिक्रम; उल्लंघन; व्यत्यास; वैशिष्ट्य; अभाव.

**व्यतीत** (ವ್ಯತೀತ) (सं) वि. – गमावलेला; गति लाभलेला; मागे पडलेला.

**व्यत्यय** (ವ್ಯತ್ಯಯ) (सं) ना. – हरकत; विघ्न; विरोध; बदल; अन्य व्यवस्था; अडथळा.

**व्यत्यस्त** (ವ್ಯತ್ಯಸ್ತ) (सं) वि. – विरुद्ध; बदललेला; मागेपुढें झालेला.

**व्यत्यास** (ವ್ಯತ್ಯಾಸ) (सं) ना. – कमीअधिकपणा; अंतर; साद्दश्यहीनता; उलटापालट

**व्यथा (थे)** (ವ್ಯಥಾ [ಥೆ]) (सं) ना. – दुःख; कळकळ; तळमळ; चिंता; कळ; दुखणे; घात. 'वेदे' पहा.

**व्यथित** (ವ್ಯಥಿತ) (सं) वि. – दुःखित; कळवळलेला; पीडित; संकटग्रस्त.

**व्यधिकरण** (ವ್ಯಧಿಕರಣ) (सं) ना. – दुसरा आधार असलेला; विशेष्य.

**व्यंतर** (ವ್ಯಂತರ) (सं) ना. – पिशाच; भूत; वेताळ.

**व्यपगत** (ವ್ಯಪಗತ) (सं) वि. – गमावलेले; नाहीसें झालेले; नष्ट.

**व्यपदेश** (ವ್ಯಪದೇಶ) (सं) ना. – बहाणा; निमित्त; कारण; आव; आडनांव.

**व्यपाय** (ವ್ಯಪಾಯ) (सं) ना. – अंत्य; शेवट; समारोप; मरण; मृत्यु.

**व्यपेत** (ವ್ಯಪೇತ) (सं) ना. – विरुद्ध; अपमानित; झडलेले; गमावलेले; नाहीसे झालेले; विरहित; प्रतिकूल.

**व्यभिचार** (ವ್ಯಭಿಚಾರ) (सं) ना. – नीतिबाह्य संबंध; जारकर्म; संबंध नसलेल्याशी ठेवलेला संबंध. 'हादर' पहा.

**व्यभिचारिणी** (ವ್ಯಭಿಚಾರಿಣಿ) (सं) ना. – दुर्वर्तिनी; जारिणी.

**व्यय** (ವ್ಯಯ) (सं) ना. – खर्च; नाश; न्यून; पालट; नष्टता.

**व्यर्थ** (ವ್ಯರ್ಥ) (सं) वि. – अर्थहीन; प्रयोजनहीन; निष्फळ; नष्ट; कामाला न येणारा.

**व्यर्थालाप** (ವ್ಯರ್ಥಾಲಾಪ) (सं) ना. – कोरड्या गप्पा; पोकळ बडबड; अप्रासंगिक वटवट.

**व्यलीक** (ವ್ಯಲೀಕ) (सं) ना. – अयोग्य काम; अकृत्य; वंचना; कपट; दुखणें; पीडा.

**व्यवकलन** (ವ್ಯವಕಲನ) (सं) ना. – नुकसान; हानी; घालवणे; गमावणे; बनावट.

**व्यवधान** (ವ್ಯವಧಾನ) (सं) ना. – अवकाश; विराम; हरकत; बाधा; विरोध; संदर्भ; प्रसंग; झाकण; पांघरूण.

**व्यवसाय** (ವ್ಯವಸಾಯ) (सं) ना. – शेती; कृषि; शेतकाम; परिश्रम; उद्योग; वृत्ति; उत्साह; हुरूप.

**व्यवस्था** (ವ್ಯವಸ್ಥಾ) (स) ना. – मांडणी; क्रमबद्धता; सुस्थिति; नेटकेपणा; निर्णय.

**व्यवस्थित** (ವ್ಯವಸ್ಥಿತ) (सं) वि. – क्रमसिद्ध; ओळीत लावलेला; मांडलेलें.

**व्यवहरण** (ವ್ಯವಹರಣ) (सं) ना. – व्यवहार; उद्योग; वर्तन; आचारविचार; विनिमय; देवघेव; रूढी; वापर.

**व्यवहरिसु** (ವ್ಯವಹರಿಸು) (क) धा. – आचरणें; वागणें; जीवनांत उतरवणें.

**व्यवहार** (ವ್ಯವಹಾರ) (सं) ना. – व्यापार; उद्योग; काम; संप्रदाय; देवघेव; प्रद्धति; रूढी; भांडण; व्याजकर्म.

**व्यवहारि** (ವ್ಯವಹಾರಿ) (सं) वि. – व्यापारी; कार्यकुशल; लौकिक काम करणारा.

**व्यवहित** (ವ್ಯವಹಿತ) (सं) वि. – झाकून ठेवलेला; न दिसलेला; गुप्त; निक्षिप्त.

**व्यष्टि** (ವ್ಯಷ್ಟಿ) (सं) ना. – व्यक्ति; एक; एकत्त्व.

**व्यसन** (ವ್ಯಸನ) (सं) ना. – रूढी; जाळें; मग्नता; संकट; चिंता; दुःख; हानी; अहित; अकल्याण.

**व्यसनि** (ವ್ಯಸನಿ) (सं) वि. – अत्यासक्त; दुर्वर्तनी; दुःखी.

**व्यस्त** (ವ್ಯಸ್ತ) (सं) वि. – अपमानित; दुःखित; विस्कळित; गोंधळलेला; व्याप्त; प्रसृत; विविध; नियमबाह्य; सम (गणित) च्या विरुद्ध.

**व्याकरण** (ವ್ಯಾಕರಣ) (सं) ना. – भाषेचे नियमन करणारे शास्त्र.

**व्याकीर्ण** (ವ್ಯಾಕೀರ್ಣ) (सं) वि. – विखरित; अव्यवस्थित; विस्कळित; प्रसृत.

**व्याकुल** (ವ್ಯಾಕುಲ) (सं) वि. – चिंतामग्न; आतुर; दुःखित.

**व्याकुलते** (ವ್ಯಾಕುಲತೆ) (क) ना. – चिंता; दुःख; आतुरता; तळमळ; गोंधळ; संकट; बेभानता.

**व्याकुलित** (ವ್ಯಾಕುಲಿತ) (सं) वि. – चिंतित; कळवळा आलेला.

**व्याख्यात** (ವ್ಯಾಖ್ಯಾತ) (सं) ना. – वक्ता; उपन्यासकार.

**व्याख्यान** (ವ್ಯಾಖ್ಯಾನ) (सं) ना. – उपन्यास; वक्तृत्त्व; टीका; भाष्य.

**व्याख्ये** (ವ್ಯಾಖ್ಯೆ) (सं) ना. – भाष्य; टीका; विवरण; सूत्रात्मक विधान; निःसंदिग्ध विधान; थोडक्यात स्पष्टार्थता.

**व्याघात** (ವ್ಯಾಘಾತ) (सं) ना. – पेट; मार; प्रतिकूल निर्बंध; हरकत.

**व्याघ्र** (ವ್ಯಾಘ್ರ) (सं) ना. – वाघ; श्रेष्ठ; थोर.

**व्याघ्री** (ವ್ಯಾಘ್ರೀ) (सं) ना. – वाघीण; वाघमादी.

**व्याज** (ವ್ಯಾಜ) (सं) ना. – कारण; प्रसंग; संदर्भ; स्मरण; निमित्तकारण; लबाडी; वंचना; असत्य; खोटेपण.

**व्याड (ळ)** (ವ್ಯಾಡ [ಳ]) (सं) ना. – सर्प; सर्पासारखा मनुष्य; दुष्टस्वभावी.

व्याध (ವ್ಯಾಧ) (सं) ना.—किरात; शिकारी; पारधी; वेरड.
व्याधि (ವ್ಯಾಧಿ) (सं) ना.—रोग; कंटाळा; अस्वस्थता.
—ग्रस्त (ಗ್ರಸ್ತ) (सं) ना.—रुग्ण; रोगी; आजारी.
व्यान (ವ್ಯಾನ) (सं) ना.—पंचप्राणातील एक वायु.
व्यापक (ವ್ಯಾಪಕ) (सं) वि.—विस्तृत; विशाल; भरलेला; व्यापणारा; वाढणारा.
व्यापन (ವ್ಯಾಪನ) (सं) ना.—व्याप्ति; प्रसार; विशालता; विस्तार.
व्यापादन (ವ್ಯಾಪಾದನ) (सं) खून करण्याची क्रिया; हिंसा; खून; घात.
व्यापादित (ವ್ಯಾಪಾದಿತ) (सं) वि.—ठार केलेला; जखमी; हिंसित.
व्यापार (ವ್ಯಾಪಾರ) (सं) ना.—चळवळ; क्रिया; देववेव; विनिमय.
व्यापारि (ವ್ಯಾಪಾರಿ) (सं) ना.—क्रियाशील; देवघेव करणारा व्यापारधंदा करणारा.
व्यापिसु (ವ್ಯಾಪಿಸು) (क) धा.—भरणें; पसरणें; वाढणें; रुंद करणें; विशाल होणें.
व्याप्त (ವ್ಯಾಪ್ತ) (सं) वि.—वाढलेला; पसरलेला; विशाल; विस्तृत.
व्याप्ति (ವ್ಯಾಪ್ತಿ) (सं) ना.—भरती; विस्तार; वाढ; व्याप.
व्याबद्ध (ವ್ಯಾಬದ್ಧ) (सं) वि.—बांधलेलें; आवळलेलें; पुरलेलें.
व्याम (ವ್ಯಾಮ) (सं) ना.—वाव; चार हाताचे माप; 'एक पुरुष' प्रमाण.
व्यामोह (ವ್ಯಾಮೋಹ) (सं) ना.—आसक्ति; अतिलोभ; विमोह; गोंधळ; संकट.
व्यायाम (ವ್ಯಾಯಾಮ) (सं) ना.—शरीरश्रम; मेहनत; शक्तिसाधना; देहकमावणी.
व्याल (ळ) (ವ್ಯಾಲ [ಳ]) (सं) ना.—साप; हिंस्रपशु; श्वापद; नीच; वंचक; माजलेला हत्ती.
—माल (ಮಾಲ) (सं) ना.—शंकर; शिव.
—शायि (ಶಾಯಿ) (सं) ना.—विष्णु; शेषशयन.
व्यालोल (ವ್ಯಾಲೋಲ) (सं) वि.—हलणारा; झोंके खाणारा.
व्यावहारिक (ವ್ಯಾವಹಾರಿಕ) (सं) वि.—व्यवहारासंबंधी; लौकिक.
व्यास (ವ್ಯಾಸ) (सं) ना.—महाभारतकार; पुराणलेखक एक मुनी; रचना; योजना.
व्यासपीठ (ವ್ಯಾಸಪೀಠ) (सं) ना.—गादी; उच्चस्थान; टेकडी; आसन.
व्याससमापक (ವ್ಯಾಸಮಾಪಕ) (सं) ना.—कैवार; सारख्या ढोकाचे; भाग पाडणारे उपकरण; गुण्या; गुणा.
व्यासंग (ವ್ಯಾಸಂಗ) (सं) ना.—उद्योग; अभ्यास; रूढी; प्रयत्न.
व्युत्क्रम (ವ್ಯುತ್ಕ್ರಮ) (सं) ना.—क्रमविरुद्ध; उलटाक्रम; अतिक्रमण; उल्लंघन; क्रमभंग.
व्युत्पत्ति (ವ್ಯುತ್ಪತ್ತಿ) (सं) ना.—जन्म; शब्दाचे मूळ; समजूत; ज्ञान.
व्युत्पन्न (ವ್ಯುತ್ಪನ್ನ) (सं) ना.—उत्पन्न झालेले; प्रचलित; वापरातील.
—मति (ಮತಿ) (सं) ना.—बुद्धिमान; ज्ञानी; विद्वान; प्रतिभाशाली.
व्युदास (ವ್ಯುದಾಸ) (सं) ना. हिणकस; फेक; त्याग; बहिष्कार.
व्युष्टि (ವ್ಯುಷ್ಟಿ) (सं) ना.—अभिवृद्धि; वाढ; आधिक्य; परिणाम.
व्यूढ (ವ್ಯೂಢ) (सं) वि.—पसरलेले; फुगलेले; रुंदावलेले; विस्तृत.
व्यूह (ವ್ಯೂಹ) (सं) ना.—रचना; युक्ति; योजना; सैना; सैन्य रचना; सेना रचनेची युद्धपद्धति.
व्योम (ವ್ಯೋಮ) (सं) ना.—आकाश; गगन; आभाळ; सूर्य.
व्योमकेश (ವ್ಯೋಮಕೇಶ) (सं) ना.—शंकर; परमेश्वर.
योमगंगा(गे) (ವ್ಯೋಮಗಂಗಾ [ಗೆ]) (सं) ना.—आकाशगंगा; तारकसरिता; स्वर्धुनि.
व्योममार्ग (ವ್ಯೋಮಮಾರ್ಗ) (सं) ना.—आकाशमार्ग; नक्षत्रमार्ग.
व्रज (ವ್ರಜ) (सं) ना.—समूह; कळप; जागळ; टोळी; गोकुळ; हट्ट; मार्ग; वाट; मथुरेजवळील एक प्रांत
व्रण (ವ್ರಣ) (सं) ना.—फोड; करट.
व्रत (ವ್ರತ) (सं) ना.—नियमन; साचा; नियम; शासन; विधि; यज्ञ; भक्ति; तपश्चर्या; पुण्य साधन; पूजा; 'नोंपि' पहा.
व्रतति (ವ್ರತತಿ) (सं) ना.—प्रसार; विस्तार; रुंदी; वेली; लता.
व्रतस्थ (ವ್ರತಸ್ಥ)(सं) वि.—व्रत घेतलेला; नियमाप्रमाणें चालणारा; धर्मनिष्ठ; आचारशील.
व्रति (ವ್ರತಿ) (सं) वि.—नियमाचे पालन करणारा; संन्यासी; यती.
व्राजक (ವ್ರಾಜಕ) (सं) ना.—सन्यासी; भिक्षु; महंत; संचार करणारा संन्यासी.
व्रात (ವ್ರಾತ) (सं) ना.—वाढता संघ; मजूर; श्रमिक; रोजंदारी करणारा. किरकोळ नोकरी. रोज मजूरी.
व्रातीन (ವ್ರಾತೀನ) (सं) ना.—रोज मजुरीवर जगणारा; श्रम करून खाणारा; मजूर. श्रमिक.
व्रात्य (ವ್ರಾತ್ಯ) (सं) ना.—संस्कारहीन. शूद्र; नीच मनुष्य.
व्रात्यस्तोम (ವ್ರಾತ್ಯಸ್ತೋಮ) (सं) ना.—बहिष्कृताच्या शुद्धिकरणाचा संस्कार; एक यज्ञ.

व्रीडित (ವ್ರೀಡಿತ) (सं) वि.–अपमानित; लज्जित. निर्लज्ज.
व्रीहि (ವ್ರೀಹಿ) (सं) ना.–तांदूळ; भात; गहूं.

—आगार (ಆಗಾರ) (सं) ना.–कोठार; अंबार; कणगा.
व्रीडा (डे) (ವ್ರೀಡಾ [ಡೆ]) (सं) ना.–लज्जा; लाज. विनयशीलता.

## श

श (ಶ) (सं) ना.–अवर्गीय व्यंजन मालेतील पाचवें व्यंजन.
शः (ಶಃ) (सं) अ.–नामापुढे येणारा अव्ययकारी प्रत्यय.
(सं) ना.–विनाशक; शिव; एक शत्रु.
शं (ಶಂ) (सं) ना.–सुख; संतोष.
शंस (सन) (सने) (ಶಂಸ [ಸನ] [ಸನೆ]) (सं) ना.–प्रशंसा; स्तुति; कीर्ति कथन; आशीर्वाद.
शंसा (से) (ಶಂಸಾ [ಸೆ]) (सं) ना.–स्तुति; कीर्तन; प्रशस्ति.
शंसित (ಶಂಸಿತ) (सं) वि.–प्रशंसित; गौरवित; कीर्तित.
शंसि (ಶಂಸಿ) (सं) वि.–प्रशंसक; कथक; भविष्यवादी; समजून देणारा.
शक (ಶಕ) (सं) ना.–एक राजवंश; एक देश; एक समाज.
—अरि (ಅರಿ) (सं) ना.–विक्रमादित्य.
—अब्द (ಅಬ್ದ) (सं) ना.–शकवर्ष.
—कर्ता (ಕರ್ತಾ)(सं) ना.–शककालगणनेस प्रारंभ करणारा.
शकट (ಶಕಟ) (सं) ना.–गाडी; रथ; एक राक्षस.
शकटिका (ಶಕಟಿಕಾ) (सं) ना. खेळातील गाडी.
शकल (ಶಕಲ) (सं) ना.–तुकडा; भाग; चूर; साल; फोलपट; कवच; शिंपला; करटी.
शकुन (ಶಕುನ) (सं) ना.–बऱ्यावाईटाची सूचना; शकुंत पक्षी पांढरा पक्षी.
शकुनि (ಶಕುನಿ) (सं) कौरवांचा मामा; चिमणी; गिधाड; पक्षी; पतंग; वावडी; अहितचिंतक; दुरालोचक.
शकुंत (तक) (ಶಕುಂತ [ತಕ]) (सं) ना.–पक्षिविशेष; शकुन पक्षी.
शकुंतला (ಶಕುಂತಲಾ) (सं) ना.–दुष्यंतपत्नी; भरताची माता.
शकृत् (त्तु) (ಶಕೃತ್ [ತ್ತು]) (सं) ना.–शेण; मल; पुरीष.
शक्त (ಶಕ್ತ) (सं) वि.–बलिष्ठ; सामर्थ्यवान; साहसी; दक्ष; जाणता.
शक्ति (ಶಕ್ತಿ) (सं) ना.–बल; सामर्थ्य; शौर्य; दुर्गादेवी; बर्ची; वीट.
शक्तित्रय (ಶಕ್ತಿತ್ರಯ) (सं) ना.–प्रभुशक्ति मंत्रशक्ति उत्साहशक्ति यांचे त्रिकूट; वाच्य, व्यंग्य व लक्षणा अशा तीन शब्दशक्ति.
शक्तिधर (पाणि) (ಶಕ್ತಿಧರ [ಪಾಣಿ]) (सं) ना.–स्कंद; षण्मुख; कार्तिकेय.

शक्य (ಶಕ್ಯ) (सं) वि.–साध्य; होण्यासारखे; शब्दाचा स्वाभाविक अर्थ.
शक्र (ಶಕ್ರ) (सं) ना.–इंद्र; घुबड; अर्जुनवृक्ष; ज्येष्ठा नक्षत्र.
शक्रगोप (ಶಕ್ರಗೋಪ) (सं) ना.–इंद्रगोप; गांडूळ; पावसाळी किडा; वर्षाकृमि.
शक्रचाप (ಶಕ್ರಚಾಪ) (सं) ना.–इंद्रचाप; इंद्रधनुष्य; मदनबाण.
शक्रसुत (ಶಕ್ರಸುತ) (सं) ना.–जयंत; अर्जुन; वाली; इंद्राचा मुलगा.
शंकर (ಶಂಕರ) (सं) ना.–सुख देणारा; शिव; परमेश्वर.
शंकरि (री) (ಶಂಕರಿ [ರೀ]) (सं) ना.–पार्वती; दुर्गा; सुख देणारी.
शंका (के) (ಶಂಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–संशय; संदेह; अनुमान; भीति; पूर्वपक्ष; आक्षेप.
शंकित (ಶಂಕಿತ) (सं) वि.–संशयित; संदिग्ध.
शंकिसु (ಶಂಕಿಸು) (क) धा.–संशय घेणें; संदेह बाळगणें; भिणें; घाबरणें.
शंकु (ಶಂಕು) (सं) ना.–कोनशिला; कडी; खुंटी; म्यान; बाण; बर्ची; शंकासुराचे झाड; अंकुर; मोड.
—आकृति (ಆಕೃತಿ) (सं) ना.–गोपुराकृति; निमुळती होत जाणारी आकृति.
—शिखर (ಶಿಖರ) (सं) ना.–गोपुराचें शिखर; मास भाजण्याची अंकडी.
शंख (ಶಂಖ) (सं) ना.–कुबेराचा एक निधी; विष्णूच्या हातातील एक आयुध; फुंकून वाजण्याचें वाद्य; गालाचें हाड; शुभ्र वर्ण.
—ध्वनि,–वाद्य (ಧ್ವನಿ,–ವಾದ್ಯ) (सं) ना.–शंख फुंकणें; बोंब; आरोळी.
शंखपाल (ಶಂಖಪಾಲ) (सं) ना.–सर्पराज; कालिया.
शंखपाषाण (ಶಂಖಪಾಷಾಣ) (सं) ना.–एक कडू पदार्थ; शखजिरे; संगजिरे.
शंखिनि (ಶಂಖಿನಿ) (सं) ना.–चौथ्या प्रकारची स्वरूपसुंदर स्त्री; असंस्कृत स्त्री.
शचि (ची) (ಶಚಿ [ಚೀ]) (सं) ना.–इंद्रपत्नी; इंद्राणी.
—पति (ಪತಿ) (सं) ना.–इंद्र.
शठ (ಶಠ) (सं) वि.–नीच; उद्धट; फसव्या; ठक.

(सं) ना.—अविवेक; धूर्त; लोह; केशर; फसवणूक; धोतरा; मध्यस्थ. दवणा; दलाल.

**शण** (ಶಣ) (सं) ना.—सनक; ताग; अंबाडी; वाक.

**शंड (ढ)** (ಶಂಡ [ಢ]) (सं) ना.—नपूंसक; पौरुषहीन; बैल; पोळ; समूह; शिबिर; वसती; घर; बीड.

**शत** (ಶತ) (सं) ना.—शंभर; पुष्कळ; शें; शेंकडा.

**शतक** (ಶತಕ) (सं) वि.—शेकडा; शतसंख्या; शंभर; शत पद्यांचे काव्य.

**शतकुंभ** (ಶತಕುಂಭ) (सं)—सुवर्णमेरु; सोने सापडणारा पर्वत.

**शतकोटि** (ಶತಕೋಟಿ) (सं) ना.—अनंत; माणिक; वज्र.

**शतक्रतु** (ಶತಕ್ರತು) (सं) ना.—शंभर यज्ञ करणारा; इंद्र.

**शतघ्नी** (ಶತಘ್ನೀ) (सं) ना.—शेकडोंना ठार करणारे अस्त्र; तोफ.

**शततारका** (ಶತತಾರಕಾ) (सं) ना.—एका नक्षत्राचे नाव; २४ वे नक्षत्र.

**शतदल** (ಶತದಲ) (सं) ना.—शंभर पाकळ्यांचे कमळ; गुलाब.

**शतद्रु** (ಶತದ್ರು) (सं) ना.—सतलज नदी.

**शतधार** (ಶತಧಾರ) (सं) ना.—वीज; इंद्राचें वज्र.

**शतधृति** (ಶತಧೃತಿ) (सं) ना.—इंद्र; ब्रह्मदेव; स्वर्ग.

**शतपत्र** (ಶತಪತ್ರ) (सं) ना.—शतदल कमळ; गुलाब. मोर; बकपक्षी; पोपट.

**शतपत्रलोचन** (ಶತಪತ್ರಲೋಚನ) (सं) ना.—कमलनयन विष्णु; शिव.

**शतपत्रलोचने** (ಶತಪತ್ರಲೋಚನೆ) (सं) ना.—कमलाक्षी; कामिनी; सुंदरी.

**शतपद** (ಶತಪದ) (सं) ना.—शतपावली.

**शतपदि** (ಶತಪದಿ) (सं) ना.—शंभरपाय असणारा प्राणी; गोम. 'बेट्टिबेनक' पहा.

**शतपर्व** (ಶತಪರ್ವ) (सं) ना.—बांबू; चिवा; अश्विनी पूर्णिमा; दूर्वा; वीज.

**शतभिष (षा)** (ಶತಭಿಷ [ಷಾ]) (सं) ना.—शततारका; २४ वे नक्षत्र.

**शतमख** (ಶತಮಖ) (सं) ना.—शतक्रतु; इंद्र.

**शतमन्यु** (ಶತಮನ್ಯು) (सं) ना.—इंद्र.

**शतमान** (ಶತಮಾನ) (सं) ना.—शंभरांची गणती; शेकड्यांचा हिशोब; शतवर्षांचा काळ.

**शतांग** (ಶತಾಂಗ) (सं) ना.—रथ.

**शतानंद** (ಶತಾನಂದ) (सं) ना.—ब्रह्मा; विष्णु; विष्णूचा रथ. अहिल्या-गौतमांचा पुत्र. शतानंदक ऋषि.

**शतायु** (ಶತಾಯು) (सं) ना.—शंभर वर्षे आयुष्य लाभलेला; दीर्घायु; चिरंजीवि.

**शत्रु** (ಶತ್ರು) (सं) ना.—विरोधी; वैरी.

**शत्रुघ्न** (ಶತ್ರುಘ್ನ) (सं) ना.—शत्रूंचा नाश करणारा; रामाचा भाऊ; दशरथ पुत्र.

**शनि** (ಶನಿ) (सं) ना.—एक ग्रह; एकवार; मंद; सूर्य आणि छाया; यांचा पुत्र.

**शनीश्वर** (ಶನೀಶ್ವರ) / **शनैश्चर** (ಶನೈಶ್ಚರ) (सं) ना.—मंदगामी; शनिग्रह.

**शंतनु** (ಶಂತನು) (सं) ना.—चंद्रवंशीय राजा; भीष्मपिता.

**शपथ** (ಶಪಥ) (सं) ना.—प्रतिज्ञा; पंथ; पण; जिद्द; शाप.

**शपन** (ಶಪನ) (सं) ना.—निंदा; शिवीगाळ; पंथ; प्रतिज्ञा.

**शपिसु** (ಶಪಿಸು) (क) धा.—शाप देणें; शिवी देणें; अहित चिंतिणें.

**शफ** (ಶಫ) (सं) ना.—खुराचे गेळ; खुरपुट. 'गोरसु' पहा.

**शफरि (री)** (ಶಫರಿ [ರೀ]) (सं) ना.—एका जातीचा मासा.

**शबर** (ಶಬರ) (सं) ना.—भिल्ल; व्याध; शिकारी; किरात; पाणी; शिकार.

—**शंकर** (ಶಂಕರ) (सं) ना.—भिल्ल वेषधारी शंकर.

**शबरि** (ಶಬರಿ) (सं) ना.—भिल्लीण; एक हरीण; रामाच्या अनुग्रहाला पात्र झालेली शबरी.

**शबल** (ಶಬಲ) (सं) वि.—चित्रविचित्र; रंगीबेरंगी; विभिन्न रंगाचे.

**शबलि (ली)** (ಶಬಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—कामधेनु; सुरभी; देवलोकीची गाय.

**शब्द** (ಶಬ್ದ) (सं) ना.—भाषा; पद; ध्वनि; अर्थबोधक अक्षर समूह; आवाज; चाहूल.

—**अनुशासन** (ಅನುಶಾಸನ) (सं) ना.—कन्नड व्याकरण शास्त्र; शब्दाचे नियमन करणारे शास्त्र.

—**अर्थ** (ಅರ್ಥ) (सं) ना.—भाषारहस्य; मथितार्थ; तात्पर्य.

—**अलंकार** (ಅಲಂಕಾರ) (सं) ना.—ललित शब्द प्रयोग.

—**बलव-ज्ञ** (ಬಲ್ಲವ-ಜ್ಞ) (सं) ना.—वादकुशल शब्दशास्त्री.

—**प्रधान** (ಪ್ರಧಾನ) (सं) ना.—वेद; आज्ञा; प्रभुसंमित साहित्य.

—**ब्रह्म** (ಬ್ರಹ್ಮ) (सं) ना.—वेद; वेदज्ञानी.

—**मंजरि** (ಮಂಜರಿ) (सं) ना.—अर्थकोश; शब्दसमूह.

—**शास्त्र** (ಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना.—व्याकरण; भाषाशास्त्र.

**शम** (ಶಮ) (सं) ना.—आत्मसंयम; मनोनिग्रह; इंद्रियदमन; शांति; विराम.

**शमन** (ಶಮನ) (सं) ना.—समाधान; शांतता; यम; मोकळीक समारोप; शेवट.

शमि (मी) (ಶಮಿ [ಮೀ]) (सं) वि.–सहनशील; शांत; आत्मसंयमी.

शमिसु (ಶಮಿಸು) (क) धा.–शांत होणें; मन आवरणें; समाधान पावणें; संयम राखणें.

शंपा (पे) (ಶಂಪಾ [ಪೆ]) (सं) ना.–वीज; विद्युत्.

शंब (ಶಂಬ) (सं) ना.–इंद्राचें वज्र; वीज; जहाज;

शंबर (ಶಂಬರ) (सं) ना.–एक राक्षस; पाणी; मेघ; ढग.

शंबरारि (ಶಂಬರಾರಿ) (सं) ना.–शंबराचा वध करणारा राम; मन्मथ; कामदेव.

शंबुक (ಶಂಬುಕ) (सं) ना.–शूद्र; तपस्वी.

शंबूक (ಶಂಬೂಕ) (सं) ना.–कालव; गांडूळ; काडू; लहान बेडूक.

शंभु (ಶಂಭು) (सं) ना.–ब्रह्मदेव; विष्णु; शिव.

शय (ಶಯ) (सं) ना.–निद्रा; अभिप्राय.

शयन (ಶಯನ) (सं) ना.–अंथरूण; पलंग; वामकुक्षी; विश्रांति; झोप; निद्रा.

शय्यनीय (ಶಯ್ಯನೀಯ) (सं) वि.–झोपण्यास योग्य; अंथरूण; पलंग; तल्प; शय्या.

शय्या (य्ये) (ಶಯ್ಯಾ [ಯೆ]) (सं) ना.–अंथरूण; पलंग; झोप; निद्रा.

शय्यागृह (ಶಯ್ಯಾಗೃಹ) (सं) ना.–निद्रास्थळ; झोपण्याची खोली; शयनमंदिर.

शय्यावल (ಶಯ್ಯಾವಲ) (सं) ना.–शय्यागृह सजवणारा; शयनगृहाचा अधिकारी; कंचुकी.

शर (ಶರ) (सं) ना.–एक प्रकारचें गवत; बाण; सायक; पाणी.

शरकोष (ಶರಕೋಷ) (सं) ना.–भाता; तुणीर; बाणसंग्रह.

शरजन्म (ಶರಜನ್ಮ) (सं) ना.–स्कंद; षण्मुख स्वामी; शरवनांत जन्मलेला; कार्तिकेय.

शरण (ಶರಣ) (सं) ना.–आश्रय; आधार; संरक्षण; घर; वसती; पालक; रक्षक; शिवाचा भक्त; शैवसाधु.

शरणागत (ಶರಣಾಗತ) (सं) वि.–आश्रयार्थी; तोंड वेंगाडणारा; पराभूत; अगतिक.

शरणागति (ಶರಣಾಗತಿ) (सं) ना.–आश्रयाची मागणी; आधीनता; पराभवाची कबूली.

शरणार्थि (ಶರಣಾರ್ಥಿ) (सं) ना.–आश्रय मागणारा; आश्रयेच्छु लवून वाकून येणारा; वंदन.

शरणु (ಶರಣು) (क) ना.–नमस्कार; आधार; आश्रय.

शरण्य (ಶರಣ್ಯ) (सं) ना.–शरण जाण्यास योग्य. आश्रय देण्यालायक. संरक्षण देण्यास समर्थ; घर.

शरणे (ಶರಣೆ) (सं) ना.–वीरशैव साध्वी; शरणम्मा; शिवभक्तीण.

शरत् (द्) (ಶರತ್ [ದ್]) (सं) ना.–शरदृतु; वर्षाकाळातील शेवट.

—इंदु (ಇಂದು) (सं) ना.–शारदीय चंद्र; शरदातील चंद्र.

शरधि (ಶರಧಿ) (सं) ना.–बाणसमूह; भाता; समुद्र.

—शयन (ಶಯನ) (सं) ना.–विष्णु; क्षीरसागरी झोपणारा.

—सुते (ता) (ಸುತೆ [ತಾ]) (सं) ना.–लक्ष्मी; समुद्रकन्या.

शरनिधि (ಶರನಿಧಿ) (सं) ना.–शरधि; भाता; समुद्र.

शरपंजर (ಶರಪಂಜರ) (सं) ना.–वि.–बाणाची शय्या.

शरपुंख (खे) (ಶರಪುಂಖ [ಖೆ]) (सं) ना.–बाणाचा पिंजरा; पंख असलेला बाण.

शरभ (ಶರಭ) (सं) ना.–आठ पायांचा सिंहापेक्षा बलिष्ठ पुराणोक्त प्राणी. वीरभद्राचा अवतार.

शरषट्पदि (ಶರಷಟ್ಪದಿ) (सं) ना.–षटपद्याचा अष्ट मात्रिक छंद; चौदा मात्रांची ओळ असणारा षट्पदीछंद.

शरसंधान (ಶರಸಂಧಾನ) (सं) ना.–बाणप्रयोग; तिरंदाजी; बाणफेक.

शरसंन्यास (ಶರಸಂನ್ಯಾಸ) (सं) ना.–शस्त्रत्याग; युद्ध न करण्याची शपथ.

शरारि (ಶರಾರಿ) (सं) ना.–शरकूट पक्षी; झाडपाला व गवत खाणारा पक्षी.

शरासन (ಶರಾಸನ) (सं) ना.–भाता; शरकोष; शरधि.

शरासार (ಶರಾಸಾರ) (सं) ना.–शरवृष्टि; बाणांचा पाऊस; बाणांचा भडिमार.

शरीर (ಶರೀರ) (सं) ना.–देह; काया; वस्तूचे स्थूल स्वरूप.

शरीरज (ಶರೀರಜ) (सं) ना.–देहापासून उत्पन्न झालेला; काम; मदन.

शरीरसंबंध (ಶರೀರಸಂಬಂಧ) (सं) ना.–आप्तपणा; नाते; विवाह; सुरति; सुरत.

शरीरि (ಶರೀರಿ) (सं) ना.–देही; आत्मा; जीव.

शरौघ (ಶರೌಘ) (सं) ना. बाणराशी; बाणांचा ओघ.

शर्करा (र) (ಶರ್ಕರಾ [ರ]) (सं) ना.–साखर; पिठीसाखर; भुरा; चिनी लिसा.

शर्करावर्त (ಶರ್ಕರಾವರ್ತ) (सं) ना.–वावटळ; धुळीचा स्तंभ. वातचक्र.

शर्ध (ಶರ್ಧ) (सं) ना.–सेना; पदाति; पायदळ; शक्ति.

शर्म (ಶರ್ಮ) (सं) ना. ब्राह्मण नावांना लागलेला विद्वत्तादर्शक शब्द; सुख संतोष; आधार; आश्रय.

शर्मिष्ठे (ಶರ್ಮಿಷ್ಠೆ) (सं) ना.–ययाति राजाची धर्मपत्नी.

शर्व (ಶರ್ವ) (सं) ना.–शिव; परमेश्वर.

शर्वरि (री) (ಶರ್ವರಿ [ರೀ]) (सं) ना.–रात्र, रजनी.

—पति (ಪತಿ) (सं) ना.–चंद्र.

**शर्वाणि (णी)** (ಶರ್ವಾಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—पार्वती; शिवपत्नी.

**शल (लल)** (ಶಲ [ಲಲ]) (सं) ना.—रानडुकराच्या अंगावरील केस. 'अेदुपंदि' पहा.

**शलभ** (ಶಲಭ) (सं) ना.—काजवा; खद्योत; पतंग; टोळ. 'मिडिके' पहा.

**शलाका (के)** (ಶಲಾಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—काडी; सळी; टोचणारी काडी; चोय; बर्ची; फुलांतील मध्य केसर.

**शलाटु** (ಶಲಾಟು) (सं) वि.—पाडाचे; कच्चे. (सं) ना.—कच्चे फळ; चिमटा; चापटी; आधिक्य.

**शल्क** (ಶಲ್ಕ) (सं) ना.—साल; टरफल; शिंप.

**शल्य** (ಶಲ್ಯ) (सं) ना.—टोकदार आयुध; बर्ची; काटा; अडचण; गंडातर; मद्रदेशीय राजा.

**शव** (ಶವ) (सं) ना.—मृत शरीर; प्रेत; मढें.

—**संस्कार** (ಸಂಸ್ಕಾರ) (सं) ना.—प्रेताची दहनक्रिया; मरणोत्तर देहसंस्कार.

**शश (शक)** (ಶಶ [ಶಕ]) (सं) ना.—ससा; चंद्रावरील सशाच्या आकाराचा डाग. 'कुंदिली' पहा.

**शशधर** (ಶಶಧರ) (सं) ना.—चंद्र; ससा धारण करणारा.

**शशांक** (ಶಶಾಂಕ) (सं) ना.—चंद्र; शशधर.

**शशि** (ಶಶಿ) (सं) ना.—चंद्र.

—**चूड, जूट** (ಚೂಡ,-ಜೂಟ) (सं) ना.—चंद्रशेखर; चंद्रमौली; शंकर; शिव.

**शशिकले** (ಶಶಿಕಲೆ) (सं) ना.—चंद्रकला; चंद्रकोर; चंद्राच्या सोळा कलांपैकी एक.

**शशिकांत** (ಶಶಿಕಾಂತ) (सं) ना.—चंद्रकांत मणि.

**शश्वत्** (ಶಶ್ವತ್) (सं) अ.—पदोपदीं; पावलोपावलीं; सतत; निरंतर; वारंवार.

**शष्कुलि (ली)** (ಶಷ್ಕುಲಿ [ಲೀ]) (सं) ना.—एक खाद्यपदार्थ; कानाची पाळी; बाह्यकान.

**शष्प** (ಶಷ್ಪ) (सं) ना.—कोवळेगवत; शेट; कूस; कस्पट.

**शंसन** (ಶಂಸನ) (सं) ना.—प्रशंसा; वर्णन.

**शसन** (ಶಸನ) (सं) ना.—पीडा; त्रास; मारपीट; शिक्षा.

**शस्त** (ಶಸ್ತ) (सं) वि.—वर्णित; कथित; प्रशंसित; जखम झालेला; क्षेम.

**शस्त्र** (ಶಸ್ತ್ರ) (सं) ना.—फेकून मारण्याचें आयुध; बाण; बर्ची.

—**अस्त्र** (ಅಸ್ತ್ರ) (सं) ना.—दारूगोळ्यासारखी आयुधें.

—**आगार** (ಆಗಾರ) (सं) ना.—शस्त्रगृह; शस्त्रसाठ्याचे ठिकाण; अस्त्रभांडार;

—**संन्यास** (ಸಂನ್ಯಾಸ) (सं) ना.—शस्त्रास्त्रांचा त्याग. युद्धविराम.

**शस्य** (ಶಸ್ಯ) (सं) ना.—पीक; धान्य; दाणागोटा; (सं) वि. प्रशंसाकरण्यायोग्य. स्तुत्य; कीर्तनीय.

**शाक** (ಶಾಕ) (सं) ना.—फळभाजी; टरफळ; उष्णता; गरमा; शक्तिसामर्थ्य.

—**आहारि** (ಆಹಾರಿ) (सं) ना.—धान्याचा आहार करणारा; मांस न खाणारा.

—**आहारिणी** (ಆಹಾರಿಣಿ) (सं) ना.—धान्याहार करणारी.

**शाकट** (ಶಾಕಟ) (सं) ना.—शकटासंबंधी; गाडी रथ वगैरेंना जोडण्याचें जनावर; बैल; घोडा वगैरे.

**शाकिनि (नी)** (ಶಾಕಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—पिशाचिनी; दुष्ट देवता.

**शाक्त (क्तेय)** (ಶಾಕ್ತ [ಕ್ತೇಯ]) (सं) वि.—शक्तीचा उपासक; शक्तिपूजक.

**शाक्य** (ಶಾಕ್ಯ) (सं) ना.—गौतम बुद्धाच्या घराण्याचे नाव; बुद्धदेव.

**शाक्यमुनि (सिंह)** (ಶಾಕ್ಯಮುನಿ [ಸಿಂಹ]) (सं) ना.—शाक्य; गौतमबुद्ध.

**शाक्वर** (ಶಾಕ್ವರ) (सं) ना.—बुळी; वळू; खोंड; बैल.

**शाखा (खे)** (ಶಾಖಾ [ಖೆ]) (सं) ना.—झाडाची ढापी; शाखा; फादी; कोंब; उपपक्ष; पंथ; उपसंस्था; भाग; विभाग.

**शाखाचर** (ಶಾಖಾಚರ) (सं) ना.—माकड; वानर; वानरवंश.

**शाखाचरी** (ಶಾಖಾಚರೀ) (सं) ना.—वानरी; मादीवानर.

**शाखामृग** (ಶಾಖಾಮೃಗ) (सं) ना.—वानर; कपि.

**शाखासंगम** (ಶಾಖಾಸಂಗಮ) (सं) ना.—रक्तवाहिनी; रक्तनाळ; रक्तवाहिनींचे जाळे; नदी.

**शाखि** (ಶಾಖಿ) (सं) ना.—कोंबयुक्त झाड. शाखा असलेला वृक्ष; तरू.

**शाटि (टी)** (ಶಾಟಿ [ಟೀ]) (सं) ना.—संन्याशाची छाटी; उत्तरीय; गोणपाट; टरट.

**शाठ्य** (ಶಾಠ್ಯ) (सं) ना.—दुष्टपणा; द्रोह; उद्धटपणा; कपट; वंचना.

**शाड्वल** (ಶಾಡ್ವಲ) (सं) ना.—शाद्वल; हिरवाचारा; ओले गवत. कुरण.

**शाण** (ಶಾಣ) (सं) ना.—सहाण; धारेचा दगड; (सं) धा. पाजळणें; सहाणेवर घासणें. पाणी लावणे.

**शाणाश्म** (ಶಾಣಾಶ್ಮ) (सं) ना—सहाणेचा दगड; जाते.

**शात** (ಶಾತ) (सं) वि.—धार लावलेले; पाजळलेले; कोमल; पातळ; संतोषदायक; सुखकर. सुंदर.

**शातकुंभ** (ಶಾತಕುಂಭ) (सं) ना.—चोख सोने. 'अपरंजि' पहा.

**शातन** (ಶಾತನ) (सं) ना.—विभाजन; धारलावण्याची क्रिया; बिघाड.

**शाद** (ಶಾದ) (सं) ना.–ओले गवत; चारणी; चरणावळः चिखल; राड.

**शाद्वल** (ಶಾದ್ವಲ) (सं) ना.–'शाडबल' पहा; हिरवा चारा; कुरण; ओले गवत.

**शानभा (भो) ग** (ಶಾನಭಾ [ಭೋ] ಗ) (सं) ना.–कुलकर्णी; मुनशी; कर्णिक.

**शाने** (ಶಾನೆ) (सं) वि.–पुष्कळ; अधिक; भरपूर.

**शांत** (ಶಾಂತ) (सं) वि.–समाधानी; धिमा; तृप्त; निःसंदेह.

**शांतनव** (ಶಾಂತನವ) (सं) ना. शंतनूचा मुलगा; भीष्माचार्य.

**शांति** (ಶಾಂತಿ) (सं) ना.–सहनशीलता; समाधान; स्तब्धता; निःशब्दता; पीडापरिहार; उपशम; स्वस्थता.

**शाप** (ಶಾಪ) (सं) ना.–अशुभ वचन; तळतळाट; बोटे मोड; शिवी.

**शाब (बक)** (ಶಾಬ[ಬಕ]) (सं) ना.–कोवळा अंकुर; कळकाचा कोंब.

**शाबर** (ಶಾಬರ) (सं) ना.–शबरासंबंधी; शिकारी; एका संहितेचें नांव.

**शाब्दिक** (ಶಾಬ್ದಿಕ) (सं) वि.–शब्दासंबंधी; तोंडी; (सं) ना.–भाषाशास्त्रकोविद; व्याकरण पंडित.

**शाम** (ಶಾಮ) (सं) ना.–सायंकाळ; तीन्हीसांज; संध्याकाळ; शांति.

**शामक** (ಶಾಮಕ) (सं) वि.–शांति देणारा; कमी करणारा; गुणदायक.

**शांबरि (री)** (ಶಾಂಬರಿ[ರೀ]) (सं) ना.–मायाविद्या; इंद्रजाल; नजरबंदी.

**शांभव** (ಶಾಂಭವ) (सं) वि.–शैव; शंभुसंबंधी.

**शांभवि (वी)** (ಶಾಂಭವಿ [ವೀ]) (सं) ना.–शंभूची पत्नी; पार्वतीदेवी.

**शायि** (ಶಾಯಿ) (सं) वि.–शयन करणारा; झोपाळु; झोपणारा; विश्रांति घेणारा.

**शारद** (ಶಾರದ) (सं) वि.–शरद्कालसंबंधी; पांढरें; शुभ्र; स्वच्छ.

**—अंभोज** (ಅಂಭೋಜ) (सं) ना.–श्वेतकमल; जहाज; आकाश; चतुर मनुष्य.

**शारदे (दा)** (ಶಾರದೆ [ದಾ]) (सं) ना.–सरस्वती; विद्यादेवी.

**शारिके** (ಶಾರಿಕೆ) (सं) ना.–सारिका; मैना; साळुंकी. 'पुरुळि' पहा.

**शारीर (रक) (रिक)** (ಶಾರೀರ[ರಕ][ರಿಕ]) (सं) वि.–शरीरासंबंधी; दैहिक.

**शार्ङ्ग** (ಶಾರ್ಙ್ಗ) (सं) ना.–विष्णूचे धनुष्य; कामठ्याचे धनुष्य.

**—धर,—पाणि** (—ಧರ ಪಾಣಿ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण.

**शार्ङ्गरव** (ಶಾರ್ಙ್ಗರವ) (सं) ना.–शार्ङ्गधनूचा टणत्कार; कण्वशिष्य.

**शार्ङ्गी** (ಶಾರ್ಙ್ಗೀ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण.

**शार्दूल** (ಶಾರ್ದೂಲ) (सं) ना.–वाघ; ढाण्यावाघ; सिंह; श्रेष्ठ; एक छांदस वृत्त.

**शार्वरि** (ಶಾರ್ವರಿ) (सं) ना.–एक संवत्सर; रात्रीसंबंधी. शक्ति; भूमि.

**शाल** (ಶಾಲ) (सं) वि.–रुंद; विस्तृत; एक वृक्ष; किल्ला; शक्ति; सामर्थ्य.

**शालग्राम** (ಶಾಲಗ್ರಾಮ) (सं) ना.–शाळिग्राम; गंडकी नदीतील काळगोटा.

**शालभंजिका (के)** (ಶಾಲಭಂಜಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–पुतळा; बाहुली; प्रतिमा.

**शालावृक** (ಶಾಲಾವೃಕ) (सं) ना.–कुत्रे; ग्रामसिंह; कुक्कुर.

**शालि** (ಶಾಲಿ) (सं) ना.–साळ; भात. 'नेल्लु' पहा. जवळ असणे या अर्थी एक संस्कृत प्रत्यय.

**शालिगळ** (ಶಾಲಿಗಳ) (क) ना.–भाताचा गादा; भातशेत; तांदुळपिकी जमीन.

**शालिनी** (ಶಾಲಿನಿ) (सं) वि.–शोभणारी; असणारी; शोभना; स्वामिनी.

**शालिवन** (ಶಾಲಿವನ) (सं) ना.–भातशेत;

**शालिवाहन** (ಶಾಲಿವಾಹನ) (सं) ना.–दक्षिण भारतांतील एक राजा. एक शक.

**शालीन** (ಶಾಲೀನ) (सं) वि.–विनयशाली; कोमल मनाचा; लाजाळु; संकोची स्वभावाचा; दाक्षिण्ययुक्त.

**शालीनते** (ಶಾಲೀನತೆ) (सं) ना.–नम्रता; विनय; दाक्षिण्य; मृदुता; कोमलता.

**शालु** (ಶಾಲು) (अ.दे) ना.–पांघरण्याचे वस्त्र; उत्तरीय.

**शालेय** (ಶಾಲೇಯ) (सं) ना.–शाळेसंबंधी; साळीचा; भातशेत.

**शाले** (ಶಾಲೆ) (सं) ना.–विद्यामंदिर; शिक्षणसंस्था; उद्योगशाळा; शाळा; गृह; भवन; घर; मंदिर.

**शाल्मलि (ली)** (ಶಾಲ್ಮಲಿ[ಲೀ]) (सं) ना.–सावरीचे झाड. 'बुरल' पहा.

**शाल्यन्न** (ಶಾಲ್ಯನ್ನ) (सं) ना.–साळीचा भात; शिजवलेले तांदूळ; भात.

**शाव (वक)** (ಶಾವ[ವಕ]) (सं) ना.–पिलू; पोत; पेटा; अर्भक.

**शाश्वत** (ಶಾಶ್ವತ) (सं) वि.–स्थिर; अविनाशी; त्रिकालाबाधित; स्वर्ग; आकाश; परमेश्वर.

**शासक** (ಶಾಸಕ) (सं) ना.–शास्ता; आज्ञा देणारा; भेरी; दुंदुभि.

**शासन** (ಶಾಸನ) (सं) ना.–नियम; चौकट; आज्ञा; निरोप; व्यवस्था; शिस्त. 'ऑरण' पहा. राजशासन; शिक्षा; दंड; 'रायस' पहा. कारभार; अधिकार; लेखी हुकूम; आधारभूत लेख. 'बखणिगे' पहा.

**शासनसभे** (ಶಾಸನಸಭೆ) (सं) ना.–न्यायसभा; कायदेमंडळ.

**शास्ति** (ಶಾಸ್ತಿ) (सं) ना.–अधिकार; शासन; आज्ञा; कारभार. शिक्षा.

**शास्त्र** (ಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना.–नीतीनियम; रीतभात सांगणारा ग्रंथ; धर्मनीतीचे नियम निबंधन; आज्ञा; अनुज्ञा.

**शास्त्रज्ञ** (ಶಾಸ್ತ್ರಜ್ಞ) (सं) वि.–शास्त्र सांगणारा; शास्त्र जाणणारा.

**शास्त्री** (ಶಾಸ್ತ್ರಿ) (सं) ना.–शास्त्रवेत्ता; शास्त्रज्ञ.

**शास्त्रीय** (ಶಾಸ್ತ್ರೀಯ) (सं) ना.–शास्त्राशी संबंधित. शास्त्रानुसार; वैज्ञानिक; शास्त्रपूत; क्रमयुक्त.

**शिंशप** (ಶಿಂಶಪ) (सं) अशोक वृक्ष. 'असुके' पहा.

**शिंशुमार** (ಶಿಂಶುಮಾರ) (सं) ना.–मकर; सुसर. 'नेगलु' पहा.

**शिक्का (क्के)** (ಶಿಕ್ಕಾ[ಕ್ಕೆ]) (अ.दे.) ना.–मुद्रा. मोहोर.

**शिक्य** (ಶಿಕ್ಯ) (सं) ना.–शिंके; शिंकाळे;

**शिक्षक** (ಶಿಕ್ಷಕ) (सं) ना.–शिकवणारा; उपाध्याय; गुरु.

**शिक्षण** (ಶಿಕ್ಷಣ) (सं) ना.–विद्या शिकणें; साधना; विद्याभ्यास; सुधारणा; शिकवणी; साक्षरता.

**शिक्षा (क्षे)** (ಶಿಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.–अक्षरज्ञान; अक्षराभ्यास; उपदेश; वेदांग; ग्रंथविशेष; दंडनीति; दंडना; सजा.

**शिक्षिसु** (ಶಿಕ್ಷಿಸು) (क) धा.–शिकवणे; पाठ देणें; सुधारणें; अक्षरज्ञान देणें; शिक्षा करणें; दंड करणें.

**शिखंड** (ಶಿಖಂಡ) (सं) ना.–केस; शेंडी; बुचडा; तुरा; मोरतुरा पिसारा. 'पीलि' पहा.

**शिखंडि** (ಶಿಖಂಡಿ) (सं) ना.–शेंडी असलेला; मोर; मोरतुरा; बाण; पांचाळ पुत्र; पौरुषहीन; नपूंसक.

**शिखर** (ಶಿಖರ) (सं) ना.–शिर; शेवट; अंत; पर्वताचा वरचा भाग; सातु; कळस; शेंडा.

**शिखरि** (ಶಿಖರಿ) (सं) ना.–पर्वत; वृक्ष; भव्य इमारत; गोपुर; वन; अरण्य; टिटवी; टिट्टिभ; सोनें; सुईचे नेडें.

**शिखा (खे)** (ಶಿಖಾ [ಖೆ]) (सं) ना.–शेंडी; डोक्याचे केस; बुचडा; डोकें; शिखर; अग्निज्वाला; किरणश्रेष्ठ; मंगळग्रह; केतु; अंत; देह; कमंडलु.

**शिखामणि** (ಶಿಖಾಮಣಿ) (सं) ना.–शिरोरत्न; श्रेष्ठ; अत्युत्तम.

**शिखावल** (ಶಿಖಾವಲ) (सं) ना.–मोर; मयूर.

**शिखि** (ಶಿಖಿ) (सं) ना.–मोर; अग्नि; ब्राह्मण; कृष्णसर्प; बाण; पर्वत; डोके; शिरस्त्राण; किरीट; केतु; मंगळग्रह.

**शिखिवाहन** (ಶಿಖಿವಾಹನ) (सं) ना.–मयूरासना; षण्मुख; कार्तिकेय; मोरावर बसणारी शारदा.

**शिखिनेत्र** (ಶಿಖಿನೇತ್ರ) (सं) ना.–शिव; अग्निनेत्र.

**शिंजित** (ಶಿಂಜಿತ) (सं) वि.–'घुंईऽऽ' असा गुंजारव करणारा झंकार; धनुष्टंकार; नुपुररव.

**शिंजिनि (नी)** (ಶಿಂಜಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–मौर्वी; धनुष्याची; दोरी; पायातील वाळे; नूपुर.

**शित** (ಶಿತ) (क) वि.–काळ्या रंगाचे पातळ; निर्बल; झिजलेले; पाजळलेले; धार लावलेले.

**शिति** (ಶಿತಿ) (क) वि.–पांढरे; काळे; निळें.

**शितिकंठ** (ಶಿತಿಕಂಠ) (सं) ना. नीलकंठ; शिव; मोर.

**शिथिल** (ಶಿಥಿಲ) (सं) वि.–सैल; दुर्बल; ठिसूळ; रोडलेले; नाश पावलेलें.

**शिद्दिके** (ಶಿದ್ದಿಕೆ) (क) ना.–'शिविका' पहा. पालखी; मेणा; डोली.

**शिपिविष्ट** (ಶಿಪಿವಿಷ್ಟ) (सं) ना.–खल्वाट; टकल पडलेला; चंपी केलेला; बोळभद्र.

**शिबि** (ಶಿಬಿ) (सं) ना.–प्राचीन दानशूर चक्रवर्ती शिबीराजा.

**शिबिका (के)** (ಶಿಬಿಕಾ[ಕೆ]) (सं) ना.–पालखी; डोली; विमान.

**शिबिर** (ಶಿಬಿರ) (सं) ना.–तात्पुरते वसतिस्थान; आश्रयस्थान; गूढागार. प्रासंगिक शिक्षालय.

**शिरः(रस्) रस्सु)** (ಶಿರಃ [ರಸ್] ರಸ್ಸು) (सं) ना.–डोकें; शेंडा.

**शिरःकृंतक** (ಶಿರಃಕೃಂತಕ) (सं) ना.–केस कापण्याचे यंत्र. कातरी.

**शिरसा** (ಶಿರಸಾ) (सं) अ.–डोक्यानें; विनयपूर्वक.

**शिरस्त्र (स्त्राण)** (ಶಿರಸ್ತ್ರ [ಸ್ತ್ರಾಣ]) (सं) ना.–शिरोरक्षक; शिरकवच; रुमाल; टोपी.

**शिरा (रे)** (ಶಿರಾ [ರೆ]) (सं) ना.–नाडी; नस; रोहिणी; रक्तवाहिनी.

**शिरीष** (ಶಿರೀಷ) (सं) ना.–शिरसाचे झाड; शिरसलवृक्ष.

**शिरोज** (ಶಿರೋಜ) (सं) ना.–डोक्यावरील केस.

**शिरोधर** (ಶಿರೋಧರ) (सं) ना.–शिर धारण करणारा; गळा; कंठ; मान; गर्दन.

**शिरोधरे** (ಶಿರೊಧರೆ) (सं) ना.–मानिनी; विनीता; शीलवती.

**शिरोमणि** (ಶಿರೋಮಣಿ) (सं) ना.–शिरोरत्न; चूडामणि; श्रेष्ठ पुरुष; नायक. 'शिखामणि' पहा.

**शिरोवेष्टन** (ಶಿರೋವೇಷ್ಟನ) (सं) ना.–रुमाल; फेटा; पटका.

**शिल** (ಶಿಲ) (सं) ना.–निवडलेले कणीस; बियासाठीं राखलेले कणीस.

**शिला (ले)** (ಶಿಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–दगड; धोंडा; अश्म; वज्र; सहाणेचा दगड; उंबरठा.

**शिलाधातु** (ಶಿಲಾಧಾತು) (सं) ना.–शिलाजित्; कावेचा दगड; शक्तिवर्धक औषध.

**शिलानदि** (ಶಿಲಾನದಿ) (सं) ना.—दहिवर; थंडीनें गोठलेली नदी.

**शिलालिपि** (ಶಿಲಾಲಿಪಿ) (सं) ना.—शिलालेख; स्थिरलेखन; ललाटरेषा.

**शिलावर्ष (वृष्टि)** (ಶಿಲಾವರ್ಷ [ವೃಷ್ಟಿ]) (सं) ना.—गारांचा पाऊस.

**शिलाशासन** (ಶಿಲಾಶಾಸನ) (सं) ना.—शिलालेखातील राजाज्ञा.

**शिलींध्र** (ಶಿಲೀಂಧ್ರ) (सं) ना.—कुत्र्याची छत्री; आळंबी; भुईफोड. 'अणजि' पहा.

**शिलीमुख** (ಶಿಲೀಮುಖ) (सं) ना.—बाण; भ्रमर; घुंगुरटें.

**शिलुबे** (ಶಿಲುಬೆ) (क) ना.—येशु खिस्ताला फाशी दिलेले झाड; खिस्ताच्या खिळे ठोकीचा खांब.

**शिलोच्चय** (ಶಿಲೋಚ್ಚಯ) (सं) ना.—पर्वत; डोंगर.

**शिल्प** (ಶಿಲ್ಪ) (सं) ना.—दगडातील खोदकाम; मूर्तिकला; कोरकाम.

**शिल्पक** (ಶಿಲ್ಪಕ) (सं) ना.—शिल्पशास्त्रज्ञ; खोदकाम करणारा; कोरीव काम करणारा; दगड कोरणारा. 'चिप्पिग' पहा.

**शिल्पिगार** (ಶಿಲ್ಪಿಗಾರ) (क) ना.—मूर्ति कोरणारा;कोरकाम करणारा.

**शिल्पि** (ಶಿಲ್ಪಿ) (सं) ना.—खोदकाम करणारा; कोरकलाकुशल; मूर्तिकार.

**शिव** (ಶಿವ) (सं) वि.—मंगलकर; कल्याणकर; निरोगी; सुदैवी; सशक्त.

(सं) ना.—शंकर; रुद्र; परमेश्वर; वेद; मुक्ति; निर्वाण; ग्रहांचा शुभयोग; पुरुषेंद्रिय; खुंटा; धोतरा; ब्रह्मानंद; पाणी; सैंधव; टाकणखार; देवता; पारा; अभ्युदय; कल्याण; आशीर्वाद.

—**अक्ष** (ಅಕ್ಷ) (सं) ना.—रुद्राक्ष; रुद्राक्षफळ.

—**आलय** (ಆಲಯ) (सं) ना.—शंकराचें देऊळ; शिवमंदिर; स्मशान; तुळस; सब्जा.

—**इतर** (ಇತರ) (सं) ना.—दुर्दैव; अकल्याण.

—**द्रुम** (ದ್ರುಮ) (सं) ना.—बेल; बिल्ववृक्ष; रुद्राक्षाचे झाड.

—**द्विष्टे** (ದ್ವಿಷ್ಟೆ) (सं) ना.—केतकी; केवडा.

—**पुर** (ಪುರ) (सं) ना.—काशी; स्मशान.

—**रात्रि** (ರಾತ್ರಿ) (सं) ना.—माघ वद्य चतुर्दशी; महाशिवरात्र.

—**लिंग** (ಲಿಂಗ) (सं) ना.—शिवाची पिंड; लिंगरूपातील शिव.

—**वल्लभ** (ವಲ್ಲಭ) (सं) ना.—आम्रवृक्ष.

—**शरण (णे)** (ಶರಣ [ಣೆ]) (सं) ना.—वीरशैवभक्त; शिवपूजक.

—**शेखर** (ಶೇಖರ) (सं) ना.—चंद्र; धोतरा;

**शिवदीक्षा (क्षे)** (ಶಿವದೀಕ್ಷಾ [ಕ್ಷೆ]) (सं) ना.—शिव भक्त होण्यासाठीं करावयाचे संस्कार; लिंगदीक्षा.

**शिवा (वे)** (ಶಿವಾ[ವೆ]) (सं) ना.—पार्वती; कोल्हा; निर्वाण; मुक्ति; शमीवृक्ष; आवळीचे झाड दूर्वा; हळद; पीतवर्ण.

—**अराति** (ಅರಾತಿ) (सं) ना.—कुत्रा.

—**प्रिय** (ಪ್ರಿಯ) (सं) ना.—मेंढी; शेळी.

**शिवानि (नी)** (ಶಿವಾನಿ[ನೀ]) (सं) ना.—पार्वती; दुर्गा.

**शिविका (के)** (ಶಿವಿಕಾ[ಕೆ]) (सं) ना.—मेणा; पालखी; डोली. 'अंदण' पहा.

**शिवैक्यवागु** (ಶಿವೈಕ್ಯವಾಗು) (क) धा.—देह ठेवणें; मरणें; कैलासाला जाणें; शिवामधे विलीन होणें.

**शिशिर** (ಶಿಶಿರ) (सं) ना.—शीत; थंडी; गारठा; हिवाळा. दहिवर;

—**ऋतु,—काल** (ಋತು–ಕಾಲ) (सं) ना.—हिवाळा.

—**कर-किरण-रश्मि** (ಕರ–ಕಿರಣ–ರಶ್ಮಿ) (सं) ना—चंद्र.

**शिशिरोपचार** (ಶಿಶಿರೋಪಚಾರ) (सं) ना.—शीतोपचार; थंड पदार्थाची औषध योजना.

**शिशु (शुक)** (ಶಿಶು[ಶುಕ]) (सं) ना.—पुत्र; अर्भक; पिलु; तरु. रोपटे.

**शिशुपाल** (ಶಿಶುಪಾಲ) (सं) ना.—चेदी देशाचा राजा; चैद्य.

**शिशुमार** (ಶಿಶುಮಾರ) (सं) ना.—मकर रास; मगर. 'नेगलु' पहा.

**शिष्ट** (ಶಿಷ್ಟ) (सं) वि.—उरलेले; शिल्लक; चालरीत जाणणारा. सुसंस्कृत; ज्ञानी; सभ्य; शिस्तप्रिय; पुण्यवान्; विनयशील; सौजन्यपूर्ण.

—**संप्रदाय** (ಸಂಪ್ರದಾಯ) (सं) ना.—सभ्यपणाची चालरीत.

**शिष्टाचार** (ಶಿಷ್ಟಾಚಾರ) (सं) ना.—योग्यवर्तन; सभ्यरीत.

**शिष्टि** (ಶಿಷ್ಟಿ) (सं) ना.—सभ्यता; शिस्त.

**शिष्य** (ಶಿಷ್ಯ) (सं) ना.—विद्यार्थी; शिक्षणार्थी; गुरूची सेवा करणारा.

**शिष्यवृत्ति** (ಶಿಷ್ಯವೃತ್ತಿ) (सं) ना.—शिक्षण पूर्तीसाठी केलेली मदत; विद्यार्जनार्थ साह्य.

**शिस्तु** (ಶಿಸ್ತು) (अ.दे) ना.—व्यवस्था; क्रमबद्धता; चोखपणा. 'ओरण' पहा.

**शिळीमुख** (ಶಿಳೀಮುಖ) (सं) ना.—बाण; भ्रमर; मुंगा.

**शीकर** (ಶೀಕರ) (सं) ना.—फवारा; शिंतोडणी; प्रोक्षण.

**शीघ्र** (ಶೀಘ್ರ) (सं) ना.—त्वरा; वेग; गडबड; घाई.

**शीघ्रते** (ಶೀಘ್ರತೆ) (सं) ना.—घाई; त्वरा. लगबग.

**शीत** (ಶೀತ) (सं) वि.—थंड; गार; हिमल.

(सं) ना.—औदासीन्य; पडसे; पाणी.

शीतक (ಶೀತಕ) (सं) वि.–थंडपणा आणणारे; बर्फाचे यंत्र; विद्युत्संग्राहक.
शीतकर (किरण) (ಶೀತಕರ [ಕಿರಣ]) (सं) ना.–चंद्र.
शीतल (ಶೀತಲ) (सं) वि.–थंडगार; हिमशीत.
—छाये (ಛಾಯೆ) (सं) ना.–थंड सावली.
शीतला (ली) (ಶೀತಲಾ [ಲೀ]) (सं) ना.–देवी रोग.
शीतवारि (अंबु) (ಶೀತವಾರಿ[ಅಂಬು]) (सं) ना.–थंड पाणी. गार पाणी.
शीतवीर्य (ಶೀತವೀರ್ಯ) (सं) ना.–अंजीराचें झाड.
शीतांशु (ಶೀತಾಂಶು) (सं) ना.–चंद्र.
शीताद्रि (ಶೀತಾದ್ರಿ) (सं) ना.–हिमालय; हिमाचल.
शीधु (ಶೀಧು) (सं) ना.–एक प्रकारचे मद्य; सराई; शिंदी. 'कळ्ळु' पहा.
—गंध (ಗಂಧ) (सं) ना.–बकुल वृक्ष.
शीर (ಶೀರ) (सं) ना.–सूर्य; नांगर; अजगर.
शीर्ण (ಶೀರ್ಣ) (सं) वि.–गळलेला; रोडलेल; क्षीण; कृश; कोमेजलेली; जखमी; छिन्न; नष्ट.
शीर्ष (ಶೀರ್ಷ) (सं) ना.–डोकें; मस्तक.
शीर्षक (ಶೀರ್ಷಕ) (सं) ना.–मथळा; शिरस्त्राण; रुमाल.
शील (ಶೀಲ) (सं) ना.–स्वभाव; वर्तन; रूढी; सद्गुण; शेष.
शीला (ले) (ಶೀಲಾ [ಲೆ]) }
शीलवती (ಶೀಲವತಿ) } (सं) ना.–सदाचारिणी; सद्वर्तनी स्त्री; शीलवती.
शीलवंत (ಶೀಲವಂತ) (सं) वि.–शीलवान; सभ्य; सुजन; सदाचारी.
शीसक (ಶೀಸಕ) (क) ना.–शीर्षक; मथळा; शिरस्त्राण; रुमाल.
शुक (ಶುಕ) (सं) ना.–पोपट; शुकमुनी.
—तरु-पुष्प-प्रिय, (ತರು-ಪುಷ್ಪ-ಪ್ರಿಯ) (सं) ना.–शिरीष वृक्ष; पळसाचें झाड.
—नास (ನಾಸ) (सं) वि.–पोपटासारखे नाक असलेला.
—वाह (ವಾಹ) (सं) ना.–काम; मन्मथ; मदन.
शुकवाणि (ಶುಕವಾಣಿ) (सं) ना.–पोपटपंची; पोपटाचे बोल; बोबडे बोल.
शुक्त (ಶುಕ್ತ) (सं) वि.–कठोर; निर्दय; प्रकाशमान; शुभ्र; परित्यक्त; सांधलेले; जुळलेले.
(सं) ना.–मांस; आंबट पदार्थ.
शुक्ति (ಶುಕ್ತಿ) (सं) ना.–मोत्याचा शिंपला; शिंप.
—उद्भव-बीज (ಉದ್ಭವ-ಬೀಜ) (सं) ना.–मोती.
शुक्र (ಶುಕ್ರ) (सं) ना.–एक ग्रह; दैत्यगुरु; एक नीतिशास्त्रकार; चांदी; वीर्य; रेत.
—अंग (ಅಂಗ) (सं) ना.–मोर.
शुक्रनीति (ಶುಕ್ರನೀತಿ) (सं) ना.–शुक्राचार्यकृत राजनीतिग्रंथ.
शुक्राचार्य (ಶುಕ್ರಾಚಾರ್ಯ) (सं) ना.–दैत्यगुरु.
शुक्ल (ಶುಕ್ಲ) (सं) वि.–चांदीचे; चंदेरी; पांढरें; शुभ्र.
(सं) ना–वीर्य; रेतस; नेत्ररोग.
—पक्ष (ಪಕ್ಷ) (सं) ना.–शुद्धपक्ष; चांदणी रात्र असणारा पंधरवडा; महिन्याचा पूर्वार्ध.
शुंग (ಶುಂಗ) (सं) ना.–भाताचे तूस; भातकोंडा; एक झाड; एक कर्नाटकी राजवंश.
शुचि (ಶುಚಿ) (सं) ना.–निर्मलता; शुद्धता; चोखपणा; पांढरेपणा; सत्य; सद्गुण; पावित्र्य; मित्र; अग्नि.
शुचिर (ಶುಚಿರ) (सं) वि.–पांढरें; शुभ्र.
शुचिकर (ಶುಚಿಕರ) (सं) वि.–शुद्धिकारक; निर्मल; पवित्र; स्वच्छ.
शुचिर्भूत (ಶುಚಿರ್ಭೂತ) (सं) वि.–सोवळा; स्वच्छ; पवित्र.
शुंठ (ಶುಂಠ) (सं) वि.–अज्ञानी; मोंड; मूर्ख; बुद्धिहीन.
शुंठि (ಶುಂಠಿ) (सं) ना.–सुंठ; आलें.
शुंड (डा) (ಶುಂಡ[ಡಾ]) (सं) ना.–हत्तीची सोंड; हत्तीच्या गंडस्थलातील मदस्राव.
—दंड (ದಂಡ) (सं) ना.–सोंड.
शुंडाल (ಶುಂಡಾಲ) (सं) ना.–हत्ती; गज.
शुद्ध (ಶುದ್ಧ) (सं) वि.–कलंकरहित; पवित्र; चोख; सोवळें. प्रामाणिक; केवल. 'शुक्ल.' पहा.
शुद्धक (ಶುದ್ಧಕ) (क) ना.–मूल वर्णमाला.
शुद्धाचार (ಶುದ್ಧಾಚಾರ) (सं) ना.–सद्वर्तन; सदाचार; चांगली राहाणी; प्रामाणिक जीवन.
शुद्धांत (ಶುದ್ಧಾಂತ) (सं) ना.–राणीवास; अंतःपूर.
शुद्धि (ಶುದ್ಧಿ) (सं) ना.–स्वच्छता; पावित्र्य; निवड; चांगुलपणा; सत्य; प्रामाणिकपणा; पुण्य; पापमोचन; दुर्गा; अधिकारी; शुद्धीकरण; पतित परावर्तन; मतांतर; संस्कार; पुटपाक.
शुनःशेप (ಶುನಃಶೇಪ) (सं) ना.–एक वैदिक ऋषि; आईबापांना नकोसा झालेल मुलगा; अजगर्तांचा मुलगा.
शुनक (ಶುನಕ) (सं) ना.–कुत्रा; शुनि; एक ऋषि.
शुनाशीर (ಶುನಾಶೀರ) (सं) ना.–इंद्र; घुबड.
शुनि (ಶುನಿ) (सं) ना.–कुत्री.
शुभ (ಶುಭ) (सं) ना.–क्षेम; मंगल; कल्याण; आनंद; सुदैव.
—अंग (गी) (ಅಂಗ [ಗೀ]) (सं) ना.–सुंदर देहधारी.
—मुहूर्त (ಮುಹೂರ್ತ) (सं) ना.–मंगल समय; कल्याणकर घटका.
शुभ्र (ಶುಭ್ರ) (सं) वि.–पांढरे; स्वच्छ; निर्मल; झळझळीत.
शुभ्रदंति (ಶುಭ್ರದಂತಿ) (सं) ना.–इंद्राचा हत्ती; ऐरावत.

शुभ्रवाहन (ಶುಭ್ರವಾಹನ) (सं) ना.–अर्जुन.

शुभ्रांशु (ಶುಭ್ರಾಂಶು) (सं) ना.–चंद्र.

शुभ्रातपत्र (ಶುಭ್ರಾತಪತ್ರ) (सं) ना.–पांढरी छत्री; श्वेत छत्र; एक छत्र.

शुंभ (ಶುಂಭ) (सं) वि.–धड्ड; अज्ञानी; हुंब; राक्षस.; 'शुंब' पहा.

शुल्क (ಶುಲ್ಕ) (सं) ना.–जकात; सारा; किंमत; वरदक्षिणा; स्त्रीधन.

—कन्याशुल्क (ಕನ್ಯಾಶುಲ್ಕ) (सं) ना.–हुंडा; वधुदक्षिणा.

शुल्व (ಶುಲ್ವ) (सं) वि.–रमणीय; सुंदर.

(सं) ना.–दोर; दोरी; ताम्र; तांबे.

शुश्रूषा (षे) (ಶುಶ್ರೂಷಾ[ಷೆ]) (सं) ना.–ऐकून घेण्याची इच्छा; सेवा; उपचार; नम्रता; परिचर्या; विधेयता.

शुष्क (ಶುಷ್ಕ) (सं) वि.–वाळलेले; रसहीन; निरुपयोगी; निष्प्रयोजन; व्यर्थ; निकामी.

—आलाप (ಆಲಾಪ) (सं) ना.–कोरड्या गप्पा; वाळली बडबड; काथ्याकूट; निष्फळ चर्चा; स्नेहशून्य भाषण.

—उपचार (ಉಪಚಾರ) (सं) ना.–मनांत नसता केलेले अतिथ्य.

शुष्म (ಶುಷ್ಮ) (सं) ना.–बल; सामर्थ्य; चकाकी; कांति.

शूक (ಶೂಕ) (सं) ना.–धान्यावरील तूस; कोंडा; भूस.

शूकर (ಶೂಕರ) (सं) ना.–सूकर; रानडुकर; वराह.

शूकल (ಶೂಕಲ) (सं) वि.–बोथट; मोंड; अडेल तट्टु; अडणारा घोडा.

शूद्र (ಶೂದ್ರ) (सं) ना–चतुर्थवर्णीय; सेवा करून राहणारा; उपनयन संस्कार नसलेला.

शूद्रक (ಶೂದ್ರಕ) (सं) ना.–'मृच्छकटिक' नाटकाचा कर्ता.

शूद्रा (द्रे) (ಶೂದ್ರಾ [ದ್ರೆ]) (सं) ना.–शूद्रस्त्री; शेतकरीण; दुसऱ्याची सेवा करून राहणारी.

शूद्राणि (णी) (ಶೂದ್ರಾಣಿ[ಣೀ]) (सं) ना.–शूद्रस्त्री; शूद्राची पत्नी.

शून्य (ಶೂನ್ಯ) (सं) वि.–मोकळे; पोकळ; रिते; रिकामे; फोल; दुःखित; खिन्न.

(सं) ना.–शून्यचिन्ह; आकाश; हानी; मायाविद्या; नास्तिकता; वंचना.

शून्यवादि (ಶೂನ್ಯವಾದಿ) (सं) ना.–नास्तिक; निरीश्वरवादी; चार्वाक.

शून्यसंपादने (ಶೂನ್ಯಸಂಪಾದನೆ) (सं) ना.–श्रीप्रभुदेवाचा 'वचनग्रंथ'

शूर (ಶೂರ) (सं) वि.–धीर; धीट; वीर; पराक्रमी; बलिष्ठ; समर्थ. 'आकेबाळ' पहा.

(सं) ना.–सूर्य.

शूर्प (ಶೂರ್ಪ) (सं) ना.–'गेरसे' पहा. सूप.

शूर्पक (ಶೂರ್ಪಕ) (सं) ना.–कामवैरी; एक राक्षस.

शूर्पकर्ण (ಶೂರ್ಪಕರ್ಣ) (सं) ना.–सुपासारखे कान असलेला हत्ती. गणपति.

शूर्पनखि (ಶೂರ್ಪನಖಿ) (सं) ना.–सुपलीसारखी नखे असणारी; राक्षसी; रावणाची बहीण.

शूल (ಶೂಲ) (क) ना.–कष्ट; दुखणें; यातना; बर्ची; वीट; सुळी देण्याचा खांब; त्रिशूळ; सूळ.

शूलधर (पाणि) (ಶೂಲಧರ[ಪಾಣಿ]) (सं) ना.–त्रिशूळ धारण करणारा; शंकर.

शूलि (ಶೂಲಿ) (सं) ना.–शूल असलेला; परमेश्वर; शिव; नळाश्रित वातरोग असणारा.

शूले (ಶೂಲೆ) (सं) ना.–दुःख; ठणका; संधिवात; सूळ; नळाश्रित वातरोग.

शूल्य (ಶೂಲ್ಯ) (सं) ना.–भाजलेले मांस; सुळावर भाजलेले मांस.

शृगाल (ಶೃಗಾಲ) (सं) ना.–कोल्हा; जंबुक.

शृंखला (ले) (ಶೃಂಖಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–साखळी; बेडी; साखळदंड; दुवाजोड.

शृंखलाघटि (टी) (ಶೃಂಖಲಾಘಟಿ [ಟೀ] (सं) ना.–पोहरा; रहाटगाडगे; पाण्याचा रहाट.

शृंग (ಶೃಂಗ) (सं) ना.–शिंग; शिंगाडा; शेंडा; शिखर; पर्वतमाथा; एक वाद्य; प्रमुखता; मालक; एक ऋषि; उंची.

शृंगरिसु (ಶೃಂಗರಿಸು) (क) धा.–शृंगारणें; अलंकारणें; भूषविणें; सजणें; सजवणें; नटणें; नटविणें; शिस्त करणें.

शृंगार (ಶೃಂಗಾರ)–(सं) ना.–अलंकार; आभरण; रसराज; नवरसातील प्रथम रस; रतिविलास; शोभा.

—चेष्टे (ಚೇಷ್ಟೆ) (सं) ना.–प्रेमसूचक हावभाव; प्रणयाविर्भाव.

शृंगाट (टक) (ಶೃಂಗಾಟ [ಟಕ]) (सं) ना.–चव्हाठा; चौक; खूट; सेनाव्यूह.

शृंगारि (ಶೃಂಗಾರಿ) (सं) वि.–शृंगार करणारी; नटणारी; सुंदरी.

शृंगि (ಶೃಂಗಿ) (सं) ना.–शिंगे असलेली; शिखर असलेली; चितळ; ठिपक्याचे हरिण; मिश्रसुवर्ण; शिंगवण.

शृत (ಶೃತ) (सं) वि.–शिजवलेले; पाचित; उकडलेले; स्वयंपाक झालेले.

शेखर (ಶೇಖರ) (सं) ना.–श्रेष्ठ पुढारी; प्रमुख; नायक; नेता; किरीट; बाशिंग; बुचडा; वेणी; डोक्याचे केस.

शेखरिसु (ಶೇಖರಿಸು) (क) धा.–एकत्र करणें; संग्रहणें; गोळाकरणें; ढीग करणें.

शेतकि (ಶೇತಕಿ) (अ.दे) ना.–कृषिकर्म. 'बेसाय' पहा.
शेमुषि (षी) (ಶೇಮುಷಿ [ಷೀ])–(सं) ना.–ज्ञान; जाणीव; समजूत.
शेवल (वाल) (ಶೇವಲ [ವಾಲ]) (सं) ना.–शेवाळ; गंजाळ; अंतर्गंगा; पाचू; सुगंधी लाकूड.
शेष (ಶೇಷ) (सं) वि.–उरलेले; बाकी; शिल्लक.
(सं) ना.–आदिशेष; बलराम; लक्ष्मण; एक हत्ती.
——गिरि (ಗಿರಿ) (सं) ना.–तिरुपति पर्वत.
शेषधर (भूषण) (ಶೇಷಧರ [ಭೂಷಣ]) (सं)ना.–सर्पांचा अलंकार करणारा; शंकर; नागभूषण.
शेषशायि (ಶೇಷಸಾಯಿ) (सं) ना.–विष्णु.
शेषा (षे) (ಶೇಷಾ [ಷೆ]) (सं) ना.–कुंकुमाक्षता; मंगलाक्षता; प्रसाद; शेसभरण.
शेषेतळे (ಶೇಷೆತಳೆ) (क) धा.–अक्षता लावणें; अक्षता टाकणें; आशीर्वाद देणें.
शैक्षणिक (ಶೈಕ್ಷಣಿಕ) (सं) वि.–शिक्षणासंबंधी.
शैत्य (ಶೈತ್ಯ) (सं) ना.–थंडी; हुडहुडी; हिम; दव; धुके.
शैत्योपचार (ಶೈತ್ಯೋಪಚಾರ) (सं) ना.–बेशुद्धावस्था घालवण्यासाठी केलेले थंड उपचार.
शैथिल्य (ಶೈಥಿಲ್ಯ) (सं) ना.–ढिलेपणा; दुर्बलता; सैलपणा.
शैनेय (ಶೈನೇಯ) (सं) ना.–शनिपुत्र; सात्यकी.
शैल (ಶೈಲ) (सं) वि.–दगडी; दगडाचे; दगडानें भरलेला.
(सं) ना.–डोंगर; पर्वत.
——अट (ಅಟ) (सं) ना.–वनवास; वनसंचार; रानात राहणारा; श्वापद.
——धर (ಧರ) (सं) ना.–कृष्ण; गोवर्धनधारी.
——पत्र (ಪತ್ರ) (सं) ना.–बिल्वपत्र.
——सार (ಸಾರ) (सं) वि.–दगडासारखे घट्ट; कठीण; टणक; रथचक्राप्रमाणें कणखर.
——जा–जे (ಜಾ,–ಜೆ) (सं) ना.–पार्वती.
——धन्वा–धन्वन् (ಧನ್ವಾ [ಧನ್ವನ್]) (सं) ना.–शिव; परमेश्वर.
शैलादि (ಶೈಲಾದಿ) (सं) ना.–नदीश्वर; शिवाचा अनुयायी; शीलदऋषिपुत्र.
शैलालि (ಶೈಲಾಲಿ) (सं) ना.–नट; नर्तक; नाचा.
शैलिक्य (ಶೈಲಿಕ್ಯ) (सं) वि.–दुरभिमानी; वंचक; फसव्या.
शैली (लि) (ಶೈಲೀ [ಲಿ]) (सं) ना.–छेदक; परिच्छेद; वितरणरीति; विवेचनप्रणाली; वर्तन; रीतिक्रम; काव्यरचनेची विशिष्ट पद्धत.
शैलूष (ಶೈಲೂಷ) (सं) ना.–नट; नर्तक; गायक; नाटक; दुष्ट; बिल्वपत्र.
शैलेय (ಶೈಲೇಯ) (सं) ना.–शिलारस; शिलाजित; पर्वताप्रमाणे अचल; सिंह; सैंधव; सुगंधी पदार्थ.
शैव (ಶೈವ) (सं) ना.–शिवासंबंधी; शिवभक्त; शिवपूजक.
शैवल (वाल) (ಶೈವಲ [ವಾಲ]) (सं) ना.–शेवाळ; अंतर्गंगा.
शैवलिनि (नी) (ಶೈವಲಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–नदी; सरोवर.
शैशव (ಶೈಶವ) (सं) ना.–बाल्य; बाळपण; शिशुत्व; कौमार्य.
शैशिर (ಶೈಶಿರ) (सं) वि.–शिशिरासंबंधी; हिवाळयातील.
शोक (ಶೋಕ) (सं) ना.–दुखणें; गंडातर; कळवळा; इवळणूक. विलाप; रड.
—अग्नि (ಅಗ್ನಿ) (सं) ना.–दुःखाचा ताप; दुःखानल.
—आकुल (ಆಕುಲ) (सं) वि.–दुःखपूर्ण; दुःखविव्हल.
—आर्त (ಆರ್ತ) (सं) वि.–दुःखी; दुःखपीडित; अभागी.
शोचन ((ಶೋಚನ) (सं) ना.–दुःख; विलाप; रडारड;
शोचनीय (ಶೋಚನೀಯ) (सं) वि.–दुःखदायक; वाईट.
शोचिसु (ಶೋಚಿಸು) (क) धा.–दुःख करणें; विचार करणें; विलाप करणें; रडणें.
शोठ (ಶೋಠ) (सं) वि.–दुष्ट; आळशी ; वंचक.
शोण (ಶೋಣ) (सं) ना.–तांबडा रंग; किरमिजी वर्ण; अग्नि; रक्त; एक नदी.
—उपल (ಉಪಲ) (सं) ना.–माणिक; तांबडा खडा; पद्म; रक्त कमल.
शोणित (ಶೋಣಿತ) (सं) ना.–रक्त; आर्तव; विटाळ; किरमिजी रंग.
शोणितपुर (ಶೋಣಿತಪುರ) (सं) ना.–बाणासुराची राजधानी.
शोथ (ಶೋಥ) (सं) ना.–सूज; फुगवटा; फुगारा; फूग.
शोध (ಶೋಧ) (सं) ना.–तपास; हुडकणी; पत्ता; शुद्धकरण्याची क्रिया; गाळणे; ऋणमुक्ति.
—इसु (ಇಸು) (क) धा.–हुकडणें; पत्ता लावणें; परिशीलन करणें.
शोफ (ಶೋಫ) (सं) ना.–सूज; फुगवटा; तीव्र बंधन.
शोभन (ಶೋಭನ) (सं) ना.–शोभा; सौंदर्य; मांगल्य; आरास.
शोभर (ಶೋಭರ) (सं) ना.–निर्मलता; स्वच्छता; चोखपणा.
शोभा (भे) (ಶೋಭಾ [ಭೆ]) (सं) ना.–सुंदरता; आरास; प्रकाश; कांति; अलंकार; आनंद झगझगाट; ओप.
शोभायमान (ಶೋಭಾಯಮಾನ) (सं) वि.–चकाकणारे; शोभणारे; शोभून दिसणारे.
शोषण (ಶೋಷಣ) (सं) ना.–नागवण; नाडणूक; जिरवणी; वाळवण; ओढ.
शौच (ಶೌಚ) (सं) ना.–स्वच्छता; निर्मलता; शुद्धता; सोवळेपणा; मलविसर्जन.

**शौंड** (ಶೌಂಡ) (सं) वि.–समर्थ; श्रेष्ठ; निशाधुंद; उन्मत्त; अत्यासक्त.
**शौंडिक** (ಶೌಂಡಿಕ) (सं) वि.–दारू विकणारा; गुत्तेदार; अमली पदार्थ विक्रेता; आसवविकणारा.
**शौद्धोदनि** (ಶೌದ್ಧೋದನಿ) (सं) ना.–शुद्धोदनाचा पुत्र; बुद्धदेव.
**शौनक** (ಶೌನಕ) (सं) वि.–नैमिषारण्यातील एक ऋषि.
**शौरि** (ಶೌರಿ) (सं) ना.–कृष्ण; विष्णु; शनिदेव.
**शौर्य** (ಶೌರ್ಯ) (सं) ना.–पराक्रम; छातीठोकपणा; सामर्थ्य; पीळ.
**श्मशान** (ಶ್ಮಶಾನ) (सं) ना.–मसण; प्रेतभूमि; दहनभूमि; रुद्रनिवास.
**—वासि** (ವಾಸಿ) (सं) ना.–शंकर; स्मशानांत राहणारा.
**—विरक्ति** (ವಿರಕ್ತಿ) (सं) ना.–तात्पुरतें वैराग्य; क्षणिक विराग.
**श्मश्रु** (ಶ್ಮಶ್ರು) (सं) ना.–दाढीमिशी.
**श्याम** (ಶ್ಯಾಮ) (सं) ना.–काळा वर्ण; करकरीत तिन्हीसांज; संध्याकाळ; नीळ; हिरवा रंग.
**—घनश्याम** (ಘನಶ್ಯಾಮ) (सं) ना.–कृष्ण.
**—कर्ण** (ಕರ್ಣ) (सं) ना.–अश्वमेधाचा घोडा.
**श्यामला (ले)** (ಶ್ಯಾಮಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–काळ्या वर्णाची स्त्री; दुर्गा; पार्वती; यमुना नदी.
**श्यामाक** (ಶ್ಯಾಮಾಕ) (सं) ना.–सावा धान्य; वरई; वरी.
**श्यामांग** (ಶ್ಯಾಮಾಂಗ) (सं) ना.–कृष्ण; कृष्णा; कालिंदी.
**श्याला (लक)** (ಶ್ಯಾಲಾ [ಲಕ]) (सं) ना.–पत्नीचा भाऊ; मेहुणा; बहीणीचा पति.
**श्येन** (ಶ್ಯೇನ) (सं) ना.–ससाणा; शिकारी पक्षी; बहिरी ससाणा; श्वेतपक्षी. 'गिडग' पहा.
**श्रद्धा (द्धे)** (ಶ್ರದ್ಧಾ [ದ್ಧೆ]) (सं) ना.–विश्वास; इच्छा; मागणी; आदरबुद्धि; मान्यता; भक्ति.
**श्रद्धालु** (ಶ್ರದ್ಧಾಲು) (सं) वि.–विश्वासु; भक्तिमान.
**श्रम** (ಶ್ರಮ) (सं) ना.–थकवा; आयास; झीज; उद्योग; प्रयत्न; रूढी; वापर; काम.
**—इक** (ಇಕ) (सं) वि.–कष्ट करणारा; कसणारा; घाम; स्वेद; श्रमानें येणारे अंगांतील पाणी.
**श्रमण (णक)** (ಶ್ರಮಣ [ಣಕ]) (क) ना.–जैन संन्यासी; बौद्ध संन्यासी; भिक्षु; सायासी; परिश्रम; कष्ट.
**श्रय** (ಶ್ರಯ) (सं) ना.–आश्रय; आधार; जमीन; घर.
**श्रयणीय** (ಶ್ರಯಣೀಯ) (सं) वि.–आश्रयघेण्यायोग्य. आधार घेण्यासारखे; विश्राम्य.
**श्रव (वण)** (ಶ್ರವ [ವಣ]) (सं) ना.–ऐकणें; परिश्रुति.
**—इंद्रिय** (ಇಂದ್ರಿಯ) (सं) ना.–कान; श्रोत्र.
**श्राद्ध** (ಶ್ರಾದ್ಧ) (सं) ना.–श्रद्धेनें करावयाचे पितृतर्पण; वर्षांतिक; (सं) वि. श्रद्धावान; विश्वासु.
**श्राद्धदेव** (ಶ್ರಾದ್ಧದೇವ) (सं) ना.–यम; काळपुरुष.
**श्रांत** (ಶ್ರಾಂತ) (सं) वि.–दमलेला; थकलेला; शिणलेला; विश्रब्ध; शांत; स्वस्थ.
**श्रावक** (ಶ್ರಾವಕ) (सं) ना.–ऐकणारा; श्रोता; शिष्य; जैन धर्मी.
**श्रावण** (ಶ್ರಾವಣ) (सं) वि.–कानासंबंधी.
(सं) ना.–श्रावण महिना; श्रवणाचा पुत्र.
**श्राव्य** (ಶ್ರಾವ್ಯ) (सं) वि.–ऐकण्यास योग्य. मधुर; मनोहर.
**—काव्य** (ಕಾವ್ಯ) (सं) ना.–मात्रा वृत्तातील काव्य; संगीत.
**श्रित** (ಶ್ರಿತ) (सं) वि.–आश्रित; समाविष्ट; मानलेला; उपचार केलेला.
**श्री** (ಶ್ರೀ) (सं) ना.–लक्ष्मी; संपत्ति; ऐश्वर्य; कीर्ति; प्रभा; उन्नति; वाद; अलंकार; शोभा; मांगल्य; आशीर्वाद.
**श्रीकंठ** (ಶ್ರೀಕಂಠ) (सं) ना.–परमेश्वर.
**श्रीकर** (ಶ್ರೀಕರ) (सं) वि.–मंगल; धनसाधक; कांतिप्रद.
**श्रीकांत** (ಶ್ರೀಕಾಂತ) (सं) ना.–विष्णु; लक्ष्मीपति.
**श्रीकार** (ಶ್ರೀಕಾರ) (सं) ना.–'श्री' या प्रथमाक्षराची ओळख. आशीर्वचनात्मक लेखारंभीची श्री.
**श्रीखंड** (ಶ್ರೀಖಂಡ) (सं) ना.–चंदन; एक मधुर खाद्य; श्रीखंड.
**श्रीद** (ಶ್ರೀದ) (सं) ना.–संपत्ति देणारा; कुबेर.
**श्रीधर** (ಶ್ರೀಧರ) (सं) ना.–विष्णु; लक्ष्मीधर.
**श्रीनगर** (ಶ್ರೀನಗರ) (सं) ना.–काश्मीरांतील प्रमुख शहर.
**श्रीनंदन** (ಶ್ರೀನಂದನ) (सं) ना.–लक्ष्मीपुत्र; मदन; काम.
**श्रीनिवास** (ಶ್ರೀನಿವಾಸ) (सं) ना.–विष्णु; निवारा घेणारी श्री ज्याच्यावळ राहते असा.
**श्रीपति** (ಶ್ರೀಪತಿ) (सं) ना.–विष्णु.
**श्रीमत्** (ಶ್ರೀಮತ್) (सं) वि.–श्रीयुत; श्रीमंत.
**श्रीमुख** (ಶ್ರೀಮುಖ) (सं) ना.–एक संवत्सर; गुरु वडीलधारे याची चर्या; तेजस्वी चेहरा; देखणेपणा.
**श्रीरंग** (ಶ್ರೀರಂಗ) (सं) ना.–विष्णु; श्रीरंगपट्टण.
**श्रीवत्स** (ಶ್ರೀವತ್ಸ) (सं) ना.–विष्णु; विष्णूच्या छातीवरील मत्स्स.
**—अंक** (ಅಂಕ) (सं) ना.–श्रीवत्सलांछन.
**श्रीवत्सलांछन** (ಶ್ರೀವತ್ಸಲಾಂಛನ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण; श्रीवत्साची खूण असलेला.
**श्रीवधू** (ಶ್ರೀವಧು) (सं) ना.–लक्ष्मी.
**श्रीवर** (ಶ್ರೀವರ) (सं) ना.–विष्णु; कृष्ण.
**श्रीशैल** (ಶ್ರೀಶೈಲ) (सं) ना.–मल्लिकार्जुन लिंगोद्भव स्थान; पंडित आराध्यांचे अवतार स्थळ.

**श्रुत** (ಶ್ರುತ) (सं) वि.–ऐकलेलें; समजलेलें.
(सं) ना.–श्रुति; वेद; ज्ञान.

**श्रुतपडिसु** (ಶ್ರುತಪಡಿಸು) (क) धा.–निवेदन करणें; विनंती करणें; प्रार्थणें.

**श्रुतकीर्ति** (ಶ್ರುತಕೀರ್ತಿ) (सं) ना.–कीर्तिशाली; प्रसिद्ध; नावाजलेला; जैनयति.

**श्रुत (ति) देवि** (ಶ್ರುತ [ತಿ]ದೇವಿ) (सं) ना;–शारदा; सरस्वती.

**श्रुति** (ಶ್ರುತಿ) (सं) ना.–कान; श्रोत्र; श्रवण; ध्वनि; नाद; वेद.

**श्रेणि (णी)** (ಶ್ರೇಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–बढती; उन्नति; इयत्ता; ओळ; गट; समूह; सैन्यविभाग.

**श्रेय (यस) (यस्सु)** (ಶ್ರೇಯ [ಯಸ] [ಯಸ್ಸು]) (सं) ना.–कीर्ति; गौरव; सुदैव; क्षेम; मोक्ष; सुख.

**श्रेयः प्रार्थने** (ಶ್ರೇಯಃಪ್ರಾರ್ಥನೆ) (सं) ना.–आशीर्वादाची याचना; 'शुभं भवतु'ची अपेक्षा.

**श्रेयोभिलाषा** (ಶ್ರೇಯೋಭಿಲಾಷಾ) (सं) ना.–श्रेयाची इच्छा; श्रेयः प्रार्थना.

**श्रेष्ठ** (ಶ್ರೇಷ್ಠ) (सं) वि.–उत्तम; योग्य; अग्रगण्य; वडील.
(सं) ना.–राजा; कुबेर; ब्राह्मण; विष्णु.

**श्रेष्ठिन्** (ಶ್ರೇಷ್ಠಿನ್) (सं) ना.–व्यापारी; नायक; पुढारी; शेठ.

**श्रोण** (ಶ್ರೋಣ) (सं) वि.–लंगडा; पांगळा. 'हेळव' पहा.

**श्रोणि (णी)** (ಶ್ರೋಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–जघन; ढुंगण; नितंब; मार्ग; वाट.

**श्रोतव्य** (ಶ್ರೋತವ್ಯ) (सं) ना.–ऐकण्यासारखे; ऐकू येण्यासारखे.

**श्रोतृ (ता)** (ಶ್ರೋತೃ [ತಾ]) (सं) ना.–ऐकणारा; श्रोतृवृंद; लक्ष देणारा;

**श्रोत्र** (ಶ್ರೋತ್ರ) (सं) ना.–कान; हत्तीच्या सोंडेचा शेंडा.

**श्रोत्रिय** (ಶ್ರೋತ್ರಿಯ) (सं) ना.–वैदिकब्राह्मण; वेदपठण केलेला; पंडित.

**श्रौत** (ಶ್ರೌತ) (सं) ना.–वेदासंबंधी; वेदांत सांगितलेले; वेदसंमत; कानासंबंधी.

**श्लक्ष्ण** (ಶ್ಲಕ್ಷ್ಣ) (सं) वि.–चिकट; गुळगुळीत; स्निग्ध; दलदलीची (जमीन.)

**श्लथ** (ಶ್ಲಥ) (सं) वि.–ढिला; शिथिल; सैल; थलथलित.

**श्लाघन (ना) (ने)** (ಶ್ಲಾಘನ [ನಾ] ನೆ) (सं) ना.–स्तुति; गौरव; वर्णन; तोंडपूजेपणा.

**श्लाघा (घे)** (ಶ್ಲಾಘಾ [ಘೆ]) (सं) ना.–स्तुति; कीर्ति; वर्णन.

**श्लाघिसु** (ಶ್ಲಾಘಿಸು) (क) धा.–स्तुति करणें; स्तवन करणें; कीर्ति गाणें; वाखाणणें.

**श्लाघ्य** (ಶ್ಲಾಘ್ಯ) (सं) वि.–स्तुत्य; श्रेष्ठ; संभावित; सद्‌गृहस्थ.

**श्लिष्ट** (ಶ್ಲಿಷ್ಟ) (सं) वि.–मिसळलेला; जुळलेला; द्व्यर्थी; मिठी घातलेला.

**श्लेष** (ಶ್ಲೇಷ) (सं) ना.–मिश्रण; जुळणी; आलिंगन; एक शब्दालंकार.

**श्लेष्म** (ಶ್ಲೇಷ್ಮ) (सं) ना.–कफ; त्रिदोषांपैकी एक.

**श्लोक** (ಶ್ಲೋಕ) (सं) ना.–पद्य; कवन; कीर्ति.

**श्व (श्वन्)** (ಶ್ವ [ಶ್ವನ್]) (सं) ना.–कुत्रा; सारमेय; श्वान.

**श्वः** (ಶ್ವಃ) (सं) ना.–उद्या; भविष्यकाळीं.

**श्वपच** (ಶ್ವಪಚ) (सं) ना.–चांडाल; महार; अंत्यज.

**श्वपाक** (ಶ್ವಪಾ) (सं) ना.–चांडाल; महार.

**श्वशुर** (ಶ್ವಶುರ) (सं) ना.–सासरा.

**श्वश्रु (श्रू)** (ಶ್ವಶ್ರು [ಶ್ರೂ]) (सं) ना.–सासू.

**श्वसन** (ಶ್ವಸನ) (सं) ना.–श्वासोच्छ्वास; वायु.

**श्वसित** (ಶ್ವಸಿತ) (सं) वि.–श्वास; श्वासोच्छ्वास; दीर्घश्वास.

**श्वान** (ಶ್ವಾನ) (सं) ना.–कुत्रा; शुनक. 'सोणग' पहा.

**श्वापद** (ಶ್ವಾಪದ) (सं) ना.–क्रूर मृग; हिंस्रपशु; वाघसिंह.

**श्वास** (ಶ್ವಾಸ) (सं) ना.–वारा; हवा; श्वासोच्छ्वास; दमा.

**श्वासकास** (ಶ್ವಾಸಕಾಸ) (सं) ना.–दमा; श्वसनांत होणारा सुंई सुंई आवाज.

**श्वासकोश** (ಶ್ವಾಸಕೋಶ) (सं) ना.–फुप्फुस.

**श्वेत** (ಶ್ವೇತ) (सं) वि.–पांढरे; शुभ्र; सफेत.
—**केतु** (ಕೇತು) (सं) ना.–बौद्ध संन्यासी; जैन साधु.
—**छत्र** (ಛತ್ರ) (सं) ना.–पांढरी छत्री; राजछत्र; अबदागिरी.

**श्वेतक** (ಶ್ವೇತಕ) (सं) ना.–चांदी; रुपे; कवडसा; कवडा.

**श्वेतगरुत्** (ಶ್ವೇತಗರುತ್) (सं) ना.–बदक. 'बातु' पहा.

**श्वेतच्छद** (ಶ್ವೇತಚ್ಛದ) (सं) ना.–बदक.

**श्वेतद्वीप** (ಶ್ವೇತದ್ವೀಪ) (सं) ना.–वैकुंठ.

**श्वेतवर्णीय** (ಶ್ವೇತವರ್ಣೀಯ) (सं) वि.–यूरोपीय; गौरवर्णाचा; गोरा.

**श्वेतवाहन** (ಶ್ವೇತವಾಹನ) (सं) ना.–चंद्र; अर्जुन.

**श्वेतहय** (ಶ್ವೇತಹಯ) (सं) ना.–इंद्राश्व; पांढरा घोडा; उच्चैःश्रवा.

**श्वेतवाही** (ಶ್ವೇತವಾಹಿ) (सं) ना.–इंद्र; अर्जुन.

**श्वेताद्रि** (ಶ್ವೇತಾದ್ರಿ) (सं) ना.–कैलास पर्वत; रजतगिरी; मेरुपर्वत.

**श्वेतांबर** (ಶ್ವೇತಾಂಬರ) (सं) ना.–पांढरे कापड; शुभ्र वस्त्र; पांढरे कापड वापरणारा जैनपंथ.

**श्वेतांबरि** (ಶ್ವೇತಾಂಬರಿ) (सं) ना.–शुभ्रवासना; जैनसंन्यासिनी.

## ष

**ष** (ಷ) (सं) ना. – अवर्गीय ६ वें व्यंजन.
(सं) वि. – श्रेष्ठ; उत्तम.
(सं) ना. – नुकसान; अंत; बाकी; नाश; स्वातंत्र्यसाधना.

**षष् (ट्)** (ಷಷ್ [ಟ್]) (सं) वि. – सामासिक शब्दांत 'ष्' चा 'ट्' होतो; सहा.

**षट्क** (ಷಟ್ಕ) (सं) ना. – सहाचा गट.

**षट्कर्ण** (ಷಟ್ಕರ್ಣ) (सं) वि. – तिसऱ्यानें ऐकलेली गोष्ट; सहा कानांवर गेलेले; कर्णोपकर्णी गेलेलें.

**षट्कर्म** (ಷಟ್ಕರ್ಮ) (सं) ना. – ब्राह्मणाची सहा कर्में; (यजन; याजन; अध्ययन; अध्यापन; दान; प्रतिग्रह.) ब्राह्मणाच्या उपजीवनापुरतेच वाणिज्य; कृषिकर्म; शांति; वशीकरण; सहा योग.

**षट्कर्मि** (ಷಟ್ಕರ್ಮಿ) (सं) ना. – षट्कर्मी ब्राह्मण; ब्राह्मणाची योग्य कामे करणारा.

**षट्कोन** (ಷಟ್ಕೋನ) (सं) ना. – सहा भुजांची आकृति.

**षट्चक्र** (ಷಟ್ಚಕ್ರ) (सं) ना. – शरीरातील सहा प्रकारची चक्रें.

**षट्चरण (पद)** (ಷಟ್ಚರಣ [ಪದ]) (सं) ना. – सहा पायांचा भुंगा; भ्रमर.

**षट्पदि** (ಷಟ್ಪದಿ) (सं) ना. – भ्रमर; एक कन्नड काव्यप्रकार.

**षट्स्थल** (ಷಟ್ಸ್ಥಲ) (सं) ना. – वीरशैव धर्माचाराची सहा स्थानें.

**षडक्षर** (ಷಡಕ್ಷರ) (सं) ना. – 'ॐ नमः शिवाय' हा षडक्षरी मंत्र; एक वीरशैव कवि.

**षडंग** (ಷಡಂಗ) (सं) ना. – (कल्प; शिक्षा; व्याकरण; निरुक्त; छंद; ज्योतिष) ही वेदांची सहा अंगें.

**षडभिज्ञ** (ಷಡಭಿಜ್ಞ) (सं) ना. – बुद्धदेव.

**षडानन** (ಷಡಾನನ) (सं) ना. – षण्मुख; कार्तिकेय.

**षडिंद्रिय** (ಷಡಿಂದ್ರಿಯ) (सं) ना. – मनासह पंचज्ञानेंद्रियें.

**षडूर्मि** (ಷಡೂರ್ಮಿ) (सं) ना. – (तहान; भूक; दुःख; जरा; मरण; मोह) या सहा उर्मी; लाटा; इच्छा.

**षट्ऋतु** (ಷಡೃತು) (सं) ना. – वसंत; ग्रीष्म; वर्षा; शरद्; हेमंत; शिशिर हे सहा ऋतु.

**षड्गुण** (ಷಡ್ಗುಣ) (सं) ना. – क्षत्रियाचे सहा गुण; साध्वीस्त्रीचे सहा सद्गुण.

**षड्ज** (ಷಡ್ಜ) (सं) ना. – संगीतातील प्रथम स्वर; सा.

**षड्दर्शन** (ಷಡ್ದರ್ಶನ) (सं) ना. – सांख्य; योग; न्याय; वैशेषिक; मीमांसा व वेदांत ही सहा दर्शनें; सौर; वैष्णव; शाक्त; शैव; वैनायक व स्कांद हे सहा दर्शनमार्ग.

**षड्रस** (ಷಡ್ರಸ) (सं) ना. – मधुर; आम्ल; कटु; तिक्त; कषाय; व लवण हे सहा रस; सहा चवी.

**षड्रिपु (वैरि)** (ಷಡ್ರಿಪು [ವೈರಿ]) (सं) ना. – काम; क्रोध; लोभ; मोह; मद; मत्सर हे सहा अंतःशत्रु.

**षड्वर्ग** (ಷಡ್ವರ್ಗ) (सं) ना. – षड्वैरी; षड्रिपु.

**षंड** (ಷಂಡ) (सं) ना. – समूह; बैल; नपूंसक.

**षंडक (ढ)** (ಷಂಡಕ [ಢ]) (सं) ना. – पौरुषहीनत्व; नपूंसकत्व; पौरुषहीन मनुष्य.

**षण्मत** (ಷಣ್ಮತ) (सं) वि. – शैव; वैष्णव; सौर; गाणपत्य; शाक्त; कापालिक ही सहा धर्ममतें.

**षण्मुख** (ಷಣ್ಮುಖ) (सं) ना. – स्कंद; कार्तिकेय; कुमारस्वामी.

**षरायि** (ಷರಾಯಿ) (अ-दे) ना. – अंगी; विजार; शर्ट.

**षष्टि** (ಷಷ್ಟಿ) (सं) वि. – साठ.

**षष्ठ** (ಷಷ್ಠ) (सं) वि. – सहावा.

**षष्टिपूर्ति** (ಷಷ್ಟಿಪೂರ್ತಿ) (सं) ना. – षष्ट्यब्दिशांति; साठावी वर्षगांठ; षष्ट्यब्दि समारंभ.

**षष्ठि (ष्ठी)** (ಷಷ್ಠಿ [ಷ್ಠೀ]) (सं) ना. – सहावी तिथी; सहावी विभक्ति.

**षाड्गुण्य** (ಷಾಡ್ಗುಣ್ಯ) (सं) ना. – सहा सद्गुणांचा समूह.

**षाण्मातुर** (ಷಾಣ್ಮಾತುರ) (सं) ना. – कार्तिकेय; कुमारस्वामी; षण्मुख.

**षाण्मासिक** (ಷಾಣ್ಮಾಸಿಕ)(सं) वि. – सहामाही; सहा महिन्याचे; सहामाससंबंधीं.

**षिड्ग** (ಷಿಡ್ಗ) (सं) वि. – स्त्रीलंपट; जार; कामुक.

**षोकि** (ಷೋಕಿ) (अ-दे) वि. – विलासी; चैनी; (क.) ना. कामुकता; सौंदर्य.

**षोडश** (ಷೋಡಶ) (सं) वि. – सोळा; सोळावा; एक श्राद्ध.

**षोडशोपचार** (ಷೋಡಶೋಪಚಾರ) (सं) ना. – अतिथी किंवा देव यांना अर्पण करावयाची १६ पूजाविधानें

**षोढामुख** (ಷೋಢಾಮುಖ) (सं) ना. – षण्मुख; कार्तिकेय.

**ष्ठीव(वन)** (ಷ್ಠೀವ [ವನ]) (सं) ना. – थुंकी; पिंक; पिक.

# स

**स** (ಸ) (सं) अ.—अवर्गीय वर्णमालेंतील ७ वें अक्षर; एक उपपद; सहित; सम; सदृश; समान.
(सं) ना.—सर्प; वायु; पक्षी; संगीतांतील षड्ज स्वर; शिव; विष्णु.

**संय** (ಸಂಯ) (सं) ना.—अस्थिपंजर; वळकटी; सुरळी; गुंडाळी.

**संयत** (ಸಂಯತ) (सं) वि.—बद्ध; विलंबित; आधीन; निर्बंधित सिद्ध; अटक झालेला.
(सं) ना.—युद्ध.
—**चेत—मन** (ಚೇತ-ಮನ) (सं) वि.—मनावर ताबा ठेवणारा.

**संयतात्म** (ಸಂಯಮಿ) (सं) वि.—इंद्रियें ताब्यांत ठेवणारा; योगी.

**संयत्त** (ಸಂಯತ್ತ) (सं) वि.—सिद्ध; सज्ज; रक्षक; पहारेकरी.

**संयम (मन)** (ಸಂಯಮ [ಮನ]) (सं) ना.—इंद्रियनिग्रह; मनाची आवरशक्ति.

**संयमि** (ಸಂಯಮಿ) (सं) ना.—इंद्रियें कह्यांत असलेला; ऋषि; मुनी.

**संयुक्त** (ಸಂಯುಕ್ತ) (सं) वि.—मिश्रित; एकत्रित; बद्ध; एकूण; समाविष्ट.

**संयुग** (ಸಂಯುಗ) (सं) ना.—युद्ध; रणकंदन; सादृश्य; मिश्रित; विसाण.

**संयुत** (ಸಂಯುತ) (सं) वि.—मिसळलेला; एकत्रित; एकजीव झालेला.

**संयोग** (ಸಂಯೋಗ) (सं) ना.—जुळणी; मिश्रण; समावेश; विसाण.

**संयोजन** (ಸಂಯೋಜನ) (सं) ना.—जोडणी; मेळ; समावेश; मिश्रण.

**संरक्षक** (ಸಂರಕ್ಷಕ) (सं) ना.—पालक; जबाबदार; उत्तरदायी; रक्षक.

**संरक्षण (णे)** (ಸಂರಕ್ಷಣ [ಣೆ]) (सं) ना.—पालन; वाहन; जबाबदारी.

**संरक्षिसु** (ಸಂರಕ್ಷಿಸು) (क) धा.—जबाबदारी घेणें; पालन करणें; जोडीदार होणें; साह्य करणें.

**संरंभ** (ಸಂರಂಭ) (सं) ना.—वेग; आवेश; संभ्रम; उद्रेक; उत्साह; कळकळ; गोंधळ; गडबड; चीड; क्रोध.

**संराव** (ಸಂರಾವ) (सं) ना.—गर्जना; घोषणा; उद्घोष.

**संरुद्ध** (ಸಂರುದ್ಧ) (सं) वि.—प्रतिहत; भरलेला; विरुद्ध; वेढलेला; हल्ला झालेला; तिरस्कृत.

**संरोध** (ಸಂರೋಧ) सं ना.—अग्रदूत; अडचण; संकट; विघ्न; पुरःप्रेषण.

**संलग्न** (ಸಂಲಗ್ನ) (सं) वि.—चिकटलेलें; एकजीव झालेला; एकरूप; कललेला.
—**कोन** (ಕೋನ) (सं) ना.—लागूनचा कोन.

**संलाप** (ಸಂಲಾಪ) (सं) ना.—सलगीचें भाषण; मोकळ्या वेळच्या गप्पा.

**संवत्सर** (ಸಂವತ್ಸರ) (सं) ना.—एक संपूर्ण वर्ष.

**संवनन** (ಸಂವನನ) (सं) ना.—फसवणूक; भोळसटपणा; वेड.

**संवर (रण)** (ಸಂವರ [ರಣ]) (सं) ना.—झाकण; आवरण; दृष्टिआड करणें; सिद्धता; सेतु; बांध; संकोच; एक मृग; शबरासुर; पाणी; बौद्धांचा एक धार्मिक संस्कार; आत्मसंयमन.

**संवरणे (भरणे)** (ಸಂವರಣೆ [ಭರಣೆ]) (सं) ना.—सिद्धता; सज्जता; विस्तार; जबाबदारी.

**संवरिसु** (ಸಂವರಿಸು) (क) धा.—सिद्ध करणें; सज्ज ठेवणें; रक्षिणें; पालन करणें; बांध घालणें.

**संवर्त (र्तन)** (ಸಂವರ್ತ [ರ್ತನ]) (सं) ना.—प्रलयकाळचा मेघ; प्रवाहाची ओढ; डोह; प्रलयाग्नि; वडवाग्नि; बलराम.

**संवर्तक** (ಸಂವರ್ತಕ) (सं) ना.—दावानल; प्रलयमेघ; डोह.

**संवर्धक** (ಸಂವರ್ಧಕ) (सं) वि.—चांगलें वाढणारें; स्वागत करणारा; आशयपूर्ण.

**संवर्धित** (ಸಂವರ್ಧಿತ) (सं) वि.—पुष्ट; समृद्ध; विस्तृत; चांगल्या रीतीनें वाढलेला.

**संवसथ** (ಸಂವಸಥ) (सं) ना.—राहण्याचे ठिकाण; वसती; वाडी; लहान खेडें.

**संवाद** (ಸಂವಾದ) (सं) ना.—चर्चा; वादविवाद; संभाषण; बोलणें; तर्क; सादृश्य; मान्यता; बातमी; संगीतांतील संवादी स्वर; मतैक्य; विचारसादृश्य.

**संवाहक** (ಸಂವಾಹನ) (सं) वि.—मग्न असलेला; घर्षण करणारा; मर्दन करणारा; पाय चेपणारा; भार वाहणारा; जबाबदार.

**संवाहन** (ಸಂವಾಹನ) (सं) ना.—पायचेपणी; ओझें वाहणे; कार्यवाहकता.

**संवित्तिं** (ಸಂವಿತ್ತಿಂ) (सं) ना.—संवेदना; ज्ञान; जाणीव; समजूत; गणती; उल्लेख.

**संविधान** (ಸಂವಿಧಾನ) (सं) ना.—रचना; निर्माणकौशल्य; व्यवस्था; जोडणी; समावेश; संनिवेश; प्रसंग; शासन नियम.

**संवीक्षण** (ಸಂವೀಕ್ಷಣ)(सं) ना.—निरीक्षण; परीक्षण; संशोधन-

**संवृत** (ಸಂವೃತ) (सं) वि.—झाकलेले; आवृत; भरलेलें; प्राप्त.

संवेग (ಸಂವೇಗ) (सं) ना.—गडबड; त्वरा; घाई; वेग; आतुरता.

संवेद (दने) (ಸಂವೇದ [ದನೆ]) (सं) ना.—लागण; जाणीव; ज्ञान; मनाला पटणें; अनुभव; भावना; धारणा; बोध; ग्रहणशक्ति.

संवेश (ಸಂವೇಶ) (सं) ना.—सुखनिद्रा; विराम; विश्रांति; मग्नता.

संव्यान (ಸಂವ್ಯಾನ) (सं) ना.—उत्तरीय; उपरणें; दुपेटा; शाल; पांघरूण.

संशय (ಸಂಶಯ) (सं) ना.—देणगी; अनुमान; चूक; कल्पना; मानसिक आंदोलन.

संश्रय (ಸಂಶ್ರಯ) (सं) ना—आधार; असरा; पाठिंबा; आशय.

संश्लिष्ट (ಸಂಶ್ಲಿಷ್ಟ) (सं) वि.—आलिंगन दिलेला; अठीमिठी घातलेला.

संश्लेष (ಸಂಶ್ಲೇಷ) (सं) ना.—दृढालिंगन; मीलन; जवळीक.

संसक्त (ಸಂಸಕ್ತ) (सं) वि.—अतिसमीप; निकट; चिकटलेला; लागूनचा; गाढ संबंधी.

संसत् (द्) (ಸಂಸತ್ [ದ್]) (सं) ना.—महासभा; परिषद; बैठक; सभा; न्यायस्थान.

संसरण (ಸಂಸರಣ) (सं) ना.—गमन; चलन; संसार; प्रपंच; क्रांति; युद्धारंभ; राजमार्ग; पुनर्जन्म; सैन्यसंचलन; धर्मशाळा; इहलोक; ऐहिक सुख; जन्म.

संसर्ग (ಸಂಸರ್ಗ) (सं) ना.—संपर्क; संबंध; जोडीदारी; सादृश्यता; वापर; संभोग; समावेश; खूण; परिचय; सहकार; सहजीवन.

संसाद (ಸಂಸಾದ) (सं) ना.—संसद; महासभा; परिषद; न्यायालय.

संसार (ಸಂಸಾರ) (सं) ना.—प्रपंच; जीवन; कुटुंब; घराणें; पत्नि; चरितार्थ; जननमरणाचा फेरा; ऐहिक संबंध.

—गुरू (ಗುರು) (सं) ना.—मन्मथ; कामदेव.

संसारि (रिग) (ಸಂಸಾರಿ [ರಿಗ]) (सं) वि.—संसार करणारा; कुटुंबी; गृहस्थ; लौकिक विचारांत गुरफटलेला.

संसिद्धि (ಸಂಸಿದ್ಧಿ) (सं) ना.—सिद्धि; पुरवठा; लाभ; पूर्णता; हातीं लागणें.

संसृति (ಸಂಸೃತಿ) (सं) ना.—संसार; प्रपंच; लौकिक विचार; धर्म.

संसृष्ट (ಸಂಸೃಷ್ಟ) (सं) वि.—विराजित; जनित; समाविष्ट; मिश्रित; एकजीव झालेले.

संसृष्टि (ಸಂಸೃಷ್ಟಿ) (सं) ना.—मिश्रण; ऐक्य; पद्यसमस्या; अर्थालंकार; रचना; संग्रह.

संस्करण (ಸಂಸ್ಕರಣ) (सं) ना.—दुरुस्ती; सुधारणा; व्यवस्था; आवृत्ति; संस्कार.

संस्कार (ಸಂಸ್ಕಾರ) (सं) ना.—सिद्धता; व्यवस्था; रूपांतर; सुधारणा; कर्मफल; मतिविलास; धार्मिक विधी; व्यवहार; उत्तरक्रिया; पुट.

संस्कृत (ಸಂಸ್ಕೃತ) (सं) वि.—संस्कारित; व्यवस्थित; सुधारलेलें; उत्तम; शिजवलेले; शृंगारित; विवाहित; चोख; स्वच्छ.
(सं) ना.—गीर्वाणवणी; देववाणी.

संस्कृति (ಸಂಸ್ಕೃತಿ) (सं) ना.—सुधारणा; व्यवस्था; आचरणातील प्रगती; सभ्यता; सौजन्य; हृदयपरिवर्तन; हृदयशुद्धि.

संस्तर (रण) (ಸಂಸ್ತರ [ರಣ]) (सं) ना.—पदर; थर; घडी; निरी; अस्तर; अंथरूण; शय्या; दर्भ; चटई.

संस्थान (ಸಂಸ್ಥಾನ) (सं) ना.—राजकीय क्षेत्रविभाग; न्यास; ठेव; जहागीर; आकार; मठ.

संस्थानिक (ಸಂಸ್ಥಾನಿಕ) (सं) ना.—संस्थानचा स्वामी; राजा; प्रजापालक.

संस्थापन (ने) (ಸಂಸ್ಥಾಪನ [ನೆ]) (सं) ना.—पायाभरणी; देवतेची संस्थापना; संघसंस्थांचा प्रारंभ; शासनसंस्था; मतप्रसार.

संस्थिति (ಸಂಸ್ಥಿತಿ) (सं) ना.—सुस्थिती; उत्तम जीवन; क्षेम.

संस्था (स्थे) (ಸಂಸ್ಥಾ [ಸ್ಥೆ]) (सं) ना. संघ; समाज; बाजार; हाट; पेठ; लोकसमाज.

संहत (ಸಂಹತ) (सं) वि.—मारलेला; बडवलेला; बद्ध; नष्ट.

संहति (ಸಂಹತಿ) (सं) ना.—समूह; ढीग; एकी; एकता.

संहनन (ಸಂಹನನ) (सं) ना.—शरीर; दुखणें; मार; वध; खून.

संहर (हार) (ಸಂಹರ [ಹಾರ]) (सं) ना.—खून; नाश; कंदन; एकत्रीकरण; एकवटता; समारोप; अंत; निर्नाम; वध; खोडणें; पुसणें.

संहरिसु (ಸಂಹರಿಸು) (क) धा.—नाश करणें; ठार मारणें; संपवणें; शेवट लावणें; मागें घेणें; एकत्र करणें.

सहर्ष (ಸಂಹರ್ಷ) (सं) ना.—अतिसंतोष; परमानंद; रोमांच.

संहत (ता) (ते) (ಸಂಹತ [ತಾ] ತೆ) (सं) वि.—संग्रहित; ठेवलेलें; एकत्रित.
(सं) ना.—शासनसंग्रह; मनसंहिता; भारतीय घटना; पदप्रक्रिया; व्यवस्था.

संहृत (ಸಂಹೃತ) (सं) वि.—एकत्रित; संग्रहित; संक्षिप्त; मागें घेतलेले; उपसंहार केलेले.

संहृति (ಸಂಹೃತಿ) (सं) ना.—संहार; वध; खून; समारोप; एकत्रिकरण.

सकर्मक (ಸಕರ್ಮಕ) (सं) ना.—कर्म असलेला; कर्म असलेला धातु.

सकल (ಸಕಲ) (सं) ना.—सर्व; अखिल; पूर्ण; सबंध,

सकाम (ಸಕಾಮ) (सं) वि.–इच्छायुक्त; आकांक्षापूर्ण; तृप्त; कांतियुत.
(सं) अ.–खरोखर.
सकाल (ಸಕಾಲ) (सं) ना.–योग्य समय; सुवेळा; निश्चित वेळ; सुमुहूर्त.
सकुटुंब (ಸಕುಟುಂಬ) (सं) ना.–कुटुंबासह; घरच्या लोकांबरोबर.
सकुति (ಸಕುತಿ) (क) ना.–शक्ति; बळ; सामर्थ्य; पीळ.
सकुल्य (ಸಕುಲ್ಯ) (सं) वि–एकाच घराण्यांतील; दूरचे आप्त.
सकृत् (ಸಕೃತ್) (सं) अ.–एकदम; एकदां; एका सपाट्यांत; एकेवेळीं.
सकेशा (शे) (ಸಕೇಶಾ [ಶೆ]) (सं) ना.–मुंडन न केलेली विधवा.
सक (ಸಕ್ಕ) (सं) ना.–छकल; चूर; चकती; तुकडा; कण.
सक्कद (ಸಕ್ಕದ) (क) ना.–गीर्वाणभाषा; संस्कृत; नागरीभाषा.
सक्कि (ಸಕ್ಕಿ) (क) वि.–साक्षी; डोळ्यानें पाहणारा; प्रत्यक्ष पाहिलेला.
सक्त (ಸಕ್ತ) (सं) वि.–गुंतलेला; मग्न; मिश्र; एकजीव झालेला; बलवंत; कठीण; सक्तमजुरी.
सक्ति (ಸಕ್ತಿ) (सं) ना.–जोडणी; मिश्रण; विसण; मग्नता; बल; शक्ति.
सक्तु (ಸಕ್ತು) (सं) ना.–सातूचें पीठ; भाजणीचें पीठ.
सख (खाय) (ಸಖ [ಖಾಯ]) (सं) ना.–मित्र; स्नेही; आप्त.
सखि (खी) (ಸಖಿ [ಖೀ]) (सं) ना.–मित्र; मैत्रीण; सहेली; स्नेहिता.
सखे (ಸಖೆ) (क) ना.–शिखा; जाळ; ज्वाळा; आग; उष्णता; संकट.
सखेद (ಸಖೇದ) (सं) वि.–खेदसहित; दुःखित; संकटग्रस्त.
सखेदाश्चर्य (ಸಖೇದಾಶ್ಚರ್ಯ) (सं) ना.–दुःखमिश्र विस्मय.
सख्य (ಸಖ್ಯ) (सं) ना.–मैत्री; मित्रत्व; दोस्ती; स्नेह.
सगर्भ्य (ಸಗರ್ಭ್ಯ) (सं) ना.–सहोदर; सख्खे; एकाच आईच्या पोटचे.
सगाटिके (ಸಗಾಟಿಕೆ) (क) ना.–सलगी; सख्यता; स्नेहाचार; गाढ मैत्री.
सगाढ (ಸಗಾಢ) (सं) वि.–दाट; अति; घट्मूट.
(सं) वि.–वेग; आवेश; प्रमुखता; आधिक्य; शौर्य; साहस.
(सं) अ.–एकसारखे; न थांबतां.
—पेर् (रु) (ಪೆರ್ [ರು]) (क) धा.–अती होणें; वाढणें; जास्त होणें.
सगाढिके (ಸಗಾಢಿಕೆ) (सं) ना.–आधिक्य; दाटपणा; आवेश; वेग; शौर्य; पराक्रम.
सगुण (ಸಗುಣ) (सं) वि.–गुणयुक्त; आकार असलेला; ओवलेलें.
—उपासना (ಉಪಾಸನಾ) (सं) ना.–मूर्तिपूजा; मूर्तीच्या ठिकाणीं देवभाव कल्पून केलेली पूजा.
सगोत्र (ಸಗೋತ್ರ) (सं) ना.–समान गोत्र; एकवंश; एकाच वंशाचें; एक ऋषी असलेले.
सग्ग (ಸಗ್ಗ) (क) ना.–स्वर्ग; इंद्राचें राज्य; देवलोक.
सग्गळे (ಸಗ್ಗಳೆ) (सं) ना.–परवाल; भिस्त.
सग्गिग (ಸಗ್ಗಿಗ) (क) ना.–स्वर्गांत राहणारे; देव; अमर.
सग्गिगर (ಸಗ್ಗಿಗರ) (क) ना.–देवांचा राजा; इंद्र; सुरपति.
—आण्म } (ಆಣ್ಮ)
—अरेय—ओडेय } (ಅರೆಯ–ಒಡೆಯ) (क) ना.–स्वर्गाचा राजा अमरेंद्र.
सग्गिवट्टे (ಸಗ್ಗಿವಟ್ಟೆ) (क) ना.–स्वर्गमार्ग; देवसंचारपथ; आकाश.
सग्गु (ಸಗ್ಗು) (क) धा.–ओढणें; कह्यांत ठेवणें; वश होणें; मुठींत राहणें; पंजांत अडकणें; वाकून येणें.
सघाट (ड) (ಸಘಾಟ[ಡ]) (सं) ना.–'सगाढ' पहा.
संक (ಸಂಕ) (क) ना.–शंख; समुद्रशंख; फुंकण्याचा मोठा शंख; सेतु; पूल; नाकाच्यावरचें हाड.
संकट (ಸಂಕಟ) (सं) ना.–आपत्ति; गंडांतर; दुखणें; व्यथा; दुःख.
संकर (ಸಂಕರ) (सं) ना.–मिश्रण; समावेश; भिन्नजातीय शरीरसंबंध; शास्त्रपूत नसलेलें नातें; केर; धूळ.
संकर्षण (ಸಂಕರ್ಷಣ) (सं) ना.–ओढाताण; आकर्षण; नांगरटः नांगर; बलराम.
संकल (ಸಂಕಲ) (सं) ना.–बेरीज; मिळवणी; मिश्रण; विसाण; जोडणी; जुळणी.
संकलन (ने) (ಸಂಕಲನ [ನೆ]) (सं) ना.–रास; संबंध; मिश्रण; एकत्रीकरण; बेरीज; कथासंकलन; बांबू.
संकलित (ಸಂಕಲಿತ) (सं) वि.–एकत्रित; संग्रहित; संमिश्र; गृहीत; रास केलेले.
संकले (ಸಂಕಲೆ) (क) ना.–शृंखला; साखळी; बेडी; 'कोळ' पहा.
संकल्प (ಸಂಕಲ್ಪ) (सं) ना.–इच्छा; आकांक्षा; निर्णय; उद्देश; ध्येय; विचार; आलोचना; मन; हृदय; प्रतिज्ञा.
संकल्पज (जन्म) (ಸಂಕಲ್ಪಜ [ಜನ್ಮ]) (सं) वि.–संकल्पानेंच जन्मलेलें; काम; मदन.
संकयुक्त (ಸಂಕಸುಕ್ತ) (सं) वि.–चंचल; अस्थिर; झोकें खाणारा; बदलणारें; अचिर; दुष्ट; नीच; नेभळा; दुर्बल; नपूंसक.
संकाश (ಸಂಕಾಶ) (सं) ना.–सादृश्य; सामीप्य; जवळीक; शेजार; साम्य.

**संकीर्ण** (ಸಂಕೀರ್ಣ) (सं) वि.—एकत्रित; मिश्रित; एकवटलेलें; अडचणीचें.

**संकीर्तन (ने)** (ಸಂಕೀರ್ತನ [ನೆ]) (सं) ना.—प्रशंसा; स्तुति; प्रार्थना.

**संकु** (ಸಂಕು) (क) ना.—शंख; शिंप; फुंकण्याचा शंख;

**संकुचित** (ಸಂಕುಚಿತ) (सं) वि.—मिटलेलें; घडी पडलेलें; आखुड; लांडे; झाकलेलें; लहान; अल्पमनाचा.

**संकुल** (ಸಂಕುಲ) (सं) ना.—समूह; ढीग; कळप; युद्ध; भांडण,

**संके** (ಸಂಕೆ) (क) ना.—शंका; अनुमान; संदेह; पूर्वपक्ष.

**संकुलते** (ಸಂಕುಲತೆ) (क) ना.—बेभानता; कळवळ; गडबड.

**संकेत** (ಸಂಕೇತ) (सं) ना.—रहस्य; ओळख, चिन्ह; परिचय; संज्ञा; नियमबद्धता; कबुली; मान्यता.

**संकोच** (ಸಂಕೋಚ) (सं) ना.—संदेह; अनुमान; घडी; सुरकुती; आखडणी; विनय; दाक्षिण्य; भीति; अधैर्य.

**संकोले** (ಸಂಕೋಲೆ) (क) ना.—शृंखला; सांखळी; बेडी; आडदांडी; आडकांठी.

**संक्रंदन** (ಸಂಕ್ರಂದನ) (सं) ना.—इंद्र; देवेंद्र; ओरड; शंख; बोंब.

—**नंदन** (ನಂದನ) (सं) ना.—अर्जुन.

**संक्रम** (ಸಂಕ್ರಮ) (सं) ना.—प्रस्तावना; प्रगति; सोबत; संगत; मिळून जाणें; जोडीनें जाणें.

**संक्रमण** (ಸಂಕ್ರಮಣ) (सं) ना.—प्रगति; सूर्याचें एका राशींतून दुसऱ्या राशींत जाणें; (मकरवृत्तांतून सूर्याचें उत्तरेस प्रयाण.)

—**मकरसंक्रमण** (ಮಕರಸಂಕ್ರಮಣ) मकरवृत्तांतून सूर्याचें उत्तरेस प्रयाण.

**संक्रमिसु** (ಸಂಕ್ರಮಿಸು) (क) धा.—पार करविणें; पुढें चालणें; आघाडीवर जाणें.

**संक्रांति** (ಸಂಕ್ರಾಂತಿ) (सं) ना.—मकरवृत्तांतून सूर्याचें उत्तरेस प्रयाण.

**संक्लेश** (ಸಂಕ್ಲೇಶ) (सं) ना.—अति दुःख; अति मोठी व्यथा.

**संक्षिप्त** (ಸಂಕ್ಷಿಪ್ತ) (सं) वि.—लहान केलेलें; थोडक्यांत आणलेले; सारांशानें सांगितलेलें.

**संक्षेप** (ಸಂಕ್ಷೇಪ) (सं) ना.—सारांश; तात्पर्य; लहान रूप; सारांश दिलेलें.

**संक्षेपिसु** (ಸಂಕ್ಷೇಪಿಸು) (क) धा.—सारांश देणें; थोडक्यांत सांगणें; आटोपसर मांडणें; तात्पर्य काढणें.

**संक्षोभ** (ಸಂಕ್ಷೋಭ) (सं) ना.—तळमळ; चित्तचांचल्य; उद्वेग; कालवाकालव; भीति; भय.

**संख्या (ख्ये)** (ಸಂಖ್ಯಾ [ಖ್ಯೆ]) (सं) ना.—अंक; हिशेब; विचार; युद्ध.

**संख्यात** (ಸಂಖ್ಯಾತ) (सं) वि.—प्रशासित; हिशेब केलेले; विचारपूर्ण.

**संग** (ಸಂಗ) (सं) ना.—मैत्री; संबंध; साम्य; जोडणी; (क) ना.—संघ; संस्था; गट; पक्ष; समूह.

**संगड** (ಸಂಗಡ) (क) अ.—मिळून मिसळून; बरोबरीनें; एक होऊन; एकजीवपणें.

**संगडिग** (ಸಂಗಡಿಗ) (क) ना.—जोडीदार; नातेवाईक; स्नेही; संगतीला असणारा.

**संगडिसु** (ಸಂಗಡಿಸು) (क) धा.—जोडीदार होणें; स्नेह करणें; संगतीला राहणें; एकत्र होणें.

**संगत** (ಸಂಗತ) (सं) वि.—जोडीदार; मिश्रित; जुळलेला; एकजीव झालेला; कार्यकारणभाव असलेला; चकाकणारा.

**संगति** (ಸಂಗತಿ) (सं) ना.—मिश्रण; चलन; वर्तन; विषय; मैत्री; स्नेह; व्यवहार; प्रसंग.

**संगम** (ಸಂಗಮ) (सं) ना.—रतिविलास; प्रवेश; दोन नद्यांचा प्रवाह मेळ; नद्यांचें मीलन.

**संगर** (ಸಂಗರ) (सं) ना.—युद्ध; भांडण; विपत्ति; प्रतिज्ञा.

**संगळिसु** (ಸಂಗಳಿಸು) (क) धा.—घडविणें; जोडणें; अस्तित्वांत येणें; संभवणें; होणें; मिसळणें; संघटन होणें.

**संगात** (ಸಂಗಾತ) (क) ना.—सोबत; जोड; प्रवेश; स्नेह; मालकी; नातें; समूह; रास; ठोसा.

**संगाति** (ಸಂಗಾತಿ) (क) ना.—जोडीदार; सांगाती; सोबती; मित्र; स्नेही; नातेवाईक; आप्त

**संगीत** (ಸಂಗೀತ) (सं) वि.—गुणगान केलेला; पुष्कळ स्तविलेला.

(सं) ना.—गायन; नृत्य; वाद्य; यांचा संयोग.

**संगोळिसु** (ಸಂಗೊಳಿಸು) (क) धा.—जुळवणें; जोडणें; प्राप्त करून घेणें; सिद्ध करणें; सज करणें.

**संगोपन** (ಸಂಗೋಪನ) (सं) ना.—जोपासना; साथ; जोडीदारी.

—**शिशुसंगोपन** (ಶಿಶುಸಂಗೋಪನ) (सं) ना.—मुलांचा सांभाळ; शिशु संरक्षण.

**संग्रह (ह्ण)** (ಸಂಗ್ರಹ [ಹಣ]) (सं) ना.—रास; संचय; ढीग; संक्षेप; सार.

**संग्राणिसु** (ಸಂಗ್ರಹಿಸು) (क) धा.—संग्रह करणें; गोळा करणें; समूह करणें; ढीग करणें; धारण करणें.

**संग्राम** (ಸಂಗ್ರಾಮ) (सं) ना.—युद्ध; रणकंदन.

**संग्रासि** (ಸಂಗ್ರಾಸಿ) (सं) वि.—विनाशक; सर्वभक्षक; ग्रासून टाकणारा.

**संघ** (ಸಂಘ) (सं) ना.—संस्था; लोकसमूह; पक्ष; गट.

**संघटना (ने)** (ಸಂಘಟನಾ [ನೆ]) (सं) ना.—जोडणी; प्रवेश; साम्य; अस्तित्व; संभावना; एकत्रीकरण.

**संघटिसु** (ಸಂಘಟಿಸು) (क) धा. – संघटना करणें; अस्तित्वांत येणें उत्पन्न होणें; संभवणें; प्राप्त होणें; जुळून येणें.

**संघटन** (ಸಂಘಟ್ಟನ) (सं) ना. – घर्षण; मारामारी; भांडण; झगडा.

**संघर्ष (र्षण)** (ಸಂಘರ್ಷ [ರ್ಷಣ]) (सं) ना. – भांडण; स्पर्धा; चढाओढ; झगडा.

**संघात** (ಸಂಘಾತ) (सं) ना. – समूह; गट; ऐक्य; खून; हत्या; नर्कविशेष.

**सचर** (ಸಚರ) (सं) वि. – फिरणारा; भटकणारा.

**सचराचर** (ಸಚರಾಚರ) (सं) ना. – स्थावरजंगम; फिरणारा न फिरणारा; स्थिरास्थिर; प्रपंच; संसार.

**सचि** (ಸಚಿ) (सं) ना. – इंद्रपत्नि; शची; सखी; मैत्रिण; सलगी; नातें; मंत्री; सभासद.

**सचिव** (ಸಚಿವ) (सं) ना. – मंत्री; प्रधान; सल्ला देणारा; विचार करणारा; आलोचक; मित्र.

**सचेतन** (ಸಚೇತನ) (सं) वि. – जाणीव असलेला; चेतना असलेला; प्रज्ञावंत; बुद्धिमान.

**सचेल** (ಸಚೇಲ) (सं) वि. – वस्त्रसहित; अंगावर कपडे घातलेला.
 —**स्नान** (ಸ್ನಾನ) (सं) ना. – सवस्त्र स्नान; कपड्यासह अंघोळ.

**सच्चरित** (ಸಚ್ಚರಿತ) (सं) ना. – सद्वर्तन; सद्गुण; सदाचार; (सं) वि. कुलवंत; सुशिक्षित; सदाचारी.

**सच्चिदानंद** (ಸಚ್ಚಿದಾನಂದ) (सं) ना. – ब्रह्मानंद; अस्तित्व, ज्ञान व आनंद यांची एकात्मता; परमात्मा.

**सच्छील** (ಸಚ್ಛೀಲ) (सं) ना. – सद्वर्तन; सदाचार (सं) वि. सदाचारी.

**सजल** (ಸಜಲ) (सं) वि. – पाणी असलेले; भिजलेले; ठिबकणारे.
 —**नयन** (ನಯನ) (सं) ना. – अश्रूपूर्ण नेत्र; पाणावलेले डोळे.

**सजा** (ಸಜಾ) (अ. दे) ना. – शिक्षा; बंदिवास.

**सजाति** (ಸಜಾತಿ) (सं) वि. – एकच कुल – जन्मस्थान – वर्ग असलेला; एकच प्रकारचे.

**सजातीय** (ಸಜಾತೀಯ) (सं) वि. – एकाच वर्णाचे; एकच जातीचे.

**सजीव** (ಸಜೀವ) (सं) वि. – जिवंत; जीव असलेला; वाढता; वाढीच्या लक्षणाचा.

**सज्जं** (ಸಜ್ಜಂ) (सं) वि. – सिद्ध; तयार; अनुकूल; अलंकृत. (सं) ना. – सिद्धता; छड्डू; तयारी.

**सजन** (ಸಜ್ಜನ) (सं) ना. – सभ्य; सुजन; संभावित; पाहारा; प्रतिज्ञा; पोषाख; धर्मपत्नि.

**सजनिके** (ಸಜ್ಜನಿಕೆ) (क) ना. – सभ्यता; सुजनता; चांगुलपणा.

**सजरस** (ಸಜ್ಜರಸ) (क) ना. – राळ.

**सजिके** (ಸಜ್ಜಿಗೆ) (क) ना. – गव्हाचा सांजा; रवा; शिरा; सोजी.

**सजित** (ಸಜ್ಜಿತ) (सं) वि. – सिद्ध; तयार; प्राप्त; सज्ज.

**सज्जीकरिसु** (ಸಜ್ಜೀಕರಿಸು) (क) धा. – सिद्ध करणें; तयार करणें.

**सज्जीकृत** (ಸಜ್ಜೀಕೃತ) (सं) वि. – सिद्ध; तयार असलेले.

**सज्जु** (ಸಜ್ಜು) (सं) ना. – सिद्धता; तयारी.

**सज्जुक** (ಸಜ್ಜುಕ) (क) वि. – नूतन; नवीन; मुग्ध. (क) ना. – कळी; मुकुल.

**सज्जुगेय्** (ಸಜ್ಜುಗೆಯ್) (क) धा. – सिद्ध करणें; अनुकूल करणें; नेम धरणें; प्राप्त करून घेणें.

**स (से) ज्जे** (ಸ [ಸೆ] ಜ್ಜೆ) (क) ना. – शय्या; शय्यागृह; शयनमंदिर; अंथरूण; पलंग; विश्रांतिस्थान.
 —**वळ (ळ)** (ವಳ [ಳ್ಳ]) (क) ना. – कंचुकी; शयन-गृहाधिकारी.

**संच** (ಸಂಚ) (क) धा. – उपाय; युक्ति; योजना; वंचना; कुशलता; संग्रह; समूह; रहस्य; गुप्तगोष्ट.

**संचकार** (ಸಂಚಕಾರ) (क) ना. – आगाऊ दिलेला पैसा; इसारा; पूर्वालोचना; पूर्वयोजना.

**संचन** (ಸಂಚನ) (सं) ना. – युक्ति; योजना; फसवणूक.

**संचय** (ಸಂಚಯ) (सं) ना. – संग्रह; समूह; रास; मिळकतीतील ठेवा; उत्पन्न.

**संचयन** (ಸಂಚಯನ) (सं) ना. – साठा; संग्रह; गोळा; प्रेताची हाडें गोळा करणें.

**संचर** (ಸಂಚರ) (सं) ना. – मार्ग; संक्रमण; अरुंद रस्ता; पांद; संकुचित मार्ग; द्वार; प्रवेश; देह; खून; अभिवृद्धि.

**संचरण** (ಸಂಚರಣ) (सं) ना. – संचार; चलन; आचरण; वर्तन.

**संचरत्** (ಸಂಚರತ್) (सं) वि. – जाणारा; संचार करणारा.

**संचलन** (ಸಂಚಲನ) (सं) ना. – वेग; गति.

**संचल** (ಸಂಚಲ) (सं) वि. – हलणारा; झोके घेणारा; चळवळ करणारा; विलोल.

**संचार** (ಸಂಚಾರ) (सं) ना. – प्रयाण; फिरती; भ्रमण; प्रवास; भ्रमंती.

**संचारमापक** (ಸಂಚಾರಮಾಪಕ) (सं) ना. – वाहनातील गतिदर्शक यंत्र.

**संचारि** (ಸಂಚಾರಿ) (सं) वि. – फिरता; अस्थिर; चंचल.

**संचारिभाव** (ಸಂಚಾರಿಭಾವ) (सं) ना. – रसपोषक अनुकूलभावना; निर्वेद, ग्लानि वगैरे संचारी भाव.

**संचालन (ने)** (ಸಂಚಾಲನ [ನೆ]) (सं) ना. – चलन; आंदोलन; कंपन.

**संचि** (ಸಂಚಿ) (क) ना.—चंची; लहान पिशवी; तांबूल करंडक घेऊन उभी राहणारी दासी; हडपिणी.

**संचिका (के)** (ಸಂಚಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—ताडपत्री लेख. पुस्तकाची पानें.

**संचिग** (ಸಂಚಿಗ) (क) वि.—ठक; फसव्या; तांबूल देणारा; हडप.

**संचियहोन्नम्म** (ಸಂಚಿಯಹೊನ್ನಮ್ಮ) (क) ना.—एक कन्नड कवयित्री.

**संचित** (ಸಂಚಿತ) (सं) वि.—एकत्रित केलेले; गोळा केलेले. (सं) ना.—पूर्वजन्मातील पापपुण्याचा परिणाम; साठलेले पाप.

**संचु** (ಸಂಚು) (सं) ना.—समूह; ढीग; उपाय; युक्ति. तंत्रवंचना; जाणतेपणा; युक्ति.

**संचुगार** (ಸಂಚುಗಾರ) (क) ना.—गुप्तचर; हेर; चारचक्षु.

**संछन्न** (ಸಂಛನ್ನ) (सं) वि.—छपविलेले; झाकलेले. पांघरूण घातलेले; गुप्त.

**संजनित** (ಸಂಜನಿತ) (सं) वि.—जन्मलेले; उपजलेले; उद्भवलेले; उत्पन्न झालेले.

**संजनिसु** (ಸಂಜನಿಸು) (क) धा.—उत्पन्न करणें; संभवणें.

**संजय** (ಸಂಜಯ) (सं) ना.—धृतराष्ट्राचा बातमीदार;—रायभारी.

**संजात** (ಸಂಜಾತ) (सं) वि.—जन्मलेले; उत्पन्न झालेले. (सं) ना.—समूह; ढीग; रास.

**संजीव** (ಸಂಜೀವ) (सं) वि.—मिळून राहणारा; वाचलेला. (सं) ना.—चिरंजीव; हनुमान्

**संजीवन (नी)** (ಸಂಜೀವನ [ನಿ] } (सं) ना.—मृतांना पुनः
**संजीविनि (नी)** (ಸಂಜೀವಿನಿ [ನಿ] } जिवंत करणारी वनस्पति.

**संजे** (ಸಂಜೆ) (क) ना.—सांज; संध्या; सायंकाळ; अपराण्ह; मावळता काल.

**संजोग** (ಸಂಜೋಗ) (सं) ना.—पोलादी कवच; चिलखत.

**संज्ञ (ज्ञा)** (ಸಂಜ್ಞ) [ಜ್ಞಾ] (सं) ना.—संकेत; हस्तचिन्ह; मुखावरील हावभाव; जाणीव; प्रज्ञा; समजूत; नांव; सूर्यपत्नी.

**सट** (ಸಟೆ) (क) ना.—शठ; दुरभिमान; अहंकार; मस्ती; माज; हट्टीपणा.

**सटे (टा)** (ಸಟೆ[ಟಾ]) (सं) ना.—जटा; पारंबी; आयाळ; केसर. (क) ना.—असत्य; वंचना; फसवणूक.

**सट्टुग** (ಸಟ್ಟುಗ) (क) ना.—पळी; चमचा; डाव.

**सडग (कु)** (ಸಡಗ [ಕು] (क) वि.—जवळचे; कडेचे; शेवटचे. (क) ना.—तोडा; आभरणविशेष; निशाणाचा गोंडा; आरास; संभ्रम; गडबड; हुरूप; सौंदर्य; शोभा.

**सडगरिसु** (ಸಡಗರಿಸು) (क) धा.—श्रृंगारणें; अलंकारणें; पीळ देणें.

**सडलु (ल्)** (ಸಡಿಲು [ಲ್]) (क) वि.—शिथिल; घट्ट नसलेले; ढिले.

**सडलिसु** (ಸಡಲಿಸು) (क) धा.—शिथिल करणें; सैल करणें; आवळण्याचें टाळणें.

**सडिल् (लु)** (ಸಡಿಲ್ [ಲು]) (क) वि. सैल; ढिले; शिथिल.

**सडिलिसु** } (ಸಡಿಲಿಸು) (क) धा.—सैल करणें; ढिलावणें;
**सडिल्चु** } (ಸಡಿಲ್ಚು) शिथिल होणें; आवळण्याचे टाळणें.

**सड्डुक** (ಸಡ್ಡಕ) (क) ना.—षट्क; साडू; पत्नीच्या बहिणीचा नवरा.

**सड्डुहोडे** (ಸಡ್ಡುಹೊಡೆ) (क) धा.—आव्हान देणें; छड्डू मारणें; दंड थोपटणें; साहसाला सिद्ध होणें; आक्रमणाला तयार होणें.

**सड्डे** (ಸಡ್ಡೆ) (क) ना.—श्रद्धा; ठाम विचार; विश्वास; दृढभाव. गौरवबुद्धि; अचलमन.

**सणे** (ಸಣೆ) (क) धा.—क्रोधाला येणें; रागावणें; चिडणें; क्रोधानें कपडे फाडणें.

**सण्णिसु** (ಸಣ್ಣಿಸು) (क) धा.—लहान करणें; उगाळणें; कृश करणें; चाळणें; छानणें.

**सत्** (ಸತ್) (सं) वि.—अस्तित्वात असलेला; चांगला; उत्तम; प्रशस्त.
(सं) ना.—ज्ञान; पूजा; सत्य.

**सतत** (ಸತತ) (सं) अ.—कायमचे; न थांबतां; अखंड; वारंवार.

**सततगति** (ಸತತಗತಿ) (सं) ना.—नित्यसंचारी; वारा; हवा.

**सति (ती)** ಸತಿ [ತೀ]) (सं) ना.—पत्नी; भार्या; साध्वी; निष्ठावान स्त्री; पतिव्रता; सहगमन.
—होगु (ಹೋಗು) (क) धा.—सहगमन करणें; सती जाणें; मृतपतीच्या चितेवर आपला देह ठेवणें.

**सतीर्थ (र्थ्य)** ಸತೀರ್ಥ [ರ್ಥ್ಯ] (सं) ना.—सहाध्यायी; सहपाठी; वर्गबंधु.

**सत्कथा (थे)** (ಸತ್ಕಥಾ[ಥೆ]) नीतिकथा; बोधकथा; पौराणिक पुण्यकथा; सज्जनचरित्र.

**सत्करिसु** (ಸತ್ಕರಿಸು) (क) धा.—सत्कार करणें; गौरव करणें; उपचार करणें.

**सत्कर्म** (ಸತ್ಕರ್ಮ) (सं) ना.—चांगलें कृत्य; पुण्यकर्म.

**सत्कार** (ಸತ್ಕಾರ) (सं) ना.—उपचार; आदर; गौरव; मान्यता.

**सत्कार्य** (ಸತ್ಕಾರ್ಯ) (सं) ना.—सत्कृत्य; पुण्यकर्म

**सत्कीर्ति** (ಸತ್ಕೀರ್ತಿ) (सं) ना.—सुयश; प्रसिद्धि; विख्याति.

**सत्कुल** (ಸತ್ಕುಲ) (सं) ना.—चांगला वंश; श्रेष्ठ घराणें.
—जात,—प्रसूत (ಜಾತ-ಪ್ರಸೂತ) (सं) वि.—कुलीन; घरंदाज; चांगल्या वंशात जन्मलेला.

**सत्कृति (त्य)** (ಸತ್ಕೃತಿ[ತ್ಯ]) (सं) वि.—सत्कार; न्याय्यकृति; उपकार; उपचार; मान्यता; गौरव.

**सत्त** (ಸತ್ತ) (सं) वि.—मृत; जीव गेलेला; निःसत्त्व; प्रेतवत्; लज्जित; खजील; सात; साताची पट.

सत्तम (ಸತ್ತಮ) (क) वि.—श्रेष्ठ; उत्कृष्ट.
सत्तिगे (ಸತ್ತಿಗೆ) (क) ना.—छत्री; आतपत्र.
सत्ते (त्ता) (ಸತ್ತೆ [ತ್ತಾ]) (सं) ना.—अधिकार; मालकी; प्रमुखत्व; यजमानकी; आस्तित्त्व प्रदर्शन; जीवन.
सत्पथ (ಸತ್ಪಥ) (सं) ना.- सुमार्ग; चांगली चालरीत; पुण्यमार्ग.
सत्पात्र (ಸತ್ಪಾತ್ರ) (सं) वि.—योग्य; जुळण्यासारखा.
—दान (ದಾನ) (सं) ना.—योग्य ठिकाणीं केलेलें दान.
सत्पुरुष (ಸತ್ಪುರುಷ) (सं) ना.—साधु; सदाचारी; सुज्ञानी; संभावित; सज्जन.
सत्फल (ಸತ್ಫಲ) (सं) ना.—चांगला परिणाम; मधुर फळ.
सत्य (ಸತ್ಯ) (सं) ना.—खरें; यथार्थ; सौंदर्य; सत्यवंत.
सत्यवंत (ಸತ್ಯವಂತ) (सं) वि.—प्रामाणिक; खरे बोलणारा; यथार्थ भाषी.
सत्यव्रत (संध) (ಸತ್ಯವ್ರತ[ಸಂಧ]) (सं) ना.—वचन पाळणारा; खरे बोलणारा; भीष्माचार्य; सत्यवादी.
सत्यार्थ (ಸತ್ಯಾರ್ಥ) (सं) ना.—खरा अर्थ; रहस्य; तात्पर्य.
सत्र (ಸತ್ರ) (सं) ना.—यज्ञ; यज्ञस्थळ; छत्र; धर्मशाळा; सदावर्त.
सत्त्व (ಸತ್ತ್ವ) (सं) ना.—बल; सामर्थ्य; पीळ; स्थिति; जीवन; सार; अर्क; रहस्य; प्राणी; जीव; जंतु.
सत्त्वगुण (ಸತ್ವಗುಣ) (सं) ना.—हितचिंतन; दुसऱ्याचे कल्याण इच्छिणें; सुस्वभाव; प्राण; श्वासोच्छ्वास; हृदय; आत्मा; आयुष्य; आकाश; पार्वती; घोडा.
सत्त्वर (ಸತ್ವರ) (सं) ना.—तीव्रता; गडबड; घाई; शीघ्रता; लगबग.
सत्त्वशालि (ಸತ್ತ್ವಶಾಲಿ) (सं) वि.—पौरुषयुक्त; शूर; धीर.
सत्त्वातिशय } (ಸತ್ತ್ವಾತಿಶಯ) सत्त्वाधिक } (ಸತ್ತ್ವಾಧಿಕ) (सं) ना.—अंतिमबलशाली; श्रेष्ठ व्यक्तित्व; प्राणिश्रेष्ठ; पुरुषसिंह.
सत्त्वात्मक (ಸತ್ತ್ವಾತ್ಮಕ) (सं) वि.—बलशाली; सामर्थ्यवान; आत्मबलशाली.
सत्संग (ಸತ್ಸಂಗ) (सं) ना.—सज्जनसहवास; साधुसंगती; संभाविताशीं मैत्री; सुवृत्तांची सोबत.
सद् (ಸದ್) (सं) ना.—सत्य; ज्ञान; पूजा.
(सं) वि.—चांगलें; उत्तम; प्रशस्त.
सदकु (ಸದಕು) (क) धा.—देह मऊ करणें; तिंबणें; मर्दन करणें; मारून मऊ करणें.
सदन (ಸದನ) (सं) ना.—घर; निवास; बिऱ्हाड; नाश; नष्टता; राखरांगोळी.
सदमल (ಸದಮಲ) (सं) वि.—सत्यशुद्ध; परिशुद्ध; पवित्र; निर्मल.
सदय (ಸದಯ) (सं) वि.—दयाशील; कोमल अंतःकरणाचा; उपकारबुद्धीचा.
सदर (ಸದರ) (क) वि.—हलका; सहज; सरळ; सलगीचा; लहान.
(अ. दे.) ना.—सिंहासन; न्यायासन; दिवाणखाना.
(अ. दे.) वि.—उपरि निर्दिष्ट; पूर्वोक्त; वर सांगितलेले.
सदर्थ (ಸದರ್ಥ) (सं) ना.—सत्यज्ञान; श्रेष्ठ; तात्पर्य.
सदसत् (ಸದಸತ್) (सं) वि.—बरे वाईट; भलेंबुरें; हिताहित; असले नसलेलें.
—विवेक (ವಿವೇಕ) (सं) ना.—खऱ्या खोट्याचा विचार करणारी बुद्धि.
सदस्य (ಸದಸ್ಯ) (सं) ना.—सभासद; सभिक; सभाघटक.
सदस् (स्सु) (ಸದಸ್ [ಸ್ಸು]) (क) ना.—सभा; संघ; वस्ती; समूह.
सदळ (ಸದಳ) (सं) वि.—सैन्यासह; सेनायुक्त; द्विदलधान्य.
सदा (ಸದಾ) (सं) अ.—निरंतर; सतत; केव्हांहि; अखंड.
सदागति (ಸದಾಗತಿ) (सं) ना.—कायम फिरणारा, नित्यसंचारी वारा; वायु.
सदाचार (ಸದಾಚಾರ) (सं) ना.—सद्वर्तन; सभ्यता; चालरीत.
सदातन (ಸದಾತನ) (सं) ना—नित्यवस्तु; देव; चिरंतन; शाश्वत; परमेश्वर.
सदाफल (ಸದಾಫಲ) (सं) ना.—नारळीचे झाड; महाफल; अश्वत्थ.
सदार (ಸದಾರ) (सं) ना.—समर्थ; बलवंत; सपत्नीक, पत्नीसह.
सदावर (ಸದಾವರ) (सं) ना.—अतिथींना अन्न देणारा. सदावर्त ठेवणारा.
सदावर्त (वृत्ति) (ಸದಾವರ್ತ [ವೃತ್ತಿ]) (सं) ना—अन्न संतर्पण अन्नछत्र; मुक्तभोजन.
सदाशिव (ಸದಾಶಿವ) (सं) ना.—महादेव; परमात्मा.
सदृक्ष(श) (ಸದೃಕ್ಷ [ಶ]) (सं) वि.—सारखा; जुळण्याजोगा; समान; योग्य; असला; या प्रकारचा.
सदे (ಸದೆ) (क) धा.—आपटणें; ठेचणें; मारणें; बडबडणें.
(क) ना.—घाण; कचरा; केर.
सदेबडि (ಸದೆಬಡಿ) (क) धा.—नाश करणें; पूड करणें; ठार मारणें; वधणें.
सद्गति (ಸದ್ಗತಿ) (सं) ना.—मुक्ति; मोक्ष; चांगली गति.
सद्गुण (ಸದ್ಗುಣ) (सं) ना.—सद्वर्तन; सदाचार.
सद्दु (ಸದ್ದು) (क) ना.—आवाज; शब्द; चाहूल; ध्वनि; गोंधळ. 'उलि' पहा.
सद्धर्म (ಸದ್ಧರ್ಮ) (सं) ना.—न्यायनीतीने वागणें; नीतियुक्त वर्तन; चांगला धर्म.

सद्धर्मिणि (ಸದ್ಧರ್ಮಿಣಿ) (सं) ना. – धर्मपत्नी; धर्मकृत्यातील भागीदारीण.

सद्भाव (ಸದ್ಭಾವ) (सं) ना. – सुचित्त; चांगली भावना; सुविचार.

सद्म (ಸದ್ಮ) (सं) ना. – घर; ठिकाण; वस्ती देवालय.

सद्यः (ಸದ್ಯಃ) (सं) अ. – आतांच लगेच; या क्षणी.

सद्योजात (ಸದ್ಯೋಜಾತ) (सं) वि. – नुकताच जन्मलेला. (सं) ना. – परमेश्वराचे एक मुख; वासरु; लोणी; नवनीत.

सद्वर्तन (ಸದ್ವರ್ತನ) (सं) ना. – चांगली वागणूक; न्यायाचरण; सन्मार्ग.

सद्वृत्त (ಸದ್ವೃತ್ತ) (सं) वि. – सदाचारी; सद्वर्तनी.

सद्वृत्ति (ಸದ್ವೃತ್ತಿ) (सं) ना. – सद्वर्तन; नीतीमार्ग.

सधर्मचारिणि (ಸಧರ್ಮಚಾರಿಣಿ) } सधर्मिणि (ಸಧರ್ಮಿಣಿ) } (सं) ना. – धर्मपत्नी; गृहिणी; धर्मकार्यात भागीदार असणारी स्त्री.

सनक (ಸನಕ) (सं) ना. – ब्रह्मदेवाचा एक मुलगा.

सनत्कुमार (ಸನತ್ಕುಮಾರ) (सं) ना. – ब्रह्मदेवाचा पुत्र; मानवांचा मूळ पुरुष.

सनदु (ಸನದು) (अ.दे) ना. – सनद; अधिकार पत्र; ब्रीद; राजशासन. 'रायस' पहा.

सनातन (ಸನಾತನ) (सं) वि. – प्राचीन; पुरातन; त्रिकालबाधित. (सं) ना. – देव; परमेश्वर.

सनाथ (ಸನಾಥ) (सं) वि. – ज्याला मालक आहे असा; आश्रित.

सनाथे (ಸನಾಥೆ) (सं) वि. – सौभाग्यवती; पति असलेली.

सनादि (ಸನಾದಿ) (अ.दे) ना. – वाजंत्री; सनई; शहनाई.

सन्निय (ह) (ಸನಿಯ[ಹ]) (क) अ. – जवळ; बाजूचा; समीप; लागूनचे; शेजारील.

संत (ಸಂತ) (सं) ना. – सज्जन; साधु; सत्पुरुष; समाधानी; भक्त.

संतं (ಸಂತಂ) (सं) अ. – सतत; केव्हाहि; शांतपणें; निष्कंटक.

संतत (ಸಂತತ) (सं) अ. – अखंड; सदोदित; निरंतर.

संतति (ಸಂತತಿ) (सं) ना. – संतान; मुलेबाळे; वंश; पिढी; कुल; गोत्र; समूह; पंक्ति; ओळ.

संततधारा (ಸಂತತಧಾರಾ) (सं) ना. – अखंडधारा; अभिषेक.

संतधारा (ಸಂತಧಾರಾ) (सं) ना. – संततधार; अखंडधारा; अभिषेक.

संतपन (ಸಂತಪನ) (सं) ना. – संताप; चीड; क्रोध; राग; सूर्य.

संतपिसु (ಸಂತಪಿಸು) (क) धा. – कळवळणें; संतापणें; रडणें; रोडणें; वितळणें; लज्जित होणें; खजील होणें.

संतप्त (ಸಂತಪ್ತ) (सं) वि. – दुःखित; क्रुद्ध; तापलेला; रागेजलेला जळणारा; कळवळणारा.

संतमिर् (ಸಂತಮಿರ್) (क) धा. – आनंदात राहणें; गप्प बसणें; मौन घेणें; निमूट राहणें; थंड बसणें; स्तब्धणें.

संतयि (तै) सु (ಸಂತಯಿ[ತೈ]ಸು) (क) धा. – समाधान पावणें; तृप्त होणें; शांतणें; शांत करणें आनंद देणें.

संतय्सु (विसु) (ಸಂತಯ್ಸು[ವಿಸು]) (क) ना. 'संतयिसु' पहा.

संतर्पण (ಸಂತರ್ಪಣ) (सं) ना. – संतोष; तृप्ति, यात्रेचे मामदे; यात्रा सुखासमाधानानें झाल्याबद्दलचे आनंदभोजन.

संतर्पिनं (ಸಂತರ್ಪಿನಂ) (क) अ. – तृप्ति होईतो; पुरे म्हणेपर्यंत.

संतवणे (ಸಂತವಣೆ) (क) ना. – शांतवन; सान्त्वन; समाधान; मनोरंजन; संतर्पण.

संतविडु (ಸಂತವಿಡು) (क) धा. – समाधान पावणें; संतृप्त होणें; शांत होणें.

संतस (ಸಂತಸ) (क) ना. – संतोष, शांति; हर्ष; आनंद.

संतान (ಸಂತಾನ) (सं) ना – पिढी; वंश; कुल; मूलबाळ; कल्पवृक्ष; समूह.

संताप (ಸಂತಾಪ) (सं) ना – कटू दुःख; पोटतिडीक, पश्चात्ताप; महाज्वाला.

संतुष्ट (ಸಂತುಷ್ಟ) (सं) वि. – तृप्त; आनंदित; समुदित; संतोषित; समाधान पावलेला.

संतुष्टि (ಸಂತುಷ್ಟಿ) (सं) ना. – समाधान; शांति; तर्पण; तृप्ति.

संतृप्ति (ಸಂತೃಪ್ತಿ) (सं) ना. – समाधान; शांति; संतोष.

संते (ಸಂತೆ) (क) ना. – संस्था; जनसमूह; बाजार; मंडई; पेठ; व्यापारस्थल.

संत्रास (ಸಂತ್ರಾಸ) (सं) ना. – भय; भीति; हिंसा; बुजगावणें; थरकाप.

संद (ಸಂದ) (क) वि. – नाव झालेला; प्रख्यात; भूतकालीन; मृत; गति पावलेला.

संदणि (ಸಂದಣಿ) (क) ना. – समूह; गट; जनसमुदाय; संधान; साम्य; सादृश्य.

संदणि (गि) सु (ಸಂದಣಿ[ಗಿ]ಸು) (क) धा. – गोळा करणें; एकत्र करणें; सावडणें; सावरून घेणें; टीका करणें; जुळवणें.

संदय (ಸಂದಯ) (क) ना. – संदेह; अनुमान; विकल्प.

संदरिवु (ಸಂದರಿವು) (क) ना. – समजूतदारपणा; ब्रह्मज्ञान; योग्य जाणीव.

संदर्भ (ಸಂದರ್ಭ)(सं) ना. – प्रसंग; अनुकूलता; योग्य समय; संबंध.

संदर्शन (ಸಂದರ್ಶನ) (सं) ना. – भेट; मीलन; दर्शन; मुलाखत.

संदष्ट (ಸಂದಷ್ಟ) (सं) वि. – चावलेला; मुरगळलेला; चावा घेतलेला.

संदाय (ಸಂದಾಯ) (सं) ना. – परतफेड; व्रतधारण कंकण. 'सुलबलि' पहा.

संदि (ಸಂದಿ) (क) ना. – सांध; संधी; जोड; जोडणी; जुळणूक; व्याकरणांतील शब्दसंयोग; सांधमोड.

—इसु (ಇಸು) (क) धा.—जोडणें; जुळणें; शिवणें; समावेश होणें; घडवणें; संभवणें; मिसळणें; साम्य लाभणें; घालणें.
**संदिग्ध** (ಸಂದಿಗ್ಧ) (सं) वि.—अनिश्चित; पुष्कळ वापरलेले; तर्कातीत; अंदाजाबाहेर
**संदु** (ಸಂದು) (क) ना.—गाठ; खिळा; खुंटी; चौकट; अनुकूलता; योग्यता; लोभ.
**संदुक (दूक)** (ಸಂದುಕ[ದೂಕ]) (अ. दे) ना.—पेटी; पेटारा.
**संदुकट्टु** (ಸಂದುಕಟ್ಟು) (क) ना.—सांधेजोड; कमानीतील कळीचा दगड; जमिनीवरील हद्दीचा दगड.
**संदप्त** (ಸಂದೃಪ್ತ) (सं) वि.—अतिशय माजलेला; अहंकारी; महामूर्ख.
**संदेग** (ಸಂದೆಗ) (क) ना.—संशय; अनुमान; संदेह.
**संदेय** (ಸಂದೆಯ) (क) ना.—विकल्प; अनुमान; संशय. 'संदेग' पहा.
**संदेश** (ಸಂದೇಶ) (सं) ना.—बातमी; वार्ता; निरोप;
—हर (ಹರ) (सं) ना.—बातमीदार; निरोप्या; वार्ताहर; जासूद; अधिकारी; रायभारी.
**संदेह** (ಸಂದೇಹ) (सं) ना.—संशय; अनुमान; विकल्प.
**संदोह** (ಸಂದೋಹ) (सं) ना.—समूह; ढीग; समुदाय; दोहन; धारकाढणें.
**संधान** (ಸಂಧಾನ) (सं) ना.—समेट; शाखा; कोंब; टोकाची काठी; व्यवस्थित मांडणी; सुस्थिरता; बाण जोडणें.
**संधि** (ಸಂಧಿ) (सं) ना.—जोड; जोडणी; लक्ष्य; ढीग; शब्दपद. संयोग; एकी; समेट; संधान; प्रसंग; संदर्भ; अध्याय; रंध्र. नाटकातील पांच विभागांपैकी एक; विराम; विश्रांति; दरोडा; चोरीप्रकरण.
**संधिविग्रह** (ಸಂಧಿವಿಗ್ರಹ) (सं) ना.—सामसंग्रामाची बोलणी; रायभारा.
**संधिविग्रहि** (ಸಂಧಿವಿಗ್ರಹಿ) (सं) ना.—युद्धमंत्री; रायभारी.
**संध्या (ध्ये)** (ಸಂಧ್ಯಾ [ಧ್ಯೆ]) (सं) ना.—संधिसमयाची देवता; सायंकाल; उषासंधि; प्रकाश; मध्यान्हीची प्रार्थना.
**संध्यावंदने** (ಸಂಧ್ಯಾವಂದನೆ)(सं.) ना.—संधिकालीन सूर्यप्रार्थना.
**संध्याराग** (ಸಂಧ್ಯಾರಾಗ) (सं) ना.—सायंकालीन तांबडे आकाश; सूर्याच्या रंगछटा; संध्येचा रक्तवर्ण.
**सन्न** (ಸನ್ನ) (सं) वि.—दुर्बल, कृश, रोडावलेला, बसका, बिघडलेला; नष्ट.
**सन्नण** (ಸನ್ನಣ) (क) ना.—सिद्धता, सैनिकांचे चिलखत; कवच.
**सन्नद्ध** (ಸನ್ನದ್ಧ) (सं) वि.—सिद्ध; सज्ज; आवळलेला; बांधलेला.
**सन्न(ना)य** (ಸನ್ನ [ನಾ] ಯ) (सं) ना.—युद्धसिद्धता.
**सन्न(ना)ह** (ಸನ್ನ [ನಾ] ಹ) युद्धार्थ सिद्ध झालेले शस्त्रास्त्रयुक्त चिलखती सैन्य. 'हूट' पहा.

**सन्नि** (ಸನ್ನಿ) (क) ना.—मतिभ्रम; खूळ; वेडेचार; बडबड.
**सन्निकाश** (ಸನ್ನಿಕಾಶ) (सं) वि.—समान; सारखा; जुळणारा; सदृश.
**सन्निकृष्ट** (ಸನ್ನಿಕೃಷ್ಟ) (सं) वि.—जवळ ओढून घेतलेला; खूप ताणलेला; शेजारी; जमवून घेणारा; जवळ राहणारा.
**सन्निद** (ಸನ್ನಿದ) (क) वि.—जवळ राहणारा; शेजारी; मिळून मिसळून राहणारा.
**सन्निधान** (ಸನ್ನಿಧಾನ) (सं) ना.—सामीप्य; आश्रय; पूज्य व्यक्तींचा सहवास.
**सन्निधि** (ಸನ್ನಿಧಿ) (सं) अ.—जवळ; समीप.
**सन्निपात** (ಸನ್ನಿಪಾತ) (सं) ना.—मतिभ्रम; भ्रमिष्टपणा; वात; रोगातील भ्रम; वेड; पतन; समूह; एकवटपणा; एकूण.
**सन्निभ** (ಸನ್ನಿಭ) (सं) वि.—समान; सदृश; जुळणारा; सारखा.
**सन्निवेश** (ಸನ್ನಿವೇಶ) (सं) ना.—संदर्भ; प्रसंग; अंतःप्रवेश; वसतिस्थान; घटना; पूर्वपीठिका.
**सन्निहित** (ಸನ್ನಿಹಿತ) (सं) वि.—जवळ असणारा; शेजारचा; समीपस्थ; जुळवून घेणारा; सिद्ध; सज्ज.
**सन्नुत** (ಸನ್ನುತ) (सं) वि.—वर्णित; स्तविलेला; श्लाघ्य; श्रेष्ठ.
**सन्नुतांगि** (ಸನ್ನುತಾಂಗಿ) (सं) वि.—वाखाणण्यासारखी; प्रशंसनीय (स्त्री); रेखीव अवयव असलेली; (कामिनी).
**सन्ने** (ಸನ್ನೆ) (सं) ना.—संकेत; खूण; सूचना; अंगविक्षेप; हावभाव.
(क) ना.—कोळवे; यारी; भार उचलण्याचे साधन; लाट.
**सन्नेवेळगु** (ಸನ್ನೆವೆಳಗು) (क) ना.—दीपगृह; दीपानुरोधी पाहारा; गोपुर.
**सन्मत** (ಸನ್ಮತ) (सं) ना.—कबुली; मान्यता; संमती; सदभिप्राय; योग्यता; औचित्य.
**सन्मति** (ಸನ್ಮತಿ) सुबुद्धि; योग्य जाणीव.
**सन्मान** (ಸನ್ಮಾನ) (सं) ना.—गौरव; मान्यता; आदर; पुरस्कार; योग्य मर्यादा.
**सन्मानिसु** (ಸನ್ಮಾನಿಸು) (क) धा.—गौरव करणें; आदरणें; मान्यता देणें.
**सन्मान्य** (ಸನ್ಮಾನ್ಯ) (सं) वि.—गौरवार्ह; पूज्य; आदरणीय; मान देण्यास योग्य.
(सं) ना.—ज्ञानी; गुरु; वडीलधारे.
**सन्मार्ग** (ಸನ್ಮಾರ್ಗ) (सं) ना.—पुण्यमार्ग; योग्य चालरीत; सदाचार.
**सन्मुद (संमुद)** (ಸನ್ಮುದ [ಸಂಮುದ]) (सं) ना.—अत्यानंद; अतिहर्ष; संमोह.
**सन्मोद (संमोद)** (ಸನ್ಮೋದ [ಸಂಮೋದ]) (सं) ना.—सात्त्विक आनंद; अतिहर्ष.

**सन्मोहन (संमोहन)** (ಸನ್ಮೋಹನ [ಸಂಮೋಹನ]) (सं) ना.— बनवा बनवी; भुरळ; मोहात पडणें; वेड लावणें.

**संन्यस्त** (ಸಂನ್ಯಸ್ತ) (सं) वि.— ठेवलेलें; टाकलेलें; अर्पित; त्यक्त; फेकलेलें; हिसकलेले; संन्यास घेतलेला.

**संन्यास** (ಸಂನ್ಯಾಸ) (सं) ना.— सर्वस्व त्याग; विरक्ति; मोहापासून अलिप्तवृत्ति; त्याग.

**संन्यासि** (ಸಂನ್ಯಾಸಿ) (सं) वि.— विरक्त; संसार सोडलेला.

**सपक्ष** (ಸಪಕ್ಷ) (सं) वि.— जोडीदार; सहाय्यक; संबंधी; आपल्या पक्षाचा; आपल्या बाजूचा; पंख असलेला.

**सपत्न** (ಸಪತ್ನ) (सं) ना.— शत्रु; वैरी; प्रतिपक्षी; द्वेषी.

**सपत्नि (त्नी)** (ಸಪತ್ನಿ[ತ್ನೀ]) (सं) ना.— सवत; नवऱ्याची दुसरी बायको.

**सपत्नीक** (ಸಪತ್ನೀಕ) (सं) वि.— पत्नीसह; पत्नी असलेला; सहकुटुंब.

**सपदि** (ಸಪದಿ) (सं) अ.— लागलीच; तत्क्षणीं; ताबडतोब.

**सपर्ये (र्या)** (ಸಪರ್ಯೆ[ರ್ಯಾ]) (सं) ना.— सेवा; पूजा; अर्चना.

**सपाट** (ಸಪಾಟ) (क) वि.— चपटा; समान भूमीचा; समपातळीचा.

**सपाद** (ಸಪಾದ) (सं) वि.— पादयुक्त; सव्वा; चतुर्थांश.
**—शतक** (ಶತಕ) (सं) वि.— सव्वाशे; एकशे पंचवीस.

**सपिंड** (ಸಪಿಂಡ) (सं) ना.— सगोत्र; एकाच पिंडाचा; एककुलीन; ज्ञातिबंधु.

**सपुर** (ಸಪುರ) (अ. दे) वि.— पातळ; कोमल; कोवळें; विनयशील; क्षीण; दुर्बल; रोड; वाळलेलें.

**सप्त** (ಸಪ್ತ) (सं) वि.— सात.

**सप्तक** (ಸಪ್ತಕ) (सं) ना.— साताचा समूह; आठवडा; सात दिवसांचा काल.

**सप्तजिव्ह (व्हा)** (ಸಪ್ತಜಿಹ್ವ[ಹ್ವಾ]) (सं) ना.— अग्नि; सात जिभा असलेला.

**सप्ततंतु** (ಸಪ್ತತಂತು) (सं) ना.— यज्ञ; याग; सात पदरी हार.

**सप्तधातु** (ಸಪ್ತಧಾತು) (सं) ना.— शरीरातील सात धातु. (रस; रक्त; मास; मेद; मज्जा; हाड व शुक्र हे सात धातु).

**सप्तपदि (दी)** ಸಪ್ತಪದಿ[ದೀ]) (सं) ना.— वधूवरांनी सात पावलें चालण्याचा विवाहातील एक विधि.

**सप्त पाताळ** (ಸಪ್ತಪಾತಾಳ) (सं) ना.— पाताळातील सात लोक.

**सप्तम** (ಸಪ್ತಮ) (सं) वि.— सातवा.

**सप्तमि (मी)** (ಸಪ್ತಮಿ [ಮೀ]) (सं) वि.— सातवी तिथी; सातवी विभक्ती.

**सप्तर्षि** (ಸಪ್ತರ್ಷಿ) (सं) ना.— (मरिचि; अंगिरस; अत्रि; पुलस्त्य; पुलह; कश्यप; वशिष्ठ) हे सात ऋषि. किंवा (वसिष्ठ; अत्रि; भरद्वाज; गौतम; विश्वामित्र; जमदग्नि; क्रतु) हे सात ऋषि.

**सप्तव्यसन** (ಸಪ್ತವ್ಯಸನ) (सं) ना.— (शिकार; मद्यपान; दुर्वाक्य; जुगार; व्यभिचार; दंड; शिक्षा) ही सात व्यसने. (द्यूत; मांसभक्षण; मदिरापान; वेश्यागमन; चौर्य; मृगया; परदारागमन) हीं सात व्यसनें.

**सप्तशति** (ಸಪ್ತಶತಿ) (सं) ना.— सातशे श्लोकांचे देवी महात्य; देवीस्तोत्र.

**सप्तसप्ति** (ಸಪ್ತಸಪ್ತಿ) (सं.) ना.— सूर्य; सात घोडे असलेला रथी.

**सप्तस्वर** (ಸಪ್ತಸ್ವರ) (सं) ना.— षड्ज (सा); ऋषभ (रे); गांधार (ग); मध्यम (म); पंचम (प); धैवत (ध); निषाद (नि) हे संगीत शास्त्रातील सात स्वर.

**सप्तांग** (ಸಪ್ತಾಂಗ) (सं) ना.— राज्याची सात अंगे (स्वामी; मंत्री; सुहृद; कोष; राष्ट्र; दुर्ग; सेना)

**सप्तार्चि** (ಸಪ್ತಾರ್ಚಿ) (सं) ना.— अग्नि; सप्तजिव्ह; धूमकेतु.

**सप्ताश्व** (ಸಪ್ತಾಶ್ವ) (सं) ना.— सात घोडे असलेला सूर्य.

**सप्ताह** (ಸಪ್ತಾಹ) (सं) ना.— आठवडा; सात दिवसाचा काल.
**—इक** (ಇಕ) (सं) ना.— आठवड्याचे वृत्तपत्र; साप्ताहिक पत्रिका.

**सप्ति** (ಸಪ್ತಿ) (सं) ना.— घोडा; अश्व; वाजी.

**सप्पगे (ने)** (ಸಪ್ಪಗೆ [ನೆ]) (सं) वि.— अळणी; बेचव; तिखट मीठ नसलेला; निरुत्साह; मौनयुक्त; दुःखित.

**सप्पळ (ळु)** (ಸಪ್ಪಳ[ಳು]) }
**सप्पुळ (ळु)** (ಸಪ್ಪುಳ[ಳು]) } (क) ना.— चाहूल; साद; शुद्धध्वनि.

**सप्पे** (ಸಪ್ಪೆ) (क) वि.— नीरस; बेचव; करुण; दुःखित; चेतनाहीन; चपटे.

**सफल** (ಸಫಲ) (सं) वि.— फलदायी; लाभकर; सार्थक; प्रयोजन युक्त; फल देणारें; इच्छापूर्ति करणारें.

**सब** (ಸಬ) (क) ना.— शव; मुडदा; प्रेत; कलेवर.

**सबर** (ಸಬರ) (क) ना.— घोडा, बैल वगैरेंच्या पाठीवरील ओझाची माकण; बैठक; जळणाचे लाकूड; सरण; पाया.

**सबल** (ಸಬಲ) (सं) वि.— समर्थ; बलशाली; सेनायुक्त; ससैन्य.

**सबळ** (ಸಬಳ) (क) ना.— लाठी; काठी; वीट; बर्ची; आयुध.

**सबळिग** (ಸಬಳಿಗ) (क) वि.— बर्ची वापरणारा; शस्त्रधारी; आयुध हातीं धरणारा.

**सबुद** (ಸಬುದ) (क) ना.— शब्द; ध्वनि; स्वर; आवाज; चाहुल; साद; सार्थ अक्षरसमूह.

**सब्ब** (ಸಬ್ಬ) (क) ना.— सर्व; शंकर; शिव; परमेश्वर.
(क) वि.— अखिल; सगळे.

**सब्बक्कि** (ಸಬ್ಬಕ್ಕಿ) (क) ना.— शाबूदाणा.

**सब्बमंगळे** (ಸಬ್ಬಮಂಗಳೆ) (सं) ना.— सर्वमंगला; पार्वतीदेवी.

**सब्बव** (ಸಬ್ಬವ) (क) ना.— हास्य; परिहास; मौज; तमाशा; वेश.

**सब्बवकार** (ಸಬ್ಬವಕಾರ) (क) ना.—सोंगाड्या; वेषधारी; विदूषक.

**सब्बाणि** (ಸಬ್ಬಾಣಿ) (सं) ना.—पार्वतीदेवी; गौरी; शर्वाणि.

**सब्बिगे (सब्बे)** (ಸಬ್ಬಿಗೆ [ಸಬ್ಬೆ]) (क) ना.—झाडाची लहान फांदी.

**सब्रह्मचारि** (ಸಬ್ರಹ್ಮಚಾರಿ) (सं) ना.—सहाध्यायी; वर्गबंधु; सहपाठी; सहधर्मी.

**सभा** (ಸಭಾ) (सं) ना.—लोकसमूह; विद्वत्परिषद; आस्थान; प्रकाश.

**सभाजन** (ಸಭಾಜನ) (सं) ना.—सभ्यलोक; सभेतील श्रोतृगण; विनय; सौजन्य; वंदना.

**सभाकंप** (ಸಭಾಕಂಪ) (सं) ना.—सभाभीरुता; सभा संकोच.

**सभापति** (ಸಭಾಪತಿ) (सं) ना.—अध्यक्ष.

**सभापर्व** (ಸಭಾಪರ್ವ) (सं) ना.—भारत ग्रंथाचे एक पर्व; महाभारताचा एक भाग.

**सभासद** (ಸಭಾಸದ) (सं) ना.—सभेत बसणारा; सदस्य; घटक.

**सभे** (ಸಭೆ) (सं) ना.—द्यूतगृह.

**सभिक** (ಸಭಿಕ) (सं) ना.—द्यूतगृहाचा मालक; सदस्य.

**सभ्य** (ಸಭ್ಯ) (सं) वि.—सभेचा घटक; सभासद; सुसंस्कृत; सद्वर्तनी.

**सभ्यता (ते)** (ಸಭ್ಯತಾ [ತೆ]) (सं) ना.—चांगुलपणा; विनयशीलता; सदाचार; सौजन्य; नागरिकता; श्रेष्ठपणा.

**सम** (ಸಮ) (सं) वि.—सरळ; सारखा; भेदहीन; एकाच प्रकारचा; जुळता; नीटनेटका; योग्य; (सं) ना.—ठेका; ताल; दोन संख्येनें भाग तुटणारी संख्या.

**समकट्टु** (ಸಮಕಟ್ಟು) (क) ना.—सादृश्य; सारखेपणा; साम्य; पात्रता; योग्यता; सज्जता; सिद्धता.

**समकाल** (ಸಮಕಾಲ) (क) वि.—एकदाच; एकवेळ.

**समकालीन** (ಸಮಕಾಲೀನ) (सं) वि.—एकाच काळीं असणारे; एकावेळचे.

**समक्ष (क्षं)** (ಸಮಕ್ಷ [ಕ್ಷಂ] (सं) अ.—डोळ्यासमोर; नजरेखालीं; जवळजवळ; आसपास.

**समगार** (ಸಮಗಾರ) / **संमगार** (ಸಮ್ಮಗಾರ) (सं) ना.—चर्मकार; चांभार; कातड्याचे काम करणारा.

**समग्र** (ಸಮಗ್ರ) (क) वि.—पूर्ण; पुरा; पूर्णपणें.

**समचतुरस्र** (ಸಮಚತುರಸ್ರ) (सं) वि.—चौरस; चारी बाजू समान असलेला काटकोन चौकोन.

**समज** (ಸಮಜ) (सं) ना.—प्राण्यांचा कळप; पशूंचा समूह.

**समजाति** (ಸಮಜಾತಿ) (सं) ना.—एकजातीय; एकवर्णी; एकवर्गी.

**समजायिसु** (ಸಮಜಾಯಿಸು) (क) धा.—समजून सांगणें; रमविणें; सोपविणें; मन वळविणें; देणें; अर्पिणें.

**समजोळि** (ಸಮಜೋಳಿ) (क) अ.—समान; ठीक; जुळण्यासारखें; बरोबरीनें.

**समंजस** (ಸಮಂಜಸ) (सं) वि.—योग्य; सरळ; पटणारे; तर्काला जुळणारे.

**समतळ** (ಸಮತಳ) (सं) वि.—सपाट; समान; एका पातळीतील.

**समतळिसु** (ಸಮತಳಿಸು) (क) धा.—सज्ज ठेवणें; सिद्ध होणें; तयार राहणें; शपथ वाहणें; शिरणें; प्रवेशणें; जुळणें.

**समता (ते)** (ಸಮತಾ [ತೆ]) (सं) ना.—समानता; सरळपणा; साम्य; ऐक्य; चित्तस्वास्थ्य; योग्यता; कठोरमन; दुजाभाव नसणें; अभेद.

—**गोष्ठि** (ಗೋಷ್ಠಿ) (सं) ना.—सलगीचे बोलणें; गप्पासप्पा; प्रेमळसभा.

**समदंडि** (ಸಮದಂಡಿ) (सं) ना.—समानता; समतोलन.

**समदर्शिन्** (ಸಮದರ್ಶಿನ್) (सं) वि.—भेदभाव न मानणारा; पक्षपातरहित.

**समनंतर** (ಸಮನಂತರ) (सं) अ.—लागलींच; त्यानंतर; ताबडतोब; तत्क्षणीं.

**समनिसु** (ಸಮನಿಸು) (क) धा.—अस्तित्वांत येणें; जमून येणें; प्राप्त होणें; मिळवणें.

**समंतात्** (ಸಮಂತಾತ್) (सं) अ.—सभोवार; पुरा; पूर्ण; आजूबाजूस.

**समंतु** (ಸಮಂತು) (सं) अ.—उत्तम रीतीनें; आणि; तसेंच; या प्रकारें.

**समन्वय** (ಸಮನ್ವಯ) (सं) ना.—जोडणी; साम्य; संबंध; आसत्य. प्रवेश; अर्थानुरोधानें शब्द जोडणें.

**समन्वित** (ಸಮನ್ವಿತ) (सं) वि.—जुळलेले; प्रविष्ट; सह; सहित; धरून.

**समपालि** (ಸಮಪಾಳಿ) (क) ना.—योग्य पद्धति; जोडीदार.

**समभाव** (ಸಮಭಾವ) (सं) ना.—भेदभावरहित मन; निःपक्षपाती बुद्धि.

**समय** (ಸಮಯ) (सं) ना.—वेळ; संदर्भ; प्रसंग; अवकाश; निर्णय; सिद्धांत; रूढी; संप्रदाय; प्रतिज्ञा; शपथ; समेट; संधि; कवळ; घास; संकेतखूण; धर्म; मत.

—**अनुसार** (ಅನುಸಾರ) (सं) वि.—कालोचित; वेळेनुरूप; प्रसंगयोग्य; गुणाला जुळणारे.

—**उचित** (ಉಚಿತ) (सं) वि.—प्रसंगानुसार; कालानुरूप.

**समर** (ಸಮರ) (सं) ना.—भांडण; युद्ध; मारामारी; लठ्ठालठ्ठी.

—**भूमि** (ಭೂಮಿ) (सं) ना. रणरंग; रणांगण; युद्धक्षेत्र; लढाईचें स्थळ.

**समरथ** (ಸಮರಥ) (सं) ना.—सारख्या योग्यतेचा योद्धा; तुल्यबळ वीर; समान आयुध असणारे.

**समरस** (ಸಮರಸ) (सं) ना.—ऐक्य; एकरूपता; रसांचा मेळ; मिश्रण, विलीनता.

**समरांगण** (ಸಮರಾಂಗಣ) (सं) ना.—युद्धभूमि; रणक्षेत्र, लढाईचें मैदान.

**समरु (र्)** (ಸಮರು[ರ್]) (क) धा.—कातरणें; उपटणें; सपाट करणें; ओळ लावणें; ओळींत उभे राहणें; क्रम लावणें; व्यवस्था करणें; गोंजारणें; अंगावरून हात फिरणें; शांत करणें;

**समर्थ** (ಸಮರ್ಥ) (सं) वि.—बलशाली; शक्तिवंत; योग्य; चतुर; अर्थपूर्ण.

**—इसु** (ಇಸು) (क) धा.—समर्थ होणें; पाठिंबा देणें; अनुमोदणें.

**—न** (ನ) (सं) ना.—पाठिंबा; निर्णय; सिद्धता.

**समर्पक** (ಸಮರ್ಪಕ) (सं) वि.—नीट; योग्य; युक्त.

**समर्पण** (ಸಮರ್ಪಣ) (सं) ना.—दान, सुपूर्त करणें; देणगी; भक्तीनें समर्पण; उपायन.

**समर्पिसु** (ಸಮರ್ಪಿಸು) (क) धा.—देणगी देणें; भक्तीनें अर्पिणें; विनवणें; विनंती करणें; विज्ञापिणें.

**समवय (यस)** (ಸಮವಯ [ಯಸ]) (सं) वि.—एका वयाचे; वर्गबंधु; मित्र; सारख्या वयाचे.

**समवयस्क** (ಸಮವಯಸ್ಕ) (सं) वि.—समवयी; मित्र.

**समवर्ति** (ಸಮವರ್ತಿ) (सं) ना.—मित्रामित्रांशी सारखी वागणूक ठेवणारा; यम.

**समवसरण** (ಸಮವಸರಣ) (सं) ना.—सुदैव; अदृष्ट; तीर्थंकरांची सभा.

**समवाय** (ಸಮವಾಯ) (सं) ना.—समूह; रसायनातील एक-तानता.

**समवायि** (ಸಮವಾಯಿ) (सं) ना.—एकीकरण; सहचारित्र्य; सहचारीपणा.

**समवेत** (ಸಮವೇತ) (सं) वि.—मिश्रित; समाविष्ट; एकत्रित.

**समष्टि** (ಸಮಷ್ಟಿ) (सं) ना.—नम्रता; एकूण; समाज; व्यक्तींचा समूह.

**समसप्तक** (ಸಮಸಪ್ತಕ) (सं) ना.—राक्षसांचे सैन्य; सात राक्षस वर्ग यांनी अर्जुनाशी युद्ध केले.

**सम(मे) सु** (ಸಮ [ಮೆ] ಸು) (क) धा.—लहान करणें; उगाळणें; घासणें; झिजविणें

**समस्त** (ಸಮಸ್ತ) (सं) वि.—पूरा; सर्व; सहित; सकल; मिसळलेला.

**समस्या (स्ये)** (ಸಮಸ್ಯಾ [ಸ್ಯೆ]) (सं) ना.—कोडें; उखाणा; पेचप्रसंग; जटिल प्रश्न. 'मुडिगे' पहा.

**—पूर्ति** (ಪೂರ್ತಿ) (सं) ना.—कोडे सोडवणूक.

**समकतरे** (ಸಮಳ್ತರೆ) (क) ना.—प्रातःकाल; उषःकाल; उदयकाल; सूर्योदय समय.

**समाकलित** (ಸಮಾಕಲಿತ) (सं) वि.—पूर्ण ताब्यात घेतलेला; कह्यात आणलेला.

**समाख्या (ख्ये)** (ಸಮಾಖ್ಯಾ [ಖ್ಯೆ]) (सं) ना.—प्रसिद्धी; कीर्ति; नावलौकिक.

**समागम** (ಸಮಾಗಮ) (सं) ना.—मीलन; प्रवेश; भोग; रति; साम्य; सहवास; ध्येयपूर्ति; अनुगमन.

**समाचार** (ಸಮಾಚಾರ) (सं) ना.—बातमी; वार्ता; सदाचार; एकाच प्रकारची वागणूक; संतोष. 'ओसगे' पहा.

**समाज** (ಸಮಾಜ) (सं) ना.—लोकसमूह; सभा; पक्ष; कुलजाति; जमाव.

**समाधान** (ಸಮಾಧಾನ) (सं) ना.—शांति; सहनशीलता; तृप्ति; प्रतिष्ठापना.

**समाधि** (ಸಮಾಧಿ) (सं) ना.—निदिध्यास; तल्लीनता; लय; मनाची एकाग्रता; थडगें; वृंदावन; छत्री; आत्मविस्मरण; मृताचे स्मारक.

**—स्थ** (ಸ್ಥ) (सं) वि.—ध्यानमग्न; योगनिद्रा परवश; मेलेले.

**समान** (ಸಮಾನ) (सं) वि.—सरळ; योग्य; पात्र; एकसारखा; सर्वांशी सारखी वागणूक असणारा; मानासहित; एक वायु.

**—ता (ते)** (ತಾ [ತೆ]) (सं) ना.—योग्य वर्तन; मान्यता; प्राप्ति.

**समानप्रतिपत्ति** (ಸಮಾನಪ್ರತಿಪತ್ತಿ) (सं) ना.—योग्य जाणीव; योग्यतेप्रमाणें झालेला गौरव.

**समानोदर्य** (ಸಮಾನೋದರ್ಯ) (सं) ना.—सहोदरत्व; बंधु-बांधव; एकमातृत्व.

**समाप्ति** (ಸಮಾಪ್ತಿ) (सं) ना.—समारोप; मुक्तता; अंत; शेवट; मरण; पूर्णता.

**समाम्नाय** (ಸಮಾಮ್ನಾಯ) (सं) ना.—वेदपठण; शास्त्रपठण; एकूण; आणखी; समूह.

**समारंभ** (ಸಮಾರಂಭ) (सं) ना.—उत्सव; सोहळा; उत्तम आरंभ; शुभारंभ.

**समाराधन (ने)** (ಸಮಾರಾಧನ[ನೆ]) (सं) ना.—ब्राह्मण-भोजन; तृप्ति; मेजवानी.

**समारूढ** (ಸಮಾರೂಢ) (सं) वि.—वर चढलेला; उच्चपदस्थ.

**समारोप** (ಸಮಾರೊಪ) (सं) ना.—पूर्ति; पूर्णता; शेवट; अंत.

**समावर्तन** (ಸಮಾವರ್ತನ) (सं) ना.—गुरुगृहीं विद्याभ्यास झाल्यावर घरीं परतणें; पुनरागमन; फेरफटका; प्रवास; भ्रमण.

**समावेश** (ಸಮಾವೇಶ) (सं) ना.—एकजीव; साम्य; प्रवेश; अंतःप्रवेश; रिघाव.

**समाश्वास** (ಸಮಾಶ್ವಾಸ) (सं) ना.—अभिवचन; शब्द देणें; प्रतिज्ञा; पंथ; समाधान; शांति.

**समास** (ಸಮಾಸ) (सं) ना.—पदसंयोग; एकार्थक शब्द-जोडणी; संक्षेप निवेदन.

**समासारित** (ಸಮಾಸಾರಿತ) (सं) वि.—जवळ आलेला; शेजारचा; जवळचा.

**समाहार** (ಸಮಾಹಾರ) (सं) ना.—संग्रह; संक्षिप्तता; एकत्रिकरण.

**—द्वंद्व** (ದ್ವಂದ್ವ) (सं) ना.—संग्रहात्मक वस्तुवाची एक समास.

**समाहित** (ಸಮಾಹಿತ) (सं) वि.—संग्रहित; एकत्रित ठेवलेले; समाधान पावलेले; प्रतिज्ञा घेतलेलें.

**समाहृत** (ಸಮಾಹೃತ) (सं) वि.—एकत्रित केलेले; स्वीकृत; संग्रहित.

**समाह्वय** (ಸಮಾಹ್ವಯ) (सं) ना.—नाव; नाम निमंत्रण; हाक; युद्ध.

**समिति** (ಸಮಿತಿ) (सं) ना.—सभा; समाज; संघ; समूह; संस्थाप्रवेश.

**समित्तु(त्) (धे)** (ಸಮಿತ್ತು [ತ್] [ಧೆ]) (सं) ना.—लाकूड; जळण; यज्ञासाठी आणलेल्या उंबराच्या किंवा अश्वत्थाच्या काड्या.

**समीक** (ಸಮೀಕ) (सं) ना.—युद्ध; कलह; भांडण; मारामारी.

**समीचीन** (ಸಮೀಚೀನ) (सं) वि.—मधुर; रुचकर; योग्य; लायक; सरळ; चकाकणारे; शोभणारे.

**समीर(रण)** (ಸಮೀರ [ರಣ]) (सं) ना.—वारा; हवा; वायु.

**—मलय समीर** (ಮಲಯಸಮೀರ) (सं) ना.—थंड हवा; सुगंधी वारा.

**समीहित** (ಸಮೀಹಿತ) (सं) ना.—अपेक्षा; आकांक्षा; इच्छा; अभीप्सित.

**समुख** (ಸಮುಖ) (सं) वि.—गोष्टीवेल्हाळ; वाचाळ; गप्पीदास एकमुखी.

**समुचित** (ಸಮುಚಿತ) (सं) वि.—योग्य; उचित; मनाला पटण्यासारखे.

**समुच्चय** (ಸಮುಚ್ಚಯ) (सं) ना.—मिश्रण; एकीकरण; जोडणी; संग्रह; समुदाय; संचय.

**समुच्छ्र(च्छ्रा)य** (ಸಮುಚ್ಛ್ರ [ಛ್ರಾ]ಯ) (सं) ना.—अभिवृद्धि; वाढ; वरचढपणा; स्पर्धा; मोठेपणा; विरोध; प्रतिकार; भांडखोरपणा.

**समुत्सारण** (ಸಮುತ್ಸಾರಣ) (सं) ना.—दूरगमन; चालढकल; वियोग.

**समुत्सारित** (ಸಮುತ್ಸಾರಿತ) (सं) वि.—दूर केलेले; बाजूला सारलेले; दूर गेलेले; गमावलेले; पुढें ढकललेले; निघालेले.

**समुदय** (ಸಮುದಯ) (सं) ना.—छाप; ठसा; जन्म; उदय; दर्शन; गट; समूह; लावणी; लागण.

**समुदाय** (ಸಮುದಾಯ) (सं) ना.—गट; युद्ध; जन्म; जनन; जमाव; समूह.

**समुद्धत** (ಸಮುದ್ಧತ) (सं) वि.—अति माजलेला; उद्दाम; मगरूर; अहंकारी.

**समुद्यत्** (ಸಮುದ್ಯತ್) (सं) वि.—वर डोके करणारा; उदय पावणारा; बाहेर येणारा; उद्योन्मुख; पुढें येणारा.

**समुद्र** (ಸಮುದ್ರ) (सं) ना.—सागर; जलधी; ठसा उमटवलेला; मुद्रा केलेला; मोहोर केलेला.

**—जाते** (ಜಾತೆ) (सं) ना.—लक्ष्मी.

**समुद्रमंथन** (ಸಮುದ್ರಮಥನ) (सं) ना.—सागराची घुसळण; देवदानवांनी अमृतप्राप्तीसाठीं केलेले सागरमंथन.

**समुद्रवसना(ने)** (ಸಮುದ್ರವಸನಾ[ನೆ]) (सं) ना.—पृथ्वी; समुद्राचे वसन नेसणारी; समुद्रांत राहणारी.

**समुन्मिषत्** (ಸಮುನ್ಮಿಷತ್) (सं) वि.—सुंदर नेत्र असलेला; विकसित; प्रकाशणारा; शोभिवंत.

**समुल्लसित** (ಸಮುಲ್ಲಸಿತ) (सं) वि.—अत्यानंद झालेला; अत्युत्साही; कांतिमान.

**समुल्लास** (ಸಮುಲ್ಲಾಸ) (सं) ना.—अत्यानंद; मोठा हुरूप; अभिनिवेश; कांतिमानता.

**समूरू** (ಸಮೂರು) (सं) ना.—मृग; हरीण.

**समूल** (ಸಮೂಲ) (सं) अ.—मूळासह; कुलंकष; थोडेसुद्धा न सोडता.

**समूह** (ಸಮೂಹ) (सं) ना.—ढीग; रास; एकूण; मेळावा; जमाव.

**समृद्ध** (ಸಮೃದ್ಧ) (सं) वि.—भरलेलें; पूर्ण; पूर्ति पावलेले; संपत्तिमान; धनवान.

**समृद्धि** (ಸಮೃದ್ಧಿ) (सं) ना.—वाढ; पूर्णता; श्री; संपत्ति; सुदैव; अतिशयता; वरचढपणा.

**समे** (ಸಮೆ) (क) धा.—पुष्पमाला करणें; रचणें; निर्मिणें; गुफणें; क्षीण होणें; कृश होणें; सिद्ध होणें; हानी होणें.
(क) ना.—उंचावरचा दिवा; ठाणवई.

**समेत** (ಸಮೇತ) (सं) ना.—मिसळलेला; सहित; जवळ आलेला; एकवटलेला; एकजीव झालेला.

**संपगे** (ಸಂಪಗೆ) (क) ना.—चंपक; चाफा.

**संपत्ति** (ಸಂಪತ್ತಿ) (सं) ना.—धनधान्यसंग्रह; वैभव; अभिवृद्धि; सुस्थिति; ऐश्वर्य; आनंद; संपूर्णता; सिद्धि.

**संपत्तु (त्) (द्)** (ಸಂಪತ್ತು [ತ್][ದ್]) (क) ना.—भाग्य; ऐश्वर्य; उन्नति; सुखसंमृद्धि; धान्यधनवैपुल्य.

**संपन्न** (ಸಂಪನ್ನ) (सं) वि.—युक्त; प्राप्त; सुदैवी; दैववान्; सभ्य; सौजन्यपूर्ण.

संपन्नते (ता) (ಸಂಪನ್ನತೆ [ತಾ]) (सं) ना.—बलशालित्व; सिद्धि; पराक्रम; बळ; सभ्यता; सौजन्य.

संपर्क (ಸಂಪರ್ಕ) (सं) ना.—संबंध; जवळीक; स्पर्श; शिवाशिव; वापर; विसाण; सांनिध्य.

संपाति (ಸಂಪಾತಿ) (सं) ना.—जटायूचा वडील भाऊ; एक गृध्र; गिधाड.

संपादक (ಸಂಪಾದಕ) (सं) ना.—मिळवणारा; संग्रह करणारा; पत्रिकेचा लेखनसंग्राहक.

संपादन (ने) (ಸಂಪಾದನ[ನೆ]) (सं) ना.—प्राप्ति; लाभ; मिळकत; अनेक विषयांचा संग्रह

संपादिसु (ಸಂಪಾದಿಸು) (क) धा.—मिळवणें; संग्रह करणें; प्राप्ति करून घेणें; विषयांची जुळणी करणें; जोडणें.

संपालि (ळि) सु (ಸಂಪಾಲಿ [ಳಿ] ಸು) (क) धा.—नीट संरक्षणें; विस्तारणें; पसरविणें; सोडविणें.

संपु (ಸಂಪು) (क) ना.—तृप्ति; सज्जता; वैभव.

संपुट (ಸಂಪುಟ) (सं) ना.—ग्रंथविभाग; झाकणाचा करंडा; बरणी; नियतकालिकाचा वार्षिक अंक.

संपूर्ण (ಸಂಪೂರ್ಣ) (सं) वि.—भरपूर; सर्व भरलेले.

संपृक्त (ಸಂಪೃಕ್ತ) (सं) वि.—एकवटलेले; जुळलेले; एकजीव झालेलें.

संप्रति (ಸಂಪ್ರತಿ) (सं) अ.—आतां; सध्यां; वर्तमानकालीं; प्रकृत; चालू.

संप्रतिपन्न (ಸಂಪ್ರತಿಪನ್ನ) (सं) वि.—प्राप्त; हस्तगत; मान्य; समजून आलेले; अनुभूत.

संप्रदान (ಸಂಪ್ರದಾನ) (सं) ना.—दान; देणगी; देणें; देन; आहेर.

संप्रदाय (ಸಂಪ್ರದಾಯ) (सं) ना.—परंपरा; पूर्वापार पद्धति; चाल; रूढी; तत्त्वज्ञानाची बैठक; विशिष्ट विचारप्रणाली.

संप्राप्त (ಸಂಪ್ರಾಪ್ತ) (सं) वि.—लाभयुक्त; मिळालेला; गवसलेला.

संप्राप्ति (ಸಂಪ್ರಾಪ್ತಿ) (सं) ना.—लाभ; फायदा; मिळकत.

संप्रीति (ಸಂಪ್ರೀತಿ) (सं) ना.—अतिप्रेम; आसक्ति; ममता; लाड.

संप्रोक्त (ಸಂಪ್ರೋಕ್ತ) (सं) वि.—चांगल्या रीतीनें विवरण केलेले; सुस्पष्ट; वाखाणलेले; शुद्ध केलेले.

संप्रोक्षण (ಸಂಪ್ರೋಕ್ಷಣ) (सं) ना.—पाणी शिंपडणें; शुद्धीकरण; पवित्री करण.

संप्लव (ಸಂಪ್ಲವ) (सं) ना.—निमज्जन; बुडी; प्रवाह; विध्वंसन; नष्टचर्य; उलथापालथ.

संप्लुत (ಸಂಪ್ಲುತ) (सं) वि.—पाण्यात बुडलेलें; जलमय झालेलें.

संबंध (ಸಂಬಂಧ) (सं) ना.—जोडणी; जुळणूक; नाते; बांधव्य; स्नेह; मैत्री.

संबंधि (धिक) (ಸಂಬಂಧಿ [ಧಿಕ]) (सं) ना.—आप्त; बंधु; नातेवाईक; सोयरीक; दशातला; सुहेरसुतकाचा.

संबद्ध (ಸಂಬದ್ಧ) (सं) वि.—नीट; बंदिस्त; अति जवळचा; संबंधी.

संब (बा) र (ಸಂಬ [ಬಾ] ರ) (क) ना.—संभार; सामग्री. साहित्य; मसाला; साधन.

संबळ (ಸಂಬಳ) (क) ना.—पगार; वेतन; मजूरी; कूली; रोजमुरा.

संबळिग (ಸಂಬಳಿಗ) (क) ना.—नोकर; सेवक; पगारी; पगार घेऊन काम करणारा; मजूर.

संबळिगे (ಸಂಬಳಿಗೆ) (क) ना.—संबळी; देव ठेण्वयाची पेटी. पाखें; भाग; सांकशी; बर्ची; वीट; भोसकण्याचे आयुध.

संबळिगोलु (ಸಂಬಳಿಗೋಲು) (क) ना.—दुबेळके; फाटा फुटलेली फांदी.

संबार (ಸಂಬಾರ) (क) ना.—संभार; साधनसामग्री; सांबर.

संबारकागे (ಸಂಬಾರಕಾಗೆ) (क) ना.—डोम कावळा; भारद्वाज. 'केंबूत' पहा.

संबाळिसु (ಸಂಬಾಳಿಸು) (क) धा.—रमविणें; समाधान करणें; संरक्षिणें; सांभाळणें; गप्प बसवणें; सहन करणें.

संबोधन (ಸಂಬೋಧನ) (सं) ना.—जागृति; बुद्धिवाद; समजूत; हाक; नाम विभक्ति.

संभव (ಸಂಭವ) (सं) वि.—आगामी; पुढे होणारे; भविष्यत्. (सं) ना.—उद्भव; जन्म; निपज; उपज; अस्तित्व.

संभविसु (ಸಂಭವಿಸು) (क) धा.—होणें; जन्म पावणें; उत्पन्न होणें; घटणें; दाखवणें.

संभार (ಸಂಭಾರ) (सं) ना.—सामग्री; उपकरण; संग्रह; सिद्धता.

संभावना (ने) (ಸಂಭಾವನಾ [ನೆ]) (सं) ना.—मान्यता; गौरव; प्रशस्ति; बिदागी; तर्क; योग्यता; सामर्थ्य; पूजा; सेवा; उपचार; घटना; कल्पना.

संभावित (ಸಂಭಾವಿತ) (सं) वि.—ज्ञात; तर्कित; अंदाजलेलें. (सं) ना.—सभ्य गृहस्थ; सज्जन; सद्गृहस्थ.

संभाविसु (ಸಂಭಾವಿಸು) (क) धा.—गौरवणें; मान्यता देणें; समजून घेणें; पारितोषिक देणें; आलोचना करणें.

संभाव्य (ಸಂಭಾವ್ಯ) (सं) वि.—घडण्यासारखें; होण्याजोगें; तर्क करण्यायोग्य; कल्पनीय; संभवनीय.

संभाषण (णे) (ಸಂಭಾಷಣ [ಣೆ]) (सं) ना.—बोलणें चालणें; संवाद; चर्चा; गप्पा.

संभिन्न (ಸಂಭಿನ್ನ) (सं) वि.—फुटलेले; तुकडे झालेले; विकसित; उमललेले; वेगळे झालेले.

संभूत (ಸಂಭೂತ) (सं) वि.—जन्मलेले; उपजलेले; उत्पन्न झालेले; प्राप्त.

**संभृत** (ಸಂಭೃತ) (सं) वि.—पूर्ण भरलेले; सुरक्षित; शाकारलेले; शाकारणी केलेले; परतविलेले.

**संभोग** (ಸಂಭೋಗ) (क) ना.—आनंद; विलास; तृप्ति; सुरति; उपभोग.

**संभ्रम** (ಸಂಭ್ರಮ) (सं) ना.—कंपन; संचार; गडबड; हुरूप; उत्साह; आनंद; उद्रेक; समारंभ; आरास; शोभा; सौंदर्य; विजृंभण.

**सम्म** (ಸಮ್ಮ) (क) ना.—चर्म; चामडें; कातडें.

**—कार** (ಕಾರ) (क) ना.—चर्मकार; चांभार; कातडकाम करणारा.

**सम्मत** (ಸಮ್ಮತ) (सं) वि.—कबूल केलेलें; अनुमति दिलेले; एकाच अभिप्रायाचे; सहमत.

**सम्मति** (ಸಮ್ಮತಿ) (सं) ना.—कबूली; अनुमति; अनुकूलता; मान्यता; आज्ञा; समेट; एकी.

**सम्मर्द** (ಸಮ್ಮರ್ದ) (सं) ना.—जमाव; गर्दी; खेचाखेच; रेटारेट.

**सम्मर्दन** (ಸಮ್ಮರ್ದನ) (सं) ना.—घर्षण; घासाघीस; रेटारेट; हातपाय रगडणें; चेपणें; पादसंवाहन.

**सम्मान** (ಸಮ್ಮಾನ) (सं) ना.—सन्मान; गौरव; घनता; मान्यता; उपचार.

**सम्मानिसु** (ಸಮ್ಮಾನಿಸು) (क) धा.—मान देणें; गौरवणें; आदरणें; मानणें; उपचार करणें.

**सम्मार्जन** (ने) (ಸಮ್ಮಾರ್ಜನ [ನೆ]) (सं) ना.—धुणें; धावन; सोवळें; उजळा; स्वच्छता; निर्मळपणा.

**सम्मार्जनि** (नी) (ಸಮ್ಮಾರ್ಜನಿ [ನೀ]) (सं) ना.—झाडणी; केरसुणी; झटकणी.

**सम्मिश्र** (ಸಮ್ಮಿಶ್ರ) (सं) वि.—एकवटलेले; मिसळलेले; एकत्र केलेले.

**सम्मुख** (ಸಮ್ಮುಖ) (सं) वि.—तोंडासमोर; डोळ्यादेखत; समोर; जवळ; सामने.

**—समरसम्मुख** (ಸಮರಸಮ್ಮುಖ) (सं) ना.—युद्धसज्ज; युद्धारंभ; युद्धाची आघाडी; 'मुचोंणि' पहा.

**सम्मुद** (ಸಮ್ಮುದ) (सं) ना.—अत्यानंद; हर्ष; प्रीति; ममता.

**सम्मेल** (लन) (ಸಮ್ಮೇಲ [ಲನ]) (सं) ना.—देणगी; प्रवेश; मेळावा; परिषद्.

**सम्मोहक** (ಸಮ್ಮೋಹಕ) (सं) वि.—मोह पाडणारें; भ्रम उत्पन्न करणारें.

**सम्मोहन** (ಸಮ್ಮೋಹನ) (सं) ना.—वेड; मोह; भुरळ; भ्रांति; भ्रम.

**—अस्त्र** (ಅಸ್ತ್ರ) (सं) ना.—मूर्छा आणणारें एक आयुध.

**सम्यक्** (ಸಮ್ಯಕ್) (सं) अ.—चांगल्या रीतीनें; सरळपणें; लक्षपूर्वक; पूर्णपणें.

**सम्राज्** (ट्) (ಸಮ್ರಾಜ್ [ಟ್]) (सं) ना.—चक्रवर्ती; सार्वभौम; राजाधिराज.

**सय्** (ಸಯ್) (क) धा.—शांत होणें; थंड होणें; थांबणें; निष्क्रिय होणें.

(क) अ.—हूं! ठीक!

**सय** (ಸಯ) (क) वि.—वेगवान्; अभिनिवेशपूर्ण; सरळ; नीट; सावेश; अचूक; बरोबर; योग्य; आपलें.

**सयंबर** (ಸಯಂಬರ) (क) ना.—स्वयंवर; स्वतःच पति निवडणें.

**सय्गरे** (ಸಯ್ಗರೆ) (क) धा.—संतत धार धरणें; सारखें ओंतणें; वर्षिणें.

**सय्गे** (ಸಯ್ಗೆ) (क) ना.—संज्ञा; गुण; संकेत; चिन्ह.

**सय्गेडे** (ಸಯ್ಗೆಡೆ) (क) धा.—आडवे पडणें; सांष्टांग नमस्कार घालणें; लोळण घेणें; लोटांगण घालणें.

**सय्त** (ಸಯ್ತ) (क) वि.—सरळ भावी; आडपडदा न ठेवणारा; लपवाछपवी न करणारा; कपट न करणारा; उघडा; निष्कपट; वंचना न करणार.; प्रामाणिक.

**सय्तिड्डु** (ಸಯ್ತಿಡು) (क) धा.—समाधान होणें; रमणें.

**सय्तु** (ಸಯ್ತು) (क) धा.—सही; होय; ठीक; अस्तु; विश्रांति; विराम; क्षेम; उत्तम.

**सय्ते** (ಸಯ್ತೆ) (क) ना.—निष्कपटता; ऋजुता; प्रामाणिकपणा; सरळपणा.

**सय्द** (ಸಯ್ದ) (क) वि.—प्रामाणिक; सरळ.

(क) ना.—ब्राह्मण.

**सय्देगे** (ಸಯ್ದೆಗೆ) (क) धा.—सुंदर होणें; शोभिवंत होणें; शोभणें.

**सय्पु** (सैपु) (ಸಯ್ಪು [ಸೈಪು]) (क) ना.—विश्रांति; मौन; नीरवता; सरळपणा; निष्कपटता; नीति; न्याय; पुण्य; सुकृत.

**सय्प** (सैप) रि (ಸಯ್ಪ [ಸೈಪ] ರಿ) (क) धा.—पुढें जाणें; पळणें; बरेंच पुढें सरणें; चांगले पुढें येणें.

**सय्वे** (सैव) रगु (ಸಯ್ವೆರಗು) (ಸೈವೆರಗು) (क) ना.—महदाश्चर्य; अचंबा; अहोविस्मय.

**सर** (ಸರ) (क) ना.—शर; बाण; काठी; फुलाची माळ; हार; मोत्याचा पेंडा.

**सर** (रत्) (ಸರ [ರತ್]) (सं) ना.—सरोवर; तळें; किनारा.

(सं) वि.—हलणारें; पुढें जाणारें.

**सरकटिसु** (ಸರಕಟಿಸು) (क) धा.—दूर जाणें; ढकलत नेणें; पुढें ढकलणें; एकत्रित करणें; मिसळणें.

**सरकार** (ಸರಕಾರ) (अ. दे) ना.—अधिकारी मंडळ; शासनसभा; परंपरेने येणारी शासनसंस्था.

**सरकु** (ಸರಕು) (क) ना.—सामान; लक्ष; ध्यान; लगन; एकचित्तता.

**सरकूठ** (ಸರಕೂಟ) (क) ना.—सुतार पक्षी 'शरारि' पहा.
**सर (रि) गुणिके** (ಸರ [ರಿ] ಗುಣಿಕೆ) (क) ना.—सुरगाठ; फास; एक प्रकारची गाठ.
**सरगुद्दु** (ಸರಗುದ್ದು) (क) ना.—भगदाड; भोंक; खिंडार; किल्ल्यांतील चोरवाट; भुयार.
**सरघ (घा) (घे)** (ಸರಘ [ಘಾ] ಘೆ) (सं) ना.—भ्रमर; भुंगा; षट्पद.
**सरट** (ಸರಟ) (सं) ना.—सरडा; पाल; गणपत.
**सरटसर्पन्याय** (ಸರಟಸರ್ಪನ್ಯಾಯ) (सं) ना.—भ्रमानें उद्भवलेलें भय; सरड्याला साप समजून वाटणारे भय.
**सरण** (ಸರಣ) (सं) ना.—चलन; हालचाल; गमन.
(क) ना.—शरण; रक्षण; आश्रय; प्रगमन; स्वागत; सामोरे जाणें; चिता.
**सरणि** (ಸರಣಿ) (सं) ना.—रीति; क्रम; पद्धति; मार्ग; ओळ; पंक्ति; काव्यशैली.
**सरणिकेडु** (ಸರಣಿಕೆಡು) (क) धा.—मार्ग चुकणें; वाट विसरणें; शैली सुटणें; क्रम बदलणें.
**सरत्विमान** (ಸರತ್ವಿಮಾನ (सं) ना.—संथ जाणारें विमान; ग्लायडर (Glider)
**सरति (दि)** (ಸರತಿ [ದಿ]) (क) ना.—बारी; पाळी; क्रम; खेप.
**सरत्नि** (ಸರತ್ನಿ) (सं) ना.—मुंडाहात; मुंडेमाप.
**सरद** (ಸರದ) (क) ना.—शरद; शरद्काल; पावसाळा.
**सरदार** (ಸರದಾರ) (अ. दे) ना.—नायक; पुढारी; मांडलिक; जहागीरदार.
**सरदि** (ಸರದಿ) (अ. दे) ना.—थंडी; शैत्य; पडसें.
**सरपणि (ळि)** (ಸರಪಣಿ [ಳಿ]) (क) ना.—सांखळी; शृंखळा.
**सरमरिके** (ಸರಮರಿಕೆ) (क) ना.—दृढालिंगन; आनंदाची भेट.
**सरमा (मे)** (ಸರಮಾ [ಮೆ]) (क) ना.—देवशुनि; कुत्रें; देवलोकींचें कुत्रें; बिभीषण पत्नि.
**सरल् (लु) (ळु)** (ಸರಲ್ [ಲು] [ಳು]) (क) ना.—बाण; पाणी.
**सरल** (ಸರಲ) (क) वि.—बाण असलेला.
—**पूसरल** (ಪೂಸರಲ) (क) ना.—कामदेव; मन्मथ.
**सरल** (ಸರಲ) (सं) वि.—जवळचा; नीट; सरळ; निष्कपट; सहज; सुलभ; आडंबररहित; प्रामाणिक.
(सं) ना.—देवदार; सुरतरु.
**सरले** (ಸರಲೆ) (सं) वि.—निष्कपट स्त्री; सद्वर्तनी स्त्री.
**सरवि (वे)** (ಸರವಿ [ವೆ]) (क) ना.—गवताचा दोर; धागा; शिकार; शाखा; समुद्र.
**सरस** (ಸರಸ) (सं) वि.—रसासह; आनंद देणारा; भावपूर्ण; आकर्षित करणारें; हलतें; चंचल.
(सं) ना.—हास्य; चेष्टा; सरोवर; तळें.
—**गाति** (ಗಾತಿ) (क) ना.—सदाचारिणी; कामिनी; अभिनेत्री; विलासिनी; विलासवती.
**सरसति** (ಸರಸತಿ) (क) ना.—सरस्वति; शारदा; विद्यादेवी.
**सरसि (सी)** (ಸರಸಿ [ಸೀ]) (सं) ना.—सरोवर; तळें; डोह.
**सरसि (सी) ज** (ಸರಸಿ [ಸೀ] ಜ) (सं) ना.—कमल; सरोवरांत जन्मणारें.
—**नाभ** (ನಾಭ) (सं) ना.—विष्णु; कृष्ण.
—**नेत्र** (ನೇತ್ರ) (सं) ना.—कमलनेत्र; विष्णु.
—**भव** (ಭವ) (सं) ना.—ब्रह्मदेव.
**सरसिजात** (ಸರಸಿಜಾತ) (सं) ना.—कमल; सरोवरांत उत्पन्न झालेलें.
**सरसिजांबक** (ಸರಸಿಜಾಂಬಕ) (सं) ना.—कमलनेत्र; विष्णु; कृष्ण.
**सरसिजासन** (ಸರಸಿಜಾಸನ) (सं) ना.—ब्रह्मदेव; कमलासन.
**सरसि (सी) रुह** (ಸರಸಿ [ಸೀ]ರುಹ) (सं) ना.—कमल.
**सरस्वत्** (ಸರಸ್ವತ್) (सं) ना.—समुद्र; सागर.
**सरस्वति (ती)** (ಸರಸ್ವತಿ [ತೀ]) (सं) ना.—विद्यादेवता; शारदा; भाषा; वाणी.
**सरस्सु (स्)** (ಸರಸ್ಸು [ಸ್]) (सं) ना.—सरोवर; डोह; मोठें तळें.
**सरहद्दु** (ಸರಹದ್ದು) (अ.दे) ना.—सीमा; सरहद्द; सीमारेखा; सीमांत.
**सरळ् (ळु)** (ಸರಳ್ [ಳು]) (क) ना.—बाण; शर; शलाका.
**सरळ** (ಸರಳ) (सं) वि.—सरळ; सुगम; जवळचा; नीट; थेट.
—**अरसरळ** (ಅರಸರಳ) (क) ना.—देवदार; सुरवृक्ष; पंचबाण; मदन.
**सरळिसु** (ಸರಳಿಸು) (क) धा.—उडणें; उडी मारणें; धूम ठोकणें; 'नेगे' पहा.
**सराग** (ಸರಾಗ) (सं) वि.—प्रीतीनें; बांधलेलें; उत्सुक.
(क) वि.—सुलभ; जवळचा; शेजारचा; अविलंबित.
**सराफ** (ಸರಾಫ) (अ.दे)—सोन्याचांदीचा व्यापारी; व्याजबट्टा करणारा; नगदी कारकून.
**सरि (रित्)** (ಸರಿ [ರಿತ್]) (सं) ना.—झरा; प्रपात; धबधबा.
**सरि** (ಸರಿ) (क) धा.—जागा सोडणें; बाजूला सरणें; जाणें; चालू लागणें; चालविणें.
(क) वि.—ठीक; सम; सपाट; योग्य; न्याय्य; क्रमबद्ध.
(क) ना.—रास; डिंक; सरस; चिकट पदार्थ; वाहवा! भले! उतार.
—**इसु** (ಇಸು) (क) धा.—जागा देणें; खालीं ढकलणें; रेटणें.
—**इक** (ಇಕ) (क) ना.—समवयस्क; एक पातळींतील स्नेही; बंधु.

—**परि** (ಪರಿ) (क) धा.—समान होणें; जुळणें; जोड होणें.
**सरिकतन** (ಸರಿಕತನ) (क) ना.—समानता; समयोग्यता; नातें; आप्तत्व.
**सरिका (गा)ण्** (ಸರಿಕಾ [ಗಾ] ಣ್) (क) धा.—तुलना करणें; ताडून पाहणें; तापवून परीक्षिणें.
**सरिगुणिके** (ಸರಿಗುಣಿಕೆ) (क) ना.—सुरगाठीची वीण; साखळी टाका.
**सरिगे** (ಸರಿಗೆ) (क) ना.—दागिना; गळ्यांतील सरी; फास; गाठ.
**सरित् (त्तु)** (ಸರಿತ್ [ತ್ತು]) (सं) ना.—ओढा; प्रवाह; झरा; धागा सूत; दोरी.
—**पति** (ಪತಿ) (सं) ना.—समुद्र; नदीपति.
—**सुत** (ಸುತ) (सं) ना.—भीष्माचार्य.
**सरिदोरे** (ಸರಿದೊರೆ) (क) अ.—सम; योग्य.
**सरिद्वरा (रे)** (ಸರಿದ್ವರಾ [ರೆ]) (सं) ना.—नदीमधील श्रेष्ठ नदी, महानदी.
**सरिमिंडि** (ಸರಿಮಿಂಡಿ) (क) ना.—समवयस्क मुलगी; अविवाहित कन्या.
**सरिल्** (ಸರಿಲ್) (क) ना.—एक प्रकारचा मासा.
**सरिस** (ಸರಿಸ) (क) ना.—सामीप्य; समानता; युद्ध; रणकंदन; सरलता; समोर; बाजू.
**सरीसृप** (ಸರೀಸೃಪ) (सं) ना.—सर्प; विंचु; पाल; सरडा; सरपटणारा प्राणी.
**सरु** (ಸರು) (क) ना.—गमन; चलन; मृगाचा माग; श्वापद फिरण्याचा जंगली रस्ता.
**सरूप** (ಸರೂಪ) (सं) वि.—रूपसहित; समरूप; रूपसाम्य; एकरूपता; सरूपता; चार मुक्तींपैकी एक.
**सरोज** (ಸರೋಜ) (सं) ना.—कमल.
—**निलय** (ನಿಲಯ) (सं) ना.—लक्ष्मीदेवी.
—**नेत्र** (ನೇತ್ರ) (सं) ना.—कमलनेत्र; विष्णु; कृष्ण.
—**भव** (ಭವ) (सं) ना.—ब्रह्मदेव.
—**रिपु** (ರಿಪು) (सं) ना.—चंद्र.
—**सख —मित्र** (ಸಖ—ಮಿತ್ರ) (सं) ना.—सूर्य.
**सरोजिनि (नी)** (ಸರೋಜಿನಿ [ನೀ]) (सं) ना.—कमलिनी.
**सरोधि** (ಸರೋಧಿ) (सं) ना.—समुद्र; सागर.
**सरोरुह** (ಸರೋರುಹ) (सं) ना.—कमल. 'तावरे' पहा.
**सरोवर** (ಸರೋವರ) (क) ना.—सर; महातळें; डोह.
**सर्क** (ಸರ್ಕ) (सं) ना.—वारा; वायु; मन.
**सर्ग** (ಸರ್ಗ) (सं) ना.—अध्याय; प्रकरण; संधि; त्याग; सृष्टि; जनन; जन्म.
**सर्ज (र्जक)** (ಸರ್ಜ [ರ್ಜಕ]) (सं) ना.—शालवृक्ष; राळ.
**सर्प** (ಸರ್ಪ) (सं) धा.—पुढें चालणें; पुढें सरणें.
(सं) ना.—सर्प; नागसाप.
**सर्पतुंडिक** (ಸರ್ಪತುಂಡಿಕ) (सं) ना.—गारुडी; साप खेळवणारा.
**सर्पभूषण** (ಸರ್ಪಭೂಷಣ) (सं) ना.—शंकर; एक कन्नड कवि.
**सर्पराज** (ಸರ್ಪರಾಜ) (सं) ना.—वासुकी; सापांचा राजा; आदिशेष.
**सर्पि (र्पिस्)** (ಸರ್ಪಿ [ರ್ಪಿಸ್]) (सं) ना.—तूप; आज्य.
**सर्पिणि (णी)** (ಸರ್ಪಿಣಿ [ಣೀ]) (क) ना.—नागिणी; सर्पराणी; नागीण.
**सर्ब (ब्ब)** (ಸರ್ಬ [ಬ್ಬ]) (क) वि.—सर्व; सगळे; अखिल.
(क) ना.—शिव; शर्व.
**सर्बव (ब्बव)** (ಸರ್ಬವ [ಬ್ಬವ]) (क) ना.—वेषधारी; बहुरूपी; सोंग घेणारा; थट्टेखोर; चेष्टेखोर.
**सर्ले** (ಸರ್ಲೆ) (क) ना.—बदक; पाणकोंबडी; 'बातुगोलि' पहा.
**सर्व** (ಸರ್ವ) (सं) वि.—सकल; अखिल; सगळे; बट्ट; पुरें.
(सं) ना.—महादेव; विष्णु.
**सर्वंसहा (हे)** (ಸರ್ವಂಸಹಾ [ಹೆ]) (सं) ना.—सर्व सहन करणारी; भूदेवी; क्षमा; पृथ्वी.
**सर्वज्ञ** (ಸರ್ವಜ್ಞ) (सं) ना.—सर्व; महाज्ञानी; कर्नाटकांतील सर्वज्ञ महाकवि.
**सर्वतोभद्रे** (ಸರ್ವತೋಭದ್ರೆ) (सं) ना.—नटी.
**सर्वतोमुख** (ಸರ್ವತೋಮುಖ) (सं) वि.—सर्व प्रकारचा; पूर्ण.
(सं) ना.—शिव; ब्रह्मा; अतिमानव व्यक्ति; ब्राह्मण; अग्नि; स्वर्ग.
**सर्वत्र** (ಸರ್ವತ್ರ) (सं) अ.—चोहोकडे; कोठेंहि; सर्व बाजूंस; अखंडपणें; सर्व संदर्भांमधें.
**सर्वथा** (ಸರ್ವಥಾ) (सं) अ.—सर्वप्रकारें; सुतराम्; खात्रीनें; निश्चयपूर्वक.
**सर्वदा** (ಸರ್ವದಾ) (सं) अ.—केव्हाहि; सर्वकालीं; सदोदित.
(सं) ना.—सर्वानुग्रही; अन्नपूर्णा; पार्वती; शारदा.
**सर्वभक्षक** (ಸರ್ವಭಕ್ಷಕ) (सं) ना.—सर्वनाशी; अग्नि; निखारा; ज्वाळा.
**सर्वमंगला (ले)** (ಸರ್ವಮಂಗಲಾ [ಲೆ]) (सं) ना.—पार्वती; सर्व मंगल करणारी.
**सर्वस्व** (ಸರ್ವಸ್ವ) (सं) ना.—चीजवस्तु; संपत्ति; मिळकत.
**सर्वांगीण** (ಸರ್ವಾಂಗೀಣ) (सं) वि.—सर्व देहाशीं संबद्ध; सर्व बाजूंनीं परिपूर्ण.
**सर्वाधिकार** (ಸರ್ವಾಧಿಕಾರ) संपूर्ण शासनस्वातंत्र्य; निरंकुश प्रभुत्व; संपूर्ण अधिकार.
**सर्वाधिकारि** (ಸರ್ವಾಧಿಕಾರಿ) (सं) ना.—निरंकुश सत्ताधारी; हुकूमशहा; संपूर्ण शासनाधिकार असलेला.

**सर्वार्थसिद्ध** (ಸರ್ವಾರ್ಥಸಿದ್ಧ) (सं) ना.—बुद्धदेव; सर्व पुरुषार्थ साधलेला.
**सर्ष (षु) प** (ಸರ್ಷ [ಷು] ಪ) (सं) ना.—मोहरी; फोडणीचे दाणे.
**सर्षपमेरुन्याय** (ಸರ್ಷಪಮೇರುನ್ಯಾಯ) (सं) ना.—राईचा पर्वत; पराचा पारवा; अजगजांतर; जमीनअस्मानाचें अंतर; अति असमानता.
**सल् (लु)** (ಸಲ್ [ಲು]) (क) धा.—योग्य होणें; मनाला येणें; आवडणें; प्रवेशणें; स्पर्शणें; गळाठणें; थकणें.
**सल** (ಸಲ) (सं) ना.—पाणी; जल; हालचाल; गमन.
(क) ना.—बारी; पाळी; सरती; पट; समय.
**सलके** (ಸಲಕೆ) (क) ना.—शलाका; सळी; लोहपट्टी; वेत; घाण काढण्याचे साधन. 'गोरुमणे' पहा; खोरें.
**सलग** (ಸಲಗ) (क) ना.—हत्तीच्या कळपांतील प्रमुख हत्ती; महागज; ऐरावत; खोंड.
**सलगु** (ಸಲಗು) (क) ना.—शलाका; सळी; वेत; कांब; काठी; फुलाचा देठ.
**सलपु (वु) (हु)** (ಸಲಪು [ವು] ಹು) (क) धा.—राखणें; पालन करणें; संगोपणें; जोपासणें.
**सलहा (हे)** (ಸಲಹಾ [ಹೆ]) (क) ना.—आलोचना; हितबुद्धि; हितवाद; अभिप्राय.
**—गार** (ಗಾರ) (क) वि.—आलोचक; सल्ला देणारा; हितवादी.
**सलाकि (के)** (ಸಲಾಕಿ [ಕೆ]) (क) ना.—शलाका; लोखंडी कांब; वेत; लाठीकाठी; फुलाचा देठ.
**सलिगे,** (ಸಲಿಗೆ) सलगी; परिचय; आवड; अग्नि; योग्यता; वापर; लाड; कौतुक; लालन.
**सलिल** (ಸಲಿಲ) (सं) ना.—पाणी; जल; वारे.
**सलिलज** (ಸಲಿಲಜ) (सं) ना.—कमळ; पाण्यांत जन्मणारें.
**सलिसु** (ಸಲಿಸು) (क) धा.—शिवणें; पोहोचणें; संधान बांधणें; अर्पण करणें; वाहणें.
**सलीलं** (ಸಲೀಲಂ) (सं) अ.—खेळतखेळत; सुलभतेनें; सहज; हळुवारपणें; आनंदानें.
**सलील** (ಸಲೀಲ) (सं) वि.—लीलायुक्त; विनोदपूर्ण;
**सलीसु** (ಸಲೀಸು) (क) वि.—सहज; सुलभ; प्रेमळ; समीपचें.
**सलु** (ಸಲು) (क) धा.—योग्य होणें; कबूल करणें; प्रवेश करणें; आवडणें; मनाला येणें.
**सलुगे** (ಸಲುಗೆ) (क) ना.—स्नेहाचार; गाढ मैत्री; सलगी; अति परिचय.
**सलुवळि** (ಸಲುವಳಿ) (क) ना.—योग्यता; साम्य; समावेश; औचित्य; रूढी; वापर; संप्रदाय; विनिमय; वधुवरांची कुंडली जमणें.
**सले** (ಸಲೆ) (क) अ.—चांगल्या रीतीनें; नीट; अतिशयेंकरून.
(क) धा.—विकणें; विक्री करणें; विनिमय करणें; देवघेव करणें
**सल्ल** (ಸಲ್ಲ) (क) अ.—योग नव्हे ! नको ! नकारार्थी अव्यय.
**सल्लकि (की)** (ಸಲ್ಲಕಿ [ಕೀ]) (सं) ना.—एक वृक्ष; कवठाचें झाड; 'वेळवल' पहा.
**सल्ललित** (ಸಲ್ಲಲಿತ) (सं) वि.—अतिसुंदर; मनोहर.
**सल्लाप** (ಸಲಾಪ) / **संलाप** (ಸಂಲಾಪ) (सं) ना.—सुखालाप; गप्पा; चर्चा; सलगीच्या गोष्टी.
**सल्लु** (ಸಲ್ಲು) (क) धा.—आवडणें; प्रवेश करणें; स्पर्शणें; वाकणें; कबूल करणें.
**सल्ले** (ಸಲ್ಲೆ) (क) धा.—शल्य; बर्ची; बाण; भोसकण्याचें आयुध; भाला.
**सल्लेखनव्रत** (ಸಲ್ಲೇಖನವ್ರತ) (सं) ना.—जैनाचें प्रायोपवेशन; उपवास.
**सव** (ಸವ) (क) वि.—सम; योग्य; सरळ; समान; बरोबरीचा.
(क) ना.—शव; मढें; प्रेत.
**—तिनि** (ತಿನಿ) (क) ना.—प्रेतभक्षक; राक्षस; पिशाच; लाव.
**सवकट्टु** (ಸವಕಟ್ಟು) (क) ना.—व्यवस्था; सिद्धता; सपाट जमीन; समपातळी; सपाटी.
**सवकळि** (ಸವಕಳಿ) (क) ना.—झीज; घर्षण; परिणाम; वापर; चालचलन.
**सवग** (ಸವಗ) (क) ना.—कवच; चिलखत; अंगत्राण.
**सवडि** (ಸವಡಿ) (क) ना.—जोड; साथ; जुळें; युग्म; आवळेजावळे.
**सवडु** (ಸವಡು) (क) ना.—विश्रांति; विश्राम; मध्यंतर; जोडीदारी; सोबती; सांगाति.
**सवण** (ಸವಣ) (क) ना.—श्रवण; जैन यति; श्रमण; वस्ती; चिमटा; सांडस; सणशी; पक्कड; 'इक्कुळ' पहा.
**—मने** (ಮನೆ) (क) ना.—बस्ती; जैनमंदिर.
**सवणिसु** (ಸವಣಿಸು) (क) धा.—सावरणें; सारखें करणें; गोळा करणें; 'सवनिसु' पहा.
**सवति (ते)** (ಸವತಿ [ತೆ]) (क) ना.—सवत; सपत्नि; पतीची दुसरी बायको; वाळुक; काकडी.
**सवन** (ಸವನ) (सं) ना.—होम; यज्ञ; स्नान; सोमरस पिळून काढणें.
**सवनिसु** (ಸವನಿಸು) (क) ना.—होणें; संभवणें; घडून येणें; सिद्ध होणें; बरोबर करणें.
**सवरु (र्)** (ಸವರು [ರ್]) (क) धा.—कातरणें; उपटणें; लेपणें, लावणें; गुळगुळीत करणें; हातावर हात मारणें; शिस्त करणें; शेवटास नेणें; नियमन होणें.

**सवरिसु** (ಸವರಿಸು) (क) धा.—एकत्रित करणें; मिसळणें; कातरल्यासारखें करणें.

**सवर्ण** (ಸವರ್ಣ) (सं) ना.—समवर्ण; एकाच जातीचे; एकाच ठिकाणाहून उच्चारले जाणारे वर्ण.

—**दीर्घ** (ದೀರ್ಘ) (सं) ना.—सवर्णाक्षर दीर्घ करणारा संधी.

**सवसु** (ಸವಸು) (क) धा.—सिद्ध करणें; टोक करणें; झिजवणें.

**सवळदे** (ळतडे) (ಸವಳದೆ [ಳ್ತಡೆ]) (क) धा.—प्रातःकाल; उषःकाल; सकाळ.

**सवळिसु** (ಸವಳಿಸು) (क) धा.—संग्रह करणें; कौलें शाकारणें; भरणें.

**सवायि** (ಸವಾಯಿ) (अ. दे.) ना.—सवापट; काकणभर अधिक.

**सवार** (ಸವಾರ) (क) ना.—राऊत; स्वार; वाहनारूढ.

**सवालु** (ಸವಾಲು) (अ. दे.) ना.—प्रश्न; म्हणणें; आव्हान; पैज; शर्यत.

**सवि** (ಸವಿ) (क) धा.—चाखणें; रुचि पाहणें; अनुभव घेणें.
(क) ना.—रुचि; चव; गोडी; मधुरता; माधुर्य; स्वाद; सुवास; मनोहरता.

**सविगडलु** (ಸವಿಗಡಲು) (क) ना.—क्षीर सागर; दुग्धसमुद्र; 'इंगडल' पहा.

**सविगाणु** (ಸವಿಗಾಣು) (क) धा.—अनुभव घेणें; चाखणें; चव पाहणें.

**सविगार** (ಸವಿಗಾರ) (क) वि.—रुचि जाणणारा; चाखून पाहणारा; वेषभूषा करणारा; रसिक; चाखया.

**सवितृ** (तार) (ಸವಿತೃ [ತಾರ]) (सं) ना.—सूर्य.

**सविदोरु** (ಸವಿದೋರು) (क) धा.—चव दाखविणें; चाखवणें; वाईट अनुभव येणें.

**सविनय** (ಸವಿನಯ) (सं) वि.—नियमानुसार; विनम्र.

**सविनोट** (ಸವಿನೋಟ) (क) ना.—प्रेमदृष्टि; शृंगारदृष्टि; डोकावणी; कामुक दृष्टि.

**सविबेट** (ಸವಿಬೇಟ) (क) ना.—शृंगारचेष्टा; विलासी हावभाव; मधुरमीलन.

**सवियेरे** (ಸವಿಯೆರೆ) (क) ना.—मिष्टान्नभोजन; गोड खाद्य; पक्वान्नसेवन.

**सविसु** (सवेयिसु) (ಸವಿಸು [ಸವೆಯಿಸು]) (क) धा.—झिजणें; झिजविणें; वाढणें; पंगत वाढणें; मासला दाखवणें; कष्ट घेणें.

**सवुटु** (ಸವುಟು) (क) ना. पळी; चमचा; लाकडी पळी; डाव.

**सवुसव** (ಸವುಸವ) (क) ना.—चांगुलपणा; परिमळ; सुवास; शोभा; सौष्ठव.

**सवुते** (ಸವುತೆ) (क) ना.—काकडी; वाळूक.

**सवुदे** (ಸವುದೆ) (क) ना.—समिधा; लाकूडफाटा; जळण.

**सवुळु** (ಸವುಳು) (क) ना.—खारट; मचुळ; सोडा; खार.

—**कार** (ಕಾರ) (क) ना.—सुताला रंग देण्याचा पदार्थ; क्षार.

**सवे** (ಸವೆ) (क) धा.—सिद्ध करणें; टोंक करणें; नाश होणें; क्षीण होणें; झिजणें; उगाळणें; तिंबणें; वाण पडणें; टंचाई भासणें.

**सवेयिसु** (ಸವೆಯಿಸು) (सं) धा.—झिजणें; झिजवणें; पंगत वाढणें; मासला दाखवणें.

**सव्य** (ಸವ್ಯ) (सं) ना.—डावी बाजू; विरोध; मागची बाजू; विरुद्ध बाजू.

**सव्यसाचि** (चिन्) (ಸವ್ಯಸಾಚಿ [ಚಿನ್]) (सं) ना.—डाव्या हातानें बाण मारणारा; अर्जुन.

**सव्वळि** (ಸವ್ವಳಿ) (क) ना.—लाटेची सुरळी; लाटेची गुंडाळी; लहरीचें अंतर्वलन.

**सशरीर** (ಸಶರೀರ) (सं) वि.—सदेह; कायेसह.

**ससन** (ಸಸನ) (क) ना.—बलिदान; आलंब.

**ससने** (ಸಸನೆ) (क) वि.—स्थिर; स्पष्ट; नीरव; मूक; अचल; न हलणारें; मौनयुक्त.

**ससि** (ಸಸಿ) (क) ना.—शशि; चंद्र; सस्य; मोडाचें धान्य; लहान तरु; रोपटें.
(क) धा.—विंचरणें; गुंता सोडवणें; अडचणींतून मुक्त करणें; उपटणें; निवडणें.

**ससिगल्** (ಸಸಿಗಲ್) (क) ना.—चंद्रकांत मणि; शशिकांत शिला.

**ससिदलेय** (ಸಸಿದಲೆಯ) (क) शशिशेखर; चंद्रमौली; शिव.

**ससिन** (ಸಸಿನ) (क) अ.—सरळ; नीट; जवळपास; व्यवस्थितपणें; उचितपणें.

**ससिने** (ಸಸಿನೆ) (क) अ.—जवळ; बाजूस; सरळ; चांगल्या रीतीनें; समानपणें.

**ससिल्** (लु) (ಸಸಿಲ್ [ಲು]) (क) ना.—एक जातीचा मासा.

**ससूत्र** (ಸಸೂತ್ರ) (सं) वि.—दोरीसह; धागायुक्त; पदर असलेला.
(सं) अ.—संकटाशिवाय; अडचणीखेरीज; सुलभतेनें; प्रेमानें.

**सस्य** (ಸಸ್ಯ) (सं) ना.—वनस्पति; धान्य; दाणा; 'दवस' पहा.

**सह** (ಸಹ) (सं) अ.—बरोबर; मिळून; संगतीनें; एकंदरीनें; सोबतीनें.

**सहकरिसु** (ಸಹಕರಿಸು) (क) धा.—मदत देणें; सहकार करणें; दान देणें; एकवटणें.

**सहकार** (ಸಹಕಾರ) (सं) ना.—परस्पर साह्य; एकोप्यानें काम करणें; गोड आंबा; आम्रवृक्ष.

**सहगमन** (ಸಹಗಮನ) (सं) ना.—सती जाणें; पतीच्या चितेवर आत्मविसर्जन.

**सहचर** (ಸಹಚರ) (सं) ना.–जोडीदार; सोबती; सवंगडी; मित्र; अंतेवासी; अनुचर.

**सहचरि** (ಸಹಚರಿ) (सं) ना.–मैत्रीण; जोडीदारीण.

**सहज** (ಸಹಜ) (सं) वि.–स्वाभाविक; बरोबर जन्मलेले; जुळे; सरळ; सुलभ; अनायास; सत्य.

**सहजते** (ಸಹಜತೆ) (सं) ना.–सरळपणा; स्वाभाविकता; अकृत्रिमता.

**सहजात** (ಸಹಜಾತ) (सं) ना.–जोडीनें जन्मलेला; सख्खा भाऊ.

**सहणि** (ಸಹಣಿ) (क) ना.–अश्वपालक; घोड्याला ताब्यांत ठेवणारा.

**सहदेव** (ಸಹದೇವ) (सं) ना.–पांचवा पांडव; सहोपासक; एकाच देवाचे भक्त.

**सहधर्मिणि (णी)** (ಸಹಧರ್ಮಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–धर्मकार्यात समानाधिकार असलेली; धर्मपत्नि; भार्या.

**सहन (ने)** (ಸಹನ [ನೆ]) (सं) ना.–सहनशीलता; शांति; क्षमा; 'सैरणे' पहा.

**सहपंक्ति** (ಸಹಪಂಕ್ತಿ) (सं) ना.–एकपांक्त; एकत्र जेवणारे; एकाच जातीचे.

**सहभव** (ಸಹಭವ) (सं) ना.–भाऊ भाऊ; सहोदर.

**सहवास** (ಸಹವಾಸ) (सं) ना.–मिळून राहणें; स्नेह; संगत; सोबत; जोडीदारपणा.

**सहस (स्)** (ಸಹಸ [ಸ್]) (सं) ना.–दीर्घप्रयत्न; सामर्थ्य; चैतन्य; हिवाळा; मार्गशीर्ष मास; शोभा; विजय.

**सहसा** (ಸಹಸಾ) (सं) अ.–लागलीच; तक्षणीं.

**सहसि (सिग)** (ಸಹಸಿ [ಸಿಗ]) (क) ना.–साहसी; धीर; शूर; बलवान.

**सहस्र** (ಸಹಸ್ರ) (सं) वि.–हजार; दशशत; पुष्कळ.
—**पाद** (ಪಾದ) (सं) ना.–विष्णु; सूर्य.

**सहस्रकर (किरण)** (ಸಹಸ್ರಕರ [ಕಿರಣ]) (सं) ना.–सूर्य; सहस्ररश्मी.

**सहस्रदल (पत्र)** (ಸಹಸ್ರದಲ [ಪತ್ರ]) (सं) ना.–कमल; पुष्कळ पाकळ्या असलेलें.

**सहस्रनयन (लोचन)** (ಸಹಸ್ರನಯನ [ಲೋಚನ]) (सं) ना.–विष्णु; इंद्र; मोर.

**सहस्रफण** (ಸಹಸ್ರಫಣ) (सं) ना.–आदिशेष; अनेक फडा असलेला; शेष.

**सहस्रबाहु** (ಸಹಸ್ರಬಾಹು) (सं) ना.–बलशाली; हजार हात असलेला; कार्तवीर्य; अर्जुन; बाणासुर.

**सहस्रशिखर** (ಸಹಸ್ರಶಿಖರ) (सं) ना.–विंध्यपर्वत.

**सहस्रांशु** (ಸಹಸ್ರಾಂಶು) (सं) ना.–सूर्य; रवि.

**सहस्राक्ष (स्रेक्षण)** (ಸಹಸ್ರಾಕ್ಷ [ಸ್ರೇಕ್ಷಣ]) (सं) ना.–इंद्र; विष्णु; मोर.

**सहाध्यायि** (ಸಹಾಧ್ಯಾಯಿ) (सं) ना.–सहपाठी; जोडीदार.
—**नि** (ನಿ) (सं) ना.–जोडीनें शिकणारी; सहवर्गिणी; वर्गभगिनी.

**सहानुभूति** (ಸಹಾನುಭೂತಿ) (सं) ना.–दुसऱ्याच्या सुखदुःखाशी भागीदार होणें; सहसंवेदना.

**सहाय (य्य)** (ಸಹಾಯ [ಯ್ಯ]) (सं) ना.–मदत; पाठिंबा; आधार; अनुकूलता; जवळीक; मित्र.

**सहायक** (ಸಹಾಯಕ) (सं) ना.–आश्रयदाता; मदतगार; आधार देणारा; पाठीराखा.

**सहायिग** (ಸಹಾಯಿಗ) (क) ना.–पाठीराखा; पाठिंबा देणारा; सवंगडी; मित्र.

**सहि** (ಸಹಿ) (अ.दे)–हस्ताक्षर; मुद्रा; दाखल करणें.

**सहित** (ಸಹಿತ) (सं) अ.–बरोबर; लागलींच; एकूण; वङ्.
(सं) वि.–हितकर; कल्याणप्रद.

**सहिष्णु** (ಸಹಿಷ್ಣು) (सं) वि.–सहनशील; सहन करणारा.

**सहिसु** (ಸಹಿಸು) (क) धा.–सहन करणें; अनुभव घेणें; तग धरणें; टिकाव धरणें.

**सहृदय** (ಸಹೃದಯ) (सं) ना.–रसिक; सज्जन; चांगल्या मनाचा.

**सहोदर** (ಸಹೋದರ) (सं) ना.–भाऊ; एकोदर.

**सहोदरि** (ಸಹೋದರಿ) (सं) ना.–बहीण; सख्खी बहीण.

**सह्य** (ಸಹ್ಯ) (सं) वि.–सहन करण्याजोगें; सहनीय; सहन करण्यायोग्य.

**सह्याद्रि** (ಸಹ್ಯಾದ್ರಿ) (सं) ना.–पश्चिम घाट; सह्यपर्वत.

**सळि** (ಸಳಿ) (क) ना.–थंडी; हीव; थंडपणा; शलाका; लोखंडी कांब.

**सळेह** (ಸಳೇಹ) (सं) ना.–शत्रु; प्रतिस्पर्धी; विरोधक.

**सांयुगीन** (ಸಾಂಯುಗೀನ) (सं) ना.–युद्धासंबंधीचे; शूरसैनिक; रणवीर.

**साकल्य** (ಸಾಕಲ್ಯ) (सं) ना.–सकलता; परिपूर्णत्व; सर्व बाजू.

**साकार** (ಸಾಕಾರ) (सं) वि.–देहयुक्त; आकृतिसह; रूपवान्.

**साकु** (ಸಾಕು) (क) धा.–संरक्षिणें; पालन करणें; जोपासणें; संगोपणें.

**साकेत** (ಸಾಕೇತ) (सं) ना.–अयोध्या नगरी.

**साक्षर** (ಸಾಕ್ಷರ) (सं) वि.–अक्षरज्ञानी; अक्षरओळख असलेला.
(सं) ना.–शिकलेला; सुशिक्षित; पदवीधर.

**साक्षरते** (ಸಾಕ್ಷರತೆ) (सं) ना.–अक्षरवाचन; लिहितां वाचतां येणारा; शिक्षण; पठण.

**साक्षात्** (ಸಾಕ್ಷಾತ್) (सं) अ.–प्रत्यक्ष; डोळ्यासमोर; निश्चळ; स्वाभाविक; उठून दिसण्यासारखे.
**साक्षात्कारिसु** (ಸಾಕ್ಷಾತ್ಕಾರಿಸು) (क) धा.–डोळ्यासमोर आणणें; प्रत्यक्ष पाहणें; अनुभवणें; मन वळवणें; प्रतीति येणें.
**साक्षी (क्ष्य)** (ಸಾಕ್ಷಿ [ಕ್ಷ್ಯ]) (सं) ना.–डोळ्यानें पाहणारा; प्रत्यक्ष पाहणारा; प्रतीति घेणारा.
**सागर** (ಸಾಗರ) (सं) ना.–समुद्र; महोदधी.
**सागरांबरे (रा)** (ಸಾಗರಾಂಬರೆ [ರಾ]) (सं) ना.–पृथ्वी; समुद्रवसना.
**सागु** (ಸಾಗು) (क) धा.–पुढे जाणें; चालविणें; पाळणें.
(क) ना.–कृषि; शेती; तांदळाची पेज.
—**माडु** (ಮಾಡು) (क) धा.–चालू ठेवणें; पुढें चालविणें; मशागत करणें.
—**वळि** (ವಳಿ) (क) ना.–शेतकी; शेतीचा धंदा; क्रम; पुढे चालवणें.
—**वड (वाड)** (ವಡ [ವಾಡ]) (क) ना.–पाठवणीचा खर्च; भागवणूक.
**सांक्रमिक** (ಸಾಂಕ್ರಮಿಕ) (सं) ना.–एकाला एक लागलेलें; स्पर्शजन्यता; संसर्ग.
—**रोग** (ರೋಗ) (सं) ना.–सांसर्गिक रोग.
**सांख्य** (ಸಾಂಖ್ಯ) (सं) ना.–कपिल ऋषीचे दर्शनशास्त्र; सांख्य पंथ; सांख्यानुयायी.
**सांग** (ಸಾಂಗ) (सं) वि.–संपूर्ण; विभागासह; सावयव.
**सांगगोळिसु** (ಸಾಂಗಗೊಳಿಸು) (क) धा.–सर्व रीतीनें पूर्ण करणें; सर्वांगानें सावरणें; सर्व बाजूंनी सरते करणें.
**सांगत्य** (ಸಾಂಗತ್ಯ) (स) ना.–संगतीनें जाणें; जोडीनें जाणें; एक पद्यजाति.
**सांगोपांग** (ಸಾಂಗೋಪಾಂಗ) (सं) वि.–वेदवेदांगासहित; अंगोपांगासह; सर्वबाजूंनी युक्त.
**साचा** (ಸಾಚಾ) (अ. दे) वि.–खरें; सत्य; योग्य; सरळ; निष्कपट; पक्व.
**साचि** (ಸಾಚಿ) (सं) वि.–वाकलेला; वक्र; बाक आलेला.
(सं) ना.–तिरंदाज; सव्यसाची.
**साज** (ಸಾಜ) (क) वि.–सहज; स्वाभाविक; सरळ.
**साटि** (ಸಾಟಿ) (क) वि.–समान; योग्य; जुळण्यासारखें.
(क) ना.–साम्य; जोड; स्नेहसंबंध; संपर्क; बाजू; छाठी; भगवी वस्त्रें.
**साणिगे** (ಸಾಣಿಗೆ) (क) ना.–चाळण्याचे साधन; छानी; चाळण.
**साणे** (ಸಾಣೆ) (क) ना.–सहाण; शाण; सहाणेचा दगड.
—**कल्लु** (ಕಲ್ಲು) (क) ना.–धारेचा दगड.
—**हिडी** (ಹಿಡಿ) (क) धा.–घासणें; सहाण लावणें; धार लावणें; पाजळणें; पाणी देणें; संस्कार देणें.
**सात्यकि** (ಸಾತ್ಯಕಿ) (सं) ना.–कृष्णाचा अनुयायी; बांधव.
**सात्विक** (ಸಾತ್ವಿಕ) (सं) वि.–सत्वगुण प्रधान; सत्वगुणी; साधुस्वभावाचा; सामर्थ्यवान्; ऐनगाभ्याचा.
(सं) ना.–सत्वगुण; सभ्यगृहस्थ; सहृदय.
**सात्यति (ती)** (ಸಾತ್ಯತಿ [ತೀ]) (सं) वि.–काव्यरचनेची एक शैली; शिशुपालाची आई.
**सादर** (ಸಾದರ) (सं) वि.–आदरयुक्त; गौरव पूर्ण; सप्रेम.
**सादा** (ಸಾದಾ) (क) वि.–सरळ; साधा; सुलभ; निष्कंटक; साधु.
**सादि** (ಸಾದಿ) (सं) वि.–नाश करणारा; विध्वंसक.
(सं) ना.–माहूत; घोडेस्वार; राऊत रथिक; वाहनारोहि.
**सादिलवारु** (ಸಾದಿಲವಾರು) (अ. दे) ना.–किरकोळ खर्च; चिल्लर सामान.
**सादु** (ಸಾದು) (क) ना.–तिलक; टिळा; सुंगधित वस्तु.
**सादृश्य** (ಸಾದೃಶ್ಯ) (सं) ना.–साम्य; सारखेपणा; दृष्टांत; उदाहरण. 'साटि' पहा.
**साद्यंत** (ಸಾದ್ಯಂತ) (सं) वि.–पूर्ण; सुरवातीपासून अखेरपर्यंत; उपक्रमापासून उपसंहारापर्यंत.
**साधक** (ಸಾಧಕ) (सं) वि.–अभ्यासक; प्रयत्न करणारा; साधना करणारा; तपस्वी; प्रयत्नशील.
(सं) ना.–सहाय; परिणाम; अनुकूलता; योगी.
—**बाधक** (ಬಾಧಕ) (सं) ना.–अनुकूल प्रतिकूल परिणाम; सहाय्यकविरोधक.
**साधन (ने)** (ಸಾಧನ [ನೆ]) (सं) ना.–उपकरण; सामग्री; प्रयत्न उपाय; मार्ग; सैन्य; दल; सिद्धि; यश; पीडा; हट्ट.
**साधारण** (ಸಾಧಾರಣ) (सं) वि.–सामान्य; सर्वसम; मध्यप्रतीचा; एक संवत्सर; उभयानुकूल.
**साधित** (ಸಾಧಿತ) (सं) वि.–साध्य झालेले, प्राप्त; मिळवलेले. सिद्धि पावलेले; सप्रमाण; पूर्ण केलेलें.
**साधिसु** (ಸಾಧಿಸು) (क) धा.–प्रयत्न करणें; सिद्धि मिळवणें; जुळवणें; प्राप्त करणें; जिंकणें; संपवणें; वशकरणें.
**साधियस् (धिष्ट)** (ಸಾಧಿಯಸ್ [ಧಿಷ್ಟ]) (सं) वि.–अधिक; उत्तम; श्रेष्ठ.
**साधु** (ಸಾಧು) (सं) वि.–चांगलें; सुंदर; उदार; कुलीन; योग्य; पुरेसें; पूर्ण.
(सं) ना.–परहितबुद्धि; सज्जनता; शुद्धवाणी; पवित्रभाषा; व्यापारी; संत; संन्यासी; श्रमण, कबुली, सूचन, अनुमति.
(सं) अ.–ठीक ठीक! बरें!
**साधुवाद** (ಸಾಧುವಾದ) (सं) अ.–ठीक; ! छान ! चांगले !
(सं) ना–तर्कशुद्धवाद; सत्यकथन.

**साध्य** (ಸಾಧ್ಯ) (सं) वि. — योग्य; साधण्यासारखे; हातीं येण्याजोगें; जुळण्यासारखें; गुण येण्याजोगें; निर्वाह्य.

—**असाध्य** (ಅಸಾಧ್ಯ) (सं) वि. — शक्याशक्य; साधकबाधक; जुळण्यानजुळण्यासारखे.

**साध्वस** (ಸಾಧ್ವಸ) (सं) ना. — भय; घाबरेपणा; थरकाप.

**साध्वि, (ध्वी)** (ಸಾಧ್ವಿ [ಧ್ವೀ]) (सं) ना. — पतिव्रता; परहितकारिणी.

**सानि** (ಸಾನಿ) (अ.दे) ना. — स्वामिनी; मालकीण; वेश्या बाजार बसवी.

**सानु** (ಸಾನು) (सं) ना. — शिखर; पठार; डोंगरउतार; श्रृंग; अरण्य; कोंब; पालवी; मार्ग; वाट; शेवट; झंजावात; सोसाटा; विद्वान; पंडित; सूर्य.

—**प्रदेश-भूमि** (ಪ್ರದೇಶ-ಭೂಮಿ) (सं) ना. — पठार; सपाटभूमी; पाचोळा; प्रस्थ.

**सानुकूल** (ಸಾನುಕೂಲ) (सं) ना. — अनुकूलता; अनुग्रह; प्रीति; नम्रता.

**सानुभव** (ಸಾನುಭವ) (सं) वि. — अनुभवासह.

**सानुभूति** (ಸಾನುಭೂತಿ) (सं) ना. — सहानुभूति; सहृदयता; दुसऱ्याच्या सुखदुःखाशी समरस होणें.

**सानुमत् (मंत)** (ಸಾನುಮತ್ [ಮಂತ]) (सं) ना. — पर्वत; टेकडी.

**सानुराग** (ಸಾನುರಾಗ) (सं) वि. — प्रेमळ; सप्रेम; प्रेमपूर्ण; मनोहर; मोहक.

**सांतपन** (ಸಾಂತಪನ) (सं) ना. — उग्र तप; खडतर तपश्चर्या.

**सांत्व (त्वन)** (ಸಾಂತ್ವ [ತ್ವನ]) (सं) ना. — मनोरंजन; शांतता; समाधान, शांति.

**सांदु** (ಸಾಂದು) (क) ना. — तिलक; टिळा; परिमळ द्रव्य; सुवास.

**सांद्र** (ಸಾಂದ್ರ) (सं) वि. — निबिड; भरीव; दाट; किर्र; एकत्रित; मृदु; कोमल; गुळगुळीत; रास.

**सांनिध्य** (ಸಾಂನಿಧ್ಯ) (सं) अ. — समीप; जवळ; समोर; बाजूला.

**साप** (ಶಾಪ) (क) ना. — शाप; शिवीगाळ; अकल्याणचिंतन; अपशब्द; तळतळाट.

**सापत्न** (ಸಾಪತ್ನ) (सं) ना. — सवतीचा मुलगा, सावत्र पोर; वैरी; शत्रु.

**सापत्न्य** (ಸಾಪತ್ನ್ಯ) (सं) ना. — सवती मत्सर; भांडण; वैर; सवतीचा मुलगा.

**सापेक्ष** (ಸಾಪೇಕ್ಷ) (सं) वि. — एकाच्या अनुरोधी; एकावर अवलंबित; अस्वतंत्र; अन्यतुलन; अन्येच्छा; अपेक्षायुक्त.

**सापेक्षे** (ಸಾಪೇಕ್ಷೆ) (सं) ना. — अपेक्षासहितता; अन्याची इच्छा.

—**वाद** (ವಾದ) (सं) ना. — सापेक्षतावाद; आइन्स्टाइनचा तत्वसिद्धांत (Relativity).

**साप्तपदीन** (ಸಾಪ್ತಪದೀನ) (सं) वि. — सप्तपदीसंबंधीचे. (सं) ना. — सप्तपदी; स्नेह; सलगी.

**साप्ताहिक** (ಸಾಪ್ತಾಹಿಕ) (सं) ना. — आठवडा; आठवड्याचें वृत्तपत्र.

**साफल्य** (ಸಾಫಲ್ಯ) (सं) ना. — फलप्राप्ति; कृतार्थता; यश; इच्छापूर्ति.

**साबीतु** (ಸಾಬೀತು) (अ. दे) ना. — घट्टमुट्ट; सरळ; सिद्ध. (अ. दे.) अ. — होते तसें.

**साम** (ಸಾಮ) (सं) ना. — सामोपचार; चतुर्विध उपायांपैकीं एक; सामवेद; समेट; सहनशीलता; कोंब; शाखा.

**सामग्रि** (ಸಾಮಗ್ರಿ) (सं) ना. — उपकरण; उपयुक्त साहित्य; साधन.

**सामज** (ಸಾಮಜ) (सं) ना. — हत्ती; गज; सामवेदोद्भव; संगीत; गायन.

**सामति** (ಸಾಮತಿ) (क) ना. — दृष्टांत; उदाहरण; म्हण; प्रहेलिका; उपमान.

**सामंत** (ಸಾಮಂತ) (सं) ना. — आधीन राजा; जहागीरदार; मांडलिक; संस्थानिक.

**सामयिक** (ಸಾಮಯಿಕ) (सं) वि. — सामाशी संबंध असलेले; नियतकालिक; क्रमबद्ध; ठराविक काळचा.

**सामरस्य** (ಸಾಮರಸ್ಯ) (सं) ना. — समरसता; एकजीवत्व; तद्रूपता.

**सामर्थ्य** (ಸಾಮರ್ಥ್ಯ) (सं) ना. — शक्ति; योग्यता.

**सामाजिक** (ಸಾಮಾಜಿಕ) (सं) वि. — समाजासंबंधी; समाजात राहणारा.
(सं) ना. — सभिक; सदस्य; जनसामान्य.

**सामानु** (ಸಾಮಾನು) (अ. दे) ना. — वस्तु; पदार्थ; माळ; लक्ष; 'सरकु' पहा.

**सामान्य** (ಸಾಮಾನ್ಯ) (सं) वि. — साधारण; आधिक्य नसलेला; सर्वसंबंधी; सर्वानुलक्षी; अश्लील; क्षुद्र; पूरा.
(सं) ना. — संघ; समाज; सार्वबांधव्य; सार्वजनिक कार्य; सामुदायिक विधान; एक अलंकार.

—**ज्ञान** (ಜ್ಞಾನ) (सं) ना. — जागतिक परिस्थितीचें ज्ञान.

—**वनिता** (ವನಿತಾ) (सं) ना. — वेश्या.

—**शास्त्र** (ಶಾಸ್ತ್ರ) (सं) ना. — सामान्य नियम.

**सामीप्य** (ಸಾಮೀಪ್ಯ)(सं)अ. — जवळ; लागून; शेजारील; बाजूचें.
(सं) ना. — मुक्तिविशेष; मोक्ष.

**सामुद्रिक** (ಸಾಮುದ್ರಿಕ) (सं) वि. — समुद्रासंबंधीचें; समुद्रांत जन्मलेलें.

(सं) ना.—तळहातावरील रेषा, मुखलक्षण वगैरेवरून भूतभविष्यकथन; हात पाहून भविष्य सांगणारा.

**सामोद्भव** (ಸಾಮೋದ್ಭವ) (सं) ना.—हत्ती; गज.

**सामोपचार** (ಸಾಮೋಪಚಾರ) (सं) ना.—मृदु उपाय; गोड बोलून मन वळवण्याची रीति; सांत्वन.

**सामोपाय** (ಸಾಮೋಪಾಯ) (सं) 'साम' पहा.

**सांप्रत** (ಸಾಂಪ್ರತ) (सं) वि.—आताचें; वर्तमान; उचित; सुस्पष्ट; सुसंबद्ध.

(सं) अ. लगेच; योग्यतेप्रमाणें; उचितपणें; कालानुसार.

**सांप्रदाय** (ಸಾಂಪ್ರದಾಯ) (सं) ना.—रूढि; परंपरा; पद्धति; वर्तन; नियम.

—**इक** (ಇಕ) (सं.) वि. रूढीनें आलेले; परंपराप्राप्त; वापरांतील; व्यवहारांतलें.

**सांब** (ಸಾಂಬ) (सं) ना.—शिव, एक यादव.

**सांब्राणि** (ಸಾಂಬ್ರಾಣಿ) (अ. दे.) ना.—एक सुगंधी द्रव्य; रताळें.

**साम्राज्य** (ಸಾಮ್ರಾಜ್ಯ) (सं) ना. चक्रवर्ति राष्ट्र; मोठें राज्य.

**साम्य** (ಸಾಮ್ಯ) (सं) ना.—सादृश्य; समानता; जोडणी; जुळणी; उपमा; सारखेपणा; जोड; स्नेह; संपर्क.

**साय** (ಸಾಯ) (सं) ना.—अंत; समारोह; सायंकाल; सामीप्य; बाण.

**साय्**, (**सायु**) (ಸಾಯ್ [ಸಾಯು]) (क) धा.—मरणें; जीव जाणें; नाश होणें; निःशक्त होणें.

**सायक** (ಸಾಯಕ) (सं) ना.—बाण; खड्ग; तलवार.

**सायण** (ಸಾಯಣ) (सं) ना.—विद्यारण्यांचे बंधु, बुक्कराय मंत्री; वेदभाष्यलेखक.

**सायन** (ಸಾಯನ) (सं) ना.—सूर्यसिद्धांतानुसार ज्योतिष पद्धति

**सायं** (ಸಾಯಂ) (सं) ना.—सूर्यास्त; संध्याकाळ.

**सायंकाल** (ಸಾಯಂಕಾಲ) (सं) ना.—संध्यासमय; संध्या; 'बैगु' पहा.

**सायंतन** (ಸಾಯಂತನ) (सं) वि.—सायंकालीन; संध्यासमयाचें; सायंकाळचें.

**सायस** (ಸಾಯಸ) (सं) ना—उपद्रव; अडचण; पीडा; संकट.

**सायान्ह** (ಸಾಯಾಹ್ನ) (सं) ना.— संध्याकाळ; संध्या.

**सायुज्य** (ಸಾಯುಜ್ಯ) (सं) ना.—एक मुक्ति; मोक्ष; परमात्म्याचे ठिकाणीं विलीन होणें; जीवशिवैक्य.

**सार** (**रु**) (ಸಾರ [ರು]) जवळ येणें; संनिध येणें; बाजूला सरणें; दूर होणें.

(सं) ना. जवळीक; सामीप्य; सांनिध्य.

**सार** (**रु**) (ಸಾರ [ರು]) (सं) वि.—श्रेष्ठ; अत्युत्तम; कल्याणकारक; रसभरित.

(क) ना.—माळा; माडी; पूल; शंख.

(सं) ना.—रहस्य, गाभा; तात्पर्य; मुख्यार्थ; बल; सामर्थ्य; मर्म, मतितार्थ; सत्य; अमृत; दूध; पाणी; निर्णय; सिद्धांत; संक्षिप्त विवरण; क्षार; द्रव्य; वस्तु.

**सारक** (ಸಾರಕ) (सं) वि.—ढकलणारा; पुढें लोटणारा; भेदक; रेचक.

—**मलसारक** (ಮಲಸಾರಕ) (सं) वि.—मलोत्सर्जक; झाडा होणारें; ढाळ होणारें; भेदक; रेचक.

**सारंग** (ಸಾರಂಗ) (सं) वि.—ठिपक्याचा; मिश्ररंगी; बेरंगी.

**सारंग** (ಸಾರಂಗ) (सं) ना.—ठिपके असलेलें हरीण; पट्टे असलेले मृग; हत्ती; सिंह; काळा भ्रमर; कोकीळ; करकोचा; चंदन; सारंगी; काम; मोर; फ्रेमिंग पक्षी; छत्री; मेघ; वस्त्र; केस; शंख; शिव; कमल; बाण; आभरण; सोनें; माती; पृथ्वी; रात्र; काळोख; प्रकाश.

—**धर** (ಧರ) (सं) ना.—चंद्र; शिव; सारंगधनुष्य वापरणारा; विष्णु.

**सारंगि** (**गी**) (ಸಾರಂಗಿ [ಗೀ]) (सं) ना.—एक तंतुवाद्य; भोपळ्याचें तंतुवाद्य; हरिणी.

**सारंगिक** (ಸಾರಂಗಿಕ) (सं) ना.—शिकारी; पक्ष्याची शिकार.

**सारण्** (ಸಾರಣ್) (क) अ.—जवळ; समीप; बाजूचा; शेजारचा.

**सारण** (ಸಾರಣ) (सं) ना.—पुढें ढकलणें; विस्तार; ढाळ; झाडा.

**सारणि** (**णी**) (ಸಾರಣಿ [ಣೀ]) (सं) ना.—प्रवाह; पाट; कालवा; चर; नियमितता; रीति; तीव्रता; वेग; झरा; खाण; खाणी.

**सारणे** (ಸಾರಣೆ) (क) ना.—लेप; माखण; चालढकल; झाडणी; केरसुणी.

**सारथि** (ಸಾರಥಿ) (सं) ना.—सूत; रथ चालवणारा; गाडीवान; म्होरक्या; गाडीहाक्या.

**सारथ्य** (ಸಾರಥ್ಯ) (क) ना.—रथ हाकणें; रथसंचालन; पाठिंबा; म्होरकेपणा.

**सारमेय** (ಸಾರಮೇಯ) (सं) ना.—कश्यपपत्नि; सरमादेवीचा पुत्र; कुत्रा.

**सारस** (ಸಾರಸ) (सं) ना.—कमल; सरोवरासंबंधी; बक; पाणकोंबडा.

**सारस्वत** (ಸಾರಸ್ವತ) (सं) वि.—सरस्वतिदेवीसंबंधीं; विद्याविषयक.

(सं) ना.—सरस्वत्युपासक; बोलघेवडा; विद्वान; पंडित; पंचगौडापैकीं एक.

**सारांश** (ಸಾರಾಂಶ) (सं) ना.—तात्पर्य; मुख्य भाग; रहस्य; मथितार्थ.

**साराय** (ಸಾರಾಯ) (सं) ना.—मुख्यार्थ; तात्पर्य; आशय; एक प्रकारचें मद्य.

**सारासार** (ಸಾರಾಸಾರ) (सं) वि.—सत्वासत्व; सत्यासत्य.

**—विचार** (ವಿಚಾರ) (सं) ना.—युक्तायुक्त विवेक; सत्यासत्यविचार.

**सारि** (ಸಾರಿ) (सं) ना.—सोंगटी; पगडें; नरद.
(क) अ.—जवळ जाऊन; पाळीनें; बारीनें; सरतीप्रमाणें.

**सारिका (के)** (ಸಾರಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.—साळुंकी; मैना; ‘पुरुळि’ पहा.

**सारिगे** (ಸಾರಿಗೆ) (क) ना.—जमीनीची लागवड; एकाग्रता.

**सारिसु** (ಸಾರಿಸು) (क) धा.—प्रसिद्ध करणें; डांगोरा पिटणें; घोषणा करणें; समजून सांगणें; लेप देणें; लावणें; झाडणें; केर काढणें; गुळगुळीत करणें.

**सारु** (ಸಾರು) (क) धा.—प्रगट करणें; हूल उठवणें; ओरडून सांगणें; जाणें; दूर होणें; जवळ येणें.
(क) ना.—आमटी; सांबारें; सार.

**सारूप्य** (ಸಾರೂಪ್ಯ) (सं) ना—एक मुक्ति; सरूपता; इष्ट देवतेमध्यें लीन होणें; एकरूपता; जुळणी.

**सारे** (ಸಾರೆ) (क) अ.—जवळ; बाजूस; शेजारी; जवळ येऊन.
(क) ना.—भरती; पाळी; खेप; बारी; क्रम.

**सारोद्धार** (ಸಾರೋದ್ಧಾರ) (सं) अ.—थोडेंहि न सोडतां; मुख्य गोष्ट बाजूला न ठेवतां; पुरेसें; ध्यानांत येईलसें.
(सं) ना.—सार; निष्कर्ष.

**सार्के** (ಸಾರ್ಕೆ) (क) ना.—सामीप्य; सुदूरता.
(क) वि.—जवळ; लगत; सोबत.

**सार्गळ** (ಸಾರ್ಗಳ) (सं) वि.—आडकाठीचा; बंधनयुक्त; गुंतलेला; बंधनांत सापडलेला.

**सार्चु** (ಸಾರ್ಚು) (क) धा.—दूर पाठविणें; सोडून जाणें; जवळ करणें; प्रगट करणें.

**सार्थ** (ಸಾರ್ಥ) (सं) वि.—अर्थासह; अर्थविवरणसहित; सकारण; अनुकूल; संपत्तिमान.
(सं) ना.—व्यापारी संघ; वणिक् संघ.

**सार्थक** (ಸಾರ್ಥಕ) (सं) वि.—प्रयोजनपूर्ण; सफल; हितकर; कल्याणप्रद.
(सं) ना.—साफल्य; उत्तरक्रिया; श्राद्ध; समूह.

**सार्थक्य** (ಸಾರ್ಥಕ್ಯ) (सं) ना.—फलदायकत्व; परिणामकारिता; यश; कृतकृत्यता.

**सार्थवाह** (ಸಾರ್ಥವಾಹ) (सं) ना.—अर्थविनिमय करणारा; वर्तक; व्यापारी; व्यापाऱ्यांचा पुढारी.

**सार्द्र** (ಸಾರ್ದ್ರ) (सं) वि.—आर्द्रतेसह; ओला; कच्चा; दयाशील; हिरवा; कोवळ्या मनाचा.

**सार्व** (ಸಾರ್ವ) (सं) वि.—सर्व; सकल; अखिल; सर्वांसंबंधीं.

**सार्वजनिक** (ಸಾರ್ವಜನಿಕ) (सं) वि.—अखिल लोकांसंबंधीं; सामाजिक; सार्वजनसंबंधीं.

**सार्वत्रिक** (ಸಾರ್ವತ್ರಿಕ) (सं) वि.—कोठेहि असणारा; सर्वव्यापी; चोहीकडे असणारा; सर्वसामान्य; सर्वसंबंधी.

**सार्वभौम** (ಸಾರ್ವಭೌಮ) (सं) ना.—सर्वभूमीचा मालक; सम्राट; चक्रवर्ती; महाराज; राजाधिराज; एक दिग्गज.
(सं) वि.—जागतिक; अखिल भूमिविषयक.

**साल्** (ಸಾಲ್) (क) धा.—पुरे होणें; समर्थ होणें; उपयोगी येणें; कर्ज काढणें.
(क) ना.—ओळ; श्रेणि; पंक्ति; कर्ज.
**—तेगे,** (ತೆಗೆ) (क) धा.—कर्ज काढणें; कर्जबाजारी होणें.

**साल** (ಸಾಲ) (सं) ना.—शालवृक्ष; सावरी; एक जातीचें झाड; तट; कुंपण; वई; कूड; भिंत; एक मासा.
(क) ना.—श्यालक; मेहुणा; पत्नीचा भाऊ; ऋण; उसनवट; दाक्षिण्य; उपकार; आधार; कर्ज; ‘हंमु’ पहा.
**—इग** (ಇಗ) (क) ना.—ऋणको; कर्जदार; कर्ज देणारा; धनको; कोष्टी.
**—वणिग** (ವಣಿಗ) (क) ना.—कर्जबाम करणारा; ऋणको; ऋणाइत.

**सालिग्राम** (ಸಾಲಿಗ್ರಾಮ) (सं) ना.—विष्णुरेखा असलेला शालिग्राम; गंडकीतील काळा गुळगुळीत गोटा.

**सालदे** (ಸಾಲದೆ) (क) अ.—कर्जबाम न करतां; उसनवट न करतां.
(क) क्रि.—पुरें झालें ना ?

**सालभंजिके** (ಸಾಲಭಂಜಿಕೆ) (स) ना.—पुतळी; बाहुली; कठपुतळी; ‘शालभंजिका’ पहा.

**सालंकार** (ಸಾಲಂಕಾರ) (सं) वि.—अलंकारसहित;
(सं) ना.—वधूला सालंकृत देण्याचा विधी.

**सालंकृतकन्यादान** (ಸಾಲಂಕೃತಕನ್ಯಾದಾನ) (सं) ना.—वस्त्रभरणासहित वधू वराला देण्याची विवाहपद्धति.

**सालिग** (ಸಾಲಿಗ) (क) ना.—कर्ज देणारा सावकार; कोष्टी; देवांग; विणकर;

**सालु** (ಸಾಲು) (क) धा.—पुरें होणें; समर्थ होणें; उपयोगी येणें.
(क) ना.—ओळ; पंक्ति; श्रेणि

**साले** (ಸಾಲೆ) (क) ना.—शाळा; पाठशाळा; विद्यालय; शिक्षणसंस्था; कार्यकर्त्यांचा संघ; भात; साळी.

**सालेग** (ಸಾಲೆಗ) (क) ना.—कोष्टी; साळी; देवांग; विणकर; ‘सालिग’ पहा.

**सालोक्य** (ಸಾಲೋಕ್ಯ) (सं) ना.—एक मुक्ति; सलोकता; एकाच लोकात राहणारा.

**साल्गुं** (ಸಾಲ್ಗುಂ) (क) अ.—पुरेसें; पुरें; भरपूर.

**साल्व** (ಸಾಲ್ವ) (क) वि.—पुरेसें.
(क) ना.—शाल्व राक्षस.

**साल्विनेगं** (ಸಾಲ್ವಿನೆಗಂ) (क) वि.–पुरे होण्याइतकें; पुरेसें.

(क) अ.–भरपूर; पुरे होईतों.

**साव (हु) (वु) कार** (ಸಾವ[ವು]ಹು]ಕಾರ) (अ.दे.) ना.–श्रीमंत; धनवान्; संपत्तिमान; व्याजबट्टा करणारा.

**सावकाश** (ಸಾವಕಾಶ) (सं) वि.–अवकाशसहित; जाग असलेला.

(सं) अ.–हळुहळु; बेतानें.

**सावगिसु** (ಸಾವಗಿಸು) (क) धा.–सावरणें; नीट करणें; व्यवस्थित करणें; सुधारणें; रेघेवर आणणें; गप्प बसणें.

**सावधान** (ಸಾವಧಾನ) (सं) ना.–तृप्ति; जागृति; जागरण; निस्तब्धता; अवधान; ध्यान; माया; जागा.

**सावन** (ಸಾವನ) (सं) वि.–यज्ञासंबंधी; यज्ञाचा शेवटचा भाग.

(अ.दे.) ना.–श्रावण महिना.

**सावंत** (ಸಾವಂತ) (क) ना.–सामंत; जहागीरदार; मांडलिक; खंडणी देणारा राजा; आश्रित राजा.

**सावयव** (ಸಾವಯವ) (सं) वि.–सांगोपांग; अवयवधारी; प्राणी.

**सावरिसु** (ಸಾವರಿಸು) (क) धा.–सावरणें; नीट करणें; टोक करणें; चेतवणें; समाधान करणें.

**सावासि** (ಸಾವಾಸಿ) (क) ना.–सहवासी; अनुचर; जोडीदार; ब्राह्मण; ब्राह्मणातील पोटजात. स्नेही; मित्र.

**सावित्र** (ಸಾವಿತ್ರ)(सं) वि.–सूर्याविषयीं; सवित्यासंबंधीं; सूर्याचा.

**सावित्र संतति** (ಸಾವಿತ್ರಸಂತತಿ) (सं) वि.–सूर्यवंश; रघुवंश.

**सावित्रि** (ಸಾವಿತ್ರಿ) (सं) ना.–सूर्य स्तोत्र; सूर्यस्तुति; अश्वपतीची मुलगी; सत्यवान पत्नि.

**साविरारु** (ಸಾವಿರಾರು) (क) वि.–हजारों; असंख्य; पुष्कळ; विपुल.

**सावु** (ಸಾವು) (क) ना.–मरण; निधन; नाश; अंत.

**सावुनोवु** (ಸಾವುನೋವು) (क) ना.–मरणाला कारण होणारें दुखणें; महदाघात; कष्ट; कार्पण्य.

**साष्टांग** (ಸಾಷ್ಟಾಂಗ) (सं) वि.–आठ अंगांसह.

(सं) ना.–नमस्कार; योग; रति; पूजा.

**—नमस्कार** (ನಮಸ್ಕಾರ) (सं) ना.–दीर्घदंड नमस्कार; लोटांगण; दंडवत; (गुडघा; हात; पाय; हृदय; मति; डोके; मंत्र; दृष्टि ही आठ अंगें.)

**सास** (ಸಾಸ) (क) ना.–साहस; दीर्घप्रयत्न; श्वासोच्छ्वास; वायु; पराक्रम.

**सासिग** (ಸಾಸಿಗ) (क) वि.–साहसी; परक्रमी; दीर्घ; कष्टाळु; संकटानें भरलेला; विचारशून्य.

**सासिर् (र)** (ಸಾಸಿರ್ [ರ]) (क) वि.–सहस्र; हजार.

**सासिरगण्ण** (ಸಾಸಿರಗಣ್ಣ) (क) ना.–सहस्राक्ष; इंद्र.

**सासिवे (वि)** (ಸಾಸಿವೆ [ವಿ]) / **सासुवे (वि)** (ಸಾಸುವೆ[ವಿ]) (क) ना.–मोहरी; राई; फोडणीचे दाणे. 'सर्षप' पहा.

**सास्ना (स्ने)** (ಸಾಸ್ನಾ [ಸ್ನೆ]) (सं) ना.–गाय, बैल वगैरेची गळ्याखालील पोळी. 'गंगेडोगलु' पहा.

**साहचर्य** (ಸಾಹಚರ್ಯ) (सं) ना.–सहचलन; सहवास; सहजीवन; संपर्क; संसर्ग; जोडीदार.

**साहजिक** (ಸಾಹಜಿಕ) (स) वि.–सहज; सुलभ; सरळ.

**साहणि (णिग)** (ಸಾಹಣಿ [ಣಿಗ]) (क) ना.–घोड्यांना शिकवणारा; घोड्यांचा बुजरेपणा घालवणारा.

**साहस** (ಸಾಹಸ) (सं) ना.–दीर्घप्रयत्न; पराक्रम; धैर्य; विचारहीन प्रयत्न; धीटपणा.

**साहस (सिक)** (ಸಾಹಸಿ[ಸಿಕ]) (सं) वि.–दीर्घप्रयत्नशील; पुढें होऊन करणारा; जबाबदार.

**साहस्र** (ಸಾಹಸ್ರ) (सं) वि.–सहस्रावधि; हजारो; हजाराविषयीं.

**साहाय्य** (ಸಾಹಾಯ್ಯ) (सं) ना.–साह्य; मदत; आपलेपणा.

**साहित्य** (ಸಾಹಿತ್ಯ) (सं) ना.–शब्दार्थ युक्तता; वाङ्मय; भाषा भांडार; मनोरंजक काव्यनाटकादि रचना; साधनसामग्री; उपकरण.

**साह्य** (ಸಾಹ್ಯ) (सं) ना.–मदत; संग; सोबत.

**साळ** (ಸಾಳ) (क) ना.–एक चर्मवाद्य.

**साळुव (ळ्व)** (ಸಾಳುವ [ಳ್ವ]) (क) ना.–साळपक्षी; ससाणा; विजयनगरचें राजघराणें.

**सिंह** (ಸಿಂಹ) (सं) वि.–श्रेष्ठ.

(सं) ना.–वनराज; एक शूर पशु; सिंहरास.

**—पीठ–पिष्टर** (ಪೀಠ) (ಪಿಷ್ಟರ) (सं) ना.–सिंहासन.

**सिंहावलोकन** (ಸಿಂಹಾವಲೋಕನ) (सं) ना.–सिंहाची दृष्टी; मागे वळून पाहण्याची प्रवृत्ति; गत जीवनाचा आढावा.

**सिंहासन** (ಸಿಂಹಾಸನ) (सं) ना.–गादी; पीठ; राजपीठ; सभापीठ; राजासन.

**सिंहि (ही)** (ಸಿಂಹಿ [ಹೀ]) (सं) ना.–सिंहीण; मादीसिंह.

**सिंहिका (के)** (ಸಿಂಹಿಕಾ [ಕೆ]) (सं) ना.–राहूची आई.

**सिकत** (ಸಿಕತ) (सं) ना.–वाळु; वालुका; पुलिन; रेव.

**सिके** (ಸಿಕೆ) (क) ना.–शिखा; ज्वाला; जाळ; मोरतुरा; शेंडी; केस.

**सिक्कटि** (ಸಿಕ್ಕಟಿ) (क) ना.–कंगवा; फणी.

**सिक्कु** (ಸಿಕ್ಕು) (क) धा.–सापडणें; प्राप्त होणें; हाती येणें; लाभणें.

(क) ना.–गाठ; गुंता; जंजाळ; गळफास; घाण.

**सिक्त** (ಸಿಕ್ತ) (सं) वि.–ओले; हिरवे; कच्चे; चुरडलेले; कुस्करलेले; चिमटलेले.

**सिक्थ (क्थक)** (ಸಿಕ್ಥ [ಕ್ಥಕ]) (सं) ना.–मेण; मधमाशीच्या पोळ्याचें मेण; शिजवलेलें धान्य.

**सिगडि** (ಸಿಗಡಿ) (क) ना.–पाण्यांतील किडे.

**सिगि** (ಸಿಗಿ) (क) धा.–फाडणें; दुभंगणें; तुकडे करणें; चिरणें.

**सिगित** (ಸಿಗಿತ) (क) ना.–चीरफाड; मोडतोड; उड्डाण.

**सिगु** (ಸಿಗು) (क) धा.–प्राप्त होणें; लाभणें; हाती येणें. हात पोचणें.

**सिगुर् (रु)** (ಸಿಗುರ್ [ರು]) (क) धा.–जखम करणें; ओरबडणें; ओरखडणें.

(क) ना.–चोय; चोयटी; चूर; दोष; उणीव.

**सिगुळु** (ಸಿಗುಳು) (क) ना.–तुकडा; फाक; संकोच; दाक्षिण्य; लाज; भीड.

**—आळु** (ಆಳು) (क) वि.–दाक्षिण्यशील; लाजाळु; भीड करणारा.

**सिग्गाळि** (ಸಿಗ್ಗಾಳಿ) (क) ना.–संकोच करणारा; लज्जाशील. मुखदुर्बळ; अबोल; घुम्या.

**सिग्गिग** (ಸಿಗ್ಗಿಗ) (क) ना.–राक्षस; दानव; लाजरा.

**सिग्गिलि** (ಸಿಗ್ಗಿಲಿ) (क) वि.–निलाजरा; लज्जाहीन.

**सिग्गु** (ಸಿಗ್ಗು) (क) ना.–दाक्षिण्य; जुगुप्सा; लज्जा; लाज.

**—आलि** (ಆಳಿ) (क) वि.–संकोचशील; लाजरा; लज्जालु.

**सिंग** (ಸಿಂಗ) (क) ना.–श्रृंग; शिंग; मोड; कोंब; मोळका; शिखर; सिंह; शार्दूल; मृगेंद्र.

**सिंग (गा) डि** (ಸಿಂಗ [ಗಾ] ಡಿ) (क) ना.–पोहण्याचा भोपळा; तरंगण्याचें साधन.

**सिंगदेरळ्** (ಸಿಂಗದೇರಳ್) (क) ना.–सिंहवाहिनी; महालक्ष्मी. दुर्गा; पार्वती. चामुंडादेवी.

**सिंग(गा)र** (ಸಿಂಗ [ಗಾ] ರ) (क) ना.–श्रृंगार; शोभा; आरास; अलंकार; सौंदर्य; भूषण; एक काव्यरस.

**सिंगली (ळी) क** (ಸಿಂಗಲೀ [ಳೀ] ಕ) (क) ना.–काळ्या तोंडाचें माकड; हुप्या.

**सिंगवणे** (ಸಿಂಗವಣೆ) (क) ना.–सिंहासन.

**सिंगाडि** (ಸಿಂಗಾಡಿ) (क) ना.–धनुष्यबाण; इंद्रधनुष्य.

**सिं (हिं) गार** (ಸಿಂ [ಹಿಂ] ಗಾರ) (क) ना.–सुपारीचें फूल; अलंकार; आभरण.

**सिंगि** (ಸಿಂಗಿ) (क) ना.–श्रृंगी; शेळी; मेंढी; एक मुनि; एक शिवगण; सिंहीण.

**सिंघाण** (ಸಿಂಘಾಣ) (सं) ना.–लोखंडाचा गंज; 'तुक्कु' पहा.

**सिंचन** (ಸಿಂಚನ) (सं) ना.–शिंपण; प्रोक्षण; शिंतोडणी.

**सिंजारव** (ಸಿಂಜಾರವ) (सं) ना.–किण किणध्वनि; पैंजणाचा झणत्कार; धनुष्टंकार; गुंजारव.

**सिंजित** (ಸಿಂಜಿತ) (सं) ना.–टणत्कार; किंकिणीचा आवाज.

**सिंजिनि (नी)** (ಸಿಂಜಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–मौर्वी; ज्या; धनुष्याची दोरी.

**—नाद** (ನಾದ) (सं) ना.–धनुष्टंकार.

**सिट्टु** (ಸಿಟ್ಟು) (क) ना.–कोप; चीड; राग; क्रोध; मनःकलुषता.

**सिडि** (ಸಿಡಿ) (क) ना.–उडणें; दूर जाणें; चोपणें; दटावणें; बोट दाखवून दरडावणें.

(क) ना.–पूड; लोखंडी कडीकोंडी; अडणा; हत्तीचा मदस्राव.

**—को (गो) ळवे** (ಕೊ [ಗೊ] ಳವೆ) (क) ना.–काडतुस.

**—मिडि** (ಮಿಡಿ) (क) ना.–तळमळ; कळवळा.

**मिडिगोळ्** (ಮಿಡಿಗೊಳ್) (क) धा.–तळमळणें; चडफडणें.

**सिडित** (ಸಿಡಿತ) (क) ना.–जखम; चीरफाड; क्रोध; उड्डाण.

**सिडिगुंडु (मद्दु)** (ಸಿಡಿಗುಂಡು [ಮದ್ದು]) (क) ना.–स्फोटक दारूगोळा; तोफ; सुरुंग; दारूचा नळा; सुरनळा.

**सिडिलु** (ಸಿಡಿಲು) (क) ना.–गडगडाट; मेघगर्जना; वीज; वज्रायुध.

**सिडिवले** (ಸಿಡಿವಲೆ) (क) ना.–एक जाळें; फेकण्याचें जाळें.

**सिडिसु** (ಸಿಡಿಸು) (क) ना.–शिंपडणें; शिंपणें; प्रोक्षण करणें; स्फोट करणें; झारीनें पाणी घालणें; सिंचिणें; थेंब पाडणें.

**सिडिसोने** (ಸಿಡಿಸೋನೆ) (क) ना.–पावसाची झिमझिम; पाऊस

**सिडिंबु** (ಸಿಡಿಂಬು) (क) धा.–गडबड करणें; आतुरता; दाखविणें; चिडणें; रागावणें.

(क) ना.–पाऊस; तिरंदाजाच्या मनगटावरील चामड्याचा पट्टा.

**सिडुक** (ಸಿಡುಕ) (क) वि.–दोषी; शीघ्रकोपी; रागीट; चिडका.

**सिडुकु** (ಸಿಡುಕು) (क) ना.–क्रोध; चीड; निंदा; शिवीगाळ; उद्वेग; चहाडी; कलंक; दुर्लौकिक; कोप.

**सिडुंबु (बे)** (ಸಿಡುಂಬು [ಬೆ]) (क) ना.–ढोली; पाऊस; काटेरी झाड; काटे; देवीरोग.

**सिंडरिसु** (ಸಿಂಡರಿಸು) (क) धा.–कंटाळणें; आळोखेपेळोखे देणें; तिरस्कार दाखवणें.

**सिंडु** (ಸಿಂಡು) (क) ना.–दुर्गंधी; घाण; कुवास.

**सित** (ಸಿತ) (सं) ना.–चांदी; शुक्र; पांढरेगंध.

**सितग** (ಸಿತಗ) (क) वि.–जार; व्यभिचारी; नीच; उद्धत.

**सितगे** (ಸಿತಗೆ) (क) ना.–जारिणी; व्यभिचारिणी.

**सितपक्ष** (ಸಿತಪಕ್ಷ) (सं) ना.–शुद्धपक्ष; शुक्लपक्ष; चांदण्याचा पंधरवडा; हंसपक्षी.

**सितरोचि** (ಸಿತರೋಚಿ) (सं) ना.–चंद्र; शिव; परमेश्वर.

**सितवाहन** } (ಸಿತವಾಹನ) (सं) ना.—श्वेताश्व; पार्थ; अर्जुन.
**सितहय** } (ಸಿತಹಯ)

**सितांशु** (ಸಿತಾಂಶು) (सं) ना.—चंद्र; कापूर.

**सिताळ** (ಸಿತಾಳ) (क) ना.—नैवेद्य; पान (नैवेद्याचें पान).

**सितेतर** (ಸಿತೇತರ) (सं) वि.—काळें.

**सितोपल** (ಸಿತೋಪಲ) (सं) ना.—खडीसाखर; काल्पी साखर.

**सिदुगु** (ಸಿದುಗು) (क) धा.—चाचपणें; चाचपडणें; हुडकणें; शोधणें; नखानें ओरखडणें.

**सिदाय** (ಸಿದಾಯ) (क) ना.—खंडणी; फाळणी; फाळा; सारा.

**सिद्ध** (ಸಿದ್ಧ) (सं) वि.—प्राप्त; अस्तित्वाला रपष्ट; निर्णित; पूर्णत्वाला पोचलेले; निश्चित; जयशाली; यशस्वी. (सं) ना. सिद्धपुरुष; योगी; देवजाति.

**सिद्धपुरुष** (ಸಿದ್ಧಪುರುಷ) (सं) ना.—असामान्य शक्ति असलेला; योगी; मोक्षमार्गी. महात्मा.

**सिद्धरस** (ಸಿದ್ಧರಸ) (सं) ना.—किमया; सुवर्ण बनवण्यासाठी योजिलेला पारा; अमृत.

**सिद्धांत** (ಸಿದ್ಧಾಂತ) (सं) वि.—विवेकपूर्वक घेतलेला निर्णय; सत्यतत्त्व; प्रमेय.

**सिद्धांति** (ಸಿದ್ಧಾಂತಿ) (सं) ना.—भूतभविष्य सांगणारा; ज्योतिषी; विज्ञानी; देवऋषि.

**सिद्धाय** (ಸಿದ್ಧಾಯ) (सं) ना.—फाळा; खंडणी; सारा.

**सिद्धार्थ** (ಸಿದ್ಧಾರ್ಥ) (सं) ना.—इष्टार्थ लाभलेला; सुदैवी; बुद्धदेव; अर्हत; श्रीमंत.

**सिद्धि** (ಸಿದ್ಧಿ) (सं) ना.—फलप्राप्ति; जय; हस्तंगतता; संपूर्णता; अतिमानव शक्ति; निर्णय; निश्चितार्थ; प्राप्ति; योगसाधना; अष्टसिद्धि.

**सिद्धिविनायक** (ಸಿದ್ಧಿವಿನಾಯಕ) (सं) ना.—गणपति; सिद्धिपति.

**सिद्धिसु** (ಸಿದ್ಧಿಸು) (क) धा.—फल येणें; पुरेसें होणें; हातीं येणें; अस्तित्वांत येणें; पूर्ण होणें; संपणें; तडीला नेणें; शेवट गाठणें.

**सिध्म** (ಸಿಧ್ಮ) (सं) ना.—शिबें; चर्मरोग; कुष्ठरोग.

**सिंधुर (धूर)** (ಸಿಂಧುರ [ಧೂರ]) (सं) ना. शेंदूर; तांबड्या रंगाची पूड; कुंकुम; पुष्पपराग; एकवृक्ष; हत्ती; गज. एक राक्षस.

**सिंध** (ಸಿಂಧ) (सं) ना.—पताका; निशाण; बावटा.

**सिंधु** (ಸಿಂಧು) (सं) ना.—समुद्र; पंजाबांतील एक नदी; एक देश.

**सिंधुपुत्र** (ಸಿಂಧುಪುತ್ರ) (सं) ना. भीष्माचार्य.

**सिंधुराज** (ಸಿಂಧುರಾಜ) (सं) ना.—सिंधुदेशाचा राजा; जयद्रथ.

**सिपायि** (ಸಿಪಾಯಿ) (अ-दे) ना.—शिपाई; चाकर; नोकर; जवान.

**सिप्पु** (ಸಿಪ್ಪು) (क) ना.—शिंप; शिल्प; चीप; दगडाचा तुकडा; शुक्ति.

**सिप्पे** (ಸಿಪ್ಪೆ) (क) ना.—साल; फळाची साल; निःसत्त्व भाग.

**सिबरू** (ಸಿಬರು) (क) ना.—देहावरील डाग; शिबें.

**सिबं (ब्बं) दि** (ಸಿಬಂ [ಬ್ಬಂ] ದಿ) (अ. दे ना.—नोकरवर्ग; पहारेकऱ्याचा वर्ग.

**सिबिके** (ಸಿಬಿಕೆ) (क) ना.—पालखी; मेणा; शिबिका; खोरें; पावडे.

**सिब्बु** (ಸಿಬ್ಬು) (क) ना.—चर्मरोग; शिबें.

**सि (से) ब्रा** (ಸಿ [ಸೆ] ಬ್ರಾ) (अ-दे) ना.—झेब्रा; पट्ट्यापट्ट्याचा घोडा.

**सिमिसिमिगरे** } (ಸಿಮಿಸಿಮಿಗರೆ) (क) धा.—सुईऽऽ असा
**सिमिसिमिसु** } (ಸಿಮಿಸಿಮಿಸು) आवाज होत जळणें.

**सिंपडिसु** (ಸಿಂಪಡಿಸು) (क) धा.—शिंपडणें; शिंपणें; झारीनें पाणी घालणें; प्रोक्षणें; फवारा मारणें; 'सिडिसु' पहा.

**सिंपिग** (ಸಿಂಪಿಗ) (क) ना.—शिंपी; कपडे शिवणारा; दर्जी; शिल्पक.

**सिंपिणि** (ಸಿಂಪಿಣಿ) (क) ना.—ठिबकणी; प्रोक्षण; झारी.

**सिंपु** (ಸಿಂಪು) (क) ना.—मोत्याची शिंप; मोत्याचें कवच; शुक्ति; कालवाचें कवच.

**सिंबळ** (ಸಿಂಬಳ) (क) ना.—श्लेष्माजल; नाकांतील मळ; शेंबूड; मेकड.

**सिंबे (बि)** (ಸಿಂಬೆ [ಬಿ]) (क) ना.—चुंबळ; सापाचें वेटोळें.

**सिय्** (ಸಿಯ್) (क) वि.—गोड; रुचकर; मधुर; स्वादिष्ट; आमोददायी.

**सिय्यने (य्येने)** (ಸಿಯ್ಯನೆ [ಯ್ಯೆನೆ]) (क) वि.—मधुर; सुवासिक.

**सिर (रस्)** (ಸಿರ [ರಸ್]) (सं) ना.—डोकें; शीर्ष; मुंड. (क) ना.—शिरा; धमनी; नाडी.

**सिरि** (ಸಿರಿ) (क) ना.—श्री; धन; पैसा; लक्ष्मी; ऐश्वर्य; वैभव; शोभा; सौंदर्य.

**सिरिकंट** (ಸಿರಿಕಂಟ) (क) ना.—श्रीकंठ; शिव; परमेश्वर.

**सिरिकंड** (ಸಿರಿಕಂಡ) (क) ना.—श्रीखंड; श्रीगंध; चंदन.

**सिरिनरे** (ಸಿರಿನರೆ) (क) ना.—लहानपणींच केस पिकणें.

**सिरिमुडि** (ಸಿರಿಮುಡಿ) (क) ना.—सुंदर बुचडा; देवमूर्तीचें कबरीबंधन.

**सिरियरस** (ಸಿರಿಯರಸ) (क) ना.—विष्णु; कृष्ण.

**सिरियरसि** (ಸಿರಿಯರಸಿ) (क) ना.—संपत्तीची स्वामिनी; लक्ष्मी; देवी.

**सिरियोंडु** (ಸಿರಿಯೋಂಡು) (क) ना.—भाजकी कौलें.

**सिरिवर** (ಸಿರಿವರ) (क) ना.—श्रीवर; विष्णु; कृष्ण; लक्ष्मीपति.

**सिरिवायि** (ಸಿರಿವಾಯಿ) (क) ना.–ओठ फाटलेलें तोंड; श्रीमुख; गुरुजनांची पवित्र वाणी.

**सिरिवेण** (ಸಿರಿವೆಣ್) (क) ना.–लक्ष्मीदेवी.

**सिरिस** (ಸಿರಿಸ) (क) ना.–शौर्य, पराक्रम, पौरुष; शिरीष; शिरसाचें झाड.

**सिरिवोळ्तु** (ಸಿರಿವೊಳ್ತು) (क) ना.–संध्यावंदनाचे तीन मंगल काल.

**सिर्कु** (ಸಿರ್ಕು) (क) ना.–अडचण; गाठाळपणा; संकट, कष्ट; गंडांतर; संकोच; लाज; लज्जा.

**सिलकु (ल्कु)** (ಸಿಲಕು [ಲ್ಕು]) (क) धा.–अडकणें; अडचणीत येणें; पात्र होणें.
(अ. दे.) ना.–शिल्लक; बाकी; उरवणी.

**सिलुबे** (ಸಿಲುಬೆ) (अ. दे.) ना.–फाशीचा खांब; खिस्तवधाचा सूळ.

**सिलुवु** (ಸಿಲುವು) (क) वि.–कोमल; पातळ; चपटा.

**सिवंगि** (ಸಿವಂಗಿ) (क) ना.–चित्ता; बिबळ्या; बिब्या वाघ.

**सिवडु (डि)** (ಸಿವಡು [ಡಿ]) (क) ना.–चुंबळ; मांड्याखालची बैठक.

**सिवदिडु** (ಸಿವದಿಡು) (क) धा.–'उदो उदो' पुकारणें; उद्घोषणा करणें

**सिवरु** (ಸಿವರು) (क) ना.–झिमझिम पाऊस; भुरभुर.

**सिविके (गे)** (ಸಿವಿಕೆ [ಗೆ]) (क) ना.–पालखी; मेणा; शिबिका; डोली. 'अंदण' पहा.

**सिसु** (ಸಿಸು) (क) ना.– शिशु; मूल; बालक; तान्हुला.

**सिहि** (ಸಿಹಿ) (क) वि.–मधुर; गोड; रुचकर.

**सिळ्ळे** (ಸಿಳ್ಳೆ) (क) ना.–चीरफाड; चिपडें, डोळ्यातील मळ; शाखा; कोंब; विभक्त स्थिति.

**सी** (ಸೀ) (क) धा.–जळून जाणें; काळे ठिक्कर होणें.
(क) ना.–माधुर्य; सौंदर्य; थंडपणा.

**सीकरणे** (ಸೀಕರಣೆ) (क) ना.–शिकरण; आमरस; फळाचा रस.

**सीकर** (ಸೀಕರ) (सं) ना.–पावसाची लहान सर; झिमझिम; शिंतोडणी; प्रोक्षण

**सीकरि** (ಸೀಕರಿ) (क) ना.–जळून खाक; जळून झालेली राख; कोळसा.

**सीकरिवोगु** (ಸೀಕರಿವೋಗು) (क) धा.–जळून खाक होणें; कोळसा होणें; नाश होणें.

**सीग (गु) डि** (ಸೀಗ [ಗು] ಡಿ) (क) ना.–एक पाणकिडा; सरककिडा; निवळी.

**सीगुरि** (ಸೀಗುರಿ) (क) धा.–एका बाजूला वाकणें; कलणें.
(क) ना.–चौरी, चामर; सूर्यपान.

**सीगुरिसु** (ಸೀಗುರಿಸು) (क) धा.–वाकणें; बाजूला कलणें; पालवी फुटणें; वाकविणें.

**सीगे** (ಸೀಗೆ) (क) ना.–शिकेकाई; बाण काढणें; स्वच्छता; धूलन.
**—अण्णे-स्नेह** (ಅಣ್ಣೆ-ಸ್ನೇಹ) (क) ना.–स्वाभाविक वैर; हाडवैर

**सीटु (सींटु)** (ಸೀಟು [ಸೀಂಟು]) (क) धा.–पिळणें; पुसणें; विंचरणें.

**सीतर् (रु)** (ಸೀತರ್ [ರು]) (क) ना.–क्रोध; राग, चीड.

**सीतळ** (ಸೀತಳ) (क) वि.–थंडगार; शीत; हिमशीत.
(क) ना.–धुकें; दहिवर

**सीता** (ಸೀತಾ) (सं) ना.–जानकी; रामपत्नी; नांगराचा तास; एक प्रकारचे गवत.

**सीताफल** (ಸೀತಾಫಲ) (सं) ना.–एक फळ.

**सीतु** (ಸೀತು) (क) अ.–जळून; खाक होऊन; काळवंडून; मधुरपणें; गोडी गुलाबीनें.

**सीदु** (ಸೀದು) (क) ना.–मद्य; दारू.

**सीन् (नु)** (ಸೀನ್ [ನು]) (क) धा.–शिंकणे; शिंकरणें.
(क) ना.–शिंक; नाकानें घेतलेला श्वासोच्छ्वास.

**सीबे** (ಸೀಬೆ) (क) ना.–पेरु; कवठ.

**सीमन्** (ಸೀಮನ್) (सं) ना.–सीमा; हद्द;

**सीमंत** (ಸೀಮಂತ) (सं) ना.–सीमारेषा; सरहद्द; सीमांची खूण; केसांचा भांग; गर्भिणीचा संस्कार; भांग पाडण्याचा विधी.

**सीमंतपुत्र** (ಸೀಮಂತಪುತ್ರ) (सं) ना.–तान्हें मूल; लाडका लेक; वडील पुत्र.

**सीमंतमणि** (ಸೀಮಂತಮಣಿ) (सं) ना.–चूडामणी; डोक्यांतील दागिना.

**सीमंतिनि (नी)** (ಸೀಮಂತಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–सुवासिनी; सती; स्त्री.

**सीमंतोन्नयन** (ಸೀಮಂತೋನ್ನಯನ) (सं) ना.–साळीच्या काट्यांनी प्रथम गर्भिणीचा भांग पाडण्याचा विधि.

**सीमा (मे)** (ಸೀಮಾ [ಮೆ]) (सं) ना.–सीमा; मर्यादा; हद्द; क्षितिज; प्रदेश; अवधि; विदेश; औचित्याची मर्यादा.
**—पूजन** (ಪೂಜನ) (सं) ना.–सीमांतपूजन.

**सीमोल्लंघन** (ಸೀಮೊಲ್ಲಂಘನ) (सं) ना.–सीमेबाहेरील शमी पूजन; मुलुखगिरी; सोनें आणण्यासाठीं मर्दुमकी.

**सीयाळ** (ಸೀಯಾಳ) (क) ना.–शाहाळें; शाहाळ्याचें पाणी.

**सीयु** (ಸೀಯು) (क) धा.–जळणें; भाजणें; शिजणें.

**सीर् (रु)** (ಸೀರ್ [ರು]) (क) धा.–चावणें; उडी मारणें; भांडणें; ओरडणें; रागावणें; किंचाळणें;
(क) ना.–अत्यल्प; ऊ चें अंडे; लीख.

**सीर** (ಸೀರ) (क) वि.–पातळ; लहान; त्रासदायक.
(सं) ना.–नांगर; हल; सूर्य; अर्काचें झाड.
**सीरण** (ಸೀರಣ) (क) ना.–बाण; शर; पटाशी; तासणी.
**सीरणिगे** (ಸಿರಣಿಗೆ) (क) ना.–चिरणें; कंगवा; फणी.
**सीरध्वज** (ಸೀರಧ್ವಜ) (सं) ना.–जनकराजा; नांगराचे चिन्ह ध्वजावर ठेवणारा.
**सीरपाणि (भृत्)** (ಸೀರಪಾಣಿ [ಭೃತ್])
**सीरसीरि** (ಸೀರಸೀರಿ) (क.) ना.–बलराम; नांगर हातांत धरणारा.
**सीरयोग** (ಸೀರಯೋಗ) (सं) ना.–नांगराला जोडलेले बैल.
**सीरुडु** (ಸೀರುಡು) (क) ना.–झिल्ली; झिट्टी; किर्ऽऽ असा आवाज करणारा किडा; पतंग.
**सीरुंबुळाडु** (ಸೀರುಂಬುಳಾಡು)(क) धा.–चूळ भरणें; खुळखुळून चूळ टाकणें; चूळ फेकणें.
**सीरुंबुळु** (ಸೀರುಂಬುಳು) (क) ना.–चूळ; संततधार; थेंबाथेंबानें गळणें; ठिबकणी.
**सीरे** (ಸೀರೆ) (क) ना.–साडी; लुगडें.
**सीर्पनि** (ಸೀರ್ಪನಿ) (क) ना.–शिंपणी; प्रोक्षण; शिडकावा; फवारा; सीकर.
**सीवट** (ಸೀವಟ) (क) धा.–चिपाड; रस काढल्यानंतर उरणारी चोय; चघळ; सोपट.
**सीवन** (ಸೀವನ) (क) ना.–शिवणकाम; शिलाई.
**सीवनि** (ಸೀವನಿ) (क) ना–सुई; सूची; दाभण.
**सीवर** (ಸೀವರ) (क) ना.–तिरस्कार; अवहेलना; हिणवणी; हुंगवणी; विसंगति; ओकारी.
**सीवरिसु** (ಸೀವರಿಸು) (क) धा.–हिणवणें; हुंगवणें; तुच्छ लेखन; ओकारी करवणें.
**सीवु** (ಸೀವು) (क) धा.–अलंकारणें; शृंगारणें; शिजणें; जळणें.
(क) ना.–जळण; कळंज; काळवंडणी.
**सीसक** (ಸೀಸಕ) (क) ना.–शीर्षक; शिरस्त्राण.
**सीळ् (ळु)** (ಸೀಳ್ [ಳು]) (क) धा.–फाडणें; तुकडे करणें; फट सोडणें; पूर्ण चिरणें.
(क) ना.–भाग; फाक; तुकडा; लड; चीत्कार; किंचाळी.
**सु** (ಸು) (सं) अ.–सत्, चांगलें, सुलभ, योग्य, या अर्थाचा शब्दारंभी येणारा उपसर्ग.
**सुकर** (ಸುಕರ) (सं) वि.–सुलभ; सोपा; अनुकूल; उदार.
**सुकवि** (ಸುಕವಿ) (सं) ना.–श्रेष्ठकवि; कविवर.
**सुकाल** (ಸುಕಾಲ) (सं) ना.–अनुकूल समय; योग्यवेळ; सुगीचे दिवस; सुदैवाचा काळ.
**सुकुमार** (ಸುಕುಮಾರ) (सं) वि.–सुंदर; कोमल; मधुर; ललित.
(सं) ना.–चांगला मुलगा; सुपुत्र.
**—अक्षर** (ಅಕ್ಷರ) (सं) ना.–सानुनासिक अक्षर; मृदुवर्ण.
**सुकुमारि** (ಸುಕುಮಾರಿ) (सं) ना.–चांगली मुलगी; सुकन्या; कोमला; सुंदरी.
**सुकुमारता (ते)** (ಸುಕುಮಾರತಾ [ತೆ]) (सं) ना.–कोमलता; लालित्य; माधुर्य; सौंदर्य; काव्यातील मधुराक्षराची जडण.
**सुकृत** (ಸುಕೃತ) (सं) ना.–पुण्य; भाग्य; सत्कृत्य; सत्कार्य.
**सुकृति** (ಸುಕೃತಿ) (सं) ना.–सत्कार्य; पुण्य; दैव; अदृष्ट; कृतकार्य; धर्मशील; पुण्यवान्; साहित्यिक; उत्तमसाहित्य.
**सुक्कु** (ಸುಕ್ಕು) (क) धा.–मुदडणें; खचणें; संकोच पावणें; झडणें; सांडणें.
(क) ना.–चमड्याची घडी; वळी; सुरकुती.
**सुक्षेत्र** (ಸುಕ್ಷೇತ್ರ) (सं) ना.–तीर्थक्षेत्र; पवित्र स्थान; अनुकूल स्थान.
**सुख** (ಸುಖ) (सं) ना.–हित; आनंद; उल्हास; हर्ष; अनुकूलता; विराम.
**सुखद (प्रद)** (ಸುಖದ [ಪ್ರದ]) (सं) वि.–हितकर; अनुकूल; आनंद देणारे; संतोषप्रदायक.
**सुखरूप** (ಸುಖರೂಪ) (सं) वि.–क्षेमकारक; सुलभ; हितावह.
**सुखि** (ಸುಖಿ) (सं) ना.–सुखकारक; आनंदी; पुण्यवंत.
**सुखिसु** (ಸುಖಿಸು) (क) धा.–सुख होणें; संतोष पावणें; भाग्यवान होणें.
**सुगत** (ಸುಗತ) (सं) ना.–बुद्धदेव.
**सुगति** (ಸುಗತಿ) (सं) ना.–सुदैव; सद्वर्तन. सद्गति; मोक्ष; सुस्थिति.
**सुगंध** (ಸುಗಂಧ) (सं) ना.–सुवास; परिमळ.
**सुगंधि** (ಸುಗಂಧಿ) (सं) ना. सुवासिक पुष्प; मालिनी.
**सुगम** (ಸುಗಮ) (सं) वि.–सुलभ; सुकर; हलके; सहज; सोपें; प्रेमळ.
(सं) ना.–सुलभता; बालबोध; सुबोधता; धोपटमार्ग.
**सुगि** (ಸುಗಿ) (क) धा.–भिणें; घाबरणें; मागें पाय घेणें; चिरणें; फाडणें; दुमडणें; घडी घालणें; कोमेजणें.
**सुगुडि (डे)** (ಸುಗುಡಿ [ಡೆ]) (क) ना.–पुरुषी स्त्री; हिजडी; स्त्रीदेहधारी नपूंसक. स्त्रीत्व नसलेली स्त्री.
**सुगुडु (डुतन)** (ಸುಗುಡು [ಡುತನ]) (क) ना.–आशा; मोह; इच्छा; लालसा; आकांक्षा; आसक्ति.
**सुगुण** (ಸುಗುಣ) (सं) ना.–सद्गुण; चांगले गुण; सद्वर्तन; सदाचारी मनुष्य.
**सुग्गि** (ಸುಗ್ಗಿ) (क) वि.–अधिक; पुष्कळ; जास्त.
(क) ना.–वसंत काळ; हंगाम; सुकाळ; सण; समृद्धि.
**—गेळेय** (ಗೆಳೆಯ) (क) ना.–कामदेव; मन्मथ.
**सुग्गिवक्कि** (ಸುಗ್ಗಿವಕ್ಕಿ) (क) ना.–कोकिळा; कोयल; पिक.

**सुग्रीव** (ಸುಗ್ರೀವ) (सं) ना.–मरदारकंठ; मधुरध्वनि; किष्किंद्धेचा राजा सुग्रीव.
**सुग्रीवाज्ञे** (ಸುಗ್ರೀವಾಜ್ಞೆ) (क) ना.–उग्र शासन; कडक शिस्त; क्रूर कायदा; उग्र विधि.
**सुंक** (ಸುಂಕ) (क) ना.–कर; फाळा; जकात; धान्याचा कोंडा; भुस्सा.
**सुंकदकट्टि** (ಸುಂಕದಕಟ್ಟೆ) (क) ना.–जकातकट्टा; टोलनाका; जकातनाका.
**सुंकिग** (ಸುಂಕಿಗ) (क) ना.–जकातदार; जकात वसूल करणारा; फाळा घेणारा.
**सुंकु** (ಸುಂಕು) (क) ना.–स्पर्शजन्यता; सांसर्गिकता; सांसर्गिक रोग; शिवाशिव; स्पर्श. 'सुकु' पहा. निरी; सुरकुती.
**सुचरित** (ಸುಚರಿತ) (सं) ना.–सद्वर्तन; सदाचार; (सं) वि. सद्वर्तनी; सदाचारी; कीर्तिवंत; ख्यातनाम.
**सुचरिते** (ಸುಚರಿತೆ) (सं) ना.–पतिव्रता; सती; सद्वर्तनी स्त्री.
**सुचरित्र** (ಸುಚರಿತ್ರ) (सं) ना.–सुचरित; सद्वर्तन; सदाचार; सुवृत्त; कीर्ति.
**सुचित्त** (ಸುಚಿತ್ತ) (सं) वि.–सहृदय (सं) ना. निःपक्षपाती सद्वर्तन; सुप्रसन्न मन.
**सुजन** (ಸುಜನ) (सं) ना.–सज्जन; सद्गृहस्थ; सभ्य; सहृदय.
**सुटि** (ಸುಟಿ) (क) ना.–हुषारी; चापल्य; रूढी; वापर; चतुरता; जाणतेपणा; निपुणता; कच्चेपणा.
**सुट्ट** (ಸುಟ್ಟ) (क) वि.–भाजलेले; शिजलेले; तळलेले; नष्ट; अवलक्षणी; निरर्थक.
**सुट्टतोरू** (ಸುಟ್ಟತೋರು) (क) धा.–बोटानें दाखविणें; स्पर्श करून दाखवणें.
**सुट्टु** (ಸುಟ್ಟು) (क) ना.–अंगुलीदर्शन; हस्तदर्शन; बोटानें दिग्दर्शन.
**सुट्टुंबे** (ಸುಟ್ಟುಂಬೆ) (क) ना.–तर्जनी; निर्देशिकांगुली; निर्देशिका.
**सुट्टुरे** (ಸುಟ್ಟುರೆ) (क) ना.–वावटळ; वातचक्र; भुताटीवारा.
**सुडाळ** (ಸುಡಾಳ) (क) ना.–सुप्रभा; सुशोभा; सुकांति; सुढाळ; डौल.
**सुडुक** (ಸುಡುಕ) (क) वि.–जळके; जळते; जळत असलेले; जाळणारा.
**सुडुगाडु** (ಸುಡುಗಾಡು) (क) ना.–प्रेते जाळण्याचे स्थान; स्मशान; दहनभूमि; अवलक्षण; वाईटपणा.
**सुंटि (ट) गे** (ಸುಂಟಿ [ಟ]ಗೆ) (क) ना.–भाजलेले मांस; हृदय
**सुंटिगेयडगु** (ಸುಂಟಿಗೆಯಡಗು) (क) ना.–काळजाचें मांस.
**सुंटरगाळि** (ಸುಂಟರಗಾಳಿ) (क) ना.–वावटळ; भूतवारा; वादळ; झंजावात; सोसाट्याचा वारा.

**सुं (शुं) डाल** (ಸುಂ [ಶುಂ] ಡಾಲ) (क) ना.–सोंड असलेला; हत्ती; गज.
**सुंडिलि** (ಸುಂಡಿಲಿ) (क) ना.–चुचुंद्री; लांबट तोंडाचा उंदराच्या जातीचा प्राणी.
**सुंडु** (ಸುಂಡು) (क) ना.–वाळवण; झिरपणी; जिरवण; सुकती; थंडावा; निवणें.
**सुंडे** (ಸುಂಡೆ) (क) ना.–हत्तीची सोंड.
**सुत** (ಸುತ) (सं) ना.–मुलगा; पुत्र; पोर; कुमार.
**सुतरां** (ಸುತರಾಂ) (सं) अ.–सर्वथा; सर्वतः; केव्हाहि; बहुतकरून पूर्णपणें; अगदीं.
**सुता (ते)** (ಸುತಾ [ತೆ]) (सं) ना.–मुलगी; कन्या; कुमारी.
**सुति** (ಸುತಿ) (क) ना.–श्रुति; ध्वनि; स्वर; राग.
**सुत्तमुत्तु** (ಸುತ್ತಮುತ್ತು) (क) आ.–चोहीकडून; कोठेहि; आजुबाजूस.
**सुत्ताले** (ಸುತ್ತಾಲೆ) (क) ना.–प्राकार; आवार; पवळी.
**सुत्तिगे** (ಸುತ್ತಿಗೆ) (क) ना.–फेरा; सुतळी; हातोडा; चिमटा; चामड्याचा पट्टा.
**सुत्तु** (ಸುತ್ತು) (क) धा.–गुंडाळणें; आवरणें; सुरळी करणें; वेढणें.
(क) ना.–प्रदक्षिणा; सुरळी; गुंडाळी; वंचना; पालवी; अनुकूल स्थळ; मंदवारा; फिरती; आळस.
**सुत्तुवरि** (ಸುತ್ತುವರಿ) (क) धा.–प्रदक्षिणा घालणें; रक्ताभिसरण होणें; रक्त सळसळणें; कागदपत्र देणें; प्रतृत करणें.
**सुत्तुवळय** (ಸುತ್ತುವಳಯ) (क) अ.–कोठेंहि; चोहीकडे; प्रदक्षिणा घालून; भोवती फिरून.
**सुत्तोले** (ಸುತ್ತೋಲೆ) (क) ना.–परिपत्र; प्रसिद्धिपत्रक; जाहिरात.
**सुत्राम** (ಸುತ್ರಾಮ) (सं) ना.–इंद्र; देवेंद्र.
—**लोक** (ಲೋಕ) (सं) ना.–स्वर्ग; इंद्रलोक.
**सुदति (ती)** (ಸುದತಿ [ತೀ]) (सं) ना.–दांत चांगले असलेली स्त्री; कामिनी.
**सुदर्शन** (ಸುದರ್ಶನ) (सं) ना.–सुलक्षण; सुंदर पुरुष; सौंदर्यसंपन्न; एक चक्रायुध.
**सुदर्शनपाणि** (ಸುದರ್ಶನಪಾಣಿ) (सं) ना.–हातात सुदर्शन असलेला कृष्ण; विष्णु.
**सुदर्शना (ने)** (ಸುದರ್ಶನಾ [ನೆ]) (सं) ना.–सुंदर स्त्री; मनोहारिणी; रूपवती.
**सुदाम** (ಸುದಾಮ) (सं) ना.–उत्तम कडदोरा; उवडी मूठ; कृष्णमित्र; एक गरीब ब्राह्मण; जीर्ण वस्त्रे वापरणारा; समुद्र; ऐरावत; गरीबीचें जीवन; दारिद्र्य.
**सुदिन** (ಸುದಿನ) (सं) ना. चांगला दिवस; पुण्यकाल; आनंदाचा दिन.

**स्वन** (ಸ್ವನ) (सं) ना. – नाद; आवाज; चाहुल; ध्वनि; ललकारी

**स्वनत्** (ಸ್ವನತ್) (सं) वि. – नादपूर्ण; ध्वनिकारक; ओरडणारे; हाक मारणारे–नाद करणारे.

**स्वप्न** (ಸ್ವಪ್ನ) (सं) ना. – ध्यान; निद्रा;

**—मंदिर** (ಮಂದಿರ) (सं) ना. – मनोरथ; हवेंतील किल्ले; मनांतले मांडे; कल्पनासाम्राज्य.

**—राज्य** (ರಾಜ್ಯ) (सं) ना. – स्वप्नांतील राज्य; असंभव गोष्ट.

**—सुख** (ಸುಖ) (सं) ना. – कल्पनेत अनुभवलेलें सुख.

**स्वभाव** (ಸ್ವಭಾವ) (सं) ना. – जन्मगुण; सहजगुण; प्रकृतिधर्म; नैसर्गिक शील.

**—आचारस्वभाव** (ಆಚಾರಸ್ವಭಾವ) (सं) ना. – विचाराची क्रमबद्धता.

**स्वयं** (ಸ್ವಯಂ) (सं) अ. – आपोआप.

**स्वयंभु (भू)** (ಸ್ವಯಂಭು [ಭೂ]) (सं) ना. – आपोआप जन्मलेला; ब्रह्मा; विष्णु; एक मनु; निरक्षर; निर्बुद्ध.

**—लिंग** (ಲಿಂಗ) (सं) ना. – आपोआप उत्पन्न झालेले लिंग; बारा ज्योतिर्लिंगे.

**स्वयंवर** (ಸ್ವಯಂವರ) (सं) ना. – एक विवाहपद्धति; स्वतःच स्वतःचा पति निवडून त्याच्याशी विवाह करणें.

**स्वर्** (ಸ್ವರ್) (सं) ना. – स्वर्ग; आकाश; प्रकाश.

**स्वर** (ಸ್ವರ) (सं) ना. – ध्वनि; नाद; शब्द; श्वास; स्वयंपूर्णवर्ण. वर्ण; पूर्णोच्चारी वर्ण; एक राग.

**स्वरमंडल** (ಸ್ವರಮಂಡಲ) (सं) ना. – एक वाद्य.

**स्वराज्य** (ಸ್ವರಾಜ್ಯ) (सं) ना. – आपले राज्य; जनराज्य. लोकांनी चालवलेले राज्य.

**स्वरित** (ಸ್ವರಿತ) (सं) वि. – बोललेले; ओरडून सांगितलेले; वेदमंत्रपठणाचा मध्यमध्वनि.

**स्वरु** (ಸ್ವರು) (सं) ना. – सूर्यप्रकाश; यज्ञस्तंभाचा भाग; यज्ञ; वीज; वज्र; बाण.

**स्वरूप** (ಸ್ವರೂಪ) (सं) ना. – निजरूप. आकार; सौंदर्य.

**स्वर्ग** (ಸ್ವರ್ಗ) (सं) ना. – सुरलोक; देवलोक; संतोष; सुख.

**स्वर्गस्थ** (ಸ್ವರ್ಗಸ್ಥ) (सं) ना. – स्वर्गात राहणारा; देवता; अमर-मृत.

**स्वर्गीय** (ಸ್ವರ್ಗೀಯ) (सं) वि. – स्वर्गासंबंधी; सुखकर;

**—सौंदर्य** (ಸೌಂದರ್ಯ) (सं) ना. – अनुपम सौंदर्य; अतुल शोभा; दिव्य सुंदरता.

**स्वर्ण** (ಸ್ವರ್ಣ) (सं) ना. – सुवर्ण; सोनें; हळद; पिवडी; पिवळेपणा.

**—मृग** (ಮೃಗ) (सं) ना. – कांचनमृग

**स्वर्णगिरि** (ಸ್ವರ್ಣಗಿರಿ) (सं) ना. – मेरुपर्वत; कांचनगिरी.

**स्वर्णदि (दी)** (ಸ್ವರ್ಣದಿ [ದೀ]) (सं) ना. – देवगंगा नदी; स्वर्गीय नदी.

**स्वर्णपुष्प** (ಸ್ವರ್ಣಪುಷ್ಪ) (सं) ना. – मंदारफूल;चाफ्याचे फूल.

**स्वर्धाम** (ಸ್ವರ್ಧಾಮ) (सं) ना. – स्वर्ग; अमरलोक.

**स्वर्धुनि (नी)** (ಸ್ವರ್ಧುನಿ [ನೀ]) (सं) ना. – देवगंगा; आकाशगंगा.

**स्वर्भानु** (ಸ್ವರ್ಭಾನು) (सं) ना. – राहू

**स्वर्मणि** (ಸ್ವರ್ಮಣಿ) (सं) ना. – सूर्य; कवि.

**स्वर्वैद्य** (ಸ್ವರ್ವೈದ್ಯ) (सं) ना. – देववैद्य; अश्विनीकुमार.

**स्वल्प (ल्पीयस्)** (ಸ್ವಲ್ಪ [ಲ್ಪೀಯಸ್]) } (सं) ना. – थोडे;
**स्वल्पिष्ठ** (ಸ್ವಲ್ಪಿಷ್ಠ) } कमी; त्यापेक्षा कमी; अतिकमी.

**स्वसृ** (ಸ್ವಸೃ) (सं) ना. – बहीण; सहोदरी; ताईमाई.

**स्वस्ति** (ಸ್ವಸ್ತಿ) (सं) ना. – कल्याण; आशीर्वाद; प्रेम; शुभआशिर्वचन.

**—क** (ಕ) (सं) ना. – एक मंगलचिन्ह; 卐 मंगलचिन्ह.

**—वाचन** (ವಾಚನ) (सं) ना. – मंगल मंत्रपठण.

**स्वस्थ** (ಸ್ವಸ್ಥ) (सं) ना. – आत्मसंतुष्ट; निरोगी; सुखशांतिकारक; निश्चित; स्थिरचित्त.

**—चित्त** (ಚಿತ್ತ) (सं) ना. – निश्चित मन; शांत मनस्वी.

**स्वस्रीय** (ಸ್ವಸ್ರೀಯ) (सं) ना. – भाचा.

**स्वस्वरूपविवेक** (ಸ್ವಸ್ವರೂಪವಿವೇಕ) (सं) ना. – आत्मानुभूति; आत्मस्वरूपज्ञान; अव्यक्त ईश्वराला ओळखण्याची एक पद्धति.

**स्वहस्तलेखन** (ಸ್ವಹಸ್ತಲೇಖನ) (सं) ना. – आपल्या हातचें लिहिणें.

**स्वागत** (ಸ್ವಾಗತ) (सं) ना. आवाहन; संतोषाचें निमंत्रण.

**स्वातंत्र्य** (ಸ್ವಾತಂತ್ರ್ಯ) (सं) ना. – स्वतंत्रता–स्वेच्छानुवर्तन; स्वच्छंद वागणूक.

**स्वाद** (ಸ್ವಾದ) (सं) ना. – रुचि; चव; गोडी; सुवास; 'कंपू' पहा.

**स्वादिष्ट** (ಸ್ವಾದಿಷ್ಟ) (सं) वि. – रुचकर; मधुर; गोड; चवदार.

**स्वादिसु** (ಸ್ವಾದಿಸು) (क) धा. – चव घेणें; खाऊन पाहणें; रुचि पाहणें.

**स्वादु** (ಸ್ವಾದು) (सं) वि. – रुचकर; गोड; मधुर.

**स्वादूदक** (ಸ್ವಾದೂದಕ) (सं) ना. – गोड पाणी; पिण्याचा सोडा.

**स्वाधीन** (ಸ್ವಾಧೀನ) (सं) वि. – आधीन; आत्मवश; आपल्या हातचा.

**स्वाधीनपतिका** (ಸ್ವಾಧೀನಪತಿಕಾ) (सं) ना. – अष्टशृंगार नायिकांपैकी एक.

**स्वाध्याय** (ಸ್ವಾಧ್ಯಾಯ) (सं) ना.–वेदाध्ययन; आपल्यापुरता अभ्यास; गृहपाठ.
**स्वान** (ಸ್ವಾನ) (सं) वि.–स्वरासंबंधीचें; ध्वनि; शब्द; हूल.
**स्वानुभव** (ಸ್ವಾನುಭವ) (सं) ना.–आत्मानुभूति; स्वमत; स्वतःचा अनुभव.
**स्वानुभवि (भावि)** (ಸ್ವಾನುಭವಿ [ಭಾವಿ]) (सं) वि.–स्वतः अनुभव घेणारा; महानुभावि.
**स्वानुभाव** (ಸ್ವಾನುಭಾವ) (सं) ना.–परमात्मविषयक स्वतःचा अनुभव.
**स्वांत** (ಸ್ವಾಂತ) (सं) ना.–मन; अंतःकरण.
**स्वाप** (ಸ್ವಾಪ) (सं) ना.–निद्रा; झोप.
**स्वापहार** (ಸ್ವಾಪಹಾರ) (सं) ना.–संपत्तीची चोरी.
—**दत्तस्वापहार** (ದತ್ತಸ್ವಾಪಹಾರ) (सं) ना.–दिलेले दान परत घेणें.
**स्वाभाविक** (ಸ್ವಾಭಾವಿಕ) (सं) वि.–सहज; नैसर्गिक; प्राकृतिक.
**स्वामि (मिन्)** (ಸ್ವಾಮಿ [ಮಿನ್]) (सं) ना.–मालक; धनी; प्रभु; गुरु; ईश्वर; संन्यासी; मठाधीश.
**स्वामिनि (नी)** (ಸ್ವಾಮಿನಿ [ನೀ]) (सं) ना.–मालकीण; यजमानीण; संन्यासिनी; शिवशरणा.
**स्वाम्य** (ಸ್ವಾಮ್ಯ) (सं) ना.–स्वामित्व, मालकी; अधिकार; हक्क.
**स्वाम्यविक्रांत** (ಸ್ವಾಮ್ಯವಿಕ್ರಾಂತ) (सं) ना.–मालकाच्या संपत्तीचे अपहरण करणारा; परमपापी.
**स्वायत** (ಸ್ವಾಯತ) (सं) ना.–आत्मानुशासन; शैव गुरूकडून घेतलेली प्राणलिंग दीक्षा.
**स्वायत्त** (ಸ್ವಾಯತ್ತ) (सं) वि. स्वाधीन झालेले.
**स्वायंभुव** (ಸ್ವಾಯಂಭುವ) (सं) वि.–ब्रह्मदेवासंबंधी; पहिला मनु.
**स्वारस्य** (ಸ್ವಾರಸ್ಯ) (सं) ना.–समयस्थिति; गोडी; रसिकता; रसात्मकता.
**स्वाराज्यं** (ಸ್ವಾರಾಜ್ಯಂ) (सं) ना.–देवराज्य; रामराज्य; उत्तम शासन; ब्रह्म.
**स्वार्जित** (ಸ್ವಾರ್ಜಿತ)(सं) वि.–स्वसंपादित; आपण मिळवलेले.
**स्वार्थ** (ಸ್ವಾರ್ಥ) (सं) ना.–स्वहित; आत्मलाभ; स्वप्रयोजन.
**स्वार्थि (थिन्)** (ಸ್ವಾರ್ಥಿ [ಥಿನ್]) (सं) वि. केवळ स्वतःपुरते पाहणारा, आत्मकल्याणेच्छु; स्वहितसाधक.
**स्वास्थ्य** (ಸ್ವಾಸ್ಥ್ಯ) (सं) ना.–स्वस्थता, आरोग्य; क्षेम; शांतता.
**स्वाहादेवि** (ಸ್ವಾಹಾದೇವಿ) (सं) ना.–अग्निपत्नी; हविभक्षण.
**स्विन्न** (ಸ್ವಿನ್ನ) (सं) वि.–पाणी सुटलेलें; घाम फुटलेलें; शिजलेलें; घामेजलेले.
**स्वीकरिसु** (ಸ್ವೀಕರಿಸು) (क) धा.–स्वीकारणें; काढून घेणें; कबूल करणें; अंगीकारणें; मोकळे करणें; रिकामे करणें; आपलासा करणें.
**स्वीकार** (ಸ್ವೀಕಾರ) (सं) ना.–ग्रहण; कबुली; मान्यता; अनुमति.
**स्वीकृति** (ಸ್ವೀಕೃತಿ) (सं) ना.–स्वीकार; अनुमति; ग्रहण; मान्यता.
**स्वीय** (ಸ್ವೀಯ) (सं) वि.–आपला; स्वतःचा; विशिष्ट; स्वतःसंबंधी.
**स्वेच्छाप्रवृत्ति** (ಸ್ವೇಚ್ಛಾಪ್ರವೃತ್ತಿ) (सं) ना.–आपल्या मनाप्रमाणे केलेलें वर्तन; स्वैरवृत्ति.
**स्वेच्छामरण** (ಸ್ವೇಚ್ಛಾಮರಣ) (सं) ना.–इच्छेनुसार मरण.
**स्वेच्छामरणि** (ಸ್ವೇಚ್ಛಾಮರಣಿ) (सं) वि.–मनाला येईल तेंव्हां मरणारा; भीष्माचार्य.
**स्वेच्छे** (ಸ್ವೇಚ್ಛೆ) (सं) ना.–स्वतःची इच्छा; स्वैरवृत्ति; मनःपूतवर्तन.
**स्वेद (दन)** (ಸ್ವೇದ [ದನ]) (सं) ना.–घाम; घर्म; अंगातील पाणी.
**स्वैर** (ಸ್ವೈರ) (सं) वि.–स्वेच्छाचारी; मनःपूत वागणारा; हेकेखोर; हटवादी; इच्छाचारी.
**स्वैरवृत्ति** (ಸ್ವೈರವೃತ್ತಿ)(सं) ना.–अविवेकीवर्तन; स्वेच्छाचार.
**स्वैराचार** (ಸ್ವೈರಾಚಾರ) (सं) ना.–स्वैरवृत्ति; अनिर्बंधवर्तन.
**स्वैरिणि (णी)** (ಸ್ವೈರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–जारिणी; व्यभिचारिणी; मनसोक्त वागणारी.

## ह

ह (ಹ) (सं) ना.–अवर्गीय व्यंजन मालेचे आठवे व्यंजन. प्राचीन कन्नड भाषेत 'अ' ऐवजीं येणारा भावप्रत्यय. शिवाचे स्वरूप; पाणी; आकाश; प्रेम; तत्सम वा तद्भव रूप करतांना येणारा आदेश.
हः (ಹಃ) (क) अ.–प्राचीन कन्नडमधील 'प' ऐवजी नव कन्नडमध्यें होणारा आदेश; हास्यदर्शक चिन्ह.
ह (हुं) (ಹ [ಹುಂ]) (क) अ.–संमतिदर्शक अव्यय.
हंस (ಹಂಸ) (सं) वि.–श्रेष्ठ (हस् धातूचा 'हंस' वाचक शब्द.)
(सं) ना.–हंसपक्षी; सूर्य; परमात्मा; जीवात्मा; यति; विष्णु; पर्वत; वायु; काम; एक मंत्र.
हंसक (ಹಂಸಕ) (सं) ना.–नूपुर; पैंजण; घुंगुर.

**हंसक्षीरन्याय** (ಹಂಸಕ್ಷೀರನ್ಯಾಯ) (सं) ना.–दूध व पाणी यांच्या मिश्रणातून दूधच घेण्याचा गुण; चांगले तेवढें घेण्याचा गुण.

**हंसगति (गमन)** (ಹಂಸಗತಿ [ಗಮನ]) } (सं) वि.–
**हंसगामिनी, (नि)** (ಹಂಸಗಾಮಿನೀ [ನಿ]) }
हंसाप्रमाणें चालण्याचा ढंग असलेली.

**हंसतूल** (ಹಂಸತೂಲ) (सं) ना.–पक्ष्याचे पर; पिसातील केस.
—**तल्प–तूलिकातल्प**–(ತಲ್ಪ–ತೂಲಿಕಾತಲ್ಪ) (सं) ना.–हंसाच्या पराची शय्या.

**हंसध्वज** (ಹಂಸಧ್ವಜ) (सं) ना.–सुधन्वाचा बाप; चंपक नगरीचा राजा.

**हंसपाद** (ಹಂಸಪಾದ) (सं) ना.–हंसाचा पाय; काकचिन्ह.

**हंसरथ (वाहन)** (ಸಂಸರಥ [ವಾಹನ]) (सं) ना.–हंसावर बसलेला ब्रह्मदेव.

**हंसाधिरूढ** (ಹಂಸಾಧಿರೂಢ) (सं) ना.–ब्रह्मदेव; हंसवाहन.

**हंसि (सी) (सिके) सिका** (ಹಂಸಿ [ಸೀ] [ಸಿಕೆ] [ಸಿಕಾ]) (सं) ना.–हंस पक्षी; हंस पक्षिणी.
—**राजहंसी** (ರಾಜಹಂಸೀ) (सं) ना.–हंस पक्षिणी.

**हकीकत** (ಹಕೀಕತ) (अ. दे) ना.–बातमी; समाचार; व्यवहार स्थितिगति; परिस्थिति.

**हकीम** (ಹಕೀಮ) (अ. दे) ना.–वैद्य; युनानी वैद्य.

**हक्करिके** (ಹಕ್ಕರಿಕೆ) (क) ना.–जीन; गाशा; थडी; हत्तीची झूल; एक पालाभाजी. 'हल्लण' पहा.

**हक्कलु** (ಹಕ್ಕಲು) (क) ना.–पीक काढून घेतलेली जमीन; दगडधोंडे वेचून काढलेले शेत; वारा दिलेलें धान्य; विश्रांति; अंतर.

**हक्कळे** (ಹಕ್ಕಳೆ) (क) ना.–वाळलेला शेंडा; कागद; पत्रा; फडा; फणा; मागचा भाग; अर्धचंद्र.

**हक्कापक्कि** (ಹಕ್ಕಾಪಕ್ಕಿ) (क) ना.–पक्ष्याप्रमाणें भान उडून जाणें.

**हक्कि** (ಹಕ್ಕಿ) (क) ना.–पक्षी; उडणारा प्राणी.

**हक्किपक्कि** (ಹಕ್ಕಿಪಕ್ಕಿ) (क) ना.–कांहीं जातीचे पक्षी.

**हक्किबाळु** (ಹಕ್ಕಿಬಾಳು) (क) ना.–खुशालछंदी जीवन; पक्ष्यासारखे जीवन.

**हक्कु** (ಹಕ್ಕು)(अ. दे) ना.–मालकी; अधिकार; योग्यता; बाध्यता.

**हक्के** (ಹಕ್ಕೆ) (क) ना.–स्थळ; घर; निवास; गोठा; गवाण; बिछाना; अंथरुण; कोंडवाडा. 'इंबु' पहा.

**हगरण** (ಹಗರಣ) (क) ना.–दंभ; कोरडा अहंकार; व्यर्थ बडबड; भांडण; कलह; निंदा; दीनपणा; प्रहसन; रूपक.

**हगरणि** (ಹಗರಣಿ) (क) ना.–नट्टपट्टा करणारी; नटवणारी; शृंगारणारी.

**हगरणिग** (ಹಗರಣಿಗ) (क) ना.–वाळला गर्व; गप्पीदास; नाटककार; अप्रामाणिक मनुष्य; वंचक; ढोंगी.

**हगरू** (ಹಗರು) (क) ना.–बांबूचा बुडखा; चिवा; उघडा हात; पसरलेला हात.

**हगल् (लु)** (ಹಗಲ್ [ಲು]) (क) ना.–दिवस; दिन; सूर्योदयकाल.

**हगलुदीप** (ಹಗಲುದೀಪ) (क) ना.–दिवसा दिवा लावून विद्वत्ता मिरवण्याची प्राचीन रीति; दिवसाउजेडी.

**हगलुदीवटिगे** (ಹಗಲುದೀವಟಿಗೆ) (क) दिवसा मशाल पाजळणें.
—**हिडिसु** (ಹಿಡಿಸು) (क) ना.–अतिप्रसिद्ध होणें; टेंभा मिरवणें.

**हगह** (ಹಗಹ) (क) ना.–पेव; धान्य ठेवण्याचे भुयार.

**हगिन** (ಹಗಿನ) (क) ना.–झाडाचा डिंक; गोंद; चिकट रस.

**हगुर् (रु)** (ಹಗುರ್ [ರು]) (क) वि.–हलके; क्षुद्र; नीच; बिनभाराचे.

**हगे** (ಹಗೆ) (क) ना.–वैरी; वैर; अमित्र; शत्रु; पेव; भूमीतील धान्य कोठार.
—**होरु** (ಹೊರು) (क) धा. वैर राखणें; शत्रुत्व चालवणें.

**हगेय** (ಹಗೆಯ) (क) ना.–अमित्र; वैरी; शत्रु; पेव.

**हग्ग** (ಹಗ್ಗ) (क) ना.–दोरी; फास; जाळें; प्रग्रह.
—**हाकु** (ಹಾಕು) (क) धा.–दोरीनें बांधणें; पाश टाकणें; कट रचणें; व्यूह रचणें.

**हग्गु** (ಹಗ್ಗು) (क) ना.–पेव; खालाटी; निम्नभूमि; सखल प्रदेश; फाल्गुन मास.

**हंकार** (ಹಂಕಾರ) (क) ना.–ताठ्यानें दिलेला 'हुं' कार; अहंकार.

**हंगिग** (ಹಂಗಿಗ) (क) वि.–ऋणी; ऋण खाणारा; उपकृत; उपकारांत बुडलेला; आश्रित; आश्रयाला राहिलेला.

**हंगाम** (ಹಂಗಾಮ) (अ.दे) ना.–सुग्गी; अनुकूल काल; योग्य समय.

**हंगिसु** (ಹಂಗಿಸು) (क) धा.–उपकारानें होरपळून काढणें; हूंणवणें; हिणवणें; टोमणा देणें; टोचून बोलणें; तुच्छ करणें; पाणउतारा करणें; स्पर्धेसाठीं आव्हान देणें.

**हंगु** (ಹಂಗು) (क) ना.–दाक्षिण्य; ऋण; उपकार; आश्रय; आधार.

**हंगुलि (लिगे)** (ಹಂಗುಳಿ [ಳಿಗೆ]) (क) ना.–लहान पाट; तिवई; लहान टेबल; चौपायी.

**हच्चड** (ಹಚ್ಚಡ) (क) ना.–पांघरूण; उत्तरीय; चादर; वाकळ; पातळ बिछाना.

**हच्चु** (ಹಚ್ಚು) (क) धा.–लेपणें; लावणें; वापरणें; पुसणें; जुळवणें; एकसंध करणें; उगवणें; चूल पेटवणें; गुंतवणें.

**हच्चे** (ಹಚ್ಚೆ) (क) ना.–गोंदण; स्त्रीच्या हातावर गोंदलेलें चित्र; गोंदणाची खूण.

**हजाम** (ಹಜಾಮು) (अ.दे) ना.–क्षौरिक, कारागिर; नापित.
**हजार** (ಹಜಾರ) (अ.दे) वि.–सहस्र; दहशत; घरापुढील अंगण; सोपा; पडवी.
**हज्जे** (ಹಜ್ಜೆ) (क) ना.–पद्धति; पाऊल; क्रम; रीत; शिक्षण.
**हज्जेहिडि** (ಹಜ್ಜೆಹಿಡಿ) (क) धा.–अनुसरणें; पावलावर पाऊल ठेवणें; माग काढणें.
**हंचिकड्डि** (ಹಂಚಿಕಡ್ಡಿ) (क) ना.–पत्रावळ लावण्याची चोय; चोयटी.
**हंचिके** (ಹಂಚಿಕೆ) (क) ना.–वाटप; वाटणी; दान; युक्ति; उपाय; योजना; सिद्धता.
**हंचिग** (ಹಂಚಿಗ) (क) ना.–माहूत; हत्ती चालवणारा.
**हंचु** (ಹಂಚು) (क) धा.–वाटणें; भाग करणें; वाटणी करणें. (क) ना.–पाहरा; कौल; पन्हळ.
**हंचुहरि** (ಹಂಚುಹರಿ) (क) ना.–फुटक्या कौलाचा चूर; चक्काचूर; चकणाचूर.
**हंजमार** (ಹಂಜಮಾರ) (क) वि)–क्षुद्र; नीच; लहान; क्षुद्र मनाचा.
**हंजर** (ಹಂಜರ) (क) ना.–घरटें; पक्ष्याचा पिंजरा; वेळु.
**हंजरगूळि** (ಹಂಜರಗೂಳಿ) (क) ना.–मासे मारण्याचा गळ.
**हंजि** (ಹಂಜಿ) (क) ना.–पेळू; कापसाची वात.
**हट** (ಹಟ) (क) ना.–हट्ट; छल; मोंडपणा; आग्रह.
**हटत्** (ಹಟತ್) (सं) वि.–प्रकाशणारा; चकाकणारा.
**हट्ट**(ಹಟ್ಟ) (सं) ना.- पेठ; यात्रा.
**—ताल** (ತಾಲ) (क) ना.–हरताळ; व्यवहार बंदी.
**—नारी–विलासिनि** (ನಾರಿ–ವಿಲಾಸಿನಿ) (क) ना.–वेश्या; रांड; रखेली.
**हट्टि** (ಹಟ್ಟಿ) (क) ना.–गोशाळा; कोंडवाडा.
**हट्टिकार** (ಹಟ್ಟಿಕಾರ) (क) ना.–गुराचा मालक; गोवळा; गुराखी; गोपालक.
**हठ** (ಹಠ) (सं) ना.–आग्रह; जबरदस्ती; दडपण.
**—योग** (ಯೋಗ) (सं) ना.–कठीण तपपद्धति; उग्र तपश्चर्या.
**हठात्** (ಹಠಾತ್) (सं) अ.–अकस्मात्; एकदम; जबरदस्तीनें. बळजोरीनें; जोरावरीनें.
**हड** (**डं**) **गु** (ಹಡ [ಡಂ] ಗು) (क) ना.–नाव; नौका; सांगड.
**हडदि** (**दे**) (ಹಡದಿ [ದೆ]) (क) ना.–राजाला द्यावयाचा दायभाग; वतन; पायघडी.
**हडप** (ಹಡಪ) (क) ना.–पानदान; विड्याचा डबा; चंची; हजामाची पिशवी; धोकटी.
**हडपगार** (ಹಡಪಗಾರ) (क) ना.–क्षौरिक; नापित; धोकटीवाला न्हावी.
**हडपवळ** (**ळ**) (ಹಡಪವಳ [ಳ್ಳ]) (क) ना.–राजवाड्यात पानपट्टी घेऊन उभा राहणाऱ्या हुजऱ्या; क्षौरिक.
**हडपिग** (ಹಡಪಿಗ) (क) ना.–पानदान देणारा; नापित.
**हडलिगे** (**के**) (ಹಡಲಿಗೆ [ಕೆ]) (क) ना.–ताम्हन; तबक; पितळी; शिपतर.
**हडि** (ಹಡಿ) (क) ना.–दार; दरवाजा; सैन्य.
**हडिके** (ಹಡಿಕೆ) (क) ना.–दुर्गंध; घाण.
**हडिलु** (ಹಡಿಲು) (क) ना.–पडजमीन; नापीक जमीन.
**हडे** (ಹಡೆ) (क) धा.–जन्म देणें; जुळणें; सहन करणें; प्रसवणें; संभोगणें. 'हेरु' पहा.
**हण** (ಹಣ) (क) ना.–धन; पैसा; द्रव्य; संपत्ति; सोन्याचें वजन.
**हणकु** (**णिकु**) (ಹಣಕು [ಣಿಕು]) (क) धा.–डोकावणें; निरीक्षण करणें; लपून पाहणें; चोरून पाहणें.
**—इकु** (ಇಕ್ಕು) (क) धा.–चोरट्या दृष्टीनें पाहणें.
**हणते** (ಹಣತೆ) (क) ना.–पणति.
**हणाहणि** (ಹಣಾಹಣಿ) (क) ना.–मारामारी; डोकेफोडी; हातघाईचें भांडण.
**हणि** (ಹಣಿ) (क) धा.–मारणें; ठोकणें; चोपणें; पात्र करणें.
**हणिगु** (ಹಣಿಗು) (क) धा.–आड राहून पाहणें; लपून पाहणें. युक्ति योजणें.
**हणिगे** (ಹಣಿಗೆ) (क) ना.–फणी; केळ्याचा फणा; मागाची फणी.
**हणित** (ಹಣಿತ) (क) ना.–पेट; ठोका; नाश; मार.
**हणिद** (ಹಣಿದ) (क) वि.–ठोका मारलेला. (क) ना.–ठोसा; ठोका; टोला; तडाखा; मार; पेट.
**हणिदवाडु** (ಹಣಿದವಾಡು) (क) धा.–चांगले सडकून काढणें; मारून मऊ करणें; चोपणें; घाव घालणें; ठोसा देणें.
**हणु** ( **णुं**) **गु** (ಹಣು [ಣುಂ] ಗು) (क) धा.–युक्ति करणें; युक्ति योजणें; डोकावून पाहणें.
**हणे** (ಹಣೆ) (क) ना.–कपाळ; वन्य पशूंचे राहण्याचे ठिकाण.
**हण्णरिवे** (ಹಣ್ಣರಿವೆ) (क) वि.–निःसत्त्व; वापरलेले. (क) ना.–जुने कापड; फाटके वस्त्र.
**हण्णु** (ಹಣ್ಣು) (क) धा.–सिद्ध करणें; तयार ठेवणें; सज्ज असणें; सुधारणें. (क) ना.–फळ; सुपरिणाम.
**हत** (ಹತ) (सं) वि.–दुर्दैवी; अगतिक; परदेशी; दुष्ट; अनाथ; पोरका.
**हतक** (ಹತಕ) (सं) वि.–निराश; निरुत्साही; उदास.
**हताश** (ಹತಾಶ) (सं) वि.–निराश; निरुत्साही; उदास.
**हताहति** (ಹತಾಹತಿ) (सं) ना.–खणाखणी; हातघाईचें भांडणें.
**हति** (ಹತಿ) (सं) ना.–पेट; मार; ठोसा; घाव; घात; हत्या; हिंसा; खून.

हतोटि (ಹತೋಟಿ) (क) वि.–हातीं आलेलें; आवाक्यांत आलेलें; मुठींत असलेलें; आधीन.
(क) ना.–अधिकार; पकड; हस्तचापल्य; हातचलाखी; जादू.
हत (ಹತ್ತ) (क) ना.–सामीप्य; जवळपणा; शेजार; समावेश; बाजू; हात; पक्ष.
हत्तकडकु (ಹತ್ತಕಡಕು) (क) ना.–कानातील दागिना; कर्णभूषण; कुडी.
हत्तडि (ಹತ್ತಡಿ) (क) ना.–रंधा; लाकूड साफ करण्याचें उपकरण.
हत्तरि (ಹತ್ತರಿ) (क) ना.–रंधा; तासणी.
हत्तळ (ಹತ್ತಳ) (क) ना.–तळहात; हस्ततळ; तळवा.
हत्ताहत्ति(ಹತ್ತಾಹತ್ತಿ) (क) ना.–झोंबाझोंबी; हातघाईचे भांडण.
हत्तिग (ಹತ್ತಿಗ) (क) ना.–आप्त; नातेवाईक; संबंधी. जुळणारा; जवळचा.
हत्ति(त्त)र (ಹತ್ತಿ [ತ್ತ] ರ) (क) अ.–जवळ; बाजूस; समीप.
हत्तुगडे (ಹತ್ತುಗಡೆ) (क) ना.–एकी; जूट; नाते; स्नेह; एकत्रीकरण.
हत्तु (ಹತ್ತು) (क) धा.–वर चढणें; उठणें; चिकटणें; जमवून येणें; आरंभणें; गुंतणें.
(क) ना.–दहासंख्या; नाते; आप्तपणा; जमवणूक.
हत्ते (ಹತ್ತೆ) (क) अ.–जवळ; लागून.
—सारू (ಸಾರು) (क) धा.–जवळ जाणें; लागून असणें; लगत राहणें.
हत्तेह (ಹತ್ತೆಹ) (क) ना.–जवळचा संबंध; मित्रत्व; नाते; बांधव्य.
हत्य(त्या)(त्ये)(ಹತ್ಯ [ತ್ಯಾ] ತ್ಯೆ) (क) ना.–खून; वध; नाश; प्राणघात.
हद (ಹದ) (क) वि.–धारदार; तीक्ष्ण; चपटा; निमूळता; टोकदार.
(क) ना.–योग्य समय; योग्य स्थान; अनुकूलस्थिति; पाड; पाडाचे फळ;
हदकार(गार) (ಹದಕಾರ [ಗಾರ]) (क) ना.–रुचि जाणणारा; अनुभविक; जाणकार.
हदगाल (ಹದಗಾಲ) (क) ना.–अनुकूल समय; प्रयत्नाला यश येण्याची वेळ; कार्यानुकूल काल; आवश्यकता.
हदगोडि (ಹದಗೇಡಿ) (क) ना.–हातीं येणारें फळ बिघडविणारा; कुलकंटक.
हदडु (दिरु) (ಹದಡು [ದಿರು]) (क) ना.–हात, मनगट; मणिबंध; कणा.
हदन (ಹದನ) (क.)–वि. धारदार; योग्य; उचित; साजेसा.
(क) ना.–बातमी; समाचार; रीति; प्रसंग; समय; धार.

हदनु (ಹದನು) (क) ना.–क्रम, परिस्थिति; अनुकूलता.
हदरु (ಹದರು) (क) धा.–सोडणें; उलगडणें.
(क) ना.–अतिकोमल वस्तु; कोवळे फळ; तोर; मिडी; मनगट.
हदि (ಹದಿ) (क) धा.–खड्डा खणणें; खळगा करणें.
(क) ना.–पाया; आधार; पति.
—तळहदि (ತಳಹದಿ) (क) ना.–पाया; बुनियाद; आधार.
हदिटे (ಹದಿಟೆ) (क) ना.–प्रतिष्ठा; ; अहंकार; कीर्ति; स्थापना; पाया भरणी.
हदिबदे (ಹದಿಬದೆ) (क) ना.–पतिव्रता; साध्वी.
हदिरू (ಹದಿರು) (क) ना.–मनगट; उघडलेला हात; रीत; पद्धत. तोर; मिडी; कोवळे फळ; हंगवणी; टोमणा.
हदुगु (ಹದುಗು) (क) धा.–वाकणें; उपमा देणें; तुलना करणें; मार्ग मोकळा करणें; दूर सरणें.
हदुळ (ಹದುಳ) (क) ना.–सुख; क्षेम; कल्याण; शुभ.
—इरु (ಇರು) (क) धा.–सुखानें राहणें.
हदुळिसु (ಹದುಳಿಸು) (क) धा.–आरामीनें राहणें; सुखात राहणें.
हदुळिग (ಹದುಳಿಗ) (क) ना.–आनंदांत राहणारा; सुखजीवि; खुशालचेंडू; सुखवस्तु; घरचें पाहून राहाणारा.
हद्दु (ಹದ್ದು) (क) ना.–गृध्र; गिधाड; गरुड; तीक्ष्ण दृष्टीचा पक्षी. 'पर्दु' पहा. सीमा; मर्यादा; सरहद्द; शीव.
—कण्णु (ಕಣ್ಣು) (क) ना.–तीक्ष्ण दृष्टि; आशाळभूताची दृष्टि.
हनन (ಹನನ) (सं) ना.–खून; वध; नाश; घाय; घाव; जखम.
हनसु (ಹನಸು) (क) ना.–फणसाचे झाड; फणस; वेदांतील एक भाग; पद्य; कविता.
हनि (ಹನಿ) (क) धा.–पाणी सुटणें; पाझरणें; ठिबकणें; ओले होणें.
(क) ना.–थेंब; बिंदु; ठिपका.
हनु (नू) (ಹನು [ನೂ]) (सं) ना.–दाढी; हनुवटी.
हनुकु (ಹನುಕು) (क) धा.–ठिबकणें; थेंबाथेंबानें पाझरणें; गळणें; ओसरणें.
हनु (नू) मत् (ಹನು[ನೂ]ಮತ್) (सं) ना.–लांब हनुवटी असलेला. आंजनेय.
हनुमंत (ಹನುಮಂತ) (सं) ना.–हनुमान; मारुती.
हंत (ಹಂತ) (क) ना.–पायरी; सोपान; जिना; शिडी.
हंतक (ಹಂತಕ) (सं) वि.–खुनी; खून करणारा; वध करणारा.
हंतव्य (ಹಂತವ್ಯ) (सं) वि.–मारण्यास योग्य; वध्य; मृत्यू-येण्याजोगा.
हंति (ಹಂತಿ) (क) ना.–पंक्ति; ओळ; जेवणाची पंगत; पायऱ्या; जिना; सोपान.

हंतिकट्टु (ಹಂತಿಕಟ್ಟು) (क) धा.–बैलांची ओळ लावणें.

हंतिदेर (ಹಂತಿದೇರ) (क) ना.–दशरथ.

हंतृ (ಹಂತೃ) (सं) वि.–खून करणारा; घातकी; ठार करणारा.

हंते (ಹಂತೆ) (क) ना.–दर्प; दंभ; अहंकार.

हंदर् (र) (रु) (ಹಂದರ್ [ರ] ರು) (क) ना.–मंडप; छप्पर. मांडव.

हंदि (ಹಂದಿ) (क) ना.–डुक्कर; सूकर; वराह.

हंदु (ಹಂದು) (क) धा.–हलणें; कंप पावणें. थरथरणें; चलन होणें.

हंदे (ಹಂದೆ) (क) वि.–भीरु; भीक; नपूंसक; भ्याड; नेभळा.

हंदोगलु (वलु) (ಹಂದೊಗಲು [ವಲು]) (क) ना.–ओलें चामडे.

हन्निब्बरु (ಹನ್ನಿಬ್ಬರು) (क) ना.–बारा लोक.

हप्ते (ಹಪ್ತೆ) (अ.दे) ना.–आठवडा; सात दिवस; जमिनीचा कर; भूभाडें; फाळा.

हप्पळ (ळे) (ಹಪ್ಪಳ [ಳೆ]) (क) ना.–पापड; पोपडा; कागद; फरशी.

हप्पुकळ (ಹಪ್ಪುಕಳ) (क) ना.–प्रेत खाणारे; गिधाड; रण-गिधाड.

हब्ब (ಹಬ್ಬ) (क) ना.–सण; पर्व; उत्सवकाळ; यात्रा; प्रसंग.

हब्बू (ಹಬ್ಬು) (क) ना.–विस्तार; प्रसार; परण; वाढ; रुंदी.

हब्बूगे (ಹಬ್ಬುಗೆ) (क) ना.–वाढ; पसरण; प्रसार; विस्तार.

हंबल (लु) (ಹಂಬಲ [ಲು]) (क) ना.–इच्छा; आकांक्षा; आतुरता; चिंता; आसक्ति; निदिध्यास.

हंबु (ಹಂಬು) (क) ना.–वेली; लता; वाढ; पडजमीन; नापीक भूमी.

हमाल (ಹಮಾಲ) (अ.दे) ना.–कुली; मजूर; ओझेकरी; भार वाहणारा; हेलकरी.

हमालि (ಹಮಾಲಿ) (अ.दे) ना.–मजूरी; मजूरीचें काम; मजूरीचा पैसा; कामाचें दाम.

हम्मद (ಹಮ್ಮದ) (क) ना.–प्रमाद; चूक; मूर्छा; भ्रम; विस्मृति.

हम्मायिसु (म्मु) (ಹಮ್ಮಾಯಿಸು [ಯ್ಯು]) (क) धा.–भान हरपणें; विस्मृति होणें; मूर्छित होणें; इच्छिणें.

हम्मि (म्मु) गे (ಹಮ್ಮಿ [ಮ್ಮು] ಗೆ) (क) ना.–कांड्या भरण्याच्या रहाटाची फळी.

हम्मु (ಹಮ್ಮು) (क) धा.–कामाला प्रारंभ करणें; सुरवात करणें; कामाला हात घालणें; दोर वळणें; विणणें.

(क) ना.–मस्ती; माज; गर्व; अहंकार; दंभ; दर्प.

हम्मुगे (ಹಮ್ಮುಗೆ) (क) ना.–दोर; पीळ घातलेली दोरी.

हय (ಹಯ) (सं) ना.–अश्व; घोडा; एक वाद्य.

—ग्रीव-वदन (ಗ್ರೀವ-ವದನ) (सं) ना.–विष्णूचा अवतार; तुंबरु; दैत्य; गव्हाची खीर.

हयन (नु) (ಹಯನ [ನು]) (क) ना.–गाईम्हशीचें दूधदुभतें; गोरस; दुभतें जनावर.

हयवल्गन (ಹಯವಲ್ಗನ) (सं) ना.–घोड्याची चाल; अश्वगति विशेष.

हयिलु (ಹಯಿಲು) (क) ना.–चट; आसक्ति; ओढ; तल्लीनता; घाबरेपणा; गोंधळ.

हय्कळु, (हैकळु) (ಹಯ್ಕಳು[ಹೈಕಳು]) (क) ना.–पोरबाळ;

हय्द (हैद) (ಹಯ್ದ [ಹೈದ]) (क) ना.–पोर; बाळ; अज्ञ; खेडवळ; अशिक्षित; अडाणी.

हर (ಹರ) (सं) ना.–भक्ताचे पालन करणारा; शिव परमात्मा; अपहार करणारा; नेणारा; वाहणारा; उपटणारा.

(क) वि.–रुंद; विस्तृत.

हरकत्तु (ಹರಕತ್ತು) (अ.दे.) ना.–हरकत; आडकाठी; अडचण; विरोध; अगत्य.

हरकरिसु (ಹರಕರಿಸು) (क) धा.–एकत्रित होणें; एकवटणें.

हरके (ಹರಕೆ) (क) ना.–आशीर्वाद; शुभाशीर्वाद; प्रार्थना.

—कट्टु (ಕಟ್ಟು)(क) धा.–प्रार्थणें; मानून घेणें; मागणी घालणें.

—कोडु (ಕೊಡು) (क) धा.–आशीर्वाद देणें; 'चांगलें होवो' असें म्हणणें.

हरगण (ಹರಗಣ) (सं) ना.–शिवगण; शिवाचा सेवक; भक्त.

हरगलु (गोलु) (ಹರಗಲು [ಗೋಲು]) (क) ना.–नदीपार होण्याचें साधन; सांगड; होडी.

हरगु (ಹರಗು) (क) धा.–फेकणें; जमीन साफ करणें; मशागत करणें.

ह (प) रचु (ಹ [ಪ] ರಚು) (क) धा.–हातानें खाजवणें; ओरबडणें; ओचकारणें; दृष्टिआड करणें.

हरटु (ಹರಟು) (क) धा.–बेचव बोलणें; अर्थहीन बडबडणें; गप्पा मारणें; अहंकारानें बोलणें; गर्व करणें.

हरटे (ಹರಟೆ) (क) ना.–गप्पा; व्यर्थ आलाप; पोचट भाषा; गोष्टीवेल्हाळपणा.

हरड (डु) (ಹರಡ [ಡು]) (क) ना.–पायाचा घोटा.

हरडि (ಹರಡಿ) (क) ना.–करकोचा; हरडीकंकण नामक दागिना; एक खाद्यवस्तु.

हरडु (ಹರಡು) (क) धा.–सोडवणें; रुंद करणें; वाढवणें; लावणें; बोटानें उकरणें; खड्डा पाडणें.

हरण (ಹರಣ) (क) ना.–प्राण; जीव.

(सं) ना.–उन्मूलन; अपहार; चोरी; खून; प्रवाहन

हरताळ (ಹರತಾಳ) (सं) ना.–हर्ताळ; पिवडी.

(अ. दे) ना.–टाळेबंदी 'हड्ताल' पहा-

**ह(प)रद्** (ಹ [ಪ] ರದ) (क) ना.–व्यापारी; वैश्य; वर्तक.
**हरदिके** (ಹರದಿಕೆ) (क) ना.–व्यापार; वाणिज्य.
**हरदु** (ಹರದು) (क) ना.–व्यापार; व्यवहार; वाणिज्य.
**हरदे** (ಹರದೆ) (क) ना.–पत्नी; भार्या.
**हरबीज** (ಹರಬೀಜ) (सं) ना.–शिवभक्त; वीरशैव.
**हर(रै)य** (ಹರ [ರೈ] ಯು) (क) वि. ना. तारुण्य; वय; यौवन; वयांत आलेला.
**हरवडि (रि)** (ಹರವಡಿ [ರಿ]) (क) ना.–प्रदर्शन; प्रगटन; जमीन; निवास.
**हरवस** (ಹರವಸ) (क) ना.–मूर्छा; स्वाधीनता; प्रमाद; परतंत्रता; अत्याशा.
**हरवालिसु** (ಹರವಳಿಸು) (क) धा.–होरपळणें; दुःखित होणें; श्रम होणें.
**हरवि** (ಹರವಿ) (क) ना.–मातीची घागर; मातीचें भांडें; घडा.
**हरवु** (ಹರವು) (क) धा.–सोडणें; रुंद करणें.
(क) ना.–रुंदी; विस्तार; चीरफाड.
**हरसु** (ಹರಸು) (क) धा.–आशीर्वाद देणें; वर देणें.
**हरहु** (ಹರಹು) (क) धा.–वाहून जाणें; पुढे सरणें; चाचपडणें; रुंद करणें; सोडणें.
(क) ना.–रुंदी; विस्तार; प्रवाह.
**हरळ् (ळु)** (ಹರಳ್ [ಳು]) (क) ना.–खडा; गोटा; मणी. रत्न; एरंड.
**हराम** (ಹರಾಮು) (अ.दे) ना.–श्रम न करतां खाणें; आलस्य.
**हरि** (ಹರಿ) (क) धा.–लौकर जाणें; पळणें; वाहणें; तुकडे करणें; चिरणें; फाडणें; उपटणें; आसावणें; घासणें; वापरणें.
(क) ना.–विष्णु; ब्रह्म; इंद्र; सूर्य; चंद्र; यम; वायु; अग्नि; किरण; जल; समुद्र; सिंह; घोडा; सर्प; हंस; पोपट; बेडुक; सकाळ; सोने; पाट; बाण; भूखंड.
**हरिकथे** (ಹರಿಕಥೆ) (सं) ना.–पुराणातील देवकथा; कीर्तन; विष्णुकथा.
**हरिकार** (ಹರಿಕಾರ) (सं) ना.–बातमीदार; जासूद; गुप्तचर; अग्रदूत.
**हरिके** (ಹರಿಕೆ) (क) ना.–देवाजवळ मागणी; प्रतिज्ञा; इच्छा; आकांक्षा.
**हरिगडि (डियु)** (ಹರಿಗಡಿ [ಡಿಯು]) (क) धा.–प्रवाह; थांबणें; प्रवाहाला अडथळा येणें.
**हरिगवि** (ಹರಿಗವಿ) (क) ना.–क्षुद्र कवि; व्यर्थ गर्व करणारा.
**हरिगे** (ಹರಿಗೆ) (क) ना.–ढालफलक; ढाल.
**हरिगोलु** (ಹರಿಗೋಲು) (क) ना.–सांगड; तरी.
**हरिचंदन** (ಹರಿಚಂದನ) (सं) ना.–श्रीगंध; पिवळा रंग.
**हरिण** (ಹರಿಣ) (सं) ना.–मृग; काळवीट; पांढरा रंग.
**हरिणधर** (ಹರಿಣಧರ) (सं) ना.–चंद्र; मृगांक.
**हरिणांक** (ಹರಿಣಾಂಕ) (सं) ना.–चंद्र.
**हरिणाक्षि** (ಹರಿಣಾಕ್ಷಿ) (सं) वि.–सुंदरी; मृगनयना.
**हरिणालिगे** (ಹರಿಣಾಳಿಗೆ) (क) ना.–प्रणालिका; पन्हाळी;
**हरिणि (णी)** (ಹರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–मृगी.
**हरित** (ಹರಿತ್) (सं) ना.–हिरवा रंग.
(क) ना.–प्रवाह; पाणी भरणें; चीरफाड;
(क) वि. तीक्ष्ण; टोकदार.
**हरितरु** (ಹರಿತರು) (क) धा.–वेगानें पळत येणें; निभावून घेणें.
**हरिताल** (ಹರಿತಾಲ) (सं) ना.–हळद; पिवडी; पिवळा रंग; एक रसद्रव्य; अष्टगंध.
**हरिदश्व** (ಹರಿದಶ್ವ) (सं) ना.–सूर्य.
**हरिदास** (ಹರಿದಾಸ) (सं) ना.–विष्णुभक्त; कीर्तन-कार.
**हरिदिक्** (ಹರಿದಿಕ್) (सं) ना.–प्राची; पूर्व; उगवती; इंद्राची दिशा.
**हरिदिन** (ಹರಿದಿನ) (सं) ना.–एकादशी तिथि.
**हरिद्र (द्रा)** (ಹರಿದ್ರ [ದ್ರಾ]) (सं) ना.–हळद; सुवासिनीचे चिन्ह; लेपनद्रव्य.
—**आकांक्षिणी** (ಆಕಾಂಕ್ಷಿಣಿ) (सं) ना.–सौभाग्यकांक्षिणी; सुमंगला.
**हरिद्वार** (ಹರಿದ್ವಾರ) (सं) ना.–गंगेवरील यात्रास्थान.
**हरिनंदन** (ಹರಿನಂದನ) (सं) ना.–इंद्रपुत्र; अर्जुन.
**हरिनील** (ಹರಿನೀಲ) (सं) ना.–इंद्रनील.
**हरिपद** (ಹರಿಪದ) (सं) ना.–आकाश; विष्णुपाद.
**हरिपीठ** (ಹರಿಪೀಠ) (सं) ना.–सिंहासन
**हरिब** (ಹರಿಬ) (क) ना.–कार्य; संबंध; अडचण; युद्ध.
**हरिबकार** (ಹರಿಬಕಾರ) (क) ना.–छातीठोक भांडणारा; समरपटु; युद्धवीर.
**हरिमय** (ಹರಿಮಯ) (सं) वि.–सुवर्णमय; सोन्याचे केलेलें.
**हरिमुरि** (ಹರಿಮುರಿ) (क) ना.–झीज; क्षय; वापरानें होणारी तूटफूट.
**हरिमेखला (ले)** (ಹರಿಮೇಖಲಾ [ಲೆ]) (सं) ना.–मायाविद्या; इंद्रजाल; सोन्याचा कमरपट्टा;
**हरियक्ष (र्यक्ष)** (ಹರಿಯಕ್ಷ [ರ್ಯಕ್ಷ]) (क) ना.–सिंह; केसरी.
**हरिय (या) ण** (ಹರಿಯ [ಯಾ] ಣ) (सं) ना.–गंगाळ; ताम्हण; परडी.
**हरिवाण** (ಹರಿವಾಣ) (क) ना.–'हरियण' पहा. गंगाळ; परडी. ताम्हण.
**हरिविष्टर** (ಹರಿವಿಷ್ಟರ) (सं) ना.–सिंहासन; राजपीठ; राजाचे आसन.

हरिवु (ಹರಿವು) (क) ना.—प्रवाह; रुंदी; पुढें चाल; पुरोगमन. विभाजन; चीरफाड; संबंध टाळणें.
हरिशिले (ಹರಿಶಿಲೆ) (सं) ना.—मरकत; पाच; शाळिग्राम.
हरिसु (ಹರಿಸು) (क) ना.—हर्ष; संतोष; आनंद; उत्साह; उत्सव.
हरिसु (ಹರಿಸು) (क) धा.—अपहार करणें; उपटणें; लुटणें; नागवणें; नकळत उचलणें; घेऊन जाणें; घाबरवणें; बसवणें; सुटका करणें; पुढें जाण्यासारखे करणें.
हरिसुलिगे (ಹರಿಸುಲಿಗೆ) (क) ना.—हल्ला करून केलेली लूट; दरोडा.
हरिसूनु (ಹರಿಸೂನು) (सं) ना.—इंद्रपुत्र; अर्जुन; जयंत; वाली.
हरिहय (ಹರಿಹಯ) (सं) ना.—देवराज; इंद्र
हरिहर (ಹರಿಹರ) (सं) ना.—शिव, विष्णु यांची एकरूप देवता.
हरिहंचु (ಹರಿಹಂಚು) (क) धा.—तुकडे वाटणें; चूर होणें.
हरिक (ಹರಿಕ) (क) वि.—वाहून गेलेले; गरीब; निराधार.
हरुगल् (ಹರುಗಲ್) } (क) ना.—नाव; होडी; सांगड; तरी.
हरुगोलु (ಹರುಗೋಲು) }
हरुवु (ಹರುವು) (क) ना.—मार्ग; वाट; युक्ति; योजना; माप; रुंदी.
हरुष (ಹರುಷ) (क) ना.—हर्ष; संतोष; उत्साह; संभ्रम; आनंद.
हरे (ಹರೆ) (क) धा.—वाढणें; रुंद होणें; पुढें सरकणें; भिणें. (क) ना.—चर्मवाद्य; नगारा; भेरी; दुंदुभी; नाद; आवाज.
हरेगडि (ಹರೆಗಡಿ) (क) धा.—उधळून लावण्यासाठीं पाठलाग करणें; मारून पळवून लावणें.
हरेगडिसु (ಹರೆಗಡಿಸು) (क) धा.—माराच्या भयानें पळ काढणें; रागाच्या भरांत अंगावर कोठेहि मारखात पळणें.
हरेतेगे (ಹರೆತೆಗೆ) (क) धा.—पाय मागे घेणें; घाबरणें.
हरेय (ಹರೆಯ) (क) वि.—तरुण; वयात आलेला; तारुण्यानें मुसमुसणारा.
हर्ता (तृ) (ಹರ್ತಾ [ರ್ತೃ]) (सं) वि.—अपहरण करणारा; उपटून टाकणारा; हिसकावून घेणारा; विनाशक.
हर्म्य (ಹರ್ಮ್ಯ) (सं.) ना.—वाडा; राजवाडा; भुयार; रंगीत भव्य घर.
हर्यक्ष (ಹರ್ಯಕ್ಷ) (सं.) ना.—सिंह; केसरी; मृगेंद्र
हर्ष (ಹರ್ಷ) (सं.) ना.—संतोष; आनंद; उत्साह; रोमांच; अंगावरील काटा. एक उत्तरभारतीय कवि; सम्राट.
हर्षाश्रु (ಹರ್ಷಾಶ್ರು) (सं) ना.—आनंदाश्रु.
हल् (ल्लु) (ಹಲ್ [ಲ್ಲು]) (क) ना.—रदन; दंत; दात; अरा; शिडीची पायरी; चक्राचा दुमडलेसा कांठ; धाक.
हल (ಹಲ) (सं) ना.—नांगर, औत; तीन तोळ्यांचे वजन; नांगल
(सं) वि.—कित्येक; अनेक; पुष्कळ.
हलकु (ಹಲಕು) (क) धा.—झाडावर चढणें; वर चढणें. (क) ना.—गालाचा खालचा भाग.
हलगे (ಹಲಗೆ) (क) ना.—फलक, फळी; फळा; मृदंग.
हलधर (ಹಲಧರ) (सं) ना.—बळराम; बैल; रामचंद्र.
हल (लं) (बर्) (ಹಲ [ಲಂ] ಬರ್) (क). ना.—कैकजण; कित्येक लोक; पुष्कळ जन
हलवंग (ಹಲವಂಗ) (सं) वि.—सांगोपांग; सर्व बाजूंनीं विचार केलेले.
हलवंद (ಹಲವಂದ) (क) वि.—अनेक रीतीचे; हरतऱ्हेचे; विविध प्रकारचे.
हलसिग (ಹಲಸಿಗ) (क) ना—विनोद करणारा; ढोंगी; विदूषक;
हलसु (ಹಲಸು) क. ना.—फणस; फणसाचे झाड.
हलायुध (ಹಲಾಯುಧ) (सं) ना.—बलराम; रामचंद्र.
हलाहल (ಹಲಾಹಲ) (सं) ना.—कालकूट; भयंकर विष.
हलि (ಹಲಿ) (सं) ना. बलराम; रामचंद्र
हलि (ल) वुलि (ಹಲಿ [ಲ] ವುಳಿ) (क) धा.—गर्भपात होणें; दिवस न भरतां बाळंत होणें.
हलु (ಹಲು) (क) ना.—दात; दंत; रदन.
हलुहरचु (ಹಲುಹರಚು) (क) धा.—दांत खाणें; दात चावणें; रागावणें.
हलु (लुं) बु (ಹಲು [ಲುಂ] ಬು) (क) धा.—एकाच गोष्टीचा ध्यास धरणें; स्वप्न पडणें; स्वप्नांत बडबडणें; दया येणें; कळवळा येणें; मन विरघळणें; रोडणें; दुःखित होणें; जळफळणें.
हला (हले) (ಹಲಾ [ಹಲೆ]) (सं) ना.—अति जहर; तीव्र विष; उत्तम मद्य; जल; भूमि.
हल्लक (ಹಲ್ಲಕ) (क) ना.—तांबडें कमल; सोनकमळ.
हल्लण (ಹಲ್ಲಣ) (क) ना.—घोड्याचे जीन; थडी; गाशा.
हल्लणिसु (ಹಲ್ಲಣಿಸು) (क) धा.—जीन चढवून बैठकीला घोडा वा हत्ती तयार करणें; चालू ठेवणें; पुढें चालणें.
हल्लन (ಹಲ್ಲನ) (सं) ना.—झोपेत कूस बदलणें; लोळकण.
हल्ला(ल्ले) (ಹಲ್ಲಾ [ಲ್ಲೆ]) (अ. दे.) ना.— घेरा; वेढा; लूट
ह (प)ल्लि (ಹ [ಪ] ಲ್ಲಿ) (क) धा.—दात असलेला; गवळण; पाल.
हल्लु (ಹಲ್ಲು) (क) ना.—दात; दाता; चाकाचा अरा; शिडीची पायरी; गाडीची धाव.
हवण् (णु) (ಹವಣ್ [ಣು]) (क) ना—प्रमाण; मिती; सारखेपणा; अनुकूलता; योग्यता; योग्यसमज; पुरावा; अनुकूल संदर्भ.
हवणिके (ಹವಣಿಕೆ) (क) ना.—युक्ति; आलोचना; आकांक्षा; मागणी; शाकारणी.

**हवणिगे** (ಹವಣಿಗೆ) (क) ना.—जुळणूक; दान; ओवणें.
**हवणिसु** (ಹವಣಿಸು) (क) धा.—युक्ति योजणें; विचार करणें; उत्तेजणें; आलोचणें; आच्छादणें; वाट पाहणें; तयार ठेवणें; ओवणें.
**हवणु** (ಹವಣು) (क) ना—प्रमाण; माप; रीति; अनुकूलता; सिद्धता.
**हवन** (ಹವನ) (सं) ना.—यज्ञ; होम; याग; आहुति.
**हवळ** (ಹವಳ) (क) ना—प्रवाळ; तांबड्या रंगाचे रत्न; विद्रुम.
**हवालि** (ಹವಾಲಿ) (अ.दे.) ना.—जामीन; प्रतिभू; जबाबदार; हवाला घेणारा.
**हवि(विस्सु) विस्** (ಹವಿ [ವಿಸ್ಸು] ವಿಸ್) (सं) ना.—यज्ञातील अग्नीत घालण्याची आहुति; हवी.
**हविर्भाग** (ಹವಿರ್ಭಾಗ) (सं.) ना.—चरु; आहुति; यज्ञार्पित पदार्थ.
**हव्य** (ಹವ್ಯ) (सं) ना.—हवनीय वस्तु; नैवेद्य; तूप; सण
**हव्यकव्य** (ಹವ್ಯಕವ್ಯ) (सं) ना.—देव व पितर यांना अर्पिलेले अन्न.
**हव्यवाह (हन)** (ಹವ್ಯವಾಹ [ಹನ]) (सं) ना.—अग्नि; आग
—**सख** (ಸಖ) (सं) ना.—वायु
**हव्यास** (ಹವ್ಯಾಸ) (आ) ना.—अत्याशा; चट; आकांक्षा; उत्कटेच्छा.
**हव्वने** (ಹವ್ವನೆ) (क) अ—एकदम; बहुतेक; घाबरे होऊन.
—**हारि** (ಹಾರಿ) (क) अ.—भान हरपून; भ्रम होऊन.
**हव्वने हारु** (ಹವ್ವನೆಹಾರು) (क) धा.—घाबरणें; दचकणे; एकदम उठणे; वेरी येऊन पडणे.
**हस** (ಹಸ) (क) ना—स्वच्छता; निर्मलता; व्यवस्था; चांगुलपणा; सौंदर्य; निवसन; राहणी; पद्धति.
**हसत्** (ಹಸತ್) (सं) वि.—हसणारा; उघड्या मनाचा; वाढलेला.
**हसन्** (ಹಸನ್) (सं) वि.—हसत राहणारा.
—**मुख** (ಮುಖ) (सं) ना.—हास्यवदन; तेजस्वी चेहरा; कळा असलेले तोंड.
**हसन (नु)** (ಹಸನ [ನು]) (क) ना.—मनोहरता; स्वच्छता; शिस्त; 'हस' पहा.
**हसर** (ಹಸರ) (क) ना.—प्रसर; पसारा; उघड्यावरील दुकान.
**हसरिसु** (ಹಸರಿಸು) (क) धा.—पसरणें; वाढणें; फोफावणें.
**हसले** (ಹಸಲೆ) (क) ना.—हिरवे गवत; कुरण; गवतराखण.
**हसाद** (ಹಸಾದ) (क) ना.—प्रसाद अनुकरण; आज्ञा; वर.
**हसि** (ಹಸಿ) (क) धा.—भूक लागणें; पोट मोकळे होणें; पोटांत कावळे उठणें.
(क) वि.—अपक्व; कोवळे; कच्चे; ओले.

**हसि (सु) गे** (ಹಸಿ [ಸು] ಗೆ) (क) ना.—वाटणी; वाटा; भाग.
**हसित** (ಹಸಿತ) (सं) वि.—हसे केलेले; उमललेले; वाढलेले स्मित.
(सं) ना.—हास्य; हसे.
**हसितले** (ಹಸಿತಲೆ) (क) ना.—रुंड; नुक्तेंच कापलेलें डोके; 'पंदले' पहा.
**हसिबे** (ಹಸಿಬೆ) (क) ना.—प्रसेव; प्रसेवक; पोते; दुहेरी पिशवी; पखाल; बुदला; भाता; ध्वनिवर्धक उपकरण.
**हसिवु** (ಹಸಿವು) (क) अ.—भूक; आवश्यकता; आकांक्षा; आतुरता; आसक्ति.
**हसु** (ಹಸು) (क) ना.—गाय; वसु; पशु; बालिश बुद्धि.
(क) वि.—लहान; कोवळा; कोमल.
—**कूसु** (ಕೂಸು) (क) ना.—अर्भक; बालक; शिशु.
**हसुकु** (ಹಸುಕು) (क) ना.—ओलेपणा; कच्चेपणा; उग्रवास.
**हसुगे** (ಹಸುಗೆ) (क) ना.—एका दिवसाची धान्यरूपानें मिळणारी मजुरी; वाटणी; विभाग; वाटा.
**हसु (सुं) बे** (ಹಸು [ಸುಂ] ಬೆ) (क) ना.—प्रसेव; प्रसेवक; पोते; पिशवी; पखाल; बुदला; भाता; ध्वनिवर्धक उपकरण.
**हसुळ (ळे)** (ಹಸುಳ [ಳೆ]) (क) ना.—तान्हुला; लहान मूल; बालक; पुत्र.
**हसे** (ಹಸೆ) (क) ना.—अंथरूण; हातरी; चटई; वधूवरांना बसण्यासाठी शृंगारलेलें आसन; बोहलें; पलंग.
**हसेनिल्** (ಹಸೆನಿಲ್) (क) वि.—बोहल्यावर चढणें; लग्नाला तयार होणें.
**हसेमणे** (ಹಸೆಮಣೆ) (क) ना.—चौरंग; वधुवरांनी बसण्याचा पाट.
—**हत्तु** (ಹತ್ತು) (क) धा.—बोहल्यावर चढणें; लग्नाला तयार होणें.
**हस्त** (ಹಸ್ತ) (सं) ना.—हात; सोंड; एक हाताचें माप; एक नक्षत्र; शेजार.
—**चापल्य** (ಚಾಪಲ್ಯ) (सं) ना.—चोरी; चौर्य. हातचलाखी; इंद्रजाल; माया विद्या.
**हस्तक** (ಹಸ್ತಕ) (सं) ना.- दैनंदिनी; वासरी; सांगकाम्या; आधीन राहणारा.
**हस्तकौशल्य** (ल)(ಹಸ್ತಕೌಶಲ್ಯ [ಲ]) (सं) ना. हातचलाखी; चोरी; चौर्य.
**हस्तगत** (ಹಸ್ತಗತ) (सं) वि.—हातीं आलेले; प्राप्त झालेले; मिळालेले.
**हस्तत्राण** (ಹಸ್ತತ್ರಾಣ) (सं) ना.—हात मोजे; लोखंडी हात मोजे.
**हस्तगुण** (ಹಸ್ತಗುಣ) (सं) ना.—हातगुण; हाताला येणारे यश.

**हस्तदोष** (ಹಸ್ತದೋಷ) (सं) ना.–वाईट हात; अक्षरस्खलन; हाताचे अपयश.

**हस्तपरीक्षे** (ಹಸ್ತಪರೀಕ್ಷೆ) (सं) ना.–सामुद्रिक; हस्तरेषेवरून सांगितलेले भविष्य.

**हस्तप्रति** (ಹಸ್ತಪ್ರತಿ) (सं) ना.–हस्तलिखित; ग्रंथाची हस्तलिखित प्रत.

**हस्तलाघव** (ಹಸ್ತಲಾಘವ) (सं) ना.–हस्तकौशल्य; हस्तचापल्य.

**हस्ताक्षर** (ಹಸ್ತಾಕ್ಷರ) (सं) ना.–हातानें लिहलेलें; करलेखन; अक्षरवळण; हस्तलेख.

**हस्तांतर** (ಹಸ್ತಾಂತರ) (सं) ना.–हातबदल, एका हातांतून दुसऱ्या हातीं जाणें.

**हस्ति (स्तिन्)** (ಹಸ್ತಿ[ಸ್ತಿನ್]) (सं) ना.–गज; हत्ती; सोंड असलेला; गणपती.

**हस्तिदंत** (ಹಸ್ತಿದಂತ) (सं) ना.–हत्तीचा दात.

**हस्तिन (ना) पूर** (ಹಸ್ತಿನ [ನಾ] ಪೂರ) (सं) ना.–पांडवांनी वसविलेले शहर; पांडवांची राजधानी.

**हस्तिनि (नी)** (ಹಸ್ತಿನಿ[ನೀ]) (सं) ना.–हत्तीण; रूपवती स्त्रियांची एक जाती.

**हस्तिप (क)** (ಹಸ್ತಿಪ [ಕ]) (सं) ना.–माहुत; हत्ती पाळणारे.

**हस्तोदक** (ಹಸ್ತೋದಕ) (सं) ना.–संतर्पणाच्या वेळी हातावर सोडलेलें पाणी; अर्पण.

**हस्त्यारोह** (ಹಸ್ತ್ಯಾರೋಹ) (सं) ना.–माहुत; गजारोही; गजस्वार.

**हळ (ळतु)** (ಹಳ [ಳತು]) (क) वि.–जुना; प्राचीन; वृद्ध; म्हातारा; दिवसगत झालेला; उतारवयाचा.

**ह (प) ळकु** (ಹ[ಪ] ಳಕು)(क) ना.–स्फटिक; चूर; कण; तुकडा.

**हळचिके** (ಹಳಚಿಕೆ) (क) ना.–उजेड; कांती; लकाकी; ओप; झळाली; हल्ला.

**हळ (ळं) चु** (ಹಳ [ಳಂ] ಚು) (क) धा.–हल्ला करून मारणें; समोरासमोर मारणें; भांडणें; विरोध करणें; कंटाळणें.

**ह (प) ळमे** (ಹ [ಪ] ಳಮೆ) (क) धा.–जुनाटपणा, प्राचीनता; वृद्धापकाळ.

**हळयिगे** (ಹಳಯಿಗೆ) (क) ना.–निशाण; बाहुटा; ध्वज; रथावरील ध्वज.

**हळवंड** (ಹಳವಂಡ) (क) ना.–निदिध्यास; आकांक्षा; तन्मयता; कळवळ; 'हळवंद' पहा.

**हळव (ह) ळिसु** (ಹಳವ [ಹ] ಳಿಸು) (क) धा.–रडणें; पश्चात्ताप करणें; आतुरणें; इच्छिणें.

**हळवातु** (ಹಳವಾತು) (क) ना.–वेद; वगैरे पुरातन ग्रंथ.

**हळवि (यि) गे** (ಹಳವಿ [ಯಿ] ಗೆ) (क) ना.–रथावरील; निशाण; बावटा.

**हळसु** (ಹಳಸು) (क) धा.–कंटाळणें; दुर्वासना उत्पन्न होणें.

**हळहळि** (ಹಳಹಳಿ) (क) ना.–पश्चात्ताप; हळहळ; आतुरता; आकांक्षा.

**हळि** (ಹಳಿ) (क) धा.–निंदणे; दोष देणें; हिणविणें; चहाडी सांगणें; दुर्वच करणें.
(क) ना.–चाकाचा तुंबा; रेल रूळ.
(सं) ना.–बलराम; हलधर.

**हळिग** (ಹಳಿಗ) (क) ना.–भृंगी; शिवगणातील एक.

**हळिय** (ಹಳಿಯ) (क) ना.–सेवक; चाकर; नोकर; मजूर.

**हळिवु** (ಹಳಿವು) (क) ना.–चहाडी; निंदा; दुर्वचन; दुष्कीर्ति; कलंक; दुर्लौकिक.

**हळुव(वु)** (ಹಳುವ [ವು]) (क) ना.–जंगल; अरण्य; वन.

**हळुवर** (ಹಳುವರ) (अ.दे) ना.–सूक्ष्मता; कोमलता.

**हळे(ळेय)** (ಹಳೆ [ಳೆಯ]) (क) वि.–जुनाट; प्राचीन; दिवसगत झालेले.

**हळेनुडि** (ಹಳೆನುಡಿ) (क) ना.–पुराण; वेद; प्राचीन ग्रंथ; जुने वचन.

**हळेनोग** (ಹಳೆನೊಗ) (क) ना.–दास; सेवक; नोकर.

**हळेवातु** (ಹಳೆವಾತು) (क) ना.–प्राचीन ग्रंथ.

**हळ्ळिगाड (डु)** (ಹಳ್ಳಿಗಾಡ [ಡು]) (क) वि.–असंस्कृत; खेडवळ; अशिक्षित.
(क) ना.–कुग्राम; लहान गाव.

**हां** (ಹಾಂ) (क) अ.–दम धरून; होकार; मान्यतादर्शक शब्द.

**हाकु** (ಹಾಕು) (क) धा.–पाणी देणें; ओतणें; नाहणें; वाढणें; देणे; वाटप करणें; अन्न वाढणें; ठेवणें; धारण करणें;
—**आट** (ಆಟ) (क) ना.–तोंडा तोंडी, बोलाचाली; भांडण.
—**आडु** (ಆಡು) (क) धा.–भांडणें; बोलण्यावरून बोलणे वाढणें.

**हाग** (ಹಾಗ) (क) ना.–रुक्का; रुवा; दोन पै किमतीचें नाणें.

**हागलहण्णु** (ಹಾಗಲಹಣ್ಣು) (क.) ना.–कारलें; कोवळीक; पक्वावस्था; म्हातारपण.

**हागु** (ಹಾಗು) (क) अ.–आणि; तसेच; त्या प्रकारें; त्या रीतीनें.

**हाजर** (ಹಾಜರ) (अ.दे.) ना.–अस्तित्व; आगमन; उपस्थिति हजर.

**हाटक** (ಹಾಟಕ) (सं) ना.–सोने; सुवर्ण.

**हाडु** (ಹಾಡು) (क) धा.–गाणें; पद म्हणणें; सुरावर म्हणणें; आलाप घेणें.
(क) ना.–गति; पद; पद्य; स्थिति; अवस्था; पाडफळ; परिणामाची पूर्वस्थिति.
—**इके** (ಇಕೆ) (क) ना.–संगीत; गीत-गायन; गीतगान; चीजगायन.

**हाडुग** (ಹಾಡುಗ) (क) ना.–गृहस्थ; निवासी; बिस्तरा टाकलेला; गवई; गायक.

**हाडुगार** (ಹಾಡುಗಾರ) (क) ना.–संगीत शास्त्रज्ञ; चीज बांधणारा; कवि; पद करणारा.

**हाडेहगलु** } (ಹಾಡೆಹಗಲು)
**हाडुहगलु** } (ಹಾಡುಹಗಲು)(क) अ.–पूर्ण उजेडीं; भर दुपारी.

**हाणाहणि** (ಹಾಣಾಹಣಿ) (क) ना.–मारामारी; डोकेफोड; हातघाई; द्वंद्व.

**हातोरे** (ಹಾತೊರೆ) (क) ना.–गडबड करणें; आतुर होणें; अति आशा करणें.

**हादर** (ಹಾದರ) (क) ना.–नर्तन; नाच; व्यभिचार; वेश्या-व्यवसाय.

**हादरि** (ಹಾದರಿ) (क) ना.–वेश्या; व्यभिचारिणी; पाटलवृक्ष.

**हादितप्पु** (ಹಾದಿತಪ್ಪು) (क) धा.–नीति सोडणें; पाय घसरणें; वाकडे पाऊल पडणें; दुर्मार्ग घेणें; भलत्या वाटेला जाणें.

**हादिहोय्क** (ಹಾದಿಹೊಯ್ಕ) (क) ना.–वाटमाऱ्या; लुटारू; दरोडेखोर.

**हादिहोक** (ಹಾದಿಹೋಕ) (क) ना.–यात्रेकरू; वाटसरू; पांथस्थ; प्रवासी; भटक्या.

**हान** (ಹಾನ) (सं) ना.–त्याग; विसर्जन; वियोग; सुटका.

**हानि** (ಹಾನಿ) (सं) ना.–तोटा; नाश; अकल्याण; धृष्टता.

**हाय्** (यु) (ಹಾಯ್ [ಯು]) (क) धा.–ओलांडणें; पलीकडे जाणें; शिंगाने मारणें; चालून जाणें; ढकलणें.
(क) अ.–आनंदून; प्रेमपूर्वक; निर्वेधपणें;
(क) ना.–शीड.

**हायन** (ಹಾಯನ) (सं) ना.–वर्ष; वत्सर; किरण; कर; अक्षता; तांबडे तांदूळ

**हायि** (ಹಾಯಿ) (क) ना.–नावेचे शीड.

**हायिकु** (य्क) (ಹಾಯಿಕು [ಯ್ಕು]) (क) धा.–पाणी देणें; नाहणें; वाटणें; वाटप करणें; देणें; वाढणें; ठेवणें; धारण करणें. 'हाकु' पहा.

**हार** (रु) (ಹಾರ [ರು]) (क) धा.–उडी मारणें; गगनविहार करणें; उडणें; परीक्षणें; निरीक्षणें; इच्छिणें; आशा दाखवणें; पार होणें.

**हार** (ಹಾರ) (सं) ना.–सर; माला; अपहार; लूट; नागवणूक; हिसकणी; पराजय.

**हारक** (ಹಾರಕ) (सं) वि.–अपहार करणारा; नाश करणारा. 'कोंडोय' पहा.
(सं) ना.–चोर; दुष्ट; सर; माला.

**हारयिसु** (य्सु) (ಹಾರಯಿಸು [ಯ್ಸು]) (क) धा.–आशा धरणें; इच्छा करणें; अपेक्षणें; वाट पाहात राहणें.

**हारय्के** (ಹಾರಯ್ಕೆ) (क) ना.–आशा; अपेक्षा; इच्छा; आकांक्षा.

**हारविसु** (ಹಾರವಿಸು) (क) धा.–इच्छिणें; आसावणें; अपेक्षिणें; प्रतीक्षा करणें. 'हारयिसु' पहा.

**हारहाकु** (ಹಾರಹಾಕು) (क) धा.–माला घालणें; लग्न करून घेणें; विवाह करणें.

**हारहीरावळि** (ಹಾರಹೀರಾವಳಿ) (सं) ना.–सोन्यामोत्याचा दागिना; कंठी.

**हारि** (ಹಾರಿ) (सं) वि.–अपहरण करणारा; नागविणारा; मनोहर; तथ्य असलेला; सुंदर.

**हारिणि** (णी) (ಹಾರಿಣಿ [ಣೀ]) (सं) ना.–अपहरण करणारी; मन आकर्षिणारी.

**हारित** (ಹಾರಿತ) (सं) वि.–देणगी दिलेला; समर्पित; आकृष्ट.
(सं) ना.–एक जातीचा पारवा; हिरवा रंग.

**हारिद्र** (ಹಾರಿದ್ರ) (सं) ना.–पिवळा रंग; हळद; हळदुळा रंग; कदंबवृक्ष.

**हारिसु** (ಹಾರಿಸು) (क) धा.–उडवणें; वर पाठवणें; उडवून लावणें, टोलवणें.

**हारीत** (तक) (ಹಾರೀತ [ತಕ]) (सं) ना.–हिरवें पारवळ; कबूतर; मैना; कवडा; धर्मशास्त्र लिहिणारा एक ऋषि; कपट; फसवणूक; वंचना.

**हारु** (ಹಾರು) (क) धा.–हसणें; उडणें; आकाशसंचार करणें; निरीक्षणें; मार्ग शोधणें; इच्छिणें; पार पडणें.

**हारुव** (ಹಾರುವ) (क) वि. आकाशसंचारी; समजून घेणारा; उडणारा.
(क) ना.–निरीक्षक; ज्ञानी; वेदपारंगत; विप्र; ब्राह्मण; पक्षी.

**हारे** (रेगोलु) (ಹಾರೆ [ರೆಗೋಲು]) (क) ना.–जमीन उकरण्याची पहार.

**हार्द** (ಹಾರ್ದ) (सं) वि. हृदयासंबंधीं.
(सं) ना. स्नेह; प्रेम; सन्मान; इंगित.

**हार्दिक** (ಹಾರ್ದಿಕ) (सं) वि.–मनःपूर्वक; स्नेहाळ; हृदयसंबंधीं.
**—स्वागत** (ಸ್ವಾಗತ) (सं) ना.–अंतःकरणपूर्वक सत्कार; सुस्वागत.

**हार्दिक्य** (ಹಾರ್ದಿಕ್ಯ) (सं) ना.–हृदिकाचा पुत्र; कृतवर्मा.

**हार्प** (ಹಾರ್ಪ) (अ. दे.) ना.–वीणा; तंतुवाद्य

**हाल** (लु) (ಹಾಲ [ಲು] क्षीर; अमृत; रस; दूध;

**हालवक्कि** (ಹಾಲವಕ್ಕಿ) (क) ना.–शकुंतपक्षी; शकुनपक्षी.

**हालहवालु** (ಹಾಲ್‌ಹವಾಲು) (अ. दे.) ना.–खबरबात; अडीअडचण; परिस्थिति.

**हाल** (ला) **हल** (ಹಾಲ [ಲಾ] ಹಲ) (सं) ना.–कालकूट विष; महाविष; जहर.

हालुबेळ्ळि (ಹಾಲುಬೆಳ್ಳಿ) (क) ना.–चोख चांदी; शुद्ध रुपें.
हाले (ಹಾಲೆ) (क) ना.–कानाची पाळी; एक वृक्ष; पातळ पत्रा.
हाव (ಹಾವ) (सं) ना.–शृंगारचेष्टा; हावभाव; मुरका; अंगविक्षेप; प्रणयसंकेत.
हा(पा) वडिग (ಹಾ[ಪಾ]ವಡಿಗ) (क) ना.–साप खेळवणारा; गारुडी; सापेरा.
हावभाव (ಹಾವಭಾವ) (सं) ना.–अंगचेष्टा; मनोभाव प्रगटविणारे अंगविक्षेप; अभिनय; मुखाविर्भाव.
हा (पा) वसे (ಹಾ [ಪಾ] ವಸೆ) (क) ना.– पाण्यांत वाढणारें शेवाळ; अंतर्गंगा.
हावळि (ಹಾವಳಿ) (क) ना.–काट; त्रास; कटकट; पीडा; उपद्रव, हल्ला; रान उठणें.
हावाडिग (ಹಾವಾಡಿಗ) (क) ना.–गारुडी; सर्प खेळवणारा.
हावुगे (ಹಾವುಗೆ) (क) ना.–पादुका; खडावा.
हावुमीन (ಹಾವುಮೀನ) (क) ना.–सर्पाकार मासा.
हास (ಹಾಸ) (सं) ना.–हास्य; हसणें; संतोष; चेष्टा; हास्यरसाचा स्थायीभाव.
(क) ना.–पाश; फास; बंधन; गळ्यांतील पट्टा.
हासक (ಹಾಸಕ) (सं) ना.–हंसे पिकवणारा; विदूषक; चेष्टेखोर; थट्टेखोर.
हासडिय (ಹಾಸಡಿಯ) (सं) ना.–बदक; पाणकोंबडी.
हासरे (ಹಾಸರೆ) (क) ना.–फरशी; चिरा; 'पासरें' पहा.
हासलु (ಹಾಸಲು) (क) ना.–बिछाना; अंथरूण; हशील; किंमत; वेच; क्रय.
हासंगि (ಹಾಸಂಗಿ) (क) ना.–द्यूत; द्यूतपट; पगडीपट; सोंगटी.
हासि (सु) गे (ಹಾಸಿ [ಸು] ಗೆ) (क) वि.–चटई; हातरी; डाळीं; पलंग; बांबूचा प्रदेश; वेताचा प्रदेश.
हासु (ಹಾಸು) (क) धा.–पसरणें; सोडवणें; गाठ सोडणें; अंथरणें.
(क) ना.–लांब धागा; पांजण; आडवा धागा; प्रोत.
—गल्लु (ಗಲ್ಲು) (क) ना.–फरशी; चिरा.
—बंडे (ಬಂಡೆ) (क) ना.–फरशी; लादी; 'पडुसिले' पहा.
हासुगेय् (ಹಾಸಗೆಯ್) (क) धा.–वाढणें; पसरणें; विस्तरणें; सोडणें; ढिले करणें.
हासुहोक्कु (ಹಾಸುಹೊಕ್ಕು) (क) ना.–गाढ संबंध; जिवश्च कंठश्च स्नेही; ताणाबाण्याचें सूत; अन्योन्य.
हासुहोय्यू (ಹಾಸುಹೊಯ್ಯು) (क) धा.–झुलवणें; न थांबतां झुलत राहणें; डोलणें; डुलवणें.
हांसे (ಹಾಂಸೆ) (क) ना.–शेवाल; शैवाल; शेवाळी चिखल.
हासे (ಹಾಸೆ) (क) ना.–सुंदर पलंग; बैठक.
—मणे (ಮಣೆ) (क) ना.–बिछायत; पलंग.
हास्तिक (ಹಾಸ್ತಿಕ) (सं) वि.–हत्तीविषयक; हत्तीचा कळप; माहूत; 'हस्तिप' पहा.
हास्य (ಹಾಸ್ಯ) (क) ना.–हंसें; चेष्टा; थट्टामस्करी; विनोद; नवरसापैकी एक काव्यरस.
हास्यका (गा) र (ಹಾಸ್ಯಕಾ[ಗಾ]ರ) (क) ना.–विदूषक; बहुरूपी; विनोद करणारा; गुड्डी.
हाहाकार (ಹಾಹಾಕಾರ) (क) ना.–'अय्यो!' असा ध्वनि; गोंधळ; घोळ; प्रलाप; गडबड.
हाहे (ಹಾಹೆ) (क) ना.–बुबूळ; डोळ्यांतील बाहुली; कनीनिका; पायातील तोडा; साखळी; शीड; बाहुली.
हाळ् (ಹಾಳ್) (क) ना.–नाश; विध्वंस; वाळवंट; नापीक जमीन; गादा; शेतविभाग.
हाळि (ಹಾಳಿ) (सं) ना.–पंक्ति; क्रम; पाळी; गादा; कागद; पातळ रुंद फळी.
हाळिहसुगे (ಹಾಳಿಹಸುಗೆ) (क) वि.–विवेक; विचार; योग्य वाटणी; रास्त वाटप.
हाळि (ळ) त (ಹಾಳಿ[ಳ]ತ) (क) वि.–मापाला येणारा; मान्यता पावणारा; पसंत पडण्यासारखे.
हाळु (ಹಾಳು) (क) ना.–नाश; अकल्याण; भूमी; नापीक जमीन; निःसारता.
हाळे (ಹಾಳೆ) (क) ना.–चपटी वस्तु; कागद; पत्रा; वाफा.
हिं (हिन्) (ಹಿಂ[ಹಿನ್]) (क) अ. प्राचीन; पूर्वकालीन; मागचा.
हिंस (ಹಿಂಸ) (सं) ना.–सिंह.
हिंसक (ಹಿಂಸಕ) (सं) ना.–त्रास देणारा; हानि करणारा; खुनी; वध करणारा.
हिंसिसु (ಹಿಂಸಿಸು) (क) धा–हिंसा करणें; त्रास देणें; पीडणें; ठार मारणें.
हिंसे(सा) (ಹಿಂಸಾ[ಸೆ]) (सं) ना–पीडा; उपद्रव; त्रास; कटकट; हिंसा; वध; खून.
हिंस्र (ಹಿಂಸ್ರ) (सं) वि–क्रूर; पीडक; त्रास देणारा; हत्यारी; खुनी; पशु; हिंसक प्राणी; श्वापद.
–पशु, प्राणी (ಪಶು–ಪ್ರಾಣಿ) (सं) ना–क्रूरतेनें ठार मारणारा वाघ, सिंह वगैरेसारखे श्वापद.
हिकलु (ಹಿಕ್ಕಲು) (क) ना–खळगा; खड्डा; उडी; नर्तन; विंचरण; पृथक्करण; निवडण.
हिकळ (ಹಿಕ್ಕಳ) (क) ना–फुगारा; मोठेपणा; गर्व; अहंकार.
हिकालु (ಹಿಕ್ಕಾಲು) (क) ना–काळ्याचे फाटे; पाट; चर.
हिक्कु (ಹಿಕ್ಕು) (क) धा–विंचरणें; वेगवेगळे करणें; अलग करणें; सोडवणें.
हिक्के (ಹಿಕ್ಕೆ) (क) ना–लेंडी.

हिग्गालिसु (ಹಿಗ್ಗಾಲಿಸು) (क) धा.—दूर करणें; उवडणें; फुगणें; गर्व करणें.

हिग्गलु (ಹಿಗ್ಗಲು) (क) ना—गर्व; अहंकार; गौरव; फुगारा; फुंज.

हिग्गु (ಹಿಗ್ಗು) (क) धा—आनंदणें; हुरूप येणें; दूर होणें; वेगळे होणें;

हिंगट्टु (ಹಿಂಗಟ್ಟು) (क) ना—मागें बांधलेलें गाठोडें.

हिंकट्टु (ಹಿಂಕಟ್ಟು) (क) धा—पाठीमागें हातमिठी करणें; मागील बाजूस हातावर हात दुमडणें.

हिंगरणे (ಹಿಂಗರಣೆ) (क) ना—पीछेहाट; पुच्छगति.

हिंगार (ಹಿಂಗಾರ) (क) ना—सुपारीचें फूल; सुपारीचा थाट.

हिंगारु(र्) (ಹಿಂಗಾರು [ರ್]) (क) ना—ईशान्येकडील पाऊस; अडवळे; वळवाचे पाऊस.

हिं(पिं)गु (ಹಿಂ [ಪಿಂ]ಗು) (क) धा.—मागें सरणें; कमी होणें; वाळून जाणें.

—इसु (ಇಸು) (क) धा—अपमान करणें; हुंगवणें; कमी लेखणें; अवहेलणें.

हिंगुरु (ಹಿಂಗುರು) (क) ना—पिंगळा; एक जातीचा पक्षी.

हिंगोट्टु (ಹಿಂಗೋಟು) (क) ना—होडीचे मागचें टोक; नावेचा मागील भाग.

हिचुकु (ಹಿಚುಕು) (क) धा—किमचणें; कींवचणें; दाबणें; घासणें; उगाळणें; शक्ति कमी होणें; वठणीवर आणणें.

हिजरिशक (ಹಿಜರಿಶಕ) (अ.दे.) ना.—महंमदीयांची कालगणना.

हिंचु (ಹಿಂಚು) (क) धा.—मागे राहणें; मागें होणें.
(क) अ.—मागें; पूर्वी; नंतर; त्यानंतर.

हिंचुमुंचु (ಹಿಂಚುಮುಂಚು) (क) अ.—मागेपुढें; कांकूं; टंगळमंगळ करून

हिंचे (ಹಿಂಚೆ) (क) अ.—नंतर; त्यानंतर.

हिंजरि (ಹಿಂಜರಿ) (क) धा.—मागे सरणें; पाय मागें घेणें; धैर्य सोडणें; खालीं येणें.

हिं (हं) जि (ಹಿಂ [ಹಂ] ಜಿ) (क) ना.—पेळू; कापसाचे पेळू.

हिंजीर (ಹಿಂಜೀರ) (सं) ना.—हत्तीच्या पायाला बांधण्याची साखळी; साखळदंड.

हिंजु (ಹಿಂಜು) (क) धा.—कसर काढणें; साफ करणें; पिंजणें; विंचरणें; निवडणें.

हिट्टु (ಹಿಟ್ಟು) (क) ना.—पीठ; पिष्ट; आहारपदार्थ; लाह्यपीठ; लाहीपीठ; भाकरी; मूद.

हिडलु (ಹಿಡಲು) (क) ना.—झाडणी; केरसुणी; साळोती.

हिडि (ಹಿಡಿ) (क) धा.—धरणें; स्पर्शणें; थांबवणें; हातीं धरणें.
(क) ना.—हत्तीण; मूठ; खड्गाची मूठ; झाडणी.

हिडिकंड (ಹಿಡಿಕಂಡ) (क) ना.—चूर; तुकडा.

हिडिके (ಹಿಡಿಕೆ) (क) ना.—मुष्टी; मूठ; कप बरणी वगैरेसारख्या वस्तूचा कान.

हिडिलु (ಹಿಡಿಲು) (क) ना.—केरसुणी; झाडणी; साळोती; फड्या.

हिडिबोडे (ಹಿಡಿಬೊಡೆ) (क) धा.—बंधनांत सांपडणें; तुरुंगांत पडणें.

हिडिसु (ಹಿಡಿಸು) (क) धा.—हातांत देणें; हाती घेववणें; धरवणें; मिळण्यासारखे करणें; मनाला येणें; पसंत पडणें; समाविष्ट होणें; समजणें.

हिडिंबा(बे) (ಹಿಡಿಂಬಾ [ಬೆ]) (सं) ना.—भीमपत्नी; हिंडबाची बहीण; घटोत्कचमाता.

हिडुवलि (ಹಿಡುವಳಿ) (क) ना.—जमिनीची मालकी; स्वाधीनता.

हिडुवलिगार (ಹಿಡುವಳಿಗಾರ) (क) ना.—भूमालक; जमीनदार

हिडुडु (ಹಿಡುಡು) (क) ना.—बाणफेक; अटक; धरपकड.

हिणि (णिल्) (णिलु (ಹಿಣಿ[ಣಿಲ್] [ಣಿಲು]) (क) ना.—वशिंड ककुद्; बाणाची दोरी; मौर्वी; जटा; केशभार; मयूरपुच्छ.

हिंडलु (ಹಿಂಡಲು) (क) अ.—हुंबरून; हंबारून; गाईला बोलवून
(क) ना.—झड; पाऊस, झाडी.

हिंडु (ಹಿಂಡು) (क) धा.—पिळणें; पाणी ओतणें; धार काढणें; दूध पिळणें; त्रास देणें; अडचण आणणें.
(क) ना.—समूह; कळप; थवा; जमाव.

हिंडुकूडु (ಹಿಂಡುಕೂಡು) (क) धा.—एकत्र होणें; जमणें; एकवटणें.

हिंडुबले (ಹಿಂಡುಬಲೆ) (क) ना.—जाळ्यांची विविधता; अनेक प्रकारची जाळी.

हिंडे (ಹಿಂಡೆ) (क) ना.—पिंड; भाताची मूद; श्राद्धान्न.

—कूळु (ಕೂಳು) (क) ना.—श्राद्धाचें भोजन.

हित (ಹಿತ) (सं) वि.—ठेवलेले; घालून दिलेले.
(सं) ना.—कल्याण; क्षेम; लाभ; शुभ; मंगल; मान्यता; योग्यता.

हितशत्रु (ಹಿತಶತ್ರು) (सं) ना.—वैरी; मैत्री दाखवणारा शत्रु; गोमुखी व्याघ्र; अस्तनीतील निखारा.

हितैषि (ಹಿತೈಷಿ) (सं) ना. हितचिंतक; कल्याण इच्छिणारा; शुभेच्छु.

हितोपदेश (ಹಿತೋಪದೇಶ) (सं) ना.—कल्याणकर बोध; संस्कृत बोधकथा संग्रह.

हित्ताळि (ळे) (ಹಿತ್ತಾಳಿ[ಳೆ]) (क) ना.—पितळ; जस्त व तांबें याचा मिश्रधातु.

हित्तिलु (ಹಿತ್ತಿಲು) } (क) ना.—परसु; शेत.
पिंतिलु (ಪಿಂತಿಲು) }

हिदुकु (ಹಿದುಕು) (क) धा.—मुरगळणें; पिळणें.

हिंताल (ळ) (ಹಿಂತಾಲ [ಳ]) (सं) ना. – तालवृक्ष.
हिं (पिं) ते (ಹಿಂ [ಪಿಂ] ತೆ) (क) अ. – पूर्वी; प्राचीन काळी; प्रथम.
हिंदिक्किकोळ् (ಹಿಂದಿಕ್ಕಿಕೊಳ್) (क) धा. – मागें ठेवणें; रक्षण करणें; राखून ठेवणें; पाठीशी घालणें; तोंड देणें.
हिंदुगळे (ಹಿಂದುಗಳೆ) (क) धा. – मागे सरणें; मागे रेटणें; पार होणें; ओलांडणें; निराकरणें; तिरस्कार करणें. 'अळुगळे' पहा.
हिंदुगोळ् (ಹಿಂದುಗೊಳ್) (क) धा. – अनुसरणें; आश्रय देणें; साथ करणें; बरोबर जाणें.
हिंदुमुंदुनोडु (ಹಿಂದುಮುಂದುನೋಡು) (क) धा. – अनमान करणें; संदेह करणें; संकोचणें; जाग्रत राहाणें; मागेपुढें पहाणें; कां कूं करणें.
हिंदे (ಹಿಂದೆ) (क) अ. – मागें; मागून; पूर्वी; प्राचीन काळीं; नंतर.
(क) वि. – पुढें; नंतरचे.
हिंदेगे (ಹಿಂದೆಗೆ) (क) धा. – मागे सरणे; पाय मागें घेणें; भिऊन पळणें.
हिंदोल (ಹಿಂದೋಲ) (सं) ना. – झोपाळा; झोका; झुरी; पाळणा; उत्तरदेशीय संगीत राग.
हिन् (ಹಿನ್) (क) अ. – पूर्वी; प्राचीन काळी; या अर्थी 'हिंदु' शब्दाचा सामासिक आदेश.
हिन्नि (ಹಿನ್ನಿ) (क) ना. – मागचा भाग; बाणाचे पुच्छ.
हिन्नेले (ಹಿನ್ನೆಲೆ) (क) ना. – पूर्वपीठिका; पाया; पूर्व संदर्भ; पार्श्वभूमि.
हि (पि) प्पलि (ಹಿ [ಪಿ] ಪ್ಪಲಿ) (क) ना. – एक मूळ; एक जातीचे रोप; धान्य रोप. पिंपळी.
हिप्पे (ಹಿಪ್ಪೆ) (क) ना. – सोपट; साल; सत्त्व काढून घेतलेला चोथा.
हिम (ಹಿಮ) (सं) ना. – धुकें; दंव; थंडी; गारवा; शैत्य; रसकापूर
—किरण–कर (ಕಿರಣ–ಕರ) (सं) ना. – चंद्र
—गिरि (ಗಿರಿ) (सं) ना. – हिमालय.
—दीधिति–प्रभ (ದೀಧಿತಿ–ಪ್ರಭ) (सं) ना. – चंद्र.
—नग (ನಗ) (सं) ना. – हिमालय.
—वत् (ವತ್) (सं) ना. – हिमशीत; गार; थंड; हिमालय.
—वालुके (ವಾಲುಕೆ) (सं) ना. – रसकापूर 'पच्चकर्पूर' पहा.
हिमांशु (ಹಿಮಾಂಶು) (सं) ना. – चंद्र; रसकापूर 'पच्चकर्पूर' पहा.
—शेखर (ಶೇಖರ) (सं) ना. – चंद्रशेखर; शंकर.
हिमानि (ಹಿಮಾನಿ) (सं) ना. – हिम नग; हिमगिरि.
हिमिके (ಹಿಮಿಕೆ) (क) ना. – दहिवर; धुके.
हिंपु (ಹಿಂಪು) (क) ना. – अहंकार; मोठेपणा; महत्त्व; वैभव; आरास; शोभा.
हिंबल (ಹಿಂಬಲ) (क) ना. – पिछाडीचे सैन्य; पाठिंबा; पाठबळ; दुजोरा.
हिम्मुरि (ಹಿಮ್ಮುರಿ) (क) धा. – मागें हातमिठी करणें; पाठीकडे हातावर हात घेणें.
हिम्मेट्टु (ಹಿಮ್ಮೆಟ್ಟು) (क) धा. – मागें सरणें; हटणें; पराजय होणें.
हिय्यालि (ಹಿಯ್ಯಾಳಿ) (क) वि. – क्षुद्र; नीच; तिरस्करणीय.
हिय्यालिके (ಹಿಯ್ಯಾಳಿಕೆ) (क) ना. – तिरस्कार; तुच्छता; निंदा; दूषण; छी: थू.
हिय्यालिसु (ಹಿಯ್ಯಾಳಿಸು) (क) धा. – तिरस्कार करणें; वरचढ दाखवणें.
हिरण (ಹಿರಣ) (सं) वि. – सोन्याचे; सौवर्ण; कांचनमय.
(सं) ना. – ब्रह्म;
(क) ना. – हरिण; मृग.
हिरण्मय (ಹಿರಣ್ಮಯ) (सं) वि. – सुवर्णखचित; सोन्याचे.
हिरण्य (ಹಿರಣ್ಯ) (सं) ना. – सोनें; द्रव्य; संपति; पिवळा धोतरा.
—गर्भ (ಗರ್ಭ) (सं) ना. – ब्रह्म; अज.
—गर्भा (र्भे) (ಗರ್ಭಾ[ರ್ಭೆ]) (सं) ना. – भूदेवी; वसुंधरा
हिरि (ಹಿರಿ) (क) धा. – बाहेर काढणें; बाहेर ओढणें; फोडणें; नाश करणें; सोडणें; समूळ उपटणें; कुस्करणें
(क) वि. – श्रेष्ठ; मोठा; वडीलधारा; वयस्कर.
हिरिमे (ಹಿರಿಮೆ) (क) ना. – मोठेपणा, श्रेष्ठता; अहंकार; नळी; पिचकारी; पंप.
हिरिय (ಹಿರಿಯ) (क) ना. – वडिलधारा; वयस्कर.
हिलालु (ಹಿಲಾಲು) (अ. दे.) ना. – मशाल; पलिता; मोठा दिवा; टेंभा; पोत.
हिसि (ಹಿಸಿ) (क) धा. – दडपणें; फोडणें; चिरणे; उडी मारणें; रुंद करणें.
हिसुकु (ಹಿಸುಕು) (क) धा. – मुरगळणें; पिळणें; कुस्करणें; किचणें; मर्दन करणें; पीडणें.
हि (पि)सुण (ಹಿ [ಪಿ] ಸುಣ) (क) ना. – पिशुनता; चहाडखोर; निंदक; दुर्जन.
हिसुणिके (ಹಿಸುಣಿಕೆ) (क) ना. – निंदा; चहाडी; चोरी.
हिसुणु (णू) (ಹಿಸುಣು[ಣೂ]) (क) वि. – चहाडखोर; निंदक; चोर.
हिसे (ಹಿಸೆ) (अ. दे) ना. वाटा; भाग; अंश; हिस्सा.
हिळलु (ಹಿಳಲು) (क) ना. – बैलाचें वशिंड; 'हिणिलु' पहा.
हिळि (ಹಿಳಿ) (क) धा. – पिळणें; मुरगळणें; फाडणें; चिरणें; नाश करणें.
हिळिगे (हेळिगे) (ಹಿಳಿಗೆ [ಹೇಳಿಗೆ]) (क) ना. – बुट्टी; ढोली; परडी; समळी; टोपली.
हिळुकु (ಹಿಳುಕು) (क) ना. – मस्ती; माज; गर्व; धनुष्याची मूठ.

ही (ಹೀ) (क) अ. – छी; छे; हा; अय्यो; तिरस्कार; आनंद वा आश्चर्य दर्शक अव्यय शब्द.

हीगळे (ಹೀಗಳೆ) (क) ना. – निंदा; टोचणी; हेंगवणी; तिरस्कार.

हीचु (जु) (ಹೀಚು [ಜು]) (क) धा. – फुगणें; गर्व करणें; कष्ट करणें; अतिश्रम करणें.

(क) ना. – लहान; कच्चे फळ; तोर; मिडी; कोवळे फळ.

हीन (ಹೀನ) (सं) वि. – लहान; कमी प्रतीचा; वाण असलेले; टंचाईचे; उणें; टाकाऊ; नीच.

हीनयिसु (ಹೀನಯಿಸು) (क) धा. – कमी करणें; लहान करणें; तिरस्काररणें; निंदणें; अपमान करणें; न लेखणें; महत्त्व न देणें.

हीनाय (ಹೀನಾಯ) (सं) ना. – हीनपण, क्षुद्रपणा; अल्पत्व; न्यूनता; वाण; नीचपणा; लहानपण.

हीप (ಹೀಪ) (क) ना. – वामभाग; डावी बाजू.

हीयाळि (ಹೀಯಾಳಿ) (क) वि. 'हीहाळि' पहा.

हियाळिसु (ಹೀಯಾಳಿಸು) (क) धा. – तुच्छ करणें; हिणवणें; तिरस्कारणें; वसरणें. 'तेगळु' पहा.

हीर् (रु) (मि) (ಹೀರ್ [ರು] [ಮಿ]) (सं) धा. – ओढून घेणें; हिसकावून घेणें; शोषणें; झुरका मारणें; तोंडांत ओढून घेणें; चोखणें.

हीर (ಹೀರ) (सं) ना. – वज्र; वज्रायुध; सर्प; सिंह; माळ.

हीरक (ಹೀರಕ) (सं) ना. – वज्र; माणिक.

हीरा (राव) ळि (ಹೀರಾ [ರಾವ] ಳಿ) (सं) ना. – हिऱ्याचा हार; माणकाची माळ.

हीरु (ಹೀರು) (क) धा. – चोखणें; ओढून घेणें; शोषून घेणें; झुरका घेणें.

हीलि, (पीलि) (ಹೀಲಿ [ಪೀಲಿ]) (क) ना. – मोरपिसारा; मेंड.

हीहाळ (ಹೀಹಾಳ) (क) ना. – संबंध; संपर्क; कंटाळा; अडचण; विचार; आलोचना.

हीहाळगेडिसु (ಹೀಹಾಳಗೆಡಿಸು)(क) ना. – निंदणें; तिरस्कारणें; अपमान करणें.

हीहाळि (ಹೀಹಾಳಿ) (क) वि. – तिरस्कारणीय; तुच्छ; नीच.

हुकुं (कुमु) (ಹುಕುಂ [ಕುಮು]) (अ. दे) ना. – आज्ञा; अनुज्ञा; हुकूम.

हुगि (ಹುಗಿ) (क) धा. – पुरणें; गाडणें; दृष्टिआड करणें.

हुगिलु (ಹುಗಿಲು) (क) अ. – जाऊ नको.

(क) ना. – कोरलेलें भोंक; तुटलेला भाग; 'पुगिलु' पहा. द्वार; प्रवेश; गमन.

हुगिलुकरे (ಹುಗಿಲುಕರೆ) (क) धा. – चिरणें; भोक पाडणें.

हुगिलुगळे (ಹುಗಿಲುಗಳೆ) (क) धा. – चिरून टाकणें; फाडणें; चिरणें.

हुगु (पुगु) (ಹುಗು [ಪುಗು]) (सं) धा. – प्रवेशणें; आंत जाणें; घुसणें; ढकलणें.

हुगुलु (ಹುಗುಳು) (क) ना. – तोंडात आलेले फोड.

हुग्गि (पुळिग) (ಹುಗ್ಗಿ [ಪುಳಿಗ]) (क) ना. – गव्हाची खीर; खिचडी; पोळी; खीर; 'पोंगलु' पहा.

हुग्गिग (ಹುಗ್ಗಿಗ) (क) ना – मस्ती आलेला; माजलेला; शक्तिशाली; दुरहंकारी.

हुच्चु (ಹುಚ್ಚು) (क) ना. – बुद्धिभ्रम; अत्यासक्ति; अतिमोह; वेड; खुळेपणा.

हुच्चुहोळे (ಹುಚ್ಚುಹೊಳೆ) (क) ना. – वेडा पूर; दुथडी वाहणारा प्रवाह.

हुचेद्दहरि (ಹುಚ್ಚೆದ್ದುಹರಿ) (क) धा. – तोंडाला पाणी सुटणें अत्यातुर होणें; अभिष्टाप्रमाणें करणें; निलाजरेपणें आशा करणें.

हुट्टि(ट्टु) गे (ಹುಟ್ಟಿ [ಟ್ಟು] ಗೆ) (क) ना. – वस्त्रप्रावरण; पोषाख; अंगावरील वस्त्र.

हुट्टु, (पुट्टु) (ಹುಟ್ಟು [ಪುಟ್ಟು]) (क) धा. – जन्म घेणें; उत्पन्न करणें; अस्तित्वात येणें; उत्पन्न होणें; अंकुरणें; कोंब येणें; संभवणें; घडून येणें; उमटणें; उगवणें; दिसून येणें.

(क) ना. – मोहोळे; मधाचे पोळें; नाव चालवण्याचे साधन. लाकडाची पळी; डाव; उत्पत्ति; संभव.

हुट्टिसु (ಹುಟ್ಟಿಸು) (क) धा. – जन्म देणें; कल्पित कथा रचणें.

हुट्टुमेट्टु (ಹುಟ್ಟುಮೆಟ್ಟು) (क) ना. – जन्मकथा; जनन इतिहास; जन्मस्थळ; झाले सवरलेले.

हुट्टुवळि (ಹುಟ್ಟುವಳಿ) (क) ना. – उत्पन्न; लाभ; आदाय; जन्मेवळ; जन्मवंश.

हुट्टुह (ಹುಟ್ಟುಹ) (क) ना. – जनन; उत्पत्ति; लाभ; उत्पन्न.

हुडि (पुडि) (ಹುಡಿ[ಪುಡಿ]) (क) ना. लहान कण; पूड; धूळ; फुलाचा पराग.

हुडिगूडु (ಹುಡಿಗೂಡು) (क) धा. – मातीत मिसळणें; नाश पावणें; प्रयत्न व्यर्थ होणें.

हुडुकु (पुडुंकु) (ಹುಡುಕು [ಪುಡುಂಕು]) (क)धा. – शोधणें; निरीक्षण करणें; शोधणें; 'पुडुक' पहा.

हुडुकुळि (ಹುಡುಕುಳಿ) (क) ना. – संशोधक; शोध लावणारा.

हुडुग (ಹುಡುಗ) (क) ना. – मुलगा; पोरगा; पोर.

हुडुगाट (ಹುಡುಗಾಟ) (क) ना. – पोरखेळ; पोरचेष्टा; पोराटकी;

हुडुगि (गे) (ಹುಡುಗಿ [ಗೆ]) (क) ना. – मुलगी; कन्या; लहान पोरगी.

हुडुगु (ಹುಡುಗು) (क) धा. – स्वच्छ करणें; झाडणें; साफ करणें; केर काढणें; लोटणें.

हुणिसे (पुणिंचे) (ಹುಣಿಸೆ [ಪುಣಿಂಚೆ]) (क) ना. – चिंच; चिंचेचें झाड.

